# श्रीदत्तोपासनाकल्पद्रुम

## प्रथम खंड




लेखक

**म. म. पं. पांडुरंगशास्त्री गणेशशास्त्री गोस्वामी**

न्यायाचार्य, आयुर्वेदाचार्य, साहित्यविशारद,

भूतपूर्व वरिष्ठ शास्त्री, डेक्कन कॉलेज, पुणे



शके १८९९ : सन १९७७

मूल्य ३२ रुपये



पं. गोस्वामी यांना शृंगेरीपीठस्थ जगद्गुरु श्रीशंकराचार्य आशीर्वाद देत आहेत.

# अर्पणपत्रिका



श्रीसन्त एकनाथ महाराज यांचा अभिनव
अवतार, भक्तकार्यकल्पद्रुम त्रिभुवनानंद
अद्वैत-अभेद-निरंजन-निर्गुण-निरालंब-
परिपूर्ण प्रेममूर्ति, ब्रह्मलीन
श्रीशांतारामभाऊ जयवंत, भिवंडी
यांच्या करकमलीं सादर समर्पण.

# लेखकाचें हृद्‌गुंजन

बरींच वर्षें झालीं. माझे एक स्नेही कै. श्री. बाबूराव वैद्य, संचालक आनंद प्रेस, सातारा, हे मी सातार्‍यास असतांना माझ्याकडे दत्तात्रेयसहस्रनाम हें प्रकरण घेऊन आले व म्हणाले, 'हें मला शुद्ध करून द्या म्हणजे मी तें मुद्रित करून प्रकाशित करीन.' मीं तें वाचून पाहिलें. तें बर्‍याच ठिकाणीं अशुद्ध असल्याची मनांत शंका आली. त्यामुळें अनधिकारानें शुद्ध करण्याचा प्रयत्न करणे इष्ट वाटलें नाहीं. पुढें डेक्कन कॉलेजमध्यें कार्य करीत असतांना एके दिवशीं शिपायानें टपाल आणून दिलें. त्यांत एक मोठें पाकिट होतें तें मीं उलगडून पाहिलें. त्यांतहि हेंच दत्तात्रेयसहस्रनाम दृष्टीस पडलें. प्रेषकानें हें सहस्रनाम शुद्ध करून आम्हांला नित्य पाठासाठीं पाठवून द्यावें अशी सूचना केलेली होती. पुन्हां दोन दिवसांनीं आणखी एक टपाल आलें. त्यांतहि त्याच सहस्रनामाचीं पानें व तें शुद्ध करण्याची सूचना होतीच.

ह्या सर्व सूचना परस्परसंबंध नसलेल्या व दूर अंतरावर राहणार्‍या लोकांकडून आलेल्या होत्या.

मीं मनामध्यें विचार केला कीं, एकाच अर्थाच्या ह्या सूचना अपरिचित व अत्यंत दूर राहणार्‍या अशा लोकांकडून मजकडे कां बरें येत आहेत ? "व्यतिषजति पदार्थानांतरः कोऽपि हेतुः" या न्यायानें यामागें कांहीं तरी अनिर्वचनीय ईश्वरसंकेत असला पाहिजे. त्याशिवाय ओळखपाळख कांहीं नसतांना, ही गोष्ट कशी घडून येणार ? तेव्हां आपण या ईश्वरी संकेताची उपेक्षा न करतां हें काम हातीं घ्यावें, असा संकल्प केला. कर्ताकरविता तो एक परमात्मा सर्व कांहीं आपल्या कृपेनें पूर्ण करून घेईल, अशा दृढ श्रद्धेनें मी त्या सहस्रनामाचें अवलोकन करूं लागलों. भगवत्कृपेनें जसेजसें अवलोकन होत चाललें तसतसा अवघड वाटणार्‍या स्थलांचाहि उलगडा होऊं लागला.

मनाला प्रसन्नता वाटूं लागली. पुढें पुढें आपल्या मनांतील संशयांचा निरास करण्यासाठीं मी निरनिराळ्या विद्वानांच्या गांठीभेटी घेऊं लागलों; परंतु असें आढळून आलें कीं, आपण ज्या ज्या स्थळांचा जो विचार करून ठेवावा त्याच्या पलीकडे कोणी जात नाहीं. तेव्हां हेंहि एक ईश्वरकृपेचेंच लक्षण आहे, असें समजून मीं अधिक नेटानें कामास लागलों.

दत्तात्रेयसहस्रनाम लिहितां लिहितां मनांत असें विचार येऊं लागले कीं, हें सहस्रनाम केवळ शुद्ध करण्यापेक्षां याच्या अर्थाचेंहि विवेचन करून तें भक्तजनांच्या हातीं द्यावें. त्याप्रमाणें सहस्रनामाच्या अर्थाचें विवेचनहि भगवत्कृपेनें लिहून पूर्ण झालें. आतां त्याच दत्तात्रेयप्रभूंच्या कृपेनें अंतःकरणातील संकल्पांचा विस्तार होऊं लागला. दत्तात्रेयकवच, दत्तात्रेयहृदय, दत्तात्रेयवज्रपंजर आणि दत्तात्रेयांच्या

एकाक्षरी मंत्रापासून तो दत्तयंत्रामध्यें निर्दिष्ट केलेल्या मालामंत्रापर्यंत सर्व मंत्रांचे विधिविधान आणि बीजाक्षरांसह सर्व मंत्रांचे अर्थहि देण्याची इच्छा उत्कटतेनें निर्माण झाली. प्रभुकृपेनें ते कार्य पूर्ण झाल्यानंतर असें वाटूं लागलें कीं, दत्तात्रेयांच्या या उपासनापद्धतीबरोबरच जर आपण दत्तात्रेयांचें विस्तृत चरित्र सुसंगत रूपानें देऊं शकलों तर फारच बरें होईल.

उपास्यदेवतेचें महत्त्व हृदयांत ठसल्याशिवाय भक्ताच्या हातून तन्मयतेनें उपासना घडणार नाहीं. उपासनेला दृढ श्रद्धेची जोड असावी लागते व दृढ श्रद्धेसाठीं उपास्यदेवतेचें महत्त्व अंतःकरणांत पक्कें ठसावें लागतें. हें महत्त्व हृदयांत ठसण्या-करितां इष्टदेवतेचें चरित्र सांगोपांग डोळ्यापुढें उभें असावें लागतें. प्रकृतस्थळीं दत्तात्रेयप्रभूंचें अशा तऱ्हेचें चरित्र कोठें उपलब्ध होईना. श्रीसंत कावडीबाबा यांचा 'दत्तप्रबोध' हा ग्रंथ उपलब्ध झाला. तसेच प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती यांनीं लिहिलेलें दत्तमाहात्म्यहि उपलब्ध झालें. अलीकडे सावंतवाडीकडील एका सद्गृहस्थानें लिहिलेलें 'श्रीदत्तचरित्रसार' हेंहि पुस्तक उपलब्ध झालें. पण हे सगळे ग्रंथ ओवी-बद्ध आहेत. गद्यात्मक ग्रंथ मात्र उपलब्ध झाला नाहीं म्हणून सरल-सुबोध असें श्रीदत्तात्रेयांचें गद्यात्मक चरित्र होणें आवश्यक आहे, असें वाटूं लागलें. पुष्कळ भक्तांना तर दत्तात्रेयांच्या चरित्राची यथार्थ कल्पनाच नसते. कांहीं लोक दत्तात्रेयांचा अवतार इसवी सनाच्या आसपास झाला असें मानतात. पण हें मान्य करणें अत्यंत चूक आहे. तसेंच कांहीं लोक श्रीपादश्रीवल्लभ आणि प. प. नरसिंहसरस्वतीस्वामी यांनाच दत्त मानतात; पण हीहि कल्पना बरोबर नाहीं. कारण यांच्याहि पलीकडे पुष्कळ पुरातनकालीन वाङ्मयांत दत्तात्रेयांचा उल्लेख आढळतो. तसेंच दत्तात्रेय देवता अवैदिक असल्याचाहि भ्रम कित्येकांच्या बुद्धींत दिसून येतो. तसेंच दत्तात्रेय ही देवता एकमुखी आहे का त्रिमुख आहे? दोन हातांची आहे का सहा हातांची आहे असाहि कित्येक लोक वाद घालीत बसतात. हे सर्व वाद अज्ञानमूलक असल्यामुळें त्याज्य आहेत, हीहि गोष्ट स्पष्ट होणें आवश्यक आहे. इत्यादि सर्व गोष्टींचा विचार सांगोपांग व सप्रमाण असा या ग्रंथांत केलेला आहे. शिवाय दत्तात्रेयांच्या अवतारां-संबंधीं भिन्न भिन्न कथानकेंहि उपलब्ध आहेत. त्या सर्वांचा विरोधपरिहार करून त्यांचा वस्तुनिष्ठ समन्वय घालण्याचाहि प्रयत्न केलेला आहे. शिवाय दत्तात्रेय हे एक नसून अनेक झालेले आहेत, याहि मिथ्या कल्पनेचा निरास करून शक्य तितकी वास्तववादाची कल्पनाहि सयुक्तिकपणें वाचकांच्या पुढें मांडलेली आहे. ती वाचकांना उपयुक्त वाटेल.

दत्तात्रेयांच्या जन्मस्थानासंबंधी असलेले मतभेद लक्षांत घेऊन त्यांचाहि युक्तिक समन्वय दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

अत्रिमहर्षींचें चरित्र मराठींत उपलब्ध नसल्यामुळें आम्हीं या ठिकाणीं त्याचाहि विस्तृत विचार केलेला आहे. कारण ते आमच्या चरित्रनायकाचे पिताच आहेत.

जगामध्यें ईश्वरीशक्तींचा अनेक रूपानें आविष्कार होत असल्याचें दिसून येतें. त्यांतल्या त्यांत सर्जनशक्ति, पालनशक्ति आणि संहरणशक्ति या तीन शक्तींना प्राधान्य आहे. तिवईवर पाण्यानें भरलेला घडा जसा ठेवावा त्याप्रमाणें वरील तीन शक्तींवर सर्व विश्वाच्या घडामोडी चाललेल्या असतात. वरील तीन शक्ति सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचीं प्रतीकें आहेत. वरील तिन्ही गुणांचें समीकरण होऊनच हें विश्व मूर्तस्वरूपानें नटलेलें दिसत आहे. ब्रह्मा, विष्णु आणि शंकर या तीन देवताहि वरील तिन्ही शक्तींचा मूर्तिमंत आविष्कार मानल्या जातात. या तिन्ही देवतांचे एकत्रीकरण म्हणजेच त्रिमूर्ति भगवान् दत्तात्रेय होत. तेल, वात आणि तैलपात्र यांचा एकत्र समागम होऊन अग्निसंपर्कानें जशी ज्योत निर्माण व्हावी आणि सर्वत्र प्रकाश पडावा त्याप्रमाणे सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांचें एकत्रीकरण होऊन दत्तात्रेयांच्या ठिकाणीं ज्ञानरूप ज्योतीचा प्रकाश आविर्भूत झाला, व सर्व जीवांना आपआपल्या कर्तव्याचे भान होऊं लागलें. अज्ञानाचा निरासहि होऊं लागला. हेंच गुरुदेव दत्तात्रेयांचें जीवनकार्य ठरलें व त्यांना स्वाभाविकच गुरुत्व प्राप्त झालें. तेव्हांपासून ते गुरुदेवदत्त या शब्दानें ओळखले जाऊं लागले.

"गृणाति उपदिशति ज्ञानं इति गुरुः" अथवा "गिरति निरासयति अज्ञानं इति गुरुः" अशा गुरु शब्दाच्या दोन व्याख्या प्रसिद्ध आहेत. दत्तात्रेयांकडून प्राप्त होणाऱ्या ज्ञानांतूनच सर्व जीवांचें बौद्धिक विकसन होत असतें म्हणून सर्व जीवांनीं दत्तात्रेयांची उपासना करणें जीवनविकासाच्या दृष्टीनें अत्यंत अवश्यक आहे. सृष्टीच्या आरंभकालापासून प्रलयकालापर्यंत मानवांचें अस्तित्व असल्यामुळें गुरुदेवांचें ज्ञानदानाचें अवतार कार्य अखंड अविरतपणें चाललेलें आहे, हेंच इतर सर्व अवतारांपेक्षां दत्तात्रेयांच्या अवताराचें वैशिष्टच आहे. गर्भामध्यें असलेल्या अर्भकाच्या पोषणासाठीं जशी मातेच्या शरीरांत दुग्धोत्पत्तीची योजना परमेश्वरानें केली त्याचप्रमाणें मानवसृष्टि निर्माण होतेवेळीं ज्ञानविकासाची उपयुक्तता लक्षांत घेऊन परमेश्वरानें नित्य ज्ञानदान करण्याचें कार्य हातीं घेतलें व तें दत्तात्रेयांच्या रूपानें अवतरलें.

वरील कार्य अविरत चालू असल्यामुळें दत्तात्रेयांच्या अवताराची परिसमाप्ति कोठेंच आढळून येत नाहीं. याच दृष्टीनें दत्तात्रेयांना अविनाश हे अन्वर्थक नांव प्राप्त झालेलें आहे.

दत्तात्रेयांचें कार्य जागतिक असलें तरी त्यांची कार्यभूमि भारतवर्ष असल्याचें दिसून येतें. भारतवर्षातील सर्व समाजाच्या एकीकरणाचें कार्य त्यांनीं मोठ्या कौशल्यानें हाताळलेलें आहे. सर्व समाजाला त्यांनीं आपल्या संप्रदायाशीं निगडित केलेंअसल्याचें त्यांच्या चरित्रांत स्पष्टपणे पहावयास सांपडतें. योगविद्या, वैराग्य आणि ज्ञान या गुणांना त्यांच्या कार्यामध्यें स्थायीभाव प्राप्त झालेला आहे. स्वायंभुव मन्वन्तरापासून विद्यमान कालापर्यंत सोमवंश आणि सूर्यवंश या दोन्ही वंशांतील राजे लोकांना

त्यांनीं अनुगृहीत केलेलें आहे. अनेक देवर्षि, ब्रह्मर्षि व राजर्षि यांना मार्गदर्शन करून कृतार्थ केलेलें आहे. या सर्व गोष्टी त्यांच्या या चरित्रांत पहावयास सांपडतील. हें चरित्र कांहीं ठिकाणीं दुर्बोध वाटलें तरी त्याची उपेक्षा न करतां पुनः पुनः अवलोकन केल्यास तें सुबोध वाटेल व कालांतरानें या ग्रंथाच्या रहस्याचा उलगडा होईल. कांहीं ठिकाणीं शब्दपुनरुक्ति अथवा अर्थपुनरुक्ति झालेली दिसेल, पण ती अंतःकरणांत विषयांचा प्रकाश निर्माण होण्याच्या दृष्टीनें आवश्यक असल्याचें आढळून येईल. सनकसनंदनापासून तों श्रीरंगावधूत व श्री योगिराज गुळवणीमहाराज यांच्यापर्यंत श्रीदत्तात्रेयांच्या चरित्राची जडणघडण होत आलेली आहे. प्रत्यक्ष शेष अथवा श्रुति देखील जेथें मौनावतात तेथें त्या अफाट चरित्राचें साकल्यानें माझ्यासारखा पामर काय वर्णन करूं शकेल ? जें झालें तें त्याच्याच कृपेनें झालेलें आहे. म्हणून "त्वदीयं वस्तु गोविंद तुभ्यमेव समर्पये" असें म्हणून मीहि ही अल्पशी वाङ्मयपूजा त्याच्याच चरणकमलीं अर्पण करीत आहे.

प्रस्तुत ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं खासदार श्री. जयंतराव टिळक यांचें मला बहुमोलाचें सहाय्य झालेलें आहे. तें शब्दांनीं सांगूं शकत नाहीं. त्यांनीं जर मनावर घेतलें नसतें, तर हा ग्रंथ वाचकांच्या हातीं येऊंच शकला नसता. म्हणून श्री. जयंतराव टिळक यांना माझे हार्दिक धन्यवाद.

श्री. क. वि. पित्रे, श्री. भास्करराव कुलकर्णी, इत्यादि सर्व मंडळींना मी मनःपूर्वक धन्यवाद देत आहे. त्याचप्रमाणें अमरावती येथील पू. मा. श्री. माणिकताई भिडे (सर मोरोपंत जोशी यांच्या कन्या), तसेच श्री. दत्तोपंत डहाणूकर, मुंबई; भाऊसाहेब टिळक, मुंबई; श्री. अमृतराव जोशी, मुंबई; श्री. छगनराव बरवे, मुलुंड; श्री. जिलकर, पुणे; इत्यादि स्नेही मंडळींनीं ग्रंथमुद्रणाच्या कामीं जे यथाशक्ति आर्थिक साहाय्य केलें त्याबद्दल मी त्या सर्वांना धन्यवाद देत आहे. ग्रंथलेखनाच्या कामीं चि. चंद्रशेखर, एम्. ए., एम्. एड्. याचें मला बरेच साहाय्य झालेलें आहे. याबद्दल मी त्याला सकौतुक धन्यवाद देत आहे. त्याचप्रमाणें श्रीमती द्वारकाबाई केशवराव पाटील यांनीहि लेखन-वाचनाच्या दृष्टीनें बरेंच साहाय्य केलें असल्यामुळें त्यांनाहि मी मनःपूर्वक धन्यवाद देतो. त्याचप्रमाणे डेक्कन कॉलेज येथील ग्रंथपाल श्री. बेलसरेसाहेब यांनीं मला आवश्यक ते ग्रंथ पुरविले. प्रसंगीं लंडन येथील ग्रंथालयांतून मला दुर्मिळ असलेला ग्रंथ 'दत्तात्रेयसर्वस्व' हा मायक्रोफिलम करून मागविला व माझ्या गैरसोयी दूर केल्या याबद्दल त्यांना धन्यवाद देतों.

शेवटीं वाचकांस नम्र विनंती कीं, त्यांनीं ग्रंथाचें परिशीलन करावें. त्यांतील दोष अवश्य लक्षांत घ्यावेत. ते दोष लेखकाला अवश्य लिहून कळवावेत. पुढील आवृत्तीच्या वेळीं त्यांचा विचार अवश्य होईल. दोष द्यावयाचाच झाल्यास सूक्ष्म निरीक्षण करूनच तो द्यावा. लेखकाचा भाव लक्षांत घेऊन दोषान्वेषण करणें हें समर्थनीय ठरतें. भाव लक्षांत घेऊन दिलेला दोष लेखकाच्या चित्ताला तापदायक होत नसतो. इत्यलम्पल्लवितेन.

पुणें, दि. ३१ ऑक्टोबर. १९७७ म. म. पांडुरंगशास्त्री गोस्वामी

# विषयानुक्रमणिका

---

ॐ सद्गुरवे श्रीदत्तात्रेयाय भगवते नमः।



## प्रथमस्कन्ध

नत्वा श्रीगुरुदेवदत्तमनिशं स्मृत्वा तदीयान् गुणान्
कृत्वा भक्तियुतं च पूजनमपि ध्यात्वाऽथ रूपं मुदा
दत्त्वा चित्तमिदं तदीयचरिते भूत्वैकचित्तस्त्वहं
दत्तोपासनसंज्ञकं सुफलदं कल्पद्रुमं कल्पये ॥ १ ॥

यस्य प्रसादान्मूढोऽपि बृहस्पतिसमो भवेत्।
तं भक्तवत्सलं नौमि दत्तात्रेयं जगद्गुरुम् ॥ २ ॥

श्रीदत्तोपासनाकल्प-द्रुमोऽयं भजतां सदा।
श्रीदत्तकृपया भूयात् सर्वकामप्रपूरकः ॥ ३ ॥

अखण्डं सच्चिदानन्दं परं ब्रह्मैव केवलम्।
श्रीदत्तात्रेयरूपेण ब्रह्माण्डेषु विराजते ॥ ४ ॥

अज्ञानतिमिराद्घोराज्जीवानुद्धर्तुमेव यः।
अवतीर्णः कृपासिन्धुर्दययाऽस्मिन्महीतले ॥ ५ ॥

तस्यावतारचरितं तत्त्वज्ञानं परात्मनः।
उपासनाविधिश्चापि ग्रन्थेऽस्मिन्सुनिरूप्यते ॥ ६ ॥

कर्ता प्रेरयिता साक्षाद्दत्तात्रेयो न संशयः ।
सकलाभीष्टसिध्यर्थं तमेवाहं समाश्रये ॥ ७ ॥

अनन्यभक्तियुक्तानां सर्वाभीष्टफलप्रदः ।
अनसूयात्रिपुत्रोऽयं दत्तात्रेयो न संशयः ॥ ८ ॥

त्रिगुणात्मा त्रिमूर्तिश्च दत्त एवंविधोऽपि सन् ।
त्रिगुणातीततां तद्वदैकरूप्यं प्रयच्छति ॥ ९ ॥

यस्य नास्त्युपमा क्वापि दुःखमोचनकर्माणि ।
सर्वानन्दप्रदात्रे च तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १० ॥

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें चरित्र अतिशय गहन असून तत्त्वज्ञानहि पण अत्यंत गंभीर आहे. श्वेतवाराहकल्पाच्या आदिकालापासून विद्यमानकालापर्यंत या चरित्राची घडण अव्याहत परंपरेनें चालूच आहे. त्यांच्या अवतारकार्याचा आदि-काल पहावयास सांपडतो, पण परिसमाप्तीचा काल मात्र पहावयास सांपडत नाहीं. अनेक पुराणांतून भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें जन्मचरित्र व अवतारकार्य कमी-अधिक प्रमाणांत वर्णन केलेलें पाहावयास सांपडतें; पण त्यांच्या निर्याणकालाचें अथवा अवतारपरिसमाप्तीच्या प्रसंगाचें कोठेंच वर्णन केलेलें आढळत नाहीं. हेंच एक प्रमाण श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या अवतारस्वरूपाचें अस्तित्व व कार्य अद्यापिहि प्रचलित असल्याचें सिद्ध करण्यास पुरेसें आहे.

जिज्ञासू भक्तजनांना जीवशिवाचें ऐक्य घडवून आणणाऱ्या तत्त्वज्ञानाचा उप-देश करून त्यांना जीवन्मुक्तीचा आनंद प्राप्त करून देणें हेंच भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या अवताराचें मुख्य प्रयोजन असल्याचें दिसून येतें. क्वचित् प्रसंगीं भक्तजनांच्या ऐहिक वैभवाच्या वासना प्रबल असतील तर त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणें ऐहिक वैभव देऊनहि शास्त्रविहित पद्धतीनें तें वैभव कसें भोगावें याचा उपदेश करून जीवांना विषयवासनांच्या जटिलजालांतूनहि ते मुक्त करतात. प्रल्हाद, आयुराजा, कार्तवीर्य, तसेंच राजा अलर्क इत्यादि अनेक उदाहरणें या बाबतींत पहावयास सांपडतात. यावरून पारमार्थिक कल्याणाबरोबरच भक्तजनांचें ऐहिक कल्याण करणें हेंहि त्यांच्या अवताराचें प्रयोजन दृष्टीस पडतें.

कित्येक देवता भक्तजनांना केवळ ऐहिक कल्याण प्राप्त करून देण्यास समर्थ असतात; पण त्यांच्या ठिकाणीं पारमार्थिक कल्याण प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य नसतें, तर कित्येक देवता पारमार्थिक कल्याण प्राप्त करून देतील; पण त्यांच्या ठिकाणीं ऐहिक वैभवाच्या कामना पूर्ण करण्याचें सामर्थ्य असल्याचें दिसत नाहीं; पण गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या ठिकाणीं मात्र ऐहिक व पारमार्थिक उभय-

विध कल्याण प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य असल्याचें स्पष्टपणें दिसून येत आहे. यावरून या अवताराचें कांहीं आगळेंच वैशिष्टच आहे यांत तिळमात्रहि संशय नाहीं. अशा या अलौकिक आणि अद्वितीय अवताराचें चरित्र, तत्त्वज्ञान आणि पुरातन वाङ्मयांत उपलब्ध होणारी विविध प्रकारची उपासना-पद्धति या सर्वांचें सुबोध विवेचन करून भक्तजनांचे मनोरथ पूर्ण करणारा असा हा श्रीदत्तोपासनाकल्पद्रुम, सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्याच प्रेरणेनें प्रवृत्त होऊन भक्तजनांच्या करकमलीं सादर केला जात आहे.

## मङ्गलाचरणविचार

आपला संकल्पित ग्रंथ निर्विघ्नपणें परिसमाप्त होऊन तो लोकोपयुक्त व्हावा व त्याचा सर्वत्र प्रसार व्हावा या उद्देशानें फार पुरातनकालापासून ग्रंथाच्या आरंभीं मंगलाचरण करण्याची पद्धति आहे. यद्यपि ग्रंथाच्या आरंभीं मंगलाचरण करूनहि कांहीं ग्रंथ समाप्त होऊं शकले नाहींत व कांहीं ग्रंथांच्या आरंभीं मंगलाचरण नसतांहि ते ग्रंथ परिसमाप्त झाले असल्याचें दिसून येतें. यावरून मंगलाचरणाचा ग्रंथसमाप्तीशीं कांहीं संबंध नाहीं अशी शंका मनांत येते. पण ही शंका बरोबर नाहीं. ग्रंथाच्याच आरंभीं काय कोणत्याहि मोठ्या कार्याच्या आरंभीं सत्प्रवृत्त लोक नास्तिक दिसत असले अथवा स्वतःला ते नास्तिक म्हणवीत असले तरी मंगलाचरण करतातच. बंगला अथवा नवी इमारत बांधण्याच्या पूर्वीं व नंतर ते भूमिपूजन व वास्तुशान्ति करीत असल्याचें दृष्टीस पडतें. कारखाना अथवा यंत्र नव्यानें सुरू करीत असतांना स्वस्ति-पुण्याहवाचन, देवपूजन व यंत्रपूजन ते करीतच असतात. याच न्यायानें उत्तम ग्रंथाच्या आरंभीं त्यांच्या हातून मंगलाचरण होणें हें स्वाभाविकच आहे. तें मंगलाचरण क्वचित् ग्रंथाच्या आरंभीं निर्दिष्ट केलेलें असेल अथवा क्वचित् नसेलहि. कित्येक वेळां मनांतल्या मनांतहि ईश्वराचें स्मरण करून कार्याला आरंभ केला जातो. क्वचित् गुरूंचें स्मरण करूनहि ग्रंथाला आरंभ केला जातो. क्वचित् प्रसंगीं ओम्, अथ, श्री इत्यादि मंगलवाचक शब्दांचाहि ग्रंथाच्या आरंभीं निर्देश केला जातो. तेंहि एक प्रकारचें मंगलाचरणच होय. प्राचीन परंपरेंत प्रायः "श्रीगणेशाय नमः", "श्रीसरस्वत्यै नमः", "श्रीगुरुभ्यो नमः", "इष्टदेवताभ्यो नमः", "कुल-देवताभ्यो नमः" इत्यादि वाक्यें ग्रंथाच्या आरंभीं असतातच. हें सर्व मंगला-चरणच होय.

यावर कोणी असें विचारील कीं अहो ! नास्तिक लोक देवच मानीत नाहींत मग ते मंगलाचरण काय करणार ? यावर उत्तर असें कीं तत्त्वतः या जगांत नास्तिक कोणी नाहींच. प्रत्येकाचें श्रद्धास्थान हें भिन्न भिन्न असूं शकतें. ज्याचें जें श्रद्धास्थान असेल त्याचेंच तो कृतज्ञतेनें स्मरण करून कार्याला आरंभ करीत असतो. तें त्याचें मंगलाचरणच होय. या जगांत नास्तिक जर कोणीच नाहीं तर नास्तिक शब्द तरी

आला कोठून? अशी जर कोणी शंका घेईल तर त्यावर उत्तर असें कीं, विद्यामद, धनमद, अभिजनमद, तारुण्यमद इत्यादि अनेक मदांनीं कांहीं लोकांची मति ही धुंद होऊन जाते; त्या वेळीं त्यांना देव, गुरु, माता, पिता, इत्यादि कांहीं भान उरत नाहीं. त्याच वेळीं त्यांना नास्तिक असें म्हटलें जातें. ही अवस्था सर्वकाळ टिकत नसते. जेव्हां त्यांची बुद्धि भानावर येते तेव्हां ते पुन्हां आस्तिक बनतात. नास्तिकहि जीवावरचें संकट आलें म्हणजे ईश्वराचें स्मरण करीतच असतो. मंगलाचरण करूनहि जेथें ग्रंथसमाप्ति झाली नसेल तेथें मंगलाचरणाच्या मानानें विघ्नांचें प्राबल्य कल्पिणें अपरिहार्य आहे.

मंगलाचरण न करितांहि जेथें ग्रंथाची परिसमाप्ती झाली असेल तेथें ग्रंथकर्त्यानें मंगलाचरण मनांतल्या मनांत केलेंच असलें पाहिजे अथवा ग्रंथसमाप्तीला अनुरूप अशा तऱ्हेचें मंगलाचरणानें प्राप्त होणारें पूर्वसुकृत त्याच्या पदरीं असलें पाहिजे असें कल्पावें लागतें. कांहीं लोक विघ्ननाश हेंच मंगलाचरणाचें कार्य मानतात. ग्रंथसमाप्ति ही ग्रंथकर्त्यांच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असते. असो. कांहींहि असलें तरी कोणतेंहि कार्य निर्विघ्नपणें परिसमाप्त होण्यासाठीं कार्याच्या आरंभीं मंगलाचरण होणें आवश्यक असतें ही गोष्ट निर्विवाद होय.

नमस्कार, आशीर्वाद, क्षेमचिंतन, स्तुति, प्रार्थना इत्यादि मंगलाचरणाचे अनेक प्रकार आहेत. प्रकृतस्थलीं शिष्टाचारपरंपरेला अनुसरून आम्ही देखील श्रीदत्तोपासनाकल्पद्रुमाच्या आरंभीं भक्तियुक्त अन्तःकरणानें सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या अलौकिक ज्ञानस्वरूप ज्योतिर्मय मूर्तीचें ध्यान करून दहा श्लोकांनीं मंगलाचरण करीत आहोंत. या संस्कृत दहा श्लोकांचा सारांश असा :—

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या चरणारविंदीं अहोरात्र वंदन करून आणि त्यांच्या अनंत गुणांचें यथामति स्मरण करून तसेंच भक्तियुक्त अन्तःकरणानें त्यांचें पूजन करून आणि अनन्य प्रेमानें त्यांच्या स्वरूपाचें चिंतनहि करून माझें चित्त मी त्यांच्या चरित्रांत गढविलेलें आहे. अगदीं मी त्यांच्याशीं एकचित्त झालों आहें. त्यांच्याशिवाय मला दुसरें कांहीं सुचतहि नाहीं व दिसतहि नाहीं. अशा एकचित्तानें मी भक्तजनांना उत्तम फल देणाऱ्या "श्रीदत्तोपासनाकल्पद्रुम" या नांवाच्या ग्रंथाची रचना करीत आहें.

ज्याच्या कृपाप्रसादानें मूर्ख देखील बृहस्पतीसारखा विद्वान् आणि वक्ता बनतो त्या जगद्‌गुरु भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेयांची मी भक्तियुक्त अतःकरणानें स्तुति करीत आहें. जे कोणी या दत्तोपासनाकल्पद्रुमाचा आश्रय घेतील त्यांचे सर्व मनोरथ श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या कृपेनें हा कल्पद्रुम पूर्ण करील. अखंड सच्चिदानन्दरूप केवल परब्रह्मच श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या रूपानें या ब्रह्माण्डामध्यें विराजत आहे. अज्ञानरूपी घोर अंधकारांतून जीवांचा उद्धार करण्याकरितांच दयासागर भगवान् श्रीदत्तात्रेय हे दयेनें या भूतलावर अवतीर्ण झालेले आहेत. परमात्मस्वरूप असलेल्या त्या भगवान्

दत्तात्रेयांचें अवतारचरित्र, तत्त्वज्ञान आणि उपासनापद्धति या सर्वांचें या ग्रंथामध्यें सुबोध रीतीनें निरूपण केलें जात आहे. कर्ते आणि प्रेरक साक्षात् भगवान् दत्तात्रेयच आहेत यांत संशय नाहीं. माझे सकल मनोरथ पूर्ण होण्यासाठीं मी त्यांच्याच चरणारविंदांचा आश्रय घेत आहें. अनन्यभक्तीनें संपन्न असलेल्या भक्तजनांचे सकल मनोरथ पूर्ण करण्याला समर्थ असे हे श्री. सती अनसूयेचे व श्री अत्रिमहर्षींचे पुत्र भगवान् श्री दत्तात्रेयच आहेत; यांत संशय नाहीं.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे स्वतः त्रिगुणात्मक आणि त्रैमूर्तस्वरूप असले तरी भक्तजनांना ते गुणत्रयांच्या पलीकडे नेतात. त्यांच्या कृपेनें भक्त निस्त्रैगुण्य बनतात. तसेच भक्तजनांना ते ऐकरूप्य म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्मस्वरूपताहि प्राप्त करून देतात असा त्यांचा स्वभाव आहे. भक्तजनांना दुःखजालांतून मुक्त करण्याच्या कामीं ज्यांना त्रैलोक्यांतहि कोणाची उपमा देतां येत नाही, जे सर्वांना सर्वातिशायीब्रह्मानन्दाचा लाभ करून देतात त्या श्रीगुरु दत्तात्रेयांना माझा नमस्कार असो. असा या वरील दहा श्लोकांचा तात्पर्यार्थ आहे.

## अनुबन्धचतुष्टय

कोणताहि ग्रंथ विद्वानांना व वाचकांना आदरणीय व्हावा म्हणून ग्रंथकाराला अधिकारी, संबंध, विषय आणि प्रयोजन या चार गोष्टी ग्रंथाच्या आरंभी दाखवाव्या लागतात. प्रस्तुत ग्रंथाचा अधिकारी कोण आहे हें अवश्य सांगावें लागतें. अनधिकाऱ्याच्या हातीं ग्रंथ पडला म्हणजे अर्थाचा अनर्थ होतो. त्याचप्रमाणें ग्रंथांतला विषयहि ग्रंथारंभीं अवश्य सांगावा लागतो. नाहीं तर वाचकांच्या मनांत जिज्ञासेला अवसर मिळत नाहीं. निष्फळ कार्य करण्याला कोणीच प्रवृत्त होत नसल्यामुळें ग्रंथकर्त्याला ग्रंथाच्या वाचनाचें व अभ्यासाचें फलहि सांगावें लागतें. फळालाच संस्कृतमध्यें प्रयोजन असें नांव आहे. या सर्वांबरोबरच संबंधाचाहि निर्देश करणें अत्यंत आवश्यक असतें. ग्रंथ आणि ग्रंथांतील विषय यांच्यामध्यें प्रतिपाद्य-प्रतिपादकभाव हा संबंध असावा लागतो. ग्रंथाचें नांव एक व प्रतिपादन केलेला विषय भलताच; अशी विसंगति असतां कामा नये. विषय आणि अधिकारी यांच्यामध्यें जिज्ञास्य-जिज्ञासुभाव हा संबंध असणें आवश्यक आहे. अधिकारी हा जर जिज्ञासु नसेल अथवा ग्रंथांतील विषय जर जिज्ञास्य नसेल तरी देखील ग्रंथनिर्मिति निरर्थक ठरते.

प्रयोजन म्हणजे फल. ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाचें सुस्पष्ट ज्ञान होणें हें ग्रंथाचें प्रत्यक्ष फल होय. त्यानंतर इष्टदेवतेच्या आराधनेनें आणि तत्त्वज्ञानाच्या चिंतनानें भुक्ति आणि मुक्ति या फलांचा लाभ होणें हीं कालांतरानें प्राप्त होणारीं फलें होत. तात्पर्य, ग्रंथ सुबोध असावा व त्यांतील विधिविधानें हींहि फलदायी असावींत. असें असेल तरच तो ग्रंथ आदरणीय ठरतो. अशा रीतीनें ग्रंथरचनेचें कार्य हातीं घेतलें कीं, ग्रंथकाराला अधिकारी, प्रयोजन, विषय आणि संबंध या चारी गोष्टींचा

ग्रंथारंभीं विचार करावाच लागतो. इतका या चार गोष्टींचा ग्रंथरचनेशीं निकट संबंध असल्यामुळें या चारी गोष्टींना अनुबंधचतुष्टय असें म्हटलें जातें. "अनुबध्यते इति अनुबन्धः". ग्रंथरचनेशीं सातत्यानें संलग्न होणारा विषय अनुबंध या शब्दानें ओळखला जातो.

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे केव्हां अवतरले, कसे अवतरले त्यांचीं विविध चरित्रें कोणत्या स्वरूपाचीं आहेत, त्यांनीं कोणाकोणाला उपदेश केला, तसेंच त्यांचें तत्त्वज्ञान काय आहे, त्यांचा स्वभाव कसा आहे व त्यांची उपासना कशी करावी ? उपासनेचीं कोणकोणतीं अंगें आहेत ? स्तोत्र, मंत्र, कवच, हृदय, वज्रपंजर, सहस्र-नाम, पूजा, व्रत, हवन वगैरे सर्व गोष्टींचें साधकाला ज्ञान असणें आवश्यक आहे. हाच विषय या ग्रंथांत प्रतिपादन केलेला असल्यामुळें या ग्रंथाचा हाच प्रतिपाद्यविषय समजावा. या प्रतिपाद्य विषयाची उत्कट जिज्ञासा अंतःकरणांत असेल तोच या ग्रंथाचा अधिकारी होय.

हा ग्रंथ वाचल्यानंतर जिज्ञासा तृप्त होणें व मनाला आनंद वाटणें हें या ग्रंथाचें तात्कालिक प्रत्यक्ष पदरांत पडणारें फल होय. यांतील तत्त्वज्ञानाचें वाचन अथवा श्रवण करून साधकानें मनन आणि निदिध्यासन केलें तर त्याला यथार्थ आत्म-स्वरूपाचा साक्षात्कार होऊन नित्य आणि निरतिशय अर्थात् सर्वातिशायी अशा आनंदाचा लाभ होतो, हें या ग्रंथाचें अत्यंत स्पृहणीय असें दुसरें फल होय. या ग्रंथाच्या उपासनाखंडांत निर्देशिलेल्या विधिविधानांचें एखाद्या योग्य अशा अधिकारी सद्-गुरूंच्या मार्गदर्शनानें आपआपल्या अधिकाराप्रमाणें अनुष्ठान केल्यास सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा कृपाप्रसाद होईल व त्यांच्या कृपेनें साधकाचे ऐहिक व पारलौकिक सर्व मनोरथ पूर्ण होतील. अशा रीतीनें हा ग्रंथ साधकांना साक्षात् सत्वर अथवा कालान्तरानें उत्तम फल देणारा आहे.

## सृष्टिरचना विचार

परमेश्वरानें ज्या वेळेला सृष्टि निर्माण केली त्याच वेळेला सृष्टीमध्यें जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या जीवनाची व जीवनविकासाचीहि तरतूद करून ठेवलेली आहे असेंच सृष्टीच्या रचनेवरून निश्चितपणें म्हणतां येतें. यावर कोणी म्हणेल कीं, परमेश्वरानें सृष्टि निर्माण केली आहे हें कशावरून ? परमेश्वर तरी आहे कां ? असल्यास तो कसा आहे ? त्याला हात, पाय, कान, नाक, डोळे वगैरे अवयव आहेत का ? त्याला मन व बुद्धि आहे का ? मानवाप्रमाणेंच त्याच्या ठिकाणीं ज्ञान, इच्छा आणि कृति हे धर्म आहेत का ? हें सर्व त्याच्या ठिकाणीं असेल, तर तो आमच्या प्रमाणेंच शरीरी अर्थात् देहयुक्तहि असणार ! आणि तो जर देहयुक्त आहे असें मानलें तर मग त्याला तुमच्याआमच्याप्रमाणें जन्म आणि मरणहि असणार ! परमेश्वराच्या ठिकाणीं हें सर्व आहे असें मानलें तर मग तो परमेश्वर आणि सामान्य

मानव यांत भेद काय राहिला ? असे किती तरी प्रश्न मनामध्यें निर्माण होतात. शिवाय परमेश्वर सृष्टि निर्माण करतो असें म्हटल्यास तो सृष्टि कां निर्माण करतो ? सृष्टि निर्माण करणें व नंतर तिच्या जीवनाची व जीवनविकासाची व्यवस्था करीत बसणें यापेक्षां ती निर्माण नाहींच केली तर काय बिघडणार ? सृष्टि परमेश्वरानें निर्माण केली आहे असें मानलें तर आणखी दोन बिकट प्रश्न पुढें येऊन उभे राहतात. ते असे : जर सृष्टि परमेश्वर निर्माण करीत असेल तर तो या सृष्टीमध्यें वैषम्य कां निर्माण करतो ? कोणी जन्मतःच सुखी असतात तर कोणी जन्मापासूनच दुःखी असतात. कोणी जन्मतःच निरोगी असतात तर कोणी जन्मापासूनच अनेक रोगांनी व्यापलेले असतात. कोणी जन्मजात श्रीमंत असतात तर कोणी जन्मापासूनच दारिद्र्याने गांजलेले असतात. कोणी स्वभावतःच सुंदर आणि देखणे असतात तर कोणी अत्यंत कुरूपहि असतात. कांहीं लोक जन्मजात बुद्धिमान् असतात तर कांहीं निर्बुद्ध, कोणी एकपाठी तर कोणाला शंभर वेळां शिकवूनहि पाठ म्हणतां येत नाही. कांहीं लोकांचा शब्द स्वभावतःच अत्यंत मधुर असतो तर कांहींचा तो अत्यंत कर्कश असतो. कांहीं लोक स्वभावतःच सरलवृत्तीचे, सज्जन असतात तर कांहीं लोक अत्यंत कुटिल बुद्धीचे दुर्जन असतात. कांहीं केल्या त्यांच्या ठिकाणीं सौजन्याचा संस्कार जडत नाहीं. कोणी मनमिळाऊ तर कोणी तुसडे, कोणी रागीट तर कोणी शान्त. जर सृष्टीचा निर्माता परमेश्वर असेल तर सृष्टीमध्यें दिसून येणारी अशी ही विषमता त्यानें निर्माण कां केली ? समानसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य जर परमेश्वराच्या ठिकाणीं नसेल तर मग तो परमेश्वर तरी कसला ? सामर्थ्य असूनहि जर अशी विषम सृष्टि निर्माण करीत असेल तर मग तो मोठा अन्यायी आणि निर्घृण आहे असें म्हणावें लागेल! तात्पर्य सृष्टि ही परमेश्वराने निर्माण केली आहे असें म्हटल्यास वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें अनेक प्रश्न विचारवंतांच्या मनामध्यें येतात. त्यांचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं व मन गोंधळून जातें. वाट चुकलेला व दिशाभूल झालेला वाटसरू ज्याप्रमाणें किंकर्तव्यमूढ होऊन भटकत राहतो, त्याचप्रमाणें त्याचें मन गोंधळलेलें असतें. तसेंच मी कोण आहें ? कोठून आलों ? कोठें जाणार ? जन्माला येण्यापूर्वी माझी काय स्थिति होती व मरणानंतर माझें काय होणार ? हेहि प्रश्न मनाला अस्वस्थ करीत असतातच.

## दत्तात्रेयांचा अवतार

अशी ही मानवी मनाची दुरवस्था लक्षांत घेऊनच सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं अज्ञानतिमिराचा परिहार करण्याकरितां अत्रि महर्षींपासून महासती श्रीदेवी अनसूया हिच्या उदरीं जन्म घेतला व आपल्या सदुपदेशानें मानवमात्रांचें अज्ञान घालविण्याचा प्रयत्न केला व अद्यापहि ते तो प्रयत्न करीत आहेत.

गुरु अथवा सद्गुरु या शब्दांचा भगवान् श्रीदत्तात्रेय या देवतेशीं जितका अधिक संबंध येतो तितका तो अन्य इतर कोणत्याहि देवतेशीं येत नाहीं. गुरुदेव अथवा श्रीगुरुदेव हे शब्द उच्चारल्यावरोबर दत्त हाच शब्द पुढें उभा राहतो, अवधूतवेषानें भूतलावर सतत परिभ्रमण करून आपल्या आचरणानें, सदुपदेशानें व दर्शनानेंहि जनतेला सतत पावन करण्याचें कार्य करीत असलेल्या थोर विभूतीस दत्तावतारच मानलें जातें. भगवान् श्रीदत्तात्रेय हे सिद्धांचे सिद्ध व योग्यांचेहि योगी असल्यामुळें त्यांना सिद्धराज अथवा योगिराज असेंहि म्हटलें जातें. ते सिद्धराज असल्यामुळें क्षणलवनिमेषांत अनेक ठिकाणीं संचार करूं शकतात. एकाच रूपानें ते अनेक ठिकाणीं आविर्भूत होतात तर एकाच वेळीं आपल्या योगबलानें अनेक रूपें धारण करूनहि ते भूतलावर परिभ्रमण करीत असतात. विश्वकल्याणार्थ त्यांचा संचार सतत चाललेला असतो. गंगा आपल्या ठराविक मार्गानेच वाहत राहून आपल्या प्रवाहामध्यें अवगाहन करणाऱ्यांना पावन करीत असते. क्वचित् गंगेच्या दर्शनानेंहि मुक्तीचा लाभ होतो असेंहि वर्णन केलेलें आढळतें. तर क्वचित् गंगा गंगा असें केवळ नामस्मरण केलें तरी देखील शेंकडों योजनें गंगेपासून दूर असला तरी तो भक्त सर्व पापांतून मुक्त होतो व त्याला विष्णु लोकाची प्राप्ती होते असें म्हटलेलें आहे, असा गंगेचा महिमा अगाध आहे; पण सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा महिमा त्याहूनहि अगाध आहे. गंगेचें नामस्मरण करीत गंगेमध्यें अवगाहन करण्याकरितां गंगेच्या प्रवाहापर्यंत धांव घ्यावी लागते तर "पावना दत्ता दयाळा पावना दत्ता" अथवा "दत्ता दिगंबरा येरे सांवळ्या मला भेट दे रे" याप्रमाणें अनन्यचित्तानें भजन करून श्रीदत्तात्रेय यांचें भक्तियुक्त अंतःकरणानें स्मरण करणाऱ्या भक्ताजवळ भगवान् दत्तात्रेय हे धांवत येतात व दर्शन देऊन त्याला कृतार्थ करतात. असा हा असंख्य भक्तांचा अनुभव आहे.

स्तोत्र, मंत्र, तंत्र, शास्त्रें व पुराणें इत्यादि अनेक ग्रंथांतून गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांना उद्देशून स्मरणगामी, स्मृतिमात्रगामी, स्मरणमात्रगोचर इत्यादि विशेषणें दिलेलीं आढळतात तीं वरील विधानाला पोषक अशींच आहेत. अशीं विशेषणें अन्यदेवतेला उद्देशून सहसा आढळत नाहींत. यावरूनहि श्रीदत्तात्रेयप्रभूंचें वैशिष्ट्य प्रतीतीला येतें.

परमेश्वरानेंच सृष्टि निर्माण केली व सृष्टीमध्यें जन्माला येणाऱ्या मानवमात्राचें ऐहिक व पारलौकिक जीवन समृद्ध करून त्यांना आत्मकल्याणाचा मार्ग दाखविण्याकरितांच श्रीदत्तात्रेयांच्या रूपानें अवतार धारण केला. आत्मकल्याण हें आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानावांचून होत नाहीं. आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान हें सहज सुलभ नसतें. "क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया, दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति" या वचनानें तर आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाचा मार्ग चोखाळणें हें वस्तऱ्याच्या तीक्ष्ण धारेवरून चालण्याइतकें अवघड असल्याचें स्पष्टच सांगितलें आहे. वेदस्तुतींतहि

आत्मतत्त्वाला " दुरवगम " असें विशेषण दिलेलें आहे. " दुरवगमात्मतत्त्व निगमाय तवात्ततनोः " हे परमेश्वरा ! आकलन करण्यास अत्यंत कठीण असलेल्या आत्मतत्त्वाचा भक्तांना साक्षात्कार करून देण्याकरितांच तुम्ही अवतरतां व जन्म घेतां ! देह धारण करतां. केवढी ही तुमची भक्तवत्सलता !

## सृष्टिचक्राचा नियमितपणा

दीनवत्सल भगवान् आदिविष्णु यांनीं निर्माण केलेल्या या विशाल सृष्टींत एक प्रकारची सुव्यवस्था पहावयास सांपडते. कालचक्राची गति ही कार्यकारणभावाच्या दृष्टीनें अत्यंत नियमितपणें चालू असते. सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें व इतर तारे यांचें अंतरिक्षांतील परिभ्रमण व उदय आणि अस्त हे गणिताच्या साहाय्यानें अगदीं पळापळानें जाणतां येतात. भूतकालांतील व भविष्यकालांतीलहि शेंकडों वर्षांचे ग्रहणयोग आणि त्यांचे स्पर्शकाल व मोक्षकालहि पहातां येतात. उन्हाळा, पावसाळा आणि हिंवाळा हें ऋतुचक्रहि नियमितपणें चालू असतें. क्वचित् प्रसंगीं ऋतुमानांचा जो अतियोग, हीनयोग अथवा मिथ्यायोग दृष्टीस पडतो, त्याच्याहि मुळाशीं कांहीं कार्यकारणभाव हा असतोच. ज्या वेळेला हा कार्यकारणभाव मानवाच्या संभाव्य दृष्टिपथाच्या पलीकडे जातो त्या वेळीं मानव त्याला अदृष्टयोग असें नांव देत असतो. तात्पर्य, या विश्वांतील कोणतेंहि कार्य असो तें त्या कार्याची कारणसामग्री एकत्र संकलित झाल्याशिवाय निर्माणच होऊं शकत नाहीं. ती कारणसामग्री क्वचित् दृष्ट स्वरूपाची असेल अथवा क्वचित् अदृष्ट स्वरूपाची असेल ही गोष्ट निराळी. तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें तर अदृष्टाचेंहि मूळ दृष्टांतच असतें. " पूर्वजन्मकृतं कर्म तद्दैवमिति कथ्यते " पूर्वजन्मीं केलेलें बरेंवाईट कर्मच पुढच्या जन्मांत पाप-पुण्याच्या रूपानें प्रकट होऊन सुख अथवा दुःख देण्याला प्रवृत्त होत असतें असा हा वसिष्ठ महामुनींनीं योगवासिष्ठांत निर्वाळा देऊनच ठेवलेला आहे.

सृष्टीमधील कार्यकारणभाव हे दृष्ट स्वरूपाचे असोत अथवा अदृष्ट स्वरूपाचे असोत ते असतात ही गोष्ट मात्र निर्विवाद स्वरूपाची आहे. " ऋते कारणान्न कार्यम् " कारण असल्याशिवाय कोणतेंहि कार्य घडून येतच नाहीं, हा सिद्धान्त सर्व शास्त्रज्ञांना मान्य आहे. सृष्टि हेंहि एक कार्य आहे. उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय अशा या विश्वाच्या तीन अवस्था गंगेच्या प्रवाहाप्रमाणें अविच्छिन्न परंपरेनें चालू असतात. विश्व हें एक कार्य आहे असें मानल्यानंतर त्याची कारणसामग्री कोणती असावी असा प्रश्न साहजिकच पुढें येतो.

## कार्यकारणभावविचार

या जगांत कोणतेंहि कार्य उत्पन्न व्हावयाचें झाल्यास त्याला उपादानकारण आणि निमित्तकारण अशीं दोन प्रकारचीं कारणें हीं असावींच लागतात. ज्या कारणापासून कार्य बनत असतें तें त्या कार्याचें उपादानकारण असतें. मृत्तिकेपासून घट

निर्माण होतात म्हणून मृत्तिका ही घटाची उपादानकारण होय. सुवर्णापासून अलंकार बनतात म्हणून सुवर्ण हें अलंकारांचें उपादानकारण होय. तंतूंच्या समुदायापासून पट उत्पन्न होतो म्हणून तंतु हें पटाचें उपादानकारण होत. याच न्यायानें मायाविशिष्ट ब्रह्मापासून सर्व विश्वाची उत्पत्ति होत असल्यामुळें मायाविशिष्ट ब्रह्म हेंच या जगाचें उपादानकारण होय ही गोष्ट निर्विवाद आहे. मृत्तिका, सुवर्ण व तंतु इत्यादि कारणांना त्या त्या कार्याचें उपादानकारण असें नांव कां पडलें असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर हेंच आहे कीं, तीं तीं कार्यें निर्माण करावयाचीं झाल्यास निर्मात्याला त्या त्या कारणांचें उपादान म्हणजे ग्रहण करावें लागतें. घट, अलंकार किंवा पट इत्यादि कार्यें निर्माण करावयाचीं झाल्यास त्या कार्यांच्या निर्मात्याला क्रमशः मृत्तिका, सुवर्ण आणि तंतु या साधनांचें उपादान म्हणजे ग्रहण करावें लागतें. अर्थात् या सर्व कारणांचा त्याला संग्रह करावा लागतो. त्याशिवाय तीं कार्यें बनतच नाहींत. याच अभिप्रायानें त्या कारणांना उपादानकारण असें नांव दिलें जातें. उपादानकारण हें नेहमीं कार्यांमध्यें अविभाज्यरूपानें घटक होऊन राहत असतें. मृत्तिकेपासून घटाला निराळें करतां येत नाहीं. म्हणूनच मृत्तिका ही घटाचें उपादानकारण होय. सुवर्णापासून अलंकारांना निराळें करतां येत नाहीं. सुवर्ण हें अलंकारांचें अविभाज्य घटक असतें. म्हणूनच सुवर्ण हें अलंकारांचें उपादानकारण होय. हाच न्याय तंतु आणि पट यांनाहि लागू पडतो. पटाला तंतूंपासून निराळें करतां येत नाहीं. तसा जर कोणी प्रयत्न करील तर तेथें पटाचा नाशच झालेला आढळून येईल. तंतु हे पटाचे अविभाज्य घटक आहेत. म्हणूनच ते पटाचें उपादानकारण होत.

जग हें ब्रह्मापासून निराळें करतां येत नाहीं. जगाला ब्रह्मापासून निराळें करण्याचा जर कोणी प्रयत्न करील तर त्याला जगाचें अस्तित्वच नाहींसें झालेलें दृष्टीस पडेल. जगाला जी सत्ता म्हणजे अस्तित्व आहे तें ब्रह्माच्याच सत्तेमुळें आहे. विश्व ब्रह्मापासून अविभाज्य आहे. याच अभिप्रायानें ब्रह्म हें विश्वाचें उपादानकारण मानलें जातें.

घटाला सोडून मृत्तिका राहूं शकते, पण मृत्तिकेला सोडून घट राहूं शकत नाहीं. अलंकारांना सोडून सुवर्ण राहूं शकतें, पण सुवर्णाला सोडून अलंकार राहूं शकत नाहींत. पटाला सोडून तंतु असूं शकतात पण तंतूंना सोडून पट असूं शकत नाहीं. याच न्यायानें विश्वाला सोडून परब्रह्म परमात्मतत्त्व असूं शकतें, पण सच्चिदानन्दरूप परब्रह्मतत्त्वाला सोडून विश्व मात्र असूं शकत नाहीं. म्हणून ब्रह्म हें विश्वाचें उपादानकारण होय. उपादानकारणाच्या ठिकाणीं जे गुणधर्म असतात तेच गुणधर्म कार्यामध्येंहि प्रतीतीला येतात. तंतु जर हिरव्या रंगाचे असतील तर त्यांपासून निर्माण होणारा पट हाहि हिरव्या रंगाचाच निर्माण होत असतो. मृत्तिका अथवा सुवर्ण यांच्या ठिकाणीं असलेले गुरुत्वादि गुणधर्म हे घट किंवा अलंकार इत्यादि कार्यांच्या

ठिकाणींहि अभिव्यक्त होत असतात. विश्वामध्यें सर्वत्र सत्ता म्हणजे अस्तित्व, चैतन्य म्हणजे ज्ञान किंवा प्रकाश आणि आनंद यांचा जो आविर्भाव होत असल्याचें दृष्टीस पडतें त्याला कारण विश्वाच्या मुळाशीं असलेल्या परब्रह्माच्या ठिकाणीं असलेली सच्चिदानंदरूपता हेंच होय. कारण विश्वाचें उपादानकारण असलेलें परब्रह्मतत्त्व हें स्वयंसच्चिदानंदरूप आहे.

सच्चिदानंदरूप परब्रह्माला मायेचें साहचर्य लाभल्याशिवाय तें जगाचें उपादानकारण होऊं शकत नाहीं. याच अभिप्रायानें तत्त्ववेत्त्याकडून शुद्ध ब्रह्माला जगाचें कारणत्व न मानतां मायाविशिष्ट ब्रह्मालाच कारणत्व मानलें जातें. मायाविशिष्ट ब्रह्मालाच शास्त्रज्ञ मायाशबलित ब्रह्म असें म्हणतात. क्वचितप्रसंगीं शबलब्रह्म असाहि शब्दप्रयोग केलेला आढळतो. या ठिकाणीं शबल किंवा शबलित शब्दाचा अर्थ मिश्रित, विशिष्ट, उपहित अथवा सोपाधिक असा समजावा. मायेचें साहचर्य लाभल्यामुळेंच ब्रह्माला जगत्कारणत्व आलें असल्यानें ब्रह्माबरोबर माया हीहि एक जगाचें उपादानकारण बनतेंच. अशा रीतीनें ब्रह्माबरोबर माया हीहि एक जगाचें कारण असल्यामुळें मायेच्या ठिकाणीं असलेले सत्त्व, रज आणि तम हे तीनहि गुण जगामध्यें सर्वत्र अनुवृत्त झाले असल्याचें आपणांस पहावयास सांपडतें. तात्पर्य, शुद्ध ब्रह्म अथवा केवळ माया हे कोणीच जगाचें कारण नसून मायाविशिष्ट ब्रह्म हेंच जगाचें उपादानकारण असल्यामुळें जगांतील प्रत्येक वस्तूमध्यें ब्रह्माची सच्चिदानंदरूपता व मायेची त्रिगुणात्मकता आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. याप्रमाणें या सर्व विश्वाचें उपादानकारण मायाविशिष्ट ब्रह्म असल्याचें निश्चित होतें. उपादानकारणालाच कांहीं शास्त्रज्ञ समवायिकारण असें नांव देतात. समवाय हा एक विशिष्ट प्रकारचा संबंध आहे. या संबंधामुळेंच कार्य आणि कारण यांच्यांतील अविभाज्यभाव हा सुरक्षित राहत असतो. ज्या कारणांच्या ठिकाणीं कार्याचा समवायसंबंध असतो त्या कारणांना समवायिकारण असें म्हणतात. तीं कारणें मात्र द्रव्यस्वरूप असावीं लागतात.

प्रत्येक कार्याला उपादानकारणाव्यतिरिक्त आणखी कांहीं आवश्यक कारणें असतात. त्या कारणांना निमित्तकारण असें म्हणतात. गाडगीं, मडकीं आदि वस्तूंच्या निर्मितीला चाक लागतें. चाकाला गति देण्यासाठीं काठी लागते. अलंकाराच्या निर्मितीला हातोडा, ऐरण वगैरे सामग्री लागते. पट विणण्याकरितां माग अर्थात् फणी, धोटा वगैरे सामान लागतें. त्याचप्रमाणें विशेषें करून कार्य निर्माण करणारा कोणीतरी लागतोच. त्याला कर्ता असें म्हणतात. प्रत्येक कार्याला कर्ता हा लागतोच कर्त्यावांचून कोणतेंहि कार्य निष्पन्नच होऊं शकत नाहीं. सर्व कारणसामग्री एकत्र संकलित झालेली असली तरी जोंपर्यंत त्या कार्याचा कर्ता उपलब्ध होत नाहीं तोंपर्यंत कार्य बनूं शकत नाहीं. हा कर्ताहि त्या कार्याचें निमित्तकारणच असतो. अशा रीतीनें प्रत्येक कार्याला कर्त्याची आवश्यकता असते ही गोष्ट निर्विवाद सिद्ध आहे. घटाचा

कर्ता कुलाल म्हणजे कुंभार हा असतो तर अलंकारांचा कर्ता सुवर्णकार म्हणजे सोनार हा असतो. धागे विणून त्यांचीं वस्त्रें तयार करणाऱ्याला वायक म्हणजे विणकर अथवा कोष्टी असें म्हणतात. ज्या ज्या कार्याचा जो कोणी कर्ता असेल त्या कर्त्याला त्यानें जें कार्य करावयाचें असतें त्या कार्यासंबंधींचें सर्व ज्ञान अवश्य असावें लागतें. जें कार्य करावयाचें आहे त्याची त्याला पूर्ण कल्पना असावी लागते. ज्याला जें कार्य करावयाचें असतें त्याला त्या कार्याची जर पूर्ण कल्पना नसेल तर तें कार्य त्याच्या हातून होऊं शकणार नाहीं. कार्यकर्त्याला जें कार्य करावयाचें असतें त्या कार्याचें केवळ ज्ञान अथवा कल्पना असूनहि भागत नाहीं तर तें कार्य करण्याची त्याला इच्छा असावी लागते. केवळ इच्छा असूनहि कार्यभाग होत नाहीं. तर ज्ञान आणि इच्छा यांच्या जोडीला अनुकूल कृति हीहि अवश्य असावी लागते. कार्यकर्त्यांच्या हातून जेव्हां एखादें कार्य घडून येतें तेव्हां त्या कार्याच्या मुळाशीं अनुकूल कृति ही असतेच. कृतीच्याहि मुळाशीं इच्छा असतेच, व इच्छेच्याहि मुळाशीं ज्ञान असतें, ज्ञानाशिवाय इच्छा होऊं शकत नाहीं व इच्छा असल्याशिवाय कृति म्हणजे प्रयत्नहि होऊं शकत नाहीं. असा हा कार्य-कारणभावाच्या विचारांतील अबाधित नियम आहे.

एखाद्या कार्याची जेवढी कांहीं कारणसामग्री असेल त्या सर्व कारणसामग्री-मध्यें कर्त्याला प्राधान्य आहे. कर्ता हाच कार्याला अनुकूल असें ठिकाण आणि काल शोधीत असतो. कर्ता हाच कारणसामग्रीचें संकलन करीत असतो, व कर्ता हाच संकलित केलेल्या कारणसामग्रीची योग्य योजना करीत असतो. हें सर्व असूनहि संक-ल्पित कार्य यशस्वी रीतीनें घडून येण्यासाठीं दैवतांचीहि अनुकूलता असावीच लागते. ती जर नसेल तर बाकीचें सर्वकांहीं असूनहि कार्यभाग घडून येत नाहीं. याच अभि-प्रायानें "अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम्" या गीतावचनांत दैव शब्दाची योजना केली आहे. ज्या ठिकाणीं व ज्या कालीं जें कार्य करावयाचें असेल त्या ठिकाणच्या त्या त्या कालाशीं, कार्याशीं अथवा कारणसामग्रीशीं संबंधित असलेल्या देवताहि अनुकूल असाव्या लागतात. देवतांची अनुकलता अथवा प्रतिकूलता ही प्रत्यक्ष चक्षुरादि इन्द्रियांनीं आकलन करतां येत नाहीं. पण परिणामांवरून ती लक्षांत घेतां येते. ती प्रत्यक्ष आकलन होत नसल्यामुळेंच कांहीं लोक त्याला अदृष्ट दैव असें नांव देतात. "दैवं चैवात्र पंचमम्" या ठिकाणींहि कांहीं लोक दैव या शब्दाचा अर्थ यथाश्रुत अदृष्ट अथवा प्राक्तन असाच करतात. तात्पर्य, कोणतेंहि कार्य घडून यावयाचें असलें तरी त्या कार्याला संपूर्ण कारणसामग्रीची अपेक्षा असते. त्यांतहि कर्त्याला प्राधान्य असतें ही गोष्ट निर्विवाद होय.

## सृष्टीचें ईश्वरकर्तृकत्व

याप्रमाणें विश्वांतील घटपटादिस्वरूप वस्तूंच्या कार्यकारणभावांचा सर्व-साधारणपणें विचार केल्यानंतर विश्व हेंहि एक कार्यच आहे असें आढळून येईल.

विश्वांतील प्रत्येक वस्तूची घडामोड अथवा हालचाल ही चाललेलीच असते. आपाततः जरी या सृष्टीकडे दृष्टिक्षेप केला तरी ही सारी सृष्टि विविध वैचित्र्यानें नटलेली असल्याचें दृष्टीस पडतें. या विश्वसृष्टींत आपल्याला लहान-मोठे पर्वत दृष्टीस पडतात. नद्या आहेत, सागर आहेत, सरोवरें आहेत, विरल घनदाट अशीं छोटींमोठीं अरण्यें आहेत. वृक्ष, लता, वेली व वनस्पति आणि विविध धान्येंहि पण दृष्टीस पडतात. वृक्ष, लता, वेली व वनस्पति आणि विविध धान्यें यांच्यांतहि कल्पनातीत वैचित्र्य आढळून येतें. एका वृक्षाचे गुणधर्म दुसऱ्या वृक्षांत नाहींत, एका फळाची अभिरुचि दुसऱ्या फळांत नाहीं. एका फुलाचें सौगंध्य हें दुसऱ्या फुलांत नाहीं. सृष्टींतील प्रत्येक वस्तूंत एक प्रकारची अपूर्वता प्रतीतीस येते.

सृष्टि ही दोन प्रकारची आहे, एक स्थावर सृष्टि व दुसरी जंगम सृष्टि. स्थावर सृष्टीमध्यें टेकड्या, डोंगर, पर्वत, नदी, नद, सरोवर, सागर त्याचप्रमाणें वृक्ष, लता-वेली, वनस्पति इत्यादिकांचा अन्तर्भाव होतो, तर जंगमसृष्टीमध्यें पशु, पक्षी, कीटक पतंग आणि मानव इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. जंगमसृष्टींतहि जलचर आणि स्थल चर असा भेद पहावयास सांपडतो. स्थलचर सृष्टीमध्यें हत्ती, घोडे, उंट, वाघ, अस्वलें, लांडगे, कोल्हे, कुत्रे, त्याचप्रमाणें गाय, बैल, इत्यादि ग्राम्य पशूंचा व वन्यपशूंचा अन्तर्भाव होतो. पक्ष्यांमध्येंहि मोर, हंस, पोपट, कावळे, कोकिळा, चिमण्या, साळुंक्या इत्यादि विविध वैचित्र्यपूर्ण पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. सर्प, विंचू, डांस, ढेकूण इत्यादि प्राण्यांचा कीट-पतंगादि-कांमध्यें अंतर्भाव होतो. चरसृष्टीमध्यें मानवसृष्टीला त्याच्या बुद्धिमत्तेमुळें कांहीं आगळेंच वैशिष्ट्य प्राप्त झालेलें आहे. जलचरसृष्टीमध्येंदेखील आपल्याला कल्पनाहि करतां येणार नाहीं असे असंख्य जातींचे विविध-वैचित्र्यपूर्ण प्राणी असतात. मगरी, सुसरी आणि प्रचंड देवमासे यांपासून तों शंख-शिंपल्यांतून जन्म घेणाऱ्या सूक्ष्म जलकीटकापर्यंत एकापेक्षां एक अत्यंत विलक्षण असे जलचर प्राणी पाहिले म्हणजे मन अगदीं थक्क होऊन जातें! चंद्र, सूर्य, ग्रह, राशी, नक्षत्रें आणि तारका इत्यादि अंतरिक्षसृष्टि ही आणखी कांहीं निराळीच आहे. या सर्व विलक्षण सृष्टीचें निरीक्षण करूं लागलें म्हणजे मोठमोठ्या विचारवंतांचींहि मनें आश्चर्यचकित होऊन जातात. जसजसें या लोकोत्तर, विलक्षण वैशिष्ट्यपूर्ण असलेल्या सृष्टीचें निरीक्षण करावें तसा तसा विचारवंतांच्या मनापुढें एक मोठा प्रश्न उभा राहतो कीं, ही एवढी मोठी विलक्षण, वैचित्र्यपूर्ण, प्रचंड सृष्टि कोणीं निर्माण केली असावी बरें?

आम्ही घरें बांधतों, बंगले बांधतों, तीसतीस मजली उंच आणि भव्य इमारतीहि बांधतों. सर्व प्रकारच्या सुखसोयींनींहि त्या सजवितों. विजेचे दिवे आहेत, वरच्या मजल्यावर जाण्याकरितां व वरून खालीं येण्याकरितां विजेचे पाळणे आहेत. घरीं बसल्या बसल्या दूरदूरच्या लोकांशीं जवळून संभाषण करीत असल्याप्रमाणें बोलण्यासाठीं दूरध्वनि अर्थात् टेलिफोन आहेत. सुखानें प्रवास करण्यासाठीं वायुवेगानें धांव-

णाऱ्या मोटारगाड्या व विमानें आहेत. सुखासाठीं संगृहित केलेली ही सर्व साधनसामग्री त्या त्या कलेंत निष्णात असलेल्या कुशल कारागिरांकडून तयार करवून घेत असतों. यांतील कोणतीहि वस्तु आपोआप बनलेली नसते. जगांत कोणतेंहि कार्य हें आपोआप होऊंच शकत नाहीं. जीं कार्यें आपोआप घडून येतात असें आपणांस वाटतें तींहि कार्यें आपोआप घडून येत नसतात. ढग येतात, विजा लवतात, गर्जना होते, पाऊस पडतो, वारे वाहतात, वादळें होतात. या अथवा यांसारख्या किती तरी गोष्टी आपल्याला आपोआप होत असतात असें वाटतें. पण या कोणत्याच गोष्टी आपोआप घडून येत नाहींत. त्यांच्याहि पाठीमागें कांहीं कार्यकारणभाव असतोच. ज्या ठिकाणीं कार्यकारणभावाचें आपल्याला आकलन होत नाहीं त्या ठिकाणीं तीं कार्यें आपोआप घडून आलीं असें आपण म्हणतों पण वस्तुस्थिति तशी नसते. उदाहरणार्थ, आपण एखादें घड्याळ पाहूं. घड्याळांतील तासकांटा, मिनिटकांटा, सेकंदकांटा हे कांटे व घड्याळांतील चक्रें आपोआप फिरत असल्याचें आपण पाहतों, पण वस्तुतः ते कांटे व तीं चक्रें आपोआप फिरत नसतात. घड्याळामध्यें गतिशील असलेल्या त्या जड कांट्यांना आणि चक्रांना गति देणारा कोणी तरी मुळामध्यें चेतन हा असावाच लागतो. चेतन जीवाकडून प्रेरणा मिळाल्याशिवाय कोणताहि जड पदार्थ हालचाल करूंच शकत नाहीं. घड्याळामध्यें मेनस्प्रिंग म्हणजे लोहधातूची वर्तुळाकार पातळ चपटी पट्टी असते. तिला कमान असें म्हणतात. हेअर स्प्रिंग म्हणजे केसासारखी बारीक तारेच्या आकाराची पण चपटी असलेली वर्तुलाकार वळविलेली लोह धातूची एक पट्टी असते. तिला बाल असें म्हणतात. त्याचप्रमाणें मध्यवर्ती लोहशलाकेला एक मुख्य चक्र बसविलेलें असतें. या चक्रास सेंट्रल व्हील असें म्हणतात. इतरहि कांहीं चक्रें असतात. हीं चक्रें वेळेचा समतोलपणा राखतात म्हणून त्यांना बॅलन्स व्हील असें म्हणतात. मुख्य चक्राला व इतर चक्रांनाहि दाते असतात. ते दाते अशा रीतीनें एकमेकांमध्यें गुंतविलेले असतात कीं, त्यामुळें सर्व चक्रांना गति मिळते आणि दात्यांच्या अंतरामुळें अथवा कमी-अधिक संख्येमुळें सेकंद, मिनिट आणि तास या वेळांचा समतोलपणाहि राखला जातो. किल्ली देणाऱ्या माणसाकडून घड्याळास किल्ली दिली गेली म्हणजे मेन स्प्रिंग आवळली जाते, तिच्या ठिकाणीं स्थितिस्थापकता अर्थात् आपल्या मूलभूत पूर्वावस्थेला जाऊन पोहोंचणें हा धर्म असल्यामुळें ती स्प्रिंग हळहळू सुटूं लागते. तिच्या त्या क्रियेनेंच शेजारीं असलेल्या केसासारख्या बारीक स्प्रिंगलाहि गति मिळते आणि तिच्या त्या गतीनेंच मुख्य चक्रालाहि गति मिळते. मुख्य चक्राच्या गतीनेंच इतर चक्रेंहि फिरूं लागतात. कारण त्या सर्व चक्रांचे दाते एकमेकांमध्यें गुंतविलेले असतात. अशा रीतीनें घड्याळांतील सर्व कांट्यांना व चक्रांना गति मिळते. आपण समजतों घड्याळांतील कांटे आपोआप फिरतात, पण मानवनिर्मित यंत्राची योजना व मानवानें त्याला दिलेली प्रेरणा या गोष्टी आपल्या लक्षांत येत नाहींत. तात्पर्य, जडाकडून होणारें कार्य हें चेतनाकडून केल्या जाणाऱ्या

योजनेमुळें व दिल्या जाणाऱ्या प्रेरणेमुळेंच होत असतें, यांत संशय नाहीं. तात्पर्य, सृष्टींतील जड वस्तु आणि चेतन-पुरुष यांच्यांतील संयोज्य-संयोजक भाव हा अबाधित आहे. स्वतःला परमनास्तिक म्हणविणाऱ्या महान् तार्किकालाहि मान्य करावा लागेल इतका तो गणितशास्त्रानें सिद्ध होणाऱ्या सिद्धान्तासारखा निराबाध आहे. या सिद्धान्ताला व्यावहारिक दृष्टीचीहि अनुकूलता आहे. व्यवहारांतहि कोणत्याहि जड वस्तूची हालचाल चेतन-पुरुषाच्या योजनेशिवाय व प्रेरणेशिवाय होत नसते हेंच आपण नेहमीं पाहत असतों. चेतन-पुरुष याचा अर्थ सजीव प्राणी असाच या ठिकाणीं समजावा.

घड्याळाप्रमाणेंच एखाद्या कारखान्याचेंहि उदाहरण आपण घेऊं शकतों. कारखान्यामध्यें यंत्रांच्या साहाय्यानें अनेक कामें चाललेलीं असतात. यंत्रांच्याच साहाय्यानें कापसापासून सरकी निराळी केली जाते. वठलेल्या कापसाचे यंत्रानेंच पेळू बनतात. त्या पेळूचें यंत्राच्याच साहाय्यानें सूत तयार होतें. यंत्राच्याच साहाय्याने सूत रंगविलें जातें. यंत्राच्याच साहाय्यानें माग चालतात. आडवा-उभा धागा विणला जातो व वस्त्रहि तयार होत असतें. हें सर्व यंत्रानें होत असलें तरी त्या यंत्रांची रचना करणारा, त्यांचें संयोजन आणि नियोजन करणारा, त्याचप्रमाणें त्या यंत्रांना गति देणारा कोणी तरी चेतन हा असावाच लागतो. चेतनावांचून केवळ जडाकडून कांहींच कार्य घडून येऊं शकत नाहीं. तात्पर्य, जड पदार्थ, त्यांना मिळणारी गति व गति देणारा कोणीतरी प्रेरक अथवा चेतन हा तिसरा असावाच लागतो. जड पदार्थ हे तमोगुणाचें प्रतीक असून त्यांना मिळणारी गति ही रजोगुणाची प्रतीक आहे. त्याचप्रमाणें गतीचा मूळ प्रेरक 'चेतन' हा सत्त्वगुणाचें प्रतीक होय. यांनाच क्रमानें क्रियाशक्ति, विमर्शशक्ति व प्रकाशशक्ति असें म्हटलें जातें. या तीन शक्तींचा समन्वय झाल्याशिवाय संघटनात्मक अथवा विघटनात्मक असें कोणतेंच कार्य घडून येऊं शकत नाहीं. या तिन्ही शक्तींचा जो समष्टिरूप अधिष्ठाता, त्यालाच परमात्मा अथवा परमेश्वर असें म्हणतात.

जें पिंडीं तें ब्रह्माण्डीं या न्यायानें पहातां सूक्ष्मदर्शी विचारवंतांना पिण्ड-ब्रह्माण्डाच्या रचनेंत बरेंच साम्य आढळून येतें. शुद्ध चित्तत्त्व, अव्यक्त तत्त्व अथवा प्रकृतितत्त्व, महत्तत्त्व अथवा बुद्धितत्त्व, अहंकारतत्त्व, सूर्य, चंद्र, अग्नि, पंचमहाभूतें व पांचभौतिक कार्यें "जायते, अस्ति, वर्धते," या शब्दांनी ओळखले जाणारे भावविकार आणि त्रिगुणात्मकता अर्थात् सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांची व्याप्ति हें सर्व पिण्डब्रह्माण्डामध्यें समान स्वरूपांतच विराजत असलेलें पहावयास सांपडतें. परमाणु आणि पर्वत यांच्याप्रमाणें व्यष्टि आणि समष्टि एवढाच काय तो भेद लक्षांत घ्यावयाचा आहे. व्यष्टि म्हणजे व्यक्ति आणि समष्टि म्हणजे समुदाय. एवढाच आकृतिभेद बाजूला केला कीं, व्यष्टि आणि समष्टि यांचे गुणधर्म समानच आहेत. व्यष्टि आणि समष्टीच्या ठिकाणीं गुणधर्मांचें साम्य असलें तरी व्यष्टीच्या ठिकाणीं

अल्पज्ञत्व, अल्पशक्तिमत्त्व, अल्पकार्यकारित्व आणि समष्टीच्या ठिकाणीं सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्त्व, विशालकार्यकारित्व अथवा चिरकार्यकारित्व इत्यादि गुणधर्म अपरिहार्यपणें पहावयास सांपडतात, [म्हणूनच जीव हा अल्पज्ञ व अल्पशक्तिमान् असतो, तर परमेश्वर हा सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् असल्याचें दिसून येतें.

## ईश्वराचें अस्तित्व

यावर कोणी असें विचारील कीं, अहो, परमेश्वरच जेथें आहे कीं नाहीं ही शंका आहे तेथें तो सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान् आहे हें म्हणणें बुद्धीला कसें पटणार? प्रश्न अगदीं बरोबर आहे, पण तो अगदीं न उलगडणाऱ्या कोडयाइतका अवघड खास नाहीं. मात्र एखादा सिद्धान्त शुद्ध तार्किक पद्धतीनें मान्य करण्याइतक्या अवस्थेंत आल्यानंतर तो मान्य करण्याइतकें बुद्धींत औदार्य असावें लागतें. केवळ बुद्धीला पटत नाहीं असें सांगण्यापेक्षां तें कां पटत नाहीं हें सांगतां येणें अधिक श्रेयस्कर असतें, कारण त्यांतूनच विचाराचा मार्ग मोकळा राहातो व विचारक्षम बुद्धीला सत्यसिद्धान्ताच्या क्षेत्रांत पोहोंचतां येतें, व सत्याचा साक्षात्कार करून घेतां येतो. ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं विचार करतांना प्रथम हीच गोष्ट लक्षांत घ्यावयास पाहिजे कीं जर जगांत ईश्वर नसता तर ईश्वर हा शब्दच अस्तित्वांत आला नसता. म्हणून ईश्वर अथवा ईश्वर या अर्थाचे शब्दच ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यास समर्थ आहेत असें म्हटलें तर तें शास्त्रीय दृष्टया योग्यच ठरतें. कोणतेंहि ज्ञान ज्याप्रमाणें शब्दाशीं संलग्न असतें त्याचप्रमाणें कोणताहि शब्द हा ज्ञानाशीं संलग्न असतोच. अर्थात् प्रत्येक ज्ञानाचा विषय हा जसा शब्दप्रतिपाद्य असतो त्याचप्रमाणें प्रत्येक शब्द हा कोणत्या ना कोणत्या तरी अर्थाचा वाचक असतोच. तात्पर्य, कोणतेंहि ज्ञान शब्दाशीं संलग्न नाहीं असें म्हणतां येत नाहीं, व कोणताहि शब्द अर्थाशीं संलग्न नाहीं असें म्हणतां येत नाहीं. याप्रमाणें शब्द आणि अर्थ यांचा संबंध नित्य असल्याचें शास्त्रज्ञांनीं मान्य केलेलें आहे. शिवशक्तीच्या सामरस्या-प्रमाणेंच शब्द आणि अर्थ यांचेंहि सामरस्य शास्त्रज्ञांना अभिप्रेत आहे. "वागर्थाविवसंपृक्तौ" ही कालिदासाची उपमाहि याच सिद्धान्ताचें समर्थन करीत आहे. "औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन संबन्धः" (मीमांसासूत्र १-१-५) या मीमांसा-शास्त्राच्या सूत्रांतहि शब्द आणि अर्थ यांचा संबंध नित्य असल्याचें सांगितलें आहे. नैयायिकांच्या मतानेंहि विश्वांतील सर्व पदार्थांना अभिधेयत्व म्हणजे शब्दप्रतिपाद्यत्व मानलेलें आहे, त्याचप्रमाणें प्रत्येक शब्दाला अथवा अक्षरालाहि अभिधायकत्व अथवा वाचकत्व मानणें हें तुल्यवित्तिवेद्यन्यायानें ओघानेंच प्राप्त होत आहे. अशा रीतीनें शब्द आणि अर्थ यांचा संबंध लक्षांत घेतला म्हणजे ईश्वर अथवा ईश्वर या अर्थाचे शब्द ज्या अर्थाचें प्रतिपादन करीत आहेत तोच ईश्वर होय.

ईश्वर अथवा ईश्वर या अर्थाचे शब्द जगांतील अनेक भाषांतून रूढ असलेले दृष्टीस पडतात. आर्य, वैदिक लोक आपल्या संस्कृत भाषेंत ईश्वराला देव, परमेश्वर, परमात्मा, अथवा ब्रह्म असें म्हणतात. मराठी भाषेंत त्याला राम, कृष्ण, हरि, अथवा देव असें म्हणतात. इंग्लिश भाषेंत ईश्वराला "गॉड्" असें म्हटलेलें आहे. हिब्रू भाषेंत ईश्वर या अर्थानें जेन्स हा शब्द रूढ आहे. लॅटिन भाषेंत त्याला "ड्यूस" असें म्हणतात. फ्रेंच भाषेंत त्याला "डायू" असें म्हटलेलें आहे, जर्मन भाषेंत "गोह" हें ईश्वराचें नांव सुप्रसिद्ध आहे. स्वीडिश आणि डॅनिश भाषेंत त्याला "गोध" असें म्हटलेलें आहे. पारशी लोक त्याला "खोऊ" असें म्हणतात. "याज्दान्" अथवा "इज्द" याहि शब्दानें पर्शियन भाषेंत ईश्वराचा उल्लेख आढळतो ग्रीक लोकांनी देवाला "ड्यूस" असें म्हटलेलें आहे. इंका भाषेंत ईश्वराला "पापा" असें म्हटलेलें आहे. सीरियन लोक "इल्यू" या शब्दानें ईश्वराला ओळखतात. खाल्डियन लोक त्याला "नेवो" या नांवानें संबोधीत असल्याचें दिसतें. मुसलमान त्याला अल्ला अथवा खुदा असें म्हणतात. जपानी लोक त्याला "शिन्" अथवा "कामी" असें म्हणतात. स्पॅनिश लोकांमध्यें तो "डीश" या नांवानें प्रसिद्ध आहे. चिनी भाषेंत त्याला "शेन्" अथवा "तिएन्" असें म्हटलेलें आहे. अरेबिक आणि पर्शियन भाषेमध्यें "दावर" हा शब्द देव या अर्थानें रूढ आहे. याशिवाय "बारि", "रब्", "हक्", "मऊला" इत्यादि अनेक शब्द ईश्वर या अर्थानें अन्य भाषांत रूढ आहेत. अशा रीतीनें जगांतील अनेकभाषांतून ईश्वर या अर्थानें रूढ असलेले शब्द पाहावयास सांपडतात. तात्पर्य ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं ईश्वर अथवा ईश्वरवाचक शब्द हेंच बलवत्तर प्रमाण आहे. ज्या पदार्थाला कांहीं अस्तित्व नसतें त्या पदार्थाचा वाचक शब्दहि पण अस्तित्वांत येऊं शकत नाहीं. यावर कोणी असें विचारील कीं, शब्द अस्तित्वांत असला म्हणून त्याचा अर्थहि अस्तित्वांत असलाच पाहिजे. असा कोठें नियम आहे? शशशृंग, वन्ध्यापुत्र, खपुष्प, इत्यादि शब्द अस्तित्वांत आहेत, पण त्यांचा अर्थ कोठें अस्तित्वांत आहे? सश्याला शिंग नसतें, वांझेला मूल होत नसतें आणि आकाशाला फुलेंहि येत नसतात. तथापि हे शब्द व्यवहारांत प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें ईश्वर अथवा परमेश्वर या नांवांचें कोणी अथवा कांहीं प्रसिद्ध नसतांनाहि ईश्वर अथवा परमेश्वर हे शब्द व्यवहारामध्यें अस्तित्वांत असणें शक्य आहे. एक काल्पनिक शब्द आहे तो! पण हा आक्षेप बरोबर नाहीं. शशशृंग नांवाचा पदार्थ प्रसिद्ध नसला तरी शश आणि शृंग या दोन शब्दांचे अर्थ प्रसिद्ध आहेत वन्ध्यापुत्र प्रसिद्ध नसला तरी वंध्या आणि पुत्र या दोन शब्दांचे अर्थ प्रसिद्ध आहेत. हाच न्याय "खपुष्प", "मृगजल", "बागुलबुवा" इत्यादि शब्दांचा अर्थ करतांना लक्षांत घ्यावा, तात्पर्य कोणताहि शब्द घ्या. तो एकाक्षरात्मक असो अथवा अनेक अक्षरांचा असो, कोणत्या ना कोणत्या तरी अर्थाचा वाचक असतोच. मंत्रशास्त्रामध्यें तर नाद, अनुस्वार

आणि विसर्ग यांचाहि अर्थ प्रतिपादन केलेला आढळतो. मग ईश्वर या शब्दालाच निरर्थकत्व कसें मानतां येईल ? 'ईश्' नियमन करणें या धातूवरून ईश्वर शब्द निष्पन्न झाला आहे. "ईष्टे इति ईश्वरः" अशी ईश्वर शब्दाची व्युत्पत्ति आहे. या व्युत्पत्तीवरून ईश्वर शब्दाचा अर्थ नियमन करणारा, नियामक असा होतो.

यावर कोणी असें विचारील कीं, अहो राजा हाहि नियामक असतो. तोहि आपल्या प्रजाजनांचें नियमन करीत असतोच. तेव्हां लोकप्रसिद्ध राजा हाच ईश्वर आहे असें मानण्यास काय हरकत आहे ? पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण लोकप्रसिद्ध राजा हा आपल्या प्रजाजनांचा नियामक असला तरी तो नियम्यहि असल्याचें दृष्टीस पडतें. राजा हा मांडलिक असतो. तो फारच थोडया प्रदेशाचा अधिपति असतो. अनेक मांडलिकांवर अधिराज्य करणाऱ्याला सम्राट् असें म्हणतात. सम्राट् हा राजांचेंहि नियमन करीत असतो. सम्राटाच्या ताब्यांत राहणारा व त्याच्या इच्छेप्रमाणें वागणारा अर्थात् परतन्त्र असलेला राजा हा ईश्वर आहे असें कसें म्हणतां येईल ? बरें सम्राटाला ईश्वर म्हणावें तर तेंहि म्हणणें बरोबर होणार नाहीं. कारण सम्राटाचाहि शत्रूकडून पराभव होत असतो, व त्याच्यावरहि मांडलिक होऊन राहण्याची आणि खंडणी भरण्याची पाळी येते. एखाद्या वेळेला सम्राटालाहि सर्व वैभवाला मुकून दरिद्री होऊन भटकत राहण्याची पाळी येते, मग त्याला ईश्वर कसें म्हणावें ? एका ठिकाणीं ईश्वर शब्दाची मोठी सुंदर व्याख्या केलेली आहे.

ईश एवाहमत्यर्थं न च मामीशते परे ।
ददामि च सदैश्वर्य-मीश्वरस्तेन कीर्तितः ।।

ईश्वर स्वतःच सांगत आहे –

ईश् धातूचा अर्थ सत्ता किंवा स्वामित्व चालविणें. मालक असणें अथवा समर्थ असणें असा आहे. मीच सर्व विश्वावर पूर्ण सत्ता चालवीत आहें. माझेंच स्वामित्व अव्याहत आहे. मीच सर्व विश्वाचा मालक आहें. मीच सर्वसमर्थ आहें. माझ्यावर कोणाचीहि सत्ता नाहीं अथवा स्वामित्व नाहीं. माझा कोणीहि मालक नाहीं. त्याचप्रमाणें या जगांत माझ्याइतका कोणीहि समर्थ नाहीं. मग माझ्यापेक्षां अधिक समर्थ असणें लांबच राहिलें ! अशा रीतीनें ईश्वर हा सर्वश्रेष्ठ सत्ताधीश असल्यामुळें त्याला परमेश्वर असेंहि म्हणतात.

इंद्र, चंद्र, वरुण, कुबेर, अग्नि, वायु, यम आणि सूर्य इत्यादि सर्व देवांना मीच सर्वकाळ ऐश्वर्य देतों, म्हणून मला ईश्वर असें म्हटलें जातें. अर्थाचा संकोच करण्याचें जेथें कांहीं कारण उरत नाहीं तेथें स्वाभाविकपणेंच त्या शब्दावरून प्रतीतीला येणारा अर्थ पूर्ण स्वरूपाचाच मानला जातो. राजे-महाराजे अथवा इतर देवता यांना उद्देशून जेव्हां ईश्वर शब्द योजला जातो तेव्हां तो त्यांच्या ठिकाणीं पूर्णत्वानें उपपन्न होत

नसल्यामुळें स्वाभाविकच तेथें अर्थाचा संकोच करावा लागतो. आपआपल्या अधिकार क्षेत्रांतच त्यांची सत्ता अथवा ऐश्वर्य परिसीमित मानावें लागतें. त्या ठिकाणीं ईश्वर हा शब्द गौण अर्थानेंच योजिला जातो; परंतु जेथें ईश्वरालाच उद्देशून ईश्वर शब्द योजला जातो तेथें अर्थाचा संकोच करण्याचें कांहीं कारण नसल्यामुळें ईश्वर शब्दाचा अर्थ विश्वाची संपूर्ण सत्ता अथवा संपूर्ण स्वामित्व असलेला किंवा संपूर्ण ऐश्वर्यांनी संपन्न असलेला परमात्मा अथवा परमेश्वर असाच अर्थ करावा लागतो. तात्पर्य, ईश्वर या शब्दाच्या अर्थावरूनच या सर्व विश्वाचा अधिपति, चालक, मालक आणि पालक असा कोणीतरी सर्वसत्ताधारी व सर्वैश्वर्यसंपन्न आहे ही गोष्ट सिद्ध होते. तेव्हां ईश्वराच्या अस्तित्वासंबंधीं शंका घेण्याचें कांहींच कारण नाहीं.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, ईश्वर या शब्दाला अर्थ असला तरी तो अर्थ ज्याच्या ठिकाणीं समन्वित होतो असा जोंपर्यंत कोणी दिसत नाहीं तोंपर्यंत या जगांत ईश्वर आहे असें कसें मानतां येईल ? पण ही शंका बरोबर नाहीं. कांही गोष्टी आपण पाहिलेल्या नसतात किंवा कांहीं गोष्टी आपल्याला दिसत नसतात. एवढ्या-वरून त्या नसतात किंवा त्या नाहींत असें आपल्याला म्हणतां येत नाहीं. आपल्या पणजोबांचीं मातापितरें आपण पाहिलेलीं नसतात, म्हणून त्यांचें भूतकालीन अस्तित्व आपल्याला अमान्य करतां येईल काय ? तसें केल्यास साऱ्याच इतिहासाला आप-ल्याला तिलांजलि द्यावा लागेल ! शिवाय "माझी माता वंध्या आहे" असें म्हणण्या प्रमाणें वदतोव्याघातासारखी दुर्धर आपत्ति पुढें येऊन उभी राहते ही गोष्ट निराळीच. असें विसंगत बोलणें हें विचारवंताला शोभत नसतें.

अरुंधतीचा तारा अतिसूक्ष्म असल्यामुळें आकाशांत तो असूनहि आपल्याला दिसत नाहीं. शुक्लपक्षांतील प्रतिपदेचा चंद्र पश्चिमेकडे क्षितिजावर असूनहि तो अतिसूक्ष्म असल्यामुळें आपल्याला दिसत नाहीं. झरोक्यांतून घरांत पडलेल्या कडोशांत अंतराळांत फिरत असलेले विविध वर्णांचे असंख्य रजःकण आपण पहात असतों. कडोशाच्या मर्यादेच्या बाहेर अंतराळांत ते असूनहि अतिसूक्ष्मत्वामुळें अथवा प्रकृष्ट प्रकाशाच्या अभावामुळें ते आपल्याला दिसत नाहींत. तात्पर्य एखादी वस्तु असूनहि कांहीं कारणामुळें ती आपल्याला दिसत नाहीं. एवढ्यावरून ती वस्तूच नाहीं असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं. याच न्यायानें तत्त्वतः ईश्वर असूनहि कांहीं कारणा-मुळें तो आपल्याला दिसला नाहीं किंवा आपण त्याला पाहूं शकत नाहीं एवढ्यावरून ईश्वर नाहीं असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं.

आतां यावर कोणी असें विचारील कीं अहो ! जर ईश्वर आहे तर मग तो आम्हांला दिसत कां नाहीं ? ईश्वर असता तर तो आम्हांला कधीं न कधीं तरी दिसला असता, पण ज्या अर्थीं ईश्वर आम्हांला कधीच दिसत नाहीं त्या अर्थीं तो नसला पाहिजे. पण हाहि तर्क बरोबर नाहीं.

एखादी वस्तु आपल्याला दिसत नाहीं एवढ्यावरून ती नाहींच असें आपल्याला म्हणतां येत नाहीं. वस्तु असूनहि अनेक कारणांमुळें ती आपल्याला दिसूं शकत नाहीं. समुद्राच्या कांठीं बसून कितीहि टक लावून पाहिलें तरी आपल्याला हिमालय पर्वत दिसणार नाहीं. हिमालय पर्वत आपल्याला दिसला नाहीं म्हणून तो जगांत नाहीं असें म्हणतां येईल का? आपल्या डोळ्यांत घातलेलें काजळ आपल्याला दिसत नाहीं, म्हणून आपल्या डोळ्यांत काजळ नाहीं असें म्हणतां येईल का? दिवसा आकाशांत तारका दिसत नाहींत म्हणून त्या आकाशांत नाहींत असें आपल्याला म्हणतां येईल का? भर उन्हांतून माजघरांत आल्याबरोबर आपल्याला तेथील वस्तु दिसत नाहींत म्हणून मधल्या घरांत वस्तूच नाहींत असें आपल्याला म्हणतां येईल का? सभा-मंडपाला असलेले खांब आंधळ्याला दिसले नाहींत म्हणून त्या सभामंडपाला खांब नाहींत असें म्हणतां येईल काय? छे, असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. वस्तु क्वचित् अतिदूर असल्यामुळें आपल्याला दिसत नाहीं. क्वचित् ती फारच जवळ असल्यामुळेंहि दिसत नाहीं. क्वचित् अंधत्व, बधिरत्वादि दोषांमुळेंहि वस्तूचें ग्रहण होत नाहीं. तात्पर्य वस्तु असूनहि ती न दिसण्याचीं अनेक कारणें असूं शकतात. प्रतिबंधक दूर झालें कीं, असलेली वस्तु आपल्याला दिसूं लागते. याच न्यायानें अज्ञान, अश्रद्धा, अविवेक, बुद्धिमालिन्य इत्यादि अनेक कारणांमुळें ईश्वर असूनहि तो आपल्याला दिसत नाहीं. गुरुकृपेनें अथवा ईश्वरकृपेनें श्रवण, मनन, निदिध्यासन अथवा भक्ति-पूर्वक परमेश्वराचें अनन्यचिंतन घडलें तर अज्ञानादि प्रतिबंधकांचा निरास होऊन आपल्याला ईश्वराचें दर्शन घडतें. आपल्याला ईश्वराचा साक्षात्कार होतो. –

श्रोतव्यः श्रुतिवाक्येभ्यो मन्तव्यश्चोपपत्तिभिः ।
मत्वा च सततं ध्येयः एते दर्शनहेतवः ।।

हरवलेला उंट स्वयंपाकघरांत, माजघरांत अथवा दिवाणखान्यांत शोधावयाचा नसतो. त्याला रानावनांतच शोधलें पाहिजे. त्याचप्रमाणें ईश्वराचाहि शोध करा-वयाचा झाल्यास श्रुतिवाक्यांचें व संतवाक्यांचें श्रवण त्याचप्रमाणें त्यांचें मनन आणि चिंतन अर्थात् निदिध्यासन हींच साधनें हातीं घेऊन आपल्याच हृदयांत तो करावयास पाहिजे. आपल्या निर्मल हृदयांतच आपल्याला ईश्वराचें दर्शन घडेल.

आतां आमचे कांहीं तार्किक बंधु असे आहेत कीं, कोणत्याहि गोष्टीकडे तर्काच्या दृष्टीनें पाहणें हाच त्यांचा छंद असतो. एखादी गोष्ट प्रत्यक्ष कळलेली असली, पाहि-लेली असली, तरी तिला अनुमानाच्या कसोटीवर घासल्याशिवाय त्यांना चैनच पडत नाहीं! "प्रत्यक्षपरिकलितमपि अर्थं अनुमानेन बुभुत्सन्ते तर्करसिकाः" प्रत्यक्ष ज्ञात असलेल्या वस्तूंनाहि तर्करसिक लोक पुन्हां तर्कानें जाणण्याची इच्छा करतात. असा हा तार्किकांचा खाक्या आहे. "नैषा तर्केण मतिरापनेया" "तर्काप्रतिष्ठानात्" ईश्वरसाक्षात्कार तर्कानें प्राप्त करून घेतां येत नाहीं. तर्क हा अस्थिर असतो. त्याला

सुप्रतिष्ठा नसते, इत्यादि श्रुतिसूत्रादिकांतील वचनांवरून तर्काला फारसें महत्त्व दिलें जात नाहीं असें दिसतें. तथापि विचारवंतांच्या विचारक्षेत्रांत तर्कालाहि बरेंच आदराचें स्थान आहे. तर्काची दृष्टि ज्याला नाहीं तो आंधळा समजला जातो. मात्र तो तर्क सत्तर्क असावा. कुतर्क नसावा. कुतर्कानें कार्याचा नाश होतो व अधोगति मिळते. सत्तर्कानें पावलें टाकल्यास यशाचा मार्ग दिसतो व उत्कर्षाचाहि लाभ होतो. निरीश्वरवाद्यांचें खंडनहि तार्किक लोक तर्कानेंच करतात.

आपण शहरामध्यें उंच उंच, अत्यंत भव्य आणि विविध कलाकौशल्यांनीं पूर्ण असलेल्या इमारती पाहतों. नाना कलाकृतींनीं विराजत असलेलीं प्रचंड मंदिरें पाहतों. तेव्हां आपल्या मनामध्यें सहजच प्रश्न उत्पन्न होतो कीं, या एवढ्या टोलेजंग इमारती कोणीं बरें बांधल्या असाव्यात? हीं कौशल्यपूर्ण कलाकृतींनीं नटलेलीं मंदिरें कोणीं बांधलेलीं असावींत? हीं लहान-मोठीं विविधाकृतींचीं रमणीय चित्रें कोणत्या बरें कारागिरानें खोदलेलीं असावींत? त्यांच्या कलाकृतींचें कौतुक करावें तेवढें थोडें आहे! आपण त्या इमारती व मंदिरें बांधणाऱ्यांचा व शिल्पकारांचाहि शोध करतों. त्या शिवाय जिज्ञासु मनाचें समाधानच होत नाहीं. ते त्या मंदिरांचे व इमारतींचे निर्माते व ते कुशल शिल्पकार हे भूतकालांतील असोत अथवा विद्यमान कालांतील असोत त्यांचा आपण शोध लावीतच असतों, व ज्ञान करून घेतच असतों. निर्मात्याशिवाय कोणतीहि कृति आणि शिल्पकाराशिवाय कोणतीहि कला अस्तित्वांतच येणार नाहीं अशी आपली खात्री असते. अतिप्राचीन किल्ले अथवा मंदिरें आणि त्यांची ती आश्चर्यजनक कलाकृति पाहिल्यानंतर आपण ताम्रपट, शिलालेख, ती विशिष्ट कलाकृति व ते दगड पाहून त्यांच्या कालाची, कर्त्यांची व शिल्पकारांची कल्पना करीत असतों. याच न्यायानें ईश्वराचाहि शोध लावणें भाग पडतें.

कोणतेंहि कार्य असो, कार्य म्हटलें कीं, त्याच्या मुळाशीं कर्ता हा असावाच लागतो. कोणतीहि कलाकृति म्हटली कीं, तिच्या मुळाशीं शिल्पकार हा असावाच लागतो. कोणताहि कारखाना म्हटला कीं, त्या कारखान्याच्या मुळाशीं प्रेरक, चालक, पालक व मालक हा असावाच लागतो. कोणतीहि संस्था म्हटली कीं, त्या संस्थेच्या मुळाशीं संस्थापक, अध्यक्ष, कार्यवाह व कार्यकारी मंडळ व त्याची घटना ही असावीच लागते. हें सर्व मानणें अपरिहार्य असतें व तें वस्तुस्थितीला धरूनहि असतें.

विश्वाचें स्वरूप आपण पाहिलें म्हणजे विश्व हें एक प्रचंड कार्य आहे, ही गोष्ट कोणालाहि मान्य करावी लागेल इतकी ती स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें विश्व हें विविध कलाकृतींनीं पूर्ण भरलेलें आहे. जेथे मोठमोठ्या बुद्धिमंतांचीहि बुद्धि थक्क होईल अशी अतर्क्य कला व कौशल्य या विश्वांत सर्वत्र भरलेलें आहे. विश्वाची घडामोड व कालचक्राची गति पाहिली म्हणजे विश्व हा जणूं कांहीं एक अत्यंत व्यवस्थित चाललेला कारखानाच आहे असें वाटतें. सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें व राशि त्याचप्रमाणें, इतरहि तारे यांचें नियमितपणें होणारे उदय, अस्त व गति आणि

त्यांचे परिणाम, त्याचप्रमाणें वरुण, अग्नि आणि वायु, तसेच ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र व विधाता, आणि यम त्याचप्रमाणें इंद्र आणि कुबेर या सर्वांचीं अव्याहत आणि सुव्यवस्थित चाललेलीं कामें पाहिलीं म्हणजे विश्व ही एक मोठी विलक्षण संस्था आहे व ती जणूं कांहीं घटनाबद्ध नियमांनीं चालली आहे असें वाटतें.

कोणत्याहि गोष्टीचें ज्ञान निःसंदिग्ध व यथार्थ व्हावयाचें असेल तर त्याला शास्त्रप्रतीति, गुरुप्रतीति, तर्क अथवा युक्ति आणि आत्मप्रतीति या चार साधनांचा समुच्चय हा असावाच लागतो. विश्व आणि विश्वेश्वर अर्थात् परमात्मा यांचाहि अन्योन्य संबंध लक्षांत घेण्यासाठीं आपल्यालाहि वर निर्दिष्ट केलेल्या साधनांचाच अवलंब करावा लागेल.

यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।
तँ्ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ।।

— बृहदारण्यक

जो सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वीं सृष्टिनिर्मात्या ब्रह्मदेवाला निर्माण करतो व सृष्टिकालीं जन्माला येणाऱ्या लोकांच्या कल्याणासाठीं ब्रह्मदेवाला वेदहि शिकवितो त्या सर्व मानवांना व देवांनाहि आत्मबुद्धीचा प्रकाश देणाऱ्या देवाला-परमेश्वराला सर्व संसारदुःखांतून मुक्त होण्याच्या इच्छेनें मी शरण जात आहें. या मंत्रांत वेदांचा उपदेष्टा व सृष्टिकर्त्याचाहि निर्माता म्हणून ईश्वराचा स्पष्टच निर्देश केलेला आहे.

"विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता" (मुण्डकोपनिषत् १.१.१) या श्रुति-वचनानेंहि सर्व विश्वाचा कर्ता व त्रिभुवनाचा संरक्षक म्हणून परमेश्वराचा निर्देश केलेला आहे. "यः सर्वज्ञः सर्ववित् यस्य ज्ञानमयं तपः" (मुण्डको. १.१.१९) ही श्रुति देखील सामान्यरूपानें व विशेषरूपानेंहि सर्व अर्थात् सर्व कांहीं जाणणारा अशा रूपानें ईश्वराचा निर्देश करीत आहे. "ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानाम्" (महानारायणोपनिषत् १७.५) "योऽन्तरो यमयति" (बृहदा. ३.७.१) — सर्व विद्यांचा स्वामी व सर्व भूतांचा-प्राणिमात्रांचा अधिपति, सर्वांच्या अन्तर्यामामध्यें राहून सर्वांचें नियमन करतो. तात्पर्य कर्ता, गोप्ता, स्वामी, नियामक, सर्वान्तर्यामी, सर्वसाक्षी इत्यादि अनेक रूपांनीं कितीतरी श्रुतिवचनें ईश्वराचें अस्तित्व व्यक्त करीत आहेत. "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति" ईश्वर सर्वभूतांमध्ये राहतो व सर्वांना आपआपल्या कार्यामध्यें प्रवृत्त करतो. इत्यादि असंख्य स्मृतिवचनेंहि मुक्त कंठानें ईश्वराचें प्रतिपादन करीत आहेत.

## वेदाचें प्रामाण्य

यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं, वेदवचनें तरी प्रमाणभूत आहेत हें कशावरून ? वेद ईश्वरानें सांगितले आहेत म्हणून प्रमाण आहेत असें जर म्हटलें

तर, वेद ईश्वराने सांगितले आहेत म्हणून वेदांना प्रामाण्य मानावयाचें व वेदांनीं ईश्वर प्रतिपादन केलेला आहे म्हणून ईश्वराचें अस्तित्व मानावयाचें असा एक प्रकारचा अन्योन्याश्रय दोष येतो. शंका अगदी बरोबर आहे. पण वेद हे ईश्वरानें सांगितले आहेत म्हणून ते प्रमाण आहेत असें शास्त्रज्ञ म्हणत नाहींत; तर वेद हे अपौरुषेय असल्यामुळें त्यांचें प्रामाण्य हें स्वतःसिद्ध आहे. वेद हे स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहेत. सृष्टीच्या आरंभकाळीं ईश्वरानें ब्रह्मदेवाला वेद उपदेशिले असें जें वर एका मंत्रांत सांगितलें आहे तें देखील "ईश्वरः स्मृत्वा उपदिशति न तु कृत्वा" पूर्व सृष्टींतील वेदांचें स्मरण करूनच उत्तरोत्तर सृष्टिकालीं ईश्वर हा ब्रह्मदेवाला वेदांचा उपदेश करीत असतो अशाच अभिप्रायानें सांगितलें आहे. यामुळेंच वेदांचें अपौरुषेयत्व निराबाध आहे त्याचप्रमाणें वेदांच्या प्रामाण्यालाहि विद्यमानकालापर्यंत कोणीहि बाध आणूं शकला नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. विद्यमान काल हा विज्ञानयुग समजला जातो. या विज्ञानयुगांत वैज्ञानिकांनी नवी नवी संशोधनसामग्री शोधून तिच्या साहाय्यानें नव्या नव्या शोधांची जणुं कांहीं पराकाष्ठा गांठली आहे. तथापि विश्वाचें पांचभौतिकत्व, जगाचें नश्वरत्व, आत्म्याचें अमरत्व, सूर्याचें उष्णत्व, कार्यरूप जलाचें निम्नगामित्व, सुखदुःखांच्या ज्ञानाचें साधन म्हणून मानलें गेलेलें मनाचें अस्तित्व, वायूचें सदागतिशीलत्व व आकाशाचें शब्दगुणकत्व इत्यादि कोणत्याहि वेदविहित प्राचीन सिद्धान्तांना बाध येऊं शकला नाहीं. ज्या दोषांनीं वेदांना अप्रामाण्य येऊं शकेल असा कोणताहि दोष वेदांच्या ठिकाणीं नसल्यामुळें वेदांचें प्रामाण्य स्वतःसिद्ध निराबाध आहे. या दृष्टीनें पाहिलें असतां वेदवचनांवरून ईश्वराचें हें अस्तित्व मानण्यांत अन्योन्याश्रय दोष येऊं शकत नाहीं.

आतां जे कोणी वेदांचें अपौरुषेयत्व मानीत नाहींत, वेद हे सर्वज्ञ ईश्वरप्रणीत आहेत असें मानतात, त्यांच्या मतानें विचार केल्यास प्रथम अनुमानप्रमाणानें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध केलें जातें व नंतर सर्वज्ञ ईश्वरानें वेद सांगितले म्हणून ते प्रमाण मानले जातात. अशी ही विचारसरणी असल्यामळें याहि मताने विचार केल्यास पूर्वोक्त अन्योन्याश्रयदोष येऊं शकत नाहीं.

आतां चार्वाक, बौद्ध, जैन, इत्यादि जे लोक वेद प्रमाण नाहींत असें म्हणतात ते देखील स्वतःचा आगम प्रमाण म्हणून मानीतच असतात. स्वतःचा आगम जर प्रमाण आहे तर मग सर्व आगमांचें उगमस्थान असलेला निगम म्हणजे वेद हा अप्रमाण आहे असें म्हणून कसें भागेल ? तात्पर्य वेदांचें प्रामाण्य हें अक्षुण्ण व निराबाध असल्यामुळें वेदांच्या वचनांवरून ईश्वराचें अस्तित्व मानणें हें क्रमप्राप्तच आहे.

## ईश्वरसिद्धि

आतां आपण तार्किक मंडळी अनुमानानें ईश्वर कसा सिद्ध करतात तें पाहूं. अनुमान म्हणजे युक्ति अथवा तर्क. ज्या गोष्टी आपल्याला प्रत्यक्ष प्रमाणानें कळत

नाहींत त्यांचें ज्ञान आपल्याला अनुमानानें होत असतें. धूर आणि विस्तव यांचा स्वयंपाकघर वगैरे ठिकाणीं आपण नेहमीं संबंध पाहत असतों. एखाद्या ठिकाणीं प्रत्यक्ष आपल्याला अग्नि दिसला नाहीं तरी त्या ठिकाणीं दिसत असलेल्या धूमावरून आपण तेथें अग्नि आहे असा तर्क करतों. धूर असला कीं अग्नि असतोच. ज्या अर्थी येथें धर दिसत आहे त्या अर्थीं या ठिकाणीं अग्नि असला पाहिजे हाच तो तर्क होय. जवळ जाऊन पाहिल्यानंतर आपल्याला तेथें प्रत्यक्ष अग्नि दिसतोहि. प्रत्यक्ष अग्नि दिसण्यापूर्वी केवळ धूमावरून येथें अग्नि आहे असें जें आपल्याला प्रथम ज्ञान होत असतें, तें अनुमानानें होत असतें. या ज्ञानाला अनुमिति असें म्हणतात. अनुमानांतील हेतु म्हणजे साधन हें जर बिनचूक असेल तर त्या अचूक हेतूनें होणारें ज्ञानहि सत्य म्हणजे बिनचूकच असतें. याच पद्धतीनें तार्किक मंडळी ईश्वराविषयीं तर्क करीत असतात. त्यांचा तो तर्क इतर कोणत्याहि प्रतिकूल प्रमाणांनीं बाधित होत नसल्यामुळें व अनुकूल तर्कांचें आणि श्रुति व अनुभव यांचेंहि पाठबळ असल्यामुळें सत्यच मानावा लागतो.

विविध वैचित्र्यानें नटलेल्या विश्वाची उत्पत्ति हाच एक ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्याला पुरेसा असा प्रबळ पुरावा आहे. जग हें एक कार्य आहे. तें उत्पन्न होणारें आहे. जेंजें कार्य असतें अथवा उत्पन्न होत असतें त्याला त्याला कोणी तरी कर्ता अथवा उत्पादक सावाच लागतो. कर्त्यावांचून कोणतेंहि कार्य उत्पन्न होत नसतें. घर म्हटलें कीं, त्या घराचा कोणीतरी बांधणारा असलाच पाहिजे. रथ म्हटलें कीं कोणीतरी त्याचा निर्माता शिल्पकार असलाच पाहिजे. तात्पर्य, कर्त्याशिवाय अथवा उत्पादकाशिवाय कोणतेंहि कार्यनिर्माण होऊंच शकत नाहीं. यावर कोणी असें विचारील कीं, अहो, रानावनांत पाऊस पडला कीं गवत उगवतें. लहान-मोठीं झाडें उगवतात. त्यांचीं जंगलें व अरण्यें तयार होतात. हें कार्य कोण करतो ? तीं सर्व कार्यें आपोआपच तयार होतात ना ? तसेंच हें सर्व जग आपोआप निर्माण होतें असें म्हणावयास काय हरकत आहे ? यावर उत्तर असें कीं, जगाच्या उत्पत्तीप्रमाणेंच रानावनांत उगवणारें गवत व जंगलांतील वृक्ष, लता, वेली, वनस्पति वगैरे यांची उत्पत्ति हाहि एक विवाद्यच मुद्दा असल्यामुळें तो दृष्टान्त म्हणून उपयोगाला येऊं शकणार नाहीं.

शेतकरी शेतामध्यें धान्याची पेरणी करतो म्हणून धान्यें उगवलेलीं दिसतात. माळी मळ्यामध्यें फुलझाडांची लावणी करतो म्हणून मळ्यामध्यें फुलझाडें फुललेलीं दिसतात. संत्रीं, मुसंबी, पेरू, चिक्कू, केळीं, फणस, आंबे वगैरे फळझाडांची लागवड बागवान करतात. म्हणूनच बागेंत फळांचे वृक्ष बहरलेले दिसतात. शेतकरी, माळी अथवा बागवान असल्याशिवाय वृक्ष, लता, वेली, वनस्पति व धान्यें यांची उत्पत्ति झालेली दिसत नाहीं. उत्पत्तीला उत्पादकाची आवश्यकता असते. कोणत्याहि निर्मितीला निर्माता हा असावाच लागतो. रानावनांतील लता, वेली, गवत व अरण्यांतील

छोटे-मोठे वृक्ष यांचा निर्माता कोणी मानव असल्याचें दिसत नाहीं. उत्पत्ति तर झालेली आहे; होत आहे. ती उत्पादकाशिवाय होऊं शकणार नाही. अर्थात् त्या मानवानें निर्माण न केलेल्या पण विश्वांत विलसत असलेल्या वृक्ष, लता, वेली, वनस्पति वगैरेंचा जो निर्माता आहे त्यालाच शास्त्रज्ञ परमात्मा असें म्हणतात. नैसर्गिक जंगलें आणि अरण्यें हीं त्या परमेश्वराचीं वनें आणि उपवनेंच होत. लोक परमेश्वराचीं वनें आणि उपवनेंच पाहतात. त्यांत रमतात. पण परमेश्वराला मात्र कोणी ओळखत नाहीं. हाच अभिप्राय याज्ञवल्क्यांनी बृहदारण्यकोपनिषदांत व्यक्त केला आहे– "आराममस्य पश्यन्ति न तं पश्यति कश्चनेति–" (बृ. ४।३।१४). नथ ज्यानें तयार केली त्याचें कौतुक केलें जातें पण ज्या नाकांत नथ घालावयाची तें नाक कोणीं निर्माण केलें याचा कोणी विचारच करीत नाहीं. आगगाडी, तारायंत्र, टेलिफोन, रेडिओ, मोटार, विमान आणि अण्वस्त्रें इत्यादि गोष्टी ज्यांनीं शोधून काढल्या, तयार केल्या त्यांचें लोक कौतुक करतात पण हे शोध लावण्याची बुद्धि ज्यानें दिली, त्याच्याकडे कोणी लक्षच देत नाहीं! अशांतलाच हाहि एक प्रकार आहे. विविध आश्चर्यांनीं भरलेलें विश्व पाहून त्याचें कौतुक करावयाचें पण तें कोणी निर्माण केलें याचा विचारच करावयाचा नाही, अथवा तें आपोआपच निर्माण झालें असें म्हणावयाचें हें केवढें अज्ञान आहे! तात्पर्य राना-वनांतील गवत किंवा जंगलांतील झाडेंझुडपें हीं आपोआप निर्माण झालेलीं नसून तीं ईश्वरानें निर्माण केलेलीं आहेत. ती सर्व सृष्टि ईशनिर्मित आहे यांत संशय नाहीं.

यावर कोणी असें विचारील कीं, हीं निरुपयोगी झाडें, झुडपें, लता, वेली, गवत वगैरे ईश्वरानें कशाकरितां निर्माण केलें? यावर उत्तर असें कीं, त्यांचा उपयोग तुम्हांला समजला नाहीं म्हणून तीं निरुपयोगी आहेत असें म्हणणें उचित होणार नाहीं. ईश्वरानें केलेल्या सृष्टींतील एकहि वस्तु निरुपयोगी नाहीं. "नास्ति मूलमनौषधम्" हें सुभाषितवाक्यहि हाच सिद्धान्त सांगत आहे. हें सर्व जग, किती विशाल आहे याचें कोणाला साकल्यानें आकलन करतां येईल काय? देव, दानव, गंधर्व, यक्ष, किन्नर, राक्षस, पितृगण, भूत, प्रेत, पिशाच्च, मानव, स्त्री-पुरुष, पशु-पक्षी, कीट, पतंग, अशा विलक्षण प्राणिमात्रांनीं नटलेलें आहे हें. अन्तरिक्षलोक स्वर्गलोक, अगदीं ब्रह्मदेवाच्या सत्यलोकापर्यंतचे सारे लोक. त्याचप्रमाणें सारी पृथ्वी व सप्त पाताल, असा हा विश्वाचा अफाट पसारा आहे! याची रचनाहि पण मोठी विचित्र आहे. कांहीं प्राणी जलचर आहेत; कांहीं आकाशगामीहि आहेत. कांहीं मासे रत्नाएवढेच असतात व रत्नासारखेच चमकतात. तर कांहीं माशांचे नेत्रच एखाद्या वेशीसारखे विशाल असतात. यावरून त्यांचा देह केवढा असेल याची कल्पना करावी. तो हत्ती पहा. केवढा अजस्र प्राणी आहे तो! सोंड किती सरळ आहे त्याची! आणि तो उंट पहा. किती उंच आहे! एकहि अवयव सरळ नाहीं त्याचा! तो मोर पहा. किती खुबीनें रंग भरले आहेत त्याच्यांत. एखाद्या कुशल चित्रकारालाहि आपल्या चित्रांत असे रंग भरतां येणार नाहींत. तो बगळा पहा. किती पांढरा शुभ्र आहे तो? तो कावळा पहा. किती काळाकुट्ट आणि

तो पोपट पहा कसा ऐटींत बसला आहे ! रंग अगदीं हिरवागार. चोंच किती बांकदार आहे ? रंगानें जणूं पळसाचें फूल. ती त्याच्या कंठाची काळी रेषा किती सुबक दिसत आहे ! त्याच्या शेपटींतील पिवळ्या, पांढऱ्या आणि गुलाबी छटा चित्ताला खेचून घेत आहेत. पानें, फुलें आणि फळें खाऊन आपलें जीवन एखाद्या ऋषिमुनीप्रमाणें अत्यंत निर्मळपणें चालवीत आहे. कधीं घाणींत तोंड घालणार नाहीं. किती सात्विक आहे तो ! आणि तो कावळा ! कसल्याहि घाणींत तोंड खुपसावयास मागेंपुढें पाहणार नाहीं ! किती हें या दोन प्राण्यांतील स्वभाववैचित्र्य ! ती बेडकी पहा. कशी टुणटुण उड्या मारीत चालली आहे ती. सरळ चालतांच येत नाहीं त्या प्राण्याला ! चिखलांत जगेल, पाषाणाच्या पोटांतहि जन्माला येईल व तेथेंच वाढेल ! " खडक फोडतां सजिव, रोडकी पाहिली सर्वांनीं बेडकी, नसतां सिंधु तियेचे मुखीं पाणि कोण घाली तो; तो राम आम्हांला देतो ! " हें समर्थांचें वचन सर्वश्रुतच आहे. तीं पहा विविध रंगांचीं व आकारांचीं गमतीगमतीचीं फुलें ! त्यांच्या परिमलानें सभोवारचा प्रदेश दरवळून गेलेला आहे ! एकाचा गंध दुसऱ्याला नाहीं. त्यांचा रस सेवन करण्याकरितां भ्रमर त्यांच्या भोंवतालीं गुंजारव करीत घिरट्या घालीत आहेत. सृष्टीच्या वैचित्र्याची झेप ही कविकल्पनेच्याहि पलीकडे जात आहे.

अशी ही वैचित्र्यपूर्ण सृष्टि पाहिल्यानंतर साहजिकच प्रश्न येतो कीं ही सृष्टि कोणीं निर्माण केली ? पदार्थसंग्रहालयांतील प्रत्येक पदार्थाचा कोणी न कोणी तरी निर्माता हा असतोच. त्याचप्रमाणें सृष्टींतील प्रत्येक पदार्थाला रंग, रूप, आकार आहे. त्याची घडण आहे. तेव्हां कोणी न कोणी तरी या पदार्थांना घडविणारा हा असलाच पाहिजे. जी घडण मानवाने केलेली असते तिच्याबद्दल प्रश्नच नाहीं पण जेथें मानवाची कृति कुंठित होते तेथें कोणी तरी ती घडण घडविणारा अलौकिक पुरुष मानलाच पाहिजे. त्यालाच तत्त्वज्ञ परमेश्वर असें म्हणतात. अशा रीतीनें कोणतेंहि कार्य कर्त्यावांचून होत नसल्यामुळें व विश्वनिर्मितीचें कार्य मानव करूं शकत नसल्यामुळें विश्वाचा निर्माता म्हणून परमेश्वर मानावाच लागतो. याच अभिप्रायानें श्रुतीनेंहि " विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता " अशा शब्दांनीं ईश्वराचें वर्णन केलेलें आहे.

निर्माण केलेल्या वस्तूंचें परिपालन करणें—संरक्षण करणें—हेंहि एक कार्य अपरिहार्य असतें. नाहीं तर निर्माण केलेल्या वस्तु ताबडतोब नष्ट होऊन जातील ! अफाट विश्वाच्या संरक्षणाचें कार्य हें मानवाच्या शक्तीच्या बाहेरचें आहे, म्हणूनहि विश्वाचा संरक्षक या नात्यानें तसाच विशिष्ट शक्तिशाली पुरुषविशेष अर्थात् परमात्मा हा मानावाच लागतो. सर्वसमर्थ असा तो परमात्मा पाठीशीं असल्याशिवाय विश्वाचें संरक्षणच होऊं शकणार नाहीं. हाच अभिप्राय वरील श्रुतिवाक्यांत "गोप्ता" या शब्दानें प्रकट केला आहे; तोहि तर्काला धरूनच आहे.

विश्व हा एक मोठा विशाल जणूं कांहीं कारखानाच आहे. यांत विविध प्रकारचे असंख्य प्राणी प्रत्यहीं जन्माला येतात व मरतात. आपआपल्या कर्माप्रमाणें ते सुख-

दुःखें भोगीत असतात. कोणी नीच कर्में करून अवनतीला जातात तर कोणी पुण्यकर्में करून आपली उन्नति करून घेतात. कित्येक भाग्यवन्त जीव सद्‌गुरूंच्या कृपेनें परब्रह्म-पदालाहि जाऊन पोहोंचतात. प्रत्येक प्राण्याच्या जीवनाचीं साधनें व राहण्याचीं स्थानेंहि मोठ्या कुशलतेनें त्या त्या जीवांच्या प्राक्तन कर्मानुसार योजिलेलीं पहावयास सांपडतात. पशूंच्यासाठीं चारा, पक्ष्यांच्यासाठीं फळें व मानवासाठीं धान्यें अशी सर्वत्र योजना पहावयास सांपडते. अर्भक जन्माला येण्याच्या पूर्वीच त्याच्या निर्वाहासाठीं मातेच्या शरीरांत स्तन्याची निर्मिति होत असलेली पहावयास सांपडते. ही सर्व सृष्टीं-तील सुसंबद्ध योजना आपोआप घडून येते काय ? छे! या जगांत आपोआप कांहींच घडून येत नाही. याच्या मुळाशीं कोणीतरी योजक आहे व त्याचीच ही योजना आहे. तो योजक तुम्ही-आम्ही कोणी असूं शकत नाहीं. कारण तुमच्या-आमच्यामध्यें ती शक्तीच नाही, मग योजना काय करणार ?

प्राणिमात्रांना वावरण्यासाठीं व त्यांना आवश्यक असलेल्या साधनसामग्रीसाठीं अवकाशाची आवश्यकता असल्यामुळें प्रथम अवकाशात्मक आकाशाची योजना झाली. राहण्यासाठीं स्थानाची आवश्यकता असल्यामुळें पृथ्वी उत्पन्न झाली. जीवनासाठीं जलाची आवश्यकता असल्यामुळें जलाची उत्पत्ति झाली. पोषणासाठीं तेजाची व विकासासाठीं वायूची गरज असल्यामुळें तेज आणि वायु यांचीहि उत्पत्ति झाली. यांनाच पंचमहाभूतें असें म्हणतात. पंचमहाभूतांची उत्पत्ति मानव करूं शकत नाहीं. मानव हा पंचमहाभूतांच्या आधारानें जगत असतो. शरीरांतील पंचमहाभूतें हीं आपआपल्या मूलभूत पंचमहाभूतांत विलीन झालीं कीं, देह पंचत्वाला गेला असें म्हणतात. या पंचमहाभूतांचा उत्पादक कोणी तरी विशिष्ट शक्तिशाली समर्थ असा पुरुषविशेष मानणें अपरिहार्य आहे. याच पुरुषविशेषाला तत्त्वज्ञ ईश्वर असें म्हणतात. जेथें मानवाची योजना अपुरी पडते, असमर्थ अथवा लुळी ठरते, तेथें अघटित घटना घडवून आणणाऱ्या आपल्या माया नांवाच्या शक्तीनें संपन्न असलेला हाच ईश्वर ती योजना घडवून आणतो. हाच त्या विस्मयजनक, अतर्क्य योजनेच्या मुळाशीं योजक अथवा संयोजक म्हणून उभा असतो. त्यानेंच सृष्टीच्या योजनेसाठीं या पंचमहाभूतांची उत्पत्ति केली !

सृष्टीच्या पोषणाकरितां उष्णतेची गरज असते म्हणून सूर्य निर्माण केला पण त्याच्या उष्णतेनें जग होरपळून जाऊं नये म्हणून आपल्या शीतल किरणांनीं अमृताची वृष्टि करून वनस्पतीचें रक्षण व पोषण करणारा आणि सर्व विश्वाला आल्हाद देणारा असा अमृतांशु म्हणजे चंद्रहि निर्माण केला! ग्रह, नक्षत्रें, तारे व राशिचक्र या सर्वांची उत्पत्ति सृष्टीचा समतोल राखण्यासाठींच आहे. त्यांचा उपयोग आम्हांला कळणें अथवा न कळणें ही गोष्ट निराळी. ईशनिर्मित कांहीं पदार्थांचा उपयोग आम्हांला कळला नाहीं म्हणून ते पदार्थ निरुपयोगी आहेत असें म्हणतां येत नाहीं. ईशनिर्मित असा एकहि पदार्थ निरुपयोगी असूं शकत नाहीं. अशा रीतीनें विश्व हा एक योजनाबद्ध

प्रचंड कारखाना आहे असें म्हटल्यास त्या कारखान्याचा निर्माता, चालक व मालक कोणीतरी असलाच पाहिजे. या कारखान्याची निर्मिति तुमच्या-आमच्या हातून होऊं शकत नाही व यावर तुमची-आमची मालकीहि असूं शकत नाहीं. अर्थात् तुमच्या-आमच्यापेक्षां कोणीतरी निराळा या विश्वरूपी कारखान्याचा कारखानदार, निर्माता, संयोजक, संचालक, पालक व मालक असलाच पाहिजे. त्यालाच तत्त्ववेत्ते ईश्वर असें म्हणतात.

जें पिंडीं तें ब्रह्माण्डीं व जें ब्रह्माण्डीं तेंच पिंडीं या न्यायानें पाहतां आपल्या पिंडांत म्हणजे शरीरांत जन्मापासून मरेपर्यंत जी एक अतर्क्य प्रक्रिया म्हणजे घडामोड चाललेली असते ती अत्यंत सुसंबद्ध व योजनामूलक असते. उदाहरणार्थ, देहाची रचनाच घ्या. देह हा एक हाडांचा सांपळा आहे. त्याची रचना अत्यंत सुसंबद्ध व योजनापूर्ण आहे. तो हाडांचा सांपळा मांसाने लिंपला आहे. रसरक्तानें भरला आहे. स्नायूंनीं आवळला आहे. मेद आणि मज्जा यांनीं सुस्निग्ध केला आहे. त्वचेनें झांकला आहे. किती मोहक दिसत आहे हा ! ही मोहकता या अचेतन देहाला आली कशी ? या प्रश्नाचें उत्तर ही सारी रचना परमेश्वराची आहे. तोच चैतन्यरूप परमात्मा या देहामध्यें जीवरूपानें नांदत आहे म्हणूनच या देहाला सौंदर्य, माधुर्य, लावण्य व मोहकता प्राप्त झालेली आहे. यावर कोणी असें म्हणेल कीं अहो ! देह हा तर आई-बापांनीं निर्मिला आहे. त्यांनींच आम्हांला जन्म दिला आहे. यांत ईश्वराचा काय संबंध आहे ? पण हें म्हणणें बरोबर नाहीं. तें अगदीं उथळ विचाराचें द्योतक आहे. आईबाप हे देहाची रचना करूं शकत नाहींत व ते देह देऊंहि शकत नाहींत. ते केवळ निमित्तमात्र जन्माचे धनी असतात. देहाची रचना करणें व जन्म देणें हें जर मानवाच्या स्वाधीन असतें तर निपुत्रिक लोकांवर अपत्यहीन होऊन राहण्याची पाळीच आली नसती. तात्पर्य देहाची रचना परमेश्वरच करतो व जन्महि तोच देतो असेंच मानणें अपरिहार्य आहे.

देहांतील प्रक्रियेची सुसंबद्ध योजना हीहि पण परमेश्वराचेंच अस्तित्व निर्विवाद-पणें सिद्ध करीत आहे. शरीरांत पचनमार्ग आहे. आमाशय, पच्यमानाशय, पक्वाशय, रक्ताशय, मूत्राशय, मलाशय, इत्यादि कितीतरी स्थानें आहेत. सेवन केलेलें अन्न प्रथम जठरांत सांठतें. तेथें त्याच्यावर प्रथम सौम्य अग्निसंस्कार होतो. तेथून तो अन्नरस पच्यमानाशयांत उतरतो. पच्यमानाशयालाच ग्रहणी असें म्हणतात. हेंच जाठराग्नीचें मुख्य स्थान आहे. येथेंच अन्नरसाचा परिपाक होतो. परिपक्व अन्नरस हा पक्वाशयांत सांठतो. तेथें त्याचें सार आणि किट्ट रूपानें विभजन होतें. किट्ट अंश हा मलाशयांत जातो व साररूप अंश लहानमोठ्या स्रोतसांच्या द्वारां सर्व शरीरभर पसरतो. या अन्नरसाचेंच रसधातूंत परिणमन होतें व पुढें क्रमानें रक्त, मांस, मेद, मज्जा, अस्थि इत्यादि धातूंची उत्पत्ति होत राहते. या सर्व प्रक्रियेच्या मुळाशीं जी एक सुसंबद्ध योजना आहे त्या योजनेचा संयोजक जीव होऊं शकत नाहीं. हें सामर्थ्य जीवामध्यें नाहीं. तसें

असतें तर तो नेहमीं आरोग्यसंपन्न राहिला असता व अमरहि राहिला असता! पण असें घडून येत नाहीं. याच कारणामुळें या शारीरिक प्रक्रियेचाहि संयोजक परमात्माच मानावा लागतो. तात्पर्य ब्रह्मांडांतील घडामोडींचा कर्ता, प्रेरक व संयोजक जसा परमात्मा आहे तसाच तो पिंडांतील अर्थात् शरीरांतील घडामोडींचाहि कर्ता, प्रेरक व संयोजकहि आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

## विश्वसंस्थेची व्यवस्था

विश्व ही एक मोठी संस्था आहे. या संस्थेंत जीवांनीं कर्मानुसार जन्म घ्यावा. सुखदुःखें भोगावींत. सुखदुःखें भोगून पापपुण्यांचा क्षय करावा. नवीन पापें जोडूं नयेत, पुण्यकर्में परमेश्वराला अर्पण करावींत. परमेश्वराच्या कृपेनें व अभ्यासानें तत्त्वज्ञान संपादन करावें व सर्व संसारबंधनांतून मुक्त व्हावें. याच कार्यासाठीं विश्व ही संस्था निर्माण झाली व ती अत्यंत व्यवस्थित चाललेली आहे. सूर्य आणि चन्द्र नियमानें उदयाला येतात. उन्हाळा, पावसाळा आणि हिंवाळा हें कालचक्र अथवा वसंत, ग्रीष्म इत्यादि ऋतुचक्र नियमानें फिरत असतें. ग्रह, नक्षत्रें, तारे व राशिचक्र यांचे उदय आणि अस्त, त्याचप्रमाणें त्यांचें अंतरालांतील परिभ्रमण ठराविक वेळापत्रकाप्रमाणें अत्यंत व्यवस्थितपणें चालू असतें. या विश्वरूपी संस्थेंत शास्य-शासकभाव आहे. प्रत्येक अधिकारी आपलें काम सुव्यवस्थित करीत असतो. अशी ही सुव्यवस्थित चाललेली संस्था पाहिल्यानंतर या संस्थेचा संस्थापक कोण, संचालक कोण, आणि नियामक कोण, असे प्रश्न मनामध्यें येणें स्वाभाविक आहे. संस्थापक असल्याशिवाय कोणतीहि संस्था अस्तित्वांत येऊं शकत नाहीं. संचालक असल्याशिवाय ती चालूं शकत नाहीं व नियामक असल्याशिवाय संस्थेंतील कामेंहि नियमितपणें होऊं शकत नाहींत. ही परिस्थिति सर्वत्र आपण पहात असतों. अर्थात् विश्वरूपी संस्थेचा संस्थापक, संचालक अथवा नियामक तुम्हीआम्ही कोणी असूं शकत नाहीं. तो कोणीतरी असल्याशिवाय विश्व सुव्यवस्थित चालूं शकणार नाहीं, म्हणून परमात्मा हाच या विश्वाचा संस्थापक, संचालक व नियामक मानणें हें क्रमप्राप्तच आहे. याच अभिप्रायानें परमेश्वराचा दरारा वर्णन करतांना तैत्तिरीयोपनिषदांत म्हटलें आहे कीं,

> भीषाऽस्माद्वातः पवते भीषोदेति सूर्यः।
> भीषा इन्द्रश्चाग्निश्च मृत्युर्धावति पञ्चम इति ।।

या परमेश्वराच्याच भयानें वायु वाहत आहे. सूर्य उदयाला येत आहे. इंद्र, अग्नि आणि यम हे आपआपलीं कामें करीत आहेत. स्वाभाविकच आहे. कोणतेंहि काम करीत असतांना काम करणाऱ्यावर नियामकाचा धाक हा असलाच पाहिजे. नियामकाचा धाक नसेल तर कामें बरोबर होणार नाहींत. नियामक हा जर सत्तालुब्ध व स्वार्थलोलुप असेल तर ज्यांच्या जिवावर त्याचें सत्तापद व स्वार्थ अवलंबून असेल त्या लोकांवर त्याचें नियंत्रणसामर्थ्य दृढ राहूं शकत नाहीं. नियंत्रणसामर्थ्य शिथिल झालें कीं त्यांतूनच

अव्यवस्था आणि अराजकता यांचा जन्म होत असतो. याकरितां अवांतर नियामकांचेंहि नियमन करणारा असा एक प्रधान नियामक असावाच लागतो. या प्रधान नियामकाचा मात्र कोणी नियामक असूं शकत नाहीं. कारण तसें मानल्यास त्याचाहि नियामक मानावा लागेल, व त्यामुळें अनवस्थाप्रसंग ओढवेल. या प्रधान नियामकाला नेहमीं न्यायनिष्ठच राहावें लागतें. तो जर अन्याय करील अथवा पाप करील तर बलिष्ठ शक्तीकडून त्याचाहि पराभव होत राहतो, म्हणून प्रधान नियामकाला न्यायनिष्ठ व निष्पाप असें राहावेंच लागतें. या दृष्टीनें पहातां परमेश्वर हा नेहमींच पूर्णपणें न्यायनिष्ठ व निष्पाप आहे असेंच म्हणावें लागतें, नाहींतर त्याचें सर्वनियामकत्व अथवा प्रधाननियामकत्व हें अक्षुण्ण राहिलेंच नसतें.

या विश्वरूपी संस्थेचा जो प्रधान नियामक आहे त्यालाच तत्त्ववेत्ते ईश्वर अथवा परमेश्वर असें म्हणतात. "सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः–एष सर्वेश्वर एष भूताधिपतिः" बृह. ४–४–२२ हा परमात्मा सर्वांना आपल्या ताब्यांत ठेवणारा आहे. सर्वांचा तो शास्ता आहे. सर्वांचा तो स्वामी आहे. सर्वांचा तो समर्थ अधिकारी आहे. सर्व भूतांचा तो मालक आणि पालकहि आहे. असें बृहदारण्यकाच्या वरील वाक्यांत त्याचें वर्णन केलेलें आहे. "एष भूतपाल एष सेतुर्विधरणः" केवल भूतमात्रांचाच नव्हे तर विश्वांतील वस्तुमात्रांचाच तो संरक्षक आहे. सर्व विश्वाला विस्कळित होऊं न देतां तो विश्वाची धारणा करतो, नियमन करतो म्हणून त्याला सेतु असें म्हटलेलें आहे. याच विश्वनियामकाला नृसिंहउत्तरतापनीयोपनिषदामध्यें "सर्वद्रष्टारं सर्वसाक्षिणम्" सर्वद्रष्टा आणि सर्वसाक्षी असें म्हटलेलें आहे.

हाच विश्वनियंता सर्व विश्वाचा मुख्य अध्यक्ष आहे. यालाच सर्वाध्यक्ष आणि विश्वपति असेंहि म्हटलेलें आहे. विश्वनाथ, विश्वेश्वर, जगन्नाथ, जगदीश्वर, लोकनाथ, ब्रह्माण्डनायक इत्यादि नांवें हाच अभिप्राय व्यक्त करीत आहेत. ही विश्वसंस्था स्थापण्याचा जेव्हां त्यानें संकल्प केला तेव्हां त्यानें प्रथम सृष्टिकर्ता म्हणून ब्रह्मदेवाला निर्माण केलें. पालनकर्ता म्हणून विष्णूला निर्माण केलें व लयकर्ता म्हणून शंकराला निर्माण केलें. निराळ्या एका दृष्टीनें तत्त्वतः तोच या तिन्ही देवतांच्या रूपानें नटला, म्हणूनच त्याला त्रिमूर्ति असें नांव प्राप्त झालें. पुढें त्यानें इंद्रपद निर्माण केलें व जगाचें महसूल खातें इंद्राकडे सोंपविलें. महसूल खात्याबरोबरच गृहखातेंहि पण इंद्रानेंच संभाळलें. वरुणाकडे पाटबंधारे व पाणीपुरवठा खातें सोंपविलें. प्रकाशपुरवठा खातें आदित्यनारायणाकडे आलें. स्वच्छताखातें वायुदेवाकडे दिलें. उष्णता पुरविण्याचें काम अग्निनारायणाकडे आलें. सूर्याच्या व अग्नीच्या अतिरिक्त तेजामुळें व उष्णतेमुळें होरपळून जाणाऱ्या वनस्पतींचें संरक्षण करून त्यांना फलाफुलांनीं समृद्ध करणें व आपल्या अमृतमय शीतल किरणांनीं सर्वांना संतुष्ट करून आल्हाद देणें व मनोरंजन करणें हें समाजकल्याण खातें चन्द्राकडे दिलें. कोषाध्यक्ष कुबेर हे अर्थमंत्री झाले ! जुन्याची मोडतोड करून व पाडापाड करूनहि त्याची व्यवस्थित रीतीनें विल्हेवाट

लावणें हें काम शंकराकडे आलें. प्राणिसंख्येची अथवा लोकसंख्येची भरमसाट वाढ होऊन पुढें पुढें जन्माला येणाऱ्यांना अन्नाची व स्थलाची टंचाई भासूं नये म्हणून मृत्यु-खातेंहि निर्माण केलें गेलें व त्या अधिकारावर यमराजांची नियुक्ति झाली. शिवाय मानवमात्रांच्या बऱ्यावाईट कर्मांची चित्रगुप्तांकरवीं नोंद ठेवून मानवांना विशेषतः त्यांच्या पापांचीं फळें भोगावयास लावण्याचेंहि दुर्धर कार्य यमराजांनींच पतकरलें. न्यायदानाचें पवित्र खातें स्वतः परमेश्वरानें आपल्याकडेच ठेवलें. असें हें विश्वसंस्थेचें कार्य अखंड व अव्याहतपणें चाललें आहे. तात्पर्य अशा रीतीनें या सर्व विश्वाचा कर्ता, संयोजक, प्रेरक, चालक, पालक, मालक, स्वामी सत्ताधीश अथवा प्रधान नियामक म्हणून परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध होत असल्यामुळें तें अमान्य करणें हें विचारवंतांच्या बुद्धीला मान्य होणार नाहीं. ईश्वराचें अस्तित्व मानण्याला आणखी कितीतरी अनुकूल तर्क आहेत. पण विस्तारभयास्तव त्यांचा येथें निर्देश करणें उचित वाटत नाहीं.

## ईश्वरसाक्षात्कार

याप्रमाणें श्रुति आणि युक्ति या दोन प्रमाणांनीं विचार करून ईश्वराचें अस्तित्व निर्विवाद सिद्ध झाल्यानंतर अनुभवाचा प्रश्न पुढें येऊन उभा राहतो. प्रत्यक्ष अनु-भवालाच साक्षात्कार असें म्हणतात. प्रत्यक्ष पाहणें या क्रियेला दर्शन असाहि एक शब्द आहे. आपल्याला बदरीनारायणाचें अथवा केदारनाथाचें दर्शन घ्यावयाचें असेल, तेथील निसर्गरमणीय दृश्यांचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घ्यावयाचा असेल तर आपल्याला ठराविक मार्गानें तेथपर्यंत पोहोंचावयालाच पाहिजे. त्याशिवाय बदरीनारायणाचें दर्शन घडणार नाहीं. केदारनाथाच्या परिसरांतील हिमाच्छादित उत्तुंग शिखरें, त्यांवर क्षणाक्षणाला विश्रांतीसाठीं येणारे व पांथस्थाप्रमाणें पुढें निघून जाणारे ढग, त्या ढगांच्या विरल अंतरांतून संधि मिळतांच शिखरांना स्पर्श करूं पाहणारे सूर्यनारायणाचे किरण व त्या किरणांच्या स्पर्शानें क्षणाक्षणाला बदलणारा सभोंवतालच्या हिमशिखरांचा रंगीबेरंगी, आकर्षक, सोनेरी सुंदर वेष या सर्व गोष्टींचा अपरोक्ष साक्षात्कार करून घ्यावयाचा असेल तर आपल्याला तेथेंच पोहोंचावयाला पाहिजे. घरीं बसून अथवा दूर राहून हा साक्षात्कार घडणार नाहीं. त्याचप्रमाणें श्रुति-युक्तींनी निर्विवाद सिद्ध झालेल्या परमेश्वराचा साक्षात्कार करून घेण्यासाठीं आपल्याला आपला नित्याचा बहिर्मुखपणाचा, विषयलोलुपतेचा व मनाच्या अस्थिर-तेचा परिसर सोडून निराळ्याच परिसरांत जाऊन पोहोंचलें पाहिजे. तो परिसर आहे श्रवणाचा, मननाचा व निदिध्यासनाचा. या परिसरांत पोहोंचण्यासाठीं विवेक, वैराग्य, इंद्रियनिग्रह, मनोनिग्रह, काम्य कर्मांचा आणि निषिद्धकर्मांचा त्याग, त्याचप्रमाणें विषयासक्तीचा व कुसंगतीचा त्याग, सत्संगतीचा अंगीकार, मान-अपमान, लाभ-हानि व सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांना सहन करण्याचा अभ्यास, परमेश्वराच्या स्वरूपा-मध्यें मनाची एकाग्रता राखणें, वेद आणि शास्त्रें त्याचप्रमाणें गुरु, संत व महात्मे

यांच्या वचनावर विश्वास ठेवणें; तसेंच अंतःकरणांत परमेश्वराला पहाण्याविषयीं उत्कट तळमळ असणें हा त्या निदिध्यासनाच्या परिसरांत पोहोंचण्याचा मार्ग होय. या मार्गानें आपण निदिध्यासनाच्या क्षेत्रांत येऊन पोहोंचलों कीं आपल्याला तेथें भगवत्कृपेनें दिव्य दृष्टीचा लाभ होईल व त्या दिव्य दृष्टीनेंच परमेश्वराचा साक्षात्कार घडून येईल. हे आपले चर्मचक्षु परमेश्वराच्या दिव्य स्वरूपाचें आकलन करण्यास असमर्थ ठरतात. परमेश्वराच्या स्वरूपसाक्षात्कारानें होणारा आनंद हा आपल्या अनुभवानेंच आपण जाणूं शकतों. त्याचें शब्दानें वर्णन करतां येत नाहीं. त्याचें वर्णन करतांना "अवर्णनीय" हाच एक शब्द उपयोगांत आणला जातो. ज्याला परमेश्वराचा साक्षात्कार होत असतो त्याच्या मुखावर एक प्रकारचें दिव्य तेज झळकत असतें. त्याच्या अंतःकरणांत आनंद सामावत नाहीं. तो हास्याच्या द्वारां ओसंडत असतो. भागवतकारांनी तर या अवस्थेचें फार सुंदर वर्णन केलेलें आहे.

"एवं व्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः ।
हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ।।" ११।२।४०

सतत निदिध्यासनानें परमेश्वराच्या प्रांगणांत जाऊन पोहोंचल्यानंतर व परमेश्वराच्या यथार्थस्वरूपाचें दर्शन झाल्यानंतर त्याला परमेश्वराइतकें प्रिय असें जगांत दुसरें कांहींच दिसत नाहीं. त्या परमप्रिय परमेश्वराचेंच तो सतत नामसंकीर्तन करीत राहतो. त्याच्या कीर्तींत रमून जातो. त्याच्या अंतःकरणांत परमेश्वराविषयीं इतका अनुराग उत्पन्न होतो कीं, त्या अनुरागानें त्याचें चित्त द्रवतें तें ढांच्यांत ढाळलेल्या धातुरसाप्रमाणें त्याचेंच रूप धारण करतें ! "मग गोविंद ते काया भेद नाहीं देवा तया" अशी त्याची अवस्था होऊन जाते. विस्मयजनक विलक्षण विश्वाचा पसारा हा एक त्या परमेश्वराचाच खेळ आहे. शुद्ध चित्स्वरूप परमेश्वराचाच हा विलास आहे, असें समजून तो आनंदानें मोठमोठ्यानें हसूं लागतो. स्वतःसिद्ध अनंत ऐश्वर्यानें संपन्न असूनहि माझा परमात्मा केवढा भक्तवत्सल आहे. भक्तासाठीं किती कष्ट घेतो ! रानावनांत वणवण करीत फिरतो ! भक्तांचा द्वारपाल बनतो ! हे परमेश्वराला सोसावे लागणारे भक्तवात्सल्यमूलक कष्ट पाहून तो साक्षात्कारी भक्त रडूं लागतो. क्वचित् प्रसंगीं परमेश्वराच्या साक्षात्काराच्या आनंदांत बेहोश होऊन मोठमोठ्यानें ओरडूंहि लागतो ! क्वचित् प्रसंगीं मोठमोठ्यानें परमेश्वराचे गुणहि तो गात राहतो. क्वचित् वेड्यासारखा नाचतहि राहतो ! याप्रमाणें त्याचें वर्तन लोकव्यवहाराची मर्यादा ओलांडून पलीकडे जातें. तो "लोकबाह्य" बनतो ! लोक त्याला वेडा समजतात ! ही त्याची अवस्था ईश्वरसाक्षात्काराची असते. हें तत्त्ववेत्ते ओळखतात व तसें वेड आपल्याला केव्हां लागेल या उत्कंठेनें ते तळमळत असतात.

"उन्मत्तवत्संचरतीह शिष्यस्तवेति लोकस्य वचांसि शृण्वन् ।
खिद्यन्नुवाचास्य गुरुः पुराहोह्युन्मत्तता मे नहि तादृशीति ।।"

सिद्धपुरुष श्री सदाशिवेन्द्रसरस्वती हे जेव्हां ईश्वरसाक्षात्कारानें तन्मय होऊन वेडचा-सारखे फिरूं लागले तेव्हां लोकांच्या तोंडून 'तुमचा सदाशिव वेडा होऊन भटकत आहे,' असें गाऱ्हाणें ऐकलें व खिन्न होऊन ते म्हणाले, "अरेरे! सदाशिव माझ्या अगोदर वेडा झाला. मला कां वरें हें वेड लागलें नाहीं!" असे प्रत्यक्ष त्यांच्या गुरूं-नींच काढलेले हे उद्‌गार प्रसिद्ध आहेत! बालभक्त ध्रुव, प्रल्हाद यांना झालेल्या ईश्वरसाक्षात्काराची ग्वाही पुराणें देत आहेत. राजा रुक्माङ्गद, राजा अंबरीष, राजा जनक, राजा रन्तिदेव इत्यादि राजेलोकहि ईश्वरसाक्षात्कारी होऊन गेले असल्याची साक्ष प्राचीन इतिहास देत आहे. सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, नारद, शुकाचार्य व आद्य श्रीशंकराचार्य इत्यादि कितीतरी थोर विभूति ईश्वर-साक्षात्कारी होऊन गेल्याचें इतिहास सांगत आहे. नाथपंथांतील नवनाथ हे तर ईश्वरसाक्षात्काराचे चालते-बोलते पुरावेच आहेत. संत सूरदास, संत तुलसीदास, संत मीराबाई, संत कबीर, संत नामदेव, संत ज्ञानेश्वरमहाराज, संत एकनाथ, संत तुकाराम, संत समर्थरामदास या सर्व संतमंडळींना झालेल्या ईश्वरसाक्षात्काराचें प्रतिबिंब आपल्याला त्यांच्याच वाङमयांत पहावयास सांपडतें. श्रीस्वामी जनार्दन-पंत देवगड (दौलताबाद), दिगंबरानुचर श्रीदासोपंत (अंबाजोगाई), श्रीमाणिकप्रभु (हुमणाबाद), श्रीरामकृष्ण परमहंस (कलकत्ता) इत्यादि आधुनिक काळांतील थोर महात्मे हेहि ईश्वरसाक्षात्कारी होते. हें सर्वमान्य आहे. तात्पर्य ईश्वरसाक्षा-त्काराविषयीं संशय घेण्याचें कांहीं कारण नाहीं.

वेदांमध्यें साक्षात्कारी पुरुषाचें असें वर्णन केलें आहे कीं, तो

"तदेतत्सामगायन्नास्ते हाऽऽउ हाऽऽउ हाऽऽउ ।
अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः ।"

"अहं मनुरभवं सूर्यश्च ।" "आनंदानें हाऽऽउ हाऽऽउ असें गमतीनें गाणें गात राहतो! मी अन्न आहें. वृक्षलता, वेली, वनस्पति, धान्य आणि फळें सर्व कांहीं मीच आहें. अन्नाद म्हणजे अन्नभक्षण करणारा. तोहि पण मीच आहें. मी सर्व कांही आहें "मी मनु झालों. मी सूर्य झालों" असें म्हणत तो नाचूं लागतो! या सर्व ईश्वर-रूपाच्या साक्षात्काराच्या खुणा आहेत.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, साक्षात्कार हा फक्त स्वानुभवानेंच जाणावयाचा असतो. तो बोलून दाखवतां येत नाहीं. म्हणून तो कोणाला होतच नाहीं असें मात्र म्हणतां येत नाहीं. दही, दूध, मध, साखर, उसाचा रस, परिपक्व द्राक्षें, फणस, आंबा इत्यादि सर्व पदार्थ मधुरच असतात; पण एकाचें माधुर्य दुसऱ्याला नाहीं व दुसऱ्याचें तिसऱ्याला नाहीं. प्रत्येकाचें माधुर्य कांहीं निराळेंच असतें. तो त्या माधुर्यांतला फरक कोणालाहि बोलून दाखवितां येत नाहीं. हापूस, पायरी, लंगडा, नीलम् इत्यादि सर्व आंबे मधुरच असतात. पण त्यांच्या माधुर्यांत फरक असतो. तो फरक अनुभवानेंच

कळतो. तो बृहस्पतीलाहि बोलून दाखवतां येत नाहीं. हें सर्वांचें पृथक् पृथक् प्रतीतीला येणारें माधुर्य वर्णन करतां आलें नाहीं म्हणन त्या आंब्यांच्या ठिकाणीं माधुर्यच नाहीं अथवा तें माधुर्य चाखणाऱ्यानें अनुभवलेंच नाहीं असें म्हणतां येईल काय ? नाहीं असें कदापि म्हणतां येणार नाहीं. तसें म्हणण्याचा कोणी प्रयत्न करील तर तो त्याचा दुराग्रह ठरेल. तें वस्तुस्थितीला धरून असल्याचें कोणी मानणार नाहीं. याच न्यायानें ईश्वराविषयींचा अनुभव बोलून दाखवितां आला नाहीं म्हणून ईश्वरच नाहीं अथवा त्याचा साक्षात्कार होतच नाहीं असें म्हणतां येत नाहीं.

तात्पर्य श्रुति, युक्ति व तत्त्ववेत्त्यांचे आणि भक्तजनांचे अनुभव या त्रिविध प्रमाणांनीं ईश्वराचें अस्तित्व सिद्ध झाल्यानंतर तो परमात्मा कुलाल, सुवर्णाकार, अथवा शिल्पकार यांच्याप्रमाणें शरीरयुक्त आहे कीं नाहीं ? तो शरीरयुक्त असल्यास त्याला तुमच्या-आमच्याप्रमाणें मृत्यूहि असणार. बरें तो शरीरयुवत नाहीं असें म्हणाल तर शरीरावांचून तो सृष्टि कसा निर्माण करील ? ईश्वर सृष्टि निर्माण करतांना सापेक्ष असतो का निरपेक्ष असतो ? तो सापेक्ष असतो असें म्हणाल तर मग तो परा तंत्र झाला असें म्हणावें लागेल. मग त्याला सर्वसमर्थ अथवा स्वतंत्र असें म्हणत-येणार नाहीं. बरें तो परमात्मा निरपेक्षपणें सृष्टि निर्माण करतो असें म्हणाल तर मग सष्टीमध्यें आढळून येणारें वैषम्य कोणी दुःखी तर कोणी सुखी, कोणी जन्मतःच रोगी तर कोणी निरोगी, कोणी बुद्धिमान्·सुस्वरूप. तर कोणी बुद्धिहीन, कोणी कुरूप याचा दोष परमेश्वराकडे आल्याशिवाय राहणार नाहीं. बरें हें सर्व वैषम्य पाहूनहि तो परमात्मा स्वस्थ बसत असेल तो प्राणिमात्रांच्या दुःखांचा परिहार करण्याचा जर कांहीं प्रयत्न करीत नसेल तर तो अत्यंत निर्घृण आहे असें म्हणावें लागेल. इत्यादि सर्व प्रश्नांचीं उत्तरें युक्तियुक्त पद्धतीनें विचार केल्यास वस्तुस्थितीला अनुसरून आपल्याला सहज उपलब्ध होतात. शंकांचें समाधान होतें व आक्षेपांचेंहि खंडन होतें

## ईश्वराचें सर्वज्ञत्व

जो जो ज्या ज्या कार्याचा कर्ता असतो त्याला त्याला त्या त्या कार्या-विषयींचें संपूर्ण ज्ञान तें तें कार्य निर्माण करण्याच्या पूर्वींच असावें लागतें. ज्या साधनांनीं कार्य निर्माण करावयाचें असतें त्या साधनांचेंहि ज्ञान असावें लागतें. त्याचप्रमाणें "चिकीर्षा" म्हणजे तें कार्य करण्याची इच्छा. तीहि तें कार्य करणाऱ्याच्या ठिकाणीं असावी लागते. त्याचप्रमाणें कार्याला अनुरूप अशी कृतीहि पण त्याच्या ठिकाणीं असावयास पाहिजे. तात्पर्य ज्ञान, इच्छा आणि कृति असल्या-शिवाय कोणतेंहि कार्य घडून येऊं शकत नाहीं. तें ज्ञान, ती इच्छा आणि ती कृति हें सर्व त्याच्या कार्याला अनुरूप अर्थात् साजेसेंच असावें लागतें. ईश्वरानें निर्माण केलेली सृष्टि अफाट आहे. अतर्क्य आहे. तिची निर्मिति अथवा रचना तुम्हाआम्हा सामान्य मानवांच्या कल्पनाशक्तीच्या बाहेर आहे. हें सर्व लक्षांत घेतल्यानंतर

सृष्टीचा कर्ता हा सर्वज्ञ आणि सर्वसमर्थ असाच मानावा लागतो. त्याशिवाय सृष्टीच्या रचनेची उपपत्तीच लागूं शकणार नाहीं. अशा रीतीनें ईश्वराचें सर्वज्ञत्व आणि सर्वसमर्थत्व हें ओघानेंच स्वीकारावें लागतें.

## ईश्वराचें कर्तृत्व

कार्य निर्माण होण्याकरितां कर्त्याची आवश्यकता असते व तो कर्ता स्वतःला शरीर असल्याशिवाय कार्य निर्माण करूं शकत नाहीं; असें जरी सर्वसामान्यपणें सर्वत्र पाहावयास सांपडत असलें तरी त्यांतलें रहस्य असें आहे कीं, कार्य निर्माण करणाऱ्या जीवाला शरीराचें साहाय्य असल्याशिवाय त्याच्या हातून कोणतेंहि कार्य घडून येऊं शकत नाहीं. शरीरावांचून कार्य करण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्यच नसतें. अशा स्थितींत सर्वसामान्य कर्त्याला कोणतेंहि कार्य करण्याकरितां शरीर मानणें अपरिहार्य आहे. पण परमात्मा हा सर्वसामान्य जीवात्म्याप्रमाणें कोणत्याहि प्रकारें असमर्थ नसतो. म्हणून त्याला कार्य करण्याकरितां शरीर धारण केलेंच पाहिजे, असा आग्रह धरण्याचें कांहीं कारण नाहीं. शरीरावांचून कार्य करण्याचें सामर्थ्य जीवाला नसलें तरी परमात्म्याच्या ठिकाणीं तें सामर्थ्य असल्यामुळें परमात्मा हा शरीर धारण न करतांच कोणतेंहि कार्य करूं शकतो. परमेश्वराचें संकल्पसामर्थ्यच अत्यंत विलक्षण आहे. निरंतर निदिध्यासन करून परमेश्वराचा साक्षात्कार करून घेणारा ज्ञानी अथवा भक्त देखील सत्यसंकल्प बनतो. तर मग परमेश्वरा-विषयीं काय सांगावें? "संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति।" छां. ८।२।१. "यं कामं कामयते सोऽस्य सङ्कल्पादेव समुत्तिष्ठति, स तेन महीयते" छां. ८।२।११. आत्मसाक्षात्कारी भगवद्भक्ताला आपल्या संकल्पसामर्थ्यानें स्वर्गीय पितरांनाहि आवाहन करून मृत्युलोकामध्यें आणतां येतें. तो ज्या वस्तूची इच्छा करतो ती वस्तु त्याला संकल्पबलानेंच प्राप्त होते. असें त्याचें सामर्थ्य उपनिषदांतील वरील वाक्यांनीं वर्णिलेलें आहे. पहिल्या वाक्याचें उदाहरण म्हणून संत एकनाथांचाच निर्देश करतां येईल. त्यांनीं श्राद्धदिनीं प्रत्यक्ष पितरांनाच आवाहन करून भोजन घातल्याचा उल्लेख त्यांच्या चरित्रांत आढळतो. विश्वामित्रानें तपोबलानें व संकल्पसामर्थ्यानें प्रतिसृष्टि निर्माण केल्याचा उल्लेख प्राचीन इतिहासांत पहावयास सांपडतो. ईश्वरभक्तांचें जर हें सामर्थ्य आहे तर मग प्रत्यक्ष परमेश्वराविषयीं काय सांगावें? महायोगी देखील साधनसामग्रीवांचून केवळ संकल्पबलानेंहि सृष्टींतील वाटेल तो पदार्थ निर्माण करूं शकतात. तर मग महामहायोग्यांचाहि अधिपति असलेला परमेश्वर शरीरादि सामग्रीवांचून सृष्टि निर्माण करूं शकेल यांत संशय घेण्याचें काय कारण आहे?

आतां शरीरादि साधनसामग्री असल्याशिवाय कोणतेंहि कार्य निष्पन्नच होत नाहीं असाच ज्यांचा आग्रह असेल त्यांच्याकरितां ईश्वर कार्यविशेषप्रसंगीं स्वसंकल्प

बलानें शरीरहि धारण करतो व तें कार्य पूर्ण झाल्यानंतर आपल्या संकल्पसामर्थ्यानें स्वीकारलेल्या शरीराचें विसर्जनहि करतो असें मानलें तरी सिद्धान्ताला कोठेंहि बाध येत नाहीं.

आतां यावर कोणी अशी शंका घेईल कीं, ईश्वराला जर शरीर मानलें तर त्या शरीराची उत्पत्ति आणि विनाश हेहि मानावे लागतील, आणि तसें मानल्यास जन्म-मरणांच्या फेऱ्यांत सांपडलेले सामान्य जीव आणि कार्यपरत्वें वेळोवेळीं शरीर धारण करणारा व त्या शरीराचें विसर्जन करणारा परमात्मा यांच्यांत भेद काय उरला ? जीवात्मा आणि परमात्मा हे दोघेंहि जन्म-मरणाच्या अधीन झाले असेंच म्हणावें लागेल. पण जरा सूक्ष्म विचार केल्यास या शंकेला अवसर राहणार नाहीं. जीव हा प्रारब्ध-कर्माच्या अधीन आहे. ईश्वराला प्रारब्धकर्म नाहीं. जीवांच्या पाठीमागें संचित कर्मांचें जंजाळ असतें तर ईश्वराला संचित कर्माचा लेशहि नसतो. जीव हा क्रियमाण कर्मानें बद्ध होतो तर ईश्वराला क्रियमाण कर्माचें बंधन नसतें. जीवाला बलवत्तर प्रारब्धकर्मानें शरीर प्राप्त झालें म्हणजे तो जन्मला असें म्हणतात. प्रारब्ध कर्म भोगून पूर्ण झाल्याबरोबर शरीर सुटतें, तेव्हां तो मेला — मरण पावला असें म्हणतात. प्रारब्ध कर्म संपलें कीं शरीर सुटतेंच. माझें अमुक कार्य शिल्लक राहिलें आहे तें मी पूर्ण करीन आणि नंतरच शरीर सोडीन असें जीवाला म्हणतां येत नाहीं. यांत जीवांचें परतंत्रत्व हें स्पष्टच आहे. ईश्वराचें मात्र तसें नाहीं. तो कार्यपरत्वें स्वसंकल्पबलानेंच अनुरूप शरीर धारण करतो व संकल्पित कार्य परिसमाप्त झाल्याबरोबर संकल्पबलानेंच शरीराचें विसर्जनहि करतो. जीवाला शरीर प्राप्त होणें आणि तें सुटणें या क्रियांना जन्म आणि मरण असें म्हणतात, तर ईश्वरानें शरीर धारण करणें आणि त्याचें विसर्जन करणें या क्रियांना आविर्भाव, तिरोभाव अथवा प्रकट होणें आणि अन्तर्धान पावणें असें म्हणतात. तात्पर्य परमात्मा हा शरीरि मानला तरी तो जीवात्म्याप्रमाणें तिळमात्रहि जन्ममरणाच्या अधीन नसल्यामुळें त्याच्या निर्नियंत्रित स्वातंत्र्याला व सामर्थ्याला यत्किंचितहि बाध येत नाहीं.

आतां यावर कोणी अशी शंका घेईल कीं, जर सृष्टीचा निर्माणकर्ता ईश्वर आहे व तो सर्वज्ञ आणि सर्वसमर्थ आहे तर मग तो कोणी अत्यंत दुःखी तर कोणी अत्यंत सुखी, कोणी अत्यंत बुद्धिमान् तर कोणी अत्यंत बुद्धिहीन, कोणी अत्यंत कुरूप, तर कोणी अत्यंत सुस्वरूप, कोणी जन्मतःच रोगांनीं गांजलेला तर कोणी जन्मजात आरोग्यानें संपन्न. देव, मानव, पशु, उच्च अथवा नीच असा हा भेदभाव अथवा हें वैषम्य निर्माण कां करतो ? दुसरा प्रश्न असा कीं, हें विश्वांतील वैषम्य त्या परमेश्वराला कळतें कां नाहीं ? कळत नसेल तर तो सर्वज्ञ आहे असें कसें म्हणतां येईल ? जर कळत असेल तर तो या विश्वांतील वैषम्याचा अथवा वैषम्य मूलक दुःखांचा परिहार कां करीत नाहीं ? बरें त्याच्या अंगीं सामर्थ्य नाहीं असें म्हणावें तर तो सर्वज्ञ आणि सर्व शक्तिमान असल्याचें तर्कानें सिद्ध केलें आहे. प्रभु,

विभु हीं त्याचीं नांवें त्याच्या निरंकुश सामर्थ्याचीं द्योतक आहेत. तेव्हां सामर्थ्य असूनहि तो जर विश्वांतील वैषम्य दूर करीत नसेल तर तो अत्यंत निर्घृण आहे असेंच म्हणावें लागेल. अशा रीतीनें ईश्वराच्या ठिकाणीं वैषम्य आणि नैर्घृण्य हे दोन दोष येतातच. या दोषांचा परिहार कसा करावा ?

## वैषम्यनैर्घृण्यपरिहार

आपण सूक्ष्मबुद्धीनें थोडा विचार केल्यास ईश्वराच्या ठिकाणीं यांपैकीं कोणताहि दोष येऊं शकत नाही असेंच आपल्या दृष्टीस पडेल. द्वेष, मत्सर, ईर्ष्या, असूया, काम, क्रोध, लोभ, मोह, अथवा अहंकार या वृत्तींतून जेथें एखाद्याचा सूड घेण्याची प्रवृत्ति निर्माण होत असेल व त्या प्रवृत्तींतूनच एखाद्याला विषम अवस्थेंत ठेवलें जात असेल तर त्या वैषम्याची जबाबदारी त्या व्यक्तीवर येऊन पडते. जो न्याय व्यष्टीचा तोच समष्टीचाहि समजावा. वर निर्दिष्ट केलेल्या कारणांपैकीं कोणत्याहि कारणानें कां होईना जर एखादा समाज दुसऱ्या समाजाला वैषम्यावस्थेंत ठेवीत असेल तर त्या वैषम्याची जबाबदारीहि त्या समाजावर येऊन पडते. प्रकृतस्थळीं काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, अथवा द्वेष इत्यादि प्रकारचा कोणताहि दोष ईश्वराच्या ठिकाणीं नसल्यामुळे ईश्वरानें निर्माण केलेल्या सृष्टींमध्यें आढळून येणाऱ्या वैषम्याचें दायित्व तिळमात्रहि ईश्वराकडे येऊं शकत नाहीं. आतां सर्वसमर्थ ईश्वर जर सृष्टीचा निर्माता आहे तर मग सृष्टींमध्यें असें वैषम्य कां ? हा प्रश्न शिल्लक राहातोच. त्याचा आपण विचार करूं.

विविध वृक्ष, लता, वेली आणि वनस्पति यांना समानप्रकारचें जीवन देऊन त्यांचें परिपोषण करण्याचें कार्य पर्जन्यराजाकडून होत असतें ही गोष्ट सर्वमान्य आहे.

सर्व वनस्पतींचें पोषण करणारें जीवन म्हणजे पाणी हें पर्जन्यराजाकडून सर्व वनस्पतींना सारखेंच मिळत असतें. तथापि ऊंस, आंबा, अंजीर, ज्येष्ठमध यांच्यामध्यें आपल्याला मधुर रस आढळतो तर चिंच, चुका, आंवाडी, आमसोल, आणि लिंबू यांच्यामध्यें आपल्याला आम्लरस आढळून येतो! हिरडा, बेहडा, आवळा इत्यादि वनस्पतींतून खारट, तुरट, रस, प्रतीतीला येईल, तर सुंठ, मिरीं, पिंपळी इत्यादि वनस्पतींतून जिभेला झोंबेल असा तिखट रस अनुभवास येईल. कडुलिंब काडेचिराईत, आणि कुटकी यांचा कडू रस, तर सुप्रसिद्धच आहे. तुपांत तळलें साखरेंत घोळलें तरी कारलें कडू तें कडूच ! कांहीं वनस्पति बल व दीर्घायु देतात, तर कांहीं वनस्पति शीघ्र प्राणहरण करतात ! कां बरें ? पाणी सर्वांना एकसारखेंच मिळत असतांना वनस्पतींच्या गुणधर्मांत हा भेद निर्माण कां व्हावा ? आणि या भेदांतील अथवा वैषम्यांतील गुणदोषाचा संबंध त्या जीवनदात्या पर्जन्यराजाकडे कांहीं येतो काय ? याचा संबंध पर्जन्याकडे तिळमात्र नाहीं ही गोष्ट आबालवृद्ध सर्वमान्य आहे. मग हा भेद कां ? या प्रश्नाचें उत्तर "यथा बीजं

तथांकुरः" ज्या जातीचें अथवा गुणधर्माचें बीज असेल त्याच जातीचे अथवा गुणधर्माचे अंकुर, वृक्ष, लता, वेली, वनस्पति वगैरे निर्माण होत असतात. तात्पर्य पर्जन्यराजाकडून जीवन जरी समान स्वरूपाचें मिळत असलें तरी बीजांच्या ठिकाणीं असलेले भिन्न भिन्न संस्कार हेच वृक्ष, लता, वेली, व वनस्पति इत्यादिकांच्या गुणधर्मभेदाला कारणीभूत होत असतात. याच न्यायानें विश्वामध्यें जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या सुखदुःखादि वैषम्याचें मूळहि जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या कर्मामध्येंच पहावयास सांपडतें. ईश्वर हा प्राणिमात्रांच्या कर्मफलांचा दाता असल्यामुळेंच जशीं जशीं ज्यांचीं कर्मे असतील तशीं तशीं त्यांना फळें देण्यासाठीं ईश्वराला तदनुरूप विषम सृष्टि निर्माण करावी लागते. तात्पर्य ईशसृष्टींत आढळून येणाऱ्या वैषम्याचा संबंध ईश्वराकडे नसून जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या कर्माकडे अर्थात् बीजभूत संस्कारांकडेच आहे; ही गोष्ट निर्विवाद होय.

आतां आपण ईश्वराच्या ठिकाणीं नैर्घृण्य म्हणजे निर्दयता अथवा निष्ठुरता या दोषाची जी वर आशंका घेतली आहे, तिचाहि विचार करूं. ज्याच्या ठिकाणीं विषयांची प्रबल आशा, तृष्णा, बुभुक्षा, स्वतःचा देह, पुत्र, कलत्र, वित्त, वैभव, यांच्या विषयींचा स्वार्थ, अविचार आणि घातक शक्ति असते तेच निर्दय आणि निष्ठुर असतात. वर वर्णन केलेल्या दोषांपैकीं कोणताहि दोष ईश्वराच्या ठिकाणीं नाहीं. तो तर सदासर्वकाळ आप्तकाम आणि पूर्णकाम आहे. तो नित्यतृप्त आहे. "आप्तकामस्य का स्पृहा ?" असें श्रीगौडपादाचार्यांनीं त्याचें वर्णन केलेलें आहे. त्याच्या सर्व कामना सर्वकाळ परिपूर्ण झालेल्या असल्यामुळें त्याला कशाची इच्छा असणार ? जेथें इच्छाच नाहीं तेथें निर्दयता अथवा निष्ठुरता तरी कोणत्या निमित्तानें असणार ? ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें ज्याला त्याला तो सुखदुःखें देत असल्यामुळें निर्दयतेचा दोष लेशमात्रहि त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. न्यायाधीशानें एखाद्याला फांशीची शिक्षा दिली म्हणून तो जसा निर्दय ठरत नाहीं याच न्यायानें ईश्वरानें जीवांना दुःख भोगावयास लावलें तरी तो निर्दय ठरत नाहीं. किंबहुना जसाजसा सूक्ष्म विचार करावा तसें तसें परमेश्वराचें पूर्ण दयालुत्वच आपल्या प्रतीतीला येतें. पश्चात्तापानें शुद्ध होऊन तुम्ही त्याला खऱ्याखुऱ्या अंतःकरणानें, अनन्यभावानें शरण गेलांत तर तो तुमचे सहस्त्रावधि अपराध पोटांत घालून तुम्हांला क्षमा करील, दर्शन देईल व तुमचें जीवन धन्य आणि आनंदमय करील. एका भक्तानें ईश्वराविषयीं कृतज्ञता व्यक्त करतांना त्याचें दयालुत्व व स्वतःचें उन्मत्तत्व मोठ्या खुबीनें वर्णन केलें आहे. तो म्हणतो —

वाचा निर्मलया सुधामधुरया यां नाथ शिक्षामदा-
स्तां स्वप्नेऽपि न संस्पृशाम्यहमहंभावावृतो निस्त्रपः ।
इत्यागःशतशालिनं पुनरपि स्वीयेषु मां बिभ्रत-
स्त्वत्तो नास्ति दयापरो यदुपते मत्तो न मत्तः परः ॥

हे परमेश्वरा ! तूं मला सर्वांगपरिपूर्ण अविकल देह दिलास, आणि अत्यंत प्रेमळ व निर्मळ वाणीनें बोधहि केलास, वेद, स्मृति, पुराणें व शास्त्रें हीं सर्व तुझीच वाणी आहे. ती अमृताहूनहि गोड आहे. हे परमेश्वरा तूं माझें वेळोवेळीं संरक्षण करतोस व मला गोड उपदेश देतोस. त्याचें मी स्वप्नांतहि स्मरण करीत नाहीं ! मला अहंकारानें पूर्ण पछाडलेलें आहे. मी अगदीं निलाजरा बनलो आहे ! असे मी शेंकडों अपराध करीत असूनहि हे परमेश्वरा पुन्हां तूं मला आत्मीयजनांमध्येंच अन्तर्भूत करीत आहेस. खरोखर परमेश्वरा, तुझ्यापेक्षां या जगांत मला दुसरा कोणी दयाळू दिसत नाहीं, व माझ्यापेक्षां अधिक कोणी उन्मत्त असेल असेंहि मला वाटत नाहीं. हा परमेश्वराचा दयाळूपणा सर्वांवर सारखा आहे, पण मानवमात्र कृतघ्न होऊन परमेश्वराला विसरतो आणि दुःखें भोगीत राहतो !

उत्तम बुद्धि देऊनहि मानवानें त्या बुद्धीचा सदुपयोग केला नाहीं तर परमेश्वरानें तरी त्याला काय करावें ? ज्यानें ज्यानें त्याला आर्त अन्तःकरणानें हांक मारली, त्याला त्यानें दर्शन देऊन संकटांतून सोडविलें आहे. त्याच्या मनीषा पूर्ण करून त्याला सुखी केलें आहे. ध्रुव, प्रल्हाद, गजेंद्र, अंबरीष, द्रौपदी, गोराकुंभार, मीराबाई, संत सखुबाई इत्यादि प्राचीन व अर्वाचीन भक्तांच्या इतिहासांत परमेश्वराचें दयालुत्व पदोपदीं प्रत्ययास येत आहे. तत्त्वज्ञानाचा आविष्कार आणि तत्त्वज्ञानाची परंपरा अविच्छिन्नपणें चालविण्यासाठीं सनकसनंदनादिकांपासून तों श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांपर्यंतचा इतिहास व त्याहि पुढच्या काळांत परमेश्वरानें घेतलेल्या अवतारपरंपरेचा इतिहास हे परमेश्वराच्या दयालुत्वाविषयींचे चालते बोलते भरभक्कम पुरावे आहेत. विद्यमानकालांतहि जे कोणी अनन्यभावानें त्या दयाघनाला शरण जातात त्यांच्यावर आजहि तो आपल्या दयेची पांखर करून त्यांना संकटांपासून वांचवितो व त्यांचें संरक्षण करतो, असेंच आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल.

“ न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् ।
यं हि रक्षितुमिच्छन्ति बुद्धया संयोजयन्ति तम् ॥ ”

परमेश्वर आणि परमेश्वराच्या अवतारभूत असलेल्या देवता अथवा महाविभूति हे कांहीं एखाद्या गुराख्याप्रमाणें हातांत काठी घेऊन संरक्षण करीत नसतात. ज्याचें ते संरक्षण करूं इच्छितात त्याला ते उत्तम बुद्धि देऊनच त्याचें संरक्षण करतात. याप्रमाणें आपल्या भक्तांचें संरक्षण करणें हेंहि एक त्या भक्तवत्सल परमेश्वराच्या दयालुत्वाचेंच लक्षण होय. किंबहुना एका भक्तकवीनें तर प्राणिमात्रांच्या संपूर्ण जीवनांतच भगवतांची दया प्रतिबिंबित झालेली पहावयास सांपडत असल्याचें मोठें मार्मिक वर्णन केलेलें आहे. तो म्हणतो, “ आमच्यावर ईश्वराची दया असल्यामुळेंच आम्ही डोळ्यानें पाहूं शकतों, त्याच्या दयेनेंच आमचे कान शब्द ऐकूं शकतात. त्याची दया नसेल तर आमचे पाय चालूं शकणार नाहींत. त्याची दया आहे म्हणूनच

आमचें रसनेंद्रिय गोड, आंबट, खारट, तुरट, कडू, तिखट इत्यादि विविध रसांचें ग्रहण करूं शकतें. आम्ही वाणीनें बोलूं शकतों, गोड बोलूं शकतों तेंहि त्याच्याच कृपेनें. त्याचप्रमाणें हातांनीं 'बहुसाळ' म्हणजे वारंवार अथवा सालोसाल, वर्षानुवर्षें जीं कामें करूं शकतों त्यांतहि त्याचीच कृपा दृष्टीस पडते. विश्रांति घेण्यासाठीं आम्ही झोंप घेतों. चांगली झोंप लागणें हेंहि त्याच्याच कृपेवर अवलंबून आहे. झोप पूर्ण झाल्यानंतर आम्ही पुन्हां आनंदानें जागे होतों व आपल्या कामास लागतों. ही सर्व ईश्वराचीच दया होय."

"डोळ्यांनीं बघतों, ध्वनी परिसतों कानीं, पदीं चालतों,
जिव्हेनें रस चाखितों, मधुरहि वाचें आम्ही बोलतों।
हातानें बहुसाळ काम करितों, विश्रांति ही घ्यावया
घेतों झोंप सुखें फिरूनि उठतों ही ईश्वराची दया ॥"

पाहील त्याला दिसेल, जो पाहणारच नाहीं त्याला काय दिसणार ? तात्पर्य ईश्वर आहे. तो सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान् आहे. तो विश्वाचा कर्ता आहे व विश्वंभरहि आहे. विश्वाचें संरक्षण आणि संवर्धनहि तोच करतो. तो जसा कर्ता आहे. तसाच संहर्ताहि आहे. तो संहर्ता असला तरी त्याच्या दयालुत्वाला तिळमात्रहि उणीव येत नाहीं. तोच विश्वरूपानें नटतो व वेळोवेळीं विविध अवतार घेऊन विश्वाचें परिपालनहि करतो. या सर्व गोष्टींचा प्रत्यय आपल्याला ईश्वरावतार, देवदेवेश्वर, सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या चरित्रांत व तत्त्वज्ञानांत सुस्पष्ट पहावयास सांपडेल.

## ईश्वराचें स्वरूप व अवतार

आत्तांपर्यंत केलेल्या विवेचनावरून श्रुतीनें, युक्तीनें, अनुभवानें व इतिहासानेंहि आपण ईश्वराचें अस्तित्व लक्षांत घेतलें. त्याचप्रमाणें त्याचें सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्त्व दयालुत्व व सर्वोपकारकत्व इत्यादि गुणस्वभावहि लक्षांत घेतले. आतां यावर कोणी अशी आशंका घेईल कीं, जोंपर्यंत ईश्वराचें मूळ स्वरूपच लक्षांत येत नाहीं तोंपर्यंत त्याचें सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्त्व, दयालुत्व व सर्वोपकारकत्व हे तरी गुणधर्म कसे लक्षांत घेतां येतील ? याकरितां आपण आतां परमेश्वराच्या स्वरूपाविषयींच थोडासा विचार करूं. आपल्याला या भूतभौतिक विश्वप्रपंचांत दिसून येणारे असंख्य जड पदार्थ व त्यांना प्रकाशित करणारे सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें, तारे किंवा अग्नि अथवा प्रदीप हे कोणी ईश्वर होऊं शकत नाहींत. कारण ते सर्वच स्वभावतः जड आहेत. विकसित होणें अथवा परिणत होणें हा कांहीं जड पदार्थांचा स्वतःसिद्ध स्वभाव नाहीं. स्वतःसिद्ध धर्म हा अपरिवर्तनीय असतो. उदाहरणार्थ, अग्नीचें उष्णत्व, जलाचें शीतत्व, साखरेची गोडी व लिंबाची कटुता इत्यादि. आतां क्वचित् प्रसंगीं पदार्थांचा मूळ स्वभावहि परिवर्तित झाल्याचें आपणांस पहावयास सांपडतें.

रखरखीत निखारा तळहातावर ठेवला तरी तळहात भाजत नाहीं. खडीसाखरेचा खडा जिभेवर ठेवला तरी तो गोड लागत नाहीं. स्वभावतःच वाहत राहणें हा पाण्याचा धर्म, पण तेंहि अतिशैत्यानें गोठून दगडासारखें कठीण बनतें ! या सर्व उदाहरणां-वरून वस्तूंच्या स्वाभाविक धर्मांचेंहि परिवर्तन घडतें असें म्हणावें लागतें. पण ही शंका बरोबर नाहीं. विशिष्ट औषधीचा रस तळहातास लावून नंतरच तळहातावर अग्नि ठेवला तर तो तळहातास भाजीत नाहीं, पण तोच रस धुवून टाकल्यास तळ-हातास निखारा सहन होत नाहीं. बळेंच ठेवला तर तळहात भाजल्याशिवाय रहात नाहीं. हाच न्याय इतरत्रहि समजावा. मणि, मंत्र किंवा औषधी यांच्या संपर्कामुळें वस्तूंचा स्वभाव कांहीं काळ कुंठित झाला तरी तेवढ्यानें त्या वस्तूच्या स्वभावाचें अथवा स्वाभाविक गुणधर्मांचें परिवर्तन झालें असें म्हणतां येत नाहीं. कांहीं निमित्तानें एखाद्या वस्तूच्या स्वभावाचा अथवा गुणधर्माचा कांहीं काळ प्रतिबंध झाला तरी तें निमित्त दूर होतांच पुन्हां त्या वस्तूचा स्वाभाविक गुणधर्म अभिव्यक्त होत असतो. परिवर्तनामध्यें पहिले गुणधर्म बदलून त्या जागीं निराळे गुणधर्म निर्माण होत असतात; तर प्रतिबंधामध्यें स्वाभाविक गुणधर्म कांहीं काळ तिरोहित होत असतात व त्या जागीं दुसरे गुणधर्म अभिव्यक्त होत असतात. कालांतरानें त्या गुण-धर्मांना अभिव्यक्त करणाऱ्या निमित्ताचा निरास झाल्यानंतर त्या निमित्तानें अभि-व्यक्त होणाऱ्या गुणधर्मांचाहि निरास होतो व पुन्हां पहिलेच गुणधर्म अभिव्यक्त होत असतात. असा हा परिवर्तन आणि प्रतिबंध यांमध्यें भेद आहे. तात्पर्य जड वस्तूंचा विकास अथवा गुणधर्मांचें परिवर्तन हें स्वाभाविक नसून त्यांच्या पाठीमागें कांहींतरी निमित्त असतें. अथवा कोणाची तरी प्रेरणा असते हें निश्चित. जेथें तें निमित्त अथवा तो प्रेरक आपल्याला पाहतां येतो तेथें हें कसें झालें; अथवा कोणीं केलें हा प्रश्न निर्माण होत नाहीं. जेथें तें निमित्त अथवा तो प्रेरक आपल्या ध्यानीं मनीं येत नाहीं तेथें त्याचें अस्तित्व अदृश्य स्वरूपांत आपल्याला मानावें लागतेंच; कारण त्याशिवाय जड वस्तूंच्या ठिकाणीं दिसणारा विकास अथवा त्यांच्या स्वाभाविक गुणधर्मांचें परिवर्तन हें उपपन्नच होणार नाहीं. तात्पर्य जडांना विकसित करणारा अथवा जडांच्या ठिकाणीं विविध गुणधर्मांचें परिवर्तन घडवून त्यांना विविध रूपांनी नटविणारा हा जड असूं शकणार नाहीं. कारण जडाच्या ठिकाणीं स्वतः सिद्ध प्रवर्तकत्व अथवा प्रेरकत्व नसतें हें आपण वर पाहिलेंच आहे. या अवाढव्य भूत-भौतिक विश्वप्रपंचाला मूळांतून चालना देणारा जो कोणी असणार तो जडाहून भिन्नच असला पाहिजे हें निश्चित झाल्यानंतर तत्त्ववेत्त्यांनीं त्या जडाहून भिन्न असलेल्या तत्त्वाला चेतन असें नांव दिलें. कारण जडाच्या विरुद्ध अर्थाचा बोधक चेतन हाच शब्द आहे. यावर कोणी असें विचारील कीं, जड अगोदर कां चेतन अगोदर, जडाच्या अपेक्षेनेंच चेतन हा शब्द अस्तित्वांत आल्यामुळें जडजगत् हें चेतनाच्याहि अगोदरचें आहे असें म्हणावें लागतें. पण या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं कारण जडाचीच उत्पत्ति मूळ चेतनाच्या

अधीन आहे. तर मग जड हें चेतनाच्या अगोदरचें आहे असें कसें म्हणतां येईल ? दुसरें असें कीं, जड शब्दाच्या अपेक्षेंतून चेतन शब्द अस्तित्वांत आला का चेतन शब्दाच्या सापेक्षतेंतून जड शब्द अस्तित्वांत आला ? हेंहि पाहण्यासारखें आहे. तत्त्ववेत्त्यांच्या सूक्ष्म चिंतनांतून व निदिध्यासनांतून त्यांना ईश्वरसाक्षात्कार झाल्यानंतरच ईश्वराचें स्वतःसिद्धत्व, स्वयंप्रकाशत्व, सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्व इत्यादि गुण लक्षांत घेऊन त्यांनीं त्याला चेतन असें म्हटलें असावें व अशा रीतीनें चेतन शब्द अस्तित्वांत आल्यानंतरच त्या चेतनस्वरूप ईश्वरतत्त्वाहून भिन्न स्वरूपानें प्रतीतीला येणाऱ्या या भूतभौतिक विश्वप्रपंचाला चेतनविरुद्ध अर्थात् "जड" या शब्दानें व्यवहारिलें असावें. असें असणेंच अधिक सयुक्तिक आहे. हें चेतन तत्त्व सर्व जड वस्तूंच्या अगोदरचें असल्यामुळेंच या चेतनाला 'पुराण' असें म्हटलेलें आहे. पुराण शब्दाचा अर्थ पुरातन असा आहे. पुरातन म्हणजे जुना. या जगांत सर्वांत जुना जर कोणी असेल तर तो परमात्माच आहे, तो सर्वांच्या आगोदरचा आहे. त्याच्या आगोदरचें या जगांत कोणीच नाहीं व कांहींच नाहीं. "पुरा भवः पुराणः" अशी पुराण शब्दाची व्युत्पत्ति आहे. पूर्वीं पूर्वीं फार पूर्वीं जेव्हां पाहावे तेव्हां तो आहेच. तो सर्वांच्या आगोदरचा आहे. जेव्हां पाहावें तेव्हां तो आनंदानें विराजत असतो. प्रफुल्लित असतो. याच अभिप्रायानें आद्य शंकराचार्यांनीं पुराण या शब्दाचें निर्वचन करतांना "पुराऽपि नव एव इति पुराणः" असें भाष्यांत म्हटलेलें आहे. जेव्हां पाहावें तेव्हां तो नव म्हणजे नवा प्रफुल्लित अर्थात् स्वतःविरुद्ध आनंदानें पूर्ण भरलेला आहे. अशा अभिप्रायानें परमेश्वराला उद्देशून पुराण हा शब्द योजला गेला आहे. "एकस्त्वमात्मा पुरुषः पुराणः" असें श्रीमद्‌भागवतामध्यें परमेश्वराचें वर्णन केलेलें आहे. "पुराणः पुरुषोत्तमः" असेंहि त्याला म्हटलेलें आहे. जणूं कांहीं सर्व जड जगत् हें एक नगर असून त्या नगरामध्यें परमेश्वराचें वास्तव्य असतें म्हणून त्याला पुरुष असेंहि म्हणतात. "पुरिसीदति इति पुरुषः" अशी पुरुष या शब्दाची व्युत्पत्ति प्रसिद्ध आहे. शतपथ ब्राह्मणांतहि परमात्मा या अर्थानें पुरुष शब्दाचें निर्वचन करतांना "सोऽस्यां पुरि शेते तस्मात्पुरुषः" चतुर्दशभुवनात्मक ब्रह्माण्डरूपी नगरीमध्यें तो परमात्मा रहात असल्यामुळें त्याला पुरुष असें म्हटलें आहे. नऊ द्वारें असलेलें आपलें शरीर हीहि एक नगरीच आहे. याहि नगरींत परमेश्वराचें वास्तव्य असल्यामुळें परमेश्वराला पुरुष असें म्हटलेलें आहे.

हा पुरुष या विश्वामध्यें सर्वांत श्रेष्ठ असल्यामुळें त्याला परमपुरुष असें म्हणतात. तो विश्वातील कीट पतंगापासून तों ब्रह्मदेवापर्यंत सर्व आत्म्यामध्यें "पर" म्हणजे अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें त्याला परमात्मा असें म्हटलें आहे. सर्व प्राण्यांच्या देहामध्यें राहून तो सर्व विषय सेवन करतो, म्हणून त्याला आत्मा असें नांव पडलें. या अर्थानें "अत्ति इति आत्मा" अशी आत्म शब्दाची व्युत्पत्ति समजावी. सर्व विश्वाची सत्ता म्हणजे स्वामित्व हें त्याच्याकडे असल्यामुळें त्याला "ईश्वर" असें

म्हणतात. वड्या वड्या सम्राटांचा व देवदेवतांचाहि तो सत्ताधीश असल्यामुळें त्याला परमेश्वर असें म्हणतात. तो सर्वांचा स्वामी असल्यामुळें त्याला सर्वेश्वर असेंहि म्हटलें आहे. तात्पर्य, ईश्वर, परमेश्वर, सर्वेश्वर, आत्मा, परमात्मा, पुरुष, परमपुरुष, पुरुषोत्तम अथवा पुराणपुरुष हीं सर्व नांवें त्या चेतनाचींच आहेत. "चिति संज्ञाने" या धातूवरून चेतन हा शब्द निष्पन्न झाला आहे. 'चेतते चेतयते इति वा स चेतनः' अशी चेतन शब्दाची व्युत्पत्ति आहे. तो स्वतः जाणतो अथवा ज्याच्या-मुळें प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ज्ञानशक्ति विराजत असते त्याला चेतन असें म्हणतात. परमात्मा हा स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूप व प्रकाशस्वरूप असल्यामुळें तो इतर कोणत्याहि साधनाची अपेक्षा न ठेवतां स्वतःलाहि जाणतो व सर्व विश्वालाहि जाणतो. त्याच-प्रमाणें विश्वांतील प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ज्ञानशक्तीला समर्पण करून त्यांना ज्ञान प्राप्त करून घेण्याला समर्थ बनवितो म्हणून त्याला चेतन असें म्हणतात. त्याच्या अनुग्रहानें ज्ञान प्राप्त करून घेण्याला समर्थ झालेले प्राणीहि चेतन याच शब्दानें ओळखले जातात. जीवांचें चेतनत्व हें परमात्मचैतन्याच्या अधीन आहे, तर परमात्माचैतन्य हें स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहे. याच अभिप्रायानें त्या परमे-श्वराला "चेतनश्चेतनानाम्" असें म्हटलेलें आहे. याच अभिप्रायानें उपनिषदांत त्याला डोळ्यांचाहि डोळा, कानांचाहि कान व मनाचेंहि मन असें म्हटलेलें आहे. इतरांना पहावयास डोळे लागतात पण चेतनांचाहि चेतन असलेल्या परमेश्वराला मात्र पाहण्यासाठी डोळा लागत नाहीं. इतरांना ऐकण्यासाठीं कान लागतात पण त्याला मात्र कानांची गरज लागत नाही. डोळे नसले तरी तो पाहूं शकतो. कान नसले तरी तो ऐकूं शकतो. "पश्यत्यचक्षुः स श्रुणोत्यकर्णः" असें कांहीं त्याचें विलक्षण वैभव आहे.

वर केलेल्या विवेचनावरून एकच चेतनतत्त्व उपाधिभेदाने अथवा कार्य-भेदानें ईश्वर, परमेश्वर, आत्मा, परमात्मा, पुरुष, परमपुरुष, पुरुषोत्तम अशा अनेक नांवांनीं ओळखलें जातें हें आपण लक्षांत घेतलें. आतां त्याच्या स्वरूपाविषयीं आपण थोडासा विचार करूं. ईश्वराच्या स्वरूपाविषयीं विचार करणें म्हणजे अनिर्वच-नीयाचें निर्वचन करणेंच होय. जें तत्त्व अनिर्वचनीय असेल त्याचें निर्वचन करतां येत नाहीं, आणि निर्वचन केलेंच तर तें तत्त्व अनिर्वचनीय आहे असें म्हणतां येत नाहीं. ईश्वराच्या स्वरूपाविषयीं विचार करतांना हीच अडचण पुढें येऊन उभी राहते. कारण ईश्वराचें स्वरूप अनिर्वचनीय आहे. ईश्वराविषयीं वर्णन करतांना प्रत्यक्ष श्रीमदाद्य शंकराचार्यांनींच असें म्हटलें आहे कीं, "यं वर्णयितुं साक्षाच्छ्रुतिरपि मूकेव मौनमावहति, सोऽस्माकं मनुजानां किं वाचां गोचरो भवति?" ज्याचें वर्णन करतांना प्रत्यक्ष वेद देखील मुक्याप्रमाणें मौन धारण करतात मग तो परमात्मा आम्हा मानवांच्या वाणीचा कसा बरें विषय होऊं शकेल? सामान्य मानव आपल्या वाणीनें त्याचें कसें बरें वर्णन करूं शकणार? अशी जेथें स्थिति आहे, त्या

परमेश्वराच्या स्वरूपाचा विचार करणें म्हणजे गगनाला गवसणी घालण्याचाच प्रयत्न करणें होय. मुंगीनें मेरु पर्वत ओलांडणें, थोटचा मनुष्यानें स्वतः पोहून महासागराच्या पैलतीराला जाणें, जन्मांधानें स्वतः तयार केलेल्या अनेकरंगी चित्रांचें रमणीय प्रदर्शन भरविणें, उलूकानें सूर्यबिंबावर झेप घेणें, मशकानें हत्तीला चिरडून टाकणें अथवा मुक्यानें वक्तृत्वकलेंत प्रथम क्रमांकाचें पारितोषिक मिळविणें इत्यादि गोष्टी जशा अशक्य आहेत त्याचप्रमाणें अनन्तकोटि ब्रह्मांडांचा नायक असलेल्या त्या सच्चिदानंदस्वरूप परमात्मतत्त्वाचेंहि वर्णन करणें अशक्य आहे. असें असलें तरी ब्रह्मदेवादिकांपासून तो विद्यमान संत-कवींपर्यंत सर्वच लोक आपआपल्या शक्तीप्रमाणें परमेश्वराच्या स्वरूपाचें चिंतन व वर्णन करीत आहेत, तर मग मीहि पूर्णावतार सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु यांच्या कृपेनें प्राप्त झालेल्या अल्पस्वल्प शक्तीप्रमाणें ईश्वरस्वरूपाचा विचार करण्यास प्रवृत्त कां न व्हावें ? अथवा मी तरी प्रवृत्त होणारा कोण ? केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि.

ईश्वर हा चेतनस्वरूप आहे असें आपण वर पाहिलेंच आहे. चेतन शब्दाचा अर्थ आत्मा, प्राण, ज्ञान अथवा चैतन्य असाहि आहे. हे सर्वच अर्थ ईश्वराच्या ठिकाणीं पूर्णपणें जुळतात. अद्वैततत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें ईश्वर हा चैतन्यस्वरूप आहे; ज्ञानस्वरूप आहे. ज्ञानशक्तींतूनच क्रियाशक्तीचा आविर्भाव होत असल्यामुळें जेथें जेथें क्रियाशक्ति असते तेथें तेथें ज्ञानशक्तीहि मुळाशीं असतेच. याच दृष्टीनें ज्या ठिकाणीं स्वाभाविकपणें क्रियाशक्तीचा आविर्भाव होत असतो त्या ठिकाणीं चैतन्य आहे असा व्यवहार होत असतो. ज्या चैतन्यानें जडांच्या ठिकाणीं हालचाल सुरू होते. त्याच चैतन्याला ईश्वर असें म्हणतात. ज्या वेळेला हा चैतन्यस्वरूप ईश्वर प्राणिमात्रांच्या देहांत प्रवेश करतो त्याच वेळेला त्याला जीव हें नांव प्राप्त होतें. "जीवयति इति जीवः" अशी जीव शब्दाची व्युत्पत्ति आहे. ईश्वरच प्राणिमात्रांच्या देहांत प्रविष्ट होऊन सर्वांच्या देहांना व इन्द्रियसमुदायांनाहि आपआपल्या कार्याकडे प्रवृत्त करतो. सर्वांना तो जगवितो. जीवन देतो म्हणूनच त्याला जीव ही संज्ञा प्राप्त झाली. याच अभिप्रायानें महर्षि याज्ञवल्क्यांनीहि "ईश्वरो जीवकलया प्रविष्टो भगवानिति" असें म्हटलें आहे. सर्वैश्वर्यसंपन्न परमात्माच प्राणिमात्रांच्या देहामध्यें प्रविष्ट झाला आहे असा त्याचा अर्थ आहे. "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया" ही गीतेंतील श्रीकृष्णाची उक्ति तर सुप्रसिद्धच आहे. यंत्रावर बसविलेल्या बाहुल्यांना सूत्रधारी जसा नाचवितो, त्याचप्रमाणें ईश्वर हा सर्वांच्या हृदयांत राहतो व सर्वांना आपआपल्या कार्याकडे प्रवृत्त करतो. तात्पर्य सर्वांच्या देहांत राहून सर्वांना प्रेरणा देणारा तोच ईश्वर होय. भूतमात्रांमध्यें आढळून येणाऱ्या ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति व भोगशक्ति या सर्व शक्तींचें मूळ अधिष्ठान ईश्वरशक्तीच

असल्यामुळें त्या ईश्वराला चिच्छक्ति अथवा चैतन्यशक्ति असेंहि म्हणतात. इच्छाशक्ति, क्रियाशक्ति व भोगशक्ति इत्यादि सर्व शक्तींचें मूळ ज्ञानशक्तींतच असल्यामुळें ज्ञानशक्ति ही सर्व शक्तींमध्ये प्रधान आहे. हिलाच चिच्छक्ति अथवा चैतन्यशक्ति असें म्हणतात. ही चैतन्यशक्ति त्या चेतन परमात्म्याहून निराळी नाहीं. पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रियाच "श्वेताश्वतर. ६।८ परमेश्वराची शक्ति ही परमेश्वराइतकीच मोठी असून ती परमेश्वराशीं अभिन्न म्हणजे एकरूप आहे. तिच्यांतून आविर्भूत होणाऱ्या ज्ञानक्रिया, बलक्रिया इत्यादि सर्वशक्ति या परमेश्वराच्या स्वाभाविकच शक्ति होत. अग्नीची औष्ण्यशक्ति अथवा चंद्राची आल्हादिनी शक्ति ही जशी अग्निस्वरूप अथवा चन्द्रस्वरूपच आहे, त्याचप्रमाणें ईश्वराची चैतन्यशक्ति हीहि ईश्वरस्वरूपच आहे. तात्पर्य ईश्वर हा चैतन्यशक्तिस्वरूप आहे असेंच म्हणावें लागतें.

याच चैतन्यशक्तीला केवल चित् असेंहि म्हणतात. चित् शब्दाचा अर्थहि ज्ञान असाच आहे. यावरून ईश्वर हा ज्ञानस्वरूप आहे, हेंहि ओघानेंच आलें. "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" "नित्यं विज्ञानमानन्दं ब्रह्म" "प्रज्ञानं ब्रह्म" इत्यादि श्रुतिवाक्यांतून ज्ञान, विज्ञान व प्रज्ञान हे सर्व शब्द ईश्वर या अर्थानेंच आलेले आहेत. ही चित् अथवा हें चैतन्य या विश्वांत सर्वांपेक्षां मोठें आहे. त्याच्यापेक्षां दुसरें कोणीच मोठें नाहीं. याच अभिप्रायानें या चैतन्याला अथवा ईश्वराला ब्रह्म असें म्हटलेलें आहे. बृह्‌बृंह म्हणजे मोठें होणें अथवा मोठें असणें या धातूवरूनच ब्रह्म हा शब्द निष्पन्न झाला आहे. ब्रह्म शब्दाचा अर्थ सर्वांत मोठा असा आहे. या विश्वांत ईश्वर हाच सर्वांत मोठा असल्यामुळें ईश्वराला ब्रह्म असें म्हणतात. तात्पर्य ईश्वर हा ब्रह्मस्वरूप आहे, हीहि गोष्ट सिद्ध झाली.

अग्नीपासून स्फुलिंग जसे प्रकट व्हावेत अथवा एखाद्या उच्चतम पर्वताच्या पठारावर असलेल्या सरोवरांतून जसे अनेक नद्यांचे प्रवाह उगम पावावेत त्याचप्रमाणें सर्व जीव ज्याच्या स्वरूपांतून आविर्भूत होतात तो परमात्मा चैतन्यघन अथवा चैतन्याचा महासागर असणें हें स्वाभाविकच आहे. खऱ्या अर्थानें सर्व नद्या व जलाशय हे जसे महासागरांतूनच निर्माण होतात व शेवटीं महासागरांतच जाऊन मिळतात, त्याचप्रमाणें सर्व भूतें, भौतिक प्रपंच व सर्वजीवसमूहहि ज्याच्या स्वरूपांतून उगम पावतात व अंतीं ज्याच्या स्वरूपांत विलीन होतात तोच परमात्मा होय. त्यालाच ब्रह्म असें म्हणतात. हेंच चैतन्यघन ब्रह्म आपल्या ईश्वराचें स्वरूप होय.

ईश्वर हा नित्य आहे. ज्याचा कधीं नाश होत नाहीं त्याला नित्य असें म्हणतात. या जगांत ज्याचा कधींहि नाश होत नाहीं असा एकच पदार्थ आहे आणि तो म्हणजे ईश्वर हाच होय. यद्यपि पृथ्वी, जल, तेज आणि वायु यांचे परमाणु व आकाश काल, दिशा, जीवात्मा आणि मन हे नित्य मानले जातात तरी पण त्यांचें नित्यत्व हें सापेक्ष आहे आणि म्हणूनच तें गौण आहे. महाप्रलयाच्या काळीं या

सर्वांचा परमात्मस्वरूपांत लय होतो व परमात्माच एकटा शिल्लक राहतो, हा सिद्धान्त प्रवल युक्तींनीं व श्रुतींनीहि मान्य केलेला असल्यामुळे तो कोणाहि विचारवन्तांना अमान्य करतां येणार नाहीं. तात्पर्य जगांत नित्य म्हणून ओळखले जाणारे पदार्थहि अंतीं महाप्रलयकाळीं परमात्मस्वरूपांत विलीन होत असल्यामुळें व परमात्मा मात्र केव्हांहि व कोठेंहि विलीन होत नसल्यामुळें खऱ्या अर्थानें परमात्मा हाच नित्य आहे असें म्हणावें लागतें. याच अभिप्रायानें परमेश्वराचें वर्णन करतांना श्वेताश्वतरोपनिषदामध्यें त्याला नित्यांचाहि नित्य "नित्यो नित्यानाम्" असें म्हटलेलें आढळतें. "नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान्। तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यं ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः। (श्वेताश्वतरः ६।१३) श्वेताश्वतरोपनिषदांतील मंत्रानें ईश्वराचेंच स्वरूप व्यक्त केलेलें आहे.

"नित्यं विज्ञानमानन्दं ब्रह्म" या तैत्तिरीयोपनिषदांतील वचनानेंहि परममहान् परमात्मा हा नित्यस्वरूप, विज्ञानस्वरूप आणि आनन्दस्वरूप असल्याचेंच सांगितलें आहे. आपल्यालाहि युक्तीनें व अनुभवानेंहि त्याचें नित्यत्व, विज्ञानस्वरूपत्व व आनन्दस्वरूपत्व पाहावयास सांपडेल. कारण तेंच त्याचें स्वरूप आहे. ईश्वर हा सत्य स्वरूप आहे. ज्याचा कधींहि बाध होत नाहीं त्याला सत्य असें म्हणतात. या जगांत ईश्वराव्यतिरिक्त जें कांहीं प्रतीतीला येतें तें कालान्तरानें बाधित होत असतें, म्हणून त्याला सत्य म्हणतां येत नाहीं. ईश्वरतत्त्वाचा मात्र कधींच बाध होत नाहीं कारण तो आत्मस्वरूप आहे. प्रतीतीला येणाऱ्या सर्व जगाचें तो अधिष्ठान आहे. अधिष्ठानाचा बाध होत नसतो. अधिष्ठानाचा जर बाध मानला तर तो बाध जाणणारा कोणीतरी असलाच पाहिजे, व तो स्वतः निराबाध असला पाहिजे. नाही तर त्याचा बाध जाणणारा दुसरा कोणी साक्षी व त्याचाहि बाध जाणणारा तिसरा अशी अनवस्थापत्ति ओढवेल. तेव्हां सर्व बाधांचा साक्षी हा स्वतः निराबाध असलाच पाहिजे. तात्पर्य स्वतः कधीं बाधित न होणारा पण साऱ्या विश्वाचा व विश्वाच्या बाधाचाहि जो कोणी अधिष्ठान व साक्षी आहे तोच ईश्वर होय. याच अभिप्रायानें "साक्षी चेता केवलो निर्गुणश्च" असें तत्त्ववेत्त्यांनी ईश्वराचें वर्णन केलेलें आढळतें. – "एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा। कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः, साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।' – ईश्वर म्हणजे देव. तो एकच आहे. तो देवांचाहि देव आहे. तो स्वतःसिद्ध प्रकाशस्वरूप असून साऱ्या विश्वालाहि प्रकाशित करतो म्हणून त्याला देव असें म्हटलेलें आहे. द्यो अथवा दिव् प्रकाशणें या धातूवरून देव शब्द निष्पन्न झाला आहे. देव म्हणजे स्वतःच्या प्रकाशानें प्रकाशणारा. "सर्वभूतेषु गूढः". ईश्वर हा विश्वांतील यच्चयावत् प्राण्यांमध्यें न कळत वास्तव्य करीत असतो. कस्तूरी आपल्या नाभिस्थानांत असूनहि कस्तूरीमृग कस्तूरीच्या शोधासाठीं रानोमाळ हिंडत असतो. त्याचप्रमाणें ईश्वर हा आपल्या अन्तरंगांत असूनहि आपण

त्याला शोधण्यासाठीं अज्ञानानें इतस्ततः वणवण करीत फिरत असतो. कारण तो जवळ असूनहि दिसत नाहीं म्हणून त्याला सर्वभूतांमध्यें गूढ म्हणजे झाकलेला असें म्हटलें आहे. "सर्वव्यापी" – आपला ईश्वर जसा सर्वांमध्यें झाकलेला आहे तसाच तो सर्वांना व्यापूनहि राहिलेला आहे. तो सर्वांना वेष्टून राहिलेला असल्यामुळेंच त्याला विष्णु असें नांव दिलें गेलें आहे. "सर्वभूतान्तरात्मा" ईश्वर हा सर्व प्राण्यांचा अन्तरात्मा म्हणजे जीवच आहे. सर्वांच्या देहांत प्रवेश करून जीव-रूपानें तोच विराजत आहे. यावर कोणी असें विचारील कीं, जीव जर ईश्वर-स्वरूप आहे तर मग तो ईश्वराप्रमाणें सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान कां नाहीं? यावर उत्तर असें कीं, महासागरांतील पाणी घडयांत भरलें कीं तें परि-च्छिन्न – परिमित होतें. तें असीम असूनहि सीमित होतें त्याचप्रमाणें जीवचैतन्य हें ईश्वरस्वरूप असूनहि देह इंद्रियें आणि अन्तःकरण या उपाधींनीं परिसीमित झाल्यामुळें त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्तीहि कुंठित होते. ती प्रतीतीला येऊं शकत नाहीं. सर्वभूतांच्या अन्तरंगात ईश्वरचैतन्य प्रतिबिंबित झाल्यामुळेंच ईश्वराला जीवभाव प्राप्त झाला आहे. प्रतिबिंबांना तत्त्वतः बिंबापेक्षां निराळें कांहीं स्वरूप नसतें. ज्या उपाधीमुळें प्रतिबिंबांची प्रतीति येते तो उपाधि नाहींसा झाल्याबरोबर प्रतिबिंबेंहि मावळतात व बिंब मात्रच शिल्लक राहतें. याच न्यायानें अन्तःकरणरूपी उपाधींत प्रतिबिंबित झालेलें चैतन्यच जीवरूपानें प्रतीतीला येतें. अन्तःकरणरूपी उपा-धींचा निरास झाला कीं जीवभाव मावळतो, व केवळ चैतन्यस्वरूप ईश्वरच शिल्लक राहतो. हाच सर्व भूतांचा अन्तरात्मा म्हणजे जीव असल्यामुळें ईश्वराला सर्वभूतान्त-रात्मा असें म्हटलेलें आहे. असें आहे ईश्वराचें स्वरूप. ईश्वर जसा सर्वभूतान्तरात्मा आहे तसाच तो कर्माध्यक्षहि आहे. अध्यक्ष शब्दाचा अर्थ देखरेख करणारा अधिकारी असा आहे. मानवमात्रांकडून आचरलीं जाणारीं काम्यकर्में, त्याचप्रमाणें नित्य आणि नैमित्तिक, विहित कर्में तसेंच निषिद्ध कर्में अथवा विहित कर्मांचा त्याग करणें इत्यादि अकरणात्मक कर्में इत्यादि सर्व कर्मांचा अध्यक्ष तो परमात्माच आहे. ज्यांचीं ज्यांचीं जशीं जशीं कर्में असतील त्यांना त्यांना त्यात्याप्रमाणें फलें देणाराहि परमात्माच आहे म्हणून त्याला कर्माध्यक्ष असें म्हणतात. सर्व भूतांच्या, प्राणिमात्रांच्या हृदयांत ईश्वराचें वास्तव्य असल्यामुळें त्याला "सर्वभूताधिवास" असेंहि म्हटलेलें आहे. सर्व प्राण्यांची सर्व प्रकारची हालचाल तो ईश्वर पहात असल्यामुळें त्याला साक्षी असें म्हटलेलें आहे. "चेता" म्हणजे प्राणिमात्रांच्या देहांत प्रवेश करून त्यांच्या कर्मेन्द्रियांना, ज्ञानेंद्रियांना, प्राण, मन, व बुद्धियांना शक्ति आणि प्रेरणा देणारा. "केवल" म्हणजे एकरूप अर्थात् कोणत्याहि प्रकारच्या उपाधीचा ज्याला तिळमात्रहि संपर्क नाहीं असा आणि म्हणूनच तो परमात्मा निर्गुण म्हणजे गुणातीत आहे. सत्त्व, रज आणि तम या कोणत्याहि गुणांचा लेशहि त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. सर्वगुणसंपन्न असूनहि गुणांशीं संपृक्त न

होणें हा ईश्वराचा एक विशिष्ट स्वभाव आहे. हाच अभिप्राय लक्षांत घेऊन महर्षि पतंजलींनीं देखील योगसूत्रामध्यें "क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः" असें ईश्वराच्या स्वरूपाचें वर्णन केलेलें आहे.

अविद्या म्हणजे अज्ञान. अस्मिता म्हणजे राग, द्वेष आणि अभिनिवेश या सर्व गोष्टींमुळें संसारांत जीवांना अत्यंत क्लेश होत असतात. ईश्वराच्या ठिकाणीं मात्र क्लेशाचें कोणतेंहि कारण नसल्यामुळें ईश्वराला कोणत्याहि प्रकारें क्लेशांचा संपर्क नाहीं. बऱ्यावाईट अथवा मिश्र अशा कोणत्याहि प्रकारच्या कर्मांचा ईश्वराशीं तिळमात्रहि संबंध नाहीं. कर्मांचा संबंध नसल्यामुळे कर्मांचा विपाक म्हणून प्राप्त होणारे जन्म मृत्यु, व सुखदुःखें इत्यादिकांचाहि ईश्वराशीं कांहीं संबंध नाहीं. जन्म, मृत्यु व सुखदुःखें यांना कारणीभूत कर्मांच्याहि मुळांशीं ज्या प्रसुप्त वासना असतात त्यांना आशय असें म्हणतात. अशा प्रसुप्त वासनाहि ईश्वराच्या ठिकाणीं नाहींत. क्लेश, कर्म, विपाक आणि आशय हे सर्व शुद्ध चित्स्वरूप असलेल्या जीवाला चित्स्वरूपांतून खालीं खेंचतात, मलिन बनवितात व दुःखी करतात. याच अभिप्रायानें हे सर्व जीवांचे दोष म्हणून ओळखले जातात. या दोषांत जोंपर्यंत जीव गुरफटलेला असतो तोंपर्यंत त्याला ईश्वरभाव प्राप्त होत नाहीं. या दोषांचा ईश्वराशीं तिळमात्रहि संबंध नसल्यामुळें ईश्वर हा सर्वस्वीं निर्दोष आहे. सर्वसामान्य जीवापेक्षां ईश्वराचें हेंच वैशिष्टय लक्षांत घेऊन तत्त्ववेत्यांनी ईश्वराला "पुरुषविशेष" असें म्हटलेलें आहे. याच अभिप्रायानें पुरुषोत्तम अथवा उत्तम पुरुष त्याला म्हणतात. असें आहे आपल्या ईश्वराचें स्वरूप.

ईश्वराच्या स्वरूपाचें विवेचन करतांना त्याला उपमा देतां येईल असें या जगांत दुसरें कांहीहि नाहीं. "न तत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यः ?" त्याच्या सारखाहि या जगांत दुसरा कोणी सांपडत नाही तर मग त्याच्यापेक्षां अधिक या जगांत दुसरा कोण असणार ? असा हा ईश्वराच्या स्वरूपाविषयीं विचार करतां करतां त्याच्या स्वरूपाचा अंतिम अनुभव भक्तजनांच्या अन्तःकरणांत सहजच प्रतीतीला येतो.

सृष्टीच्या आद्यकालापासून विद्यमानकालापर्यंत ज्यानें असंख्य भक्तांचे मनोरथ पूर्ण केले आहेत. सनकसनंदनादिकांपासून श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत एकनाथमहाराज, श्रीसंत दासोपंत, श्रीसंत माणिक प्रभु व श्रीसंत तुकाराममहाराज यांच्यापर्यंत ज्यानें सकलांचे मनोरथ पूर्ण केले आहेत व विद्यमान कालांतहि असे कांहीं संत-महात्मे आहेत कीं ते देखील परमेश्वराच्याच सकलमनोरथपूरकत्वाची साक्ष देत आहेत. याच अभिप्रायानें ईश्वराला भक्तकामकल्पद्रुम असें म्हणतात. याच अभिप्रायानें श्रुतीनें देखील "एको बहूनां यो विदधाति कामान्" (श्वेताश्वतर. ६।१३) सृष्टीच्या आरंभकालापासून शेवटपर्यंत जो एकटाच असंख्य भक्तजनांचे सकल मनोरथ पूर्ण करतो तोच परमात्मा होय असें परमेश्वराचें वर्णन केलेलें आहे.

"दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा" म्हणणारे देखोल अंतीं गंगेच्या वाहत्या प्रवाहांत उभे राहिलेल्या मनुष्याच्या पायाखालची वाळू जशी निसटून जावी त्याप्रमाणें क्षणभंगुर दिल्लीश्वराचा आधार सुटल्यानंतर ईश्वरालाच शरण जाण्याविषयीं आपल्या मनाला विनवीत आहेत कीं, बा मना! "हा चापलान्नरपिशाचानुपासितुमनाचार किं नु यतसे?" अरेरे! केवळ मूर्खपणानें आपला आचारविचार सोडून देऊन, या दिल्लीच्या सत्तेवर विराजत असलेल्या नरपिशाचांची मनधरणी करण्याकरितां कां बरें तुं व्यर्थ झटत आहेस? दिल्लीच्या सत्तावैभवाच्या छायाछन्नाखालीं तूं आज आनंदांत आहेस उद्यां देशोधडीला लागशील. जा! ईश्वरालाच शरण जा. तोच तुझे सर्व मनोरथ पूर्ण करील. "अनातंकाय वत्स भज तं कालमेघगहंकारहारिवपुषम्" बाळा! संसारांतील सर्व प्रकारच्याच चिंतेंतून मुक्त होण्यासाठी तूं त्या सजलजलदश्यामलतनु घनश्याम रामचंद्र प्रभूलाच शरण जा. कारण ते पूर्णपरब्रह्मस्वरूप आहेत. तात्पर्य परमात्मा हाच एक सकल मनोरथ पूर्ण करण्याला समर्थ असल्यामुळें त्यालाच ईश्वर अथवा परमेश्वर असें म्हणतात. एका हिंदी भक्तकवीनेंहि पण "जा के सुमिरन सो नित पाप हरत जनम टरत पावत पद परम उन्नत" ज्याच्या नित्यस्मरणानें पापें निरस्त होतात, व जन्मपरंपरा टळते, व अत्यंत उन्नत पदाची प्राप्ति होते तोच परमात्मा होय. तें ईश्वराचें स्वरूप सर्व सृष्टीचें मूलकारण आहे. याच अभिप्रायानें त्याला एका विद्वानानें "संसारमहीरुहस्य बीजाय" असें म्हणून नमस्कार केलेला आहे. तें ईश्वराचें स्वरूप तत्त्वज्ञानाच्या चिंतनानें व योगविद्येच्या अभ्यासानेंच जाणतां येण्यासारखें आहे. त्या दिव्य ईश्वरस्वरूपाला जाणलें असतां जीव हा सर्व संसारपाशांतून मुक्त होतो. हाच अभिप्राय श्वेताश्वतरोपनिषदांतील खालीं दिलेल्या वाक्यांत व्यक्त केला आहे. "तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यं ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः" (—श्वेताश्वतर ६।१३) तात्पर्य सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, अनादि, अनन्त, जगत्कर्ता, विश्वंभर, सर्वसंहाराकर्ता, सन्मय, चिन्मय, आनन्दमय, नित्य, सत्य, ज्ञान, विज्ञान, प्रज्ञान, स्वतःसिद्ध, स्वयंप्रकाश, सत्यसंकल्प, भक्तकामकल्पद्रुम, करुणानिधान इत्यादि अनेक विशेषणांनीं ज्याचें वर्णन करतां येईल असेंच आहे आमच्या दयाघन परमेश्वराचें स्वरूप.

आतां यावर कोणी असें विचारील कीं, हें सर्व वाचलें, ऐकलें अथवा लक्षांत घेतलें तरी मनाला कांहींही समाधान होत नाहीं. ईश्वर आहे व त्याला कांहीं स्वरूपहि आहे हें लक्षांत आलें तरी जोंपर्यंत त्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार होत नाहीं तोंपर्यंत मनाला कांहीं समाधान होत नाहीं. तेव्हां मनाला कांहीं समाधान होईल असें सांगा. यावर उत्तर असें कीं, प्रश्न अगदीं बरोबर आहे. ईश्वर आहे व त्याला कांहीं स्वरूपहि आहे, असें जें आपल्याला ज्ञान होत असतें त्या ज्ञानाला परोक्ष ज्ञान म्हणतात. अगदींच अज्ञान असण्यापेक्षां परोक्ष स्वरूपांचें ज्ञान असणें हें पुष्कळ बरें असलें तरी आत्मसमाधानाच्या दृष्टीनें परोक्ष ज्ञान हें दुबळेंच असतें. "बोलाचीच कढी,

बोलाचाचि भात, जेवोनिया तृप्त कोण झाला ? " असा जो परखड सवाल आपल्या पुढें येतो तो या परोक्ष ज्ञानाला उद्देशूनच होय. एखादी वस्तु प्रत्यक्ष जेव्हां आपण पहावी अथवा अनुभवावी तेव्हांच त्या ज्ञानाला अपरोक्ष ज्ञान असें म्हणतात. याच ज्ञानाला अपरोक्षानुभव अथवा अपरोक्ष साक्षात्कार असेंहि म्हणतात. सुखास्पद वस्तूचा अपरोक्ष साक्षात्कार झाल्याशिवाय खरें समाधान लाभत नाहीं. अशी ही वस्तुस्थिति आहे.

## ईश्वरसाक्षात्कार

आत्मसमाधानासाठीं आवश्यक असलेला ईश्वरसाक्षात्कार आपल्याला कसा होईल हा प्रश्न शिल्लक राहतोच. आपण आतां त्याचा थोडासा विचार करूं या. अनुमानानें, शब्दानें अथवा तत्सम इतर साधनांनीं होणाऱ्या ज्ञानाला परोक्ष ज्ञान असें म्हणतात. डोळा, कान, नाक, रसना म्हणजे जीभ आणि स्पर्शेन्द्रिय या इन्द्रियांनी व अन्तःकरणानें होणाऱ्या ज्ञानाला अपरोक्ष ज्ञान किंवा अपरोक्ष साक्षात्कार असें म्हणतात. चक्षु, श्रोत्र, रसना इत्यादि बहिरिंद्रियांचा वस्तूशीं संबंध होऊन जें ज्ञान होत असतें त्या ज्ञानाला बाह्यप्रत्यक्ष अथवा बाह्यसाक्षात्कार असें म्हणतात.

ईश्वराचा साक्षात्कार आम्हांला केव्हां होईल अशी ज्यांच्या अन्तःकरणाला तळमळ वाटते त्यांनीं पुढें निर्दिष्ट केलेल्या विचारांचें अवश्य मनन करावें. बहिरिन्द्रियांनी ज्या वेळेला एखाद्या वस्तूचें ज्ञान होत असतें त्या वेळेला त्या वस्तूच्या ठिकाणीं रूप, रस, गंध किंवा स्पर्श हे अथवा यांपैकीं कोणतातरी एखादा गुण असावा लागतो. त्याचप्रमाणें ती वस्तु मोठ्या परिमाणाची असावी लागते. अंधारांत गंध कळतो व त्या गंधावरून सुगंधी अथवा दुर्गंधी असलेल्या वस्तूंची कल्पना करतां येते. अंधारांत गोड, तिखट, आंबट, खारट इत्यादि रसांचें ज्ञान होऊं शकतें व त्या त्या रसांवरून वस्तूंचेंहि ज्ञान होऊं शकतें. प्रकाशावांचूनहि एखादी वस्तु मृदु आहे का कठीण आहे या गोष्टी स्पर्शानें कळूं शकतात, पण काळा, तांबडा, पांढरा इत्यादि गुणधर्म किंवा त्या गुणधर्मानें विशिष्ट असलेल्या वस्तूचें ज्ञान, सूर्य, चंद्र, अग्नि अथवा दिवा इत्यादिकांचा प्रकाश असल्याशिवाय होऊं शकत नाहीं. डोळ्यानें एखादी वस्तु पहावयाची झाल्यास त्या वस्तूच्या ठिकाणीं कांहींतरी रंगरूप असावें लागतें. ती वस्तु मोठी अर्थात् महत्परिमाणाची असावी लागते. अतिसूक्ष्म वस्तूचें डोळ्यानें ज्ञान होत नाहीं. शिवाय स्थूल वस्तूचें डोळ्यानें ज्ञान होण्यासाठीं प्रकाशाचीहि आवश्यकता असतेच. ईश्वराचा आपल्याला बाह्य साक्षात्कार व्हावा अशी ज्यांची तळमळ असेल त्यांनीं या गोष्टीचा अवश्य विचार करावा कीं, ईश्वर हा कांहीं घटपटासारखा डोळ्यांनीं दिसणारा नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं स्थूल अथवा सूक्ष्म असें कोणतेंहि परिमाण नाहीं. तो तर "अणोरणीयान् महतो महीयान्" (श्वेताश्वतर ३।२०) असा आहे. अणु म्हणजे अतिसूक्ष्म पदार्थ. त्याच्यापेक्षांहि अणु

म्हणजे अतिसूक्ष्म आहे ! तो डोळ्यानें कसा दिसणार ? तो आकाश, काल वगैरे महान् समजल्या जाणाऱ्या पदार्थांपेक्षांहि महान् आहे. तो परममहान् आहे. जेथें आकाश आणि काल यांचेंहि डोळ्यानें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं तेथें त्यांच्यापेक्षांहि महान् असलेल्या व आकाश आणि काल यांनाहि व्यापून उरलेल्या परमेश्वराचें या चर्म-चक्षूनें प्रत्यक्ष ज्ञान कसें होणार ? तो परमात्मा तर साऱ्या विश्वाला व्यापून वीतभर उरलेला आहे. "स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम्" असें तिन्ही वेद त्याचें वर्णन करीत आहेत. सारें विश्वहि जेथें आपल्याला डोळ्यानें दिसूं शकत नाहीं तेथें विश्वाला व्यापून असलेल्या ईश्वराचें दर्शन डोळ्यानें कसें घडणार ? डोळ्याची शक्ति ती किती ? ती परिच्छिन्न आणि परिमित आहे व ईश्वर हा तर अपरिच्छिन्न आणि अपरिमित आहे ! ! अशा स्थितींत ईश्वराचा डोळ्यानें साक्षात्कार व्हावा असा आग्रह धरणें हें एखाद्या अर्भकानें आकाशांतील चंद्र हातांत खेळावयास देण्याचा हट्ट करण्यासारखेंच होय. कोणता न कोणता तरी गुण असल्याशिवाय व आकारहि असल्याशिवाय बाह्य वस्तूचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं. ईश्वर हा तर निर्गुण आणि निराकार आहे. मग त्याचें बहिरिंद्रियांनीं प्रत्यक्ष कसें होणार ? "अस्थूलमनणु, अह्रस्वमदीर्घम्" इत्यादि वाक्यांनीं बृहदारण्यक श्रुतीनें परमेश्वराचें निर्गुणत्व व निराकारत्व स्पष्टच वर्णन केलेलें आहे. (बृहदा. ३।८।८) काठक, श्वेताश्वतर, महानारायणीय, ईशावास्य इत्यादि उपनिषदांतून ठिकठिकाणीं ईश्वराचें निर्गुणत्व मुक्तकंठानें प्रतिपादिलेलें आहे. असें त्याचें स्वरूप असतां त्या स्वरूपाचा बाह्य इन्द्रियांनी साक्षात्कार करून घेण्याचा आग्रह हा निरर्थक आहे.

आतां आपण परमेश्वराच्या अन्तःसाक्षात्काराचा विचार करूं. परमेश्व-राच्या स्वरूपाचा अन्तःसाक्षात्कार आपल्याला होऊं शकतो ही गोष्ट निर्विवाद आहे. अन्तःसाक्षात्कारालाच मानसप्रत्यक्ष असें म्हणतात. ईश्वरसाक्षात्काराच्या वेळीं बाह्य प्रत्यक्षाच्या बाबतींत ज्या अडचणी उपस्थित होतात त्या अडचणी मानसप्रत्यक्षाच्या वेळीं आड येत नाहींत. एखाद्या वस्तूचें मानसप्रत्यक्ष होतांना त्या वस्तूच्या ठिकाणीं कांहीं गुणधर्म अथवा आकार प्रकार असावयास पाहिजेत असा नियम नाहीं. सुख, दुःख, लज्जा, भीति, काम, क्रोध इत्यादि गुणधर्मांचें अथवा विकारांचें जसें मानसप्रत्यक्ष होतें त्याप्रमाणें ईश्वराचेंहि मानसप्रत्यक्ष होण्यास कांहीं हरकत नाहीं. यावर कोणी असें विचारील कीं, सुख-दुःख हे आत्म्याचे धर्म आहेत. वेदान्ती तर त्यांना मनाचेच धर्म मानतात. अशा स्थितींत त्यांचा साक्षात्कार केवळ मनानें होऊं शकेल. पण ईश्वर हा कांहीं आत्म्याचा धर्म नव्हे किंवा मनाचाहि धर्म नव्हे मग ईश्वराचा साक्षात्कार केवळ मनानें कसा होईल ? प्रश्न अगदीं बरोबर आहे, पण जरा सूक्ष्म विचार केल्यास ईश्वराचा अन्तःसाक्षात्कार किंवा मानसप्रत्यक्ष मानण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. ईश्वर हा आत्म्याचा किंवा मनाचा धर्म नसला तरी तो स्वतःच आत्म-

स्वरूप आहे. तो मनःस्वरूपहि आहे. आणि म्हणूनच त्याचें मानसप्रत्यक्ष होण्यास कांहींच अडचण पडत नाहीं.

दुसऱ्याच्या सुख-दुःखांचें अथवा आत्म्याचें आपल्याला आपल्या मनानें ग्रहण करतां येत नसलें तरी आपल्या सुखदुःखांचें व आत्म्याचें आपल्याला आपल्या मनानें प्रत्यक्ष ज्ञान होत असल्यामुळें आपला आत्मा हा आपल्या अपरोक्ष साक्षात्काराचा विषय होऊं शकतो. ईश्वरच आत्मस्वरूपानें सर्वत्र विराजत असल्यामुळें आत्म-स्वरूपाच्या साक्षात्कारावरोबर ईश्वराचाहि साक्षात्कार होतो असें म्हणावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

यावर कोणी असें विचारील कीं, आत्मा तर बाळगोपाळांनाहि कळतो. मी आहें असें तेहि म्हणत असतात. आत्मा आणि ईश्वर जर एकरूप असतील तर मग बाळगोपाळांनाहि आत्मज्ञानावरोबर ईश्वरसाक्षात्कारहि होतो असें म्हणावें लागेल. शंका आपाततः बरोबर आहे. पण जरा सूक्ष्म विचार केल्यास या शंकेला अवसर रहात नाहीं. बाळगोपाळांना अथवा सर्वसामान्य अज्ञ जनांना जें आत्मस्वरूपाचें ज्ञान होत असतें तें अत्यंत तुच्छ, हीन अथवा मलिन अशा उपाधींत गुरफटलेल्याच आत्म्याचें ज्ञान होत असतें. अज्ञत्व, असमर्थत्व, दीनत्व, सुखदुःखादि भोक्तृत्व इत्यादि हीन धर्मांची ज्या उपाधीमुळें आत्म्याच्या ठिकाणीं प्रतीति येते त्या उपा-धीचा निरास झाल्याशिवाय आत्म्याचेंहि यथार्थ ज्ञान झालें असें म्हणतां येत नाहीं. हीन आत्मस्वरूपाच्या ज्ञानांत ईश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होऊं शकत नाहीं. यथार्थ आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारांतच ईश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होऊं शकतो. उपाधि-निरासाच्या तारतम्यानें जसा जसा आत्मसाक्षात्कार उज्ज्वल होईल तसा तसा ईश्वर साक्षात्कारहि उज्ज्वल स्वरूपांत प्रतीतीला येईल. याच अभिप्रायानें "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः" (कठ ३।१२) याप्रमाणें कठोपनिषदांत ईश्वराचा साक्षात्कार सूक्ष्म बुद्धीनें होऊं शकतो असें स्पष्टच सांगितलें आहे. सूक्ष्म विचारक्षम असलेले साधक ज्या वेळेला आत्मश्रवणानें व मननानें आपली बुद्धि सूक्ष्म, सतेज व धारदार बनवितात व अशा सूक्ष्म बुद्धीला अत्यंत एकाग्र करून निदिध्यासन अर्थात् अखंड चिंतन करतात तेच साधक त्या सूक्ष्म व एकाग्र बुद्धीनें शुद्ध आत्मस्वरूपाचा व ईश्वराचाहि साक्षात्कार करून घेऊं शकतात.

यावर कोणी असें विचारील कीं, अहो "नतत्रमनोगच्छति न वाग्गच्छति" "न विद्मो न विजानीमः" ईश्वर हा आत्म्याप्रमाणें सर्वव्यापी व निराकार असल्या-मुळें त्याचें डोळचानें अथवा मनानें ग्रहण होत नाहीं. मन त्याचें आकलन करूं शकत नाहीं. वाणीलाहि त्याचें वर्णन करतां येत नाहीं. आम्हांला तें कांहीं कळत नाहीं. अशी केनोपनिषदामध्यें (१।३) त्याच्या विषयीं तत्त्ववेत्त्यांनीं अगतिकता व्यक्त केलेली आहे. मग मनानें अथवा सूक्ष्म बुद्धीनें त्याचें आकलन होतें; दृश्यते अथवा अनुद्रष्टव्यं तो दिसतो अथवा त्याला पाहावें असें कसें म्हणतां ? यावर उत्तर असें

कीं मन अथवा बुद्धि मालिन्यामुळें जरी प्रथम त्याला पाहूं शकली नाहीं तरी विवेका-सहित वैराग्याच्या वळानें व श्रवणमननांच्या दृढ अभ्यासानें सुसंस्कारसंपन्न झालेलें मन आणि बुद्धि हेच त्याचा साक्षात्कार करून देण्याला समर्थ होऊं शकतात. एखादा गवई वसंत, हिंडोल, जोगी, मालकंस, ललत, देसकार, भैरव इत्यादि अनेक राग उत्तम प्रकारें गात असतो. आपल्याला ते राग आवडत असतात. आपण मन लावून तल्लीनतेनें ऐकत असतों. अशा वेळीं जर आपणांला कोणीं विचारलें कीं, 'काय हो, गवईबुवा काय गात आहेत ?' त्या वेळीं जर आपण संगीतशास्त्राचा अभ्यास केला नसेल, संगीतशास्त्राचे कांहीं संस्कार जर आपल्या मनावर आणि बुद्धीवर नसतील तर आपण काय उत्तर देणार ? "न विद्मो न विजानीमः" (केन १।३) मन असून, बुद्धि असूनहि आम्हांला कांहीं कळत नाहीं. कळत असूनहि वळत नाहीं असेंच विचित्र उत्तर आपणांस द्यावें लागेल. पण पुढें आपण संगीतशास्त्राचा अभ्यास केल्यानंतर स्वरांचे आरोह-अवरोह, वर्ज्य अवर्ज्य, औडव, षाडव, अथवा संपूर्ण त्याचप्रमाणें वादी, संवादी, विवादी वगैरे गोष्टींचें ज्ञान व रागांचें स्वरूपहि आपल्या लक्षांत येतें. त्या वेळेला आपल्याला जें रागांचें ज्ञान होत असतें तो त्या रागांचा साक्षात्कार होय. तेंच मन व तीच बुद्धि पण संस्कारसंपन्न होण्याच्या पूर्वकालांत सारंगादि रागांच्या साक्षात्काराला असमर्थ असतें. तेंच मन आणि तीच बुद्धि पुढें अभ्यासानें संस्कार-संपन्न झाल्यानंतर रागसाक्षात्काराला समर्थ झाल्याचें आढळून येतें. याच न्यायानें परमात्मसाक्षात्काराला अथवा ईश्वरसाक्षात्काराला पूर्वीं असमर्थ असलेलें मन-अथवा बुद्धि सद्‌गुरुकृपेनें अज्ञानाचा निरास झाल्यानंतर परमात्मसाक्षात्काराला समर्थ बनतात व आपल्याला त्याच सद्‌गुरुकृपेनें व शास्त्राभ्यासानें सुसंस्कृत झालेल्या मनानें व बुद्धीनें ईश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होऊं शकतो. ईश्वर आणि आत्मा हे दोन्ही एकरूपच असल्यामुळें आत्मस्वरूपाचा साक्षात्कार व ईश्वरसाक्षात्कार हे दोन्ही एकच होत.

आत्मा आणि परमात्मा त्याचप्रमाणें परमात्मा आणि परमेश्वर हे सर्व एकच आहेत. "ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते" एकमेव, अद्वितीय आत्मतत्त्वच ब्रह्म, परमात्मा अथवा भगवान् इत्यादि शब्दांनीं प्रतिपादिलें जातें असें श्रीमद्-भागवतांत स्पष्टच म्हटलें आहे. (भागवत १।२।११) ईश्वर हा निर्गुण, निराकार असला तरी तो आत्मस्वरूप असल्यामुळें यथार्थ आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारांतच ईश्वराचाहि अपरोक्ष साक्षात्कार होतोच. "सर्वं खल्विदं ब्रह्म, ब्रह्मैवाहमस्मि, अहंब्रह्मैवास्मि, हंसः सोऽहं शिवोऽहम्" खरोखर सर्व कांहीं ब्रह्मच आहे. ब्रह्मच मी आहें. मी ब्रह्मच आहें. हंसः म्हणजे तो परमात्मा शुद्ध, स्वच्छ, निर्मळ अर्थात् सकल संसारधर्मरहित आहे. तोच मी आहें. मी शिवस्वरूप आहें. मी कल्याणस्वरूप आहें. मी मंगलमय आहें. अशी प्रतीति येणें हेंच ईश्वरस्वरूपाच्या साक्षात्काराचें लक्षण होय. "यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि" हे विश्वव्यापका परमेश्वरा !

तुझें जें परमकल्याणस्वरूप अर्थात् सर्वोत्कृष्ट, नितान्त आनन्दमय, मंगलमय रूप आहे तें मी तुझ्या कृपेनें आज स्पष्ट पहात आहें. तुझ्या त्या सर्वोत्कृष्ट कल्याणमय स्वरूपाचा मला साक्षात्कार होत आहे. असा हा ईश्वरसाक्षात्काराचा निर्वाळा. ईशोपनिषदांत आणि बृहदारण्यकोपनिषदांतहि स्पष्टच पहावयाला सांपडतो (ईशो. १६. बृहदा. ५।१५।१) तात्पर्य डोळसाला जसा सूर्याबद्दल संशय असूं शकत नाहीं त्याचप्रमाणें तत्त्ववेत्त्यांना ईश्वरसाक्षात्काराविषयीं तिळमात्रहि संशय वाटत नाहीं.

## ईश्वराच्या सगुण स्वरूपाचा साक्षात्कार

वर वर्णन केल्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यांना ईश्वरस्वरूपाचा अपरोक्ष मानस साक्षात्कार होत असला तरी कित्येक भक्तांच्या अन्तःकरणाला तेवढ्यानें समाधान होत नाहीं. त्यांना परमेश्वराचें प्रत्यक्ष डोळ्यानेंच दर्शन घडावें अशी तळमळ असते. "कन्या सासुराशीं जाये, मागें परतोनी पाहे । तैसे झालें माझ्या जीवा कधीं भेटसी केशवा" असा परमेश्वराच्या भेटीसाठीं त्यांचा जीव तळमळत असतो. त्यांना आपल्या वाणीनें परमेश्वराच्या परमपवित्र सगुण चरित्राचेंच वर्णन करावेंसें वाटतें. कोटि कोटि कन्दर्पांच्याहि रूपांचा व लावण्याचा दर्प हरण करणारें तें गोजिरें रूपच डोळ्यानें पहावेंसें वाटतें. त्याच्या सगुण स्वरूपाच्या त्या मंगलमय लीलाच कानांनीं ऐकाव्याशा वाटतात. बाळ ज्याप्रमाणे आईच्या गळ्याला कडकडून मिठी मारतो अथवा आईदेखील बाळाला वरचेवर इकडून तिकडे व तिकडून इकडें गळ्याशीं लावते, छातीशीं घट्ट धरते, मटामट मुके घेते, "आलिंगावें कीं दृढ चुंबावें" अशी तिच्या अन्तःकरणाची अवस्था होऊन जाते. तशीच ज्यांच्या अन्तःकरणाची अवस्था झाली आहे; "डोळे तुम्ही घ्यारे सुख, पहा विठोबाचें मुख । तुम्ही ऐकारे कान, माझ्या विठोबाचे गुण । मना तेथें धांव घेई रहा विठोबाचे पायीं ।" अशीच ज्यांच्या मनाची तळमळ असते; त्यांना परमेश्वराच्या निर्गुण स्वरूपाच्या साक्षात्कारानें समाधान होणार नाहीं. अशा स्थितींत परमेश्वराचा बहिरिंद्रियांनीं साक्षात्कार होऊं शकतो कीं नाहीं? व होत असल्यास तो कसा होतो याचा उलगडा होणें आवश्यक आहे. दयाघन सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या निर्गुण स्वरूपांतून सगुणस्वरूपाकडे जाण्यासाठीं व त्यांच्या त्या सर्वंकष नयनमनोहर स्वरूपाचा साक्षात्कार व्हावा म्हणून आम्हांलाहि "दत्त येवोनी उभा ठाकला, साष्टांग नमुनी प्रणिपात केला" अशी रोकडी प्रतीति यावयास हवी आहे. याच हेतूनें आपल्याला आतां श्रीदत्तात्रेय प्रभुंच्या निर्गुण स्वरूपांतून सगुण स्वरूपाकडें जावयाचें आहे. अव्यक्ताच्या साक्षात्कारांत अधिक क्लेश आहेत तर व्यक्त स्वरूपाच्या अर्थात् सगुण स्वरूपाच्या साक्षात्काराचा मार्ग सर्वांना सुलभ आहे. "यारे यारे लहान थोर, होका याती भलते नर" असा हा सगुणस्वरूपाच्या साक्षात्काराचा मार्ग सर्वांना मोकळा आहे. येथें कोणालाहि मज्जाव नाहीं. परमेश्वराचें

प्रत्यक्ष दर्शन झाल्याशिवाय ज्यांच्या मनाचें समाधान होऊं शकत नाहीं त्यांना परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शनहि घडलें. असा श्रेष्ठ श्रेणीच्या भक्तजनांचा अनुभव आहे. अनेक भक्तांनीं आपले अनुभव आपल्या शब्दांनींच नमूद करून ठेवलेले आहेत. उदाहरणार्थ, गेल्या शतकांत श्री रघुनाथ निरंजन हे एक मोठे श्रेष्ठ कोटीचे दत्त-साक्षात्कारी संत होऊन गेले. त्यांनी आपला अनुभव दिलेला पहाण्यासारखा आहे.

तव मस्तक होवोनि छिन्नभिन्न । अचेतन पडियेलों ।। निघोनि गेले सर्व प्राण । नाहीं कांहीं देहभान । कोठें पडिलो हा ठिकाण कांहीं एक स्मरेना ।। तों इतक्यांत श्रीदत्तात्रेय षड्भुजमूर्ति सावयव । ध्यान केले होतें बरवें । तयापरी प्रगटले ।। स्वकमंडलूचें पाणी । घालते झाले माझे वदनीं । मस्तकावरी कर ठेवोनी । वरदवाणी बोलती ।। सावध होई रे निरंजन । मज पाहे नेत्र उघडोन । तुज द्यावयासी दर्शन । दत्तात्रय मी आलों ।। मग म्यां नेत्रांतें उघडून । पहातां झालों सुहास्यवदन । षड्भुजमूर्ति सगुण । तेजायमान देखली ।। खडावा आणि वस्त्रें दोन्ही । त्यांसी संरक्षी जीवाहूनी । ते समजोनी माझे ठिकाणीं । जतन करी सर्वदा ।। ऐसें स्वामींचें उत्तर । ऐकोनिया बहुसुंदर । वृत्ति केली तदाकार । ज्ञान-दृष्टि करोनी ।। तंव पाहतां पाहणें हरपलें । वस्तूपण मजची आलें । देहभान सर्वहि गेलें । मुद्रा उन्मनी लागली ।। ऐसें होताची सत्वर । गुप्त झाले दिगंबर । मग मी येवूनी देहावर । नेत्र उघडोनी पाहिलें ।। अनेक जन्मींचें सुकृत । म्हणोनि भेटले श्रीगुरुदत्त । दर्शन झालेसें साक्षात । तया जगद्गुरूचें ।। झालीं होतीं दोन शकलें । कपाळ पहिल्यासारखें झालें । तीं जडोनियां गेलीं । जोडफळासारखी ।। कपाळ फुटल्याची खूण । कपाळीं शोभे सुलक्षण । केशापर्यंत भोवयाहून ।। असे व्रण सूक्ष्मत्वें ।। ...

अवधूतकुलमुकुटमणि भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें प्रत्यक्ष डोळ्यांनीं दर्शन घडण्याकरितां अहोरात्र तळमळणाऱ्या या भक्तानें शेवटीं एक वर्ष सात दिवसांची दत्तात्रेयांना मुदत देऊन त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं खडतर तप सुरू केलें. शेवटीं श्रीदत्तात्रेयप्रभु भेटले नाहींत म्हणून त्यांनीं श्रीदत्तात्रेय प्रभूंच्या चरणीं प्राणच अर्पण करण्याचा दृढ संकल्प केला व गिरनार पर्वतावर असलेल्या गुरुदेव श्रीदत्तात्रेय यांच्या पादुकांसमोर दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं आपलें मस्तकच फोडून घ्यावयास आरंभ केला. मस्तक रक्तबंबाळ झालें. कवटी फुटली ! अखेर रघुनाथ निरंजन आतां खास मरणार असा बांका प्रसंग निर्माण झाला तोंच करुणासागर भगवान् दत्तात्रेय त्या ठिकाणीं मूर्तरूपानें अवतरले व त्यांनीं रघुनाथ निरंजन यांना त्यांच्या अपेक्षेप्रमाणें प्रत्यक्ष दर्शन देऊन धन्य केलें. त्यांच्या मस्तकावर आपल्या कमंडलू-तील जल शिंपडून दुभंगलेली कवटी सांधली व सारे व्रण एका क्षणांत भरून काढले. व्रण भरून काढले तरी त्या व्रणांच्या खुणा शेवटपर्यंत त्यांच्या मस्तकावर सर्वांना पहावयास सांपडत होत्या. हा सर्व इतिहास त्यांच्याच शब्दांत वर आम्हीं दिला

आहे. परमेश्वराच्या साकारस्वरूपाचें दर्शन कसें घडूं शकतें हा एक मोठा विचाराचा प्रश्न आहे. ज्याला रूप नाहीं, रंग नाहीं, जो निरवयव आणि निराकार आहे त्याचें प्रत्यक्ष डोळ्यांनीं दर्शन घडणें अशक्य आहे. गोष्ट खरी आहे. परमेश्वर जरी स्वभावतः निर्गुण, निराकार आणि निर्विकार असला तरी त्याच्या ठिकाणीं असें कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे कीं, त्यामुळें तो निर्गुण असला तरी सगुण बनतो. निराकार असला तरी साकार बनतो. निरवयव असला तरी सावयव बनतो. भक्तांना अभीष्ट असलेलें नयनमनोहर रूप धारण करतो. प्रेमोद्रेकानें भक्तांना दर्शन देतो. भक्तांचीं कामें करतो. भक्तांसाठी खस्ता खातो. असा हा त्याचा अलौकिक भक्तवात्सल्याचा इतिहास सृष्टीच्या आदिकालापासून विद्यमान कालापर्यंत जागरूक आहे. निर्गुणाचा सगुण, निराकाराचा साकार, निरवयाचा सावयव, निर्विकाराचा सविकार, अपरिच्छिन्नाचा परिच्छिन्न, अपरिमिताचा परिमित, अखंडाचा सखंड व अनन्ताचा सान्त बनूनहि पुन्हां तो निर्गुण, निराकार, निर्विकार, निरवयव, अपरिच्छिन्न, अपरिमित, अखंड आणि अनन्त अशा आपल्या स्वाभाविक ज्योतिर्मय सच्चिदानन्द स्वरूपांत विराजतच आहे. असें कांहीं त्याचें सामर्थ्य विलक्षण आहे आणि म्हणूनच त्याला स्वस्वरूपापासून कधींहि भ्रष्ट न होणारा या अर्थानें अच्युत शब्द योजण्यांत येतो.

भक्तकामकल्पद्रुम भगवान् आपल्या भक्तवात्सल्यामुळें भक्तांच्या इच्छेप्रमाणें यद्यपि सगुण साकार बनत असले तरी ते स्वभावतः निर्गुण आणि निराकारच आहेत. भक्तवात्सल्यामुळें तो परमात्मा सखंडसा, सान्तसा, परिच्छिन्नसा, परिमितसा दिसला तरी तो तत्त्वतः अखंड, अनन्त, अपरिच्छिन्न आणि अपरिमितच आहे. ज्या अनिर्वचनीय सामर्थ्यामुळें परमेश्वराच्या ठिकाणीं हा विरोधाभास प्रतीतीला येतो तें त्याचें सामर्थ्य तरी काय आहे याचा आतां आपण थोडासा विचार करूं.

## ईश्वरसामर्थ्यविचार

भगवंताच्या अनिर्वचनीय सामर्थ्यालाच तत्त्ववेत्ते माया असें म्हणतात. माया ही एक परमेश्वराची अनिर्वचनीय शक्ति आहे. हिचें स्वरूप अमुक एका प्रकारचें आहे असें निश्चयानें कोणालाच सांगतां येत नाहीं. याच अभिप्रायानें तिला अनिर्वचनीय असें म्हटलें जातें. यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं, अहो ! माया आहे पण ती अनिर्वचनीय आहे या म्हणण्यांत काय अर्थ आहे ? माया म्हणून कांहीं असेल तर त्याचें निर्वचन करा. निर्वचन करतां येत नसेल तरी ती नाहीं म्हणून म्हणा. पण या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं. जगांत पुष्कळ असे पदार्थ आहेत कीं, ज्यांचें निर्वचन करतां येत नाहीं. त्यांचें निर्वचन करतां येत नाहीं म्हणून ते पदार्थच नाहींत असें मात्र म्हणतां येत नाहीं. सतार, सारंगी, दिलरुबा, बीन,

व्हायोलीन, बुलबुलतरंग, जलतरंग, घंटातरंग, तबला, मृदंग, पखवाज, झांज, टाळ, शंख, शिंग इत्यादि वाद्यांचे ध्वनि आपण ऐकतों. ते पृथक्पणें ओळखतोंहि पण त्या ध्वनींचें अथवा ध्वनींच्या पृथक्पणांचें निर्वचन करा असें जर कोणाला म्हटलें तर तें कोणालाहि करतां येणार नाहीं. ध्वनींचें अथवा त्यांच्या पृथक् पृथक् स्वरूपाचें अनुकरण करतां येतें पण निर्वचन मात्र करतां येत नाहीं. शास्त्रज्ञ ध्वनींचें व त्यांच्या पृथक्पणाचें आपाततः वर्णन करतात पण त्यांचें प्रत्यक्ष स्वरूप अथवा स्वरूपभेद हे कानानें ऐकूनच कळतात. आतां येथें ध्वनि किंवा ध्वनींचे भेद यांचें निर्वचन करतां येत नाहीं म्हणून ध्वनि किंवा ध्वनिभेद नाहींतच असें मात्र कोणाला म्हणतां येणार नाहीं. कारण ते अनुभवानें प्रतीतीला येत असतात. विविध पदार्थांच्या ठिकाणीं असलेलें माधुर्य अथवा त्या माधुर्याचा अन्योन्यभेद यांचें आपल्याला निर्वचन करतां येत नाहीं. निर्वचन करतां येत नाहीं म्हणून त्या पदार्थांच्या ठिकाणीं माधुर्यच नाहीं अथवा माधुर्यामाधुर्यामध्यें कांहीं भेदच नाहीं असें का आपल्याला म्हणतां येणार? छे. तसें म्हणतां येणार नाहीं. कारण माधुर्य आणि माधुर्यामाधुर्यांतील फरक हा आपण प्रत्यक्ष अनुभवूं शकतों. त्याचप्रमाणें परमेश्वराच्या मायेचें कोणालाहि निर्वचन करतां आलें नाहीं म्हणून माया कांहीं नाहींच असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण मायेचीं विविध कार्यें बालगोपालां-पासून मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांपर्यंत सर्वांच्याच अनुभवाला येत असतात. बड्या बड्या तार्किकांचीहि तर्कशक्ति जेथें कुंठित होते अशी ही विविध वैचित्र्यपूर्ण विश्वाची रचना व सृष्टींतील चाललेल्या घडामोडी, ज्यांना आपण नैसर्गिक घडामोडी म्हणतों त्या सर्व मायेचींच कार्यें होत. याच अभिप्रायानें तत्त्ववेत्त्यांनीं "अघटितघटनापटीयसी माया" अशा शब्दांनीं मायेचें वर्णन केलेलें आहे.

यावर कोणी असें विचारील कीं, नैसर्गिक घडामोडी या निसर्गानेंच होत असतात. तेथें मायेचा काय संबंध आहे? यावर उत्तर असें कीं, सूक्ष्मातिसूक्ष्म, मूल-गामी विवेचन करून या निसर्गाचें स्वरूप जर आपण पाहूं लागलों तर हा निसर्गहि आपल्याला परमात्मस्वरूपच मानावा लागेल व सृष्टींतील विलक्षण घडामोडी घडवून आणण्याची त्या निसर्गाच्या ठिकाणीं असलेली जी विलक्षण शक्ति आहे त्या शक्तीला माया असेंच नांव द्यावें लागेल! मायेचा खेळ मोठा अजब आहे.

मायेच्या स्वरूपाचा परिचय करून देण्यासाठीं व्यवहारांतील उदाहरण द्यावयाचेंच झालें तर तें विद्युत्-शक्तीचें देतां येईल. वीज ही एक शक्ति आहे. विजेची शक्ति असा जरी क्वचित् शब्दप्रयोग होत असला तरी विजेची शक्ति ही विजेपेक्षां निराळी दाखवितां येत नाहीं, म्हणून वीज आणि तिची शक्ति हे दोन्ही पदार्थ एकरूपच मानले जातात. त्याचप्रमाणें माया ही एक शक्ति आहे. तिचें स्वरूप दृग्गोचर होत नाहीं पण तिचीं कार्यें मात्र दृष्टीस पडत असतात. विजेला रंग नाहीं व रूपहि नाहीं म्हणून तिचें स्वरूप वर्णन करतां येत नाहीं. बरोबर हीच स्थिति

मायेची आहे. मायेलाहि रूप, रंग, आकृति वगैरे कांहीं नाहीं. ती स्वरूपतः दिसत नाहीं पण तिचीं कार्यें मात्र दिसत असतात. वीज जशी कार्यानुमेय आहे तशीच मायाहि पण कार्यानुमेयच आहे. कार्यांवरूनच त्यांचें अनुमान करतां येतें. विजेनें यंत्रें चालतात. विजेनें पंखे फिरतात. विजेनें दिवे लागतात. विजेनेंच रेडिओमध्यें ध्वनि उमटतात. किंबहुना दळण, कांडण, धुणेंपाणी इत्यादि जीवनोपयोगी कामें विजेच्याच जीवावर पार पडत असतात. असा हा विद्युच्छक्तीचा आपल्या जीवनाशीं निकट संबंध असूनहि आपण विद्युत्-शक्तीचें स्वरूप जाणूं शकत नाहीं. विजेला आपण हात लावून पहाल तर आपणांस धक्का बसेल. लागलेले दिवे, चाललेलीं यंत्रें, फिरत असलेले पंखे या सर्व कार्यांवरून विद्युत्चें अस्तित्व प्रतीतीला येतें; पण प्रत्यक्ष वीज मात्र आपणांला दिसत नाहीं. हीच अवस्था मायेची आहे. जोंपर्यंत मायेसंबंधानें आपण कांहीं विचार करीत नाहीं तोंपर्यंत तिचें थैमान चालूं असतें. सूक्ष्म दृष्टीनें आपण तिचें निरीक्षण करूं लागलों कीं तिचें स्वरूप मावळतें ! ती नाहीं म्हणावें तर आहेशी वाटते, कारण तिचीं कार्यें चाललेलीं दिसतात. आहे म्हणावें तर तिचें स्वरूप कळून येत नाहीं. याकरितां "न सती, ना सती, न सदसती लक्षणशून्या सा मायेत्युच्यते" असें तिचें सर्वसारोपनिषदामध्यें मोठें गमतीचें वर्णन केलेलें आहे. माया ही सत्य आहे असें म्हणावें तर स्वस्वरूपाच्या साक्षात्कारानें तिचा बाध होतो. बरें ती असत्य आहे असें म्हणावें तर विश्वाच्या घडामोडीचें निरन्तर कार्य चालू आहे. तें मायेवांचून दुसरें कोणीहि करूं शकणार नाहीं. बरें माया ही "सदसती" म्हणजे खरीहि आहे व खोटीहि आहे असें म्हणावें तर तें म्हणणें वदतो व्याघातासारखें असंबद्ध ठरतें ! म्हणून आचार्यांनीं "सदसद्भ्यां अनिर्वचनीया" अशाच शब्दांनी तिचें निर्वचन केलें आहे. "अघटित घटना पटीयसी माया" असा चौथा चरण असलेलें मायापंचक स्तोत्र जिज्ञासूंनीं आमच्या सुबोधस्तोत्रसंग्रह भाग पहिला या ग्रंथांत अवश्य पहावें.

## मायेचें स्वरूप

तात्पर्य माया ही एक परमेश्वराची मोठी विलक्षण अनिर्वचनीय शक्ति आहे. तिच्या स्वरूपाचा थांग पत्ता "आपण मायेचे अधिपति आहोंत" असें म्हणणाऱ्या मोठमोठ्या ब्रह्मादि देवांनाहि लागत नाहीं मग इतरांची कथा काय ?

परस्य विष्णोरीशस्य मायिनामपि मोहिनीम् ।
मायां वेदितुमिच्छामो भगवन्तो ब्रुवन्तु नः ।।

असा मायेसंबंधानें प्रश्न करतांना निमि राजानें "मायिनामपि मोहिनीम्" असें मायेला स्पष्टच विशेषण दिलेलें आहे, तें अत्यंत योग्यच आहे. ( भागवतांतील अकराव्या स्कंधांतला तिसरा अध्याय पहा.) उत्तर देतांना देखील अन्तरिक्षमुनींनी मायेच्या कार्याचाच फक्त निर्देश केलेला आहे. "एषा माया भगवतः सर्गस्थित्यन्तकारिणी"

परमेश्वराच्या शक्तीनें विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय होत असतात, त्याच शक्तीला माया असें म्हणतात. विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय हें मायेमुळेंच होत असल्यानें मायेला प्रकृति असें म्हटलेलें आहे. सृष्टि, स्थिति आणि प्रलय यांना कारणीभूत असलेले रजोगुण, सत्त्वगुण, आणि तमोगुण हे मायेच्या ठिकाणीं स्वतः सिद्धच आहेत. याच अभिप्रायानें माया अथवा प्रकृति ही त्रिगुणात्मक मानली जाते. या मायेचा जो अधिष्ठाता त्यास परमेश्वर अथवा परमात्मा असें म्हणतात. "मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्" असें श्वेताश्वतरोपनिषदांत (४।१०) स्पष्टच म्हटलेलें आहे. "माति अस्यां शक्त्यां प्रलये सर्वं जगत् अथ च सृष्टिकाले व्यक्तिं आयाति अस्याः इति माया" मा अधिक आया बरोबर माया. प्रलयकालीं परमेश्वराच्या ज्या शक्तीमध्ये हें सर्व जग सामावतें आणि सृष्टिकालीं ज्या शक्तीमधून तें आविर्भूत होतें त्या शक्तीलाच माया असें नांव दिलेलें आहे. या मायेवर परमेश्वराचा पूर्ण अधिकार आहे. म्हणूनच त्याला ईश्वर अथवा परमेश्वर असें म्हणतात. जीव मात्र पूर्णपणें या मायेच्या अधीन झालेले असतात. म्हणूनच संसारबंधनांत पशूप्रमाणें बद्ध होऊन अनेक प्रकारचे उच्च-नीच जन्म घेत राहतात.

परमेश्वराची ही माया परमेश्वराच्या अधीन होऊन रहात असली तरी ती परमेश्वरालाहि अवतार घ्यावयास भाग पाडते. असा तिचा विलक्षण प्रभाव आहे. मायेच्याच प्रभावानें परमात्मा निर्गुणाचा सगुण बनतो. निराकाराचा साकार बनतो; निरवयवाचा सावयव बनतो. निर्विकाराचा सविकार बनतो. अनन्ताचा सान्त बनतो व अपरिच्छिन्न आणि अपरिमित असूनहि परिच्छिन्न व परिमित बनतो! पण असें असूनहि तो परमात्मा स्वतःच्या सर्वनियन्तृत्वाला, अखण्डत्वाला व सामर्थ्याला तिळमात्रहि बाध येऊं देत नाहीं. जशी एखादी चतुर कान्ता आपल्या पतीच्या पूर्णपणें अधीन होऊन राहते व आपल्या पतिराजांनाहि पूर्णपणें अधीन करून ठेवते त्यांतलाच हा प्रकार आहे. ज्याप्रमाणें एखादा योगी आपल्या इच्छेवर पूर्ण नियंत्रण ठेवूनहि व्यवहारांत वागतांना तो आपल्या इच्छेप्रमाणेंच वागत असतो. त्यांतलाच हा प्रकार आहे. याच अभिप्रायानें मायेला परमेश्वराची इच्छाशक्ति असेंच कांहीं ठिकाणीं म्हटलेलें आहे.

ज्ञानशक्ति, इच्छाशक्ति, क्रियाशक्ति, ल्हादिनीशक्ति, प्रेमशक्ति, इत्यादि विविधरूपांनीं ईश्वराच्या मायाशक्तीचा आविष्कार होत असतो. या सर्वच शक्ति अलौकिक आणि दिव्य प्रभावशाली आहेत. या सर्व शक्ति परमेश्वराच्या स्वरूप-शक्तीशीं समरस झालेल्या असल्यामुळें परमेश्वराहून निराळें त्यांना पहातां येत नाहीं. हत्तीच्या पर्वतप्राय प्रचंड देहांतील चिच्छक्तीचा लोप झाल्याबरोबर तो त्याचा अवजड देह चिखलाच्या गोळ्याप्रमाणें अचेतन जड होऊन पडतो. चिच्छक्तीचा आविर्भाव झाल्याबरोबर तो जड देह रमणीय व कार्यक्षम बनतो. यावरून चेतन आणि त्याची चिच्छक्ति हे दोन्ही एकच आहेत असें म्हणावें लागतें. यावर कोणी

असें विचारील कीं हत्तीची प्राणशक्ति निघून गेली तरी हत्ती हा पुढें पडलेला दिसतच असतो. यावरून हत्ती निराळा व त्याची शक्ति निराळी असेंच नाहीं का सिद्ध होत? पण ही शंका निरर्थक आहे. हत्तीची जीवनज्योत मावळल्याबरोबर हत्ती गेला असाच व्यवहार होत असतो. हत्तीच्या मृत देहाला कोणी हत्ती म्हणत नाहीं. म्हटलेंच तर तें म्हणणें गौण अर्थाचें असतें. तात्पर्य हत्ती आणि हत्तीची शक्ति हे दोन्ही जसे एकच आहेत त्याचप्रमाणें चेतन आणि चिच्छक्ति अथवा परमात्मा आणि त्याची माया हे एकच होत. परमेश्वराशीं अभिन्नरूपानें संलग्न असणारी त्याची ही अनिर्वचनीय मायाशक्तीच त्याला विविध रूपांनीं अवतीर्ण होण्यास उपयुक्त होते. "इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते" परमात्मा हा आपल्या विविध मायाशक्तींनीच विविधरूप बनतो. या मायाशक्तीनेच तो लोककल्याणाकरितां विविध अवतार धारण करतो. चौरंगावर तांदूळ, तांदळावर कलश व कलशावर नारळ अशा रीतीनें आधार-आधेय भावानें अथवा धर्मधर्मिभावानें रहात नाहींत. अशा स्थितींत वरील शंकेला येथें अवसरच मिळूं शकत नाहीं. परमात्मतत्त्व हें मायेच्या प्रभावानें कांहीं काळ निर्गुणाचें सगुण बनलें. निराकाराचें साकार बनलें अथवा निरवयवाचें सावयव बनलें तरी त्याचें त्याहि अवस्थेंत सच्चिदानन्दरूपत्व हें अबाधितच राहतें. कमल मिटलें अथवा विकसलें तरी त्याचें कमलत्व अबाधितच असतें. तूप अळलें अथवा वितळलें तरी तें तूपच असतें. त्याचप्रमाणें परमात्मा हा अमूर्तस्वरूपांतून मूर्त-स्वरूपांत आला. तो निर्गुणाचा सगुण अथवा निराकाराचा साकार बनला तरी तो परमात्माच असतो. त्याच्या परमात्मस्वरूपाला अथवा सच्चिदानन्दरूपाला तिळ-मात्रहि बाध येत नाही.

ज्या वस्तूचा जो मूळ स्वभाव असतो तो कांहीं निमित्तानें बदलल्यासारखा दिसला तरी निमित्ताचें निरसन झाल्याबरोबर ती वस्तु पुन्हां आपल्या मूळ स्वभावा-लाच प्राप्त होत असते. उष्णतेच्या संपर्कानें पाणी उष्ण झालें तरी तो संपर्क नाहींसा होतांच पुन्हां तें पूर्ववत् शीतल होतच असतें. स्वभावतःच द्रवीभूत असलेलें जल अति शैत्याच्या संपर्कानें गोठून दगडासारखें कठीण बनलें तरी अतिशैत्याचा संपर्क संपतांच तें पुन्हा पूर्ववत् द्रवीभावालाच प्राप्त होत असतें. तें पुन्हां पातळच बनतें. हें सर्वमान्य आहे. त्याचप्रमाणें स्वभावतः निर्गुण व निराकार असलेला परमात्मा मायारूपी उपा-धीच्या निमित्तानें सगुण व साकार बनतो. त्याचा तो मायारूपी उपाधि तिरोहित झाल्याबरोबर अर्थात् तो मावळल्याबरोबर परमात्मा हा पुन्हां आपल्या पूर्वीच्या निर्गुण निराकार स्वरूपालाच प्राप्त होतो. पाणी द्रवरूप असो अथवा घन-स्वरूप असो दोन्ही अवस्थांत त्याचा स्वाभाविक असलेला शीतस्पर्श हा नाहीसा होत नाहीं, त्याचप्रमाणें परमात्मा हा सगुण असो अथवा निर्गुण असो. या दोन्ही अवस्थांत त्याची स्वाभाविक असलेली सच्चिदानन्दरूपता ही प्रतीतीला येतच असते. तात्पर्य परमात्मा हा निर्गुण आणि निराकार असल्यामुळें त्याचें प्रत्यक्ष डोळ्यानें दर्शन घडणें

अशक्य असलें तरी तो आपल्या अनिर्वचनीय मायाशक्तीचा अवलंब करून सगुण व साकार बनून अवतरतो व आपल्या भक्तजनांना प्रत्यक्ष दर्शन देतो, असा हा त्याचा स्वभाव आहे. सगुणस्वरूपानें साकार होऊन भक्तांना दर्शन देणें हाच त्याच्या सगुण स्वरूपाचा बाह्य साक्षात्कार होय.

देव भक्तांच्यासाठीं अवतरतो. तो भक्तांना भेटतो. दर्शन देतो. तो भक्तांना संकटांतून सोडवतो. भक्तांची सेवाचाकरी करतो. भक्तांच्या अंकित होऊन राहतो. ब्रह्मसायुज्य देऊन भक्तांचें जीवन धन्य करतो. असा हा देवाचा स्वभावच आहे.

## परमेश्वराचे विविध अवतार

अव् उपसर्गपूर्वक तृ धातूपासून अवतार शब्द निष्पन्न झालेला आहे. 'अवतरति इति अवतारः' अशी अवतार शब्दाची व्युत्पत्ति आहे. सज्जनांचें संरक्षण, दुर्जनांचें निर्दलन, स्वधर्माची संस्थापना, विश्वाचें कल्याण आणि भक्तजनांच्या मनोरथांची परिपूर्ति यांपैकी कोणत्याहि हेतूनें भगवान् श्रीहरि ज्या स्वरूपानें भूमंडलावर प्रकट होतात, त्या स्वरूपाला अवतार असें म्हणतात. विश्वाच्या भरण-पोषणाचें व संरक्षणाचें कार्य विष्णूनें स्वतःकडेच घेतलेलें असल्यामुळें प्रायः भगवान् श्री विष्णु यांचेच भूमंडलावर अधिक अवतार झालेले दृष्टीस पडतात. क्वचित् ब्रह्मदेव आणि भगवान् शंकर यांचेहि या भूमंडलावर अवतार झाल्याचें वर्णन पुराणांत व इतिहासांत पहावयास सांपडतें.

## अवतारांचे अनेक प्रकार

अवतारांचे अनेक प्रकार आहेत. १–पूर्णावतार. २–विभवावतार. ३–कलावतार. ४–अंशांशावतार. ५–आवेशावतार. ६–अर्चावतार ७–हार्दावतार इत्यादि अनेक शब्दांनी या अवतारांचा निर्देश केला जातो. परमेश्वराचे अवतार असंख्य झाले आहेत. आजहि आहेत व पुढेंहि होतील. त्यांची परिगणना कोण करूं शकेल ?

अवताराह्यसंख्येया हरेः सत्त्वनिधेर्द्विजाः ।
यथाऽविदासिनः कुल्याः सरसः स्युः सहस्रशः ।। भागवत १।३।२६

ज्याचें पाणी कधींहि आटत नाहीं अशा एखाद्या तुडुंब भरलेल्या विशाल सरोवरांतून ज्याप्रमाणें अनेक प्रवाह प्रकट होतात त्याचप्रमाणें सच्चिदानन्दघन दयासागर परिपूर्ण परमात्मा देखील विश्वाच्या दुःखाचें निर्हरण करण्याकरितां व जिज्ञासु भक्तांचें जीवन ज्ञानोपदेशानें सुसमृद्ध व आनन्दमय करण्याकरितां वेळोवेळीं अनेक रूपांनीं प्रकट होत असतो. या त्याच्या विविध रूपांना अवतार असेंच म्हटलें जातें. परमात्मा हा स्वभावतः निर्विकार, शुद्ध सच्चिदानन्दरूप व स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहे. तो आकाशापेक्षांहि अतिविशाल असून नितान्त शान्त आहे; परंतु अशा स्थितींतहि त्याची अनिर्वचनीय मायाशक्ति त्याच्या स्वरूपांत समरस होऊन राहिलेली

आहे. तिच्या या सामरस्यामुळें परमात्मतत्त्वाच्या अद्वैतस्वरूपाला तिळमात्रहि बाध येत नाहीं. या निराबाध अद्वैत अवस्थेंत असलेल्या आत्म्यालाच तत्त्ववेत्ते आदिगुरु ही संज्ञा देतात. पुढें अभिव्यक्त होणाऱ्या सृष्टींतील ज्ञानपरंपरेचें हेंच मूळ उगमस्थान असल्यामुळें याला आदिगुरु म्हणणें हें योग्यच आहे. सृष्टीमध्यें जन्माला येणाऱ्या सर्व नाथांचाहि तो नाथ असल्यामुळें त्याला कोणी आदिनाथ असेंहि म्हणतात. सृष्टीमध्यें जन्माला येणारा नरसमुदाय अर्थात् प्राणिसमूह हें त्याचें सृष्टिकालीन वसतिस्थान असल्यामुळें आदिनारायण याहि नांवानें तो ओळखला जातो. आपआपल्या अभिरुचीप्रमाणें आदिविष्णु, आदिशंकर अशींहि नांवें तत्त्ववेत्त्याकडून त्याला दिलीं जातात. याच तत्त्वाला कांहीं वेदान्ती महाकारण असें म्हणतात.

प्रशान्त आणि नित्यज्ञानस्वरूप असलेल्या याच अद्वैत तत्त्वामध्यें प्रसुप्त असलेली त्याची अनिर्वचनीय मायाशक्ति भावी काळांत जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या अदृष्टामुळें जेव्हां जागृत होते, तेव्हां तिच्या ठिकाणीं तिच्या स्वाभाविक विमर्श शक्तीचें स्फुरण होतें. त्या स्फुरणाच्या आघातानें, स्वभावतःच प्रशान्त व नित्य प्रकाशस्वरूप असलेल्या चिन्मय परमात्मतत्त्वाच्या ठिकाणीं संकल्पाचा तरंग उमटतो. तोच उपनिषदामध्यें "बहुस्यां प्रजायेय" (छांदोग्य ६।२।३) या वाक्यानें सांगितला आहे.

संकल्पस्फुरणाच्या पूर्वकालांतील आत्मतत्त्व हें अत्यंत विशुद्ध आणि सर्वस्वीं निर्विकार असल्यामुळें त्याला "शिव" असें म्हटलें जातें. याच शिवाची तत्स्वरूप असलेली जी मायाशक्ति तिला शिवा अथवा शिवानी असें म्हणतात. हिलाच कोणी केवल या शक्ति नांवानेंहि संबोधितात. श्री. शंकराचार्यांनी सौंदर्यलहरीस्तोत्रांत महामाया आणि परब्रह्ममहिषी असें म्हटलेलें आहे. "तुरीया कापि त्वं दुरधिगमनिःसीम महिमा, महामायाविश्वं भ्रमयसि परब्रह्ममहिषी।" (श्लोक ९२ सौंदर्यलहरी) कोणत्याहि संकल्पाचें स्फुरण होण्यापूर्वीं आलोचनाची आवश्यकता असतेच. याच अभिप्रायानें "बहुस्यां" या संकल्पाच्या पूर्वीं "तदैक्षत" या वाक्यानें प्रकाशस्वरूप परब्रह्माचें आलोचन निर्दिष्ट केलें आहे. हेंच तेजोमय प्रकाशतत्त्व आपल्या अनिर्वचनीय विमर्शशक्तिस्वरूप मायेसह पहिल्याप्रथम भक्तजनांच्या अनुग्रहासाठीं "अर्धनारीश्वर' रूपानें आविर्भूत होतें. हाच परमात्म्याचा पहिला पूर्णावतार होय.

अभिव्यक्त होणाऱ्या सृष्टीच्या सुव्यवस्थेसाठीं आवश्यक असलेल्या कृत्यांची पांच संख्येनें विभागणी केली गेली आहे.

१ उपादान, २ परिपालन, ३ संहरण, ४ तिरोधान म्हणजे विलीनीकरण आणि ५ अनुग्रह म्हणजे बीजभूतसंस्कारानुरूप सुखदुःखादि भोगद्वारां व अविद्यानिरसनद्वारां प्रत्येक जीवाला कर्मपाशांतून मुक्त करणें व नित्य निरतिशय आनंदाचा लाभ करून देऊन त्याला कृतकृत्य करणें. हींच तीं पंचकृत्यें होत. या पंचकृत्यांचे पांच

अधिकारी आहेत. त्यांना अनुक्रमें ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव अशीं नांवें दिलेलीं आढळतात. सर्व विश्वच जेथें परब्रह्मस्वरूप आहे तेथें हे पांच अधिकारी परब्रह्मस्वरूपच आहेत, अथवा परब्रह्मच या पांच अधिकाऱ्यांच्या रूपानें प्रथम नटलें असें म्हटलें तर सिद्धान्ताला तें तिळमात्रहि बाधक होऊं शकणार नाहीं. हे पांच अधिकारी म्हणजे सर्व सृष्टिप्रपंचाचे पंचच समजा. या पाचांवरही ज्यांचा पूर्ण अधिकार आहे ते सरपंच म्हणजे परमशिवस्वरूप परब्रह्म परमात्मतत्त्वच होय.

सर्जन म्हणजे चराचर सृष्टि निर्माण करणें. परिपालन म्हणजे ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या चराचर सृष्टीचें प्रतिपालन करणें व पोषण करणें. संहरण म्हणजे सृष्टीचा सुव्यवस्थित रीतीनें संहार अथवा लय करणें. तिरोधान म्हणजे प्रलयकालीं सर्व कार्यद्रव्यांचा व शरीरांचा नाश झाल्यानंतर सर्व जीवांना स्वस्वरूपांत विलीन करून घेणें. या अवस्थेंत जीवांची पृथक् नामरूपानें प्रतीति येत नाहीं. केवळ बीजभूत संस्कार मात्र या अवस्थेंत शिल्लक असतात. तेहि अज्ञातस्वरूपांतच असतात. सृष्टिकालीं जन्माला येणाऱ्या जीवांच्या स्थूलसूक्ष्मशरीरांना हेच बीजभूत संस्कार कारणीभूत असल्यामुळें या संस्कारांना कारणशरीर असेंच म्हटलें जातें. हीं सर्व कारणशरीरें ज्या तत्त्वांत विलीन होऊन राहतात त्या तत्त्वाला तिरोधानकर्ता ईश्वर असें म्हटलें जातें. याच ईश्वरतत्त्वापासून सृष्टीच्या आरंभकालीं प्रकृतितत्त्व, महत्तत्त्व, अहंकारतत्त्व आणि त्याचप्रमाणें पंचतन्मात्रा, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व मन यांची उत्पत्ति होते. ईश्वरतत्त्वांत तिरोहित असलेलीं हीं सर्व तत्त्वें सदाशिवतत्त्वाच्या अनुग्रहानें अभिव्यक्त केलीं जातात, म्हणून या तत्त्वांच्या उत्पत्तीला तत्त्ववेत्ते अभिव्यक्ति असेंहि नांव देतात. अनुग्रहाचें स्वरूप वर व्यक्त केलेंच आहे. कांहीं तत्त्ववेत्ते या सदाशिवतत्त्वालाच अव्यक्त अथवा अव्याकृत असें नांव देतात, तर ईश्वरतत्त्वाला "व्यक्ताव्यक्त" अथवा "व्याकृताव्याकृत" असेंहि म्हणतात. या सर्व संज्ञा तत्त्ववेत्त्यांच्या आपआपल्या विचारसरणीवर अवलंबून आहेत. कांहीं तत्त्ववेत्ते तर सदाशिवतत्त्व आणि ईश्वरतत्त्व या दोन्ही तत्त्वांना एकच मानून त्यालाच अव्यक्त ईश्वर अथवा मायोपहित शबलब्रह्म असें म्हणतात.

शबल शब्दाचा अर्थ मिश्रित अथवा संयुक्त असा आहे. मायाविशिष्ट ब्रह्मालाच ईश्वर, परमेश्वर अथवा परमात्मा असें म्हणतात. हाच परमात्मा कार्यपरत्वें विविध रूपांनी अवतरत असतो. यालाच कोणी आदिविष्णु अथवा आदिनारायण असें म्हणतात. आदिविष्णूच्या स्वरूपाचें वर्णन करतांना श्रीशंकराचार्यांनीं श्रीहरीच्या विराट् पण सगुण साकार स्वरूपाचें विष्णुपादादिकेशान्तवर्णनस्तोत्रांत नखशिखान्त वर्णन करून शेवटीं

"आपादादाचशीर्षाद्वपुरिदमनघं वैष्णवं यः स्वचित्ते,
धत्ते नित्यं निरस्ताऽखिलकलिकलुषे सन्तताऽन्तः प्रमोदः ।"

जो कोणी परमेश्वराच्या या परमपवित्र असलेल्या विशाल विराट् स्वरूपाचें चरणकमलापासून तों मुखकमलापर्यंत शुद्धान्तःकरणानें निरन्तर चिंतन करील त्याचें जीवन आनंदानें परिपूर्ण होईल असें म्हटलेलें आहे. आदिनारायणाच्या या रमणीय, विशाल स्वरूपाचें सांगोपांग वर्णन आमच्या सुबोधस्तोत्रसंग्रह भाग २ रा या ग्रंथांत अवश्य पहावें. योगिजनांच्या अन्तःकरणाला ध्यानानें समाधान देण्यासाठींच प्राधान्यानें हा अवतार झालेला आहे. स्वरूपावरून व कार्यावरून हा परमेश्वराचा पूर्णावतारच होय असें म्हणावें लागतें. वस्तुतः परमेश्वराचा कोणताहि अवतार अपूर्णस्वरूपाचा मानतांच येत नाहीं. कारण तो सदासर्वकाळ पूर्णस्वरूपच आहे. परमेश्वराची पूर्णता अथवा अपूर्णता ही पहाणाऱ्याच्या दृक्शक्तीवर अवलंबून आहे. तत्त्ववेत्याच्या दृष्टीनें परमेश्वराची परिपूर्णता सर्वत्र ओतप्रोत भरलेली दिसते.

"पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते"

हा याज्ञवल्क्यांच्या पूर्णदृष्टीचा पूर्णत्वाचा सिद्धान्त प्रसिद्धच आहे (बृहदारण्यक ५।१।१) अदः म्हणजे अतिदूर असलेले सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें, इत्यादि सर्व पदार्थ पूर्ण म्हणजे परमात्मस्वरूप आहेत, तर इदं म्हणजे संनिकृष्ट असलेले सागर, पर्वत, वृक्ष, लता अथवा देव्हाऱ्यांतील देव—हेहि पूर्णस्वरूपच आहेत. पूर्णांतून संकुचित दृष्टीनें देवदेवता अथवा इतर पदार्थ नामरूपांनीं निराळे काढले तरी तेहि तत्त्वतः पूर्णरूपच आहेत. जसा अग्नीचा स्फुलिंग अग्नीच असतो अथवा साखरेचा कणहि साखरच असतो, त्याचप्रमाणें परमेश्वराचा कोणताहि अवतार हा परमेश्वरस्वरूपच आहे. भिन्न भिन्न नामरूपांनीं अपूर्णरूपानें प्रतीतीला येणाऱ्या देवदेवतांचा अथवा विविध पदार्थांचा बाध झाल्यानंतर अधिष्ठानरूपानें जें शिल्लक राहतें तेंहि पूर्णच म्हणजे परमात्मतत्त्वच शिल्लक राहतें.

सोन्याचा कोणताहि अलंकार तत्त्वतः सोनेंच असला तरी आंगठी, कंठा इत्यादि विभिन्न नामांनीं त्यांचा व्यवहार होतो, व त्यांचें कार्यहि निरनिराळें असल्याचें दृष्टीस पडतें. त्याचप्रमाणें परमेश्वराचा कोणताहि अवतार तत्त्वतः पूर्ण परमात्मस्वरूपच असला तरी ब्रह्मा, विष्णु, महेश, गणेश, दत्तात्रेय, राम, कृष्ण इत्यादि विभिन्न नामांनीं त्यांचा उल्लेख होतो, व त्यांचीं कार्येंहि भिन्न भिन्न स्वरूपाचीं असलेलीं दृष्टीस पडतात. तात्पर्य एकाच परमात्मतत्त्वाचे हे सर्व अवतार होत यांत तिळमात्रहि शंका नाहीं.

## चतुर्व्यूहावतार

गोलोकांतील भगवान् श्रीकृष्ण, वैकुंठांतील भगवान् श्रीविष्णु, सत्यलोकांतील भगवान् ब्रह्मदेव आणि कैलासलोकांतील भगवान् शंकर हे आदिनारायणाचे विभवावतार मानले जातात. ते आपआपल्या लोकामध्यें स्वतःच्या पूर्णवैभवानें विराजत आहेत. आदिविष्णूनेंच विश्वाच्या उपकाराकरितां वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि

अनिरुद्ध अशा चार रूपांनीं स्वतःला प्रकट केलेलें आहे. या रूपांना चतुर्व्यूहावतार असें म्हणतात. व्यूह शब्दाचा अर्थ रचना, आकृति, मूर्ति असा आहे. चतुर्व्यूह–अवतारांतील प्रत्येक अवतार वाह्य स्वरूपांत चतुर्भुज व शंख, चक्र, गदा आणि पद्म धारण केलेला असाच आहे. हातांतील आयुधांचा क्रम आणि वर्ण बदलतो.

"वासुदेवः शङ्खचक्र-गदा-पद्म-धरः सितः" वासुदेवाच्या वरच्या उजव्या हातांत शंख आणि डाव्या हातांत चक्र त्याचप्रमाणें खालच्या उजव्या हातांत गदा आणि डाव्या हातांत पद्म अशीं आयुधें असून वासुदेवाचा वर्ण सित म्हणजे शुभ्र-अथवा पांढरा असा आहे.

"सङ्कर्षणः सितो धत्ते शङ्खपद्मारिसद्गदाः" संकर्षणाचाहि वर्ण सित म्हणजे शुभ्र असून त्याच्या वरच्या उजव्या हातांत शंख आहे, आणि वरच्या डाव्या हातांत पद्म म्हणजे कमल आहे. तसेंच खालच्या उजव्या हातांत गदा असून खालच्या डाव्या हातांत चक्र आहे. संकर्षणानें प्रसंगविशेषीं नांगर आणि मुसळ हींहि आयुधें धारण केलेलीं आहेत.

"प्रद्युम्नः कनकाभः स्याच्छङ्खाब्जारि-गदाधरः" – प्रद्युम्नाची अंगकांति पीतवर्ण अर्थात् सुवर्णासारखी देदीप्यमान असून त्याच्या वरच्या उजव्या हातांत शंख आणि डाव्या हातांत गदा आहे. त्याचप्रमाणें खालच्या उजव्या हातांत चक्र असून खालच्या डाव्या हातांत पद्म आहे.

"अनिरुद्धो नीलवर्णः शङ्ख-पद्म-गदारि-भृत्"–अनिरुद्धाचा वर्ण शनीच्या खड्यासारखा निळा आहे. त्याच्या वरच्या उजव्या हातांत गदा आहे. वरच्या डाव्या हातांत शंख आहे. त्याचप्रमाणें खालच्या उजव्या हातांत चक्र असून खालच्याच डाव्या हातांत पद्म आहे.

भगवान् वासुदेव हे स्वतःसिद्ध षडैश्वर्यसंपन्न असून त्यांची गणना विभवावतारामध्यें केली जाते. समग्र ऐश्वर्य, समग्र धर्म, समग्र यश, समग्र श्री, समग्र ज्ञान आणि समग्र वैराग्य या सहाहि गुणांना भग असें म्हणतात. या ऐश्वर्यादि षड्गुणांनीं संपन्न असलेल्या अवताराला भगवान् असें म्हणतात. चतुर्व्यूहामध्यें वासुदेव ही प्रधान देवता असून बाकीच्या तीन देवता वासुदेवाचेच कलावतार म्हणून मानल्या जातात. ·ासुदेवकलाऽनन्तः।" अनन्त म्हणजे संकर्षण, शेष हा वासुदेवाचाच कलावतार आहे असें स्पष्टच म्हटलेलें आहे. सूर्य जसा रश्मि म्हणजे हजारों किरणांनी युक्त आहे त्याचप्रमाणें भगवान् वासुदेव सहस्रशक्तिसंपन्न आहेत. त्यांच्या शक्ति म्हणजे कला या जरी अनन्त असल्या तरी या जगांत सर्व जीवांचा उद्धार करण्यासाठीं केवळ ज्ञानशक्ति, इच्छाशक्ति, क्रियाशक्ति, प्रेमशक्ति, दयाशक्ति, निरोधशक्ति, ऐश्वर्यशक्ति, बल, वीर्य, आणि तेज इत्यादि सोळा कलांनींच काम भागतें; म्हणून विश्वाच्या कल्याणासाठीं भगवान् सोळा कलांनींच अवतीर्ण होतात. याच अभिप्रायानें परमेश्वराच्या सोळाच कला मानल्या जातात व "षोडशकलो वै पुरुषः"–पुरुष म्हणजे

परमात्मा हा सोळा कलांनीं पूर्ण आहे असा व्यवहार होत असतो. हा षोडशकलांनीं पूर्ण असलेला परमात्माच वासुदेव होय. येथें सर्व शक्तींचा योग्य समयीं कार्यानुरूप आविष्कार होत असतो.

संकर्षणावतारामध्यें प्राधान्यानें ज्ञानशक्ति आणि बलशक्ति यांचा विकास पहावयास सांपडतो. संकर्षण ही देवता समस्त जीवांचें अधिष्ठान असल्याचेंहि तत्त्ववेत्त्यांनीं सांगितलें आहे. द्रष्टा आणि दृश्य, भोक्ता आणि भोग्य अथवा समस्त जीवसृष्टि आणि जडसृष्टि या सर्वांचें संहारकालीं अव्यक्त तत्त्वाकडे संकर्षण करण्याचें म्हणजे खेंचण्याचें अथवा एकीकरण करण्याचें कार्य या देवतेचें आहे म्हणून या देवतेला संकर्षण असें म्हणतात. "अहमित्यभिमानलक्षणम्" असेंहि एक विशेषण या देवाला दिलेलें आहे. समष्टचहंकार हा आदरणीय असला तरी व्यष्टचहंकार हा अत्यंत घातक आहे. याकरितां अहंकाराला अथवा गर्वाला जिंकण्यासाठीं संकर्षणाची उपासना करावी असें सात्वततन्त्रवेत्त्यांचें सांगणें आहे. अभिमानशुद्धीसाठीं भक्तजन संकर्षणाचें ध्यान करीत असतात. संकर्षणाला उद्देशून "भगवतस्तामसी कला" असेंहि म्हटलेलें आहे. या ठिकाणीं तामसी शब्दाचा अर्थ तमोगुणमयी असा कोणीं समजूं नये. "बभ्रार सत्त्वं संशुद्धं" भक्तजनांवर अनुग्रह करण्याकरितांच शुद्ध सत्त्वगुणाचा अवलंब करून भगवंतानें संकर्षणाचा अवतार धारण केला आहे असें तत्त्ववेत्ते सांगत आहेत, ही गोष्ट लक्षांत ठेवावी. प्रकृतस्थलीं तामसी या शब्दाचा अर्थ संहरणशक्तिशाली असाच समजावा. या संकर्षणानेंच शेषाचें रूप धारण करून आपल्या मस्तकावर समस्त ब्रह्मांड धारण केलेलें आहे. तें त्याच्या मस्तकावर एका मोहरीसारखें दिसत आहे; असें भागवतांत वर्णन केलेलें आहे. यावरून शेषाचें स्वरूप व संकर्षणाचें सामर्थ्य लक्षांत घ्यावें. प्रलयकालचा रुद्रावतार हा संकर्षणच होय. "सञ्जिहीर्षोरिदं काले यत्र रुद्रसमुद्भवः" असें या संकर्षणाचें वर्णन केलेलें आहे.

प्रद्युम्न हाहि एक वासुदेवाचाच कलावतार आहे. या अवतारांत ऐश्वर्य आणि वीर्य म्हणजे पराक्रम या शक्तींचा आविष्कार होत असतो. ऐश्वर्यासाठीं व यशस्वी पराक्रमासाठीं साधकानें प्रद्युम्नाची उपासना करावी. "प्रकृष्टं द्युम्नं बलं यस्य सः प्रद्युम्नः" अशी प्रद्युम्न शब्दाची व्याख्या आहे. प्रद्युम्नाचें बल प्रकृष्ट असल्यामुळें तो महापराक्रमी आहे. प्रद्युम्नानेंच कामदेवाचें रूप धारण करून ब्रह्मदेवाला सृष्टीच्या निर्मितीमध्यें साहाय्य केलें आहे. शंकरानें आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें कामदेवाचा देह भस्म केल्यानंतर प्रद्युम्नानें पुन्हा श्रीकृष्णापासून रुक्मिणीच्या उदरीं जन्म घेतला. तेथेंहि प्रद्युम्न याच नांवानें प्रसिद्धीला येऊन शंबरासुरादि मायावी दुष्ट दैत्यांचा वध करून आपल्या अतुल पराक्रमानें श्रीकृष्णाला भूभारहरणाच्या कामीं फार मोठें साहाय्य केलें आहे.

अनिरुद्ध हाहि एक परमेश्वराच्या चतुर्व्यूहावतारांतील एक अवतार होय. अनिरुद्धावतारामध्येंहि शक्ति आणि तेज यांचा विकास पहावयास सांपडतो.

"न निरुध्यते इति अनिरुद्धः"– समरभूमीवर कोणीहि त्याचा निरोध करूं शकत नसे म्हणून या अवताराला अनिरुद्ध असें म्हणतात. बाणासुराची जी कन्या उषा तिच्याशीं विवाह करून युद्धामध्यें बाणासुराला परास्त करणारा प्रद्युम्नपुत्र जो अनिरुद्ध तो याच अनिरुद्धाचा अवतार होय. अनिरुद्धावतारामध्यें सर्जनशक्तीचाहि आविष्कार झालेला असल्यामुळें या अनिरुद्धानेंच ब्रह्मदेवाचें रूप धारण केलें व सर्व स्थूल सृष्टीची निर्मिति केली असेंहि तत्त्ववेत्त्यांचें सांगणें आहे.

'अनिरुद्धः स्वयं ब्रह्मा प्रद्युम्नः काम एव च
बलदेवः स्वयं शेषः कृष्णश्च प्रकृतेः परः ॥' (ब्रह्मवैवर्तपुराण)

अव्यक्त तत्त्वाच्याहि पलीकडे असलेले आदिनारायण हेच भगवान् श्रीकृष्ण या रूपानें अवतरलेले आहेत. ते चतुर्व्यूहावतारांतील साक्षात् वासुदेवच होत. म्हणूनच त्यांना "प्रकृतेः परः" अव्यक्ताच्याहि पलीकडचें मायाशक्तीचें अधिष्ठान असें म्हटलेलें आहे. चतुर्व्यूहांतील अनिरुद्ध वासुदेव आणि संकर्षण हेच पुढे ब्रह्मदेव, विष्णु आणि महेश्वर या रूपानें अवतरले व त्यांनीं या साऱ्या चराचर विश्वाला व्यक्तस्वरूपांत आणलें, व त्याची व्यवस्था ठेविली आहे. याच व्यवस्थेचें एक अंग म्हणून नित्य नैमित्तिक प्रलयाच्या रूपानें भगवान् शंकरहि उपसंहाराचें काम करीतच असतात. हेच तिन्ही देव पुढें श्रीअनसूया मातेच्या उदरीं तिन्ही गुणांनीं व अंशतः तिन्ही रूपांनीं सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय या रूपानें अवतरले म्हणूनच या अवताराला "त्रिगुणात्मक त्रैमूर्ति दत्त हा जाणा" असें म्हटलेलें आहे. ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, निग्रहशक्ति, अनुग्रहशक्ति, प्रेमशक्ति, दयाशक्ति, योगशक्ति, त्यागशक्ति व मायाशक्ति इत्यादि विविध शक्तींचा पूर्ण आविष्कार या अवतारांत प्रकट होत असल्यामुळें त्रिमूर्तींचा श्रीदत्तात्रेयांच्या रूपानें झालेला हा अवतार परमेश्वराचा पूर्णावतारच होय यांत शंका नाहीं. निर्माणशक्ति, पालनशक्ति, व संहरणशक्ति यांच्या अधिष्ठात्री असलेल्या, अनिरुद्ध, वासुदेव आणि संकर्षण याच देवता ब्रह्मा, विष्णु आणि महेश या रूपानें व पुढें सोम, दत्त आणि दुर्वास या त्रिमूर्तिस्वरूप दत्तात्रेयांच्या रूपानें अवतीर्ण झाल्या असल्यामुळें कोणी दत्तात्रेयांना कलावतार अथवा अंशावतार असेंहि म्हणतात. परमेश्वराचे सुप्रसिद्ध दहा अवतार हेहि अंशावतारच मानले जातात.

"मत्स्यः कूर्मो वराहो नरहरिणपतिर्वामनो जामदग्न्यः
काकुत्स्थः कंसघाती मनसिजविजयी यश्च कल्किर्भविष्यन् ।
विष्णोरंशावतारा भुवनहितकरा धर्मसंस्थापनार्थाः
पायासुर्मां त एते गुरुतर-करुणा-भार-खिन्नाशया ये ॥"

(दयाघन भगवान् करुणेनें भारावलेल्या अन्तःकरणानें धर्मसंस्थापनेकरितां व लोककल्याणाकरितां या भूमंडलावर मत्स्य, कूर्म, वराह, इत्यादि दहा रूपांनीं अवतरले. या दहा अवतारांना विष्णूचे अंशावतार असें म्हणतात. यांत नरहरिणपति

म्हणजे नरसिंह, जामदग्न्य म्हणजे परशुराम, काकुत्स्थ म्हणजे दाशरथिराम, कंसघाती म्हणजे श्रीकृष्ण आणि मनसिजविजयी म्हणजे भगवान् बुद्ध. बाकींचीं नांवें प्रसिद्धच आहेत. हे परमेश्वराचे दाही अवतार माझें सतत संरक्षण करोत, असा याचा अर्थ आहे. यांत दशावतारांना अंशावतार असें स्पष्टच म्हटलें आहे. )

कांहीं लोक दाशरथि रामाला द्वादशकलावतार मानतात तर श्रीकृष्णाला षोडशकलावतार मानतात. वस्तुतः परमेश्वराचे सर्वच अवतार हे पूर्णावतारच होत असें आम्हीं वर सांगितलेंच आहे. केवळ कार्यपरत्वें प्रकट होणाऱ्या शक्तींचें तारतम्य लक्षांत घेऊनच पूर्णावतार, कलावतार, अथवा अंशावतार हा व्यवहार होत असतो. जेथें कार्याचें स्वरूपहि अल्प असतें व त्यामानानें शक्तीचा आविष्कारहि पण अल्प प्रमाणांत पहावयास सांपडतो त्या अवताराला अंशावतार असें मानतात. उदाहरणार्थ, भस्मासुराचा वध करण्यासाठीं अथवा दैत्यांना मोहित करून त्यांनीं पळविलेला अमृतकलश हस्तगत करण्यासाठीं घेतलेला मोहिनी अवतार, ऋषभावतार, मारुतिरायांचा अवतार इत्यादि. या ठिकाणीं "अंशावतार" किंवा "अंशांशावतार" हे शब्द न्यूनता दाखविणारे आहेत असें मात्र कोणीच समजूं नये. कार्यपरत्वें शक्तीच्या आविष्कारांत तारतम्य असलें तरी सच्चिदानन्दरूप स्वस्वरूपामध्यें यत्किंचितहि तारतम्य नाहीं. याच अभिप्रायानें वेदान्ततत्त्ववेत्त्यांनीं सर्व जीव हें परमेश्वराचे अंशांशांश स्वरूपानें अवतारच मानलेले आहेत. "ईश्वरो जीवकलया प्रविष्टो भगवानिति" ( याज्ञवल्क्योपनिषद् ) "ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः" (भ. गीता. १५.७) "अनेन जीवेन आत्मना अनुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि" ( छान्दोग्य ६।३।२ ) भगवान् ईश्वर हाच अंशस्वरूपजीवरूपानें प्राणिमात्रांच्या देहामध्यें प्रविष्ट झालेला आहे. जीवसृष्टीमध्यें जीवरूपानें माझाच अंश सर्वत्र विराजत आहे. मीच आतां या सर्व देहामध्ये इंद्रियादिसमुदायाच्या पाठोपाठ प्रवेश करून या सृष्टीला नांवारूपाला आणावें असा संकल्प करून तो परमात्माच सर्व शरीरांमध्यें जीवरूपानें प्रविष्ट झाला आहे इत्यादि अनेक श्रुति-स्मृति-वचनें जीव हा परमेश्वराचाच अंशावतार असल्याचें सांगत आहेत. "जें जें भेटेल भूत । तें तें मानिजे भगवन्त" या संत-वचनांतहि हाच अभिप्राय गोवलेला आहे.

आतां यावर कोणी असें विचारील कीं जीव हा जर अत्यंतात्यंत सूक्ष्मरूपानें कां होईना पण परमेश्वराचा अवतार असेल तर मग परमेश्वराच्या अंगचे सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्व इत्यादि गुण परमेश्वराप्रमाणें जीवांच्या ठिकाणीं असल्याचें कां बरें दृष्टीस पडत नाहीं ? यावर उत्तर असें कीं, जीव हा जरी परमेश्वराचा अंश असला तरी तो अज्ञानानें झांकलेला आहे. अनंत जन्मांच्या मलिन वासनांचीं खूपच खूप आच्छादनें त्यावर पडलेलीं आहेत. कुकर्मजनित पर्वतप्राय पापांच्या ढिगाऱ्याखालीं तो दडपला गेला आहे. याच कारणामुळें त्याच्या अंगचे स्वतःसिद्ध सर्वज्ञत्वादि गुण अभिव्यक्त होऊं शकत नाहींत. तो अल्पज्ञ आणि अल्पशक्तिमान् असाच प्रतीतीला

येतो. याच कारणामुळें जीवाचा ईश्वरभाव मावळल्यासारखा होतो, व त्याला जीवत्व प्राप्त होतें. जसा जसा जीव आपल्या प्रयत्नानें आपल्याभोंवतीं असलेले पापांचे ढिगारे दूर सारील, मलिन वासनांचीं आच्छादनें फेकून देईल, आणि भक्तिभावें ईश्वराची आराधना करून व ईशकृपा व गुरुकृपा सम्पादन करील तसा तसा तो सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्त्व, इत्यादि ईश्वराच्या ठिकाणीं असलेल्या गुणांनीं अधिकाधिक संपन्न होत असल्याचें दिसून येईल. त्याच्या ठिकाणीं ईश्वरीय शक्तींचा आविष्कार होत असल्याचें आपणांस पाहावयास सांपडेल.

जीव हा प्रथम अज्ञानाच्छन्न अवस्थेंत असतो. नंतर तो उद्‌बुद्ध मलिन संस्कारावस्थेंत येतो. या वेळीं त्याचे अत्यंत सूक्ष्म बीजभूत वासनात्मक मलिन संस्कार फलोन्मुख अदृष्टानें जागृत होत असतात. पुढें अदृष्टानें मिळालेल्या जन्मामध्यें जीवाच्या हातून जीं मलिन कर्में घडतात त्यांमुळें मनामध्यें मलिन संस्कारांची वाढ होत राहते. ही त्याची परिवृद्ध मलिन संस्कारावस्था होय. यामुळें जीव उत्तरोत्तर दुराचाराकडे प्रवृत्त होत राहतो. पुढें अनुकूल अदृष्टानें प्राप्त होणाऱ्या ईश्वरानुग्रहानें म्हणा अथवा सत्संगानें म्हणा जीवाला पापाचाराचा पश्चात्ताप होऊं लागतो. ही त्याची पश्चात्तापावस्था समजावी. "तत्त्वपक्षपातो हि धियां स्वभावः" आन्तरिक बुद्धि ही अखेर सत्याकडेच धांव घेत असते. हा मानवी बुद्धीचा स्वभावच आहे. या पश्चात्तापाच्या पोटींच मानवाच्या अन्तःकरणांत नित्यानित्यवस्तुविवेक उत्पन्न होत असतो. मी कोण आहें? कोठून आलों आहें? माझें कर्तव्य काय आहे? मी काय करीत आहें? या जगांत नित्य काय आहे? या जगाच्या मुळाशीं कांहीं तत्त्व आहे कीं नाहीं? का जग हें एक बिनबुडाचें गाडगें आहे? जगाच्या मुळाशीं कांहीं तत्त्व असेल तर त्याचें काय स्वरूप असावें? असे अनेक प्रश्न त्याच्या मनश्चक्षूपुढें उभे राहतात, व तो त्यांचा आपल्या परीनें विचार करीत असतो. मानवाच्या मनांत असे विचार उत्पन्न होणें हा एक त्याच्या पूर्वसुकृताचाच अल्पसा परिपाक होय. या पूर्वसुकृतांतूनच विद्यमान जन्मांत त्याच्या ठिकाणीं सत्प्रवृत्तींचा उदय होऊं लागतो. मग तो स्वाभाविकच दुराचारापासून परावृत्त होतो, व त्याचें मन सदाचाराकडे वळतें. अशाश्वत पदार्थांपासून मिळणारें सुखहि अशाश्वतच असणार. या विचारानें तो नाशवन्त वस्तूंच्या अथवा वैभवाच्या मोहांत गुंतत नाहीं, एवढेंच नव्हे तर योगायोगानें जवळ असलेल्या अशा वैभवाचा तो त्यागहि करतो; ही त्याची वैराग्यावस्था होय. या वैराग्याच्या भूमिकेंत आल्यानंतरच मानव हा इंद्रियनिग्रहाचा प्रयत्न करीत असतो. तो मी व हे माझे पुत्र, मित्र, कलत्र आणि हें माझें वित्त, वैभव इत्यादि संकुचित स्वार्थाच्या जाळ्यांतून मुक्त होत असतो. यालाच शास्त्रज्ञ शम, दम आणि उपरम असें म्हणतात. याच अवस्थेला साधकावस्था असें म्हणतात. साधक हा नेहमींच "यदृच्छालाभसंतुष्ट" राहून आत्मप्रवण होत असतो. प्राप्त परिस्थितींत होणारे सुखदुःखांचे व मानावमानांचे आघात सहन करून विश्वांतील प्राणिमात्रांकडे तो परमात्मभावानें पहात असतो. सारें विश्व त्याला परमात्म-

स्वरूप दिसत असल्यामुळें तो कोणाचाहि द्वेष अथवा मत्सर करूं शकत नाहीं. सर्वांशीं त्याचें वागणें अत्यंत सरळपणाचें असतें. यालाच तितिक्षा आणि आर्जव असें म्हणतात. पुढें हा साधक आपल्या मनाला एकाग्र करण्याकरितां उपास्य तत्त्वाची उपासना करीत असतो. धारणा आणि ध्यान हीं याच उपासनेचीं अंगें होत. हें सर्व करण्यासाठी साधकाला सद्‌गुरूंचा शोध करावाच लागतो. भगवत्कृपेनें सद्‌गुरूंचा लाभ झाल्यानंतर त्यांच्याकडून होणाऱ्या उपदेशाचें श्रवण व त्यानंतर मनन आणि निदिध्यासन हें क्रमश: कर्तव्य म्हणून प्राप्त होतच असतें. निदिध्यासनाचाच परिपाक परमेश्वराच्या साक्षात्कारांत होऊन साधक हा सिद्ध अवस्थेला प्राप्त होत असतो. साधकावस्थेंत साधकाला जिज्ञासु, आरुरुक्षु, अथवा मुमुक्षु असें म्हणतात, तर तोच साधक पुढें "ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति" या श्रुतिवचनाप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कार होऊन परमात्मस्वरूपाशीं समरस झाल्यानंतर सिद्धावस्थेला पोहोंचतो. त्या वेळीं त्याला सिद्ध, ज्ञानी, आरूढ किंवा मुक्त असें म्हणतात. सिद्ध अथवा मुक्त पुरुषहि ज्या वेळीं कारुण्यातिरेकानें अज्ञजनांचा उद्धार करण्यासाठी परमेश्वराच्या प्रेरणेनें अथवा स्वसंकल्पबलाने योगशक्तीचा अवलंब करून खालीं येतात, भूमंडलावर अवतरतात, तेव्हां त्यांनाहि अवतार म्हटलें जातें.

साधकावस्थेंतून सिद्ध अवस्थेला पोहोंचलेल्या लोकांनाहि कित्येक वेळां अवतार म्हणून म्हटलें जात असल्याचें दिसतें ही गोष्ट खरी आहे, पण तेवढ्यावरून सिद्धपुरुष हा अवतार होऊं शकत नाहीं. त्या ठिकाणचा अवतार हा शब्दप्रयोग मुख्य अर्थानें नसून तो गौण अथवा लाक्षणिक रूपानें होत असतो. असाच त्याचा अर्थ समजावा. साधनांच्या अभ्यासानें प्राप्त झालेल्या सिद्धींच्या बळावर त्याच्याकडून अवताराप्रमाणें अलौकिक शक्तीचीं कामें यशस्वी रीतीनें पूर्ण होत असतात, म्हणून त्यांना अवतार म्हटलें जातें, असाच त्याचा अर्थ समजावा. अशा रीतीनें सिद्ध पुरुषांचे होणारे अवतार हेहि भगवन्ताचे अंशांशावतारच समजावेत. "यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छत्वं ममतेजोंशसंभवम्।" समृद्धि, सत्ता, प्रभाव, शौर्य, धैर्य, औदार्य, धर्म, कर्म, विद्या आणि कलाकौशल्य इत्यादि सद्‌गुणांच्या समृद्धीला विभूति असें म्हणतात. हें ज्या ज्या ठिकाणीं आढळेल तो परमेश्वराच्या शक्तीचा अंशच समजावा. श्री म्हणजे शोभा, लक्ष्मी, कान्ति, सरस्वती, बुद्धि, कीर्ति आणि स्फूर्ति इत्यादि सद्‌गुणांनीं जो संपन्न असेल, त्याला श्रीमान् असें म्हणतात. त्याचप्रमाणें ऊर्जित म्हणजे श्रेष्ठ ओजानें, तेजानें, वेगानें, बलानें, उत्साहानें, आकारानें, पराक्रमानें व याचसारख्या अन्य सद्‌गुणांनी संपन्न असलेल्यांना ऊर्जित असें म्हणतात. जेथें जेथें अलौकिक श्रीमत्ता अथवा ऊर्जितपणा दिसेल तें सर्व परमेश्वराच्या तेजाच्या म्हणजे शक्तीच्या अंशापासूनच उत्पन्न झालेलें असल्यामुळें त्यांनाहि अवतार असेंच म्हटलें जातें. मात्र या सर्व गुणांचा स्वत:सिद्ध आविष्कार जेथें असेल त्यालाच अवतार म्हणतां येईल.

पुष्कळ प्रसंगीं भूतावेशन्यायानें परमेश्वराचे आवेशावतारहि होत असल्याचें पहावयास सांपडतें. कार्यपरत्वें एखाद्या स्थूल शरीरांतहि प्रवेश करून परमेश्वर आपलें अभिलषित कार्य पूर्ण करून घेत असतो. हें स्थूल शरीर परमेश्वरानें आपल्या संकल्पबलानें स्वतंत्र निर्माण केलेलें असतें का एखाद्या जीवाला अदृष्टबलानें प्राप्त झालेलें तें शरीर असतें? हा प्रश्न अगदीं निराळा आहे. सर्वसमर्थ असलेला परमेश्वर क्वचित् प्रसंगीं स्वतःच्या संकल्पसामर्थ्यानेंहि कार्यानुरूप स्थूल शरीर निर्माण करून त्यांत प्रवेश करील अथवा अदृष्टबलानें प्राप्त झालेल्या एखाद्या जीवाच्या स्थूल शरीरांतहि प्रवेश करील. दोन्ही गोष्टी शक्य आहेत. या दोन्ही प्रकारच्या अवतारांना आवेशावतार असेंच म्हणावें लागेल.

भूत, पिशाच अथवा ब्रह्मराक्षस या अवस्थेंत असलेल्या जीवांना गति नसल्यामुळें ते बीजभूत वासनारूपानें लिंग-देहाचा अथवा सूक्ष्म शरीराचा आश्रय करून वाऱ्यावर भटकत असतात. ज्या वेळेला त्यांच्या वासना प्रबल होतात त्या वेळेला ते एखाद्या मानवाच्या स्थूल शरीरांत प्रवेश करून आपल्या वासना पूर्ण करून घेतात. कांहीं शास्त्रज्ञ तर पिशाच व ब्रह्मसमंध यांना वायवीय शरीर असल्याचें समर्थन करतात. व्यवहारांतहि पिशाचबाधा झालेल्या मनुष्याला उद्देशून "त्याला वारें लागलें" अथवा "वा यानें झपाटलें" असाच शब्दप्रयोग होत असतो. याच न्यायानें परमेश्वराचाहि एखाद्याच्या शरीरांत तात्कालिक प्रवेश होत असतो. त्या काळांत त्या मनुष्याच्या हातून कांहीं अलौकिक शक्तीचें कार्य घडून येत असतें. तें कार्य मानवाच्या शक्तीच्या बाहेरचें असतें हें निश्चित. आणि म्हणूनच त्या वेळीं तो परमेश्वराचा आवेशावतारच मानणे योग्य ठरतें.

भर दरबारांत सर्वांसमक्ष दामाजीपंतांची रक्कम भरून हिशेब पूर्ण करणारा तो विठू महार बेदरच्या बादशहाला किंवा दाही दिशा शोध करून पाहणाऱ्या त्याच्या दूतांनाहि पुन्हां दिसला नाहीं. बारा वर्षे संत एकनाथांच्या घरीं गंध उगाळणारा व पाणी भरणारा श्रीखंड्या आतां आपण उघडकीस येणार हें बरें नाहीं, असें म्हणून जो अन्तर्धान पावला तो पुन्हां त्या रूपांत कोणालाहि दिसला नाहीं. गोराकुंभाराचीं मडकीं घडलीं. भाजी उखडून सावतामाळ्याबरोबर भाजीच्या जुड्या बांधल्या! जनाबाईबरोबर दळणकांडण केलें. संत सखूबाईच्या घरीं तिच्या परोक्षकाळांत खवीस असलेल्या तिच्या सासूसासऱ्यांचा व नवऱ्याचाहि जांच सोसून ती पंढरीहून घरीं परत येईतोपर्यंत घरातलीं सर्व कामें पार पाडलीं! इत्यादि सर्व गोष्टींचा इतिहास परमेश्वराचा आवेशावतार मानल्याशिवाय उपपन्नच होणार नाहींत. तात्पर्य प्रारब्धकर्मानें निर्माण झालेल्या एखाद्या जीवाच्या शरीरांत स्वसंकल्पबलानें प्रवेश करून ज्या वेळेला परमेश्वर कार्य करतो त्या वेळेला त्या अवताराला आवेशावतार असें म्हणतात.

योगाभ्यासानें सिद्ध झालेले योगीदेखील योगसामर्थ्यानें एकाच वेळेला अनेक शरीरें धारण करून कार्य करूं शकतात; तर मग योगसम्राट् भगवान् श्रीहरि एकाच वेळेला कार्यपरत्वें अनेक रूपें धारण करूं शकतील यांत संशय मानण्याचें कारण काय आहे ? कोणतीहि गोष्ट मानवाच्या दृष्टीनें कितीहि अशक्य वाटली तरी ती करावयाचें मनांत आणल्यानंतर परमेश्वराला अशक्य असें कांहींच नाही. याच अभिप्रायानें त्याला "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ" असें म्हणतात.

आवेशावताराचेहि दोन प्रकार आहेत. एक शक्त्यावेश व दुसरा स्वरूपावेश. केवल आवेशकालांतच ज्या ठिकाणीं एखाद्या चेतन शरीरांत विशिष्ट शक्तीचा आविष्कार अथवा विकास पहावयास सांपडतो त्या ठिकाणीं त्याला आवेशावतार म्हणतात, तर प्रसंगानुरूप स्वसंकल्पबलानें निर्माण केलेल्या एखाद्या शरीरांत परमात्मा जेव्हां आपल्या अलौकिक रूपाने प्रवेश करतो व कार्य परिसमाप्त झाल्या-बरोबर अन्तर्धान पावतो तेव्हां त्याला स्वरूपावेश असें म्हटलें जातें. भक्तांच्या गाथेंत याचीं उदाहरणें पुष्कळ पहावयास सांपडतील. अंशाच्या अपेक्षेनें कमी शक्ति असलेल्या अवताराला विभूत्यवतार असें म्हणतात. हुमणाबादजवळ असलेल्या माणिकनगरचे सिद्धयोगी श्रीमाणिकप्रभु, श्रीस्वामीसमर्थ अक्कलकोटकर महाराज, शिर्डीचे श्रीसाईबाबा, शेगांवचे श्रीगजाननमहाराज इत्यादि थोर विभूतींचा यांत अन्तर्भाव होतो.

## अर्चावतार

परमेश्वराच्या बहुविध अवतारांमध्ये अर्चावतार हाहि एक अवताराचा प्रकार पहावयास सांपडतो. अनंतकोटि ब्रह्माण्डनायक ही ज्याची स्वतःसिद्ध पदवी आहे तो परमात्मा "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ" असल्यामुळें त्याचें सर्वनियन्तृत्व अर्थात् सर्वनियामकत्व, सर्वेश्वरत्व, सर्वसत्ताधिष्ठातृत्व, सर्वज्ञत्व, सर्वप्रकाशकत्व इत्यादि धर्म स्वाभाविकच आहेत, व ते सर्वमान्यहि आहेत. असें असलें तरी "अहं भक्तपराधीनः" मी भक्तांच्या अधीन आहें असें भगवन्तांनीं स्वमुखानेंच स्वतःचें भक्तपराधीनत्व निःसंदिग्धपणें मान्य केलेलें आहे. भक्तश्रेष्ठ राजा अंबरीष याच्या संरक्षणासाठीं नियुक्त केलेलें सुदर्शनचक्र ज्या वेळीं दुर्वास ऋषींच्या पाठीमागें लागलें त्या वेळीं भयभीत झालेले दुर्वासमुनि, सुदर्शनचक्राचे अधिपति भगवान् श्रीविष्णु यांनाच शरण गेले; पण श्रीहरींनी त्यांना स्पष्टच सांगितलें कीं, "माझा भक्त अंबरीष राजा यालाच तुम्ही शरण जा. त्याची इच्छा असेल तर तोच तुम्हांला या संकटांतून सोडवील. मी तरी स्वतंत्र कोठें आहें ? मीहि भक्तांच्याच अधीन आहें !" अखेर दुर्वास ऋषींना राजा अंबरीषालाच शरण जावें लागलें ! अंबरीषानेंच त्यांची त्या संकटांतून सुटका केली. हिरण्यकशिपूनें देवांचा व मानवांचा अनन्वित छळ केला. सर्व देव परमेश्वराला शरण गेले, पण परमेश्वरानें सांगितलें कीं, "तो जेव्हां माझा अनन्यभक्त असलेल्या प्रल्हादाचा छळ करील त्यावेळीं तो ब्रह्मदेवानें दिलेल्या वरांनीं

कितीहि जरी वरिष्ठ असला तरी मी त्याचा नाश करीन. तोंपर्यंत थांबा." केवढी ही परमेश्वराची भक्तपराधीनता प्रतीतीला येत आहे! केवढें हें भक्तवात्सल्याचें प्रतिबिंब भगवंतांच्या या विचारांत आपल्याला पहावयास सांपडत आहे ! तात्पर्य, भक्तांनी पूजेकरितां संकल्पिलेली अथवा स्वीकारलेली अर्चामूर्ति ही काष्ठमय असो, मृण्मय असो पाषाणमय असो अथवा ती तांबें, चांदी, सोनें इत्यादि धातूंची बनविलेली असो, त्या अचेतन मूर्तीमध्यें पूजेच्या वेळीं अथवा भक्ताची इच्छा असेल त्या वेळीं इष्टदेवतेच्या चिच्छक्तीचा आविर्भाव होतो व ती मूर्ति हसूं लागतें, बोलूं लागते, खेळूं लागते व जेवूंहि लागते, असा अनेक भक्तांचा अनुभव आहे. भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय हे आंबेजोगाई येथील देवघरांत दिगंबरानुचर श्रीदासोपंत यांच्या बरोबर खेळत असत. भगवान् रामचन्द्र प्रभु हे संत श्रीगोस्वामी तुलसीदासजी यांच्याबरोबर बोलत असत. संत मीराबाई यांच्याबरोबर त्यांची आराध्यदेवता श्रीगोपालकृष्ण हे तर नाचत असत. अद्यापिहि या देवभक्तांची जोडी वाराणसी येथील मीराबाईच्या श्रीकृष्ण मंदिरांत रंगभरी एकादशीच्या ( फा. शु।। ११ ) दिवशीं नाचत असल्याची साक्ष रात्रीं सभा-मंडपांत उधळलेल्या गुलालावर उमटलेल्या पावलांच्या रूपानें दुसरे दिवशीं सकाळीं मंडप उघडल्यावरोवर पहावयास सांपडते असें वाराणसी येथील लोक सांगतात. ब्रह्मनाळ येथील ब्रह्मीभूत श्रीआनन्दमूर्ति यांची समाधि, पूजा झाल्यानंतर केल्या जाणाऱ्या मंगलार्तीच्या वेळीं डोलत असल्याचें असंख्य भक्तजनांनीं अनेक वेळां पाहिलें आहे. अद्यापिहि ही प्रतीति येत असल्याचें कळतें. पंढरीच्या पांडुरंगाची पूजा झाल्या-नंतर देवानें नैवेद्य भक्षण करावा असा संत श्रीनामदेव यांनीं आग्रह धरला ! पाषाणमय मूर्ति, ती नैवेद्य काय भक्षण करणार ? लोक कुतूहलबुद्धीनें पहात होते. अखेर नामदेवांनीं सत्याग्रहच सुरू केला. शेवटीं देव त्या अर्चामूर्तीमध्यें अवतरले व त्यांनीं नामदेवाला बरोबर घेऊन नैवेद्य भक्षण केला ! हें तर नामदेवांनींच स्वमुखानें वर्णिलेलें आहे. तो प्रसंग असा–

नामदेवांचे वडील श्रीदामाजीपंत हे बाजाराच्या गडबडीनें कापड घेऊन पर-गांवीं गेले. जातांना त्यांनीं पूजा – नैवेद्य वगैरे नाम्याच्या हातून करवून घ्यावयाचें घरांत सांगितलें. आईच्या आज्ञेनें नामदेव पूजासामग्री व नैवेद्य घेऊन पांडुरंगाच्या मंदिरांत आले. पूजा केली. नैवेद्य पुढें ठेवला. ती पाषाणाची मूर्ति हालेना व बोलेना. पाहीना व खाईना! तेव्हा नामदेव म्हणाले–

केशवा माधवा गोविंदा गोपाळा । जेवी तू कृपाळा पांडुरंगा ।।१।।
अच्युता वामना दशरथनन्दना । जेवी तूं गा कृष्णा पांडुरंगा ।।२।।
कृष्णा विष्णु हरी, मधुसूदन मुरारी । जेवी तूं नरहरी पांडुरंगा ।।३।।
ऐसी ग्लानी[1] करितां विठ्ठल पावला । नैवेद्य जेविला नामयाचा ।।४।।

---

१ ग्लानी–विनवणी.

हाटाचे[1] तातडी[2] दामुशेटी[3] गेला । नैवेद्य पाठविला नाम्या हातीं ।।१।।
ऊठं लवकरी जेवी झडकरी । माता माझी घरीं वाट पाहे ।।२।।
नेणता म्हणोनी कारे जेवीनासी । आपुल्या प्राणांशीं करीन घात ।।३।।
देईन धडक फोडीन मस्तक । आपुल्या प्राणांचा करीन घात ।।४।।
पाषाणाची मूर्ति कांपे थरथरा । जेवी भरभरा नाम्यासंगे ।।५।।

सुमारें चार वर्षांचें वय असेल. वडिलांच्या अनुपस्थितींत आद्य श्रीशंकराचार्य यांनीं कालटी गांवीं श्रीललिताम्बा महात्रिपुरसुन्दरी देवीची पूजा केली. शर्करामिश्रित वाटीभर दूध देवीपुढें नैवेद्य म्हणून ठेवलें. आतां ती पाषाणमय जड मूर्ति दूध काय पिणार ? शेवटीं आचार्यांनीं हट्ट धरला व रडावयास आरंभ केला! अखेर जगज्जननीला त्या अर्चामूर्तीमध्यें अवतीर्ण होऊन तें दूध प्यावें लागलें ! सर्वच दूध देवीनें घेतलेलें पाहून " मला शिल्लक कां ठेविलें नाहीं ? " म्हणून पुन्हां रडावयास आरंभ केला ! तेव्हां देवीनें आचार्यांना आपल्या अंकावर घेतलें व स्तन्य पाजून तृप्त केलें ! " तव स्तन्यं मन्ये " या सौन्दर्यलहरी स्तोत्रांतील पंचाहत्तराव्या श्लोकांत आचार्यांनीं देवीनें आपल्याला मुखांत स्तन देऊन दूध पाजल्याचें स्पष्टच मान्य केलें आहे.

दक्षिण देशामध्यें अप्पर, सुन्दरर्, माणिक्कवाचकर आणि ज्ञानसंबंदर असे चार मोठे अधिकारी शिवभक्त होऊन गेले. पाषाणमय जड मूर्तीमध्यें प्रकट होऊन श्रीपार्वतीदेवीनें त्यांनाहि स्वकीय स्तन्यपानानें ज्ञानी केलें. पुढें ते मोठे कवि झाले. हा इतिहास त्या प्रदेशांत प्रसिद्ध आहे. परिव्राजक सम्राट श्रीवासुदेवानंदसरस्वती यांनी श्रीदत्तात्रेयांच्या दोन मूर्ति घडविल्या. त्यांतील एका मूर्तीची स्थापना हिंगोली या गांवीं झाली व दुसरी मूर्ति ठेविल्या ठिकाणाहून गुप्त झाली व वडणेरा येथें ब्रह्मीभूत श्रीसीताराम महाराज (श्री. वासुदेवानंद स्वामींचे धाकटे बंधु) यांच्या समाधिस्थानीं प्रकट झाली व तेथेंच त्या मूर्तीची स्थापना करण्यात आली.

बीड येथील वै. श्री. आबा कासार यांच्या वयोवृद्ध वडिलांनीं पंढरपुराहून श्रीरुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ति बीडला आणल्या. मंदिर बांधून त्यांची स्थापना करण्याचा विचार चालला. स्वप्न पडलें. मला तूं सख्याहरिबुवांच्या मठांत नेऊन ठेव. ते गृहस्थ श्रीसख्याहरिबुवांना भेटले व स्वप्नांत झालेल्या दृष्टान्ताप्रमाणें श्रीरुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ति आपल्या मठांत आणून ठेवतों म्हणाले. तेव्हां प्रस्तुत ग्रंथलेखकाचे पणजोबा श्रीसख्याहरिबुवा यांना म्हणाले, 'अहो ! मी श्री एकनाथ संप्रदायाचा अनुग्रह घेऊन " श्रीगुरुदेव दत्तात्रेय जनार्दन श्री एकनाथ " असा सवाल टाकतो व कोरडी भिक्षा मागतों. त्यांतच मठाचा श्रीरामनवरात्र महोत्सव, नित्य धार्मिक कृत्यें,

---

१ हाट—बाजार. २ तांतडी—त्वेगानें. ३ दामूशेटी—दामाजी (नामदेवांचे वडील).

व ब्रह्मीभूत श्री जीवानंद स्वामी महाराज यांची पुण्यतिथि साजरी करतों. अखेरपर्यंत एवढे निभलें म्हणजे पुरें. त्यांत आणखी नवी भर कशाला ? ' ते कासारमहाशय आपल्या घरीं निघून गेले. दुसऱ्या दिवशीं सख्या हरिबुवा रामाचें दर्शन घेण्याकरितां दार उघडीत आहेत तोंच त्यांना त्या रुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ति श्रीरामापुढें उभ्या असलेल्या दिसल्या !

कलकत्याची देवी श्रीकाली माता ही तर स्वामी श्रीरामकृष्ण परमहंस यांच्याबरोबर बोलत असे व त्यांनीं अर्पण केलेला नैवेद्यहि सेवन करीत असे, हें त्यांच्या चरित्रांत प्रसिद्धच आहे. हा त्या जडमूर्तींतील चैतन्याचा प्रवेश अर्चावतारच मानला जातो. हीं सर्व अर्चावतारांचींच उदाहरणें होत.

## हार्दावतार

याचप्रमाणें " हार्दावतार " हाहि एक अवताराचा प्रकार मानला जातो. हार्द शब्दाचा अर्थ हृदयांतील अथवा हृदयांत प्रकट होणारा असा आहे. भक्त ज्या स्वरूपानें हृदयांत भगवंताचें ध्यान करतो, त्याच स्वरूपानें भगवान् त्याच्या हृदयांत आविर्भूत होतात. या अवताराला हार्दावतार असें म्हणतात. अनन्यभावानें चिंतन करणाऱ्या अनेक भक्तांना या अवताराचा साक्षात्कार होत असतो. याप्रमाणें परमेश्वराच्या अवतारांचे अनेक प्रकार विश्वाच्या इतिहासांत आपल्याला पहावयास सांपडतात.

## परमेश्वराचें रूप व शरीर

पाणी जसें द्रवस्वरूपहि असतें व घनस्वरूपहि असतें तथापि द्रवस्वरूपता हा पाण्याचा स्वाभाविक धर्म आहे. तेंच त्याचें स्वाभाविक रूप होय. त्याचप्रमाणें अनिर्वचनीय तेजोरूपता हा परमेश्वराचा स्वाभाविक धर्म आहे. परमेश्वर हा तेजोमय आहे. " भारूपः सत्यसंकल्पः " याप्रमाणें छान्दोग्योपनिषदांत (३।१४।२) परमेश्वराच्या रूपाचा निर्देश केलेला आहे. " तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि " (ईशावास्य १६) हे परमेश्वरा ! अत्यंत मंगलमय आणि कल्याणकारक असें जें तुझें तेजोमय रूप आहे तें मी प्रत्यक्ष पहात आहें. " आदित्यवर्णं तमसः परस्तात् " (श्वेता. ३।८) परमेश्वराचें रूप सूर्यासारखें तेजस्वी असून तेथें तमाचा लेशहि स्पर्श करूं शकत नाहीं. केनोपनिषदांतहि इंद्रादि देवांना परमेश्वरानें प्रथम तेजोरूपानेंच दर्शन दिल्याचें वर्णिलेलें आहे. देवांना तें रूप ओळखतां आलें नाहीं, पण आदिशक्तीनें पार्वतीचें रूप घेऊन देवांना तें समजावून सांगितलें ! परमेश्वराच्या तेजोरूपाला उपमा नाहीं. आकाशामध्यें हजार सूर्य एकदम उदयाला आले असतां त्यांची ती एकवटलेली प्रभा कदाचित् परमेश्वराच्या तेजोरूपाची कल्पना करण्यास उपयुक्त होईल ! असें हें विलक्षण तेज हेंच परमेश्वराचें रूप होय. हें परमेश्वराचें अलौकिक तेजोमयरूप सर्वसामान्य भक्तजनांच्या चर्मचक्षूंना पाहण्याचें सामर्थ्य नसतें. देवाचें रूप पाहिल्या-

शिवाय मनाचें समाधान होत नाहीं व डोळ्यांचें पारणेंहि फिटत नाहीं. त्याच्या दर्शनासाठीं जीव तळमळत असतो. "त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम्" देवा! तुझ्या दर्शनाशिवाय एक क्षण देखील आम्हांला युगासारखा वाटतो! देवाचें मंगलमयरूप डोळे भरून कधीं पाहीन असें त्यांना वाटत असतें. ही त्यांची उत्कट तळमळ पाहून परमेश्वराला त्यांना दर्शन देण्याकरितां मूर्तरूप धारण करावें लागतें! स्वसंकल्प-बलानें धारण केलेलें हें मूर्तरूप हेंच परमेश्वराचें शरीर होय.

परमेश्वराचें शरीर हें तुमच्याआमच्या शरीराप्रमाणें पांचभौतिक शरीर नसतें. मातीच्या डिखळांतील परमाणु व खडीसारखेच्या खड्यांतील परमाणु हे दोन्ही परमाणु भौतिकशास्त्राच्या दृष्टीनें पार्थिव परमाणूच असले तरी मातीच्या परमाणू-पेक्षां खडीसाखरेच्या परमाणूचें वैशिष्टच कांहीं निराळेंच असतें; त्याचप्रमाणें अवतारी शरीर हें स्थूलदृष्टीनें पांचभौतिक दिसलें तरी त्याचें व त्यांतील घटक असलेल्या अवयवांचें वैशिष्टच कांहीं आगळेंच असतें! त्यांतील अंशन् अंश अलौकिक अर्थात् सत् चित् आणि आनंदस्वरूप असतो. याच अभिप्रायानें श्रीतुलसीदास गोस्वामी यांनी भगवान् रामचंद्रप्रभु यांच्या देहाचें वर्णन करतांना "चिदानंदमय देह तुम्हारी। विगत-विकार जानु अधिकारी" रामा, तुमचें शरीर सच्चिदानंदमय आहे. तें निर्विकार आहे. अधिकारी भक्तच तें जाणूं शकतात. सामान्य मानवांना तें काय कळणार! श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज देखील आपल्या "घोंगडी" या पदांत श्रीकृष्णप्रभूंच्या स्थूलशरीराचें वर्णन करतांना "कान्होवा तुझी घोंगडी चांगली चांगली। आम्हांसि का दिली वांगली रे ।।धृ०।। स्वगत सच्चिदानंद मिळोनी शुद्ध-सत्त्वगुण विणलीरे। षड्गुण गोंडे रत्नजडित तुज श्यामसुंदरा शोभली रे ।। (सुबोध स्तोत्रसंग्रह भा. २ रा पान २१ पहा) हे कान्होबा कृष्णा! तुझी घोंगडी किती चांगली आहे! आम्हांला मात्र आमच्या कपाळीं वांगली म्हणजे सदोष अशीच प्राप्त झाली आहे. तुमचें शरीर स्वस्वरूपीं विराजत असलेल्या सत्ता, चैतन्य आणि आनंद यांनींच ओतप्रोत भरलेलें आहे. ऐश्वर्यादि षड्गुण व दया वात्सल्यादि रत्नांनी तें विभूषित आहे. या ठिकाणीं घोंगडी शब्दाचा अर्थ देह असाच आहे. तात्पर्य, ईश्वराचें शरीर देखील ईश्वराप्रमाणेंच अलौकिक अर्थात् सच्चिदानंदरूप असेंच असतें. तें सृष्टींतील कोणत्याहि शरीराच्या आकारानें अथवा अलौकिक आकारानेंहि प्रकट होऊं शकतें.

## सृष्टीची सुसम्बद्धता

सृष्टि ही कांहीं आपोआप झालेली नाहीं. सृष्टींतील पदार्थ जर आपोआप निर्माण होतील तर ती एक मोठी अपत्तीच ठरेल. सर्वत्र अनास्था व अनवस्था दृष्टीस पडेल. कार्यकारणभावाला वावच उरणार नाहीं. पण सृष्टीचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां सृष्टींत अव्यवस्था असल्याचें दृष्टीस पडत नाहीं. उलट सृष्टीमध्यें एक योजना-बद्ध व सुसंगत अशी व्यवस्थाच असल्याचें पहावयास सांपडतें. ती योजना मानवाला

आकलन होईल अथवा न होईल, ही गोष्ट निराळी आहे. मानवाला एखादी योजना आकलन झाली नाहीं म्हणून ती योजनाच नव्हे असें म्हणतां येणार नाहीं. सृष्टीच्या मुळाशीं एक सुसंबद्ध योजना आहे व त्या योजनेनेंच सृष्टीचा आविष्कार झालेला आहे. सृष्टि निर्माण करण्यामध्यें व निर्मिलेल्या सृष्टींत विविध अवतार घेण्यामध्येंहि परमेश्वराचा लोककल्याण हाच एक हेतु आहे. ज्यामध्यें लोककल्याणाचा प्रयत्न झाला नाहीं असा एकहि परमेश्वराचा अवतार नाहीं. त्याचप्रमाणें ज्यांत लोककल्याणाचा हेतु नाहीं असा सृष्टींतील एकहि पदार्थ नाहीं. विश्वाची उत्पत्ति ही देखील लोककल्याणासाठींच आहे, व प्रळयकाळहि पण लोककल्याणासाठींच आहे. याच अभिप्रायानें 'ईश्वर जें करितो तें भल्यासाठींच करितो' असा एक मराठीमध्यें वाक्प्रचारहि रूढ आहे. तो अगदीं बरोबर आहे.

## कालचक्र

या जगांत एकच एक परमात्मतत्त्व ओतप्रोत भरलेलें आहे. त्याच्या शिवाय दुसरें कांहीं नाही. जगाच्या आदीं व अन्तीं तेंच आहे. मधल्याहि काळांत चराचर विश्वाच्या रूपाने तेंच नटलेलें आहे. तें पूर्ण सत्य व सच्चिदानंदरूप आहे. अशी ही वस्तुस्थिति आहे. दिवस उगवतो आणि मावळतो. रात्र येते आणि जाते. त्याचप्रमाणें सृष्टि उपन्न होते आणि संपते. प्रलयकाळहि येतो आणि जातो. असें हें कालचक्र सारखें चाललें आहे. या कालचक्राचा आदि आणि अन्त कोणासहि पहावयास सांपडत नाहीं. हीच पहिली सृष्टि किंवा हाच शेवटचा प्रलय असें कधींच पहावयास सांपडत नाहीं. गतिशील चक्रांतील आरा अथवा रहाटगाडग्याच्या माळेंतील पोहरे यांचा अनुक्रम गृहीत धरावा लागतो. त्याचप्रमाणें कालचक्रांतील सृष्टि आणि प्रलय यांचाहि अनुक्रम गृहीतच धरावा लागतो. वस्तुतः सृष्टि-प्रलय-परंपरा ही कांहीं चक्राकार नाहीं. ती अनादि आणि अनंत आहे. तिचा आदिकाल भूतकालामध्ये शोधून पाहतां हातीं लागत नाहीं व भविष्यकाळामध्यें शेवटहि दृष्टीस पडत नाहीं. याच अभिप्रायानें सृष्टि-प्रलय-परंपरा ही अनादि व अनंत आहे असें मानलें जातें. कालाच्या उदरांत गडप झालेले सृष्टि आणि प्रलय परत फिरून येत नाहींत. "धाता यथा पूर्वमकल्पयत्" या वेदवचनावरून पुढील सृष्टीची रचना ही सामान्यपणें मागील सृष्टीच्या अनुरोधानेंच होत असते, हें तत्त्व प्राचीन तत्त्ववेत्त्यांना मान्य असल्याचें दिसतें. आधुनिक ऐतिहासिक तत्त्ववेत्तेदेखील इतिहासाची पुनरावृत्ति होत असल्याचें तत्त्व मानतातच. तात्पर्य कालचक्र हें अव्याहत चाललेलें आहे.

## मूलतत्त्वविचार

सृष्टीला आरंभ होण्याच्या पूर्वीं प्रलयाची अवस्था होती. या प्रलयावस्थेंतच पुढें निर्माण होणाऱ्या सृष्टीचीं वासनारूप सूक्ष्मबीजें विद्यमान असतात. हीं बीजें

इतकीं सूक्ष्म असतात कीं, त्यांची स्पष्ट रूपानें कोणालाहि प्रतीति येऊं शकत नाहीं. म्हणूनच तत्त्ववेत्त्यांनीं या अवस्थेला अव्यक्त अथवा अव्याकृत असें नांव दिलेलें आहे. या अव्यक्ताचें अधिष्ठान असलेलें परमात्मतत्त्वहि पण या वेळीं अव्यक्त याच नांवानें ओळखलें जातें. अधिष्ठानाची सत्ता ही आधेयाच्या सत्तेपेक्षां व्यापक असल्या-मुळें अव्यक्ताचें अधिष्ठान असलेलें परमात्मतत्त्व हें अव्यक्ताच्याहि पलीकडचें आहे. त्यालाच तत्त्ववेत्त्यांनीं आदिब्रह्म असें म्हटलेलें आहे. आदिनारायण, आदिविष्णु, आदिशिव, आदिनाथ, आदिगुरु अथवा आदिशक्ति अशा अनेक नांवांनीं तत्त्ववेत्ते आपआपल्या अभिरुचीप्रमाणें या तत्त्वाचा उल्लेख करीत असतात.

या अव्यक्त तत्त्वाचें स्वरूप कोणालाच कळत नसल्यामुळें त्याला अज्ञान असेंहि नांव दिलें जातें. हेंच अज्ञान समष्टिरूपानें समस्त विश्वाचें मूलकारण असल्यामुळें त्याला मूलप्रकृति अथवा माया असेंहि म्हणतात. हेंच अज्ञान समुदायाच्या रूपानें संपूर्ण जीवसृष्टीच्या व व्यष्टिरूपानें अर्थात् पृथक् पृथक् स्वरूपानें प्रत्येक जीवाच्या अभिव्यक्तीचेंहि कारण असल्यामुळें त्याला कारणशरीर असेंहि नांव दिलेलें आहे. कारणसमष्टीचें अधिष्ठान असलेल्या चैतन्याच्या पलीकडे असलेलें जें चैतन्य त्याला महाकारण असें म्हणतात. व्यष्टि म्हणजे पृथक् पृथक् व्यक्ति, आणि समष्टि म्हणजे समुदाय, ही परिभाषा येथें अवश्य लक्षांत घ्यावी. व्यष्टीचा अभिमानी जीव आणि समष्टीचा अभिमानी ईश्वर अशी तत्त्ववेत्त्यांनी जीव आणि ईश्वर यांचीहि परिभाषा कल्पिलेली आहे. जीव हा अल्पज्ञ, अल्पशक्तिमान्, कर्ता, भोक्ता व नियम्य आहे, तर ईश्वर हा सर्वज्ञ, सर्व शक्तिमान्, कर्तृत्वभोक्तृत्वरहित आणि नियामक आहे. ईश्वराला स्वतःचें कर्तृत्व नसलें तरी जीवांच्या उपकारासाठीं सृष्टीचें कर्तृत्व त्यानें आपण होऊन आपल्याकडे घेतलें आहे. लोकोपकारार्थ निरपेक्ष बुद्धीनें केलीं जाणारीं कर्में हीं स्वार्थमूलक नसल्यामुळें त्या कर्मांना कर्म म्हटलें जात नाहीं. याच दृष्टीनें ईश्वर हा सृष्टीचा कर्ता असूनहि तत्त्वतः तो अकर्ताच मानला जातो.

## ईशसृष्टिचा क्रम

प्रलयकालीं अव्यक्त अवस्थेंत असलेले प्राणिमात्रांचे अतिसूक्ष्म बीजभूत संस्कार ज्या वेळीं उदयोन्मुख अवस्थेला येतात त्या वेळीं परमशांत व निर्विकार अस-लेल्या अव्यक्तरूप परमात्मतत्त्वाच्या ठिकाणीं एक सूक्ष्मसा प्रक्षोभ निर्माण होऊन विचारांचा तरंग उद्‌भवतो. मी बहुरूप व्हावें याच विचारतरंगांतून " बहु स्यां प्रजा-येय " या संकल्पाचा आविष्कार होतो. अव्यक्त अवस्थेंतील परब्रह्मतत्त्व हें स्वभावतः प्रकाशमय आहे. त्या प्रकाशाच्या साहचर्याला वरील संकल्पानें विमर्शशक्तीची जोड मिळते. प्रकाश आणि विमर्श यांच्या साहचर्यांतून क्रियाशक्तीचा आविर्भाव होतो. प्रकाश आणि विमर्शशक्ति यांच्या साहचर्याचेंच मूर्त स्वरूप म्हणजे अर्धनारीनटेश्वर हें परमेश्वराचें पहिलें रूप होय. यालाच शिवशक्ति असेंहि म्हणतात. क्रियाशक्तीचा

आविर्भाव झाल्यावरोबर हीं दोन रूपें पृथक् होतात व त्यांनाच पार्वती आणि परमेश्वर अशीं नांवें प्राप्त होतात. हींच सर्व विश्वाचीं मातापितरें होत. प्रकाशाच्या ठिकाणीं तरंगित झालेल्या विमर्शशक्तीच्या साहचर्यानें जेव्हां "बहुस्याम्" या संकल्पाचें स्फुरण होतें त्याच वेळीं अव्यक्त तत्त्वांतून व्यक्त तत्त्वांचा आविर्भाव होऊं लागतो. पहिल्या प्रथम अभिव्यक्त होणारीं हीं तत्त्वें इतकीं सूक्ष्म असतात कीं त्यांचा त्या वेळीं पृथक्रूपानें कांहींच बोध होत नाहीं. अतिसूक्ष्मरूपानें तीं तत्त्वें प्रकट होत असल्यामुळें त्यांना "व्यक्त" असें म्हणतात. पण स्पष्टरूपानें त्यांचा बोध होत नसल्यामुळें त्यांना अव्यक्त असेंहि म्हणतात. अशा रीतीनें अव्यक्त तत्त्वांतून व्यक्ताव्यक्त स्वरूपाची सृष्टि निर्माण होऊं लागते. या व्यक्ताव्यक्त सूक्ष्म तत्त्वांच्या सृष्टीलाच कारणसृष्टी असेंहि म्हणतात. कारण हीच सृष्टि पुढें निर्माण होणाऱ्या सर्व स्थूल सृष्टीचें कारण असतें. या कारण सृष्टीलाच तत्त्ववेत्ते "तन्मात्रा" असें म्हणतात. या सूक्ष्म तन्मात्रांतूनच स्थूल स्वरूपाची कार्यसृष्टि निर्माण होत असते. या सूक्ष्मरूपानें व स्थूलरूपानें निर्माण होणाऱ्या सर्व सृष्टीच्या मुळाशीं आधारभूत शुद्धचैतन्य आणि मूलगामी बीजभूत सूक्ष्मसंस्कार हे असतातच. (हे बीजभूत संस्कार जरी अतिसूक्ष्म आणि अनादि असले तरी तत्त्वज्ञानोत्तरकालीं, निदिध्यासनानें आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर त्या संस्कारांचा बाध होत असल्यामुळें त्या संस्कारांचें अस्तित्व मूलभूत अद्वैततत्त्वाला बाध आणूं शकत नाही.) चैतन्यतत्त्व हें अतिसूक्ष्म व सर्वव्यापी असल्यामुळें त्याची सृष्टींतील सर्व पदार्थांशीं अनुवृत्ति म्हणजे संबंध हा असतोच. त्याचप्रमाणें संस्कारांचीहि अनुवृत्ति म्हणजे उत्तरोत्तर सातत्यानें संक्रमण होत असल्यामुळें सृष्टींतील सर्व पदार्थांत व प्राणिमात्रांतहि संस्कारानुरूप आकारांची व गुणधर्मांची अभिव्यक्ति होत राहते.

अव्यक्त तत्त्वालाच तत्त्ववेत्ते ईश्वर अशी संज्ञा देतात. या ईश्वराच्या अनिर्वचनीय शक्तीलाहि पण तत्त्ववेत्त्यांनीं अव्यक्त असेंच नांव दिलेलें आहे. या अव्यक्ताला माया असेंहि म्हणतात. तात्पर्य, अनिर्वचनीय शक्तिविशिष्ट ईश्वर अथवा ईश्वराच्या आश्रयानें असलेली त्याची अनिर्वचनीय शक्ति या दोन्ही अर्थांनीं अव्यक्त या शब्दाचा प्रयोग केला जातो. या अव्यक्त तत्त्वाच्याहि पलीकडे असलेल्या तत्त्वाला शुद्ध परब्रह्मतत्त्व असें म्हटलेलें आहे. हेंच परब्रह्मतत्त्व सृष्टिकालीं निर्माण होणाऱ्या यच्चयावत् प्राणिमात्रांच्या देहांत जीवरूपानें विराजत असल्यामुळें त्याला पुरुष असें म्हणतात. "अव्यक्तात्पुरुषः परः" अव्यक्त तत्त्वापेक्षांहि हें पुरुषतत्त्व अत्यंत श्रेष्ठ आहे. तें सर्वांपेक्षां अत्यंत सूक्ष्म आहे व सर्वांपेक्षां अत्यंत महानहि आहे. "अणोरणीयान् महतो महीयान्" अशा शब्दांनीं उपनिषदें त्या पुरुषाचें वर्णन करीत असतात.

सृष्टीच्या पूर्वकालांत अर्थात् प्रलयकालांत आणि सृष्टीच्या कालांतहि सातत्यानें विद्यमान असलेलें ईश्वर-तत्त्व अथवा अव्यक्त तत्त्व ही एक शुद्ध परब्रह्म-तत्त्वाची विशिष्ट अवस्था आहे. या अवस्थेंत पुढें जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांचे बीजभूत

संस्कार अत्यंत सूक्ष्मरूपाने विद्यमान असतात. प्रचंड वटवृक्षाचें आश्रयस्थान असलेली जशी एखादी त्या वृक्षाच्या मुळाशीं बीजकणिका असते व ती जशी अतिसूक्ष्म असते त्याचप्रमाणें सृष्टीमध्यें जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या स्थूलसूक्ष्म शरीरांचे बीज-भूत संस्कार अतिसूक्ष्मरूपानें या अव्यक्त अवस्थेंत विराजत असतात. अव्यक्तांत सामावलेल्या या संस्कारांचें आश्रयस्थान अज्ञात असतें. म्हणून त्याला अज्ञान असें म्हणतात. यावर कोणी विचारील कीं, हें कोणाचें व कशाचें अज्ञान आहे? यावर उत्तर :– हें स्वच्या ठिकाणीं असलेलें स्व-स्वरूपाचेंच अज्ञान होय! हेंच अज्ञान या सर्व संसाराचें व सांसारिक दुःखांचें मूळ कारण आहे. "अज्ञानमेवास्यहि मूलकारणं तद्धानमेवात्र विधौ विधीयते" (रामगीता). या अज्ञानाचा निरास घडवून आणल्या-शिवाय जीवाची सर्व सांसारिक दुःखांतून सुटका होत नाहीं. हें अज्ञान समूळ नष्ट करणें हें या जीवाचें प्रधान कर्तव्य होय. जीवांचें अज्ञान घालविण्याकरितांच सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा अवतार आहे. गुरुदेवांची जीवांनीं उपासना करावी व त्यांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें स्वस्वरूपाचें मनन आणि निदिध्यासन करून सर्व दुःखांतून आपली पूर्णपणें सुटका करून घ्यावी हेंच जीवांचें कर्तव्य होय.

अव्यक्त अवस्थेंत असलेल्या – सर्व बीजभूत संस्कारांचें अधिष्ठान असलेल्या अज्ञान-समष्टीच्या ठिकाणीं चिदात्मा हा तादात्म्याभिमान ठेवतो म्हणून त्याला ईश्वर असें म्हटलें जातें. तोच पुढें सृष्टिकालांत सर्व जीवांचा शास्ता व नियंता बनतो म्हणून त्याला ईश्वर आणि नियामक असें नांव दिलें जातें. हाच ईश्वर सर्व जीवांच्या अन्त-र्यामांत वास्तव्य करीत असल्यामुळें त्याला अन्तर्यामी असेंहि म्हणतात. तात्पर्य अव्यक्त, ईश्वर, अन्तर्यामी, नियामक हीं सर्व ईश्वराचींच नांवें होत. जे लोक अव्यक्त शब्दाचा अर्थ माया अथवा मूलप्रकृति असा करतात त्यांनाहि माया अथवा प्रकृति ही स्वभावतः जड असल्यामुळें सृष्टीचें कर्तृत्व तिच्या ठिकाणीं उपपन्न होत नाहीं म्हणून अव्यक्त शब्दाचा अर्थ मायाविशिष्टचैतन्य किंवा चैतन्याश्रित माया असा करावाच लागतो. अव्यक्त अवस्था ही ईश्वराची सौषुप्त अवस्था मानली जाते. हाच अभिप्राय श्रीमद्भागवतकारांनीं खालीं दिलेल्या श्लोकांत वर्णिलेला आहे.

भगवानेक आसेदमग्र आत्माऽत्मना विभुः ।
आत्मेच्छानुगतावात्मा नानामत्युपलक्षणः ।। ३।५।२३

अग्रे म्हणजे सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी अर्थात् पूर्वप्रलयकालीं हें सर्व विश्व म्हणजे केवळ एक भगवान् परमात्माच होता. हा द्रष्टा हें दृश्य असा भेदभाव त्या वेळेला कांहींच नव्हता. "आत्मनां आत्मा" पुढें सृष्टिकालीं जन्माला येणाऱ्या सर्व जीवांचा तो आत्मा म्हणजे स्वरूपच होय. तो परमात्मा विभु म्हणजे सर्वांचा स्वामी आहे. तो सर्वांचा मालक आहे. सर्ववैभवसंपन्न आहे. म्हणूनच त्याला विभु असें म्हटलेलें आहे. "आत्मा आत्मेच्छानुगतौ नानामत्युपलक्षणः" – भागवत. । आत्मेच्छा म्हणजे

माया आणि अनुगति म्हणजे अनुसरण. पुढें तोच परमात्मा त्रिगुणात्मक मायाशक्तीच्या अनुसारानें स्त्री, पुरुष, पशु, पक्षी, कीट, पतंग, देव, दानव, मानव, वृक्ष, लता, वेली इत्यादि विविध रूपांनीं नटतो व सात्त्विक, राजस आणि तामस अशा अनेक रूपांनीं प्रतीतीला येतो; म्हणूनच त्याला वरील श्लोकांमध्ये "नानामत्युपलक्षण:" असें म्हटलेलें आहे. तोच परमात्मा सृष्टिकालीं द्रष्टा, दृश्य इत्यादि अनेक रूपांनीं प्रतीतीला येतो असा त्याचा अर्थ आहे.

अव्यक्त अवस्था ही परमेश्वराची सौषुप्त अवस्था मानली जाते. सौषुप्त अवस्थेंत द्रष्टा, दृश्य इत्यादि भेदभाव कांहींच उरत नसतो हें आपण नित्याच्या दैनंदिन जीवनांत अनुभवीतच असतों. जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं.

स वा एष तदा द्रष्टा नापश्यद् दृश्यमेकराट् ।
मेनेऽसन्तमिवात्मानं सुप्तशक्तिरसुप्तदृक् ॥

— भागवत ३।५।२४

तो परमात्मा सौषुप्त अवस्थेंत द्रष्टा असूनहि कांहीं दृश्य पाहूं शकत नाहीं. कारण त्या वेळीं सर्व दृश्य प्रपंचाचा कारणस्वरूपांत अर्थात् मूलप्रकृतिस्वरूप असलेल्या मायाशक्तींत लय झालेला असतो. त्या वेळीं दृश्य असें कांहींच उरत नसल्यामुळें परमेश्वराचें द्रष्टृत्वहि मावळतें. त्या वेळीं तो परमात्मा "एकराट्" म्हणजे स्वस्वरूपानें एकटाच विराजत असतो. त्या वेळीं तो "सुप्तशक्ति" म्हणजे ज्याच्या ठिकाणच्या इच्छाशक्ति, क्रियाशक्ति इत्यादि सर्व प्रकारच्या शक्ति सुप्त झालेल्या असतात असा असतो. परमेश्वराच्या सर्व शक्ति त्या वेळीं सुप्त झालेल्या असल्या तरी तो स्वत: मात्र "असुप्तदृक्" असाच असतो. अर्थात् परमेश्वराची स्वत:सिद्ध असलेली दृक्शक्ति म्हणजे चैतन्यशक्ति ही मात्र मावळलेली नसते. ईश्वराची चैतन्यशक्ति ही सदासर्वकाळ जागृतच असते. अव्यक्त अवस्थेंतहि ती जागृत असते म्हणूनच त्याला असुप्तदृक् असें म्हटलेलें आहे. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय या पांच कोषांच्या दृष्टीनें विचार केला असतां अव्यक्त अवस्था ही ईश्वराचा आनंदमय कोष आहे.

ईश्वर जेव्हां अव्यक्त अवस्थेंतून व्यक्त अवस्थेंत येऊं लागतो तेव्हां ती त्याची तन्द्रा समजावी. या काळांत धड सुषुप्ति म्हणजे निद्राहि नसते व धड जागृतीहि नसते. अशा अवस्थेंत पूर्वीचे प्रसुप्त संस्कार स्मृतिरूपानें वर डोकें काढीत असतात. या असंबद्ध रूपानें उमटणाऱ्या संस्कारांनाच आपण स्वप्न असें नांव देत असतों. स्वप्नें हीं क्वचित् प्रसंगीं सुसंबद्ध दिसलीं तरी मुळांत तीं असंबद्धच असतात. स्वप्न आणि जागृति यांव्यतिरिक्त जी एक अवस्था क्वचित्प्रसंगीं प्रतीतीस येत असते तिला दृष्टान्त असें म्हणतात. स्वप्नांतील पदार्थ जागृतीमध्यें बाधित होत असतात तर दृष्टान्तांतील घटना जागृतीमध्यें बहुधा यथार्थरूपानें प्रतीतीला येत असतात

असा स्वप्न आणि दृष्टान्त यांतला फरक लक्षांत घ्यावा, जागृतीमध्यें प्रत्यक्ष इंद्रियांचे व्यापार अथवा हालचाली न घडतां बसल्या ठिकाणीं अथवा पडल्या ठिकाणीं जे मनांतल्या मनांत संकल्पविचार अथवा व्यापार सुरू होतात त्यांना मनोरथ असें म्हणतात. जागृति, स्वप्न, सुषुप्ति, दृष्टान्त आणि मनोरथ या अवस्थांव्यतिरिक्त अशी एक अवस्था असते कीं, ज्या अवस्थेंत इंद्रियें हीं आपआपल्या स्थानीं विश्रान्ति घेत असतात व मन हें कुंडलिनी शक्तीसह सुषुम्ना नाडीमध्यें प्रविष्ट होत असतें. सुषुम्णानाडींत प्रविष्ट झालेलें मन क्रमशः मूलाधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र, मणिपूर-चक्र, अनाहतचक्र, विशुद्धिचक्र आणि आज्ञाचक्र या सहाहि चक्रांचा भेद करून मूर्द्धस्थानीं असलेल्या सहस्रदलकमलांतील चंद्रमंडलावर विराजत असलेल्या गुरु-तत्त्वाशीं अथवा शिवतत्त्वाशीं समरस होऊन जातें. त्या अवस्थेला समाधि-अवस्था असें म्हणतात. या अवस्थेंत योगी अथवा ईश्वराचे अनन्य भक्तच राहूं शकतात. मूर्च्छा हीहि एक अवस्था असली तरी तिचा तन्द्रेमध्यें अंतर्भाव होत असल्यामुळें पृथक् निर्देश करण्याची आवश्यकता नाहीं. ज्यांच्या मतें मूर्च्छेचा तन्द्रेमध्यें अंतर्भाव होत नाहीं ते मूर्च्छा ही एक स्वतंत्र अवस्था मानतात. व्यवहारामध्यें मात्र जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीनच अवस्था प्राधान्यानें मानल्या जातात.

ईश्वरालाहि जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्था आहेतच. जागृत अवस्थेच्या आद्य कालांत आलेला ईश्वर जेव्हां चोहोंकडे दृष्टि टाकतो तेव्हां त्याला कांहींच दिसत नाहीं. प्रलयकालाची शेवटचीच ती अवस्था असल्यामुळें त्या कालांत कोणताहि दृश्य पदार्थ निर्माण झालेला नसतो. आपण एकटेच आहोंत, दुसरें कोणीच नाहीं व कांहींच नाहीं असें जेव्हा ईश्वर पाहतो तेव्हां ती अवस्था त्याला रमणीय वाटत नाहीं ! एकाकी असणें ही एक मोठी भयंकर अवस्था आहे. पण भय कोणाला? ईश्वराला कसलें भय? भय असेल तर तो ईश्वर नव्हे व ईश्वर असेल तर त्याला भय असूं शकणार नाहीं. ही गोष्ट खरी आहे. पण अनन्त जीव बीजभूत संस्काररूपानें अज्ञानांत खितपत पडलेले आहेत. हें बरें नव्हे असें वाटणें हेंच ईश्वराचें भय होय. आपण या जीवांना जन्म देऊन त्यांचें अज्ञान घालवावें व त्यांना या भयानक संसार-सागरांतून वर काढावें व त्यांना पूर्ण सुखी करावें अशी ईश्वराच्या अंतःकरणांत करुणा निर्माण होत असते. म्हणून तो एकाकी राहूं इच्छीत नाहीं. आपलें एकाकी राहणें हें खरें नव्हे असें त्याला वाटूं लागतें. एकाकी जीवन हें शून्य वाटतें, ओकें वाटतें, तें असून नसल्यासारखें वाटतें हाच अभिप्राय भागवतकारांनीं "मेनेऽसन्तमिवा-त्मानम्" या वाक्यानें प्रकट केला आहे. सृष्टिपूर्वकालीन तंद्रावस्थेंतील ईश्वर हा स्वतः विद्यमान असूनहि नसल्यासारखें मानूं लागला ! हाच अभिप्राय बृहदारण्य-कोपनिषदांत याज्ञवल्क्यमहर्षींनी व्यक्त केलेला आहे. "स वै नैव रेमे । स द्वितीय-मैच्छत् । स इममेवात्मानं द्वेधाऽपातयत् । ततः पतिश्च पत्नी चाभवताम् । ततो मनुष्या अजायन्त" बृहदारण्यक १।४।३ ईश्वराला ही एकाकी अवस्था

रमणीय वाटली नाहीं. ईश्वराचें जीवन हें समष्टिजीवन आहे पण मानवाच्या व्यष्टि-जीवनामध्यें अर्थात् वैयक्तिक जीवनामध्येंहि पण हाच अनुभव येतो. कोणी तरी दुसरें जोडीला असावें असें त्यास ब्रह्मांडीं तें पिंडीं या न्यायानें वाटूं लागतें.

शिवशक्तिस्वरूप एकभावापन्न असलेल्या त्या ईश्वरानें मायाशक्तीचा अंगीकार करून आत्मस्वरूपाचे दोन विभाग केले. जशीं एकाच द्विदल धान्याचीं दोन दलें असावींत तसेच ते दोन विभाग होते. एका विभागानें तो पुरुष बनला आणि दुसऱ्या विभागानें स्त्री बनला. पुढें त्यांच्यापासून मनु आणि शतरूपा यांचा जन्म झाला व या जोडप्यापासूनच विश्वांतील मानवमात्रांचा जन्म झालेला आहे. अव्यक्त अदस्थेंतून वर येऊं पाहणाऱ्या ईश्वराच्या ठिकाणीं जेव्हां आपण बहुरूप व्हावें, विशाल विश्वाच्या रूपानें नटावें असा संकल्प स्फुरला त्या वेळीं विश्वनिर्मितीला अनुरूप अशी सामग्री निर्माण करणें अथवा संकलित करणें आवश्यक होतें. ज्याप्रमाणें एखादी, प्रचंड इमारत बांधण्याचा संकल्प केला, निश्चय केला म्हणजे पहिल्या प्रथम दगड, चुना, सिमेंट, वाळू, विटा, लोखंड, लाकूड, पाणी, गवंडी, सुतार, कॉंट्रॅक्टर, इंजिनियर या सर्वांची जुळवाजुळव करावी लागते. तसेंच कांहींसें सृष्टि निर्माण करण्याच्या पूर्वी ईश्वरालाहि करावें लागणें स्वाभाविक आहे.

कोणत्याहि कार्याला सृष्टिकालीं सूक्ष्म अवस्थेंतून स्थूल अवस्थेकडे जावें लागतें व विनाशकालीं स्थूल अवस्थेंतून सूक्ष्म अवस्थेकडे यावें लागतें हा निसर्गाचा नियमच आहे. या नियमाला अनुसरून ईश्वरानेंहि प्रथम स्थूलसृष्टीच्या निर्मितीला अनुरूप अशीं सूक्ष्मतत्त्वें निर्माण केलीं. या सूक्ष्मतत्त्वांत पहिल्या प्रथम अव्यक्तांतून बुद्धितत्त्व निर्माण केलें. व्यवसाय अथवा अध्यवसाय म्हणजे निश्चय हें बुद्धीचें स्वरूप होय. या बुद्धितत्त्वाला कोणी विज्ञान अथवा महत्तत्त्व असेंहि म्हणतात. बुद्धितत्त्वानंतर संकल्प-विकल्पात्मक मनस्तत्त्व निर्माण झालें. कांहीं लोक महत्तत्त्वांतून अहंकार निर्माण झाला असें म्हणतात. वेदान्त्यांनी चित्ताचा मनामध्यें व अहंकारचा बुद्धीमध्यें अन्तर्भाव केलेला आहे. पौर्वापर्यभावांत मतभेद असले तरी तत्त्वांत फारसा मतभेद नाहीं ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. सृष्टिक्रमांत मनाला फार महत्त्व आहे. योगवासिष्ठकार तर मन हेंच सर्व सृष्टीचें व बंधमोक्षाचेंहि कारण मानतात. कांहीं तत्त्ववेत्ते अव्यक्तस्वरूप ईश्वरतत्त्वापासून अर्थात् मायोपाधिक आत्मचैतन्यापासून प्रथम पंचतन्मात्रांची उत्पत्ति झाली असेंहि प्रतिपादन करतात. या पंचतन्मात्रा म्हणजे क्रमशः आकाशतन्मात्रा, वायुतन्मात्रा, तेजस्तन्मात्रा, जलतन्मात्रा आणि पृथ्वीतन्मात्रा होत. कांहीं तत्त्ववेत्ते शब्दतन्मात्रा, स्पर्शतन्मात्रा रूपतन्मात्रा, रसतन्मात्रा आणि गंधतन्मात्रा असे सूक्ष्म तन्मात्रांचे पांच प्रकार मानून त्यांतून पंचमहाभूतांची उत्पत्ति झाली असें म्हणतात. हीं पंचमहाभूतें महाभूतें म्हटलीं जात असलीं तरी तीं प्रथम अतिसूक्ष्मच असतात. अतिसूक्ष्म असलेल्या पंचमहाभूतांना व्यवहारोपयोगिता यावी म्हणून त्यांना स्थूलरूप देण्यासाठीं ईश्वराकडून त्यांचे पंचीकरण केलें जातें. पांचहि महाभूतांच्या विशिष्ट

प्रमाणांत झालेल्या संमिश्रणाला पंचीकरण असें म्हणतात. पंचमहाभूतांचें पंचीकरण झालें म्हणजे त्यांना स्थूलस्वरूप प्राप्त होतें व व्यवहारक्षमताहि येते.

अव्यक्त शब्दाचा अर्थ ईश्वर असा असला तरी ईश्वराच्या मायाशक्तीलाहि उद्देशून शास्त्रज्ञ अव्यक्त शब्दाचा प्रयोग करीत असतात. त्यामुळें अव्यक्त शब्दाचा अर्थ मायातत्त्व असाहि होतो. हें ईश्वरीय मायातत्त्वच सर्व विश्वाचें मूलकारण आहे, म्हणून या मायेला मूलप्रकृति असेंहि म्हणतात. ही माया ईश्वराची शक्ति असल्यामुळें व शक्ति आणि शक्तिमान् यांच्यामध्यें अभेद असल्यामुळें ईश्वर आणि ईश्वराची माया हीं दोन्हीं मिळून सृष्टीचें कारण होत असतात. कारणें दोन प्रकारचीं असतात. एक निमित्त कारण व दुसरें उपादान कारण. घटाचें निमित्तकारण कुंभार असतो तर उपादान कारण मृत्तिका असते. त्याचप्रमाणें सृष्टीचें निमित्तकारण ईश्वर असतो तर त्याची मायाशक्ति ही उपादनकारण असते. ईश्वर आणि त्याची मायाशक्ति हीं दोन्ही अभिन्न म्हणजे एकरूप असल्यामुळें ईश्वर हा सृष्टीचें अभिन्न-निमित्तोपादान कारण आहे असें म्हटलें जातें.

वृक्षाच्या फांदीवरील एखादी अळी फांदीवरून निसटली तर लगेच ती आपल्या मुखांतून एक धागा निर्माण करून त्या धाग्याच्या साहाय्यानें धागा आपल्याच मुखानें आवरीत आवरीत फांदीच्या दिशेनें चाललेली असते हें आपण पहात असतों. त्या धाग्याचें उपादानकारण ती अळीच आहे व निमित्तकारणहि ती अळीच आहे. मात्र शरीराच्या द्वारां ती अळी त्या धाग्याचें उपादानकारण आहे व स्वगत चैतन्याच्या द्वारां ती अळी त्या धाग्याचें निमित्तकारण बनते. त्याचप्रमाणें ईश्वर हा मायाशक्तीच्या द्वारां सृष्टीचें उपादान कारण आहे तर स्वरूपभूत चैतन्यद्वारां तो सृष्टीचें निमित्तकारण आहे. उपादानकरणाचे गुण-धर्म कार्यांमध्यें सर्वत्र अनुवृत्त होत असतात. कारणांतून ते कार्यामध्यें येत असतात. निमित्तकारणाचे गुण-धर्म मात्र कार्यांत येत असलेले व्यवहारांत आढळत नाहीं. मातीचे गुणधर्म घटांत येतात, पण कुंभाराचे गुणधर्म घटांत येत नाहींत. असें असलें तरी " बाप वैसे बेटे और कुंभार वैसे लोटे " ही म्हण व्यवहारांत प्रसिद्ध आहे. त्या म्हणींतहि कांहीं अर्थ आहे. बाप हा मुलाचें निमित्तकारण आहे तथापि " मूल बापाच्या वळणावर गेलें " असे शब्द व्यवहारांत कानांवर येतात. याच न्यायानें ईश्वराचें स्वरूपभूत सत्ता, चैतन्य आणि आनंद हे सृष्टीमध्यें सर्वत्र ओतप्रोत असलेले पहावयास सांपडतात. तर मायेकडून सृष्टीमध्यें त्रिगुणात्मकता आणि नामरूपात्मकता आलेली पहावयास सांपडते. अशा रीतीनें सृष्टि ही मायेच्या अंशानें त्रिगुणात्मक व नामरूपात्मक असली तरी ईश्वराच्या अंशानें ती सच्चिदानंद-रूपहि आहे हें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें. याच अभिप्रायानें श्री विद्यारण्यांनींहि

" अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपञ्चकम् । "

असें या विश्वाचें वर्णन केलेलें आहे तें अगदीं बरोबर आहे.

## पंचीकरण

सूक्ष्म पंचमहाभूतांचें स्थूलरूपांत जेव्हां परिणमन होत असतें तेव्हां पंचमहाभूतांचें पंचीकरण होत असतें असें आपण वर वाचलेंच आहे. पंचीकरण हा एक पारिभाषिक शब्द आहे. तेव्हां आपण त्याचा अर्थ अथवा स्वरूप पाहूं या. पंचमहाभूतांचे अतिसूक्ष्म अंश सृष्टीच्या आरंभकाळीं या अनंत आकाशामध्यें विरळ स्वरूपांत विखुरलेले असतात. ते दृश्य स्वरूपांत नसतात व त्यांच्या ठिकाणीं व्यवहारक्षमताहि नसते. त्यांना व्यवहारक्षमता येण्यासाठीं स्थूलरूपानें परिणत व्हावें लागतें व त्यासाठीं पंचमहाभूतांच्या पंचीकरणाची आवश्यकता असते. पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांचे प्रथम समप्रमाणांत दोन विभाग होतात. त्यानंतर प्रत्येकाच्या एका विभागाचे पुन्हां समप्रमाण असे चार-चार विभाग होतात. नंतर ते चारहि विभाग आपल्याहून इतर भूतांच्या विभागांत जाऊन मिळतात. त्यानंतर पंचमहाभूतांतील प्रत्येक महाभूत स्वतःचा एक-द्वितीयांश व इतर चारहि महाभूतांचे प्रत्येकीं एक-अष्टमांश मिळून पूर्णपणें स्थूलस्वरूपाला येतें. उदाहरणार्थ, एकद्वितीयांश पृथ्वी, एक-अष्टमांश जल, एक-अष्टमांश तेज, एक-अष्टमांश वायु आणि एक-अष्टमांश आकाश मिळून स्थूल पृथ्वी पूर्णत्वाला येते व पुढें ती विविधरूपांनीं परिणत होते. याचप्रमाणें एक-द्वितीयांश जल, एक-अष्टमांश पृथ्वी, एक-अष्टमांश तेज, एक-अष्टमांश वायु आणि एक-अष्टमांश आकाश मिळून स्थूल जल पूर्णत्वाला येतें व तें पुढें विविधरूपांनीं परिणत होऊन व्यवहारक्षम बनतें. हीच रीति पुढें तेज, वायु आणि आकाश याहि महाभूतांची समजावी. याप्रमाणें पंचीकृत झालेल्या प्रत्येक महाभूतांत स्वतःचा एक-द्वितीयांश भाग असतो व इतर भूतांचे एकेक-अष्टमांश भाग असतात. ज्या भूताचा एक द्वितीयांश भाग असेल त्याच भूताच्या नांवानें तें पंचीकृत महाभूत ओळखलें जातें. अशा रीतीनें प्रत्येक पंचमहाभूतांत इतरहि भूतांचा समावेश असला तरी ज्याचा अंश अधिक असेल त्याच्याच नांवानें व्यवहार होत असतो. असें हें पंचीकरणाचें स्वरूप आहे.

त्रिगुणात्मक मायेपासून पंचमहाभूतांची उत्पत्ति झालेली असल्यामुळें प्रत्येक महाभूताच्या ठिकाणीं सत्त्व, रज आणि तम हे मायेचे तीन गुण आलेले असतातच. त्याच गुणत्रयानें युक्त असलेल्या पंचमहाभूतांपासून पांचभौतिक सृष्टि निर्माण होत असल्यामुळें पांचभौतिक सृष्टींतील प्रत्येक सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण असतात.

शुद्ध ब्रह्मचैतन्य सोडून बाकीच्या सर्व पदार्थांना स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन अवस्था असतातच. सृष्टीमध्यें निर्माण होणाऱ्या प्राणिमात्रांच्या शरीरांनाहि तीन अवस्था असतात. या अवस्थांतील शरीरांना क्रमशः आपण स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर असें म्हणत असतों. या शरीरांचे समष्टि आणि व्यष्टि या

रूपांनीं दोन भेद आहेत. समष्टि म्हणजे समुदाय आणि व्यष्टि म्हणजे व्यक्ति ही गोष्ट वाचकांनीं अवश्य विचारांत घ्यावी. मायाविशिष्ट चैतन्यतत्त्व ज्या ज्या वेळीं वर निर्दिष्ट केलेल्या शरीरांशीं संलग्न होतें त्या त्या वेळीं त्या अव्यक्त तत्त्वाला निर-निराळीं नांवें दिलीं जातात.

कारणशरीरसमष्टीचा अभिमान ठेवणाऱ्या अव्यक्त तत्त्वाला ईश्वर असें म्हणतात तर कारणशरीरव्यष्टीचा अभिमान ठेवणाऱ्या अव्यक्त चैतन्याला जीव असें म्हणतात. कारण शरीरव्यष्टीचा अभिमान ठेवणाऱ्या या जीवाला प्राज्ञ असें दुसरेंहि नांव आहे. अर्थात् कारणअवस्थेंतील चैतन्यतत्त्वाला समष्टि आणि व्यष्टि भेदानें ईश्वर आणि प्राज्ञ असें नांव दिलेलें आढळतें. हेंच चैतन्यतत्त्व-सूक्ष्म-शरीर समष्टीचा अभिमान ज्या वेळेला बाळगतें त्या वेळेला त्याला हिरण्यगर्भ असें नांव दिलें जातें. त्याचप्रमाणें सूक्ष्म शरीर व्यष्टीचा अभिमान बाळगणाऱ्या त्या चैतन्य तत्त्वाला तैजस असें नांव दिलें जातें. त्याचप्रमाणें स्थूलशरीर समष्टीचा अभिमान बाळगणाऱ्या त्या अव्यक्त चैतन्याला शास्त्रज्ञांनीं विराट् अथवा विराडात्मा असें नांव दिलेलें आहे. यालाच वैश्वानर असेंहि म्हणतात. हेंच चैतन्य तत्त्व स्थूल शरीरव्यष्टीचा अभिमान बाळगतें त्या वेळीं त्याला विश्व असें पारिभाषिक नांव आहे. या ठिकाणीं विश्व शब्दाचा अर्थ पृथक् पृथक् स्थूल शरीराच्या ठिकाणीं तादात्म्याभिमान ठेवणारा विशिष्ट एक प्रकारचा जीव असा आहे. तात्पर्य स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही प्रकारच्या शरीराचे व्यष्टि आणि समिष्टि भेदानें दोन-दोन प्रकार कल्पिल्यास त्या ठिकाणीं तादात्म्याभिमान ठेवणाऱ्या मायोपहित चैतन्याला क्रमशः विश्व आणि वैश्वानर, तैजस आणि हिरण्यगर्भ त्याचप्रमाणें प्राज्ञ आणि ईश्वर अशीं नांवें मिळतात. शरीरभेदानें भिन्न भिन्न रूपांनीं प्रतीतीला येणाऱ्या चैतन्याला जीवचैतन्य असें म्हणतात तर संपूर्ण जीवचैतन्याच्या ठिकाणीं तादात्म्याभिमान ठेवणाऱ्या समष्टय-भिमानी चैतन्याला ईश्वर असें म्हणतात. ईश्वर हा समष्टयभिमानी असल्यामुळें सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान आहे तर जीव हा व्यष्टयभिमानी असल्यामुळें अल्पज्ञ आणि अल्पशक्तिमान आहे ही गोष्ट वाचकांनी लक्षांत घ्यावी. कारण-शरीराच्या ठिकाणीं असलेल्या अभिमानाचा काळ ही ईश्वराची आणि जीवाची सौषुप्त अवस्था मानली जाते. कारण-शरीरसमष्टीच्या अभिमानाचा काळ ही ईश्वराची सौषुप्त अवस्था होय आणि कारण-शरीरव्यष्टीच्या अभिमानाचा काळ ही जीवाची सौषुप्त अवस्था होय. सूक्ष्म-शरीरसमष्टीच्या अभिमानाचा काळ ही ईश्वराची स्वप्नदशा मानली जाते, तर सूक्ष्म-शरीरव्यष्टीच्या अभिमानाचा काळ ही जीवाची स्वप्नदशा मानतात. स्थूल-शरीरसमष्टीच्या अभिमानाचा काळ ही ईश्वराची जागृत अवस्था आहे तर स्थूल-शरीरव्यष्टीच्या अभिमानाचा काळ ही जीवाची जागृत अवस्था समजावी.

कोशाच्या परिभाषेंत सांगावयाचें झाल्यास कारण-शरीरसमष्टि हा ईश्वराचा आनन्दमय कोश आहे तर सूक्ष्मशरीरसमष्टि हा विज्ञानमय, मनोमय आणि प्राणमय

कोश होय. सूक्ष्मशरीराला लिंगशरीर असें म्हणतात. लिंगशरीरामध्यें बुद्धितत्त्व, मन, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि पंचप्राण अशीं सतरा तत्त्वें असतात. विज्ञान शब्दाचा अर्थ बुद्धि असा असल्यामुळें बुद्धिसहित पंचज्ञानेंद्रियांना विज्ञानमय कोश असें म्हणतात. तर मनासह पंचकर्मेंद्रियांना मनोमयकोश असें म्हणतात. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पंचप्राणांच्या समुदायाला प्राणमयकोश असें म्हणतात. स्थूल-शरीरसमष्टि हा ईश्वराचा अन्नमय कोश समजावा. पृथक् पृथक् कारणशरीरें हे जीवांचे आनंदमयकोश समजावेत. पृथक् पृथक् लिंगशरीरें हे जीवांचे वर सांगितल्या-प्रमाणें विज्ञानमय, मनोमय आणि प्राणमय कोश समजावेत. पृथक् पृथक् प्रत्येक स्थूलशरीर हा जीवाचा अन्नमय कोश समजावा. असाहि जीवांचा आणि ईश्वराचा पंचकोशविवेक लक्षांत घ्यावा.

## सृष्टीची उत्पत्ति

अव्यक्त अवस्थेंतून चैतन्य तत्त्व जेव्हां व्यक्त अवस्थेंत येऊं पहातें तेव्हां तें प्रथम आपल्या अनिर्वचनीय मायाशक्तीच्या प्रभावानें निरीक्षण करीत असतें. त्यानंतर संकल्पाचें स्फुरण होतें व त्या संकल्पांतून क्रमशः सूक्ष्म सृष्टीचा आविर्भाव होऊं लागतो. प्रथम मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार यांची उत्पत्ति होते. यांनाच अन्तःकरणचतुष्टय असें म्हणतात. मनाच्या पाठोपाठ मनाची अधिष्ठात्री देवता जो चंद्रमा तो उत्पन्न होतो. बुद्धीची अधिष्ठात्री देवता जो चतुर्मुख ब्रह्मा तो उत्पन्न होतो. त्यानंतर चित्ताची अधिष्ठात्री देवता अच्युत व अहंकाराची अधिष्ठात्री देवता शंकर यांची उत्पत्ति होते.

संकल्प-विकल्प हें मनाचें कार्य असतें. तर निश्चय करणें हें बुद्धीचें कार्य असतें. स्मृति म्हणजे स्मरण हें चित्ताचें कार्य असून अहंकाराचें कार्य अहंभाव अथवा अस्मिता प्रकट करणें हें आहे.

श्रोत्र म्हणजे श्रवणेंद्रिय अथवा कान. या इंद्रियानें शब्दाचें ज्ञान होत असतें. त्वच् अथवा त्वग् म्हणजे स्पर्शेंद्रिय अथवा त्वगिन्द्रिय. या इंद्रियानें शीत, उष्ण, मृदु अथवा कठीण इत्यादि विषयांचें ज्ञान होत असतें. चक्षु म्हणजे नेत्र अथवा डोळा. या इंद्रियानें शुक्ल, नील, पीत इत्यादि विषयांचें ज्ञान होत असतें. रसनेंद्रियानें मधुर, आम्ल इत्यादि विषयांचें ज्ञान होत असतें. त्याचप्रमाणें घ्राणेन्द्रियानें आपल्याला बरा-वाईट गंध कळत असतो. या पांचहि इंद्रियांबरोबर त्यांचे विषय शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांचीहि उत्पत्ति होत असते. त्या त्या इंद्रियांवर नियंत्रण ठेवणाऱ्या पृथक् पृथक् देवताहि पण त्या त्या इंद्रियांबरोबरच प्रकट होत असतात.

श्रोत्रेंद्रियाची देवता दिक् मानलेली आहे. या ठिकाणीं दिक् हा शब्द पूर्व, पश्चिम इत्यादि दिशांचा वाचक नसून तो एका विशिष्ट देवतेचा वाचक आहे असें समजावें. त्वगिंद्रियाची देवता वायु आहे. चक्षुरिंद्रियाची देवता अर्क

म्हणजे सूर्य आहे. रसनेंद्रियाची देवता वरुण असून घ्राणेंद्रियाची देवता अश्विनी कुमार आहेत.

ज्ञानेंद्रियानंतर कर्मेंद्रियांची उत्पत्ति होत असते. ज्ञानेंद्रियांप्रमाणेंच कर्मेंद्रियेंहि पांच आहेत. (१) वाक् (२) पाणि, (३) पाद, (४) पायु आणि (५) उपस्थ अशीं त्यांचीं संस्कृत भाषेंत नांवें आहेत. वाक् शब्दाचा अर्थ वागिंद्रिय असा आहे. यालाच वाणी असेंहि म्हणतात. वागिंद्रियानें बोलण्याचें कार्य होत असतें. अग्नि ही वागिंद्रियाची अधिष्ठात्री देवता आहे. संस्कृतमधील पाणि या शब्दाचा अर्थ हात असा आहे. कोणताहि पदार्थ जवळ करणें अथवा दूर करणें हें या इंद्रियाचें स्वाभाविक कार्य आहे. एखादा पदार्थ पायानेंहि जवळ करतां येतो व दूर फेंकतां येतो ही गोष्ट खरी आहे. तथापि तें पायाचें स्वाभाविक कार्य नव्हे. इंद्र ही हाताची देवता आहे. पाद म्हणजे पाय. जाणें-येणें हें पायांचें स्वाभाविक कर्म आहे. एखाद्या वेळेला माणूस हातांनींहि चालतो पण हातांनीं चालणें हें त्याचें स्वाभाविक कर्म नव्हे. उपेन्द्र ही पायांची अधिष्ठात्री देवता आहे. संस्कृतमधील पायु या शब्दाचा अर्थ गुदेन्द्रिय असा आहे. मलाचें विसर्जन करणें हें या इंद्रियाचें कार्य आहे. यम ही या इंद्रियाची अधिष्ठात्री देवता आहे. उपस्थ या इंद्रियाचें कार्य मूत्र आणि शुक्र यांचें विसर्जन करणें हें असून आनंद हा त्याचा विषय मानलेला आहे. प्रजापति ही त्याची अधिष्ठात्री देवता आहे. याप्रमाणें पंचकर्मेंद्रियें, त्यांच्या क्रिया आणि देवता लक्षांत घ्याव्या.

## पञ्चप्राणांचीं कार्यें

आतां आपण प्राणाचा विचार करूं. बाह्य भौतिक वायु ज्या वेळेला शरीरामध्यें संचार करतो तेव्हा त्याला प्राण हें नांव मिळतें. या वायूच्या साहाय्यानेंच शरीराची सर्व हालचाल होत असते. म्हणून या वायूला प्राण असें म्हणतात. प्र-उपसर्गपूर्वक अन् या धातूपासून प्राण हा शब्द बनलेला आहे. अन् या धातूचा अर्थ हालचाल करणें असा आहे. "प्रकर्षेण अनिति अनेन इति प्राणः" विशेषेंकरून शरीराची सर्व प्रकारची हालचाल याच्यामुळे होते म्हणून या वायूला प्राण ही संज्ञा प्राप्त झालेली आहे. हा शरीरांत संचार करणारा प्राणवायु तत्त्वतः एकच प्रकारचा पण शरीरांतील निरनिराळ्या स्थानांमुळें आणि निरनिराळ्या कार्यांमुळें याचे अनेक प्रकार मानलेले आहेत. त्यांत प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे प्राणवायूचे पांच प्रकार प्रसिद्ध आहेत. त्यांतहि प्राण हाच मुख्य असून त्याचें वास्तव्य प्राधान्यानें हृदयामध्यें असतें.

"हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः ।
उदानः कण्ठदेशे स्याद् व्यानः सर्वशरीरगः ॥

प्राणवायु हा हृदयामध्यें राहतो. अपानवायूचें वास्तव्य गुदस्थानीं असतें. नाभिस्थानामध्यें राहणाऱ्या वायूला समान असें म्हणतात. तर व्यान वायूचें स्थान

सर्वच शरीर आहे. प्राणवायु हा हृदयामध्यें रहात असला तरी सर्व देहाची धारणा तोच करीत असल्यामुळें सर्व वायूंमध्यें प्राणवायूला प्राधान्य आहे. सुश्रुताचार्यांच्या मतें प्राणवायूचें संचारस्थान मुख असून अन्न आणि पाणी यांचा शरीरामध्यें प्रवेश प्राणवायूमुळेंच होत असतो. नासापुटांच्याद्वारां शरीरांतील दूषित वायूला बाहेर टाकून बाहेरचा निर्मल वायु शरीरांत घेण्याचें कार्य हाच वायु करीत असतो. प्राणवायूमुळेंच सर्व इंद्रियांना बल मिळतें. कुंडलिनी जागृत झाल्यानंतर हाच प्राणवायु मनाला बरोबर घेऊन सुषुम्ना नाडीमध्यें प्रवेश करीत असतो. मूलाधारादि सहा चक्रांचा क्रमशः भेद करून हाच प्राणवायु पुढें मूर्द्धस्थानीं असलेल्या सहस्रदलकमलांत प्रवेश करतो तेव्हां योग्याला समाधिसौख्याचा लाभ होत असतो. अशा रीतीनें प्राणवायूचीं कार्यें हीं अत्यंत महत्त्वाचीं असल्याचें दिसून येतें.

प्राणवायूची अधिष्ठात्री देवता "विशिष्ट" या नांवानें शास्त्रांत निर्देशिलेली आहे. विशिष्ट हा शब्द विष्णूचा वाचक असल्याचें विष्णुसहस्रनामांमध्यें प्रसिद्ध आहे. "शिष्टो विशिष्टः शिष्टेष्टः" अशीं विष्णूचीं नांवें सहस्रनामांमध्यें दिलेलीं आहेत. येथेंहि विशिष्ट शब्दाचा अर्थ विष्णु असा समजण्यास हरकत नाहीं.

अपान शब्दाचा अर्थ खालीं टाकण्याची क्रिया करणारा असा आहे. शरीरांतील मलमूत्र इत्यादिकांचें विसर्जन करणाऱ्या वायूला अपानवायु असें म्हणतात. याचें वास्तव्य गुदस्थानाजवळ असतें. अपानवायूच्या देवतेला "विश्वसृष्ट" असें म्हणतात. विश्वसृष्ट शब्दाचाहि अर्थ विष्णु असाच समजावा; कारण सर्व विश्व विष्णूनेंच सृष्ट म्हणजे निर्माण केलेलें आहे. कांहीं ठिकाणीं विश्वस्रष्टा असाच पाठ आढळतो. म्हणजे विश्वाचा निर्माता भगवान् विष्णु हा अर्थ उघडच आहे. शुक्र, आर्तव आणि गर्भ यांचें योग्य वेळीं विसर्जन करणें हेंहि अपान वायूचेंच कार्य असल्याचें आयुर्वेद सांगत आहे.

पंचप्राणान्तर्गत व्यान हा वायु सर्व देहभर संचार करीत असतो. देहांतील रसरक्तादि धातूंचें नखशिखान्त सर्व देहांत याच वायूमुळें अभिसरण होत असतें. या वायूची अधिष्ठात्री देवता "विश्वयोनि" ही आहे. विश्वयोनि हेंहि विष्णूचेंच नांव आहे. विश्वयोनि या शब्दाचा अर्थ विश्वाचें कारण असा आहे.

उदान नांवाचा चौथा वायु. हा शरीरामध्यें कंठस्थानीं रहात असून बोलणें, गाणें इत्यादि क्रिया या उदान वायूच्याच साहाय्यानें होत असतात. उदान वायूची देवता अज आहे. अज शब्दाचाहि अर्थ जन्मविर्वाजित अनादि भगवान् विष्णु असाच आहे. पंचप्राणान्तर्गत समान या नांवाचा वायु हा शरीरामध्यें नाभिस्थानाजवळ रहात असून जाठराग्नीला प्रफुल्लित अर्थात् प्रदीप्त ठेवण्याचें तो कार्य करीत असतो. शरीरांतील रसरक्तादि सर्व धातूंच्या अग्नींनाहि तोच बळ देत असतो. आपण जें कांहीं खातों, पितों त्याचें पचन याच अग्नीमुळें होत असतें. आपण घेतलेल्या आहाराचें सार, कट्ट, मल, मूत्र इत्यादि रूपांनीं पृथक्करण करण्याचेंहि कार्य समानवायूकडूनच होत

असतें. किंबहुना सर्व धातूंना आहार-रसाचा पुरवठा देऊन समीकरणाचेंहि कार्य हाच वायु करीत असतो. जणूं कांहीं शरीरसंस्थेंतील नियोजनमंडळाचा तो अध्यक्षच आहे. समानवायूच्या अधिष्ठात्री देवतेला "जय" असें नांव दिलेलें आहे. जय शब्दाचाहि अर्थ विष्णु असाच आहे.

कारण-शरीर हें अवस्थेच्या दृष्टीनें सौषुप्तावस्थास्वरूप असतें व कोशाच्या दृष्टीनें आनंदमयकोशस्वरूप असतें हें आपण वर पाहिलेंच आहे. हें कारण-शरीर अज्ञान-स्वरूप असतें. या अज्ञानालाच तत्त्वज्ञ मूलाज्ञान असें म्हणतात. हें अज्ञान व्यष्टि आणि समष्टि या रूपांनीं दोन प्रकारचें आहे. व्यष्टिरूप अज्ञानाला अविद्या असें दुसरें नांव आहे. हा जीवाचा उपाधि आहे. अविद्येनें उपहित म्हणजे संबंधित झालेल्या चैतन्यालाच जीव असें म्हणतात. या अविद्येमुळेंच शुद्ध चैतन्याला जीवभाव प्राप्त होतो. "न विद्यते इति अविद्या" अशी अविद्या शब्दाची व्युत्पत्ति आहे. पाहूं गेलें असतां जिचें स्वरूप हातीं लागत नाहीं म्हणून तिला अविद्या असें म्हणतात. "न विद्यते" या व्युत्पत्तीवरून अविद्या ही अभावस्वरूप आहे कीं काय अशी कोणी शंका घेईल पण ही शंका बरोबर नाहीं. कारण अविद्या जर अभावस्वरूप मानली तर तिची भाव-रूपानें जीं कार्यें प्रतीतीला येतात तीं उपपन्न होणार नाहीत. कारण अभावांतून भाव-रूप कार्याची निष्पत्ति होऊं शकत नसते. निर्माण होणारीं सर्व कार्यें भावरूपानें प्रतीतीला येत असल्यानें त्यांचें कारण असलेली अविद्या ही अभावस्वरूप आहे असें म्हणतां येत नाही. बरें अविद्या ही भावरूप आहे असें म्हणावें तर तिची तशी प्रतीति येत नाहीं. आत्मसाक्षात्कारानंतर अविद्येचा बाध होत असल्यामुळें अविद्येला सत् असेंहि म्हणतां येत नाहीं व तिचीं कार्यें प्रतीतीला येत असल्यामुळें तिला असत् असेंहि म्हणतां येत नाही. असें हे अविद्येचें स्वरूप मोठें विचित्र आहे. ही स्थिति जर अविद्येची आहे तर मग अविद्यासमष्टिस्वरूप असलेल्या मायेबद्दल काय सांगावें? फरक एवढाच आहे कीं जीव हे अविद्येच्या जाळ्यांत गुरफटतात व दुःखें भोगतात आणि ईश्वर हा मायापाशांत कधींच गुरफटत नाहीं. उलट मायेलाच तो आपल्या अधीन करून ठेवतो. यामुळें तो समर्थ आणि स्वतंत्र आहे.

## अवस्थात्रय-विचार

मूलाविद्या ही जीवांच्या संसाराला कारणीभूत आहे तर मूळमाया ही ईश्वराच्या सर्व कर्तृत्वाला कारणीभूत आहे. सौषुप्त अवस्थेच्या अथवा आनंदमय कोशाच्या अवस्थेंत असलेल्या या मूलाज्ञानाच्याहि तीन अवस्था आहेत. त्यांना अज्ञानवृत्ति असें म्हणतात. प्रिय, मोद आणि प्रमोद अशीं त्या वृत्तींचीं नांवें आहेत. प्रिय शब्दाचा अर्थ सुख अथवा आनंद असा आहे. योग्य वेळीं पुत्र, मित्र अथवा कलत्र इत्यादि प्रिय व्यक्ति अथवा आपल्याला आवडणाऱ्या वस्तु दृष्टीस पडल्या म्हणजे जो आनंद होतो त्याला 'प्रिय' असें म्हणतात. प्रिय वस्तूंचा लाभ झाला असतां जो हर्ष होतो त्याला 'मोद'

असें म्हटलेलें आहे. तोच हर्ष ज्या वेळेला प्रकृष्ट कोटीला पोहोंचतो त्या वेळीं त्याला 'प्रमोद' असें म्हणतात. हा आनंद प्रथम कारण अवस्थेंत फारच सूक्ष्म रूपानें असतो. पुढें तो अभिव्यक्त होतांना सूक्ष्म स्वरूपांत येतो व पुढें तोच आनंद स्थूल रूपानें परिणत होतो. असा हा स्थूल, सूक्ष्म आणि कारण अथवा जागृत, स्वप्न आणि सुषुप्ति यांचा विचार शास्त्रज्ञांनीं केलेला आहे. या सर्व अवस्था जीवाप्रमाणें ईश्वरालाहि आहेतच. पण ईश्वर हा सर्वज्ञ असल्यामुळें या सर्वांत असूनहि मुक्त आहे व जीवमात्र अज्ञानामुळें या सर्व मायाजालांत गुरफटतो आणि संसारबंधनांत बद्ध होतो. या जीवांना संसार-बंधनांतून सोडविण्यासाठींच परमेश्वराला विविध अवतार घ्यावे लागतात. या विविध अवतारांतच सर्व संसारबंधनांना कारणीभूत असलेल्या अज्ञानरूप बंधनाचें समूल निरसन करण्याकरितांच परमेश्वराला सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या रूपानें अवतरावें लागलें आहे.

ज्या जीवांच्या उद्धारासाठीं परमेश्वराला ज्या रूपानें अवतार घ्यावा लागतो त्या रूपानें अवतार घेण्यापूर्वी त्या त्या जीवांचे व जीवांच्या वास्तव्यासाठीं आणि जीवनासाठीं सृष्टीचें अस्तित्व असणें अपरिहार्य आहे. याच अभिप्रायानें परमेश्वर प्रथम चराचर सृष्टि निर्माण करतो. सृष्टीची सर्व घडामोड ही सापेक्षतावादावरच अवलंबून असल्यामुळें परमेश्वराच्या ठिकाणीं प्रथम सर्व जीवांना त्यांच्या त्यांच्या पूर्वसृष्टींतील कर्माप्रमाणें जन्म देण्याची अपेक्षा निर्माण होते. जीवांना जन्म देण्यासाठीं शरीरांची निर्मिति करणें आवश्यक आहे. स्थूल शरीरें हीं अन्नमय असल्यामुळें त्यांच्या-करितां अन्न निर्माण करण्याची आवश्यकता वाटूं लागली. अन्नासाठीं धान्याची व धान्यासाठी विविध वनस्पति, वनस्पति आणि त्यांच्याबरोबरच वृक्षलता, वेली इत्या-दिकांच्याहि उत्पत्तीची आवश्यकता वाटूं लागली ! या सर्व गोष्टी पांचभौतिक अस-ल्यामुळें त्यांच्यासाठीं पंचमहाभूतांची उत्पत्ति करणें अपरिहार्य वाटूं लागलें. याप्रमाणें भूत-भौतिक सृष्टीच्या आविर्भावाची ही सुसंबद्ध शृङ्खला आहे.

स्थूलांची उत्पत्ति ही नेहमीं सूक्ष्मांतून होत असते, सूक्ष्मांची सूक्ष्मतरांतून व सूक्ष्मतरांची सूक्ष्मतमांतून होत असते. हा सिद्धान्त सर्वशास्त्रसंमत आहे. या सिद्धा-न्ताला अनुसरून तैत्तिरीयोपनिषदानें सृष्टीचा उत्पत्तिक्रम मोठा सुसंबद्ध व सोपपत्तिक वर्णिलेला आहे. सृष्टि उत्पन्न होतांना अव्यक्तसंज्ञक मायोपाधिक आत्मचैतन्यापासून प्रथम आकाश निर्माण झालें, कारण पुढें निर्माण होणाऱ्या सृष्टीला प्रथम अवकाश-स्वरूप आकाशाची गरज आहे. अवकाश म्हणजे पोकळी हेंच आकाशाचें स्वरूप आहे. अवकाशस्वरूप आकाश नसेल तर सृष्टि निर्माण होणार कोठें ? अशी ही अवकाशाची गरज भासल्यामुळेंच परमेश्वरानें प्रथम अवकाशस्वरूप आकाश निर्माण केलें. पंच-महाभूतांमध्यें आकाश हें अत्यंत सूक्ष्म आहे. कारण तें हातानें स्पर्श करून कळत नाहीं, डोळयाला दिसत नाहीं, तें जिभेनें चाखतां येत नाहीं, कीं नाकानें गुलाबाच्या सुगंधा-प्रमाणें हुंगून कळत नाहीं. कानानें आकाशांतला शब्दमात्र कळतो पण आकाश कळत

नाहीं. पंचज्ञानेंद्रियांपैकीं कोणत्याहि ज्ञानेंद्रियानें आकाशाचें ज्ञान होत नाहीं. तें केवळ शब्द या गुणावरून अनुमानानें जाणावें लागतें. शब्द हा आकाशाचा असाधारण गुण आहे. तो त्याचा स्वतःसिद्ध नैसर्गिक गुण आहे. एका शब्दाव्यतिरिक्त दुसरा कोणताहि विशेष गुण आकाशाच्या ठिकाणीं रहात नसल्यामुळें आकाशाची बाह्य ज्ञानेंद्रियांनीं प्रतीति येत नाहीं. याच कारणामुळें आकाश हें अतिसूक्ष्म आहे असें मानलें जातें. तें जसें अतिसूक्ष्म आहे तसेंच अतिमहानहि आहे. कारण सर्वच सृष्टि आकाशाच्या उदरांत सामावलेली असते. असें असलें तरी ज्या आत्मचैतन्यांतून आकाशाची उत्पत्ति झाली आहे तें आत्मचैतन्यस्वरूप ईश्वरतत्त्व आकाशापेक्षांहि मोठें आहे यांत शंकाच नाहीं.

## सृष्टीची सापेक्षता

सृष्टीमध्यें जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या जीवनासाठीं हवेची आवश्यकता असते. हवेशिवाय प्राणी जगूंच शकत नाहीं. हवेशिवाय बीजहि अंकुरत नाहीं. किंबहुना हवेशिवाय सृष्टीचें पानहि हलूं शकत नाहीं. याकरितां आकाशापाठोपाठ वायूची उत्पत्ति झाली. वायु हा त्वगिंद्रियानें जाणला जातो. आकाशांतूनच वायूची उत्पत्ति झाली असल्यामुळें वायु हें आकाशाचें कार्य आहे. कार्य हें कारणापेक्षा स्थूल असल्यामुळें त्याचें ज्ञान होणें सुलभ असतें. आकाशापासून उत्पन्न झालेला वायु आपल्याला त्वगिंद्रियानें कळतो. स्पर्श हा वायूचा स्वाभाविक गुण असून शब्द हा आकाशाकडून वायूच्या ठिकाणीं आलेला असतो. याप्रमाणें वायूच्या ठिकाणीं स्वतःचा स्पर्श व आकाशाकडून आलेला शब्द असे दोन विशेष गुण असतात. म्हणून वायु हा आकाशापेक्षां स्थूल मानला जातो. सृष्टींतील पदार्थांना रूपांतरानें परिणत होण्यासाठीं तेजाची अत्यंत आवश्यकता असते. कोणत्याहि वस्तूला विकसित होण्यासाठी अथवा निराळ्या रूपानें परिणत होण्यासाठीं तेजाच्या ठिकाणीं असलेला औष्ण्य हा धर्म अत्यंत उपयुक्त असतो. औष्ण्यामुळेंच पदार्थांचें रूपांतर होत असतें. याचकरितां सृष्टीमध्यें वायूच्या पाठोपाठ तेजाची उत्पत्ति झाली. तेजाच्या ठिकाणीं रूप हा त्याचा स्वाभाविक गुण असून औष्ण्य हेंहि पण त्याच्या साहचर्यानें विराजत असतें. तेजाच्या ठिकाणीं शब्द आणि स्पर्श हे दोन गुण आकाश आणि वायु यांच्याकडून आलेले आहेत. एकंदर तेजाच्या ठिकाणीं शब्द, स्पर्श, आणि रूप हे तीन गुण प्रतीतीला येत असल्यामुळें तेजोरूपी महाभूत हें अधिक स्थूल मानलें जातें. जल हें तर सजीव सृष्टीचें जीवनच आहे. जलावांचून जीवांचें जगणेंच अशक्य असल्यामुळें तेजाच्या पाठोपाठ जलाची उत्पत्ति झाली. रस हा जलाचा सहजसिद्ध असाधारण गुण आहे.व शब्द,स्पर्श आणि रूप हे तीन धर्म आकाश, वायु आणि तेज यांच्याकडून आलेले आहेत. एकंदर जलाच्या ठिकाणीं शब्द, स्पर्श, रूप आणि रस इतके गुण रहात असल्यामुळें आकाश, वायु आणि तेज यांच्यापेक्षां जल हें अधिक स्थूल आहे. ज्या बीजांतून चराचर सर्वसृष्टीचा आविर्भाव होतो तीं बीजें अंकुरित होण्यासाठीं पृथ्वीची आवश्यकता आहे. म्हणून जलानंतर

पृथ्वी उत्पन्न झाली. गंध हा पृथ्वीचा स्वगत विशेष गुण असून मागील चार महाभूतां-कडून क्रमशः शब्द, स्पर्श, रूप आणि रस हे चार गुण आलेले असतात. कारणांच्या ठिकाणीं असलेले गुण हे कार्याच्या ठिकाणींहि प्रकट होत असतात. याला शास्त्रामध्यें "कारणगुणप्रक्रमन्याय" असें म्हणतात. कारणांच्या ठिकाणीं असलेल्या गुणांचें कार्याच्या ठिकाणीं प्रकट होणें असा त्याचा अर्थ आहे. पृथ्वीच्या ठिकाणीं शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पांचहि गुण असल्यामुळें पंचमहाभूतांमध्यें पृथ्वी ही अधिक स्थूल मानली जाते. अशा रीतीनें ईश्वरापासून पंचमहाभूतांची उत्पत्ति झाल्यानंतर व्यावहारिक कार्यक्षमतेच्या दृष्टीनें त्या पंचमहाभूतांचें पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें पंचीकरण केलें जातें व या पंचीकृत पंच महाभूतांपासूनच सर्व सृष्टि निर्माण होते. पृथ्वीपासून ओषधि, ओषधीपासून अन्न आणि अन्नापासून सर्व प्रकारचीं शरीरें उत्पन्न होतात. अन्न आणि पाणी हेंच शरीराच्या पोषणाचें मुख्य साधन आहे. असा हा सृष्टीच्या उत्पत्तीचा स्थूल मानानें क्रम सांगितलेला आहे. जन्माला येणाऱ्या बाळासाठीं मातेच्या देहांत जशी दुधाची उत्पत्ति होते त्याचप्रमाणें चरसृष्टींतील प्राणी जन्माला येण्यापूर्वीच परमेश्वरानें त्या प्राण्यांच्या निर्वाहासाठीं वृक्ष, लता, वेली, वनस्पति या रूपांनी अन्न आणि पाणी निर्माण केलेलें आहे. यावरून परमेश्वराच्या अंगचें सुविचारित्व, दयालुत्व आणि कार्यक्षमत्व इत्यादि गुण स्पष्टपणें प्रतीतीला येत आहेत.

## ईश्वराचे तीन अवतार

याच ईश्वरानें सृष्टीच्या आरंभकालापासून आत्तांपर्यंत अनेक अवतार घेतलेले आहेत. सृष्टीच्या आरंभकालांतील ईश्वराचा जो पहिला अवतार आहे त्याला उत्तम-पुरुष अथवा पुरुषोत्तम असें म्हणतात. हा परमेश्वराचा षोडशकलात्मक पूर्णावतार मानला जातो. कला शब्दाचा अर्थ अंश अथवा सोळावा हिस्सा असा आहे. चंद्र जसा सोळा कलांनीं पूर्ण झाला म्हणजे पूर्णरूपानें प्रतीतीला येतो त्याचप्रमाणें सोळा कलांनीं पूर्ण असलेल्या परमेश्वराचीहि तत्त्ववेत्त्यांना पूर्णत्वानें प्रतीति येत असते. पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें आणि सोळावें मन ह्याच त्या परमेश्वराच्या सोळा कला होत.

"कलाश्च पञ्चभूतानि ज्ञानकर्मेन्द्रियाणि च ।
पञ्च पञ्च मनश्चेति षोडशोक्ता महर्षिभिः ।। "

ईश्वररूपानें अवतार घेत असतांना ज्याच्या स्वरूपांत या सोळा कला पूर्णत्वानें प्रवेश करतात असें श्रुतीनेंहि परमेश्वराचें वर्णन केलेलें आहे. "यस्मिन्नेताः षोडशकलाः प्रविशन्ति" असें श्रुतिवचन आहे. हा परमेश्वर षडैश्वर्यसंपन्न असल्यामुळें त्याला पूर्ण अथवा पूर्णपुरुष असें म्हणतात. ईश्वराचें ऐश्वर्य हें सहा प्रकारांचें आहे. (१) ऐश्वर्य म्हणजे संपूर्ण सत्तासामर्थ्य, (२) धर्म म्हणजे धारणशक्ति. अनंतकोटि ब्रह्मांडांची धारणशक्ति ही ईश्वराच्या ठिकाणीं परिपूर्ण असल्यामुळे ईश्वराच्या ठिकाणी धर्माचेंहि ऐश्वर्य परिपूर्ण आहे. "एष सेतुर्विधरणः" पाण्याची वाताहत होऊं न

देतां पाण्याला आवरून धरणारा जसा बांध असावा त्याचप्रमाणें परमात्मा हा विश्वाला विस्कळित होऊं न देतां विश्वाची सर्व बाजूंनीं धारणा करतो म्हणून परमेश्वराला धर्म असेंच नांव दिलें गेलें आहे व धर्माचें ऐश्वर्यहि त्याच्या ठिकाणीं परिपूर्ण आहे. श्रुतींतील सेतु शब्दाचा अर्थ बांध असून विधरण शब्दाचा अर्थ धारण करणारा, आवरणारा अथवा विस्कळीत होऊं न देणारा असा आहे. (३) परमेश्वराच्या ठिकाणीं यशाची म्हणजे कीर्तीचीहि पूर्णता आहे. (४) श्री म्हणजे वैभव. तेंहि परमेश्वराच्या ठिकाणीं सर्वांगपरिपूर्ण आहे. (५) परमेश्वराच्या ज्ञानाचेंहि वैभव परिपूर्ण असून त्याचें (६) वैराग्यहि पराकोटींचें आहे. अखंड वैभवांत निरंतर राहूनहि त्या वैभवाच्या ठिकाणीं तिळमात्रहि आसक्ति नसणें हीच वैराग्याची पराकाष्ठा होय. या सहाहि प्रकारच्या ऐश्वर्याला संस्कृत भाषेंत "भग" असें म्हणतात व हीं सर्व ऐश्वर्यें परमेश्वराच्या ठिकाणीं असल्यामुळें परमेश्वराला भगवान् असें म्हणतात.

जगृहे पौरुषं रूपं भगवान्महदादिभिः ।
संभूतं षोडशकलमादौ लोकसिसृक्षया ।। भागवत १।३।१

अथवा परमेश्वराच्या ठिकाणीं असलेल्या विशिष्टशक्ति असाहि कला शब्दाचा अर्थ करतात. यद्यपि परमेश्वराच्या शक्ति अनंत आहेत तथापि त्यांची प्रामुख्यानें सोळा संख्येनें परिगणना केलेली आहे. या सोळा संख्येंतच इतर सर्व शक्तींचा अंतर्भाव होतो. त्या सोळा कला अशा —

"श्रीर्भूः कीर्तिरिला कान्तिर्लीला विद्येति सप्तकम् ।
विमलाद्या नवेत्येता मुख्याः षोडश शक्तयः ।।
विमलोत्कर्षिणी ज्ञाना क्रिया योगा तथैव च ।
प्रह्वी सत्या तथेशानाऽनुग्रहेति नव स्मृताः ।।"

(१) वैभवशक्ति, (२) बहुरूपानें संपन्न होण्याचें सामर्थ्य, (३) कीर्तिशक्ति, (४) वाक्शक्ति, (५) कान्ति म्हणजे तेज, (६) क्रीडाशक्ति, (७) विद्या म्हणजे शिल्पकलासामर्थ्य, (८) विमला नैर्मल्यशक्ति, (९) उत्कर्षशक्ति, (१०) ज्ञाना म्हणजे परमार्थ–ज्ञानशक्ति, (११) क्रियाशक्ति, (१२) योगशक्ति, (१३) प्रह्वीशक्ति म्हणजे नम्रभाव अथवा विनयशक्ति, (१४) सत्याशक्ति, (१५) ईशाना म्हणजे प्रभु शक्ति आणि (१६) अनुग्रहशक्ति अशा या परमेश्वराच्या सोळा शक्ति म्हणजे सोळा कलाच आहेत.

सर्व कलांनीं परिपूर्ण असलेल्या परमेश्वरानें सृष्टि निर्माण करतांना प्रथम महत्तत्त्व, अहंकारतत्त्व, पंचतन्मात्रा, इंद्रियात्मक तत्त्वें, पंचमहाभूतें इत्यादि सूक्ष्मतत्त्वात्मक सृष्टि निर्माण केल्यानंतर विशेषतः पंचमहाभूतांच्या साहाय्यानें लम्बवर्तुलाकार ब्रह्मांडाची रचना केली. या रचनेंत भूलोकापासून क्रमशः वर वर सप्तलोकांची

म्हणजे भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक अशा सात लोकांची रचना झाली. त्याचप्रमाणें भूलोकापासून क्रमशः खालीं खालीं सात पाताळांची रचना झाली. त्यांचीं क्रमशः नांवें अशीं :– (१) अतल, (२) वितल, (३) सुतल, (४) रसातल, (५) तलातल, (६) महातल, (७) पाताल. खालच्या व वरच्या या सर्व लोकांना भुवन असेंहि म्हणतात. एका ब्रह्मांडांत चौदा भुवनें असतात. अशा अनंत ब्रह्मांडांनीं ही सृष्टि नटलेली असते. ब्रह्मांडांतील चौदा भुवनें हें एक परमेश्वराचें विराट् स्वरूपच मानलें जातें.

सत्त्व, रज आणि तम हे जे मायेचे स्वाभाविक गुण आहेत ते परमेश्वराच्या ठिकाणीं औपाधिक या स्वरूपानें प्रकट होतात. याच गुणांच्या साहाय्यानें परमेश्वर वेळोवेळीं विविध रूपें धारण करीत असतो. स्थूलसृष्टि निर्माण करण्याकरितां पुरुषोत्तमानें रजोगुणप्रधान असा ब्रह्मदेवाचा अवतार घेतला. मानवांना आत्मकल्याणाचा मार्ग दाखविणारे वेदहि पण ब्रह्मदेवाला त्यानेंच शिकविले. ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या सृष्टीचें संगोपन करण्याकरितां सत्त्वगुणप्रधान असा विष्णूचा अवतारहि पण त्यानेंच घेतला. त्याचप्रमाणें पृथ्वीचा संहार करण्याकरितां तमोगुणप्रधान असा रुद्राचाहि पण अवतार त्याच परमेश्वरानें घेतला. याप्रमाणें ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या तीन रूपांनीं नटून जगाच्या उत्पत्तीचें, स्थितीचें आणि प्रळयाचेंहि कार्य तो परमात्मा करूं लागला. कांहीं तत्त्ववेत्ते ब्रह्मदेवाचा विराट् पुरुषामध्यें अंतर्भाव करतात, विष्णूचा हिरण्य-गर्भामध्ये अंतर्भाव करतात व रुद्राचा ईश्वरामध्यें अंतर्भाव करतात. तात्पर्य, विराडात्मा, हिरण्यगर्भ आणि ईश्वर म्हणजेच ब्रह्मा, विष्णु आणि शंकर होत. याच तीन मूर्तींच्या समन्वयांतून त्रिमूर्ति भगवान् श्री दत्तात्रेय यांचा आविष्कार झालेला आहे हें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें.

" अवताराह्यसंख्येया हरेस्तत्त्वनिधेर्द्विजाः ।
यथाऽविदासिनः कुल्याः सरसः स्युः सहस्रशः ॥ "

ज्याच्यांतून अविरत जलस्रोत उसळत आहेत अशा मुळाशीं असलेल्या निर्झरांच्या जिवंत जलानें तुडुंब भरलेल्या तडागांतून ज्याप्रमाणें सर्व बाजूंनीं हजारों पाट वाहत असावेत त्याचप्रमाणें, मायोपहित ब्रह्मचैतन्यस्वरूप श्रीहरीपासून असंख्य अवतार झालेले आहेत. त्यांतील कांहीं प्रमुख अवतारांचें स्वरूप व कार्य पहात पहात आपण आतां आपल्या चरित्रनायकाच्या अर्थात् सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कथासंदर्भाकडे येऊं.

## परमेश्वराचे विविध अवतार

शुद्धब्रह्मचैतन्यांतून परमात्मा प्रथम आविर्भूत झाला. मायारूप उपाधीचा अंगीकार करून तो जगाच्या कल्याणासाठीं विश्वरूपानें नटला व प्राणिमात्रांच्या शरीरांत जीवरूपानें प्रविष्ट झाला. हा परमेश्वराचा पुरुषोत्तमसंज्ञक पहिला अवतार

होय. या पुरुषोत्तमानें स्वसंकल्पबलानें क्षीरसागरांत विश्रांति घेत असतां आपल्या नाभिस्थानांतून एक कमल निर्माण केलें. याच कमलांतून ब्रह्मदेवाचा जन्म झाला ब्रह्मदेवांची अंगकांति जातिवंत गुलाबाच्या फुलाप्रमाणें गौरवर्ण असून त्यांना चार मुखें व चार हात आहेत. उजव्या हातांत अक्षमाला व डाव्या हातांत कमंडलु आहे. त्याचप्रमाणें वरील उजव्या हातांत स्रुवा म्हणजे पळी व डाव्या हातांत पुस्तक धारण केलें आहे. मस्तकावर जटा आणि मुकुट शोभत असून त्यांनीं यज्ञोपवीत धारण केलेलें आहे. कमळामध्यें ते पद्मासन घालून वसलेले असून त्यांची मूर्ति ध्यानस्थ आहे. हा पुरुषोत्तमाचा अर्थात् शेषशायी भगवंताचा दुसरा अवतार होय.

श्रीहरीच्या नाभिकमलांतून प्रकट झाल्याबरोवर ब्रह्मदेव प्रथम गोंधळला. मी कोण, कोठून आलों व मी काय करावयाचें आहे हें त्याला कांहीं सुचेना. अखेर ईश्वरी संकेतानें त्याला तप करण्याचा आदेश मिळाला. मानवानेंहि बुद्धीमध्यें गोंधळ निर्माण झाल्यानंतर तप करावें असाच यांतला अभिप्राय आहे. मन शांत ठेवून सम्यक् चिंतन करणें हेंच तप होय. ब्रह्मदेवानें तप केलें तेव्हां त्याला ईश्वर भेटला. ईश्वरानें ब्रह्मदेवाला अध्यात्मज्ञानाचा उपदेश करून त्याच्या बुद्धींतील व्यामोह दूर केला. अध्यात्मज्ञानाशिवाय बुद्धींतला व्यामोह कधीं दूर होत नाहीं. पुढें ब्रह्मदेवाला ईश्वरानें वेदांचा उपदेश करून जीवसृष्टि निर्माण करण्याची आज्ञा केली. ब्रह्मदेवानें ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें आपल्या संकल्पबलानें मनापासून व देहापासून कांहीं ऋषींना व प्रजापतींना जन्म दिला. ते ऋषि सनक, सनन्दन, सनातन व सनत्कुमार म्हणून प्रसिद्धीस आले. त्यानंतर सनत्सुजातांचा जन्म झाला. हे सर्व अत्यंत विरक्त होते. जनतेशीं त्यांचा फारसा संपर्क आला नाहीं.

यानंतर ब्रह्मदेवानें पुन्हां कांहीं ऋषींना जन्म दिला. (१) मरीचि, (२) अत्रि, (३) अंगिरा, (४) पुलस्त्य, (५) पुलह, (६) क्रतु आणि (७) वसिष्ठ यांची ऋषिसमुदायांत प्रामुख्यानें गणना होते. हे सप्तर्षि म्हणूनच ओळखले जातात. या ऋषींनीं प्राधान्यानें वेद आणि वैदिक संस्कृति यांच्या संरक्षणाचें कार्य करावें असें त्यांना सांगण्यांत आलें. हे ऋषि, ऋषि तर होतेच पण प्रजापतींमध्येंहि त्यांचा अंतर्भाव केलेला आढळतो. प्रचेता, भृगु आणि नारद यांचाहि प्रजापतींमध्यें अंतर्भाव करून ब्रह्मदेवानें दहा प्रजापतींना जन्म दिला. महाभारतामध्यें तर एकवीस प्रजापतींची नांवें दिलेलीं आहेत. त्यांत ब्रह्मदेवाचाहि अंतर्भाव केलेला आहे.

ब्रह्मास्थाणुर्मनुर्दक्षो भृगुर्धर्मस्तथा यमः ।
मरीचिरङ्गिरात्रिश्च पुलस्त्यः पुलहः क्रतुः ॥
वसिष्ठः परमेष्ठी च विवस्वान् सोम एव च ।
कर्दमश्चापि यः प्रोक्तः क्रोधोऽर्वाक् क्रीत एव च ।
एकविंशतिरुत्पन्नास्ते प्रजापतयः स्मृताः ।

ब्रह्मा, स्थाणु, मनु, दक्ष, भृगु, धर्म, यम, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वशिष्ठ, परमेष्ठी, विवस्वान्, सोम, कर्दम, क्रोध, अर्वाक् आणि क्रीत असे हे एकवीस प्रजापति आहेत. यांत आपले चरित्रनायक भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे पिता श्रीअत्रिमहर्षि यांचा सप्तर्षींमध्यें आणि एकवीस प्रजापतींमध्येंहि अंतर्भाव आहे ही गोष्ट वाचकांनी अवश्य लक्षांत घ्यावी. यावरून दत्तात्रेयांचें महत्त्व आणि पुरातनत्व या दोन्ही गोष्टी लक्षांत येण्यासारख्या आहेत. वरील श्लोकांत उल्लेखिलेले सोम हे दत्तात्रेयांचे सख्खे बंधु असून कर्दम प्रजापति हे दत्तात्रेयांचे आजोबा म्हणजे आईचे वडील आहेत. स्वायंभुव मनु हे दत्तात्रेयांच्या आईचे आजोबा असून प्रत्यक्ष ब्रह्मदेव हे वडिलांच्या बाजूनें आजोबा अर्थात् वडिलांचे वडील आहेत हीहि गोष्ट वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावी. याप्रमाणें ब्रह्मदेवानें ऋषि आणि प्रजापति यांना जन्म देऊन ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें सर्व सृष्टि पूर्णपणें निर्माण केली. असें हें ईश्वराच्या दुसऱ्या अवताराचें स्वरूप व कार्य आहे.

पुढें जन्माला येणाऱ्या जिज्ञासु भक्तांना भक्तिमार्गाचा उपदेश करण्याकरितां परमेश्वरानें तिसरा नारदाचा अवतार घेतला. हा अवतार ब्रह्मदेवापासून झाला. त्यांनीं उपदेशिलेला भक्तिमार्ग हा नारदपंचरात्र या ग्रंथांत पहावयास सांपडतो. नारदांनीं उपदेशिलेल्या भक्तिशास्त्राच्या या ग्रंथाला सात्त्वततंत्र असें म्हणतात. सत्त्वगुणसंपन्न भगवद्भक्तांना "सात्त्वत" असें म्हणतात. त्यांना प्रिय असलेल्या भक्तिमार्गाचें जें शास्त्र आहे त्याला सात्त्वततंत्र असें म्हणतात. नारदांचीं भक्तिसूत्रें हीं तर सुप्रसिद्धच आहेत. शिवाय विविध पुराणांतून व नारदपुराणांतूनहि नारदमुनींचें वर्णिलेलें अवतारकार्य विस्तृत प्रमाणांत पहावयास सांपडतें. नारदाला कांहीं लोक "कळलाव्या" म्हणतात, पण तें त्यांच्या पूर्ण अज्ञानाचेंच द्योतक आहे. नारदानें जें कांहीं कार्य केलें आहे तें लोककल्याणासाठींच केलें आहे व त्यांतून लोककल्याणच सिद्ध झालेलें आहे. अक्षमाला, कमंडलु आणि वीणा घेऊन निरंतर भगवन्नामस्मरण करीत त्रैलोक्यामध्यें परिभ्रमण करणारा हा भगवंताचा तिसरा अवतार मानला जातो.

भगवंताचा चौथा अवतार नरनारायण या नांवानें ओळखला जातो. ब्रह्मदेवाच्या अनेक पुत्रांत धर्म नांवाचाहि एक पुत्र होता. याला दक्षप्रजापतीनें अनेक कन्या अर्पण केल्या होत्या. त्यांतील मूर्तिनांवाच्या भार्येपासून धर्माला नर आणि नारायण या नांवांचे दोन पुत्र झाले. हे दोन्ही पुत्र मिळून भगवंताचा एकच नरनारायण हा अवतार मानला जातो. इंद्रियनिग्रह कसा करावा, मनोनिग्रह कसा करावा, वैराग्य धारण करून खडतर तपश्चर्या कशी करावी याचा जणूं कांहीं ऋषिजनांपुढें नरनारायणांनीं आदर्शच निर्माण करून ठेवला आहे. इंद्रियांना विचलित करणारे व मनाला मुग्ध करणारे प्रसंग प्राप्त झाले असतां इंद्रियांना कसें आवरावें व मनाला कसें शांत ठेवावें हें सर्व नरनारायणांनीं स्वतः आचरून दाखविलें. त्यांचा आदर्श आचार हाच उपदेश होता ! बदरीनारायणाजवळ अलकनंदेच्या दोन्ही तीरांवर नर आणि नारा-

यण या नांवांचे प्रचंड पर्वत उभे आहेत. ते त्यांचें मूर्तिमंत स्मारक आहे. त्यांच्या कडकडीत वैराग्याचें आणि खडतर तपश्चर्येचें वर्णन पुराणांतून आढळतें. त्यांना मी मनोभावें साष्टांग प्रणिपात करीत आहें.

कपिलमहामुनि या रूपानें परमेश्वरानें पांचवा अवतार धारण केलेला आहे, पहिल्या मन्वन्तरांतील पहिलेच मनु, ज्यांना श्राद्धदेव या नांवानें ओळखलें जात होतें. ते स्वयंभू म्हणजे ब्रह्मदेव यांचे पुत्र असल्यामुळें त्यांना स्वायंभुव असेंच म्हणण्याचा प्रघात पडला. शतरूपा ही त्यांची पत्नी होती. स्वायंभुव मनूने आपली द्वितीय कन्या देवहूती ही कर्दमऋषींना अर्पण केली होती. कर्दमऋषि हे ब्रह्मदेवाचे पुत्र व प्रजापतीहि होते. कर्दमांना देवहूतीपासून नऊ कन्या झाल्या. त्यांचीं अनुक्रमें नांवें अशीं — (१) कला, (२) अनसूया, (३) श्रद्धा, (४) हविर्भू, (५) गति, (६) क्रिया, (७) ख्याति, (८) अरुंधति आणि (९) शान्ति. यांतील अनसूयादेवी हीच आपल्या चरित्रनायकाची अर्थात् सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय महामुनि यांची माता होय. या नऊ कन्यांच्या पाठीवर कर्दमऋषींना एक पुत्र झाला. तोच भगवंतांचा पांचवा अवतार होय. याचें नांव कपिल भगवान् असें होतें. हे अवधूतकुल-मुकुटमणि भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे सख्खे मामाच होत. कपिलमहामुनींनीं आपली माता देवहूती आणि आसुरी प्रभृति शिष्यजन यांना सांख्यतत्त्वज्ञानाचा उपदेश केला. सांख्यतत्त्वज्ञान आणि अद्वैत तत्त्वज्ञान हीं दोन्ही तत्त्वज्ञानें बरींचशीं मिळतींजुळतीं आहेत. सर्व आत्म्यांचा ऐक्यभाव हा सांख्यांनीं लक्षांत घेतला कीं सांख्यतत्त्वज्ञान हें अद्वैतांतच पर्यवसित होतें. कपिलऋषींनी सूक्ष्मतत्त्वांचा विचार करून जिज्ञासु जनतेला अध्यात्मज्ञानाच्या अगदीं जवळ नेऊन पोहोंचविलेलें आहे. सांख्यतत्त्वज्ञानाचे आद्यप्रवर्तक असलेल्या भगवदवताररूप कपिलमहामुनींना माझा नमस्कार असो.

षष्ठे अत्रेरपत्यत्वं वृतः प्राप्तोऽनसूयया ।
आन्वीक्षिकीमलर्काय प्रल्हादादिभ्य ऊचिवान् ॥

परमेश्वराचा सहावा अवतार हेच प्रस्तुत ग्रंथाचे चरित्रनायक विश्वगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय होत. अत्रिऋषींच्या तपश्चर्येनें आणि अनसूयेच्या पातिव्रत्यानें प्रसन्न झालेला परमात्मा, तुम्हांला पाहिजे असेल तो वर मागा असें त्यांना म्हणाला. तेव्हां तुम्हीच माझ्या पोटीं पुत्ररूपाने अवतरावें असा वर तिनें मागितला. इष्टवरदानाच्या वचनानें बद्ध झालेला परमात्मा अत्रिमुनींचा पुत्र म्हणून अनसूयेच्या पोटीं दत्त या रूपानें अवतरला. हा अवतार घेऊन परमेश्वरानें अलर्क आणि प्रल्हाद इत्यादि जिज्ञासु भक्तांना आत्मविद्येचा उपदेश केला. आत्मसाक्षात्कार होईतोंपर्यंत आत्मसाक्षात्कारासाठीं व आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर तो दृढ होण्यासाठीं आत्मविद्येचे "अनु" म्हणजे निरंतर व "ईक्षण" म्हणजे चिंतन करावें लागतें म्हणन आत्मविद्येला "आन्वीक्षिकी" असें म्हणतात. आत्मविद्येशिवाय जीवाला दुसरा तरणोपाय नाही. आत्मविद्या हेंच

खऱ्या सुखाचें साधन आहे. याच अभिप्रायानें परमेश्वरानें सृष्टीच्या आरंभकालींच गुरुदेव दत्तात्रेयांच्या रूपानें अवतार घेतला व जिज्ञासु जीवांना ते ज्ञानदान करीत राहिले. परम अवधूत संवर्तऋषि, देवांचे सेनापति कार्तिकस्वामी, गणपति, प्रल्हाद, अलर्क, आयुराजा, यदुराजा, महापराक्रमी राजा कार्तवीर्य, जमदग्नीचे चिरंजीव भगवदवतार श्रीपरशुराम, आद्य श्रीशंकराचार्य, नागार्जुन, दलादनऋषि, श्रीगोरक्षनाथ, चक्रधर, दासोपंत, एकाजनार्दन, माणिक प्रभु आणि रघुनाथ निरंजन अशी ही श्रीदत्तात्रेयप्रभूंची शिष्यपरम्परा आहे. विद्यमान कालांतहि त्यांचें ज्ञानदानाचें कार्य अविरत चालूंच आहे. पुढेंहि तें असेंच चालत रहाणार. कारण अवताराचें ध्येयच तें आहे. असा हा दत्तात्रेयांच्या रूपानें परमेश्वराचा सहावा अवतार वर्णिलेला आहे.

यानंतर परमेश्वरानें रुचीपासून आकूतीच्या उदरीं यज्ञ नांवाचा सातवा अवतार धारण केला. रुचि हे एक सृष्टीच्या आरंभकालांतील ऋषिगणांतले मोठे नामांकित ऋषि होते. आकूती ही स्वायंभुवमनूची थोरली मुलगी, अनसूयेची सख्खी मावशी असल्यामुळें भगवान् श्रीदत्तात्रेयांची ती मावस आजी होती. हें दत्तात्रेयांचें नातें कालनिर्णयाच्या दृष्टीनें वाचकांनी अवश्य लक्षांत घ्यावें. परमेश्वरानें यज्ञ नांवाच्या अवतारांत वैवस्वत मन्वन्तराचें पालन केलेलें आहे. यामादि अनेक देवगण यज्ञाच्या पोटीं जन्माला आले व त्यांनीहि प्रजाजनांच्या संरक्षणांत वडिलांना हातभार लावल्याचा पुराणांत उल्लेख आहे.

यानंतर भगवान् श्रीहरि हे ऋषभदेवाच्या रूपाने अवतरले. हा परमेश्वराचा आठवा अवतार होय. हा अवतार नाभिराजापासून मेरुदेवीच्या उदरीं झाला असल्याचें वर्णिलेलें आहे. आपल्या देशाला भारतवर्ष अथवा भारत हें नांव ज्याच्यामुळें पडलें तो भरतराजा याच ऋषभदेवांचा पुत्र होय. ऋषभदेवांच्या पोटीं जयन्तीदेवीपासून मोठे विरक्त आणि तत्त्ववेत्ते असे नऊ पुत्र जन्माला आले. कवि, हरि, अन्तरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस आणि करभाजन म्हणजे करपात्र अशीं त्यांचीं नांवें आहेत. या नऊजणांना नवनारायण असें म्हटलें जात होतें. ते प्रत्यक्ष नारायणाचेच अवतार होते. तेच पुढें नवनाथांच्या रूपानें अवतरले असें भविष्योत्तर महापुराणांत वर्णिलें आहे. स्वतः ऋषभदेवहि अत्यंत विरक्त होते. त्यांनीं राज्याची धुरा वाहण्याचें कार्य भरताकडे सोंपविलें व स्वतः साम्राज्यवैभवाचा त्याग करून लोकांना आत्मकल्याणाच्या मार्गदर्शनाकरितां ते राजधानीच्या बाहेर पडले. ऐकमत्यानें राहून व्यवहारांत यशस्वी व्हा आणि वैराग्यानें व अध्यात्मज्ञानानें परमार्थ साधा हें त्यांच्या उपदेशाचें सूत्र होतें. शेवटीं आश्रमांचें बंधन सोडूनहि ते बाहेर पडले आणि अवधूत बनले ! त्यांचें आचरण सर्व आश्रमांतील प्रजाजनांना अत्यंत आदरणीय वाटत होतें व त्यांची अवधूतवृत्ति सर्वांना वंदनीय होती.

नवव्या अवतारामध्यें भगवान् श्रीहरि हे पृथुराजाच्या रूपानें अवतरले. वडिलांच्या वेळेपासून प्रजाजनांमध्ये निर्माण झालेलें अराजक पृथुराजानें शमविलें.

चोर व लूटमार करणारे दरोडेखोर यांना शासन करून प्रजाजनांना निर्भय केलें. असन्मार्गानें जाणाऱ्या लोकांना सन्मार्गीं लावलें. पृथ्वी सुपीक बनवून सर्वांना अन्न-वस्त्रांनीं समृद्ध केलें. वसति, वाडी, गांव, उपनगर आणि नगर इत्यादि रूपांनीं लोकांची राहण्याची व्यवस्था निर्माण केली. कायदा आणि सुव्यवस्था हीं प्रथम पृथुराजानेंच राबविलीं. दुष्काळी प्रदेशांतील लोकांना दुष्काळांतून वांचविलें. सर्वांची आरोग्याची व शिक्षणाचीहि व्यवस्था केली. देवांचा राजा इन्द्र त्यालाहि हेवा वाटावा अशी लोकप्रियता पृथुराजाने संपादन केलेली होती! इतकें असूनहि लोकांनीं व भाटां-नींहि केलेली आपली स्तुति त्याला आवडत नसे. तो अत्यंत निगर्वी आणि विनयी होता. सनकसनंदनादि परमविरक्त तत्त्ववेत्त्यांनीहि त्याचें मोठेपण मान्य केलेलें आहे. असा कर्तबगार राजा प्राचीन इतिहासांतहि पृथुराजाशिवाय दुसरा कोणी पहावयास सांपडत नाही. मध्ययुगांतहि नाही व अर्वाचीन युगाचा तर प्रश्नच नाही. याच सर्व सद्‌गुणांच्या उत्कर्षामुळें पृथुराजा हा परमेश्वराचा नववा अवतार गणला गेला.

मत्स्यावतार – मत्स्यावतार हा परमेश्वराचा दहावा अवतार होय. आत्तापर्यंत परमात्मा, देव आणि मानव या रूपांनीं अवतरला. पण या अवतारांत मात्र परमेश्वरानें कार्यपरत्वें मत्स्यरूप धारण केलें. मत्स्य म्हणजे मासा. हा एक जलचर प्राणी. पण असाच एक दुर्धर प्रसंग निर्माण झाला कीं, त्या वेळीं परमेश्वराला माशाचें रूप धारण करणें भाग पडलें! पृथ्वीभोंवतालचे सर्व समुद्र एकदम खवळले. अकालीं जलप्रलय ओढवला! मनु, मनूचे पुत्र, सप्तर्षि, वेद आणि हविर्द्रव्यें इत्यादि सर्वांचाच नाश होण्याची पाळी आली. अखेर दयाघन परमात्मा वोळला. त्यानें माशाचें रूप घेतलें. तो त्या प्रक्षुब्ध झालेल्या अगाध सागरांत संचार करीत करीत मनुमहर्षि यांच्या जवळ आल्यानंतर त्याच्या सांकेतिक आदेशाप्रमाणें मनूनें आपला परिवार, सप्तर्षि, वेद, प्रजाजन, हविर्द्रव्यें व बीजधान्यें हे सर्व पृथ्वीस्वरूप नावेमध्यें घालून ती नाव माशाच्या मस्तकावर असलेल्या शिंगासारख्या अवयवास बांधून टाकली. त्या माशानेंहि समुद्र शान्त होईतोंपर्यंत ती नाव संभाळली. अखेर समुद्र शान्त झाले. ती नाव स्थिरावली. पृथ्वीचें संरक्षण झालें. मनु आणि त्याचा परिवार, सप्तर्षि आणि वेद, बीजधान्यें आणि हविर्द्रव्यें हें सर्वच सुरक्षित राहिलें. सर्वच लोक त्या संकटांतून मुक्त झाले. सर्वांच्या जिवांत जीव आला व त्यांनीं समाधानाचा श्वास टाकून त्या मत्स्यरूपीं परमेश्वराची मुक्त कंठानें स्तुति केली. प्रलयकालीं सर्वांचें सर्वतोपरी संरक्षण करणाऱ्या या माशाला परमेश्वराचा अवतार मानावयाचें नाहीं तर दुसरें काय म्हणावयाचें? सृष्टीच्या इतिहासांत अलौकिक आणि अद्‌भुत कार्य करणारा हा मासा असल्यामुळें सर्वांनीं त्याला परमेश्वराचा अवतार मानलें आहे तें योग्यच आहे. दशावतारांमध्यें तर मत्स्यावतार हा अग्रगण्य आहे.

कूर्मावतार – फार फार प्राचीन काळीं समुद्रांतील कांही अमूल्य रत्नांचा अर्थात् रत्नतुल्य वस्तूंचा लाभ करून घेण्यासाठीं देव आणि दैत्य यांनीं समुद्राचें मंथन

करण्याचा संकल्प केला. परमेश्वराचा कौल घेऊनच त्यांनीं हें कार्य सुरू केलें. त्यांनीं मंदार पर्वताची रवी केली. त्याला वासुकी सर्प दोराप्रमाणें गुंडाळला. हें सारेंच कृत्य अचाट होतें, यांत शंकाच नाहीं. सर्पाच्या मुखाकडची बाजू दैत्यांनीं घेतली आणि शेपटाकडची बाजू देवांनीं घेतली. समुद्रमंथनाचें कार्य सुरू झालें. पण काय सांगावें? तो मंदार पर्वत समुद्रामध्यें खालींखालींच जाऊं लागला ! देव आणि दैत्य हताश होऊं लागले ! त्यांच्या मनोरथांची सारी इमारत ढांसळण्याच्या बेतांत आली. निदानीं हरीची आठवण होते म्हणतात त्याप्रमाणें सर्वांना शेवटीं देवाची आठवण झाली. देवाला त्यांचे परिश्रम पाहून दया आली. देवहि परीक्षाच पहात असतो. परिश्रमाशिवाय देवाचेंहि सख्यत्व जोडलें जात नाहीं. "न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः" कष्ट करून थकल्याशिवाय देवहि मदतीला धांवून येत नाहीं. अखेर परमात्मा, देव आणि दैत्य यांच्या मदतीला धांवून आला. त्यानें कासवाचें रूप घेतलें व चटकन् मंदार पर्वताच्या खालीं जाऊन त्याला आपल्या पाठीचा आधार दिला. कासवाच्या पाठीचा आधार मिळतांच मंदार पर्वताचें बुडणें थांबलें. देवांना व दैत्यांना आनंद वाटला. त्यांनीं पुन्हां समुद्रमंथनाचें कार्य सुरू केलें व त्यांतून त्यांना पाहिजे असलेल्या रत्नतुल्य वस्तूंचा लाभ झाला. कासवाला संस्कृतमध्यें कूर्म अथवा कच्छ हें नांव आहे. याच कारणामुळें या अवताराला कूर्मावतार अथवा कच्छावतार असें म्हणतात. हा परमेश्वराचा अकरावा अवतार होय.

अमृताच्या प्राप्तीसाठी समुद्राचें मंथन सुरू झालें. पण पहिल्याप्रथम नेमकें विषच हातीं आलें ! हा दैवाचा खेळ संसारांत नेहमींच पुष्कळांच्या अनुभवाला येतो. चांगल्या उद्देशानें एखाद्या कार्याला हात घालावा तों भलतेंच कांहीं तरी अनपेक्षितपणें पुढें येऊन उभें रहातें. अशा वेळीं सामान्यजन घावरतात व आरंभिलेलें कार्य सोडून देतात. पण विचारवंत आणि धैर्यशील लोक आलेल्या संकटाला धैर्यानें तोंड देऊन आरंभिलेलें कार्य तडीस नेतात. समुद्राचें मंथन करीत असतांना पहिल्याप्रथमच विष हातीं आलेलें पाहून देव आणि दैत्य घावरले. या भयंकर हालाहल विषाचें काय करावें हेंच त्यांना सुचेना. शेवटीं "शंभोः पदं निर्भयम्" हा निर्वाणीचा सिद्धान्त लक्षांत घेऊन ते त्रिलोकीनाथ भगवान् शंकर यांना शरण गेले. केवळ देव आणि दैत्य यांच्यावरच नव्हे तर साऱ्या विश्वावरच हें संकट कोसळलें आहे असें पाहून विश्वनाथाचें हृदय द्रवलें आणि त्यांनीं पार्वतीच्या रूपानें जवळच विराजत असलेल्या आदिशक्तीची अनुमति घेऊन तें जहाल विष शंकरानें प्राशन केलें. त्या विषाच्या प्रभावानें शंकरांचा कंठ काळा निळा झाला व तेव्हांपासूनच शंकरांना नीलकंठ हें नांव पडलें !

देव आणि असुर विषाच्या संकटांतून मुक्त झाल्यानंतर त्यांनीं पुन्हां समुद्राचें मंथन सुरू केलें. त्यांतून अनेक उपयुक्त रत्नें बाहेर आलीं. त्यांतच भगवान् धन्वन्तरी हे अमृताचा कलश घेऊन समुद्रांतून वर आले ! देवांना जें पाहिजे होतें तें मिळालें. अत्यंत आनंद झाला ! धन्वन्तरी हा परमेश्वराचा बारावा अवतार होय. धन्वन्तरीमुळें

देवांना अमृत मिळालें. इतरांना आरोग्यासाठीं आयुर्वेदाचा लाभ झाला. धन्वन्तरी हेच आयुर्वेदाचे आद्य प्रवर्तक होत.

परमेश्वरानें धन्वन्तरीचा अवतार घेऊन देवांच्याकरितां अमृताचा कलश आणला खरा पण दैत्यांनीं चपळाई करून तो पळविला. देव दैत्यांकडे टक लावून पहातच राहिले. त्यांना कांहींहि सुचेना. ज्या अमृताकरितां आपण एवढी धडपड केली तें अमृत दैत्यांनीं पळविलें! आपले सारेच प्रयत्न विफल झालेले पाहून देवांचीं तोंडें सुकलीं. तिकडे दैत्य अमृताचा कलश आपल्या हातीं आला असें समजून आनंदाच्या भरानें बेहोष झाले! एक म्हणतो मी आधीं अमृत घेईन तर दुसरा म्हणतो तूं कोण? मी अगोदर घेणार. याप्रमाणें त्यांच्यांत आपआपसांत कलह सुरू झाला. इकडे देवांची केविलवाणी अवस्था पाहून परमेश्वराला दया आली. देवांचा वाली तो परमात्मा मोहिनीचें रूप घेऊन तेथें अवतरला. हा परमेश्वराचा तेरावा अवतार होय.

अगोदरच परमेश्वराचें रूप मोहक; त्यांतून त्यानें मोहिनीचा अवतार घेतला! मग त्या मोहकतेचें काय वर्णन करावें? मोहिनीचें तें रमणीय रूप पाहून दैत्यांचें तर भानच हरपलें! त्यांना भुरळ पडली व अमृताचा कलश सोडून ते त्या मोहिनीकडे धांवले! "आपण कोण? कोठून आलांत? कोणाच्या आहांत? आपल्या बरोबर कोण आहे?" अशा रीतीनें त्यांनीं मोहिनीभोंवतीं गोळा होऊन लघळपणा सुरू केला. मोहिनी म्हणाली, "तुम्ही कश्यपऋषींचे पुत्र माझ्यासारख्या स्त्रीच्या काय नादीं लागतां? हें तुमच्या मोठेपणाला शोभत नाहीं. तुम्ही माझा नाद सोडून द्या." मोहिनीच्या या बोलण्याचा परिणाम उलटा झाला. ते दैत्य अधिकच मोहिनीच्या जवळ येऊं लागले! अखेर मोहिनीनें त्यांना आपल्या विश्वासांत घेऊन त्यांच्या जवळचा अमृतकलश हस्तगत केला! देवांची एक पंगत व दैत्यांची एक पंगत अशा दोन निरनिराळ्या पंगती बसविल्या. मोहिनीनें देवांच्या पंगतीपासून अमृत वाढण्यास आरंभ केला. राहू नांवाचा दैत्य चोरून देवांच्या पंगतींत बसला होता. त्याच्या डाव्या आणि उजव्या बाजूस चंद्र-सूर्य बसलेले होते. मोहिनी जवळ आल्याबरोबर त्यांनीं हा दैत्य आहे असें मोहिनीस सुचविलें. मोहिनी हा विष्णुचाच अवतार असल्यामुळें मोहिनीरूपीं श्रीहरीनें सुदर्शन चक्रानें राहूचें मस्तक उडविलें. पंक्तींत गोंधळ माजल्याबरोबर मोहिनीनें सर्व अमृत देवांना वांटून टाकलें व स्वतः ती पहातां पहातां अंतर्धान पावली. पुढें देव आणि दैत्य यांच्यांत तुंबळ युद्ध झालें. त्या युद्धांत देवांचा अमृत प्राशनामुळें विजय झाला आणि दैत्य पराभूत होऊन निघून गेले! समदर्शी परमेश्वराला यद्यपि देव आणि दैत्य हे दोन्ही सारखेच आहेत तथापि लोककल्याणासाठीं दैवी संपत्तीचा उत्कर्ष होणें व आसुरी संपत्तीचा ऱ्हास होणें हेंच श्रेयस्कर असें लक्षांत घेऊन श्रीहरीनें देवांचा पक्ष उचलून धरला व दैत्यांना अमृताच्या लाभापासून वंचित केलें. असें आहे हें मोहिनी-अवताराचें चरित्र.

नरसिंह अवतार हा श्रीविष्णूचा चौदावा अवतार होय. या अवताराचें स्वरूप, कार्य आणि प्रभाव हे मोठे विलक्षण आहेत. स्वायंभुव मन्वन्तरांतील पहिल्याच युगांतली गोष्ट आहे ही. कश्यप ऋषींना दिति नांवाच्या पत्नीपासून दोन पुत्र जन्माला आले. दितीपासून त्यांचा जन्म झाल्यामुळें त्यांना दैत्य असें म्हटलें जात होतें. हिरण्यकशिपु आणि हिरण्याक्ष अशीं त्यांचीं नांवें होतीं. ते वयांत आल्यानंतर अत्यंत उन्मत्त झाले. हिरण्याक्षानें तर सारी पृथ्वीच बुडविली व रसातळाला नेली. परमेश्वर पाठीराखा असल्यानंतर संकटांतून सुटका होण्याला अवधि लागत नाहीं. परमेश्वरानें तत्काल वराह अवतार घेतला. समुद्रामध्यें स्वैर संचार करणाऱ्या हिरण्याक्षाला शोधून काढलें. त्याच्याशीं द्वन्द्वयुद्ध करून त्याला ठार केलें! आपल्या दांताचा आधार देऊन पृथ्वीला वर काढलें. अशा रीतीनें परमेश्वरानें पृथ्वीचा उद्धार केल्यामुळें सर्वांना आनंद झाला. वराह म्हणजे डुक्कर या नांवानें ओळखला जाणारा क्षुद्र प्राणी. पण लोकोपकारासाठीं हें रूप धारण करणें आवश्यक आहे, असें वाटल्याबरोबर त्या अनंतकोटि ब्रह्मांडनायकानें या क्षुद्ररूपानेंहि अवतार घेतला. दशावतारांत तिसरा अवतार म्हणून या अवताराची गणना होते.

हिरण्याक्षाचा वध झालेला ऐकून त्याचा थोरला भाऊ हिरण्यकशिपु हा खवळला. ज्या विष्णूनें वराहरूप घेऊन माझ्या भावाचा वध केला त्याचा मी नाश करीन असें म्हणून त्यानें विष्णूला प्रिय असलेलें त्याचे भक्त, देव, ब्राह्मण, यज्ञयागादि कर्म आणि भजन-कीर्तन इत्यादि सर्व गोष्टींचा उच्छेद मांडला. त्याच्या भयानें सारें त्रैलोक्य संत्रस्त झालें. हिरण्यकशिपूनें खडतर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून जवळ जवळ अमरत्वच मागून घेतलें होतें. त्याला दिवसा, रात्रीं, अन्तराळांत अथवा पृथ्वीवर, शस्त्रानें, अस्त्रानें अथवा ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या सृष्टींतील कोणाकडूनहि मृत्यु येणार नसल्यामुळें तो निर्भयच झाला होता. पोटचा मुलगा कुमार प्रल्हाद हा नित्य नारायणाचें नामसंकीर्तन करतो म्हणून त्यालाहि ठार करण्याचें हिरण्यकशिपूनें अनेक प्रयत्न केले. ते सारे विफल झालेले पाहून संतापलेल्या हिरण्यकशिपूनें भक्तवर प्रल्हादाला ठार करण्याकरितां आपल्या हातांतील खड्ग उपसलें. तोंच परमेश्वरानें आपल्या परमप्रिय बालभक्ताचें संरक्षण करण्याकरितां नरसिंहावतार धारण केला. ब्रह्मदेवानें दिलेल्या सर्व वरांच्या अटी पाळून परमात्मा सूर्य अस्ताच्या उत्तरकालीं खांबांतून कधीं कोणी न पाहिलेल्या अशा नरसिंहाच्या रूपानें प्रकट झाला व त्यानें हिरण्यकशिपूला मांडीवर आडवें घेऊन काकडी चिरावी त्याप्रमाणें आपल्या तीक्ष्ण नखांनीं हिरण्यकशिपूचें वक्षःस्थल विदीर्ण करून टाकलें! सर्वांना अत्यंत आनंद झाला. देवांनीं व भक्तांनीं प्रभूवर पुष्पवृष्टि केली. प्रल्हादानें परमेश्वराला शांत केलें व परमेश्वराच्याच आज्ञेनें चिरकाल राज्य करून आपल्या सुराज्यानें सर्वांना आनंदी केलें. परमेश्वराचा हा अवतार नरसिंह अथवा नरहरि या नांवानें ओळखला जातो.

परमेश्वराचा पंधरावा अवतार हा वामनावतार म्हणून प्रसिद्ध आहे. दैत्य-

कुलोत्पन्न बलिराजा हा मोठा पराक्रमी आणि दानशूर होता. त्यानें युद्धामध्यें देवांचा पराभव करून देवांना देशोधडीला लावलें होतें. देवांचें वैभवहि त्यानें हिरावून घेतलें होतें. त्यामुळें देवांची माता अदिति मोठी दुःखी होती. तिनें आराधना करून परमेश्वराला प्रसन्न केलें. तिनें त्यास वर मागितला. "माझ्या मुलांचें बलीनें हिरावून नेलेलें वैभव माझ्या मुलांना परत मिळावें आणि त्यांचें स्वतःचें स्थान स्वर्गलोक त्यांचा त्यांना परत मिळावा अशी माझी प्रार्थना आहे." देवानें अदितीच्या प्रार्थनेचा स्वीकार–अंगीकार–केला. तिच्याच उदरीं वामनरूपानें अवतार घेऊन बटुरूपानें ते बलीच्या यज्ञमंडपांत आले. बलीला तीन पावलें भूमिदान मागितलें. बलिराजाचे गुरु शुक्राचार्य यानी वामनाचें हें कपट ओळखलें व बलीला या दानाचें उदक सोडण्यापासून परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. पण दानशूरत्वाच्या अहंकारानें पछाडलेल्या बलीनें गुरूंचा सल्ला मानला नाहीं. शेवटीं तीन पावलें भूमिदानाचें उदक वामनाच्या हातावर सोडलें. तें उदक हातावर पडतांच वामनानें त्रिविक्रमाचें विराट्रूप धारण केलें. त्यानें दोन पावलांतच सर्व विश्व व्यापून टाकलें! तिसऱ्या पावलाला जागा विचारतांच बलीनें आपलें मस्तक नम्रतेनें पुढें केलें. परमेश्वरानें तिसरें पाऊल बलीच्या मस्तकावर ठेवून त्याला कृतार्थ केलें. देवांचें वैभव आणि स्वर्गलोक देवांना मिळवून दिला. बलीला सुतलाचें राज्य देऊन परमात्मा स्वतः बलिराजाच्या दारावर द्वारपाल होऊन राहिला! अशी ही वामन-अवताराची कथा आहे.

जमदग्निऋषि आणि श्रीरेणुकादेवी यांच्यापासून परमेश्वरानें परशुराम म्हणून सोळावा अवतार धारण केला. दैत्यकुलोत्पन्न राजा कार्तवीर्य यानें जमदग्नींच्या आश्रमांतील आतिथ्य स्वीकारल्यानंतर आश्रमांत असलेली कामधेनु पाहिली. तिचा प्रभाव ऐकला व लोभानें तिचें अपहरण केलें. परशुरामानें ही गोष्ट ऐकली व कार्तवीर्याशीं युद्ध करून त्याच्या पराक्रमी मुलांसह त्याचा पराभव केला. कामधेनूला ते आपल्या आश्रमांत परत घेऊन आले. पुढें कालांतरानें आश्रमांत परशुराम नाहींत ही संधि साधून कार्तवीर्याच्या मुलांनीं जमदग्नींच्या आश्रमावर आक्रमण केलें व जमदग्नींचा वध केला! आईचा आक्रोश कानीं आल्यानंतर परशुराम आश्रमांत परत आले. त्यांनीं सर्व वृत्तान्त ऐकला. पितृवियोगाचें त्यांना अत्यंत दुःख झालें. मदोन्मत्त झालेल्या क्षत्रियांना योग्य तें शासन करण्याच्या संकल्पानें हातांत परशु घेउन ते आश्रमाच्या बाहेर पडले. त्यांनीं घनघोर युद्ध करून हैहय कुलाचा तर अंत केलाच पण याच निमित्तानें त्यांनीं भूमंडलावर असलेल्या इतरहि उन्मत्त क्षत्रियांना युद्धाचें आव्हान देऊन एकवीस वेळां युद्ध केलें व सारी पृथ्वी निःक्षत्रिय केली. जे लपूनछपून अथवा शरण येऊन राहिले ते जगले. शेवटीं श्रीपरशुराममुनि दत्तात्रेयाला शरण गेले. गुरुदेव श्रीदत्तात्रेय यांनीं त्यांना श्रीविद्येची उपासना देऊन चिरंजीव केलें.

सतराव्या अवतारांत परमात्मा हा सत्यवतीच्या उदरीं पराशर मुनीपासून वेदव्यासांच्या रूपानें अवतीर्ण झाला. युगक्रमानें उत्तरोत्तर बुद्धीचा ऱ्हास होत असलेला

पाहून वैदिक वाङमयाचें त्यांनीं चार वेदांच्या रूपानें सुव्यवस्थित विभाजन केलें. त्याच्याहि पुन्हां अवान्तर शाखा कल्पून त्या निरनिराळ्या शिष्यांना शिकविल्या. ज्ञानदानाच्या कार्यांत व्यासांचें इतरहि कार्य फारच मोठें आहे. ज्ञानदानाच्या क्षेत्रांत विविध पुराणें, महाभारत व भागवत यांसारख्या विलक्षण ग्रंथांची निर्मिति करून लोककल्याणाचें अभूतपूर्व असें कार्य व्यासांनीं केल्यामुळें ते अवतार ठरले.

अठराव्या अवतारांत परमात्मा हा दशरथाचा पुत्र म्हणून श्रीरामचंद्ररूपानें अवतरला. वानरांचें साहाय्य घेऊन रावण-कुंभकर्णासारख्या दुष्ट राक्षसांचा त्यानें निःपात केला. आपल्या संयमशील आणि त्यागमय जीवनानें मानवांना उत्तम चारित्र्याचा धडा देणारा त्याच्याशिवाय इतिहासांत दुसरा कोणी सांपडणार नाहीं. उत्तम विद्या, उत्तम चारित्र्य, उत्तम प्रेम, उत्तम पराक्रम, उत्तम दया, उत्तम वैभव, उत्तम रूप, उत्तम सौंदर्य, उत्तम त्याग आणि उत्कृष्ट लोकप्रियता इत्यादि सर्व गुणांनीं तो संपन्न होता. सर्व गुणांची जणूं कांहीं तेथें सीमाच पहावयास सांपडते. असें असूनहि रामचंद्रप्रभूंची नम्रता इतक्या पराकाष्ठेची होती कीं त्यांना उद्देशून "मर्यादा पुरुषोत्तम" हेंच त्यांना अन्वर्थ विशेषण दिलें जातें. त्यांची राज्यपद्धति अत्यंत आदर्श होती. म्हणूनच 'रामराज्य' हा शब्द वाक्प्रचाराप्रमाणें सर्वतोमुखीं रूढ झालेला आहे.

आनन्दकन्द भगवान् श्रीकृष्णप्रभु आणि त्यांचे थोरले बंधु बलराम हे परमेश्वराचे एकोणिसावे आणि विसावे अवतार होत. श्रीकृष्णप्रभूंचें सारेंच चरित्र अलौकिक आणि आकर्षक आहे. वाचकांनीं तें श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधांतून अवश्य वाचावें. श्रीकृष्ण हे लहानात लहान व थोरांत थोर अशा रीतीनें वागत होते. बालपणापासूनच ते मोठे विनोदी होते. वृत्ति अत्यंत खेळाडू होती. सर्व प्रकारच्या खेळांत ते पूर्ण निपुण होते. मल्लविद्येंत निष्णात होते. गायनवादनपटु होते. गायी-वासरें पशुपक्षी व बाळ-गोपाळ यांच्या मेळाव्यांत ते वृन्दावनामध्यें विहार करीत असत. नृत्यकलेंतहि ते प्रवीण होते. त्यांचें रासलीलानृत्य प्रसिद्धच आहे. बालपणापासूनच ते महापराक्रमी होते. कंस-चाणूरादिकांचा बालपणींच त्यांनी वध केला. समुद्रामध्यें द्वारका वसविली. युद्धकलेंत ते तरबेज होते. त्यांनीं अठरा वेळां जरासंधाचा युद्धांत पराभव केला. कालयवनाचा मोठ्या युक्तीनें वध केला. रुक्मिणी, सत्यभामा, कालिंदी, मित्रविंदा, भद्रा, लक्ष्मणा, जांबवती, सत्त्या आणि भौमासुराच्या बंदीखान्यांतील एक हजार उपवर राजकन्या यांच्याशीं नाट्यपूर्ण प्रसंगांतून विवाह केले. दगदगीच्या जीवनांतहि त्यांच्या गृहस्थाश्रमाचा थाट अपूर्व होता. बाणासुर, भौमासुर, काशिराज, पौंड्रक, शाल्व, शिशुपाल, वक्रदंत इत्यादि 'दुष्ट-दुर्जनां'चेंहि युद्धामध्यें निर्दलन केलें. कौरव आणि पांडव यांच्या युद्धाच्या निमित्तानें दुर्योधन, दुःशासन वगैरे पृथ्वीला भारभूत झालेल्या दुष्टांचा यांनीं वध केला. व्यवहाराला अध्यात्मविद्येचें अधिष्ठान देऊन अर्जुनाच्या बुद्धींतील समरभूमीवर निर्माण झालेला व्यामोह त्यांनीं

दूर केला. तो त्यांचा अलौकिक उपदेश भगवद्‌गीता या नांवानें प्रसिद्धच आहे. प्रयाणसमयीं उद्धवाला केलेला उपदेश भागवतांतील अकरावा स्कंध — हा वैराग्य, तत्त्वज्ञान आणि भक्ति या क्षेत्रांतील श्रीकृष्णाच्या अधिकाराचा प्रत्यक्ष पुरावाच आहे. श्रीकृष्णाचें भक्तवात्सल्यहि अपूर्व होतें. सुदामदेव, श्रुतदेव, राजा बहुलाश्व, कुब्जादासी आणि विदुर हीं त्याचीं चालतीं बोलतीं उदाहरणें आहेत. असा हा श्रीकृष्ण प्रभूंचा सर्वश्रेष्ठ अवतार पूर्णावतार मानला जातो. "कृष्णस्तु भगवान् स्वयम्" भूभार हरण करतांना श्रीकृष्णाला थोरले बंधु श्रीबलराम यांचा फारच उपयोग झाला म्हणून त्यांचीहि अवतारांत गणना होते.

परमेश्वराचा एकविसावा अवतार कीकट देशांत झाला. कीकट हा देश मगध या नांवानें ओळखला जातो. यालाच हल्लीं बिहार असें म्हणतात. राजा शुद्धोधन याच्यापासून मायावती राणीच्या पोटीं जन्माला आलेला पुत्र हाच तो अवतार होय. याला गौतम अथवा बुद्ध म्हणत असत. पुढें दोन्ही नांवें एकत्र करून लोक याला गौतमबुद्ध असेंच म्हणूं लागले. गौतमबुद्ध हे अत्यंत विरक्त होते. त्यांच्या वैराग्याला उपमा देतां येईल असें उदाहरण मानवजातीच्या इतिहासांत क्वचितच पहावयास सांपडेल. त्यांचा आत्मा बहुजनसमाजाच्या हितासाठीं तळमळत होता. अहोरात्र देव-ब्राह्मणांचा द्वेष करून स्वर्गादि विषयसुखाच्या प्राप्तीसाठीं अनधिकृतपणें प्रवृत्त होणाऱ्या असुरप्रवृत्तीच्या लोकांना वैदिक कर्मापासून परावृत्त करण्याचें कार्य बुद्धानें केलें; ज्या मार्गाचा अवलंब करून पुण्याऐवजीं पापच पदरांत पडलें असतें व परिणामीं त्यांना दुःखच भोगावें लागलें असतें. तात्पर्य बहुसंख्य समाजाला निषिद्ध मार्गापासून परावृत्त करून बुद्धानें त्यांना वैराग्याचा उपदेश केला. वैराग्य हेंच खऱ्या सुखाचें साधन आहे. ही गोष्ट त्यांनीं स्वतःच्या आचरणानें जनतेच्या मनावर बिंबविली. सर्व-सामान्य जनतेमध्यें हें कार्य करीत असतांना त्यांना वेदांचें प्रामाण्य झुगारून देऊन वेदांची निंदाहि करावी लागली. त्यामुळें चांगल्या चांगल्या लोकांचाहि बुद्धिभेद होऊन तेहि वैदिकमार्गाचा त्याग करूं लागले. त्यामुळें श्रीकुमारिलभट्ट आणि आद्य शंकराचार्य यांच्यारूपानें अवतीर्ण होऊन परमेश्वराला पुन्हा वैदिक मार्गाची स्थापना करण्याचा प्रयत्न करावा लागला. असा हा परमेश्वराचा एकविसावा बुद्धावतार मोठा प्रभावी होऊन गेल्याची साक्ष इतिहास देत आहे. कांहीं लोक त्रिपुरासुराच्या वधाच्यावेळीं दैत्यांना मोहित करण्यासाठीं भगवंतांनी बुद्धावतार घेतला असेंहि वर्णन करतात. कांहींही असलें तरी परमेश्वराच्या या अवतारांत मोहनशक्तीचा आविष्कार पराकाष्ठेचा होता यांत शंकाच नाहीं. भगवान बुद्ध हे बहुजनहितासाठीं व बहुजन-सुखासाठींच तळमळत होते ही गोष्ट निर्विवाद होय. याच अभिप्रायाने त्यांची अव-तारांत गणना झाली.

ईश्वरी संकेताप्रमाणें परमेश्वराचा आणखी एक नामवंत अवतार व्हावयाचा आहे. हा विष्णुयश नांवाच्या ब्राह्मणाच्या येथे त्याचाच पुत्र म्हणून जन्माला येणार

आहे. हा परमेश्वराचा बाविसावा असतार समजावा. "भविष्यकाळांतलें कोणीं पाहिलें आहे ?" "पुढें काय होईल हें कोणीं सांगावें ?" अशीं वाक्यें कांहीं लोकांच्या तोंडीं ऐकूं येतात. त्यांना अपेक्षित असलेल्या घटना सत्वर पहाण्याची घाई झालेली असते. वैयक्तिक जीवनांत इष्ट गोष्टींची घाई समर्थनीय असली तरी सृष्टीच्या जीवन-प्रवाहांत घाई समर्थनीय ठरणार नाहीं. स्वार्थी राजकारणमूलक प्रवृत्तींतून निर्माण होणाऱ्या म्लेंच्छयवनांचे दंगेधोपे, लूटपाट, जाळपोळ आणि अत्याचार इत्यादि गोष्टींनी भारत संत्रस्त झालेला असला तरी तो परमेश्वराकडून उपेक्षिला गेला आहे असें मानण्याचें कांही कारण नाहीं. "संभवामि युगे युगे" ही परमेश्वराची प्रतिज्ञा, मागील इतिहास आणि संतांचे अनुभव लक्षांत घेतां आपण निराश होण्याचें कांहीं कारण नाहीं. परमेश्वरावर दृढ विश्वास ठेवून लोककल्याणासाठीं व आत्मकल्याणा-साठीं परमेश्वराची अनन्यभावानें प्रार्थना करीत रहा. त्याच्या कृपेनें तुम्हांला व तुमच्या राष्ट्राला आनंदाचे व समाधानाचे दिवस लाभतील यांत शंकाच नाहीं. अनादि व अनंत अशा सृष्टीच्या जीवनप्रवाहांत समष्टीच्या दृष्टीनें हजारपांचशें वर्षांचा कालखंड हा कांहीं फार मोठा काल मानतां येत नाहीं. या दृष्टीनें पहातां आपलें व आपल्याबरोबर भारताचेंहि दुर्दैव विलयाला जाऊन आपण परमात्मकृपेनें सुखाचे व समाधानाचे दिवस पाहूं असा विश्वास ठेवण्याला आपल्याला पूर्ण वाव आहे.

तात्पर्य भारतांत शंभलग्रामीं पुढें विष्णुयश ब्राह्मणापासून भगवंताचा कल्कि या नांवाचा अवतार निश्चित होणार. कल्कि शब्दाचा अर्थच कलह – भांडणतंटे मिटविणारा असा आहे. "कलिं कृणोति इति कल्किः" अशी कल्कि या शब्दाची व्युत्पत्ति आहे. कलि म्हणजे कलियुग. अर्थात् कलह, भांडण–तंटे आणि त्याचा दुष्परि-णाम म्हणून भोगावे लागणारे क्लेश या सर्वांना जो नाहींसें करून टाकतो त्याला कल्कि असें म्हणतात. हा अवतार कलियुगाच्या शेवटीं शेवटीं संधिकालांत होणार आहे. ज्या वेळीं राजे लोक अथवा तत्सम राज्यकर्ते लोक जनतेच्या वित्ताचें आणि जीवितांचें अपहरण करतील व जनतेवर दुर्धर प्रसंग ओढवेल त्या वेळीं परमेश्वर कल्कि रूपानें अवतरून शांततेची प्रस्थापना करील.

श्रीहयग्रीव, श्रीहरि, हंस, पृश्निगर्भ, विभू, सत्यसेन, वैकुंठ अथवा अजित, सार्वभौम, विश्वक्सेन, धर्मसेतु, सुधाम, योगेश्वर, बृहद्भानु आणि शुक्ल इत्यादि रूपांनीं परमे-श्वराचे असंख्य अवतार पुराणान्तरीं उपलब्ध आहेत. वर निर्दिष्ट केलेले बावीस अवतार म्हणजे परमेश्वराच्या अनंत अवतारांतील कांहीं प्रमुख अवतारांचें केवल दिग्दर्शन मात्र आहे.

## भगवान् दत्तात्रेय

वर केवळ दिग्दर्शित केलेल्या परमेश्वराच्या कांहीं प्रमुख अवतारांपैकीं सहावाच अवतार आपले चरित्रनायक आणि उपास्यदैवत असलेले सद्गुरु भगवान श्रीदत्तात्रेय होत हें आपण वर पाहिलेंच आहे. अवधूतकुलमुकुटमणि सिद्धराज विश्वगुरु भगवान

श्रीदत्तात्रेय यांचा अवतार केव्हां झाला ? कोठें झाला ? कां झाला ? व कसा झाला ? हे चार प्रश्न प्रामुख्यानें पुढें येतात. दत्तात्रेयांचा अवतार केव्हां झाला या प्रश्नांत कालविचार अभिप्रेत असतो तर कोठें झाला या प्रश्नांत देशविचार अभिप्रेत असतो. त्याचप्रमाणें श्रीदत्तात्रेयप्रभूंचा अवतार कां झाला या प्रश्नांत हेतुविचार अभिप्रेत असून तो कसा झाला या प्रश्नांत अवताराच्या प्रसंगांचा इतिहास आणि अवतारांचें स्वरूप अभिप्रेत असतें. यानंतर दत्तात्रेय प्रभूंचें चरित्र आणि प्रभाव यांचा विचार करणें हें ओघानेंच येतें. या सर्वांचा विचार झाल्यानंतर उपास्य देवता या दृष्टीनें गुरुदेवांचीं स्तुतिस्तोत्रें, सहस्रनामें, कवच, हृदय, वज्रपंजर, यंत्र, मंत्र, पुरश्चरण-पद्धति, पूजापद्धति आणि उपासनेचीं इतरहि अंगें अर्थात भूपाळ्या, काकडारती, पंचामृतपूजा, पंचपदी आणि भजनें इत्यादि गोष्टींचा विचार होणेंहि आवश्यक आहे. आपल्या इष्ट देवतेची अथवा उपास्य देवतेची उपासना करीत असतांना उपास्य देव-तेनें उपदेशिलेल्या तत्त्वज्ञानाचेंहि चिंतन करणें हेंहि आवश्यक असतें. भगवत्कृपा असली तरी भगवंताच्या उपदेशांचें व तत्त्वज्ञानाचें चिंतन करणें आत्मसमाधानाच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त असतें. दत्तात्रेयांनीं अनेक भक्तांना वेळोवेळीं केलेले उपदेश अत्यंत मननीय असून ते बहुमोलाचे आहेत. अनेक भक्तांनीं दत्तात्रेयप्रभूंच्या उपदेशाचा करून ठेवलेला अनुवाद आज आपल्याला पहावयास सांपडतो हें खरोखर आपलें मोठें भाग्य आहे. त्या उपदेशाचें चिंतन आपल्या मनाला निश्चित समाधान देणारें असल्यामुळे त्या उपदेशांचा विचार करणें हेंहि आपलें कर्तव्य आहे. तरी आतां आपण श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या कृपेनें वर निर्दिष्ट केलेल्या सर्व विषयांचें यथामति अवलोकन करूं.

## कालविचार

एकावर एक अशा कमळाच्या एक हजार पाकळ्या रचल्या आणि त्यांना एका सुईच्या अग्राप्रमाणें सूक्ष्म टोंक असलेल्या तीक्ष्ण लोखंडाच्या सळईनें जोराचा आघात केला म्हणजे त्या लोहशलाकेला त्या एक हजार पाकळ्यांचा भेद करून आपलें मुख बाहेर काढण्यास किती वेळ लागेल ? अगदी एका चुटकीसरशी ही क्रिया घडून येते. अधिक वेळ लागत नाही. पण एवढ्या अल्पकाळांत काळाचे एक हजार सूक्ष्म खंड पडतात. एकावर एक रचलेल्या अशा एक हजार कोमल कमलदलांचा भेद कर-तांना त्या सूक्ष्म सळईच्या टोंकाला एका दलांतून दुसऱ्या दलांत व दुसऱ्या दलांतून तिसऱ्या दलांत प्रवेश करावा लागला ही गोष्ट निर्विवाद आहे. हा काल क्षणासारखा जरी सूक्ष्म असला तरी तो एक हजार कमलदलांच्या संख्येमुळें एक हजार संख्येनें विभागला गेला हें कोणालाहि मान्य करावें लागेल.

एखादी विजेच्या दिव्यांची रांग (लाईन) सुरू झाल्याबरोबर त्या रांगेंतील (लाईनींतील) सर्व दिवे एकदम लागल्यासारखे आपणांस दिसतात. पण ते एकदम लागत नसतात. सूक्ष्म दृष्टीने व अत्यंत सावधानतेनें आपण पाहिल्यास ते सर्व दिवे

एकामागून एक अशा क्रमानेच लागत असल्याचें दिसून येतें. विद्युत्प्रवाह हा फारच द्रुतगतीनें वहात असल्यामुळें सर्व दिवे एकदम लागल्याचा आपणांस भास होत असतो. आपल्याला असा भास झाला तरी त्या ठिकाणीं विजेच्या गतीचा काळ हा दिव्यांच्या अंतरानें व संख्येने विभागला जातोच. असा हा कालाचा विभाग अतिसूक्ष्म आहे.

कालाच्या या अतिसूक्ष्म विभागांतूनच कालाचे स्थूलखंड कल्पिले जातात व त्यांवरूनच ज्यौतिषशास्त्रवेत्ते कालगणना करीत असतात. सद्‌गुरु भगवान श्री दत्तात्रेय यांच्या अवतारकालाची कल्पना येण्याकरितां आपण आतां थोडासा कालगणनेचा विचार करूं. कालाच्या अतिसूक्ष्म अंशाला शास्त्रज्ञांनीं त्रुटि असें नांव दिलेलें आहे. (या त्रुटीलाच अणु किंवा बारीक काळ असेंहि म्हणतात) दोन त्रुटि म्हणजे एक लव व दोन लव म्हणजे एक क्षण होय. ज्योतिषशास्त्रामध्यें शंभर त्रुटींना एक तत्पर असें नांव दिलेलें आढळतें. तीस तत्पर म्हणजे एक निमेष. डोळयांच्या पापण्यांची उघडझाप होण्याला जेवढा वेळकाळ लागतो तेवढ्या काळास आपण निमेष असें म्हणत असतों. त्यांतहि पापणीस पापणी लागणें हा निमेष होय व पापणीपासून पापणी अलग होणें हा उन्मेष होय. अठरा निमेष म्हणजे एक काष्ठा व तीस काष्ठा म्हणजे एक कला समजावी. अश्या तीस कला पूर्ण झाल्या म्हणजे एक घटका झाली असें समजतात. एक घटका म्हणजे चोवीस मिनिटांचा काळ होय. दोन घटका म्हणजे एक मुहूर्त आणि साडेसात घटका म्हणजे एक प्रहर होय. चार प्रहर म्हणजे एक दिवस. अर्थात् सामान्यपणें सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काल. सामान्यतः तेवढेंच रात्रिमान गृहीत धरल्यास आठ प्रहरांचा एक संपूर्ण दिवस होतो. यालाच अहोरात्र असें म्हणतात. पंधरा दिवसांचा एक पक्ष व दोन पक्षांचा एक मास समजला जातो. सौरमास, चांद्रमास, नाक्षत्रमास इत्यादि भेदानें याचे अनेक प्रकार आहेत. दोन मास म्हणजे एक ऋतु व तीन ऋतु म्हणजे एक अयन समजलें जातें. मकरसंक्रमणापासून कर्क संक्रमणाला आरंभ होईतोंपर्यंतच्या काळास उत्तरायण व कर्क संक्रमणापासून मकर संक्रमणाच्या सुरुवातीपर्यंतच्या काळास दक्षिणायन असें म्हणतात. उत्तरायण काल हा देवांचा दिवस मानला जातो तर दक्षिणायन काल ही देवांची रात्र मानिली जाते. दक्षिणायन व उत्तरायण मिळून देवांचा एक अहोरात्र काल पूर्ण होतो. दोन अयनांचा अथवा बारा महिन्यांचा एक कालखंड म्हणजे मानवांचें एक वर्ष समजावें. एका वर्षांत सरासरीनें तीनशेंसाठ दिवस बसतात. तिथींच्या वृद्धि – क्षयांच्या मतभेदानें क्वचित् एका वर्षाची दिनसंख्या तीनशेंपासष्ट दिवसांपर्यंतहि जाते.

आतां यापुढें आपणांला युगमानाचाहि विचार करणें अत्यंत आवश्यक आहे. त्याशिवाय भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कालाची बरोबर कल्पना येणार नाहीं. आपलें आराध्यदैवत सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे ब्रह्मदेवांचे पौत्र म्हणजे चिरंजीवांचे चिरंजीव आहेत. ब्रह्मदेवांचे पुत्र श्री अत्रिमहर्षि व अत्रिमहर्षींचे पुत्र योगेश्वर भगवान श्रीदत्तात्रेय होत. दत्तात्रेयांचा अवतार हा पहिल्याच स्वायंभुव मन्वन्तराच्या पहिल्या

महायुगांतील कृतयुगांत झालेला आहे. हा काल बरोबर लक्षांत येण्यासाठीं आपण आतां युगमानाचाहि विचार करूं. ब्रह्मदेवाच्या एका दिवसाला कल्प असें म्हणतात. कल्प शब्दाचा अर्थ सृष्टि अथवा सृष्टिकाल असा आहे. जेवढा सृष्टीचा काल असतो साधारणपणें तेवढाच प्रलयाचाहि काल असतो. कल्पकाल हा ब्रह्मदेवाचा दिवस आहे तर प्रलयकाल ही त्याची रात्र होय. प्रलयकालीं सर्व कार्यसृष्टि ही विशीर्ण झालेली असते; तिचा नाश झालेला असतो. कल्पाच्या आरंभी ब्रह्मदेव पुन्हां सृष्टि निर्माण करतात. ती ते पूर्वींप्रमाणेंच निर्माण करीत असतात. "धाता यथा पूर्वमकल्पयत्" हें याविषयींचें प्रमाणभूत श्रुतिवाक्य प्रायः सर्वतोमुखीं विराजत आहेच.

ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा मन्वन्तरें होतात. एकाएका मनूच्या कालखंडाला मन्वन्तर अशी संज्ञा आहे. चौदा मन्वन्तरांमध्ये चौदा मनूंची कारकीर्द क्रमशः सुरू होते व संपतहि असते. ते चौदा मनु असे :–

| | |
|---|---|
| (१) स्वायंभुव मनु | (२) स्वारोचिष मनु |
| (३) उत्तम मनु | (४) तामस मनु |
| (५) रैवत मनु | (६) चाक्षुष मनु |
| (७) वैवस्वत मनु | (८) सावर्णि मनु |
| (९) दक्षसावर्णि मनु | (१०) ब्रह्मसावर्णि मनु |
| (११) रुद्रसावर्णि मनु | (१२) धर्मसावर्णि मनु |
| (१३) रुचिसावर्णि मनु | (१४) भूतिसावर्णि मनु |

अशीं त्यांचीं क्रमशः नांवें आहेत. एका मन्वन्तरामध्यें एकाहत्तर महायुगें मानलीं जातात. कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग आणि कलियुग अशा या चार युगांच्या कालसमुच्चयाला महायुग अशी संज्ञा आहे.

एका कृतयुगामध्यें सतरा लक्ष अठ्ठावीस हजार मानवीं वर्षें होतात. सतरा लक्ष अठ्ठावीस हजार मानवीं वर्षें म्हणजे एक कृतयुग समजावें. बारा लक्ष शहाण्णव हजार मानवीं वर्षें म्हणजे एक त्रेतायुग समजावें. द्वापरयुगामध्यें आठ लक्ष चौसष्ट हजार मानवीं वर्षें बसतात. तरी कलियुगामध्यें चार लक्ष बत्तीस हजार मानवीं वर्षांचा अंतर्भाव होत असतो. एकंदर या चारहि युगांची वर्षसंख्या एकत्र केली म्हणजे ती त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षें भरते. हाच एका महायुगाचा काळ समजावा. अशी एकाहत्तर महायुगें लोटलीं म्हणजे एक मन्वन्तर पूर्ण होतें. हाच एका मनूचा काल समजावा. एका मनूच्या काळांत तीस कोटि सदुसष्ट लक्ष वीस हजार मानवीं वर्षें पूर्ण होतात. अशीं चौदा मन्वन्तरें पूर्ण झालीं म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस पूर्ण होतो. अर्थात् तीस कोटि सदुसष्ट लक्ष वीस हजार या संख्येला चौदानें गुणिलें म्हणजे चार अब्ज एकोणतीस कोटि चाळीस लक्ष ऐंशी हजार ही संख्या येते. इतक्या संख्येनें मानवीं

वर्षे पूर्ण झालीं म्हणजे एक कल्प पूर्ण होतो. हाच ब्रह्मदेवाचा एक दिवस होय. ब्रह्मदेवाच्या एका दिवसाचें जेवढें कालमान सांगितलें आहे तितकेंच कालमान ब्रह्मदेवाच्या रात्रीचेंहि समजावें. एकूण आठ अब्ज अठ्ठावन्न कोटि एक्क्याऐंशी लक्ष साठ हजार मानवी वर्षें म्हणजे ब्रह्मदेवाचा एक संपूर्ण दिवस होतो.

"चतुर्युगसहस्त्रं तु ब्रह्मणो दिनमुच्यते" या वचनाप्रमाणें विचार केल्यास ब्रह्मदेवाच्या एका दिवसामध्यें च्यार अब्ज बत्तीस कोटि मानवीं वर्षे बसतात आणि तितकेंच रात्रिमान त्यांत मिळविल्यास आठ अब्ज चौसष्ट कोटि मानवीं वर्षे म्हणजे ब्रह्मदेवाचा एक संपूर्ण दिवस होतो.

या कालमानाप्रमाणें विचार केल्यास ज्योतिषशास्त्राप्रमाणें चतुर्दशभुवनात्मक विद्यमान ब्रह्मांडाचा अधिपति असलेल्या ब्रह्मदेवाला पन्नास वर्षे पूर्ण झालेलीं असून आतां त्यास एक्कावन्नावें वर्ष चालूं आहे असें मानलें जातें.

आपण यज्ञयाग, जपतप, पूजाश्राद्ध किंवा दानधर्म करीत असतांना जे संकल्प करीत असतों त्या संकल्पाच्या वेळीं देशकालाचा निर्देश करतांना "अद्य ब्रह्मणो द्वतीयपरार्धे" असें म्हणत असतों. सर्वश्रीविभूषित भगवान् महापुरुष म्हणजेच आदिविष्णु, त्यांच्या आज्ञेनें सृष्टीच्या उत्पत्तीसाठी प्रवृत्त झालेल्या विद्यमान ब्रह्मदेवाचें हें दुसरें परार्ध म्हणजे उत्तरार्ध चालूं आहे. असा नेहमींच आपण उल्लेख करीत असतों. अर्थात् आज ब्रह्मदेवाचें एक्कावन्नावें वर्ष चालूं आहे. ब्रह्मदेवाच्या एक्कावन्नाव्या वर्षांतील ब्रह्मदेवाचा हा पहिलाच दिवस चालू आहे. पहिल्या दिवसांतील सहा मन्वन्तरें लोटलीं असून सातव्या मन्वन्तरांतील सत्तावीस महायुगें पूर्ण झालेलीं आहेत. अठ्ठाविसाव्या महायुगांतीलहि कृतयुग, त्रेतायुग आणि द्वापारयुग पूर्ण झालें असून प्रस्तुत कलियुगाचीहि पांच हजार एक्काहत्तर वर्षे पूर्ण झालीं आहेत. एकंदर विचार करतां शालिवाहन शकारंभाच्या पूर्वीं एक अब्ज सत्त्याण्णव कोटि एकोणतीस लक्ष सत्तेचाळीस हजार एकशेंएकूण ऐंशी मानवीं वर्षे हाच ब्रह्मदेवाच्या चालूं दिवसांतील पहिल्या अर्थात् स्वायंभुव मनूचा काळ येतो. प्रस्तुत ग्रंथांतील चरित्रनायकाचा म्हणजेच वर्ण्यदेवतेचा अर्थात् भगवान श्रीदत्तात्रेय यांचाहि तोच आविर्भावकाल होय. अशा रीतीनें प्रमाणपुरस्कृत शास्त्रोक्त पद्धतीने विचार केल्यास अत्रिपुत्र भगवान श्रीदत्तात्रेय यांचा आविर्भावकाल हा इसवीसनपूर्व एक कोटि शहाण्णव लक्ष आठ हजार पांचशेंअकरा शतकें असल्याचें निर्विवाद सिद्ध होतें. ऐतिहासिक तत्त्ववेत्त्यांना हा काळ फारच दीर्घ व असंभवनीय वाटेल. पण पौराणिक वाङ्मयांतील कथासंदर्भ लक्षांत घेतां हाच काळ मानणें अपरिहार्य ठरतें.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, पौराणिक वाङ्मयाची जडणघडण हीच मुळीं अलीकडच्या काळांतली आहे. पुराणें हीं इसवी सनाच्या जवळपासच्या कालखंडांतच निर्माण झालेलीं आहेत. अशा स्थितींत त्यांत वर्णन केलेल्या घटनांचा काळ हा अतिपुरातन मानतां येणार नाहीं. पण ही शंका युक्तिविसंगत असल्यामुळें अगदीं

निरर्थक आहे. एखादा ऐतिहासिक ग्रंथ अलीकडच्या काळांत लिहिला गेला असला तरी तेवढ्यावरून त्या ग्रंथांत वर्णिलेल्या ऐतिहासिक घटनांचाहि काळ अलीकडचाच असें मानतां येत नाहीं. तुलसीरामायणाचा काळ सोळावें शतक असला तरी त्यांत वर्णन केलेले राम–रावण युद्धासारखे ऐतिहासिक प्रसंग अलीकडचे आहेत असें म्हणतां येत नाहीं. रामायणांत वर्णन केलेल्या वशिष्ठ–विश्वामित्र यांसारख्या व्यक्तीहि अलीकडच्या काळांतील आहेत असेंहि म्हणतां येत नाहीं. वीतरागमहाविभूति श्रीवासुदेवानंदसरस्वति यांनीं लिहिलेलें दत्तपुराण हें विसाव्या शतकांतील असलें तरी त्यांत वर्णन केलेल्या घटनाहि विसाव्या शतकाच्या जवळपासच्या आहेत असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें पुराणांचा काळ हा पाश्चात्त्य संशोधक आणि त्यांच्याच विचारांना अनुसरणारें पौर्वात्य पंडित यांच्या मतानें अलीकडचा असला तरी तेवढ्यावरून त्यांत वर्णिलेला इतिहास हाहि अलीकडच्याच काळांतला आहे असें मानतां येत नाही. ऐतिहासिक घटनांचा काळ हा अन्य प्रमाणांवरून सिद्ध होत असतो. भगवान श्रीदत्तात्रेय यांचे पितामह प्रत्यक्ष ब्रह्मदेवच आहेत. त्यांचेच पुत्र ऋग्वेदांतील सूक्तांचे द्रष्टे आद्यअत्रिमहर्षि होत. स्वायंमभुव मनूचे जामात कर्दममहर्षि हे दत्तात्रेयांचे मातामह असून कर्दमऋषींची कन्या आद्यदेवी महासती अनसूया ही दत्तात्रेयांची माता आहे. स्वायंभुव मनूंची कन्या देवहूती ही दत्तात्रेयांची मातामही म्हणजे आईची आई अर्थात् आजी आहे आणि सांख्यशास्त्रप्रणेते भगवान् कपिलमहामुनि हे दत्तात्रेयांचे सख्खे मामा आहेत. हा सर्व इतिहास लक्षांत घेतां श्रीदत्तात्रेय भगवान यांचा आम्ही वर निर्दिष्ट केलेला कालच आविर्भावकाल मानावा लागतो.

श्रीदत्तात्रेय हे कोणत्या अत्रीचे पुत्र आहेत ?

आतां दत्तात्रेय हे कोणत्या अत्रीचे पुत्र आहेत याचा आपण विचार करूं. भगवान् श्रीदत्तात्रेय हे ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या साक्षात् अत्रि महर्षींचेच औरसपुत्र होत यांत संशय नाहीं. " अत्रिवंशसमुद्भूत " अथवा " अत्रिकुलोद्भव " या विशेषणांचा आधार घेऊन कांहीं आधुनिक विद्वान् दत्तात्रेयाला अत्रिकुलांत केव्हांतरी, कोठेंतरी कोणाच्यातरी पोटीं जन्माला आलेला असें मानून दत्तात्रेयांचा आविर्भावकाल इसवीसनाच्या आरंभाच्या जवळपास एक-दोन शतकें मागेंपुढें असल्याचें मानतात. पण त्यांचें हें मानणें युक्तिविसंगत असल्यामुळें यथार्थ आहे असें म्हणतां येत नाहीं. केवळ एखाद्या ठिकाणीं " अत्रिवंशसमुद्भूत " अथवा " अत्रिकुलोद्भव " असें विशेषण आलें आहे. एवढ्यावरून दत्तात्रेय हे अत्रिऋषींच्या वंशांत केव्हांतरी आणि कोणाच्या तरी पोटीं जन्माला आलेले आहेत अशी कल्पना करावयाची असेल तर मग " अत्रितनय ", " अत्रिपुत्र ", " अत्रिसुत ", " अत्रिनंदन " इत्यादि अनेक विशेषणें दत्तात्रेय हे साक्षात् अत्रिमुनींचेच पुत्र असल्याचें दाखवीत आहेत, त्यांची वाट काय लावणार ? एखादें विशेषण प्रतिकूल भासलें तर तें अनेक विशेषणांच्या अनुरोधानें लावणें श्रेयस्कर, का अनेक विशेषणांचा एखाद्या विशेषणाच्या अनुरोधानें अर्थ लावणें

श्रेयस्कर ? एखाद्या वचनाच्या अनुरोधानें प्रतिकूल भासणारीं अनेक वचनें अप्रमाण मानणें श्रेयस्कर, का अनेक वचनांच्या अनुरोधानें एखादें वचन उपपन्न करणें श्रेयस्कर? असा जेव्हां विचार सुरू होतो तेव्हां अनेक वचनांच्या अनुरोधानेंच प्रतिकूल भासणारें एखादें वचन सुसंगत करून घ्यावें लागतें. एखाद्या वचनाच्या अनुरोधानें अनेक वचनें जर प्रतिकूल दिसत असतील तर त्या ठिकाणीं अनेक वचनांनीं सिद्ध होणारें विधानच यथार्थ मानावें लागतें व प्रतिकूल भासणारें एखादें वचन हेंच अनेक वचनांच्या अनुरोधानें लावावें लागतें, अशी विचारवंतांची परिपाटी आहे. या दृष्टीनें पाहतां "अत्रिवंश समुद्भूत" अथवा "अत्रिकुलोद्भव" हीं विशेषणें जरी दत्तात्रेय हे अत्रिकुलांत जन्माला आलेले आहेत असें सांगत असलीं तरी "अत्रितनय", "अत्रिपुत्र", "अत्रिसुत", "अत्रिनंदन" इत्यादि अनेक विशेषणांवरून दत्तात्रेय हे साक्षात् अत्रिऋषींचेच पुत्र आहेत असें ठरतें. बहुमतानें निर्णय घेण्याची पद्धति विद्यमान काळांत जगन्मान्य झालेली आहे.

## सिद्धान्त निर्णयाची रीती

वस्तुस्थिति अशी आहे कीं, कोणत्याहि सिद्धान्ताच्या तात्त्विक स्वरूपाचा निर्णय घेतांना केवळ एखाद्या बाजूला बहुमत आहे म्हणून तो पक्ष यथार्थ आहे असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या बाजूला अल्पमत आहे – अत्यंत अल्पमत आहे–एवढ्यावरून ती बाजू अथवा तो पक्ष अयथार्थ आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. सिद्धान्ताची यथार्थता अथवा अयथार्थता ही मतांच्या संख्येवर अवलंबून नसते. ती मतांच्या प्रामाणिकतेवर अवलंबून असते. युक्तियुक्त व प्रबल प्रमाणावर अवलंबून असलेलें मत हें संख्येनें अल्प जरी असलें तरी तेंच सिद्धान्ताच्या तात्त्विक स्वरूपाचें निर्णायक ठरतें. याच्या उलट एखाद्या बाजूला, कितीहि बहुमत असलें तरी जोंपर्यंत त्या मतांना युक्तीचें अथवा बलवत्तर पुराव्यांचें अधिष्ठान लाभत नाहीं तोंपर्यंत त्या बहुमताला तात्त्विक स्वरूपाचें निर्णायकत्व येत नाहीं. प्रकृतस्थलीं युक्ति व पौराणिक इतिहास यांच्या आधारें सूक्ष्म विचार केल्यास भगवान् श्रीदत्तात्रेय हे ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रिमहर्षींचेच पुत्र होत यांत तिळमात्रहि संशय घ्यावयास जागा उरत नाहीं.

आतां "अत्रिवंशसमुद्भूत" या विशेषणाचा आपण स्वतंत्रपणें विचार केला तरी दत्तात्रेय हे प्रत्यक्ष अत्रिपुत्र नव्हेत ही गोष्ट सिद्ध होत नाहीं असेंच दृष्टीस पडेल. "अत्रिवंशसमुद्भूत" याचा अर्थ अत्रिवंशांत जन्माला आलेला असाच आहे. अत्रीचा प्रत्यक्ष पुत्रहि अत्रिवंशांतलाच असल्यामुळें त्यालाहि उद्देशून "अत्रिवंशसमुद्भूत' हें विशेषण लागू पडतेंच. रघूचा पुत्र अज राजा हा जसा रघुवंशसमुद्भूत आहे अथवा यदूचे पुत्र क्रोष्टु आणि नल हे जसे यदुवंशसमुद्भूत आहेत त्याचप्रमाणें अत्रीचे पुत्र दत्तात्रेय हेहि अत्रिवंशसमुद्भूत आहेत असें म्हणावयास भाषेची कांहींच अडचण

येत नाहीं. "वंशसमुद्भूत" म्हटल्यानें मूळ पुरुषापासून कांहीं पिढ्यांचें अंतर मानावयासच पाहिजे असा नियम नाहीं. मूळ पुरुषाची औरस पिढी देखील मूळ पुरुषाच्या वंशांतच उत्पन्न झालेली असल्यामुळें त्या पिढींतील वंशजांनाहि "तद्वंशसमुद्भूत" असें विशेषण लागु पडतेंच. याच न्यायानें अत्रिपुत्र दत्तात्रेयांनाहि "अत्रिवंशसमुद्भूत" हें विशेषण देणें योग्यच ठरतें. हाच न्याय "अत्रिकुलोद्भव" याहि विशेषणाला लागू पडतो. केवळ या विशेषणांवरून दत्तात्रेय हे अत्रीनंतर कांहीं पिढ्यांच्या अंतरानें अत्रिगोत्रांत जन्माला आलेले आहेत अशी कल्पना करणें उचित होणार नाहीं.

तात्पर्य "अत्रितनय", "अत्रिपुत्र", "अत्रिसूनु", "अत्रिनंदन", "अत्रिसुत" इत्यादि विशेषणांवरून व इतिहासावरूनहि अवधूत भगवान् श्रीदत्तात्रेय हे प्रत्यक्ष अत्रिपुत्र असल्याचें सिद्ध होत असल्यानें केवळ "अत्रिवंशसमुद्भूत" अथवा "अत्रिकुलोद्भव" या विशेषणांवरून दत्तात्रेय हे साक्षात् अत्रिपुत्र असल्याच्या सिद्धांताला यत्किंचित्हि बाध येऊं शकत नाहीं. अशा रीतीनें भगवान् दत्तात्रेय हे साक्षात् अत्रिमहर्षि यांचेच पुत्र असल्याचें प्रबल प्रमाणांनीं सिद्ध होत असल्यामुळें प्रकृतस्थलीं पुढें आलेलें "अत्रिवंशसमुद्भूत" अथवा "अत्रिकुलोद्भव" हें विशेषण हें कांहीं दत्तात्रेयांच्या अत्रिपुत्रत्वाचें व्यावर्तक होऊं शकत नाहीं. उलट अत्रिमुनींच्या पोटीं जन्म घेऊन दत्तात्रेयांनीं अत्रिवंशाला भूषित केलें असल्याचेंच तें द्योतक आहे ही गोष्ट वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावी.

अनेक वचनांनीं सिद्ध होणाऱ्या एखाद्या सिद्धान्ताला विरोध दर्शविणारें एखादें वचन आढळल्यास तें वचन जर बलवत्तर प्रमाणांवर अधिष्ठित असेल तरच इतर वचनांचा बाध करून आपल्याला अभिप्रेत असलेल्या सिद्धान्ताचें समर्थन करूं शकतें. त्याला जर इतर बलवत्तर प्रमाणांचा आधार नसेल तर तें वचन इतर वचनांचा बाध न करतां स्वतःच बाधित होत असतें. या न्यायानें पाहतां प्रकृतस्थलीं दत्तात्रेयांचें "अत्रिवंशसमुद्भूत" हें विशेषण "अत्रितनय", "अत्रिनंदन", "अत्रिपुत्र", इत्यादि अनेक विशेषणांचा बाध करून दत्तात्रेय हे अत्रिकुलांत केव्हांतरी, कोणाच्या तरी पोटीं जन्माला आले असा निष्कर्ष काढण्यास समर्थ होऊं शकत नाहीं.

भगवान् दत्तात्रेय हे ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रिमुनींचे व कर्दम ऋषींची कन्या असलेल्या अनसूयेचेच पुत्र आहेत, का आणखी कोणत्या तरी अत्रीचे व अनसूयेचे पुत्र आहेत ? कारण "अत्रिपुत्र", "अत्रितनय", "अत्रिनंदन" इत्यादि विशेषणें हीं दत्तात्रेय हे अत्रींचे पुत्र आहेत ही गोष्ट सिद्ध करूं शकतील पण ते अत्रि-ब्रह्मदेवाचेच पुत्र होत, का अत्रिकुलांत जन्माला आलेले कोणीतरी दुसरे अत्रि होत ? ही शंका राहतेच. तात्पर्य, कोणत्यातरी अत्रीपासून व अनसूया नांव असलेल्या त्यांच्या पत्नीपासून दत्तात्रेयांचा जन्म झाला नसेल कशावरून ? अशी जर कोणी शंका घेईल तर त्याला आमचें हेंच उत्तर आहे कीं, प्रश्न करतांना सुद्धां प्रश्नाची सोपपत्तिकता

लक्षांत घेऊनच प्रश्न केलेला बरा. उगाच कांहींतरी विचारावयाचें म्हणून प्रश्न करणें बरोबर होणार नाहीं. भगवान् श्रीदत्तात्रेय हे ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रीपासून व कर्दमुनींची कन्या असलेल्या अनसूयेपासूनच अवतरलेले आहेत ही गोष्ट अनेक पुराणेतिहासादि प्रमाणांवरून निर्विवाद सिद्ध होत असतांना उगाच स्वकपोलकल्पित तर्कावर आधारित असलेल्या व प्रमाणशून्य आणि म्हणूनच निरर्थक अशा विचारांच्या पोटीं कांहीं तरी शंका घेत राहणें अथवा प्रश्न करणें हें उचित होणार नाहीं. उलट भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा जन्म ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रिमुनींपासूनच झालेला आहे हें आपल्याला विविध पुराणेतिहासावरून लक्षांत घेतां येतें. श्रीमद्भागवत, महाभारत, अग्नि-पुराण, वायुपुराण, मत्स्यपुराण, मार्कण्डेयपुराण, ब्रह्माण्डपुराण, ब्रह्मपुराण व भविष्योत्तर महापुराण इत्यादि अनेक पुराणांतून श्रीदत्तात्रेयप्रभूंचा अवतार ब्रह्मदेवांचे पुत्र असलेल्या अत्रिमहर्षींपासूनच झाला असल्याचें स्पष्ट सांगितलेलें आहे.

प्रथम वाचकांनीं ही गोष्ट अवश्य लक्षांत घ्यावी कीं, योगेश्वर भगवान् दत्तात्रेय हे एकटेच अत्रिमुनि व अनसूया यांच्यापासून जन्माला आले असें नसून त्यांच्याबरोबर सोमवंशाचा मूळपुरुष असलेला श्रीसोम आणि तपोमूर्ति श्री दुर्वासमुनि हेहि जन्माला आलेले आहेत. सोम आणि दुर्वास हे दत्तात्रेयांचे सख्खे बंधु आहेत. ते सहोदर आहेत. जर दत्तात्रेय हे अत्रिवंशांत जन्माला आलेल्या कोणत्या तरी अत्रीपासून जन्मले आहेत असें मानलें तर सोम, दत्त आणि दुर्वास यांचें सहोदरत्व सिद्ध होणार नाहीं. सोम आणि दुर्वास मुनि यांचा जन्म अत्रिगोत्राचा प्रवर्तक असलेल्या आद्य अत्रीपासूनच झाला असल्याचे अनेक ग्रंथांतून उल्लेख आढळतात, दत्त, दुर्वास आणि सोम हे तिघेहि सहोदर म्हणजे सख्खे बंधु असल्याचे उल्लेख अनेक प्राचीन ग्रंथांतून पहावयास सांपडतात. आद्य अत्रिव्यतिरिक्त इतर कोणत्याहि अत्रीपासून अथवा अत्रिगोत्रांत जन्माला आलेल्या व्यक्तीपासून सोम आणि दुर्वास यांचा जन्म झालेला पहावयास सांपडत नाहीं. तो आद्य अत्रीपासूनच झालेला असल्याचीं ठिकठिकाणीं वर्णनें आढळतात. दुर्वास आणि सोम हे तर दत्तात्रेयांचे सख्खे बंधु होत असें ज्याअर्थीं अनेक पुराणांतून निःसंदिग्धपणें सांगितलें जातें त्याअर्थीं गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय हे आद्य अत्रींचेच पुत्र आहेत यांत तिळमात्रहि संशय घेण्यास अवधि उरत नाहीं.

अत्रेरथानसूयायां त्रयो देवा निजांशतः।
जाताः पुत्राः शुभेकाले रूपशील-गुणान्विताः॥

दत्तात्रेयश्च दुर्वासाचन्द्रः श्रीशेशधातृजैः।
अंशैरेतानवाप्यात्रिः संतुष्टोऽभूत्प्रियान्वितः।

— गुरुपरम्परा

विधेरंशाद्विधुर्जज्ञेऽनसूयायां मुनीश्वरात् ।
विष्णोरंशात्स्त्रियां तस्यामत्रेर्दत्तो ध्यजायत ।।
दुर्वासामुनिशार्दूलः शिवांशान्मुनिसत्तमः ।
जज्ञे तस्यां स्त्रियामत्रेर्वरधर्मप्रवर्तकः ।।

— शिवपुराण २५

आद्यः पुत्रोऽनसूयायाः स्वयं साक्षात्पितामहः ।
चन्द्रमा इति विख्यातः सोमरूपो नृपात्मज ।।
द्वितीयस्तु महादेवि दुर्वासा नाम नामतः ।
सृष्टिसंहारकर्ता च स्वयं साक्षान्महेश्वरः ।।
दत्तात्रेयस्वरूपेण भगवान्मधुसूदन : ।
जगद्व्यापी जगन्नाथः स्वयं साक्षाज्जनार्दन : ।।

— स्कंदपुराण, अवन्ती खंड, अध्याय १०३

अनसूया तदा प्राह भवन्तो मम पुत्रकाः ।
भूत्वा शापान्मदीयाच्च मुक्त्वा, तृप्तिमवाप्स्यथ ।।
इत्युक्ते वचने ब्रह्मा चन्द्रमाश्च तदाह्यभूत् ।
दत्तात्रेयो हरिः साक्षात् दुर्वासा भगवान्हरः ।।
तत्पापपरिहारार्थं योगवन्तो बभूविरे ।।

— भविष्यमहापुराण

इति पुत्रत्रयं तस्या जज्ञे ब्रह्मेश वैष्णवम् ।
सोमो ब्रह्माऽभवद्विष्णुर्दत्तात्रेयोऽभ्यजायत ।
दुर्वासाः शंकरो जज्ञे वरदानाद्दिवौकसाम् ।।

— मार्कण्डेय १६।१०२–१०३

अत्रे : पत्न्यनसूया त्रीञ्जज्ञे सुयशसः सुतान् ।
दत्तं दुर्वाससं सोममात्मेशब्रह्मसंभवम् ।। ४।१।१५

— श्रीमद्भागवत

तेषां विख्यातयशसौ ब्रह्मिष्ठौ सुमहौजसौ ।
दत्तात्रेयस्तस्य ज्येष्ठो दुर्वासास्तस्य चानुजः ।।
यवीयसी सुता तस्य ह्यमला ब्रह्मवादिनी ।।

— वायुपुराण अध्याय ७०।७५–७६

तस्य पुत्रत्वमापन्नौ जनार्दनमहेश्वरौ ।
दत्तात्रेयोऽथ दुर्वासा लोके ख्यातिमुपागतौ ।।

— विष्णुधर्मोत्तर पुराण २५।५

उत्तम रूप, शील आणि गुण यांनी युक्त असलेले तीन देव अर्थात् विष्णु महेश्वर आणि ब्रह्मदेव हे शुभ मुहूर्तावर अत्रिमहर्षींपासून अनसूयेच्या उदरीं पुत्ररूपाने अवतरले. त्यांचीं नांवें क्रमशः दत्त, दुर्वास आणि चंद्र अशीं होत. श्रीविष्णु, भगवान् महेश्वर आणि सृष्टिविधाता ब्रह्मदेव हे तिघेहि आपआपल्या अंशानें पुत्ररूपानें आपल्याला लाभलेले पाहून अनसूयेसह अत्रिमहर्षींना अत्यंत आनंद झाला. असें गुरुपरंपरा या ग्रंथामध्यें वर्णिलेलें आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें अतिप्राचीन असलेल्या शिवपुराणांतहि मुनीश्वर श्रीअत्रिमहर्षि यांच्यापासून अनसूयेच्या ठिकाणीं ब्रह्मदेवाच्या अंशापासून चंद्राचा जन्म झाला. तिच्याच उदरीं श्रीविष्णूच्या अंशापासून देवदेवेश्वर दत्त अवतरले. त्याचप्रमाणें मुनिश्रेष्ठ दुर्वासमहर्षि हेहि अत्रिमुनींपासून अनसूयेच्याच उदरीं सदाशिवाच्या अंशानें अवतरले. अशा रीतीनें चंद्र, दत्त आणि दुर्वास हे तिघेहि सहोदरबंधु असल्याचें वर्णन केलेलें आहे.

स्कंदपुराणांतहि भगवान शंकर पार्वतीला दत्तात्रेयांचा परिचय करून देतांना महर्षि दुर्वास आणि नक्षत्रगणांचा अधिपति व सोमवंशाचा मूळ पुरुष चंद्रमा हे दत्तात्रेयांचे सख्खे बंधु असल्याचा उल्लेख करीत आहेत. ते म्हणतात, " हे गिरिराजतनये पार्वती, अत्रिऋषींचा आद्य पुत्र स्वयं साक्षात् ब्रह्मदेवच चंद्र या नांवानें प्रसिद्धीस आला. त्यालाच सोम असेंहि म्हणतात. अनसूयेचा दुसरा पुत्र दुर्वास या नांवानें प्रख्यात झाला. तो सृष्टिसंहारकर्ता असलेल्या साक्षात् महेश्वराचाच अंश होय. भगवान् मधुसूदन, जगाला व्यापून राहणारा जगन्नाथ साक्षात् जनार्दन विष्णु हेच स्वतःच्या अंशानें दत्तात्रेयांच्या रूपाने अनसूयेच्या उदरीं अवतरले, यावरूनहि हे तिघेहि सख्खे बंधु असल्याचेंच सिद्ध होत आहे.

भगवान ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांच्यावर रागावलेली अनसूया त्यांची नम्र प्रार्थना ऐकून त्यांना म्हणाली, " तुम्ही माझ्या उदरीं जन्म घेऊन माझ्या येथें नांदाल तरच माझ्या शापांतून मुक्त होऊन आनंदी व्हाल ! " अनसूयेचें हें भाषण ऐकून ब्रह्मदेव हे चंद्राच्या रूपानें तिच्या पोटीं जन्माला आले. प्रत्यक्ष भगवान् विष्णु हे दत्तात्रेयांच्या रूपानें अवतरले आणि देवांचे देव भगवान् शंकर हे दुर्वासमुनींच्या रूपानें प्रकटले. अनसूयेशीं केलेल्या लगटीमुळें लागलेल्या पापांतून मुक्त होण्यासाठीं ते तिघेहि योगी झाले, अशी ही कथा भविष्यमहापुराणांत आलेली आहे. या कथाप्रसंगावरूनहि दत्त, दुर्वास आणि चंद्र हे तिघेहि सख्खे बंधु असल्याचें सिद्ध होत आहे.

मार्कंडेय पुराणांत म्हटलें आहे कीं, देवांनी संतुष्ट होऊन वर दिल्यामुळें ब्रह्मदेव, शंकर आणि विष्णु हे तिघेहि अनसूयेचे पुत्र झाले. त्यांत ब्रह्मदेव हे सोम म्हणजे चंद्र झाले, साक्षात् भगवान् विष्णु हे दत्तात्रेय झाले आणि भगवान् शंकर हे दुर्वासऋषींच्या रूपानें जन्माला आले. याप्रमाणें हे तिघेहि अनसूयेचे पुत्र सहोदरबंधूच होत यांत संशय नाहीं.

श्रीमद्भागवतकर्त्यांनींहि चौथ्या स्कंधांत, "अत्रींची पत्नी अनसूया हिनें अत्यंत यशस्वी अशा तीन पुत्रांना जन्म दिला. ते दत्त, दुर्वास आणि सोम होत. प्रत्यक्ष भगवान् विष्णु, शंकर आणि ब्रह्मदेव यांच्या अंशांपासूनच त्यांचा जन्म झाला," असें म्हटलेलें आहे. यावरूनहि ते तिघेंहि सख्खे बंधु असल्या.चेंच सिद्ध होत आहे.

अत्रीला जे अनेक पुत्र झाले त्यांमध्यें ज्यांची ब्रह्मसाक्षात्कारी म्हणून दिगंत कीर्ति पसरली व जे अत्यंत तेजस्वी दिसत असे दोन पुत्र होत. दत्तात्रेय हे अत्रींचे ज्येष्ठ पुत्र असून दुर्वासमुनि हे दत्तात्रेयांचे धाकटे बंधु होत. अत्रिमुनींची एक धाकटी कन्या अर्थात् दत्तात्रेयांची धाकटी बहीण अमला अथवा अमलात्रेयी हीहि पण मोठी ब्रह्मवादिनी होती असा वायुपुराणामध्यें उल्लेख आहे.

जनार्दन म्हणजे विष्णु आणि महेश्वर म्हणज शंकर हे अत्रींचे पुत्र म्हणून जन्मास आले. त्यांत पहिले दत्तात्रेय आणि दुसरे दुर्वास होत. हे दोघेंहि जनतेंत अत्यंत प्रख्यात झाले असें विष्णुधर्मोत्तर पुराणांत म्हटलेलें आहे. याप्रमाणें ठिकठिकाणीं दत्तात्रेय, दुर्वास आणि सोन यांचा सहोदर म्हणून उल्लेख केलेला आढळतो. दुर्वास आणि सोम हे जर दत्तात्रेयांचे सख्खे बंधु होत आणि दुर्वास ऋषि व बुधाचे वडील सोम हे जर ऋग्वेदांतील सूक्तांचे द्रष्टे आणि ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रींचे पुत्र होत तर मग भगवान् श्री दत्तात्रेय हेहि त्याच अत्रींचे पुत्र होत हें मानणें ओघानेंच प्राप्त होतें. ब्रह्मदेवाचे पुत्र असलेले अत्रि हे तर ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांचे द्रष्टे होते ही गोष्ट निर्विवाद आहे. पुराणेतिहासाची कालगणनापद्धति ही क्षणभर बाजूला ठेवली तरी ज्याअर्थीं आधुनिक संशोधनसामग्रीच्या साहाय्यानें निरीक्षण करणाऱ्या पुरातत्त्ववेत्त्यांनींहि ऋग्वेदाचा रचनाकाल इसवीसनपूर्व आठ ते दहा हजार वर्षें असल्याचा सिद्ध होत असल्याचें मान्य केलें आहे त्या अर्थी ऋग्वेदांतील सूक्तांचा द्रष्टा असलेला व सूर्यग्रहणाचा शोध लावणारा ब्रह्मदेवाचा पुत्र अत्रि याचाहि तोच काळ मानावा लागतो. त्याच अत्रींच्या पोटीं दत्तात्रेयांचा जन्म झालेला असल्यामुळें दत्तात्रेयांचा आविर्भावकाल हाहि त्यांच्या दृष्टीनें इसवीसनपूर्व आठ ते दहा हजार वर्षेंच मानणें युक्तियुक्त ठरतें. अशा स्थितींत दत्तात्रेयांचा आविर्भावकाल इसवी सनाच्या जवळपास एक-दोन शतकें मानणें हें अत्यंत हास्यास्पद होय. तसें मानल्यास शंकराचे पुत्र देवांचे सेनापति कार्तिकस्वामी, हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद, पुरूरव्यापासून उर्वशीस झालेला पुत्र आयु राजा, श्रीकृष्णाचा पूर्वज यदु, ऋतुध्वजाचा पुत्र अलर्क, कृतवीर्याचा पुत्र सहस्रार्जुन, जमदग्नीचा पुत्र भार्गवराम हे सर्वच इसवीसनाच्या आरंभीं आगेमागें एक-दोन शतकांच्या कालखंडांतील मानावे लागतील. कारण हे सर्वच अवधूतकुलमुकुटमणि असलेल्या श्रीदत्तात्रेयांचे शिष्य होत. वेदद्रष्टे व ब्रह्मदेवाचे मानसपुत्र अंगिरा ऋषींचे पुत्र संवर्त मुनि हेहि दत्तात्रेयांचेच शिष्य बनले व अवधूत झाले. यालाहि इसवीसनाच्याच जवळपास मानावें लागेल. पण ते तर ऋग्वेदाच्या रचनाकालांतील अंगिरामुनींचे पुत्र आहेत ! त्यांनाहि उपदेश

करणारे भगवान् दत्तात्रेय हे इसवीसनाच्या जवळपास प्रकट झाले असें कसें मानतां येईल ?

आतां यावर कोणी शंका येईल कीं, एवढचा मोठचा दीर्घकालांत एकाच दत्तात्रेयांचें हें कार्य कसें मानतां येईल ? भिन्न भिन्न काळांत होऊन गेलेल्या प्रल्हाद, अलर्क, आयु, यदु, कार्तवीर्य आणि परशुराम इत्यादि व्यक्तींवर अनुग्रह करून त्यांना उपदेश देणारे दत्तात्रेय हेहि भिन्न भिन्नच असले पाहिजेत. ही शंका आपाततः बरोबर आहे असें वाटत असलें तरी तत्त्वतः ती बरोबर नाहीं. दत्तात्रेय हे जर भिन्न भिन्न असते तर त्यांचे काल व देश त्याचप्रमाणें माता आणि पिता यांचाहि पृथक् पृथक् निर्देश झाला असता. पण सर्वत्र भगवान् श्रीदत्तात्रेय हे अत्रींचे व अनुसूयादेवीचेच पुत्र म्हणून वर्णिलेले आहेत. ते अत्रिमहर्षि आणि ती अनसूयादेवी अनुक्रमें ब्रह्मदेवाचे पुत्र व कर्दमऋषींची कन्या हेच होत. राम हें नाम एकच असलें तरी परशुराम, दाशरथीराम आणि बलराम अशीं त्या नांवांच्या पाठीमागें व्यावर्तक विशेषणें आहेत. स्थलभेद, कालभेद आणि विशेषणभेद यांवरून व्यक्तिभेदाची कल्पना करतां येते. प्रकृतस्थलीं श्रीदत्तात्रेय हे अनेक होऊन गेले अथवा आहेत असें मानण्याला स्थल, काल, माता, पिता आणि व्यावर्तक विशेषणें यांचा 'बलवत्तर' पुरावा उपलब्ध होत नाहीं. सर्वत्र इतिहास, पुराणें, उपनिषदें व परंपरा यांतून एकच दत्तात्रेय आढळतात व ते म्हणजे ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रिमुनींचे पुत्र आणि कर्दममुनींची कन्या असलेल्या अनसूयेचे पुत्र. तेच ते एकच एक भगवान दत्तात्रेय हे युगायुगांमध्यें कार्तिकस्वामी आणि प्रल्हाद यांच्यापासून तों जनार्दनस्वामी आणि एकनाथ त्याचप्रमाणें दासोदिगंबर आणि निरंजन रघुनाथ यांच्यापर्यंत दर्शन देत आलेले आहेत; उपदेश देत आलेले आहेत आणि भक्तजनांना कृतार्थही करीत आलेले आहेत. त्यांचें हें सर्व कार्य एकाच अवताराचें कार्य मानलें जातें. भिन्न भिन्न दत्तात्रेयांची कल्पना कोणीहि स्वीकारलेली नाहीं. सर्वांना उपदेश देणारे दत्तात्रेय हे एकच आहेत. भक्तांना दर्शन देतांना भक्तांच्या इच्छेप्रमाणें क्वचित् ते 'एकमुख द्विभुज' असतील तर क्वचित् ते 'एकमुख-षड्भुज' असतील. तर क्वचित् ते "तीन शिरें सहा हात" याहि रूपानें दर्शन देतील. कोणत्याहि रूपानें त्यांनीं दर्शन दिलेलें असलें व तें कोणालाहि, कोठेंहि व केव्हांहि दिलेलें असलें तरी अवतारस्वरूप गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय ही एकच व्यक्ति आहे यांत तिळमात्रहि संशय नाहीं.

साक्षात्कारी दत्तभक्त संत श्रीदासोदिगंबर यांनीं दत्तात्रेयांचे सोळा अवतार मानलेले आहेत. दासोपंतांच्या संप्रदायांत या सोळाहि अवतारांच्या सोळा जयंत्या मानलेल्या आहेत. वर्षांतील प्रत्येक महिन्यांत दत्तात्रेयांचा अवतार झालेला आहे. एका वर्षात सोळा अवतारांची संख्या पूर्ण होण्याच्या दृष्टीनें कांहीं महिन्यांतून दोन-दोन अवतारांचेंहि वर्णन केलेलें आहे. योगिराज, सिद्धराज, दत्तात्रेय, आदिगुरु, देवदेवेश्वर, दिगम्बर इत्यादि या अवतारांचीं सोळा नांवें असून वेळ, तिथि,

वार, नक्षत्र आणि महिना यांचा पृथक् पृथक् निर्देश केलेला आहे. हीं नांवें पृथक् पृथक् असलीं तरी सर्वत्र अनुस्यूत म्हणजे सातत्यानें भक्तांच्या प्रतीतीला येत असलेली दत्तात्रेय ही एकच व्यक्ति आहे. दत्तात्रेय या रूपानें अवतरलेल्या एकाच देवतेचे हे सोळा आविष्कार आहेत आणि म्हणूनच सोळाहि प्रसंगीं माता आणि पिता या नात्यानें सती श्री अनसूयादेवी व भगवान् अत्रिमहर्षि यांचाच संबंध असलेला पहावयास सांपडतो. प्रत्येक आविष्कारांतील कार्य हें त्या नांवांतच सामावलेलें आहे. कार्यभेदानें आविष्कारभेद असला तरी तेथें व्यक्तिभेद नाहीं. याच अभिप्रायानें सर्वत्र मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस सूर्यास्त समयीं होणारा दत्तात्रेयांचा अवतार हाच प्रधान मानला जातो. यद्यपि या अवताराचें नांव "योगिजनवल्लभ" असें आहे तथापि ते दत्तात्रेय म्हणूनच सर्वत्र ओळखले जातात.

तात्पर्य, आविष्कारभेदानें व्यक्तिभेद होत नाहीं. आविष्कार हें अनेक असले तरी सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय ही अवतारव्यक्ति एकच आहे. त्यामुळें दत्तात्रेयांची गादी कल्पून कालभेदानें अनेक दत्तात्रेयांची कल्पना करणें हें इतिहासाविरुद्ध आणि प्रमाणशून्य असल्यामुळें निरर्थक होय. सद्‌गुरु श्रीदत्तात्रेयांच्या सोळाहि अवतारांचा इतिहास श्रीवासुदेवानंद सरस्वती यांच्या "श्रीदत्तात्रेयषोडशावतारजयन्तीकल्प" या ग्रंथाच्या आधारें आम्ही पुढें देणारच आहोंत.

## श्री अत्रिमहर्षि

विरिञ्चि-तनयं देवं साक्षसूत्रकमण्डलुम् ।
अनसूयापतिं शान्तमत्रिं निष्कल्मषं भजे ।।

अत्रिं मरीचितनयं साक्षसूत्रकमण्डलुम् ।
जटिलं श्मश्रुलं शान्तं श्यामलांगं भजेऽनिशम् ।।

श्रीतत्त्वनिधि या ग्रंथामध्यें अत्रिमहर्षींच्या ध्यानाचे हे दोन श्लोक दिलेले आहेत. अत्रिमहर्षि हे अत्यंत तेजस्वी असून ब्रह्मदेवाचे ते पुत्र आहेत. त्यांच्या उजव्या हातांत रुद्राक्षमाला व डाव्या हातांत कमण्डलु आहे. ते अनसूयेचे पति असून अत्यंत शान्त आहेत. त्यांच्या चरित्राला व मनालाहि कोणत्याहि प्रकारच्या कल्मषाचा म्हणजे दुराचरणाचा व दुर्विचारांचा स्पर्शहि झालेला नाहीं. त्या अत्रींना मी नम्र भावानें भजत आहे. दुसऱ्या श्लोकामध्ये अत्रिऋषींना दाढी आणि जटा असल्याचें सांगून त्यांची अंगकांति श्यामल म्हणजे सांवळ्या वर्णाची असल्याचें सांगितलें आहे. या दुसऱ्या श्लोकांत "मरीचितनयम्" असेंहि एक विशेषण अत्रींना दिलेलें आहे. वस्तुतः अत्रिमहर्षि हे मरीचीचे पुत्र नसून ते मरीचिमहर्षींचे धाकटे बंधु असल्याचा सर्वत्र उल्लेख आढळतो.

मरीचिरत्र्यङ्गिरसौ पुलस्त्यः पुलहः क्रतुः ।
ब्रह्मणो मानसाः पुत्रा वशिष्ठश्चेति सप्त ते ।।

विधात्यानें सृष्टि निर्माण करतांना प्रथम सनक, सनन्दन, सनातन आणि सनत्कुमार यांना निर्माण केलें. हे चौघेहि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र जन्मापासूनच वैराग्य-संपन्न होते. ब्रह्मदेवानें त्यांना गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून पितृऋणांतून मुक्त होण्याची आज्ञा केली; पण प्रखर वैराग्यामुळें त्यांनीं ती आज्ञा स्वीकृत केली नाहीं. ते दिगंबर राहून आत्मचिन्तनामध्यें व हरिभक्तीमध्येंच काळ कंठूं लागले. पुढें ब्रह्म-देवानें वरील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, ऋतु आणि वशिष्ठ असे सात पुत्र निर्माण केले. हेहि ब्रह्मदेवाचे मानसपुत्रच होत. वरील श्लोकांत "ब्रह्मणो मानसाः पुत्राः" असें स्पष्टच म्हटलेलें आहे. ब्रह्मदेवाच्या देहा-पासून यांची उत्पत्ति असल्यामुळें यांना ब्रह्मदेवाचे औरस पुत्र असेंहि म्हटलें जातें. तात्पर्य, अत्रि हे ब्रह्मदेवाचे पुत्र असून मरीचिमुनींचे ते धाकटे बंधु आहेत. अशा स्थितींत "मरीचितनयं" हें अत्रिमुनींचें विशेषण उपपन्न होत नाहीं. मरीचीच्या मुलांमध्यें अत्रिमुनींचा अंतर्भाव असल्याचें कोठेंहि आढळून येत नाहीं. "म्रियन्ते पापराशयः यस्मिन् इति मरीचिः" अशी मरीचि शब्दाची व्युत्पत्ति आहे. सर्व पापांचे समूह ज्याच्या स्वरूपांत नामशेष होतात. नष्ट होतात त्याला मरीचि असें म्हणतात. मरीचि म्हणजे महातेजस्वी परमात्मा. प्रकृत स्थलीं संदर्भानुरोधानें मरीचि शब्दाचा अर्थ ब्रह्मदेव असा समजावा. ब्रह्मदेव हा परमेश्वराच्या सर्जनशक्तीचा आविष्कार असल्यामुळें ईश्वरच आहे. याच अभिप्रायानें त्याला परमेष्ठी म्हणजे चित्स्वरूपांत विराजमान असलेला परमात्मा पितामह असें म्हटलेलें आहे. तात्पर्य मरीचि म्हणजे सर्वश्रेष्ठ प्रजापति ब्रह्मदेव. अत्रिमुनि हे त्याचे पुत्र असल्यामुळें त्यांना उद्देशून वरील दुसऱ्या श्लोकांत मरीचितनय असें विशेषण दिलें आहे तें स्वाभाविकच आहे.

मरीचिमुनि हे अत्रिमुनींचे थोरले बंधु आहेत. "ज्येष्ठो भ्राता पितुः समः" या न्यायानें थोरला भाऊ हा वडिलांप्रमाणें असतो हें मानणें ओघानेंच येतें. याहि दृष्टीनें अत्रिमुनींना दिलेलें "मरीचितनयं" हें विशेषण योग्यच आहे असें म्हणावें लागतें. तात्पर्य जे महातेजस्वी असून ब्रह्मदेवाचे पुत्र आहेत, ज्यांच्या हातांमध्ये रुद्राक्षमाला आणि कमंडलु शोभत आहे, ज्यांना दाढी आणि जटा असून जे अत्यंत शांत दिसत आहेत, जे निष्कलमष म्हणजे निष्पाप असून कर्दममुनींची जी कन्या अनसूया तिचे पति आहेत त्या अत्रिमहर्षींना मी नम्रभावानें भजत आहें.

कांहीं लोक मरीचि ऋषींनाहि अत्रि नांवाचा पुत्र होता असें म्हणतात पण ते अत्रि आपल्या दत्तात्रेयांचे पिता नव्हेत. कारण कर्दम मुनींची कन्या अनसूया ही ब्रह्मदेवाचे पुत्र असलेल्या अत्रिमुनींची पत्नी होती व तिच्याच उदरीं दत्तात्रेयांचा आविर्भाव झालेला आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. याच अभिप्रायानें आम्हीं वर दिलेल्या पद्धतीनें 'मरीचितनय' या विशेषणाचा अर्थ ब्रह्मदेवाचे पुत्र

असा केलेला आहे. कदाचित् मरीचितनय याऐवजीं 'विरिंचितनय' असाच पाठभेद असण्याची शक्यता आहे. तसा पाठभेद असल्यास अर्थाची ओढाताण करण्याची कांहींच आवश्यकता रहात नाहीं.

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे जनक असलेल्या अत्रिमहर्षींचा महिमा फार अगाध आहे. त्यांचें व्यक्तिमत्त्व असामान्य आहे. साक्षात् परमेश्वरानें स्वतःच त्यांना समर्पण करून घेतलें. पुत्ररूपानें त्यांच्या पोटीं जन्म घेतला. त्या अत्रिमहर्षींचा महिमा आतां आपण संक्षेपानें पाहूं. ते अत्रिमुनि दत्तात्रेयांचे जनक असल्यामुळें त्यांच्या काळा-वरून दत्तात्रेयांचाहि आविर्भाव काळ आणि महिमा आपल्याला लक्षांत घेतां येईल.

## अत्रिमहर्षींचा काळ

अत्रिमहर्षि हे विश्वविधात्या ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असलेल्या सप्तर्षींपैकी एक ऋषि आहेत. ऋषि शब्दाचा अर्थ ज्ञानी, द्रष्टा किंवा संशोधक असा आहे. अत्रिमहर्षि हे ज्ञानी तर होतेच पण ते द्रष्टे म्हणजे दूरदर्शी अथवा सूक्ष्मदर्शी त्रिकालज्ञहि होते. ते एक महान् संशोधक होते. ते जसे ज्ञानसंपन्न होते तसेच विज्ञानसंपन्नहि होते. दुःखां-तून व संकटांतून लोकांना मुक्त करण्याचें जणूं कांहीं त्यांनीं कंकणच बांधलेलें होतें. याच दृष्टीनें अत्रिमहर्षींना अत्रि, अरात्रि आणि सारात्रि अशीं विशेषणें देऊन सर्वत्र त्यांचा एकमुखानें गौरव केलेला आढळतो.

कांहीं लोक सप्तर्षींमध्ये अत्रींचा अनुक्रम चौथा कल्पून, ते आरंभाकडून मोजलें तरी तीन संख्येच्या पलीकडे जातात व शेवटून मोजलें तरी तीन संख्येच्या पलीकडे जातात म्हणून त्यांना अत्रि असें म्हणतात अशी कोटी करीत असतात पण ही एक शाब्दिक कोटी आहे यापेक्षां तिला कांहीं अर्थ नाहीं. कारण अत्रिऋषींचा अनुक्रम वाङमयांत सर्वत्र चौथाच असेल असा नियम नाहीं. तथापि या शाब्दिक कोटीलाहि एक आधार आहे. बृहत्संहितेमध्ये आकाशांतील सप्तर्षींचें वर्णन करतांना "पूर्वे भागे भगवान्, मरीचिरपरे स्थितो वसिष्ठोऽस्मात् । तस्याङ्गिरास्ततोऽत्रिस्तस्यासन्नः पुलस्त्यश्च" या वर्णनांत अत्रींचा निर्देश मरीचि, वसिष्ठ आणि अंगिरा यांच्यानंतर केलेला आहे. तेव्हां वरील शाब्दिक कोटी अगदीं निरर्थक आहे असें म्हणतां येत नाहीं.

"मरीचिरत्र्यङ्गिरसौ" या वचनांत तर अत्रींचा अनुक्रम दुसराच आहे. अत्रिमहर्षींचा जसा सप्तर्षींमध्यें अंतर्भाव आहे तसाच त्यांचा प्रजापतींमध्येंहि अन्त-र्भाव आहे. प्रजापतींची संख्या कोणी दहा मानतात तर कोणी एकवीस मानतात. संख्येमध्यें मतभेद असले तरी सर्वमतांत अत्रिमहर्षींचा प्राधान्यानें अन्तर्भाव आहेच.

"अहं प्रजाः सिसृक्षुस्तु तपस्तप्त्वा सुदुश्चरम् ।
पतीन्प्रजानामसृजं महर्षीनादितो दश ॥ — मनु १।३४
मरीचिमत्र्यङ्गिरसौ पुलस्त्यं पुलहं क्रतुम् ।
प्रचेतसं वसिष्ठं च भृगुं नारदमेव च ॥ — मनु १।३५

ब्रह्मदेव म्हणतात, सृष्टि निर्माण करण्याच्या पूर्वी मीं खडतर तप केलें. त्यानंतर प्रजापति म्हणून मीं दहा महर्षींना निर्माण केलें. १ मरीचि, २ अत्रि, ३ अंगिरा, ४ पुलस्त्य, ५ पुलह, ६ क्रतु, ७ प्रचेता, ८ वसिष्ठ, ९ भृगु आणि १० नारद हेच ते दहा प्रजापति होत. यांतहि प्रजापति म्हणून अत्रींचा अनुक्रम दुसराच आहे.

"ब्रह्मा स्थाणुर्मनु-र्दक्षो भृगुर्धर्मस्तथा यम:।
मरीचिरङ्गिरात्रिश्च पुलस्त्यः पुलहः क्रतुः ।।
वशिष्ठः परमेष्ठी च विवस्वान्सोम एवच ।
कर्दमश्चापि यः प्रोक्तः क्रोधोऽर्वाक् क्रीत एवच ।।
एकविंशतिरुत्पन्नास्ते प्रजापतयः स्मृताः ।।"

महाभारतांतील मोक्षधर्मांत एकवीस प्रजापतींचा उल्लेख केलेला आहे. त्यांत ब्रह्मदेवाचा आद्य प्रजापति म्हणूनच उल्लेख आहे त्यानंतर स्थाणु, मनु, दक्ष, भृगु, धर्म, यम, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वशिष्ठ, परमेष्ठी, विवस्वान् सोम, कर्दम, क्रोध, अर्वाक् आणि क्रीत असे क्रमानें एकंदर एकवीस प्रजापतींचे उल्लेख केलेले आहेत. त्यांत अत्रींचा अनुक्रम दहावा आहे. तात्पर्य श्वेतवाराह कल्पाच्या आरंभीं पहिल्याच स्वायंभुव मन्वन्तरांत ब्रह्मदेवाचे पुत्र म्हणून गणल्या गेलेल्या सप्तर्षींमध्यें अथवा दहा प्रजापतींमध्यें किंवा एकवीस प्रजापतींमध्ये एक महान् ऋषि म्हणून अथवा प्रजापति म्हणून ज्या अत्रींचा उल्लेख येतो, त्याच अत्रिऋषींचा वैवस्वत मन्वन्तरांतील सप्तर्षींमध्येहि अन्तर्भाव असल्याचें भागवतांत वर्णिलेलें आहे. तेथेंहि अत्रिऋषींचा अनुक्रम दुसराच आहे.

"कश्यपोऽत्रिर्वसिष्ठश्च विश्वमित्रोऽथ गौतमः ।
जमदग्निर्भरद्वाज इति सप्तर्षयः स्मृताः ।।" — भागवत ८।१३।५

कांहींच्या मतें वैवस्वत मन्वन्तराचा आरंभ काल हाच दत्तात्रेयांचा आविर्भाव काल होय असें दिसतें; पण तसें मानल्यास दत्तात्रेयांचें सोम आणि दुर्वास यांचें सहोदरत्व सिद्ध होणार नाहीं म्हणून आम्हीं वर निर्देशिल्याप्रमाणें स्वायंभुव मन्वन्तरांतील आद्य अत्रि हेच दत्तात्रेयांचे जनक मानावे लागतात व तोच कल्पारंभकाल दत्तात्रेयांचा आविर्भाव काल मानणें योग्य ठरतें. तात्पर्य आद्य अत्रि हेच विश्वगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे पिता होत.

प्रलयोत्तर कालीं सृष्टि निर्माण होण्याच्या पूर्वी श्रीविष्णूच्या नाभिस्थानांतून निर्माण झालेल्या कमलांतून ब्रह्मदेव जेव्हां प्रकट झाले तेव्हां त्यांनीं दाही दिशांकडे दृष्टि टाकून अवलोकन केलें ! कांहींच दिसेना व कांहींच कळेना ! मी कोण आहे ? कोठें होतों व कोठून आलों ? माझें कर्तव्य तरी काय आहे ? हें ब्रह्मदेवाला कांहीं सुचेचना. तो दिङ्मूढ झाला ! अखेर त्यानें तप केलें. तप म्हणजे तरी काय आहे ? ईश्वराचें चिंतन आणि स्वतःच्या कर्तव्याचें आलोचन हेंच तप होय. आत्मानुसंधान

हीहि एक तपश्चर्याच होय. तपश्चर्येनें तप करणाऱ्याच्या अंगीं ईश्वरशक्तीचा आविर्भाव होत असतो. ब्रह्मदेवाच्या अंगीं तपश्चर्येनें ईशशक्तीचा आविर्भाव झाला. त्या आविर्भावांतूनच ब्रह्मदेवाच्या अंगीं ज्ञानशक्तीचा व क्रियाशक्तीचा विकास झाला. ब्रह्मदेवाच्या मनापासून व देहापासून कांहीं पुत्र जन्माला आले. त्यांच्यामध्येंहि पित्याप्रमाणें ज्ञानशक्तीचा व क्रियाशक्तीचा जन्मजात आविर्भाव होताच. सनक-सनंदनादि हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र प्रसिद्धच आहेत. पुढें ब्रह्मदेवाच्या देहापासून दहा पुत्र जन्माला आले.

"उत्संगान्नारदो जज्ञे दक्षोऽङ्गुष्ठात्स्वयंभुवः ।
प्राणाद्वसिष्ठः संजातो भृगुस्त्वचि करात्क्रतुः ।।
पुलहो नाभितो जज्ञे पुलस्त्यः कर्णयोर्ऋषिः ।
अङ्गिरा मुखतोऽक्ष्णोरत्रिर्मरीचिर्मनसोऽभवत् ।।"

— भागवत ३–१२–२३, २४

वरील श्लोकांत ब्रह्मदेवाच्या निरनिराळ्या अवयवांपासून सृष्टीच्या आरंभकालीं निरनिराळ्या ऋषींची उत्पत्ति झाली असल्याचें सांगितलें आहे. ब्रह्मदेवाच्या उत्संगापासून नारद, अंगुष्ठापासून दक्ष, प्राणांपासून वसिष्ठ, त्वचेपासून भृगु आणि हातांपासून ऋतु यांचा जन्म झाला. त्याचप्रमाणें नाभीपासून पुलह, कानापासून पुलस्त्य, मुखापासून अंगिरा, नेत्रापासून अत्रि आणि मनापासून मरीचि असे ऋषि व प्रजापति जन्माला आले. आरंभ कालांतील सृष्टिरचना दैवी शक्तीच्या अचिंत्य प्रभावानें घडत असल्यामुळें तेथें कां व कसें याची उपपत्ति सामान्य मानवी बुद्धीच्या तर्काला आकलन होत नाहीं. असो.

आपले अत्रिमहर्षि हे कल्पारंभकालीं ब्रह्मदेवाच्या नेत्रांतून प्रकट झाले. अत्रि या नांवांत कांहीं विशिष्ट अर्थ आहे. गुणवत्ता आहे. ही त्यांची भावी कालांतील गुणवत्ता लक्षांत घेऊनच "अत्रि" हें त्यांचें नामकरण करण्यांत आलें. "अत्ति इति अत्रिः" अशी अत्रि शब्दाची व्युत्पत्ति आहे. एका प्रसंगीं संपूर्ण गंगाजल एका चुळींतच त्यांनीं प्राशन करून टाकलें या अभिप्रायानें त्यांना अत्रि असें म्हटलें जातें. असें शब्दकल्पद्रुमामध्यें म्हटलेलें आहे. जह्नुऋषीप्रमाणें अत्रिऋषींच्याहि जीवनांत संपूर्ण गंगाजल एका चुळीनेंच प्राशन करून टाकण्याचा प्रसंग आलेला असावा असें यावरून दिसतें. अत्रि हा शब्द जसा विशिष्ट व्यक्तींचा वाचक आहे तसाच तो विशिष्ट गुणांचाहि वाचक आहे.

"न विद्यन्ते त्रयः यस्मिन् स अत्रिः" अशी अत्रि शब्दाची दुसरी व्युत्पत्ति आहे. या व्युत्पत्तीप्रमाणें पाहतां ज्याच्या ठिकाणीं मायिक सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांचा किंवा या गुणांचीं कार्यें असलेल्या सुख, दुःख आणि मोह यांचा तिळमात्रहि संबंध येत नाहीं त्याला अत्रि म्हणावें. अत्रि म्हणजे त्रिगुणातीत असलेला. अथवा

मायिक सत्त्वगुणाचें कार्य विषयसुख, रजोगुणाचें कार्य चांचल्य आणि दुःख, त्याच-प्रमाणें तमोगुणाचें कार्य मोह आणि अज्ञान, यांच्या जाळ्यांत जो गुरफटत नाहीं त्याला अत्रि असें म्हणतात. अथवा अत्रि म्हणजे त्रिपुटीच्या पलीकडे गेलेला. द्रष्टा, दृश्य आणि दर्शन. ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान. भोक्ता, भोग्य आणि भोग इत्यादि सांसारिक त्रिकांना त्रिपुटी असें म्हणतात. अज्ञानदशेंत या सांसारिक त्रिपुटीचा प्रत्यय येत असतो. आत्मसाक्षात्कारानें अज्ञान मावळलें म्हणजे या त्रिपुटीचाहि अस्त होत असतो. त्रिपुटीचा अस्त झाल्यानंतर जो ब्रह्मात्मैक्य भाव प्राप्त होतो, त्या ऐक्यभावानें संपन्न असलेल्या तत्त्ववेत्त्याला अत्रि असें म्हणतात. अत्रिमहर्षि हे एक असेच ब्रह्मविद्वरिष्ठ होते म्हणून अत्रि हे त्यांचें नांव अत्यंत सार्थ होतें.

"न विद्यन्ते तिस्त्रः अवस्थाः यस्य सः अत्रिः" अवस्थात्रयातीत असा शब्दाचा अर्थ आहे. तात्पर्य कालत्रयातीत, देहत्रयातीत, अवस्थात्रयातीत अथवा गुणत्रयातीत परमात्मा असा अत्रि शब्दाचा अर्थ आहे. तपश्चर्येनें व तत्त्वज्ञानानें अत्रिऋषि हे परमात्मस्वरूप झालेले असल्यामुळें अत्रि हें आपलें नांव त्यांनीं सार्थ केलेलें होतें.

"अत्ति इति अद् मृत्युः तस्मात् त्रायते इति अत्रिः" अशी अत्रि शब्दाची आणखी एक व्युत्पत्ति लक्षांत घेण्यासारखी आहे. अत्ति म्हणजे खातो, भक्षण करतो. "अद्" म्हणजे काळ अथवा मृत्यु असा अर्थ समजावा. "कालोऽस्मि लोकक्षय-कृत् प्रवृद्धः" हें गीतावचन अथवा "कालोजगद्भक्षकः" हें सुभाषितवचन सर्वांना माहीतच आहे. सर्वांना गिळंकृत करणाऱ्या मृत्यूच्या भयापासून जो जगाचें त्राण म्हणजे रक्षण करतो त्याला "अत्रि" असें म्हणतात. अत्रिमुनींनीं तत्त्वज्ञानाच्या बलावर सर्व जगाचें मृत्यूपासून संरक्षण केलें आहे म्हणून त्यांना "अत्रि" असें म्हणणें उचितच ठरतें.

तत्त्वतः मृत्यु शब्दाचा अर्थ पाप असा आहे. मृत्यूनें जीवाचा खरा नाश होत नाहीं. तो होतो पापानें. मृत्यूनें जीवाचें पुनर्नवीकरण होतें पण पापानें जीव उत्तरोत्तर अधोगतीलाच जात असतो. म्हणून पाप हाच खरा मृत्यु होय. याच अभिप्रायानें उपनिषदामध्यें "पाप्मानं मृत्युमन्ववायानि" इत्यादि वाक्यांनीं मृत्यु शब्दाचा पाप या अर्थानें अनेक ठिकाणीं प्रयोग केलेला दृष्टीस पडतो. तात्पर्य पापापासून जो जगाचें संरक्षण करतो त्याला अत्रि असें म्हणतात. वेदानेंहि अत्रिमहर्षींच्या या कार्याचें मोठ्या गौरवानें वर्णन केलेलें आहे. "स यदिदं सर्वं पाप्मनोऽत्रायत यदिदं किं च तस्मादत्रय इति" ऐतरेय २।१।६

अत्रिमहर्षींनीं साऱ्या विश्वाचें पापरूपी मृत्यूपासून संरक्षण केलें म्हणून त्यांना अत्रि असें म्हटलें जातें असें अत्रि या शब्दाचें निर्वचन प्रत्यक्ष वेदानेंच केलेलें आहे. तत्त्वज्ञानाच्या व धर्मोपदेशाच्या द्वारां अत्रिमुनींनीं साऱ्या विश्वाला पापापासून-सुरक्षित राहण्याचें मार्गदर्शन केलें आहे; हें त्यांच्या कार्यावरून स्पष्टच होत आहे. तात्पर्य अत्रि म्हणजे पापापासून संरक्षण करणारा. "अत्रयः" असा बहुवचनी प्रयोग

करून वेदांनीं देखील अत्रीबद्दल आदरच व्यक्त केलेला आढळतो ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

अत्रि या अर्थाचा "अरात्रि" असाहि एक विशेषणवाचक शब्द संस्कृत वाङ्मयामध्यें आढळतो. तोहि अत्रिमुनींना उद्देशूनच उपयोगांत आणलेला आहे. महाभारताच्या अनुशासन पर्वामध्यें स्वतः अत्रीच आपल्या नांवाचा उल्लेख करतांना अरात्रि आणि सारात्रि या विशेषणांसह करीत आहेत.

"अरात्रिरत्रिः सारात्रिर्यां नाधीते त्रिरद्य वै ।
अरात्रिरत्रिरित्येव नाम मे विद्धि शोभने ।। "

प्रसंग असा आहे कीं, शिबिकुलोत्पन्न वृषादर्भिराजा राज्य करीत असतांना वसिष्ठ, अत्रि, विश्वामित्र, जमदग्नि, कश्यप, भरद्वाज आणि गौतम हे त्या राजाच्या प्रदेशांत संचार करीत होते. फिरतां फिरतां ते राजाच्या उपवनांत आले. त्या उपवनांत एक पुष्करिणी होती. छोटेंसें राखीव तळें कमळांनीं भरून गेलेलें होतें. त्या पुष्करिणीच्या संरक्षणासाठीं राजानें एका राक्षसीची योजना केली होती. श्रीअत्रि महर्षि यांच्यासह वर सांगितलेले सर्व ऋषि त्या पुष्करिणीच्या कांठी आले. ती वेळ ऐन उन्हाची होती. प्रवासानें जीव त्यांचा थकला होता. तहानेनें व भुकेनें ते व्याकुळ झालेले होते. स्वच्छ पाण्यानें भरलेली ती पुष्करिणी आणि कमळाक्षांनीं – टपोऱ्या कमलबीजांनीं भरगच्च भरलेलीं तीं मनोहर कमलें पाहून ऋषिजनांचीं मनें मोहून गेलीं. यथेच्छ कमलकंद खावेत आणि पोटभर पाणी प्यावें असें त्यांना वाटूं लागलें. स्वाभाविकच आहे. थकवा, तहान आणि भूक यांच्या परिहाराचेंच स्थळ होतें तें. पण कोणाला विचारावें ? विचारल्यावांचून कमलगड्ड्यांना हात लावणें बरें नाहीं. असा ते विचार करीत आहेत तोंच ती राक्षसी पुढें आली व तिनें प्रत्येकाला आप-आपलें नांव सांगावयास आणि परिचय द्यावयास सांगितलें. सर्वांनीं आपआपलें नांव सांगून परिचय दिला. अत्रिमुनींवर पाळी आली तेव्हां ते म्हणाले :–

हे शोभने ! अत्रिऋषींच्या तोंडचें हें विशेषण ऐकल्याबरोबर ती राक्षसी थक्कच झाली ! आतापर्यंत हें गोड विशेषण तिला कोणी दिलेंच नव्हतें. अत्रिऋषींच्या तोंडचें तें मधुर संबोधन ऐकल्याबरोबर तिच्या अन्तःकरणांतील राक्षसी भाव मावळला व त्या प्रसन्न अन्तःकरणांत मानवतेचें प्रतिबिंब उमटलें. अत्रिऋषींना ती म्हणाली, 'आपण कोण आहां ? आपलें नांव काय आहे ?' तेव्हां अत्रिऋषि म्हणाले, "हे शोभने" "अहं अत्रिः अस्मि" बाईसाहेब मला अत्रि असें म्हणतात. ती म्हणाली, 'अत्रि म्हणजे काय ?' त्यावर अत्रि म्हणाले, 'यां अवस्थां प्राप्तः नरः वै अद्य त्रिः न अधीते सः अत्रिः इत्युच्यते" ती राक्षसी म्हणाली, 'मला या तुमच्या कोड्याप्रमाणें असलेल्या कूट वाक्याचा उलगडा होत नाहीं तुम्हीच तो सोप्या भाषेंत खुलासा करून सांगा !' तेव्हां अत्रि म्हणाले, "ज्या अवस्थेला प्राप्त झाला असतां

मनुष्याला खरोखर भूत, भविष्य आणि वर्तमान या तीन अवस्थांचें पृथक् भान उरत नाहीं, ज्याला तिन्ही काळ ' अद्य ' म्हणजे वर्तमानकाळस्वरूपच होतात त्याला अत्रि असें म्हणतात. " सा म्हणजे ती. रात्रिः म्हणजे रात्र. अर्थात् अवस्था-विशेष. ज्याला आपण सुषुप्ति अथवा गाढ निद्रा असें म्हणतों त्या अवस्थेंत मानवाला भूत, भविष्य आणि वर्तमान हा कालाचा भेद कळत नाहीं. त्यावेळीं सर्वकाळ एकरूपच असतो. त्या काळाचें केवळ अस्तित्व व्यक्त करण्याकरितां त्याला " वर्तमान " हा शब्द योजला जातो.तोच प्रकृत श्लोकांत " अद्य " या शब्दानें दाखविला आहे. तात्पर्य रात्र म्हणजे तम, अंधार अथवा अज्ञान. हें ज्याला नाहीं त्याला अरात्रि म्हणतात. अरात्रि म्हणजे अज्ञानरहित असलेला ब्रह्मसाक्षात्कारी महात्मा. तात्पर्य मी अरात्रि असूनहि लोक मला अत्रि या नांवाने ओळखतात.

देवांचा राजा इंद्र या नांवाने ओळखला जातो. वस्तुतः त्याचें नांव आहे " इदंद्र." कारण अध्यात्म तत्त्वज्ञानानें इंद्राला जेव्हां ब्रह्मसाक्षात्कार झाला तेव्हां तो सर्वज्ञ बनला. " सर्वं खल्विदं ब्रह्म " " ब्रह्मैवेदं सर्वम् " हें सर्व विश्व खरोखर ब्रह्म-स्वरूप आहे आणि ब्रह्मच तत्त्वतः विश्व रूपानें साकारलें आहे. असा हा अबाधित असलेला सिद्धान्त ज्याला कळला, पटला, तो सर्वज्ञच समजला जातो. तो सर्वज्ञ होतो असें वेदच सांगत आहेत. तात्पर्य, इंद्र हा ब्रह्मसाक्षात्कारानें सर्वज्ञ बनला. त्यामुळें त्याला इदंद्र हें नांव पडलें. " इदं सर्वं पश्यति इति इदंद्रः " हें सर्व विश्व तो पाहतो म्हणून त्याला इदंद्र असें म्हणतात असें इंद्र शब्दाच्या व्युत्पत्तीवरून सिद्ध होतें, पण इदंद्र हें नांव असूनहि सर्व देव आणि लोक त्याला संक्षेपानें इंद्र म्हणू लागले. इदंद्र हें प्रत्यक्ष नांव आहे तर इंद्र हें परोक्ष नांव आहे. प्रत्यक्ष नांवापेक्षां परोक्षनांवच व्यवहारामध्यें अधिक प्रिय असलेलें आढळून येतें. जगन्नाथ, रघुनाथ अथवा विश्वनाथ या नांवांपेक्षां जगन्राव, राघोबा अथवा विसुभाऊ अशींच नांवें अधिक प्रिय वाटतात. त्याहीपेक्षां रावसाहेब, नानासाहेब अथवा बाबासाहेब इत्यादि नांवें अधिक प्रिय वाटतात. हीच स्थिति इदंद्र आणि इंद्र या नांवांची आहे. देवांनाहि परोक्ष नांव आवडतें मग मानवांना आवडेल यांत आश्चर्य कसलें ? पहा " तमिदन्द्रं सन्तमिन्द्र-मित्याचक्षते परोक्षेण । परोक्षप्रिया इव हि देवाः " ऐ. उ. ३।१४

तात्पर्य वर निर्दिष्ट केलेल्या पद्धतीला अनुसरून प्रकृतस्थलीं तत्त्वतः " अरात्रि " या नांवानेंच ओळखलें जाण्यास योग्य असलेल्या अत्रिमहर्षींना लोक अरात्रि या शब्दांतील ' रा ' हें अक्षर वगळून केवळ अत्रि याच शब्दानें ओळखुं लागले.

अरात्रि शब्दाची आणखी एक मोठी गमतीदार व्युत्पत्ति आहे. " अरयः सन्ति अस्मिन् इति अरम्-पापम्, तस्मात् त्रायते इति अरात्रिः " अरि म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादि सहा विकार. यांनाच रिपु, षड्रिपु असे म्हणतात अथवा अन्तः-शत्रुंना कारणीभूत असलेलें पाप हाच अर शब्दाचा अर्थ समजावा. हेंच पाप अज्ञान, अहंकार, मोह मिथ्या आणि अभिनिवेश या रूपानें प्रकट होऊन मानवाचा सर्वनाश

करीत असतें. अशा या अरापासून, पापापासून मानवांचें जो संरक्षण करतो त्याला 'अरात्त्रि' असें म्हणतात. या ठिकाणीं 'अरात्' या पंचमी विभक्तीचा लोप होत नाहीं म्हणून "अरात्रि" असेंच रूप सिद्ध होतें. पापापासून जगाचें संरक्षण करण्याचें कार्य अत्रिऋषींनींच केलेलें असल्यामुळें त्यांना उद्देशून अरात्रि हें विशेषण दिलेलें आहे. पापामुळें उत्पन्न होणाऱ्या कामक्रोधादि विकारांपासून संरक्षण करणारा असा या विशेषणाचा अर्थ आहे. अरात्रि हें विशेषण अत्रिमुनींच्या बाबतींत इतकें रूढ व सर्वतोमुखीं झालें होतें कीं, अरात्रि हा शब्द उच्चारल्याबरोबर अत्रिमहर्षि यांचाच बोध होत असे. जसें लोकमान्य हा शब्द उच्चारल्याबरोबर बाळ गंगाधर टिळक याच व्यक्तीचा बोध होतो त्याचप्रमाणें अरात्रि हा शब्द उच्चारल्याबरोबर अत्रीचा बोध होत असे. याच अभिप्रायानें "अरात्रिरत्रिरित्येव" असें वरील श्लोकांत म्हट-लेलें आहे. हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

आतां आपण अत्रिमुनींच्या "सारात्रि" या विशेषणाचा अर्थ पाहूं. महाभार-ताच्या वरील श्लोकांत "सारात्रिः" या ठिकाणीं प्रथम सा आणि रात्रिः अशीं दोन पृथक् पदें कल्पून "यां नाधीते त्रिरद्य वै" या चरणानें "अरात्रि" या शब्दाचा अर्थ सांगितला आहे. व्यवहारदशेमध्यें तीन प्रकारांनीं पदार्थांचें ज्ञान होत असतें. नष्ट झालेल्या पदार्थांचें अतीत म्हणून ज्ञान होत असतें. उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचें अनागत म्हणून ज्ञान होत असतें आणि विद्यमान पदार्थांचें विद्यमान अथवा वर्तमान याच शब्दानें ज्ञान होत असतें. अशा रीतीनें कालाच्या उदरांत जन्माला येणाऱ्या प्रत्येक वस्तूचें तीन प्रकारांनीं ज्ञान होत असतें. ही व्यवहारदशा अज्ञानमूलक असल्यामुळें तत्त्ववेत्ते तिला रात्र असें म्हणतात. रात्र ही तमोमय असते. आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार नसल्यामुळें मूढ लोकांची जागृत अवस्थाहि तमोमयच असते. ती त्यांची रात्रच होय. ज्या अवस्थेंत ही रात्र मावळते त्या अवस्थेला "अरात्रि" असें म्हण-तात. या अवस्थेंत अतीत, अनागत किंवा वर्तमान हा भेद कांहींच उरत नाहीं. ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय हाहि भेद शिल्लक रहात नाहीं. या अवस्थेंत आल्यानंतर त्याला सर्व कांहीं प्राप्त झाल्यासारखेंच असतें. "सर्वं तदन्न गत्वा विन्दति" "अत्र हि सर्वे कामाः समाहिताः" या अवस्थेंत आल्यानंतर सर्व कामना पूर्ण होतात. अप्राप्त असें कांहींच उरत नाहीं. अशी ही अवस्था असते. मी देहादि उपाधि रहित, निर्विकार, निष्कल, निरंजन, शुद्ध, सच्चिदानंद, परब्रह्मस्वरूप आहें. मी स्वयंप्रकाश परंज्योतिःस्वरूप आहें असा अपरोक्ष साक्षात्कार या अवस्थेंत असतो. या अवस्थेलाच अरात्रि असें म्हणतात व ही अवस्था ज्या महापुरुषाला प्राप्त झालेली असते त्याला "सारात्रि" असें म्हणतात. "अरात्र्या सहितः सारात्रिः" अशी सारात्रि या शब्दाची व्युत्पत्ति आहे. अत्रि महर्षींचीहि हीच अवस्था असल्यामुळें त्यांना सारात्रि असें म्हटलें आहे तें अत्यंत उचितच आहे. सारांश, अत्रिमुनि हे स्वतः त्रैगुण्यातीत राहून लोकांना पापजालांतून सोडवीत होते. सर्वनाश करणाऱ्या काम-क्रोधादि अंतःशत्रूंपासून ते

लोकांची सुटका करीत होते. स्वयंप्रकाश चित्स्वरूप ज्योतिर्मय शुद्ध आत्म्याशीं ते सदा सर्वकाळ समरस होऊन रहात असत हाच अत्रींचा स्वभाव होय आणि हेंच अत्रींचें स्वरूप होय.

ब्रह्मणो मानसाः पुत्रा विदिताः षण्महर्षयः ।
मरिचिरङ्गिरा अत्रिः पुलस्त्यः पुलहः क्रतुः ।।
अत्रेस्तु बहवः पुत्राः श्रूयन्ते मनुजाधिप ।
सर्वे वेदविदः सिद्धाः शान्तात्मानो महर्षयः ।।

ब्रह्मदेवाला सहा मानसपुत्र होते. ते मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह आणि क्रतु या नांवांनी प्रसिद्ध होते. ते सहाहि महर्षि होते. हे राजा, त्यांत अत्रीच्या पोटीं पुष्कळ पुत्र जन्माला आले. हे सर्व वेदवेत्ते आणि सिद्ध पुरुष होते. ते अत्यंत शांत प्रकृतीचे असून महर्षि होते, असें महाभारताच्या आदि पर्वांतील एकूणसत्तराव्या अध्यायांत वर्णन आलेलें आहे. या वर्णनावरून ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांत अत्रिमुनींचा अनुक्रम तिसरा असल्याचें दिसून येत आहे. प्रजापतींच्या गणनाक्रमांतहि अत्रींचा अनुक्रम तिसराच असल्यामुळें यांना अत्रि असें नांव पडलें. "अयं तृतीयः" अशी अत्रि शब्दाची व्युत्पत्ति या मतानें मानली जाते. क्वचित्प्रसंगीं अत्रिऋषींनीं स्वतःच "अहं तृतीयः" असें म्हटल्यामुळें अहं या शब्दांतील अ आणि तृतीय या शब्दांतील त्रि असें मिळून अत्रि हें नांव रूढ झाल्याचें सांगतात. वरील विधानाला पोषक असें खालीं दिलेलें वचनहि वाचकांनीं लक्षांत घेण्यासारखें आहे.

"भृगुर्मरीचिरत्रिश्च अङ्गिराः पुलहः क्रतुः ।
मनुर्दक्षो वसिष्ठश्च पुलस्त्यश्चेति ते दश ।।
ब्रह्मणो मानसा ह्येते उत्पन्नाः स्वयमीश्वराः"

भृगु, मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलह, क्रतु, मनु, दक्ष, वसिष्ठ आणि पुलस्त्य असे हे ब्रह्मदेवाचे दहा मानसपुत्र जन्माला आले. ते जन्मापासूनच स्वतःसिद्ध ऐश्वर्यशक्तीनें संपन्न होते. या वचनावरूनहि ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांत अथवा दहा प्रजापतींमध्यें अत्रिऋषींचा अनुक्रम तिसरा असल्याचेंच दृष्टीस पडतें. या मताप्रमाणें पाहतां अत्रि हे प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचे पुत्र असून ते तिसरे प्रजापति होते ही गोष्ट सिद्ध होत आहे. कांहीं ठिकाणीं ब्रह्मदेवाच्या पुत्रांमध्यें अत्रिमुनींचा अनुक्रम नववा असल्याचेंहि आढळतें. कोणते कोणते पुत्र ब्रह्मदेवाच्या कोणत्या कोणत्या अंगापासून प्रकट झाले याचें वर्णन करतांना भागवतकार तिसऱ्या स्कंधाच्या बाराव्या अध्यायांत सांगत आहेत.

उत्सङ्गान्नारदो जज्ञे दक्षोऽङ्गुष्ठात्स्वयंभुवः ।
प्राणाद्वसिष्ठः संजातो भृगुस्त्वचि करात्क्रतुः ।। २३
पुलहो नाभितो जज्ञे पुलस्त्यः कर्णयोर्ऋषिः ।
अङ्गिरा मुखतोऽक्ष्णोऽत्रिर्मरीचिर्मनसोऽभवत् ।। २४

ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकी नारद हे ब्रह्मदेवाच्या मांडीपासून प्रकट झाले तर दक्ष हे हाताच्या अंगठ्यापासून आविर्भूत झाले. प्राणांपासून वसिष्ठ, त्वचेपासून भृगु आणि हातापासून क्रतु यांचा आविर्भाव झाला. पुलहऋषि हे ब्रह्मदेवाच्या नाभिस्थानापासून प्रकट झाले तर पुलस्त्य ऋषींचा आविर्भाव ब्रह्मदेवाच्या कानापासून झाला. अंगिरा ऋषि हे ब्रह्मदेवाच्या मुखापासून प्रकट झाले तर अत्रिमहर्षि हे ब्रह्मदेवाच्या नेत्रापासून जन्माला आले. जणूं कांही ब्रह्मदेवाचे ते नेत्रच होते! मरीचि ऋषींचा आविर्भाव ब्रह्मदेवाच्या मनापासून झालेला आहे. या सर्व वचनांवरून आद्य अत्रि हे ब्रह्मदेवाचेच पुत्र होते हें निर्विवाद होय. या मताप्रमाणें पाहतां अत्रि हे प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचे पुत्र असून ते तिसरे प्रजापति होते ही गोष्ट सिद्ध होत आहे.



# द्वितीयस्कन्ध

## अत्रींचा स्वभाव

अत्रिमहर्षि हे स्वभावानें अत्यंत शांत होते. "स हि विपुलौजा अपि नितान्त-शान्तप्रकृतिःसर्वलोकहितप्रवणश्चासीत्" असें अत्रिख्याति या निबंधांत अत्रींचें वर्णन केलेलें आहे. नेभळट मनुष्यहि शांत असतो पण त्याची ती शांत प्रकृति त्याच्या अनन्यगतिकत्वाची द्योतक असते; पण अत्रिमहर्षींच्या ठिकाणीं असलेली शांतता ही त्यांना भूषणावह होती. कारण ते अत्यंत तेजस्वी आणि महापराक्रमी होते. सर्व लोकांच्या हितासाठीं ते नेहमीं तळमळत असत. दक्ष रहात असत आणि यशस्वीरीत्या सर्व लोकांचें दुःख दूर करण्यासाठी ते अगदीं अंतःकरणापासून झटतहि असत. लोक-कल्याणासाठीं ज्यानें आपले प्राण तळहातावर घेतले त्याला सौख्य कोठून मिळणार ? अत्रिमहर्षींनाहि सर्व लोकांच्या सौख्यासाठीं स्वतः अत्यंत क्लेश भोगावे लागले आहेत. ते गरिबांचा व दीनदुबळ्यांचा कैवार नेहमीं घेत होते. ही गोष्ट अहोरात्र गरिबांना व दीनदुबळ्यांना छळणाऱ्या असुरांना खपत नव्हती. असे कांहीं असुर त्याहि काळांत होतेच. ते या कारणामुळेच अत्रिऋषींचा फार छळ करीत होते असें प्रत्यक्ष ऋग्वेदांत वर्णन केलेलें आहे.

समाजाची अथवा राष्ट्राची व्यवस्था ही व्यक्तिगत राजनियंत्रित असण्यापेक्षां ती लोकतंत्र स्वरूपाची असावी असें अत्रींना वाटत होतें. त्यांचे ते विचार आसुरी वृत्तीच्या शासकांना न रुचणें हें स्वाभाविकच होतें. त्यामुळें असुर आणि आसुरी वृत्तीचे शासक हे अत्रींचा खूपच छळ करीत होते. बहुसंख्य सुसंस्कृत लोक असलेल्या राष्ट्रांत लोकशाहीतंत्र सुखावह होत असतें. याच्या उलट राष्ट्रांतील बहुसंख्य लोक अडाणी आणि अशिक्षित असतील तर तेथील लोकतंत्र हें गुंडांच्या अधीन होऊन गुंड गबर बनतात व सामान्य जन हे पिळले व छळले जातात. अत्रिऋषींच्या काळांत बहुसंख्य समाज हा सुसंस्कृत असल्यामुळें लोकतंत्रांतील शासनसंस्था ही तापदायक होणें शक्य नव्हतें. शासनसंस्थेचीं सूत्रें हलविणारा लोकमतानुवर्ती राजा हा आपल्या सत्प्रवृत्तीनें प्रजाजनांचें अनुरंजन करीतच असतो. याच अभिप्रायानें कविकुलगुरु कालिदासानेंहि "राजा प्रकृतिरंजनात्" अशी राजा या शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे. पण रजोगुणाच्या अथवा तमोगुणाच्या अतिरेकामुळें शासनसंस्थेचीं सूत्रें हलविणारी व्यक्ति जर उन्मार्गगामी बनली तर त्या व्यक्तीकडून दहशतवाद, धाकदपटशा अथवा भेदनीतीचा अवलंब केला जाऊन सामान्य प्रजाजनांचा छळ होऊं लागतो. अशा वेळीं प्रजाजनांची बाजू उचलून धरणारा हा राज्यकर्त्यांच्या द्वेषास अधिकच पात्र होतो व त्याचा राज्यकर्त्यांकडून अनन्वित छळ होत राहतो. लोककल्याणासाठीं अहोरात्र झटणाऱ्या अत्रिऋषींवरहि एकदां अशीच पाळी आली होती.

"ऋबीसे अत्रिमश्विनाववनीतमुन्निन्यथुः" ऋग्वेदांतील पहिल्या मंडळांतल्या एकशें सोळाव्या सूक्तांतील ही आठवी ऋचा आहे. अहो अश्विनीकुमार देवहो! प्राणान्तिक देहदंड करण्याच्या उद्देशानें अत्रिमुनींना असुरांनीं चोहोंकडून पेटलेल्या तुषाच्या राशीवर ठेवलें असतां तुम्ही त्या संकटांतून अत्रींना वर काढलें याबद्दल तुम्हांला धन्यवाद. असा या ऋचेचा अर्थ आहे. या ऋचेवरून अत्रिऋषींच्या जीवनांतील एका प्रसंगावर चांगलाच प्रकाश पडत आहे. नेहमींच लोकांची कड घेऊन वागणाऱ्या अत्रिमुनींवर एकदां तत्कालीन राज्यकर्त्यांची कोपदृष्टि अगदींच विकोपास गेली. असुरलोक अशा संधीची वाटच पहात असतात. राजाची अनुमति घेऊन त्यांनीं व राजदूतांनी अत्रिऋषींचा छळच सुरू केला. एकदां तर त्यांनीं अत्रिऋषींना सपरिवार पकडून अंधारकोठडींत डांबून ठेविलें. कोठूनहि प्रकाशाचा किरणहि त्या कोठडींत प्रवेश करूं शकत नव्हता अशी ती भयंकर कोठडी होती. कठोर शिक्षा करण्याचें साधन असलेल्या स्थानाला ऋग्वेदामध्यें ऋबीस असें नांव दिलेलें आहे. जेथें प्रकाश प्रवेश करूं शकत नाहीं असें अंधारकोठडीसारखें कैद्याला छळण्याचें स्थान असा ऋबीस या शब्दाचा अर्थ केलेला आहे. अपगतप्रकाश पीडायंत्रगृह असा ऋबीस याला पर्याय दिलेला आहे. दुसरें ऋबीस याचें स्वरूप "तप्तं अग्निकुण्डम्" अशा शब्दांनीं वर्णिलेलें आहे. अपराधी म्हणून समजल्या जाणाऱ्या व्यक्तींना शासन करण्याकरितां तयार केलेलें तप्त अग्निकुंड म्हणजे ऋबीस होय. अथवा ऋबीस या शब्दाचा अर्थ तुषाग्नि असाहि केलेला आहे. भात कांडून झाल्यानंतर त्यांतील तांदूळ निराळे काढल्यावर जो असार भाग शिल्लक राहतो त्याला भूस किंवा तूस असें म्हणतात. या तुसाच्या ढिगाला सर्व बाजूंनीं पेटवितात. यास तुषाग्नि असें म्हणतात. तो तुसाचा ढीग धुमसतच जळतो. त्याच्या कधीं ज्वाळा निघत नाहींत. अशा रीतीनें धुमसणाऱ्या त्या तुसाच्या ढिगांत अपराध्याला जाळून मारतात. अशी ही एक देहान्ताची शिक्षा करण्याची प्रथा प्राचीन काळीं होती. या शिक्षेला प्राणान्तिक देहदंडाची शिक्षा असें म्हटलें जात होतें.

अत्रिऋषि हे सपरिवार अंधार कोठडींतून मुक्त झाले खरें, पण पुढें त्यांच्यावर तुषाग्नीच्या राशीवर बसून प्राणान्तिक देहदंड भोगण्याची पाळी आली. राजाच्या संमतीनें त्या असुरांनीं अत्रिमुनींना तुषांच्या प्रचंड राशीवर बसविलें व सर्व बाजूंनीं ती रास पेटवून दिली. आतां अत्रिऋषि हे खात्रीनें मरतील अशी कल्पना करून ते तेथून निघून गेले. पण "देव तारी त्याला कोण मारी?" या म्हणीचा तेथें प्रत्यय आला. त्या ठिकाणीं अकस्मात् देवांचे वैद्य अश्विनीकुमार प्राप्त झाले! त्यांनीं अत्रिऋषींची त्या संकटांतून सुटका केली. त्यांचें शरीर तुषाग्नीनें जेथें जेथें भाजलें होतें त्या त्या ठिकाणीं वनस्पतिरसांचा उपचार करून अत्रिऋषींचा देह त्यांनीं दिव्य केला. अशा रीतीनें अश्विनी-कुमारांनीं अत्रिऋषींना त्या संकटांतून मुक्त केल्यामुळें ऋग्वेदांत अश्विनीकुमारांचें मुक्त कंठानें स्तवन केलेलें आहे. ऋबीस हा एक सांकेतिक शब्द

आहे. त्याला कांहीं म्हणण्यासारखी समाधानकारक व्युत्पत्ति नाहीं. ऋबीस या शब्दांतील ऋ धातूचा अर्थ जाणें – नष्ट होणें असा असून प्रकाश या अर्थाच्या भास शब्दांतील भ चा व बनला व आ च्या जागीं ई होऊन ऋबीस असा शब्द तयार झाला असें यास्काचार्यांनीं निरुक्तांत वर्णिलेलें आहे. ज्याच्यांतून बाष्प म्हणजे वाफा बाहेर पडतात असा तापलेला जमिनीचा खळगा असाहि ऋबीस या शब्दाचा अर्थ आहे. तात्पर्य ऋबीस शब्दाचे जेवढे अर्थ आहेत त्या सर्व अर्थांनीं व्यक्त होणाऱ्या संकटांतून अश्विनीकुमारांनीं व अग्निदेवतेनें अत्रिऋषींना मुक्त केलेलें आहे. यावरून देवांनाहि अत्रिऋषींचें महत्त्व वाटत होतें ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होत आहे. असो. अत्रिऋषींना लोककल्याणासाठीं सर्व प्रकारचे छळ भोगावे लागलेले आहेत हेंहि ऋग्वेदांतील वर्णनावरून उघड दिसत आहे.

अग्निदेवतेनेंहि अत्रिऋषींना विविध संकटांतून वांचविलें असल्यामुळें ऋग्वेदांत अग्नीचेंहि स्तवन केलेलें आढळतें. " अग्निरत्रिं घर्म उरुष्यदन्तः " ऋग्वेद १०।८०।३ अग्निः अत्रिं महर्षिं घर्मे अन्तः उरुष्यत् असा या मंत्रांतील वाक्याचा अन्वय आहे. घर्म म्हणजे ज्याला आपण वर ऋबीस असें म्हटलेलें आहे. अर्थात् ज्याच्यांतून वाफा निघत आहेत असा पृथ्वीचा प्रतप्त खोल खळगा. अत्रिमहर्षींना असुरांनीं अशा तापलेल्या खोल खड्ड्यांत टाकले असतां अग्निदेवानेच अत्रिमुनींना खड्ड्यांतून वर काढलें आणि त्यांचें संरक्षण केलें. अग्निदेवाचा महिमा अवर्णनीय आहे. असा या ऋग्वेदांतील वचनाचा अर्थ आहे. यावरून अत्रि ऋषीवर अग्नि, अश्विनीकुमार इत्यादि देवतांचा मोठा अनुग्रह असल्याचें दिसून येतें. याशिवाय अत्रिमहर्षींचा ऋग्वेदांत ठिकठिकाणीं गौरवपूर्ण उल्लेख केलेला आढळतो. ऋग्वेद मंडल १।४५।३, ५।४।९, ७।८।१२, ७।८।११, ७।८।७२, अधिक जिज्ञासूंनी हीं सर्व स्थानें अवश्य पहावीत.

अत्रिमहर्षि हें एक महान् संशोधक होते. सर्वानुक्रमणी आणि सायणभाष्य यांतील उल्लेखावरून ऋग्वेदांतील पांचव्या मंडलाचें द्रष्टृत्व – परंपरेनें – अत्रिऋषींकडेच असल्याचें दिसून येतें. बृहद्देवता या ग्रंथांतहि ऋग्वेदाच्या पांचव्या मंडलाला अत्रिमंडल अशीच संज्ञा दिलेली आहे. अत्रिऋषींचें एक फार मोठें संशोधनमंडळच असल्याचें दिसून येतें. या मंडळाला " ब्रह्मपर्षद " अथवा " आत्रेय परिषद् " असें नांव दिलेलें होतें. या मंडळांत अत्रिमहर्षींचे अनेक पुत्र, पौत्र व शिष्य यांचा समावेश होता. अत्रिमहर्षि हे स्वतः या मंडळाचे नेते होते. ते सर्वांचे मार्गदर्शक होते. या मंडळांत ज्यौतिष शास्त्राचा विशेषतः खगोल शास्त्राचा प्राधान्यानें विचार होत असे. ग्रहनक्षत्रादिकांच्या स्थिति-गतींचा संशोधनात्मक दृष्टिकोणांतून बारकाईने विचार होत असे. आद्य अत्रिमहर्षींच्या काळांत एकदा खग्रास सूर्यग्रहणाचा प्रसंग आला. ख म्हणजे पूर्ण आणि ग्रास म्हणजे घास. चंद्र अथवा सूर्य जेव्हा ग्रहाकडून पूर्णपणें ग्रासिला जातो तेव्हां त्या ग्रहणाला खग्रास ग्रहण असें म्हणतात. चंद्र-

बिंबाचा अथवा सूर्यबिंबाचा अंशतः जेव्हां ग्रास होतो तेव्हां त्याला खंडग्रास म्हणतात. स्वायंभुवमन्वन्तरांतील खग्रास स्वरूपाचें पहिलेंच सूर्यग्रहण होतें तें. दिवसाढवळ्या सूर्य नाहींसा झाला! चोहोंकडे अंधार पडला. लोक घाबरले, देवहि घाबरले. कोणाला कांहीं सुचेनासें झालें! त्या वेळेला अत्रींच्या संशोधनशालेनें फार मोठें काम केलेलें आहे. "अत्रिमर्हषिः पूर्वं ग्रहणकाले सूर्यं द्रष्टुं कंचिदपूर्वं यन्त्रविशेषं निर्मापयामास" अत्रिमहर्षींनीं पूर्वीं खग्रास सूर्यग्रहणाच्या वेळीं सूर्याला पाहण्याकरितां – सूर्याचें संशोधन करण्याकरितां विशिष्ट प्रकारचें एक अपूर्व यंत्र निर्माण केलें असें अत्रिख्यातिकारांनीं म्हटलेलें आहे.

सूर्याला ग्रहण कां लागतें हें शोधून काढण्याकरितां त्या वेळीं अनेकांनीं प्रयत्न केले पण कोणालाहि शोध लागला नाहीं. अत्रिऋषींचें संशोधन-मंडळ मात्र त्यांत यशस्वी झालें. त्या संशोधनाचें सर्व श्रेय अत्रिमहर्षींनाच मिळालेलें आहे. सूर्यग्रहण कां लागतें? हा शोध लागल्याबरोबर आत्रेय ब्रह्मपरिषदेला मोठा आनंद होणें हें स्वाभाविक आहे. पहा ऋग्वेद ५।४०।९ "यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाऽविध्यदासुरः। अत्रयस्तमन्वविन्दन्, अत्रयस्तमन्वविन्दन्। नहि अन्ये अशक्नुवन्" अत्रि आणि त्यांच्या संशोधन-मंडळांतील सदस्य हे सर्वच अत्रि या शब्दानें ओळखले जात होते. तं म्हणजे त्या सूर्याला जो सूर्य स्वर्भानु नांवाच्या असुरानें मायेनें निर्माण केलेल्या अंधकारानें खरोखरच झाकून टाकलासा केला. अत्रयः म्हणजे अत्रिमर्हषि आणि त्यांच्या ब्रह्मपरिषदेमधील सदस्य यांनीं अन्वविन्दन् म्हणजे मिळविलें, जाणलें अथवा शोधून काढलें. इतरांना हा शोध लावतां आला नाहीं. "नहि अन्ये अन्वविन्दन्"। असा त्याचा अर्थ आहे. सूर्य ही एक विश्वोपकारक मोठी देवता असून राहु आणि केतु हे देखील देवतास्वरूपाला प्राप्त झालेले ग्रहरूपी देवच आहेत अशा दृष्टिकोणांतून केलेला ऋचेचा हा सरल आधिदैविक स्वरूपाचा अर्थ आहे.

## गायत्रीमंत्राचा अर्थ

आध्यात्मिक दृष्टिकोनांतूनहि या ऋचेचा मोठा बहारदारीचा अर्थ केलेला असून त्याहि दृष्टीनें अत्रिमुनींचा महिमा अगाध असल्याचें वर्णन केलेलें आहे. पहा – "यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाऽविध्यदासुरः। अत्रयस्तमन्वविन्दन्नह्यन्ये अशक्नुवन्।" आधिभौतिक दृष्टीनें सूर्य शब्दाचा अर्थ नित्यनियमानें उदयाला येणारा, अस्ताला जाणारा व ठराविक मार्गानें आकाशांत फिरणारा एक विशिष्ट तेजोगोल असा आहे. या दृष्टीनें पहातां सृ = सरणें या धातूपासून सूर्यशब्द निष्पन्न झालेला आहे. "सरति इति सूर्यः" अशी त्याची व्युत्पत्ति आहे. आधिदैविक दृष्टीनें सूर्य शब्दाचा अर्थ चक्षुरिंद्रियाची अधिष्ठात्री व प्राणिमात्रांच्या देहाला, मनाला व बुद्धीला प्रेरणा देणारी एक विशिष्ट देवता असा आहे. "सर्व विश्वाला प्रसवणाऱ्या त्या श्रेष्ठ सवित्याच्या तेजाचें आम्ही ध्यान करीत आहोंत. तो आमच्या बुद्धीला

कल्याणकारक उत्तम प्रेरणा देवो" अशी संध्योपासनप्रसंगीं नित्य त्या देवाची प्रार्थना केली जाते. तोच देव असा सूर्य शब्दाचा अर्थ आहे. तत् म्हणजे तें अर्थात् सुप्रसिद्ध असलेलें ऋषि, मुनि, तत्त्ववेत्ते आणि देवहि ज्या तेजाची अपेक्षा करतात तें तेज. तें कोणाचें तेज आहे? असें विचाराल तर सांगतों — "सवितुः" सर्व विश्वाला प्रसवणाऱ्या परमात्म्याचें जें तेज आहे; "जन्माद्यस्य यतः" या सूत्रानें ब्रह्मसूत्रकार ज्या परमात्म्याचें वर्णन करीत आहेत त्याच परमात्म्याचें तें तेज होय. तें "वरेण्यं" म्हणजे अत्यंत श्रेष्ठ आहे. कारण तें "भर्गः" म्हणजे तेज भर्गस्वरूप आहे. भर्गशब्दांतील भकार हा कांतीचा अथवा प्रकाशाचा द्योतक आहे. प्रकाशानेंच पदार्थांची सत्ता उपलब्ध होत असल्यामुळें शब्द हा सत्तेचाहि अभिव्यंजक आहे. भर्ग या शब्दांतील रकार हा सुखाचा, आनंदाचा बोधक आहे आणि ग हें अक्षर गति अर्थात् ज्ञान असा अर्थ सुचवीत आहे. भकार, रकार आणि गकार मिळून बनलेला भर्ग हा शब्द परमेश्वराच्या तेजाची सच्चिदानन्दरूपता प्रकट करीत आहे. सवित्याचें तेज हें सच्चिदानन्दरूप आहे असा त्याचा अर्थ झाला. त्या तेजाचें आम्ही धीमहि म्हणजे ध्यान करीत आहोंत. सूक्ष्म तेलाची धार जशी अविच्छिन्न असते त्याप्रमाणें अखंड चिंतन करीत राहणें याला ध्यान असें म्हणतात. आम्ही कोणाचें ध्यान करीत आहोंत तर सांगतात "देवस्य." द्युत् प्रकाशणें या धातूपासून निष्पन्न झालेल्या देव शब्दाचा अर्थ प्रकाशमान असा आहे. प्रकृत स्थलीं देव शब्दाचा अर्थ नित्य प्रकाशमान परमात्मा असा आहे. "द्योतते इति देवः" अशी त्याची व्युत्पत्ति आहे. दिव् म्हणजे क्रीडा करणें या धातूपासून निष्पन्न झालेल्या देव शब्दाचा अर्थ नित्य स्वस्वरूपीं रमणारा असा आहे. तात्पर्य नित्य प्रकाशमान असलेल्या आणि स्वस्वरूपीं रमलेल्या परमेश्वराचें सच्चिदानंद स्वरूप असलेलें तें तेज, त्या तेजाचें आम्ही ध्यान करीत आहोंत.

"यः" म्हणजे वर वर्णन केलेला असा जो परमात्मा, अथवा यः शब्दाचा अर्थ लक्ष्मीसहित नारायण असाहि लक्षांत घ्यावा. व्याकरणशास्त्राच्या दृष्टीनें ई आणि अ मिळून य हें अक्षर बनतें. ई हें अक्षर शक्तिबीज असल्यामुळें लक्ष्मीचें वाचक आहे व अ हें अक्षर "अकारो वासुदेवः स्यात्" या वचनाप्रमाणें वासुदेवाचें अर्थात् नारायणाचें वाचक आहे. तात्पर्य ई आणि अ मिळून बनलेल्या य या शब्दाचा अर्थ लक्ष्मीसहित नारायण असा समजून त्याचें ध्यान करावें, असें याज्ञवल्क्यांनीं म्हटलेलें आहे. तो लक्ष्मीसहित नारायण. "नः धियः प्रचोदयात्" — आमच्या बुद्धींना कल्याणकारक अशी उत्तम प्रेरणा देवो. अशा रीतीनें गायत्री मंत्रांत ज्याची प्रार्थना केलेली आहे, तो देव. "भा-रति-ज्ञानरूपत्वाद्भर्गो ध्येयोऽखिलैर्जनैः" परमेश्वराचें स्वरूप, प्रकाश, प्रेम आणि ज्ञान असें असल्यामुळें त्याचें सर्व लोकांनीं ध्यान करावें; असें श्रीमध्वाचार्यांनींहि आपल्या ऋग्वेदभाष्यांत म्हटलेलें आहे. आधिदैविक दृष्टचा सूर्य शब्दाचा अर्थ निराळाच आहे. या दृष्टीनें पाहतां सु = प्रेरणा करणें

या धातूपासून सूर्य शब्द निष्पन्न झालेला आहे असें समजावें. सुवति इति सूर्यः अशी सूर्य शब्दाची व्युत्पत्ति आहे. सर्व लोकांना आपआपल्या कर्माच्या ठिकाणीं प्रवृत्त करतो त्याला सूर्य असें म्हणतात, असा याचा अर्थ आहे. "सुप्रसवैश्वर्ययोः" या धातुपाठांत सांगितल्याप्रमाणे सर्वांना जन्म देतो अथवा ऐश्वर्यसंपन्न करतो त्याला सूर्य असें म्हणतात. सूर्य हा सर्व विश्वाचा पिता व ऐश्वर्यदाता आहे. हा सर्व विचार आधिदैविक दृष्टीनें झाला. आता आध्यात्मिक दृष्टीनें आपण सूर्य या शब्दाचा अर्थ पाहूं.

आध्यात्मिक दृष्टचा सूर्य शब्दाचा अर्थ आहे आत्मा. "सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च।" सूर्य हा स्थावर-जंगमात्मक सर्व विश्वाचा आत्मा आहे असें वेदच सूर्याचे वर्णन करीत आहे. 'सूरिभिःसदा वन्द्यः सूर्यः' अशी या दृष्टीनें सूर्य शब्दाची निरुक्ति आहे. वन्द्य शब्द हा अत्यंत आदराचा सूचक आहे. विद्वज्जनांना अत्यंत आदरणीय असा त्याचा अर्थ होतो. जें तत्त्व अविनाशी आणि निरतिशय आनंदास्पद असेल तेंच विद्वज्जनांना आदरणीय असतें. या विश्वामध्यें असें एक तत्त्व म्हणजे आत्माच होय. या दृष्टीनें सूर्य हा शब्द आत्म्याचा वाचक ठरतो. हा आत्मा सर्व जगाचा प्रसवकर्ता म्हणजे जनक असल्यामुळें त्याला सूर्य असें म्हटलेलें आहे. अद्वैत तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें तो साऱ्या विश्वाच्या आभासाचें अधिष्ठान असल्यामुळें साऱ्या विश्वाच्या उत्पत्तीचा, स्थितीचा आणि प्रलयाचाहि तोच कर्ता मानला जातो. जगतः म्हणजे गतिशील विश्वाचा व तस्थुषः म्हणजे स्थितिशील विश्वाचा सूर्य हाच आत्मा आहे. याच अभिप्रायानें सूर्य शब्दाचा अर्थ आत्मा असा होतो. तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें आत्म्याचें संशोधन करणें व आत्म---स्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार होणें या गोष्टी अत्यंत अवघड आहेत. "क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया। दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति" वस्तऱ्याच्या तीक्ष्ण धारेवरून चालणें किंवा ती धार जिभेनें चाटणें हें जितकें अवघड आहे तितकाच आत्मसंशोधनाचा व साक्षात्काराचा मार्ग अवघड आहे. अशा अत्यंत गूढ असलेल्या एकमेव अद्वितीय आत्मतत्त्वाच्या संशोधनाचें कार्य प्रथम जर कोणीं केलें असेल तर तें अत्रिमुनींनींच केलेलें आहे. आत्मतत्त्वाचा साक्षात्कार मानवलोकांत पहिल्या प्रथम जर कोणीं करून घेतला असेल तर तो अत्रिमहर्षींनींच करून घेतला आहे. याच अभिप्रायानें ऋग्वेदानें "अत्रयस्तमन्वविन्दन्" अत्रिऋषींनींच आत्मतत्त्वाचा शोध लावला, अत्रिमुनींनींच प्रथम त्याचा साक्षात्कार करून घेतला. "नहि अन्ये अशक्नुवन्" अत्रि ऋषींच्या अगोदर दुसऱ्या कोणालाहि तें शक्य झालें नाहीं असा स्पष्ट निर्वाळा दिला आहे. यावरूनहि अत्रिऋषींचें महत्त्व वाचकांनीं लक्षांत घ्यावे

आध्यात्मिक दृष्टचा वरील श्रुतिवचनाचा अर्थ करतांना स्वर्भानु शब्दाचा अर्थ मृत्यु असा केलेला आहे. स्वर्गलोकांतील देव हे मृत्यूचा प्रकाश जाणूं शकतात, त्यांना मृत्यु कळतो. पण अधोलोकीं त्याचा प्रकाश नसल्यामुळें मृत्युलोकांतील

मानवांना मृत्यु कळत नाहीं म्हणून मृत्यूला स्वर्भानु असें अन्वर्थ नांव देण्यांत आलें आहे. आधिदैविक दृष्टीनें पाहिलें असतांहि स्वर्भानु शब्दाचा अर्थ राहु असा करतात. राहु हा समुद्रमंथनाच्या वेळीं अमृत वांटलें जात असतां देवांच्या पंक्तींत सूर्य आणि चंद्र यांच्यामध्यें बसला होता. हा राहु आहे असें सूर्य आणि चंद्र यांनीं सुचवितांच भगवंतानें त्याचा शिरच्छेद केला. तोच पुढे राहु आणि केतु या नांवांनीं ओळखला जाऊं लागला. त्याचें ज्ञान मानवांना झालें नाहीं. स्वर्गीय देवतांनाच तो प्रकाशत असल्यामुळें त्याला स्वर्भानु असें म्हटलें गेलें. आधिभौतिक दृष्टचा राहु हा एकच ग्रह असून तो शिर आणि पुच्छ या रूपानें एकशें ऐंशी अंशांच्या कोनांत दोन विरुद्ध टोंकांना विशिष्ट वातावरणाच्या रूपानें विभागला गेला आहे. हीं वातावरणाचीं दोन्हीं मंडलें अधच्छाय आणि ऊर्ध्वप्रकाश असल्यामुळे त्यांना स्वर्भानु असें म्हटलेलें आहे. आधिदैविक दृष्टचा स्वर्भानु हा एक असुर असून तो चंद्र आणि सूर्य या देवांना छळीत असतो. आधिभौतिक दृष्टीनें स्वर्भानु हा एक छायात्मक विशिष्ट वातावरण-मंडलाच्या स्वरूपांत अदृश्य राहून सूर्य आणि चंद्र यांना विशिष्ट कालांत झाकून टाकणारा ग्रहच आहे. आध्यात्मिक दृष्टीनें वर सांगितल्याप्रमाणें मृत्यूला उद्देशून स्वर्भानु हें नांव दिलेलें आहे. या मृत्युरूपीं स्वर्भानूनें हा आत्मस्वरूपी सूर्य " तमसा " म्हणजे अविद्यारूपी अंधकारानें " अविध्यत् " म्हणजे व्यापून टाकला, झाकला. असा याचा अर्थ आहे. अविद्येचा निरास करून अत्रिऋषींनींच प्रथम त्याला जाणलें. अत्रिऋषींनींच मानवलोकांत आत्मस्वरूपाचा प्रथम साक्षात्कार करून घेतला आणि सर्व दुःखांतून तरून जाण्याचा मार्ग लोकांना दाखविला. हें कार्य त्या काळांत इतर कोणी करूं शकलें नाही. " नहि अन्ये अशक्नुवन्."

सर्व जनतेला सर्व प्रकारच्या सांसारिक दुःखांतून सोडवून आत्मसाक्षात्काराच्या आनंदानें त्यांचें जीवन आनंदमयच बनविण्याचें कार्य अत्रिमुनींनीं केलें व हेंच कार्य सर्व मानवांच्या कल्याणासाठीं अविच्छिन्न परंपरेने चालू ठेवण्याकरितां खडतर तपश्चर्या करून परमेश्वराजवळ दत्तात्रेयासारखा पुत्र मागितला. अत्रिमुनींच्या प्रार्थनेप्रमाणें प्रत्यक्ष परमात्माच दत्तात्रेयांच्या रूपानें अत्रिमुनींच्या येथें अवतरला व अत्रिमुनींनीं हें विश्वोद्धाराचें कार्य आपले पुत्र श्रीगुरुदेव दत्तात्रेय यांच्यावर सोंपविलें. ऋग्वेदांतल्या पांचव्या मंडलांतील चाळिसाव्या सूक्तांतल्या पांच ते नऊ ऋचांनीं हाच विषय वर्णिलेला आहे. स्वर्भानु नांवाचा राक्षस (ग्रह) असा आहे कीं, तो राहूच्या रूपानें चंद्राला व केतूच्या रूपानें सूर्याला ग्रासतो. याप्रमाणें सूर्याला ग्रासलें असतां इंद्रानें अत्रिऋषींच्या आज्ञेनें ५ व्या मण्डलांतील, ४० व्या सूक्तांतील ६ ते ९ ऋचा म्हणून सूर्याची सुटका केली व सर्वांना आनंदी केलें.

अत्रिऋषींचा ऋग्वेदामध्यें आदरानें, बहुवचनानें उल्लेख केला जातो. क्वचित्प्रसंगीं त्या बहुवचनाचा अत्रिमुनि व त्यांचें कुल अर्थात् पुत्र व शिष्यादि

परिवार असाहि अर्थ करतात. आणि अत्रि हा शब्द एकवचनामध्येंहि आढळतो. ऋग्वेद (मंडल) १।११३९।९; १।११८३।५; ८।३६।७; ८।४२।५ वरील ऋचांमध्यें एकवचनी निर्देश असला तरी तेथेंहि अत्रिमहर्षींबद्दल आदरच व्यक्त झालेला दिसेल.

## अत्रिमुनींची लोकसेवा

भगवान दत्तात्रेय यांचे पिता असलेले अत्रिमहर्षि हे स्वराज्याचे कट्टर पुरस्कर्ते होते, पारतन्त्र्याचा प्रतिकार करण्यांत त्यांनीं अत्यंत कष्ट भोगले. असुरांकडून होत असलेला छळ त्यांनीं फारच सोसला. प्रयत्नांची पराकाष्ठा करून त्यांनीं जनतेला स्वराज्याचें सुख भोगावयास लावलें. स्वराज्य मिळविणें हें जितकें अवघड आहे त्याहीपेक्षां तें सुरक्षित राखणें अत्यंत अवघड आहे. याची अत्रिऋषींना पूर्ण कल्पना होती. याच अभिप्रायानें ते लोकजागृतीचें काम अत्यंत जागरुकतेनें करीत होतें. प्रायः स्वराज्यप्राप्तीनंतर लोक बहिर्मुख बनतात. संकुचित स्वार्थ साधण्यासाठीच प्रायः त्यांची धडपड सुरू होते. त्यापायीं राष्ट्र नीतिभ्रष्ट होऊन अवनतीला जातें. याकरितां ते राष्ट्राची नीतिमत्ता सुरक्षित राखण्याचा नेहमी प्रयत्न करीत असत. त्यांची कांहीं आचारसंहिता व नियम (कायदे कानू) त्यांच्या काळांत त्यांनी प्रचलित केले होते. त्याचेंच संकलन पुढे अत्रिस्मृतीच्या रूपानें झालेलें पहावयास सांपडतें.

"व्याचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये" ऋग्वेद ५।६६।६ मित्रावरूणदेवतांना उद्देशून अत्रिऋषींनीं केलेली ही प्रार्थना आहे. स्वराज्य मिळविण्यासाठीं, तें वाढविण्यासाठी व त्याचें संरक्षण करण्यासाठीं आम्हीं प्रयत्न करावा असें सामर्थ्य देवतांनो तुम्ही आम्हांला द्या; अशी त्यांची देवतांना प्रार्थना असे. केवळ देवतांच्या प्रार्थनेवरच ते अवलंबून राहिलेले नाहींत तर आपल्याला पाहिजे असलेल्या तत्त्वांचा व राष्ट्राला हितावह असलेल्या तत्त्वाचा ते प्रचारहि करीत होते. "लोक हो! आपल्याला स्वराज्य मिळालेलें आहे. एवढेंच नव्हे तर तें खूप विस्तृत आहे. व्यचिष्ठ या शब्दाचा अर्थ अत्यंत विस्तृत असा आहे. स्वराज्य आणि त्याचा वाढलेला विस्तार याची काळजी एकटयादुकटयांनीं वाहावयाची नसते. राष्ट्राच्या अनेक नेत्यांनीं काळजी वाहून त्यांचें संरक्षण करावयाचें असतें. "बहुपाय्य" याचा अर्थ अनेकांनीं संरक्षण करण्यास योग्य असाच आहे. तरी तुम्ही-आम्ही सर्वांनी या स्वराज्याच्या संरक्षणाचा प्रयत्न केला पाहिजे. अशी अत्रिमहर्षींची सर्वांना शिकवणूक होती. यावरून अत्रिमहर्षींचें स्थान समाजांत अत्यंत श्रेष्ठ होतें हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

स्वराज्यप्राप्तीसाठीं ज्यांनीं तळमळून परिश्रम केलेले असतात, देह झिजविलेला असतो, हाडाचीं काडें केलेलीं असतात व अंतीं सर्वस्वालाहि मुकण्याचा

ज्यांच्यावर प्रसंग येतो ते स्वराज्यप्राप्तीनंतर प्रायः उपेक्षिले जातात. अत्रिमुनींच्याहि जीवनांत एक काळ असा आलेला होता. पण अत्रिमुनि त्याला यत्किंचितहि डगमगले नाहींत. अत्रिमुनींचा यज्ञयागादि कर्मांमध्येहि चांगला अधिकार होता. ते उत्तम याज्ञिक होते. यज्ञयागादि कर्मांमध्ये मिळणाऱ्या दक्षिणेवरहि त्यांना कांहीं काळ निर्वाह करावा लागला असल्याचें दिसून येतें. कांहीं खोडसाळ ब्राह्मण अत्रिऋषींना अथवा त्यांच्या गोत्रांतील लोकांना दक्षिणा देण्याच्या बाबतींत अडथळा अथवा दिरंगाई करीत असत. अत्रिऋषि हे जसे सरळ स्वभावाचे होते तसे ते स्वाभिमानीहि होते. एका यज्ञप्रसंगीं सूर्यग्रहणाचें विघ्न उपस्थित झालें. देव घाबरले! ऋषिलोकांनाहि कांहीं सुचेना! शेवटीं तेथे उपस्थित असलेल्या अत्रिऋषींना सर्व देव आणि ऋषिलोक शरण गेले. अत्रिऋषींनीं ग्रहणाचें निरीक्षण केलें. त्या बाबतींत त्यांचा फार मोठा अधिकार होता हें आपण मागें पाहिलेंच आहे. अत्रींनीं राहु (केतु) शोधून काढला. त्याचें निरसन केलें. सूर्य संकटांतून मुक्त झाला व यज्ञकर्म यथासांग पार पडलें. अथर्ववेदामध्यें याचें वर्णन केलेलें आहे. "आदित्यं वै तमोजग्राह तदत्रिरपनुनोद। तदत्रिरन्वपश्यत्। गोपथ ब्राह्मण २।१७ (पूर्व भाग). यज्ञ-कर्म यथासांग पार पडल्यानंतर संतुष्ट झालेल्या देवांनीं अत्रिऋषींना वरदान दिलें. आपणांस काय पाहिजे तें मागा असें जेव्हां देवांनीं म्हटलें तेव्हां अत्रि म्हणाले "दक्षिणीया मे प्रजा स्यादिति" लोक माझ्या मुलांना व शिष्यांना दक्षिणा देण्याची टाळाटाळ करतात; याला, आम्ही विद्वत्तेंत, संशोधनांत आणि लोकसेवेत पुढाकार घेतों, याबद्दल त्यांच्या मनांत असलेला मत्सर हाच एक कारण आहे. तरी अत्रिगोत्रातील लोकांना सर्वांच्या अगोदर आदरपूर्वक दक्षिणा मिळावी अशी व्यवस्था होणे आवश्यक आहे; हा अत्रिमुनींनीं वर मागितल्याबरोबर देवांनीं अत्रिऋषींच्या मागण्याप्रमाणें व्यवस्था केली. "तस्मादात्रेयाय यज्ञे प्रथमा दक्षिणा दीयन्त इति" गोपथब्राह्मण, पूर्व भाग २।१७. देवांनीं अत्रींना वरदान दिलेलें असल्यामुळे अद्यापिहि यज्ञयागादि कर्मांमध्यें अत्रिगोत्रोत्पन्नांनाच प्रथम दक्षिणा दिली जाते असा प्रघात आढळून येतो. महाभारतांतील अनुशासन पर्वांतहि या प्रसंगाचें विस्तृत वर्णन आढळतें.

अत्रिमहामुनि हे नेहमींच लोकहितप्रवण असत. कोठेंहि कांहीं वाद, तंटा निर्माण झाला असतां तो मिटविण्यासाठीं त्याहि काळीं पंचांची निवड होत असे. पंचांनीं दिलेला निर्णय पांचामुखीं परमेश्वर म्हणून प्रमाण मानला जात असे. त्या पंचांत अत्रिमहर्षि हे असावयाचेच. अत्रिमुनि हे त्या पंचांमध्यें केवळ घटक या नात्यानेंच काम करीत नसत तर ते सर्वानुमतें सरपंच म्हणूनच कार्य करीत. अगदीं गिरिचरांपासून तों थेट पुरीचरांपर्यंत ते सर्वांनाच मान्य असत. ही गोष्ट ऋग्वेदांत त्यांना दिलेल्या "पांचजन्य" या विशेषणावरून सिद्ध होत आहे.

"ऋबिं नरावंहसः पाञ्चजन्यमृबीसादत्रिं मुंचथो गणेन" – ऋ. १।११७.३

अश्विनीकुमार देवतांची स्तुति करीत असतांना ऋग्वेदांत म्हटलें आहे; हे अश्विनी-कुमार देवांनो! तुम्ही वररूप धारण करून भूमंडलावर अवतरला आणि या अत्रि ऋषींना त्यांच्या परिवारासह या ऋबीस नांवाच्या यातनांतून अर्थात् अंधार-कोठडींत कोंडून ठेवणें, जमिनींत खोल खळगा खणून त्यांत ढकलणें व सभोंवार भाताचें भूस टाकून त्याला सर्व बाजूंनीं पेटविणें इत्यादि अनेक प्रकारच्या क्लेशांतून व दुःखांतून (अंहसः) सोडविलें हें फार उत्तम कार्य केलें. कारण अत्रिऋषींची उप-युक्तता ही केवळ आपल्या परिवारापुरतीच परिसीमित नसून ते पंचजनप्रिय आहेत असें आढळतें. न्यायनिवाड्यासाठीं योजलेल्या पंचांना तर 'पंचजन' म्हणतातच पण "निषादपंचमाः चत्वारो वर्णाः पंचजनाः" या सायणाचार्यांच्या व्याख्येप्रमाणें चारहि वर्णांचे प्रजाजन बौद्धिक व औद्योगिक क्षेत्रांत काम करणारे, संरक्षण, उत्पादन, व्यापार आणि शेती इत्यादि विविध क्षेत्रांतील लोक, तसेच गिरिचर आणि वनचर या सर्वांना मिळून पंचजन असा शब्द लावला जातो. या पंचजनांमध्यें अत्रिमुनींना फार मोठा मान असल्यामुळें त्यांना पांचजन्य असें म्हणत असत. "पंचजनेषु भवः पांचजन्यः" अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. चारहि वर्णांच्या समाजांत व गिरिचर आणि वनचर यांच्या मेळाव्यांत आत्मीयतेनें वावरणारा असा त्याचा अर्थ आहे. अत्रिमुनींचें जीवन असेंच लोकप्रिय असल्यामुळें त्यांना वेदांमध्यें पांचजन्य असें विशेषण दिलेलें आहे.

"पंचजनानामभ्यर्हणीयत्वादेवायमत्रिः पांचजन्य इत्युच्यते"

पंचजनांमध्ये प्रायः सकल मानवजातीचा अंतर्भाव होतो. असुर वृत्तीचे दैत्यदानव वगळल्यास प्रायः सर्व मानवजातीला अत्रिमुनि हे प्रिय वाटत होते, म्हणूनच त्यांना पांचजन्य हें नांव पडलें. या सर्व वर्णनावरून अत्रिमुनि हे सर्व-लोकप्रिय होते ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होत आहे. याच अभिप्रायानें अत्रि आणि सर्वांशीं मैत्री असा वाक्प्रचारहि मराठी भाषेमध्यें रूढ आहे.

अत्रि, बादरायण, मुद्‌गल आणि वैन्य हीं चार गोत्रें अशीं आहेत कीं, या गोत्रांचें स्वगोत्रावांचून इतर सर्व गोत्रांशीं विवाहसंबंधाच्या दृष्टीचें मिळतेंजुळतें असतें. त्यांचा इतर गोत्रांशीं विरोध येत नाहीं. अशा या चार गोत्रांमध्ये अत्रींचा अनुक्रम पहिलाच असल्यामुळें "अत्रि आणि सर्वांशीं मैत्री" या वाक्प्रचाराला आणखी पुष्टीच मिळते. अत्रिमुनि हे यज्ञविद्येमध्यें अत्यंत निष्णात होते. मोठ्या-मोठ्या यज्ञांमध्यें त्यांना मानाचें स्थान मिळत असे. औषधींचा राजा व सोमवंशाचा मूळ पुरुष सोम हा अत्रींचा पुत्र असून दत्तात्रेयांचा तो सख्खा बंधु होता. तो जेव्हां मोठा झाला तेव्हां त्यानें आदिनारायणाच्या ठिकाणीं चित्त स्थिर करून फार मोठी तपश्चर्या केली. आदिनारायण प्रसन्न झाले, म्हणाले, 'सोमा! तुला पाहिजे तो वर मागून घे.' आदिनारायणांचे हे शब्द ऐकताच सोम म्हणाला, 'महाराज! मीं इंद्रलोक जिंकावा असें सामर्थ्य आपण मला द्या. त्याचप्रमाणें माझ्या घरीं होणाऱ्या

राजसूय यज्ञामध्यें देवांनीं प्रत्यक्ष हविर्भाग सेवन करावा अशी माझी इच्छा आहे. अत्यंत श्रेष्ठ व अधिकारी असलेल्या ऋषिमुनींनीं माझें यज्ञकर्म पार पाडावें. प्रत्यक्ष शंकरानेंच त्रिशूळ हातांत घेऊन आमचें राक्षसांपासून संरक्षण करावें ' याप्रमाणें सोमानें मागणें मागितल्याबरोबर आदिनारायण भगवान् विष्णु यांनीं ' ठीक आहे ! ' असें म्हटलें. पुढें सोम राजा झाला. त्यानें लौकरच राजसूय यज्ञाचा संकल्प करून यज्ञाला आरंभ केला. या यज्ञामध्यें श्रीहरीनें दिलेल्या वराप्रमाणें अत्यंत अवघड असलेलें होत्याचें काम प्रत्यक्ष अत्रिमहर्षींनींच केलेलें आहे. भृगुमहर्षींनीं अध्वर्यूचें काम केलें. उद्गात्याचें काम प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंच केलें आणि भगवान् विष्णु हे हे स्वतःच त्या यज्ञकर्मांत ब्रह्मा बनले. याप्रमाणें होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा हे चार ऋत्विज् या यज्ञकर्माची सांगता करीत होते. सनक-सनंदनादि तत्त्ववेत्ते या यज्ञांतील सदस्य होते. यावरून या यज्ञसमारंभाचें महत्त्व लक्षांत घेतां येतें. त्यांतहि अत्रिमुनींचें सर्वोच्च स्थान लक्षांत घेतलें म्हणजे यज्ञयागादि कर्मांमध्येंहि अत्रिमुनींचा केवढा मान होता हें सहज लक्षांत येतें. मत्स्यपुराणांत याचें खुलासेवार वर्णन केलेलें आहे. कृष्ण-यजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेमध्येंहि अत्रिमुनींच्या सामर्थ्याचें व स्वभावाचें बहारदार वर्णन केलेलें आहे. " अत्रिरददादौर्वाय प्रजां पुत्रकामाय। स रिरिञ्चानो ऽ मन्यत। निर्वीर्यः शिथिलो यातयामः। स एतं चतूरात्रम-पश्यत्। तमाहरत्। तेनायजत। तेनायजत "

और्व नांवाचा एक राजा होता. त्याला मूलबाळ नसल्यामुळें तो अत्यंत दुःखी होता. अत्रिमुनींना तो शरण गेला, जसा दशरथ वशिष्ठाला. अत्रींना त्याची दया आली. त्यांनीं आपलें तपःसामर्थ्य खर्च करून त्याचें दुःख दूर केलें. पुत्रप्राप्तीला प्रतिबंधक असलेलें प्रारब्ध कर्म दूर सारून त्याला पुत्र दिला. पुत्रप्राप्तीनें और्व अत्यंत आनंदी झाला. अत्रिऋषींना मात्र आपलें तपःसामर्थ्य कमी झाल्याची प्रतीति येऊं लागली. आपण दुबळें बनत चाललों आहों. आपल्या सामर्थ्यांत शिथिलता येत चालली असून आपण यातयामा म्हणजे शिळ्या पदार्थाप्रमाणें असार होत चाललों आहोंत असें वाटूं लागलें. आपलें कमी झालेलें पुण्य आपण पुन्हां मिळवावें व पूर्ववत् तेजस्वी आणि समर्थ बनावें असा त्यांनीं विचार केला. या कामीं चतूरात्र नांवाचा याग आपल्याला उपयोगाला येईल हें त्यांनीं शोधून काढलें. त्या यागाला लागणारी सर्व सामग्री त्यांनीं संपादन केली. अधिकारी ऋत्विजांचें साहाय्य घेऊन त्यांनीं त्या सामग्रीनें तो यज्ञ पूर्ण केला. यज्ञकर्मानें ते पूर्ववत् सामर्थ्य-संपन्न झाले ! यज्ञानें काय सिद्ध होत नाहीं ? " यज्ञो वै विष्णुः " यज्ञ साक्षात्परमात्मा आहे. अत्रिमुनींना तिळमात्रहि सामर्थ्याची उणीव सहन झाली नाहीं. त्यांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली व गेलेलें सामर्थ्य पुन्हां प्राप्त करून घेतलें.

अत्रिमुनींचें यज्ञकर्मांतील वर्चस्व त्या वेळच्या पुरोहितवर्गाला सहन होत नव्हतें. स्वभावच तो पुरोहितांचा. " ब्राह्मणो ब्राह्मणं दृष्ट्वा श्वानवद्गुर्गुरायते "

कुत्र्याप्रमाणें एकमेकांच्या अंगावर गुरगुरणें अथवा वसकन् धांवणें हाच स्वभाव बहुधा अजूनहि पुरोहितवर्गांत पाहावयास सांपडतोच. अत्रिकुलांतील लोकांना दक्षिणा देण्यास दिरंगाई अथवा टाळाटाळहि केली जात असे. हें अत्रिमहर्षींच्या लक्षांत येतांच त्याचा त्यांनीं चांगलाच बंदोबस्त केला. एकदां पुष्कळ दिवस सूर्यच दिसेनासा झाला ! जिकडे तिकडे अंधारच अंधार ! सूर्योदयाच्या अभावीं यज्ञयागादि क्रिया थांबल्या. देवांना हविर्द्रव्य मिळेना. उपाशी राहण्याची पाळी आली. पुढें अत्रिमुनींनींच या सर्व गोष्टींचा शोध लावून देवांना संकटांतून मुक्त केलें ! देव प्रसन्न झाले. ते अत्रीस म्हणाले, 'तुम्ही पाहिजे तो वर मागून घ्या.' तेव्हां अत्रि म्हणाले, 'माझ्या कुलांतील लोकांना यज्ञामध्यें दक्षिणा देण्याच्या बाबतींत दिरंगाई केली जाते. तेव्हां कोणत्याहि यज्ञामध्यें प्रथम अत्रिकुलांतील लोकांनाच दक्षिणा दिली जावी.' देवांनी तथास्तु म्हटलें आणि तेव्हांपासूनच कोणत्याहि यज्ञामध्यें प्रथम अत्रिगोत्रांतल्या ब्राह्मणालाच दक्षिणा देण्याची प्रथा पडली. ती अद्यापीहि क्वचित् ठिकाणीं प्रचलित असल्याचें पाहावयास सांपडतें ! पहा गोपथ ब्राह्मण पूर्वभाग २।१७ "दक्षिणीया मे प्रजा स्यादिति, तस्मादात्रेयाय यज्ञे प्रथमा दक्षिणा दीयन्त इति" याप्रमाणें अथर्ववेदांतहि अत्रिमुनींचा महिमा मुक्त कंठानें गायिलेला आढळतो.

ऋग्वेदांतील पर्जन्यसूक्ताचे व अथर्ववेदांतील वृष्टिसूक्ताचेहि द्रष्टे अत्रिमुनीच असल्याचें दिसून येतें. अनावृष्टीच्या काळांत पाऊस कसा पाडावा, अतिवृष्टि कशी टाळावी, आपल्या इच्छेप्रमाणें जेथें पाऊस पाहिजे असेल तेथें तो कसा पाडावा ? वाऱ्यांना अनुकूल गति कशी द्यावी, शेतांमध्यें पिकें भरघोस कशीं काढावींत, या सर्व गोष्टींचे शोध अत्रिमहर्षींनीं लावले असल्याचें त्यांच्या पर्जन्यसूक्तावरून व वृष्टिसूक्तावरून स्पष्ट दिसून येतें. संशोधनाच्या प्रयोगानंतर घडून आलेल्या परिस्थितीचें अत्रिमुनी वर्णन करीत आहेत. "प्रवाता वान्ति पतयन्ति विद्युतः !" पहा ! वारे अनुकूल वाहूं लागले आहेत. चोहोंकडे विजा लवत आहेत. आकाशांतून वृष्टि होत आहे. औषधी वनस्पति प्रफुल्लित झाल्या आहेत. पृथ्वी आतां सर्वांचें पोषण करण्याला समर्थ झाली आहे. या सर्व वर्णनांतील क्रियापदें प्रार्थनात्मक नसून तीं वस्तुस्थितीचें वर्णन करणारीं आहेत हें या ठिकाणीं वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें. पहा ऋग्वेद ५।८३।४. आमचे प्रयोग यशस्वी झालेले आहेत. आतां या प्रयोगानीं "आपः पृथिवीं तर्पयन्तु" विपुल वृष्टीनें पृथ्वी तृप्त होवो. पावसाच्या धारा पृथ्वीला पुष्ट करोत. "जायन्तामोषधयो विश्वरूपाः" अनेक प्रकारचीं पिकें आतां मुबलक पिकोत. पहा अथर्ववेद (४।१५।१,२) असा हा अत्रिमुनींचा पर्जन्य-संशोधनाच्या क्षेत्रांतील प्रभाव होता. !

## गुणग्राहक अत्रि

"सब दिन होत न एक समान" जीवनांतील सर्व दिवस सारखे असूं शकत नाहींत. अत्रिमहर्षींनाहि आपल्या जीवनांत दारिद्र्याला तोंड द्यावें लागलेंच होतें.

दारिद्र्यानें गांजले, पण ते मनानें कधीं रंजले नाहींत. कधीं उद्विग्न अथवा उदासीन झाले नाहींत. एकदां तर मुलावाळांच्या निर्वाहाचीहि त्यांना चिंता वाटूं लागली. त्या वेळीं महासती श्री अनसूयादेवी अत्रिमहर्षींना नम्रपणें म्हणाली, अहो! आपण दारिद्र्याची चिंता कां करतां? सुदैवानें ईश्वरावतारस्वरूप पृथुराजा हा आपल्याच वंशांत जन्माला आलेला आहे. आपण त्याला एकदां भेटावें. आपल्या सर्व दारिद्र्याचा परिहार होईल, अत्रींसारख्या परम विरक्त तत्त्ववेत्त्याला आपल्या पत्नीचा हा सल्ला रुचला नाहीं. तत्त्ववेत्ते लोक वाटेल त्या हाल-अपेष्टा पत्करतील, पण निर्वाहासाठीं कोणाकडे जाऊन तोंड वेंगाडणें कधींहि पत्करणार नाहींत. सुदामदेवालाहि त्याच्या पत्नीनें दारिद्र्याच्या परिहाराकरितां द्वारकेमध्यें जाऊन श्रीकृष्णाला भेटण्याचा सल्ला दिला होता. तो सुदामदेवाला रुचला नाहीं. परंतु या निमित्तानें तरी द्वारकाधीश श्रीकृष्णप्रभूंचें आपल्याला दर्शन घडेल. सर्व वैभवानें संपन्न असलेल्या आपल्या बाल-मित्राला एकदां तरी नेत्रभरून आपण पाहूं या. अशा अभिप्रायानें सुदामदेव द्वारकेस जाऊन श्रीकृष्णप्रभूंची भेट घेण्यास प्रवृत्त झाले. त्याचप्रमाणें अत्रिमहर्षिदेखील पृथु-राजाची भेट घेण्यास तयार झाले. पृथुराजाच्या रूपानें आपल्याच वंशांत जन्माला येऊन प्रत्यक्ष परमात्माच अत्रिवंशधर बनला आहे. तर मग आपण बाळाला अवश्य जाऊन भेटावें. बाळाच्या रूपानें प्रत्यक्ष परमेश्वराचेंच दर्शन आहे तें. असें म्हणून अत्रिमहर्षि हे पृथुराजाकडे जावयास निघाले. पुत्ररूपानें प्रत्यक्ष परमात्माच गुरुदेव दत्तात्रेय बनला तर प्र-प्र-प्रपौत्रादिरूपानें पृथुराजाचें रूप धारण करून परमेश्वरानें आपल्या वंशाला विभूषित केलें आहे याची जाणीव अत्रिमहर्षींना असल्यामुळें ते दारिद्र्याला तिळ-मात्रहि डगमगले नाहींत. असेल त्या परिस्थितींत ते नेहमीं संतुष्ट असत. "जब आवत संतोषधन सब धन धूलि समान" संतोषरूपी धन हातीं लागल्यानंतर त्यापुढें बाकीच्या सर्व संपत्ति मातीमोल ठरतात. अत्रिमुनींचीहि अशीच स्थिति होती.

अत्रिमहर्षि हे पृथुराजाकडे आले. पृथुराजानें सामोरे जाऊन त्यांचें स्वागत केलें. त्यांना उच्च आसनावर बसवून त्यांचा यथोचित सत्कार केला. पृथुराजाचें वैभव, गुणवत्ता, नम्रता, प्रजावात्सल्य, दया, गुणग्राहकता, सुशीलता, सदाचारसंपन्नता, तारुण्यसुलभ सौंदर्य, कर्तव्यतत्परता, विद्याविवेक व निरहंकारता इत्यादि असाधारण गुण पाहून अत्रिमहर्षींना अत्यंत संतोष झाला. त्यांनीं पृथुराजाला आशीर्वाद दिले. हा प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार आहे असें लक्षांत घेऊन पृथुराजाची स्तुतीहि केली. अत्रिमुनींनीं पृथुराजाची केलेली स्तुति गौतममुनींना रुचली नाहीं. ते म्हणाले, "पृथुराजा हा यःकश्चित् मानव. तुमच्यासारख्या निःस्पृह तत्त्ववेत्त्यानें मानवाची स्तुति करणें हें योग्य नव्हे." या वेळीं आम्हांला वामन पंडिताची एक उक्ति आठवते.

"स्तुती करावी परमेश्वराची। करूं नये व्यर्थ कधीं नराची ॥
स्तुतीस कीं, ईश्वर पात्र होतो। तसा तिला मानव काय होतो?" ॥

यांप्रमाणें अत्रिमुनि व गौतममुनि यांचा वादविवाद चालला असतांना त्या सभेंत अकस्मात् सनक, सनन्दन, सनातन आणि सनत्कुमार हे चार विरक्त तत्त्ववेत्ते येऊन पोहोंचले. त्यांचें सर्वांनीं स्वागत केलें. त्यांनीं विवादाचा विषय समजावून घेतला आणि सर्वानुमतें मध्यस्थाची भूमिका स्वीकारून आपला निर्णय प्रकट केला. सनकसनन्दनादिकांनी अत्रिमहर्षींचें मुक्त कंठानें समर्थन केलें आहे. ते म्हणाले,

अत्रिमुनींनीं पृथुराजाचें जें स्तवन केलेलें आहे तें कांहीं प्रलोभनाच्या आहारीं जाऊन केलेलें नाहीं. पृथुराजाच्या अंगचे ईश्वरीय गुण लक्षांत घेऊनच त्यांनीं पृथुराजाची स्तुति केलेली आहे. गुणांची स्तुति आहे ती. मानवाची नव्हे.

" बालोऽपि नावमन्तव्यो । मनुष्य इति भूमिपः ।।
महती देवता ह्येषा । नररूपेण तिष्ठति ।।
यमूर्ध्वमिद्धा तिष्ठन्तं । सर्वेऽधस्तादुपासते ।।
स ईश्वरांशो विज्ञेयो । नेश्वरादन्य इष्यते ।।
हस्तपादादिसाम्येऽपि । येनांशेन स शास्ति नॄन् ।।
तेनांशेनेश्वरो राजाऽभ्यर्हणीयतमो नृणाम् ।।

राजा हा वयानें लहान आहे किंवा तो मानव आहे असें म्हणून त्याचा अवमान करणें हें योग्य नाहीं. यथार्थ राजगुणांनीं संपन्न असलेला राजा म्हणजे प्रत्यक्ष विष्णूच या भूतलावर नररूपानें नांदत असतो. आपल्या अंगच्या लोकोत्तर कल्याणकारक गुणांनीं जो सर्वश्रेष्ठ होऊन विराजत असतो व सर्वजण त्याच्या मानानें आपल्याला न्यून मानीत असतात, त्याच्या पुढें आपल्याला असमर्थ समजून नम्रभावानें राहतात तो ईश्वराचा अंश आहे असें समजावें; तोच स्तुतीला पात्र ठरतो. सज्जन ईश्वराला सोडून दुसऱ्या कोणाचीहि स्तुति करीत नसतात. राजाचे व सामान्य मानवाचे हातपाय इत्यादि अवयव सारखे असले तरी ज्या अंशानें राजा सर्व जनांचें संरक्षण करतो, भरण-पोषण करतो, त्याच अंशानें तो ईश्वर आहे असें समजावें. त्याच अंशानें तो सर्व लोकांना आदरणीय असतो. याच अभिप्रायानें पृथुराजाच्या अंगचे लोक-कल्याणकारक असाधारण गुण लक्षांत घेऊन अत्रिमहर्षींनीं पृथुराजाची स्तुति केलेली असल्यामुळें ती राजाची स्तुति नसून ईश्वराचीच स्तुति ठरते. त्यांत अत्रिमहर्षींचा कांहीं दोष नसून त्यांच्या अंगची गुणग्राहकताच प्रतीतीला येत आहे. पृथुराजाच्या यज्ञमंडपांत अत्रिऋषींचा " सर्वयज्ञप्रयोगवित् " असें विशेषण देऊन सर्व विद्वानांनीं मोठा गौरव केला. पृथुराजानेंहि पण अत्रिमुनींचा आश्रम धनधान्यांनीं समृद्ध केला.

आपल्या जवळचा पैसा उद्योग-व्यापारांत न गुंतवितां अथवा परोपकार किंवा दानधर्म न करतां जे लोक निरर्थक त्याचा संचय करून ठेवतात त्यांच्याबद्दल अत्रींना फार राग येत असे. ते देवाची प्रार्थना करीत असत. " विसर्माणं कृणुहि वित्तमेषां ये भुंजते अपृणन्तः " देवा ! जे लोक दानधर्माच्या रूपानें अथवा परोपकाराच्या निमित्तानें आपल्या जवळ असलेल्या पैशाचा विनियोग करीत नाहींत, केवळ व्यर्थ

संचय करून ठेवतात, त्यांच्या त्या पैशाला पाय फुटूं दे. तें धन चोरांचें न होतां सर्वांचें होऊं दे. दीनदुबळ्यांसाठी या संचित धनाचा उपयोग होऊं दे.

धर्मशास्त्रांतहि अत्रिमुनींची एक विशिष्ट परंपरा होती ही गोष्ट अत्रिसंहिता, अत्रिस्मृति इत्यादि ग्रंथांतील सिद्धान्तांवरून लक्षांत येतें. आयुर्वेदाच्या संशोधनांत व विकासांतहि अत्रिमुनींचा हातभार मोठाच होता. आत्रेय शब्दाचा आयुर्वेदांत गौरवानें उल्लेख होत असतो. या सर्व गोष्टींवरून अत्रिमहर्षींचें लोकोत्तर वैशिष्टच लक्षांत येतें. याच अत्रिवंशांत देव-नहुषाचाहि जन्म झाला असल्याचें सांगितलें जातें. नहुष हा आयुराजाचा पुत्र. आयु हा सोमवंशांतील एक राजा. पुरुरव्याचा पुत्र. सोम हा अत्रिमुनींचाच पुत्र असल्यामुळें नहुषाला अत्रिवंशधर असें म्हटलें आहे. नहुष हा मोठा पराक्रमी होता. तो आपल्या पराक्रमानें इंद्रपदावर आरूढ झाला. त्याला भगवान् सद्गुरु श्रीदत्तात्रेय यांच्या अनुग्रहाचें पाठबळ होतें. अहंकारानें तो पुढें अधोगतीला गेला ही गोष्ट निराळी. पण सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कृपेनें नहुष जेव्हां इंद्रपदावर आरूढ झाला तेव्हां त्याला लोक देव-नहुष असें म्हणूं लागले.

अत्रिमहर्षि हे मेरुपर्वताजवळ तपश्चर्या करीत आहेत असें कळतांच देव-नहुष हा अत्रिमुनींच्या दर्शनासाठीं मेरुपर्वताच्या परिसरांत गेला. अत्रिमुनींचा त्या ठिकाणीं त्यानें पुष्कळ शोध केला पण त्याला अत्रिमुनि भेटले नाहींत व त्याला अत्रिमुनींचा आश्रमहि सांपडला नाही. पण हा परिसर अत्रिऋषींच्या तपश्चर्येचें स्थान आहे हें लक्षांत घेऊन त्यानें त्या ठिकाणीं एक नगरी वसविली. या नगरीला देव-नहुषपुरी असें नांव दिलें. याच नगरीला यवन लोक दि ओन्यसिवोपोलिस असें म्हणूं लागले. या नगरीचा संस्थापक देव-नहुष हा "दि ओन्यसि उस्" या नांवानें ओळखला जाऊं लागला.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, अहो ! त्या वेळीं यवन होते कोठें ? यवनच नव्हते तर मग यवन लोकांचा वरील व्यवहार हा कसा उपपन्न होणार ? यावर उत्तर असें कीं, यवनसमाज हा फार प्राचीन काळापासून या भूतलावर विद्यमान आहे. मुळामधले यवन हे दुसरे-तिसरे कोणी नसून ते अत्रिकुलोत्पन्न आर्य वैदिकच होत. ही गोष्ट पुराणेतिहासावरूनच सिद्ध होत आहे. अत्रिमहर्षींना अनसूयेव्यतिरिक्त अनेक स्त्रिया होत्या व अनेक पुत्र होते. अत्रिमुनींचा शिष्यादि परिवार व पुत्र-पौत्रादि परिवारहि फार मोठा होता. अत्रिऋषींच्या अनेक पुत्रांमध्ये तुळशींत भांग जशी जन्माला यावी त्याप्रमाणें शांखायन नांवाचाहि एक पुत्र जन्माला आला होता. हा अत्यंत बुद्धिमान् होता, पण दुर्दैवानें त्याची बुद्धिमत्ता भलत्या मार्गाला लागली. तो अत्यंत व्रात्य निघाला. सत्संस्कारांचें नियंत्रण त्यानें पार झुगारून टाकलें. शिष्टाचार सोडला. स्नानसंध्या, गायत्रीजप वगैरे ब्रह्मकर्म धुळीस मिळविलें. वाटेल तसा बडबडत सुटला. "वाग्दुष्टः, सावित्रीभ्रष्टः, संस्कारहीनः" अशा सर्व विशेषणांना

तो पात्र बनला. तो वाऱ्यासारखा सैरावैरा धांवत सुटावयाचा. त्याच्या याच कृतीमुळें त्याला जवन हें नांव पडलें. वेगानें धांवणें या अर्थाच्या जु धातूपासून जवन शब्द निष्पन्न झाला आहे. जवन शब्दाचेंच लाक्षणिक रूप यवन असें बनलें. शांखायन हा स्वतः तर संस्कारहीन व्रात्य बनलाच पण आपल्या बरोबर त्यानें आपल्या परिवारांतील अनेकांना व्रात्य बनविलें. ते सर्वच आज येथें तर उद्यां तेथें अशा रीतीनें या भू-तलावर स्वैरपणें भटकूं लागले. वैदिक धर्माला सोडून देऊन पृथ्वीच्या पाठीवर यथेच्छ स्वैरसंचार करणाऱ्या या लोकांना ऋषिमुनींनीं बहिष्कृत करून टाकलें. या समाजांत स्वच्छंदपणें स्वैरसंचार करण्याची व वाटेल तसें वागण्याची मुभा असल्यामुळें अनेक लोक येऊन मिसळूं लागले. वर्णसंकराला या समाजांत जणूं कांहीं एक प्रकारचें मानाचें स्थान मिळालें ! वर्णसंकराला या समाजांत स्थायिभाव प्राप्त झाला. याहि अभिप्रायानें या समाजाला यवन हें नांव प्राप्त झालें. यु धातूचा अर्थ मिश्रित होणें, संकरित होणें असाहि आहे. हाच समाज पुढें म्लेच्छ या नांवानें ओळखला जाऊं लागला. "ते आत्मधर्मपरित्यागान्म्लेच्छत्वं ययुरिति बौधायनः" स्वतःचा धर्म सोडल्यामुळें व विधिनिषेधाची तमा न बाळगतां यथेच्छ स्वैर वर्तन करीत राहिल्यामुळें या समाजांतील लोकांना म्लेच्छ असें नांव पडलें. जो गोमांस भक्षण करतो; धर्म, वेद, ईश्वर व आर्यसंस्कृति यांच्या विरुद्ध बहु बडबड करतो व धर्माचाराचा त्यागहि करतो त्याला म्लेच्छ असें म्हटलें जातें. अशी म्लेच्छ शब्दाची व्याख्या प्रायश्चित्ततत्त्वामध्यें केलेली आहे. "गोमांसखादको यश्च विरुद्धं बहु भाषते। धर्माचारविहीनश्च म्लेच्छ इत्यभिधीयते ॥" म्लेच्छति म्लेच्छयति इति वा म्लेच्छः अशी म्लेच्छ शब्दाची व्युत्पत्ति आहे. वरील श्लोकांत अभिप्रेत असलेला अर्थच "म्लेच्छ्" या धातूनें सांगितला जातो. तात्पर्य जो स्वतः सदाचारापासून भ्रष्ट होतो आणि दुसऱ्यालाहि आचारभ्रष्ट बनवितो त्याला म्लेच्छ असें म्हणतात. म्लेच्छ आणि व्रात्य या सर्वांचा यवन या शब्दाच्या अर्थांत अंतर्भाव होतो. पण पुढें यवन शब्दाच्या अर्थाचा संकोच होऊन यवन हा शब्द विशिष्ट जातीचा वाचक बनला.

सोमवंशांतील सुप्रसिद्ध राजा ययाति याला दोन बायका होत्या. एकीचें नांव देवयानी व दुसरीचें नांव शर्मिष्ठा. देवयानीला ययातीपासून यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र झाले व शर्मिष्ठेपासून अनु, द्रुह्यु आणि पूरु असे तीन पुत्र जन्माला आले. यदु, तुर्वसु, अनु आणि द्रुह्यु हे चारहि ययातीचे पुत्र पित्याची आज्ञा झुगारून वागूं लागले. स्वाभाविकच ययातीला त्यांचा राग आला. ययातीनें यदूला शाप दिला. तुझ्या वंशांत जे जन्माला येतील ते चक्रवर्ती राजे होऊं शकणार नाहींत. तुर्वसूला शाप दिला कीं तुझ्या वंशांत जे जन्माला येतील ते यवन होतील. अनु आणि द्रुह्यु यांना असा शाप मिळाला कीं तुमच्या वंशांत जे जन्माला येतील ते सर्व म्लेच्छ होतील. अशा रीतीनें यदु आणि पुरु यांव्यतिरिक्त इतर पुत्रांच्या वंशांत जन्माला आलेले ते

सर्व यवन आणि म्लेच्छ बनले. ते वेदबाह्य बनले. अशा रीतीनें यवनसमाज हा वृद्धिगत झाला. त्यांतच सगरराजानें युद्धामध्यें पराभूत केलेले वरेचसे क्षत्रिय देशांतून बाहेर घालविले गेले. त्यांचा वेष विकृत केला गेला. कांहींच्या दाढ्या ठेवल्या तर डोक्यांचें मुंडण केलें. त्यांचे स्वाध्यायवषट्कारांचे अधिकारहि काढून घेतले. याप्रमाणें धर्मभ्रष्ट झालेले हे लोक त्या वेळच्या ब्राह्मणांकडूनहि उपेक्षिले गेले. "ते च ब्राह्मणैः आत्मधर्मपरित्यागात् परित्यक्ताः म्लेच्छतां ययुः" अशा अर्थाचीं वर्णनें विष्णु-पुराण, मत्स्य-पुराण, भागवत-पुराण इत्यादि पुराणांतून आढळतात. तात्पर्य- अशा अनेक लोकांची यवनसमाजांत भर पडली व हा समाज फार मोठा बनला. एकंदर विचार करतां यवन, म्लेच्छ आदि समाजाचें मूळ अत्रींचे पुत्र शांखायन असल्याचें पहावयास सांपडतें. याप्रमाणें यवनांचा अत्रिकुलाशीं निकटचा संबंध असल्यामुळें अत्रिमुनि हे यवनांना देवाप्रमाणें पूज्य वाटत असल्याचें सांगितलें जातें. अधिक जिज्ञासू लोकांसाठीं अत्रिख्याति या निबंधांतील उतारा खालीं दिला जात आहे. "अत्रेः पुत्रस्य शाङ्खायनस्य म्लेच्छप्रायतायाः पौराणिकैरुक्तत्वात् तद्वंशधरा एवैते यवनाः स्युः। अत एवैषां यवनानामप्ययमत्रिः पूज्यदेवेषु परिगणित आसीदिति केचिदाहुः" या उताऱ्याचा अर्थ वरील विवेचनांत आलाच आहे.

हेच यवन प्रथम ग्रीस व आशियामायनर देशांत स्थिरावले. तेव्हां ते तेथील भाषेंत आयोनियन् या शब्दानें ओळखले जाऊं लागले. तुर्वसूच्या वंशांतील लोक पुढें तुरुष्क अथवा तुर्क या नांवानें ओळखले जाऊं लागले असावेत. भारताच्या वायव्य प्रदेशांत पुरुरव्यानें वसविलेल्या प्रतिष्ठान या शहरांत व त्याच्या सभोंवतालच्या प्रदेशांत राहणारे लोकच पुढें पठाण या नांवानें ओळखले जाऊं लागले असेंहि कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. ते प्रतिष्ठान या शब्दांतूनच पठाण-पख्तून इत्यादि शब्दांची व्युत्पत्ति मानतात. सगरानें पराभूत केलेले व वैदिक संस्कृतींतून बहिष्कृत झालेले हे आर्यवंशीय लोकच अनार्य बनले व तेच पुढें भारताच्या प्रत्यंत भागांत गेले. तेच लोक पश्चिम आणि वायव्य भागांत यवन, तुरुष्क, तुर्क, पठाण इत्यादि शब्दांनीं ओळखले जाऊं लागले. जे लोक ईशान्य आणि पूर्व दिशेकडे गेले ते जावा, सुमात्रा, बाली, इंडोनेशिया इत्यादि प्रदेशांत वसती करून राहिले. हे सारे यवनच होते.

हे सारे यवन सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना अत्यंत जवळचे होते. यवनांचा मूळ पुरुष शांखायन हा तर गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा सावत्र बंधूच होता. ययाति हा सोमवंशांतला राजा होता व सोम हा तर गुरुदेव श्रीदत्तात्रेय यांचा सख्खाच बंधु होता. अशी ही वस्तुस्थिति असल्यामुळें सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना आपल्याच वंशांत जन्माला आलेल्या (यवन, म्लेच्छ, हे स्वभावतः व्रात्य असले तरी हिरण्यकशिपूच्या पोटीं प्रल्हाद अथवा गारेच्या पोटीं हिरे जन्माला यावेत त्याप्रमाणें त्यांच्यांतहि सत्प्रवृत्त आणि सद्‌गुणी लोक जन्माला येतातच.) या म्लेच्छयवनांचा व्यावहारिक दृष्टीनें उद्धार व्हावा असें वाटणें स्वाभाविक

आहे. भगवान् श्रीदत्तात्रेय हा ईश्वराचा अवतार आहे. सर्व विश्वाच्या कल्याणासाठीं घेतलेल्या या अवताराला गुरु असें म्हणतात. सद्‌गुरूंचें अंतःकरण हें आईच्या अंतःकरणापेक्षांहि अधिक प्रेमळ असतें. आई ही बाळाला एकाच जन्मांत प्राप्त होणाऱ्या संकटांच्या जालांतून सोडविण्याचा यथाशक्ति प्रयत्न करीत असते तर सद्‌गुरु हे जीवाचें अज्ञान घालवून त्याला जन्मोजन्मींच्या संकटांतून मुक्त करीत असतात. कोणत्याहि निमित्तानें कां होईना पण सत्संस्कारांना पराङ्मुख झालेल्या, वैदिक संस्कृतीला मुकलेल्या व स्वधर्माला अंतरलेल्या आणि म्हणूनच उत्तरोत्तर अधोगतीला लागलेल्या याहि समाजाचा पारमार्थिक दृष्टचा उद्धार व्हावा म्हणून दत्तरूपानें अवतरलेल्या सद्‌गुरु माउलीचें अंतःकरण तळमळत असणें हें स्वाभाविक आहे. याच तळमळींतून म्लेच्छयवनांचाहि उद्धार व्हावा म्हणून त्यांना अनुगृहीत करण्यासाठीं सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे कित्येक वेळां मलंग वेशानें प्रकट होतात. म्लेच्छ वेशानेंहि दर्शन देतात अशी त्यांची ख्याति आहे. ज्याला जें प्रिय वाटेल त्याला त्या रूपानें दर्शन देऊन अनुगृहीत करणें, त्याला कृतार्थ करणें हा दयाळू दत्तात्रेयांचा स्वभावच आहे.

पुष्कळ वेळेला लोक असें विचारतात कीं, दत्तात्रेयांना मुसलमानांचा वेश कां आवडतो ? ते फकिराच्या अथवा मलंगाच्या रुपानें कां प्रगट होतात ? ते म्लेच्छ रूपानें कां दर्शन देतात ? या सर्व प्रश्नांच्या उत्तरांचें प्रतिबिंब वरील इतिहासांत स्पष्ट उमटलेलें पाहावयास सांपडतें. सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे म्लेच्छांना मलंगाच्या रूपानें, सदाचारसंपन्न शुचिर्भूतांना ऋषिमुनींच्या रूपानें, सिद्धांच्या समाजांत सिद्धराजाच्या रुपानें तर योग्यांच्या मेळाव्यांत ते योगिराजाच्या रुपानें अवतरून दर्शन देतात व आपल्या दर्शनानें त्यांना पावन करतात हा त्यांचा स्वभावच आहे. “मौने मौनी गुणिषु गुणवान् पंडितः पंडितेषु” ज्यांना जें आवडेल त्यांच्यामध्यें त्या रूपानें वावरणें हा जीवन्मुक्त अवधूतांचा स्वभावच असतो. मग जीवन्मुक्तांचेहि आदर्श गुरु असलेल्या दत्तात्रेयांच्या बाबतींत अधिक काय सांगावें ? ते यवनांच्या उद्धारासाठीं यवन बनतात तर म्लेच्छांच्या उद्धारासाठीं म्लेच्छहि बनतात. तात्पर्य ज्याच्या अंतरीं जसा भाव असेल तसा त्याला देव दिसतो असेंच प्रत्ययाला येते.

शांखायनासारखा व्रात्य पुत्र आपल्या पोटीं जन्माला आला याबद्दल अत्रिमुनींना फार खेद वाटत होता. सर्व विश्वाचें कल्याण करणारा, समर्थ व अविरत कार्यकर्ता असा अलौकिक पुत्र आपल्या पोटीं जन्माला यावा असें त्यांना वाटूं लागलें. एक ना धड अशा भाराभर चिंध्या काय उपयोगाच्या ? अत्रींना पुष्कळ पुत्र होते तथापि आपल्या अपेक्षेप्रमाणें जनतेचें कार्य करणारा असा पुत्र त्यांत त्यांना आढळला नाहीं. “एक गुणीना दुर्गुणी बेटे शंभर कशाला ?” या हरिकवीच्या वचनाप्रमाणें अत्रिमुनींच्या मनाची अवस्था झाली. त्यांचें जीवन स्वभावतःच तपस्वी होतें तथापि उत्तम पुत्राच्या प्राप्तीसाठीं त्यांनीं खडतर तपश्चर्या करण्याचा संकल्प केला.

## अत्रिऋषींच्या तपश्चर्येचें स्थान

सूर्याची प्रभा जशी सूर्याला सोडून रहात नाहीं अथवा रत्नांची कांति जशी रत्नाला सोडून रहात नाहीं त्याप्रमाणें महासती देवी श्री अनसूया ही अत्रिमुनींना सोडून कधीं दूर रहात नसे. अत्रिमुनींच्या मनाची रुखरुख ही अनसूयेच्या लक्षांत आली. उभयतां प्रथम ब्रह्मदेवांना शरण गेले. त्यांनीं आपल्या मनांतील वेदना ब्रह्मदेवांना निवेदन केल्या. साऱ्या विश्वाचें कल्याण करणारा, दुःखाच्या सागरांत गटांगळ्या खाणाऱ्या लोकांचा उद्धार करून लोकांना खऱ्या सुखाचा मार्ग दाखविणारा, व हें कार्य सतत यावच्चंद्रदिवाकरौ करीत राहणारा विश्वगुरु असा पुत्र आपल्या पोटीं जन्माला यावा अशी त्यांची तळमळ होती. ब्रह्मदेवानें त्यांचें गाऱ्हाणें ऐकलें व त्यांना तपश्चर्या करण्याचा आदेश दिला.

"आदिष्टो ब्रह्मणा पूर्वमत्रिः सर्गविधौ पुरा।
अनुत्तमं नाम तपः सृष्टचर्थं तप्तवान् प्रभुः।। ११।।

— मत्स्यपुराण २३।२

फार पूर्वीची गोष्ट आहे. सृष्टीचा आरंभकाल होता तो. अत्रिमुनींचा अभिप्राय लक्षांत घेऊन ब्रह्मदेवानें त्यांना प्रथम असा आदेश केला कीं, तुम्हांला उत्तम, सद्‌गुणी व लोककल्याणकर्ता असा चिरायु पुत्र प्राप्त व्हावा अशी इच्छा आहे ना? तर मग तुम्ही अनुत्तम नांवाचें तप करा. श्रेष्ठ तपश्चर्या हेंच श्रेष्ठ यशाचें उत्तम साधन होय. ब्रह्मदेवाचा हा आदेश ऐकून अत्रिमहर्षि हे अनुत्तम या नांवाचें अत्युत्तम तप करण्याला प्रवृत्त झाले.

महासती अनसूयादेवी ही महापतिव्रता होती. पतीच्या व्रताला अनुसरून आपणहि त्या व्रताच्या पूर्तीसाठीं निरंतर प्रयत्न करावेत अशा संकल्पानें जी स्त्री प्रेरित होते व नित्य पतिसमवेत राहून एकनिष्ठेनें पतीची सेवा करते त्या स्त्रीला पतिव्रता असें म्हणतात. प्रसंगविशेषीं स्वतःचे प्राण पणास लावूनहि जी स्त्री आपल्या पतीचे प्राण वांचविते व पतिसेवेंत तत्पर राहते तिला पतिव्रता असें म्हणतात. कोणत्याहि निमित्तानें जिचें मन क्षणभरहि आपल्या पतीपासून विचलित होत नाहीं तिला पतिव्रता असें म्हणतात. पतीच्या आज्ञेप्रमाणें वागून जी स्त्री आपल्या पतीला नेहमीं संतोषवीत असते तिला पतिव्रता असें म्हणतात. आपल्या अपकृत्यांनीं जी स्त्री आपल्या पतीला तिळमात्रहि दुखवीत नाहीं तिला पतिव्रता असें म्हणतात. पतिराजांची स्वारी कितीहि आपल्या मनाविरुद्ध वागली तरी जी स्त्री पतिराजांना गोड शब्दांनींच अनुकूल करून घेते तिला पतिव्रता असें म्हणतात. पतिदेव उन्मार्गगामी झाले तर न डगमगतां जी स्त्री आपल्या मधुर अनुनयाने पतीला सन्मार्गगामी बनविते तिला पतिव्रता असें म्हणतात. जी स्त्री सर्वस्वीं पतीला अनुकूल होऊन वागते, कधींहि प्रत्युत्तर देत नाहीं, अपमान करीत नाहीं, पतीचा अपराध करीत नाहीं त्या स्त्रीला पति-

व्रता असें म्हणतात. जी स्त्री पति बाहेरून आल्याबरोबर पतीचें प्रसन्न अंतःकरणानें स्वागत करते, गोड शब्द बोलून ताजे, रुचिकर व मधुर पदार्थ खावयास देते, पतीला मानवेल असें स्वच्छ थंडगार पाणी प्यावयास देते, मनोभावें पतीची सेवाशुश्रूषा करते, पतीच्या भोजनानंतर आपण भोजन करते, पतीचें चरणोदक तीर्थ मानून सेवन करते आणि पतीचें उच्छिष्ट प्रसाद समजून प्रसन्न चित्तानें ग्रहण करते तिला पतिव्रता असें म्हणतात. जी स्त्री पतिसमक्ष उच्च आसनावर बसत नाहीं, पतीची सेवा करीतच पतीला झोंपविते व पति जागृत होण्याच्या आंत स्वतः जागे होऊन पुन्हां पतिसेवेंत तत्पर राहते तिला पतिव्रता असें म्हणतात. जी स्त्री आपली अभिरुचि बाजूला ठेवून पतीच्या अभिरुचीप्रमाणें वागते, पतीची अभिरुचि शास्त्र, शिष्टाचार, नीति आणि मानवता यांना सोडून असेल तर आपल्या सद्वर्तणुकीनें, गोड शब्दानें, अकृत्रिम प्रेमानें व मधुर अभिनयानें पतीचें मन वळवून पतीच्या अभिरुचीमध्यें अनुकूल बदल घडवून आणते व पतीला सत्प्रवृत्त करते तिला पतिव्रता असें म्हणतात. जी स्त्री पति दूर परगांवीं गेले असतां मिष्टान्न सेवन करीत नाहीं, सौभाग्यालंकाराव्यतिरिक्त इतर अलंकार धारण करीत नाहीं, नूतन वस्त्र परिधान करीत नाहीं, हास्यविनोद करीत नाहीं, पतिवांचून एक क्षणहि जिला युगासारखा मोठा वाटतो आणि पतिसांन्निध्यांत मोठा कालहि जिला एका क्षणासारखा चटकन् निघून गेलासें वाटतें, जिचें सारें लक्ष निरपेक्ष वृत्तीनें आपल्या पतीकडेच लागलेलें असतें तिला पतिव्रता असें म्हणतात. पति हाच जिचा देव असतो, पतीची आज्ञा हेंच जिचें शास्त्र असतें आणि पतीची तत्परतेनें सेवा करणें हेंच जिचें कर्तव्य असतें तिलाच पतिव्रता असें म्हणतात. दोन दिव्यांच्या ज्योति एकत्र झाल्या असतां त्या जशा एकरुप होतात किंवा दोन नद्यांचे प्रवाह एकत्र झाले असतां ते जसे एकरूप होतात त्याचप्रमाणें जिच्या अंतःकरणाची वृत्ति आपल्या पतिराजाच्या अंतःकरणवृत्तीशीं समरस होऊन जाते तिला पतिव्रता असें म्हणतात. किंबहुना पतीच्या जीवनाव्यतिरिक्त जिच्या जीवनाचें निराळें अस्तित्व उरतच नाहीं तीच खरी पतिव्रता होय. अशा पतिव्रता स्त्रियांमध्ये तरतम भावानें जी सर्वश्रेष्ठ असते तिलाच महापतिव्रता असें म्हणतात. जिचा पतिनिष्ठेपासून कधींहि बुद्धिभेद होत नाहीं तीच स्त्री पतिव्रता होय. "स्त्री आणि पुरुष हे दोघेहि सारखींच आहेत", "समान बुद्धि समान दर्जा, समान हक्क" इत्यादि शब्दजाल जिच्या अंतःकरणांत व्यामोह निर्माण करीत नाहीं तीच खरी पतिव्रता होय. महासती देवी श्रीअनसूया ही पुराणेतिहासांवरुन सर्वश्रेष्ठ पतिव्रता असल्याचें दिसून येतें. म्हणूनच तिला महापतिव्रता असें म्हटलें आहे. काळ कितीहि बदलला तरी जीं तत्त्वें कधींहि बदलत नाहींत त्याच तत्त्वांना अबाधित तत्त्वें असें म्हणतात. पातिव्रत्याचें तत्त्वहि एक असेंच अबाधित तत्त्व आहे. ज्या स्त्रीनें आपल्या जीवनांत या तत्त्वाचा पुरस्कार केला आपलें जीवन याच तत्त्वाच्या परिपालनांत व्यतीत केलें त्या स्त्रीचें जीवन हें योग-बलानें सिद्ध

झालेल्या एखाद्या महान् योगिराजाच्या जीवनाप्रमाणें पवित्र आणि सर्वसमर्थ असें बनलेलें असतें. पातिव्रत्याच्या तपानें सिद्ध झालेली पतिव्रता ही पंचमहाभूतांनाच काय पण पंचमहाभूतांच्या अधिष्ठात्री देवतांनाहि आपल्या अधीन ठेवीत असते. प्रसंगविशेषीं इंद्र, चंद्र, वरुण, कुबेर, अग्नि, वायु आणि सूर्य इत्यादि देवतांवरहि पतिव्रतांचें नियंत्रण असल्याचें पाहावयास सांपडतें. प्रतिष्ठान अर्थात् पैठण या क्षेत्रांत अति प्राचीन कालीं वास्तव्य करीत असलेल्या सुमति नांवाच्या पतिव्रतेची गोष्ट आम्हीं योग्य संदर्भांत पुढें वाचकांना सादर करणारच आहोंत. त्याहीपेक्षां कितीतरी अलीकडच्या काळांतील एक गोष्ट येथे आम्ही उदाहरण म्हणून वाचकांच्या पुढें ठेवीत आहोंत. कालिदास आणि राजा भोज यांच्या वेळची गोष्ट आहे ही.

एकदां भोजराजा आपल्याविषयीं प्रजाजनांचें मत काय आहे, आपल्या राज्यव्यवस्थेविषयीं लोक काय बोलतात व आपलें अंतर्गत संरक्षणखातें व्यवस्थित काम करीत आहे कीं नाहीं, इत्यादि गोष्टी अजमावण्याकरितां रात्रीच्या वेळीं वेष पालटून गुप्तपणें फिरूं लागला. फिरतां फिरतां त्यानें एका घराची खिडकी उघडी असलेली पाहिली. त्यानें आंत डोकाविलें तों एक स्त्री एका पुरुषाचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन बसलेली आहे. त्या पुरुषाला गाढ झोंप लागलेली आहे. ती स्त्री त्याची झोंप सुखानें पूर्ण व्हावी म्हणून पंख्यानें वारा घालीत आहे, मध्येंच अग्निकुंड असून त्यांतील अग्नि प्रज्वलित झालेला आहे, त्या कुंडाच्या जवळच असलेल्या अंथरुणावर एक मूल आई आई म्हणून रडत आहे. परम पतिव्रता असलेली ती स्त्री आपल्या पतीचा निद्राभंग होऊं नये म्हणून मांडी न हालवितांच त्या मुलाला गप्प बसण्याचें सुचवीत आहे. पण तें मूल आईच्या इशाऱ्याकडे दुर्लक्ष करून वेगानें आईकडे धांव घेत आहे. ही सर्व परिस्थिति पाहून भोजराजा मनांत म्हणाला, 'आतां हें मूल या अग्निकुंडांत पडणार आणि मरणार ! ' तोंच तें मूल त्या अग्निकुंडांत पडलेंहि. त्या मुलाची आई तिळमात्रहि घाबरली नाहीं. तिनें आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावानें कुंडांतील अग्निनारायणांच्या औष्ण्यशक्तीचा प्रतिबंध केलेला होता ! राजाला हें कसें कळणार ? त्या मुलाचें प्राण वांचविण्यासाठीं राजा ओरडणार तोंच त्या पुरुषाची झोंप पूर्ण झाली व तो जागा झाला. उठला, आईनें व बापानें त्या मुलाला कुंडांतून वर काढलें ! झाडलें, पुसलें ! मूल आनंदांत असल्याचें राजानें पाहिलें. राजाची खात्री झाली कीं ही स्त्री महान् पतिव्रता असली पाहिजे व हा ब्राह्मणहि तसाच पवित्र, तपस्वी आणि सदाचारसंपन्न असला पाहिजे. त्रैलोक्यालाहि मी एका क्षणांत भस्म करून टाकीन अशी प्रतिज्ञा करणारा अग्नि ईश्वराच्या प्रभावानें हतबल झाल्यानंतर एक वाळलेली गवताची काडीहि जाळूं शकला नाहीं. (केनोपनिषद) प्रल्हादाला जाळून मारावें म्हणून हिरण्यकशिपूनें त्याला अग्नींत टाकलें असतां अग्निनारायण जसें शीतल झाले होते त्याचप्रमाणें या पतिव्रतेच्या पातिव्रत्यप्रभावानेंहि आज अग्निनारायण शीतल झाले व हें मूल वांचलें, अशी भोजराजाच्या मनाची खात्री

झाली. त्याला लागलीच एक श्लोकाचा चरण स्फुरला. हा प्रसंग इतिहासांत स्थायी व्हावा अशी त्याची इच्छा होती पण ही घटना त्याला श्लोकांत बसवितां येईना. अखेर त्यानें दरबारांत पंडितांच्या पुढें तो चरण ठेवला.

"हुताशनश्चन्दनपङ्कशीतलः" हाच तो चरण होता. सर्व पंडित एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. कोणालाहि कांहीं सुचेना, पण शहरांत घडलेली ही घटना कालिदासाच्या कानावर आलेली होती. कालिदासानें चटकन उत्तर दिलें!

"सुतं पतन्तं प्रसमीक्ष्य पावके न बोधयामास पतिं पतिव्रता।
पतिव्रताशापभयेन पीडितो हुताशनश्चन्दनपङ्कशीतल:।।"

आपलें मूल धगधगणाऱ्या अग्निकुंडांत पडत आहे हें पाहुनहि पतीची झोंपमोड होऊं नये म्हणून एका पतिव्रतेनें आपल्या पतीला जागे केलें नाहीं पण अग्निनारायण मात्र त्या पतिव्रतेच्या शापाच्या भयानें घाबरून चंदनाच्या उटीप्रमाणें अगदीं शीतल झाला!! असा हा पातिव्रत्याचा महिमा आहे. सती अनसूयाही एक या तत्त्वाचें चालतेंबोलतें अधिष्ठान असल्यामुळें स्त्री-जीवनांत तिचा महिमा मोठा अगाध आहे.

अत्रिमहर्षि जेव्हां उत्तम पुत्राच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करण्यास प्रवृत्त झाले तेव्हां महासती श्रीअनसूयादेवीही त्यांच्या पाठोपाठ तपश्चर्या करण्यासाठीं निघाली. ही गोष्ट अगदीं स्वाभाविक आहे. देवताराधन अथवा मंत्राराधन या रूपानें आपला पति तपश्चर्या करीत असतांना आपण पातिव्रत्ययोगानें पतीची सेवाशुश्रूषा करीत राहणें हीच पतिव्रतेची तपश्चर्या होय. या तपश्चर्येनें पतिव्रता आपल्या पतीच्या तपश्चर्येचें सामर्थ्य द्विगुणित करीत असते. एरवी स्त्रीचें सांनिध्य तपश्चर्येच्या वेळीं हितावह नसलें तरी अशा पतिव्रता स्त्रीचें सांनिध्य तपश्चर्येला बाधक होत नाहीं; याच अभिप्रायानें अत्रिमुनींनीं अनसूयेलाहि आपल्या बरोबर घेतलें.

## अत्रिऋषींच्या तपश्चर्येची स्थानें

आतां आपण अत्रिमुनींच्या तपश्चर्येचीं स्थानें पाहूं. ब्रह्मदेवांच्या आज्ञेप्रमाणें अत्रिमुनींनीं सद्‌गुरु श्री सनत्सुजातानंद यांच्याकडे जाऊन मंत्रोपासनेची दीक्षा घेतली. उपासनेंतील मंत्र सिद्ध करण्यासाठीं तपश्चर्या व पुरश्चरणें करावीं लागतात. परम पतिव्रता महासती श्रीअनसूयादेवी यांना बरोबर घेऊन अत्रिमुनि तपश्चर्येसाठीं निघाले. अत्रिमुनींनीं कोठें तपश्चर्या केली असावी आणि त्यांचें आश्रमस्थान कोठें असावें, हा एक मोठा संशोधनाचा विषय आहे. पुरातन वाङमयामध्यें अनेक ठिकाणीं अत्रिमुनींचे आश्रम असल्याचे उल्लेख पहावयास सांपडतात. त्यामुळें सामान्य वाचकांचें मन गोंधळतें. हा उल्लेख खरा का तो उल्लेख खरा? एक खरा मानला तर दुसरा चुकीचा कशावरून व दुसरा खरा मानला तर पहिला चुकीचा कशावरून? असे मनांत प्रश्न उभे रहातात.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, अत्रिऋषींचें मूलस्थान ब्रह्मलोक अथवा सत्यलोक आहे. पण तो काळ सृष्टीचा आरंभकाळ असल्यामुळें सृष्टीच्या विस्तारासाठीं व विकासासाठीं अत्रिमुनींना ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें लोककल्याणाकरितां मृत्युलोकामध्ये यावें लागलें. मृत्युलोकामध्यें आल्यानंतर अत्रिमहर्षींनीं भूपृष्ठावरील महत्त्वाचीं व मुख्य मुख्य अशीं अनेक स्थानें पाहिलीं असणें स्वाभाविक आहे. अत्रिऋषींच्या बरोबर अनेक ऋषींचें आगमन या भूलोकावर झालेलें आहे. त्या सर्व ऋषींनीं भारत हेंच आपलें कार्यक्षेत्र निवडलें. हवामानाच्या व निसर्गाच्या दृष्टीनें इतर सर्व स्थानें सोपद्रव होतीं व भारत हाच एक निरुपद्रव असल्यामुळें तोच सर्व ऋषिमुनींचें कार्यक्षेत्र बनला. याच अभिप्रायानें भारत हा देश कर्मभूमि म्हणून मानला गेला व इतर सर्व प्रदेश भोगभूमि म्हणून गणले गेले.

अत्रिमहर्षींनीं भारत हें आपलें कार्यक्षेत्र म्हणून निश्चित केल्यानंतर भारतांतील कांहीं ठिकाणीं तपश्चर्येच्या निमित्तानें त्यांनीं वास्तव्य केलें व तेथे आश्रमांचीहि स्थापना केली ही वस्तुस्थिति असणें स्वाभाविक आहे. याच अभिप्रायानें अत्रिऋषींनीं जेथें जेथें तपश्चर्या केल्याचें वर्णन आढळेल अथवा त्यांचा आश्रम असल्याचा उल्लेख आढळेल ते सर्व सत्यच आहेत असें म्हणावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं. अत्रिमुनींच्या तपश्चर्येचें एक स्थान पश्चिमेकडील हिमालयाच्या भागांत वायव्य सरहद्दीच्या अलीकडे, पश्चिम पंजाबच्यावर, जम्मू-काश्मीरच्या परिसरांत असावें असें पौराणिक वाङमयेतिहासांतील वर्णनावरून दिसतें. दुसरें स्थान हिमालयाच्या मध्य भागांत गंगोत्तरीच्या मार्गावर मार्ग सोडून सात-आठ मैल बाजूस असावेंसें वाटतें. त्या भागांतील पर्वत-शिखरें अद्यापि अत्रिमुनींचें आश्रमस्थान म्हणून रूढ परंपरेनें ओळखलीं जातात. अत्रिमुनींचें तपश्चर्येचें व आश्रमाचें स्थान म्हणून ऋक्ष पर्वताचा उल्लेख केला जातो. हा ऋक्षपर्वत सप्तकुलाचलांपैकी एक असून याचें स्थान विंध्य पर्वताच्या व सातपुडयाच्या दक्षिणपूर्व भागाकडे असल्याचें सांगतात. वाल्मीकीरामायणावरून अत्रिमुनींचा आश्रम आणि पुष्कळ काळपर्यंतचें वास्तव्य चित्रकूट पर्वतावर असल्याचें दिसून येतें. सह्य पर्वताच्या माहुर गडाजवळ असलेल्या पर्वत-शिखरांवरहि अत्रिमुनींचें कांहीं काळ वास्तव्य असावें असें दिसतें. रैवतक पर्वत म्हणजे हल्लीचा जुनागड जवळ असलेला गिरनार पर्वत. हाहि अत्रिमुनींच्या तपश्चर्येचें व आश्रमाचें स्थान बनलेला होता अशीहि इतिहासाची ग्वाही आहे. अविरत वाहणारा अथवा कधीं न आटणारा निर्मल जलाशय, घनदाट जंगल आणि रमणीय पर्वतशिखर असेंच तपश्चर्येसाठीं स्थान निवडलें जात असें. तेथेंच जवळपास आश्रमाची योजना होऊन पर्णकुटी बांधली जात असे. तेथेंच गृह्याग्नि व गृहदेवता यांचें वास्तव्यहि होत असे. जवळपास इतर साधक आणि शिष्यगण यांचेंहि वास्तव्य होत असें. साधक साधनेमध्यें आणि शिष्यगण अध्ययन-अध्यापनामध्यें गुंतलेले असत. नैसर्गिक कंद, फळें, मुळें आणि तृणधान्यें यांच्यावर निर्वाह होत असे. याबरोबरच दुभत्यासाठीं

गोधनाचीहि आश्रमामध्यें व्यवस्था होत असे. "गोकामा एव वयम्" हें याज्ञवल्क्य महर्षींचें बृहदारण्यकांतील वचन प्रसिद्धच आहे. वस्त्रप्रावरणांच्या गरजा वल्कलांनीं भागविल्या जात असत. असा हा प्राचीन काळीं ऋषिमुनींच्या आश्रमाचा थाट असे.

अत्रिमुनींनीं आपल्या तपश्चर्येसाठीं निवडलेलीं स्थानें हीं अशींच रमणीय असणें हें स्वाभाविक आहे. अत्रिऋषींचें सर्वांत जुनें तपश्चर्येचें स्थान राजा पुरुरवा यानें शोधून काढलें व तेथें त्यानेंहि तपश्चर्या करून आपले मनोरथ पूर्ण करून घेतले याचें रम्य वर्णन मत्स्य पुराणांत आढळतें. पुरुरवा हा एक अत्रिगोत्रांतलाच राजा होता. यानें पूर्वजन्मांत केव्हां तरी व्रतोपवासाच्या दिवशीं अंगाला तेल लावून स्नान केलें. असें करणें हें शास्त्रसंमत नसल्यामुळें पुरुरव्याला त्याचा दोष लागला व तो पुढच्या जन्मीं जन्मजात कुरूप बनला. लोक त्याचा उपहास करूं लागले. तो राजपुत्र खरा पण कोणी त्याला मुलगीहि देईना. त्यांतल्या त्यांत एखाद्या उपवर वधूच्या पित्यानें आपली मुलगी द्यावयाचें ठरविलें तरी ती मुलगी त्यास वरीना ! स्वाभाविकच आहे. "कन्या वरयते रूपम् ।" आपण कुरूप आहों याची पुरुरव्याला खंत वाटूं लागली. शेवटीं तो तपश्चर्येच्या उद्देशानें बाहेर पडला. अत्रिऋषींच्या तपोभूमीचा महिमा त्याच्या कानीं आलेला होता. जेथें अत्रिऋषींनीं तपश्चर्या करून आपले मनोरथ पूर्ण करून घेतले तेथेंच आपणहि तपश्चर्या करावी असें त्याच्या मनांत आलें व तो त्या स्थानाचा शोध करीत निघाला. सापत्न मातेच्या वाग्बाणांनीं विद्ध होऊन श्रीहरीच्या आराधनेकरितां राजधानीच्या बाहेर पडलेल्या ध्रुव बालकाला मार्गदर्शन करण्याकरितां जसे नारदमुनि भेटावेत त्याचप्रमाणें पुरुरव्याला ऋषिकुलावतंस सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे अकस्मात् भेटले. त्यांनीं पुरुरव्याला मंत्रदीक्षा देऊन अनुगृहीत केलें व मार्गदर्शनहि केलें. जिनें संसार निर्माण केला ती योगमाया आदिशक्ति हीच संसारांतून पार करणार. तिच्यावांचून दुसरें कोण आहे ? राजा ! आपल्याला रूप नाहीं म्हणून खिन्न कां होतोस ? जा त्या जगन्मातेला शरण. म्हण "शरण्ये त्र्यम्बके गौरि नारायणि नमोऽस्तु ते" या मंत्रांत त्र्यंबके, गौरि आणि नारायणी या तिन्ही शब्दांनीं क्रमशः महाकाली, महासरस्वती आणि महालक्ष्मी या तिन्ही शक्तिदेवता विवक्षित आहेत. या तिन्ही शक्तींचें मूळपीठ असलेली योगमाया आदिशक्ति तिलाच तूं शरण जा. तुला काय उत्तम रूप पाहिजे आहे ना ? माग तिला मागणें. म्हण "रूपं देहि ।" आपल्याला सर्वत्र जय मिळावा असें तुला वाटतें ना ? तर मग कर तिची प्रार्थना. म्हण "जयं देहि" तुला आपली कीर्ति व्हावी असें वाटतें काय ? तर मग कर तिची विनंती. म्हण "यशो देहि" आणखी काय तुला पाहिजे ? आपल्या सर्वबाह्यशत्रूंचा व अन्तः शत्रूंचाहि नाशव्हावा असें वाटतें ना ? तर मग परित्राणपरायणा अशा त्या आदिशक्तीलाच शरण जा आणि म्हण "द्विषो जहि" तुझे सर्व शत्रु नाहींसे होतील. तुला उत्तम पत्नी पाहिजे आहे ना ? तर मग जा त्या जगन्मातेला शरण. कर तिची प्रार्थना "पत्नीं मनोरमां देहि मनोवृत्तानुसारिणीम् ।

तारिणीं दुर्गसंसारसागरस्य कुलोद्भवाम्" याप्रमाणे अनुग्रहमूर्ति दत्तात्रेयांचा उपदेश झाल्याबरोबर पुरुरव्याने गुरुदेवांना साष्टांग नमस्कार घातला. नम्रपणें हात जोडून कृतज्ञता व्यक्त करीत दत्तगुरुंनीं दाखविलेल्या मार्गानें तो अत्रिऋषींच्या तपश्चर्येचें स्थान शोधीत निघाला.

ऐरावती सरिच्छ्रेष्ठा यस्मा-द्देशाद्विनिर्गता ।
तच्चाश्रमपदं पुण्यं बभूवात्रेः पुरा नृप ।।

दत्तात्रेयांनीं पुरुरव्याला अत्रिमुनींच्या आश्रमाचा मार्गहि सांगितला होता व आश्रमाच्या स्थानाचें वर्णनहि करून सांगितलें होतें. त्या अनुषंगानें राजा शोध करीत निघाला. ऐरावती नदी जी आज रावी या नांवानें ओळखली जाते. हिची पवित्र तीर्थांत गणना केलेली आहे. या नदीचा उगम ज्या प्रदेशांत होतो तोच प्रदेश अत्रिऋषींनीं आपल्या आश्रमस्थानासाठी निवडला होता. तेथेंच त्यांनीं प्रथम आपला आश्रम स्थापिला आणि आपल्या दिव्य तपश्चर्येनें त्या आश्रमस्थानाला पुनीत केलें. तें आश्रम-स्थान अत्रिऋषींच्या तपश्चर्येने पावन बनलें. आज हें स्थान समुद्रसपाटीपासून सुमारें अठरा हजार पांचशें छप्पन्न फूट उंचावर असल्याचें सांगितलें जातें. तो राजा ज्या प्रदेशांतून चालला होता तो प्रदेश ऐरावतीप्रमाणेंच परुष्णी, विपाशा, शतद्रु आणि सरस्वती याहि नद्यांनीं विभूषित केलेला होता. तेथील सृष्टिसौंदर्य अवर्णनीय होतें. गंगा ज्याप्रमाणें आपल्या कांठी राहणाऱ्या लोकांना व पशु, पक्षी, वृक्ष आणि लतावेली यांना तृप्त करते, एवढेंच नव्हे तर पुष्ट आणि संतुष्टहि करते त्याचप्रमाणें ऐरावती अथवा इरावती म्हणजे रावी, विपाशा म्हणजे बियास, शतद्रु म्हणजे सतलज, परुष्णी ही कदाचित् आजची चिनाब असेल, आणि सरस्वती, जिच्या कांठीं ऋषिजनांची सत्रें सतत चालत होतीं. अशा या सुप्रसिद्ध पांच नद्या आपापल्या कांठचा प्रदेश समृद्ध करीत होत्या. त्या प्रदेशांत पशु स्वच्छंदपणें वागडत होते. पक्षी आनंदानें गात होते. सर्वांच्या मुखांवर प्रसन्नता झळकत होती. अशीं हीं दृश्यें पाहात पाहात त्या प्रदेशातून पुरूरवा एक एक पर्वत मागें टाकीत हळूहळू पुढें चालला. राजा जसाजसा रावीच्या कांठानें वर जाऊं लागला तशी त्याची प्रादेशिक उंचीहि वाढूं लागली. लोकसमुदाय विरळ होत चालला. जिकडे पहावें तिकडे घनदाट अरण्यें दिसूं लागलीं. माणूस एकहि दिसेना. तथापि दत्तगुरुंनी दाखविलेल्या दिशे-प्रमाणें तो धैर्यानें मार्ग आक्रमूं लागला. निर्जन अरण्यांतला तो प्रवास, मन कितीहि खंबीर असले तरी अन्तःकरणांत भय हें मधून मधून डोकावीत होतेंच. "दत्तात्रेय हरे कृष्ण उन्मत्तानन्ददायक । दिगम्बर मुने बाल पिशाच ज्ञानसागर" या सर्वभय-हारक दशनामी दत्तात्रेयमंत्राचा मनांतल्या मनांत सारखा जप करीत तो चालला होता. ऐरावती नदीचा तो कांठ किती रमणीय वाटला त्याला ! ती ऐरावती, क्वचित् इरावती नांवानेहि तिचा उल्लेख आढळतो. कशी दिसली त्याला ? पहा—

" सितहंसावलिच्छन्नां काशचामररंजिताम् ।
साभिषिक्तामिव स तां पश्यन् प्रीतिं परांययौ ।।"

जणूं कांहीं एखादी राज्याभिषेक झालेली पट्टाभिषिक्त महाराणी असावी असाच तिचा थाट होता ! ज्याप्रमाणें एखाद्या महाराणीच्या मस्तकावर श्वेतच्छत्र विराजत असावें त्याप्रमाणें ती इरावती नदी पांढऱ्याशुभ्र हंसांच्या मालिकांनीं आच्छादित झालेली होती. तिच्या प्रवाहावर दाटीवाटीनें विहार करीत असलेले ते हंसपक्षी मस्तकावर धारण केलेल्या चांदीच्या छत्राप्रमाणें दिसत होते. छत्राच्या जोडीला चामरेंहि असावीं लागतात. प्रकृतस्थलीं इरावतीच्या तीरावर दोन्ही बाजूंनीं विकसित झालेल्या कास-कुसुमांचे गुच्छ चामराप्रमाणेंच शोभत असल्यामुळें इरावती महाराणीचा थाट कांहीं आगळाच दिसत होता ! जणूं कांहीं नुकताच तिला राज्याभिषेक झाला आहे असें वाटत होतें.

इरावतीच्या कांठाकांठानें तो पुरुरवा पुढें चालला असतां त्याला उंच उंच व विशाल वृक्ष दिसूं लागले. पुरातन कालांतील ऋषि-मुनींप्रमाणें त्यांनीं या एकान्त स्थलीं जणूं कांहीं दीर्घकालापासून तपश्चर्याच सुरू केली असावी असें वाटत होतें. शाल (सर्जवृक्ष) ताल-तमाल, न्यग्रोध म्हणजे वड आणि श्यामल म्हणजे औदुंबर वृक्ष त्याचप्रमाणें अश्वत्थ म्हणजे पिंपळ, शिरीष, शाल्मली, शिंशपा आणि कर्णिकार म्हणजे बाहवा इत्यादि अनेक वृक्षांची गर्दी होती. श्वेतचंदन, रक्तचंदन, कालागरु वृक्ष, गगनचुंबी सरल देवदार, निंब, कदंब, आम्र, पनस, आक्रोड त्याचप्रमाणें खिरणीचीं झाडें, नारळ, सुपारी, बदाम, पिस्ते, खजूर, तसेंच पेरू, डाळिंब, महाळुंग आणि चकोत्रे त्याचप्रमाणें करंज, इंगुदीवृक्ष (हिंगणबेट) बिल्व, कपित्थ म्हणजे कवठ, जांभूळ, बोर, बकुळ, चांफा, धावडा, खैर आणि अशोक इत्यादि अनेक जातींचे वृक्ष त्याला तेथें आढळले. जाई, जुई, शेवंती, पाटल म्हणजे गुलाब आणि मल्लिका म्हणजे मोगरा इत्यादि अनेक पुष्पक्षुपांचे व लतांचे ताटवेच्या ताटवे मधून मधून दृष्टीस पडत होते. त्यांचा सभोंवार दरवळणारा सुगंध सर्वश्रमांचा परिहार करीत होता. विविध प्रकारच्या लता-वेलीहि फलभारांनीं समृद्ध होऊन वृक्षांच्या आश्रयानें विलसत होत्या. कंद, फळें आणि मुळें यांची अपार समृद्धि होती !

वाघ, सिंह, हत्ती, तरस, लांडगे आणि अस्वलें त्याचप्रमाणें गेंडे, गवय, बैल, गायी, वासरें व वनगायी तसेंच वराह, हरिणे, ससे इत्यादि अनेक श्वापदें व जनावरेंहि स्वच्छंदपणें त्या अरण्यांतून संचार करीत होतीं. मयूर, कोकिळा, भारद्वाज, शुक, सारिका इत्यादि अनेक पक्ष्यांचे कलरव अर्थात् मधुरध्वनीहि कानांवर येत असत. हें सर्व पाहून अन्तकरणांत भय, विस्मय, आनंद आणि प्रेम अशा विविध वृत्तींचा एकाच वेळीं मोठा विचित्र संगम होत असे. यांतील बरेचसे प्राणी परस्परविरुद्ध स्वभावाचे असूनहि त्या ठिकाणीं ते आपला निसर्गसिद्ध वैरभाव सोडून वागत असल्याचें त्याला

दिसून आलें. अत्रि आणि अनसूया यांच्या अहिंसाव्रताचाच तो प्रभाव असावा असा त्यानें तर्क केला. "अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः" अहिंसाव्रत सिद्ध झाल्यानंतर त्याच्या सांनिध्यांत वैरभाव मावळतो हा पातंजल-दर्शनांतील सिद्धान्त त्याला तेथें दृग्गोचर होऊं लागला. येथून अत्रिऋषींचा आश्रम आणि तपश्चर्येचें स्थान जवळच असलें पाहिजे अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तो उत्साहानें पुढें चालूं लागला.

राजा आतां हिमगिरीच्या वऱ्याच उंच प्रदेशावर येऊन पोहोंचला होता. एका बाजूनें खोल दरींतून वाहणारा तो इरावतीचा हिमप्रवाह दुधाप्रमाणें शुभ्र व पिंजलेल्या कापसाप्रमाणें स्वच्छ द्रुतगतीनें गर्जना करीत वाहत होता. त्याची ती अपूर्व शोभा गंगोत्तरीपासून धो धो वाहणाऱ्या गंगाप्रवाहाच्या शोभेलाहि मागें टाकीत होती. दुसऱ्या बाजूला व पुढें समोर उंच उंच गिरिशिखरें विराजत होतीं. तीं बर्फानें आच्छादित असल्यामुळें जणूं कांहीं चांदीचे मुकुटच त्यांनीं आपल्या मस्तकांवर धारण केले आहेत असें वाटत होतें. सप्तरंगी इंद्रधनुष्यानें तर जणूं कांहीं त्या मुकुटां-वर जडविलेली ती विविध रत्नांची राजिकाच होय असा भास होत होता. ढगाच्या झरोक्यांतून मधून मधून सूर्यनारायण आपल्या करांनीं त्या गिरिशिखरांवर अरुण वस्त्राचें आच्छादन घालीत आहे कीं काय असें वाटत होतें. हें अपूर्व सृष्टिसौंदर्य दृष्टीस पडलें कीं राजा प्रवासाचे परिश्रम पार विसरत होता. क्षणभर विश्रांति घेतली कीं तो पुन्हां उत्साहानें पुढची चढण चढूं लागत असे. त्याला आतां समोर तीन शिखरें दिसूं लागलीं जणूं कांहीं प्रत्यक्ष ब्रह्मा, विष्णु आणि महेश अथवा अत्रि-पुत्र त्रिमूर्ति भगवान् श्रीदत्तात्रेय यांचीं तीं प्रतीकेंच उभीं होतीं असें त्याला वाटलें. दत्तात्रेयांनीं सांगितलेल्या सर्व खाणाखुणा लक्षांत आल्यानंतर हेंच तें अत्रिमुनींच्या आश्रमाचें स्थान असा त्यानें निर्णय घेतला. त्या वेळीं त्याला जो आनंद झाला तो लेखणीनें लिहितां येत नाहीं व शब्दांनीं वर्णिलाहि जाऊं शकत नाहीं.

त्या आश्रमस्थानाच्या भोंवतालच्या दऱ्या बर्फानें भरलेल्या होत्या. सामान्य-मानवाला त्या ठिकाणीं पोहोंचणें अशक्यच होतें. केवळ त्या स्थानाशीं परिचित असलेल्या तपस्वी लोकांच्या तुरळक संचारानें उमटलेल्या अस्पष्ट डोंगराळ पायवाटा मात्र दृग्गोचर होत होत्या. पूर्वजन्मार्जित पुण्यप्रभावानेंच तो पुरुरवा राजा मोठ्या कष्टानें तेथें पोहोंचू शकला ! हाच भाव पुढील दोन श्लोकांत मत्स्य-पुराणात वर्णिला आहे.

"तदाश्रमं समन्ताच्च हिमसंरुद्धकन्दरैः ।
शैलवाटैः परिवृतमगम्यं मनुजैः सदा ।।
पूर्वाराधितभावो ऽसौ महाराजः पुरुरवाः ।
तदाश्रमपदं प्राप्तो देवदेवप्रसादतः ।।"

अ. ११८ श्लोक ७४, ७५

अत्रिऋषींच्या आश्रमस्थानीं येऊन पोहोंचल्यानंतर राजा पुरुरवा यानें त्यांचें प्रत्यक्ष तपश्चर्यास्थानहि शोधून काढलें. मागें सांगितलेल्या तीन शिखरांपैकीं सर्वांत उंच व प्रशस्त दिसणारें मधलें शिखर चढून तो वर गेला तेव्हां त्याला त्या शिखरावर एक प्रशस्त पठार दिसलें. त्या पठारावर एक सरोवर होतें. त्याचा परीघ सुमारें सहा-साडेसहा मैलांचा असून व्यास दोन मैलांचा होता. जणूं कांहीं मानससरोवराचें नातवंडच तें! त्याचें पाणी मानससरोवराप्रमाणें अत्यंत स्वच्छ होतें. सतरा अठरा हजार फूट उंचावर असलेल्या या सरोवरांतलें पाणी स्वाभाविकपणें दोन-तीन महिने सोडून नेहमीं गोठलेलेंच असावयास पाहिजे ही गोष्ट खरी, पण अत्रिऋषींच्या तपश्चर्येच्या प्रभावामुळें येथील पाणी गोठत नसे.

" हिमपातो न तत्रास्ति समन्तात्पंच योजनम् ।
उपत्यकासु शैलस्य शिखरे ऽ पि तथैव च "

त्या शिखराच्या पांच योजन परिसरांत बर्फाची वृष्टि होत नसे. एवढेंच काय पण त्या सरोवराचें पाणी देखील पिण्याला व स्नानालाहि सुखशीत व सुखोष्ण अशाच स्वरूपाचें होतें. स्नान केलें कीं अंगांतील थंडी जात असे, असें त्याचें वर्णन केलेलें आहे.

" सुखोष्णं चैव तत्तोयं स्नानाच्छीतविनाशनम् "

असा हा अत्रिमहर्षींच्या तपश्चर्येचा प्रभाव होता. तो मद्रदेशाधिपति पुरुरवा यानें प्रत्यक्ष अनुभविला.

राजाला त्या सरोवरांत एक खडकाळ टेकडी दिसली. पोहत पोहत राजानें ती टेकडीहि गांठली. अनेक प्रकारच्या रत्नांची जणूं कांहीं खाणच होती ती! त्या टेकडीच्या माथ्यावर त्याला एक प्रशस्त पुष्करिणी दिसली. तिचें पाणी फारच उत्तम होतें. जें पाणी दांताला झोंबत नाहीं, घशाला दुखवीत नाहीं, प्राशन केलें असतां पोट फुगत नाहीं. अर्थात् वात अथवा गुबारा धरीत नाहीं. मन तृप्त होतें. जीवाला अत्यंत आनंद वाटतो आणि शरीरालाहि जें अत्यंत सुखावह होतें त्याच पाण्याला उत्तम पाणी म्हणतात.

" न क्षिणोति यथा कण्ठं कुक्षिं नापूरयत्यपि ।
तृप्तिं विधत्ते परमां शरीरे च महत्सुखम् ।। "
तद्विद्यादुत्तमं जलम् ।

पुष्करिणींतील तें मधुर व स्वच्छ जल राजानें यथेच्छ प्राशन केलें. थोडा वेळ विश्रांति घेतली आणि तो पुष्करिणीच्या सभोंवार निरीक्षण करूं लागला तोंच त्याला तेथे एक गुहेचें मुख दिसलें. तो आंत शिरला. वैडूर्य रत्नासारख्या सुंदर खडकांत खोदलेली ती प्रशस्त गुहा पाहून त्याला फारच आनंद झाला. हीच ती

गुहा. जेथें अत्रिऋषींनीं पुत्रप्राप्तीकरितां तप केलें. प्रसन्न झालेल्या परमेश्वरानें अत्रिमुनींना इष्ट वर देऊन स्वतःच स्वतःला अर्पण करून घेतले. हीच ती जागा. परमेश्वराच्या कृपेनें आपल्या प्रयत्नाला यश आलें व आपण अत्रिमुनींचा आश्रम व तपश्चर्येचें स्थान शोधून काढलें याबद्दल त्याला जो आनंद झाला त्याची वाचकांनींच कल्पना करावी.

"प्रासादे तत्र भगवान् देवदेवो जनार्दनः ।
भोगिभोगावलीसुप्तः सर्वालंकारभूषितः ।। "

त्या प्रशस्त गुहेंत शेषशायी भगवान् विष्णु यांची सर्वालंकारांनीं नटलेली अशी फारच रमणीय मूर्ति दिसली. ती अत्रिमुनींनीं आपल्या तपोबलानें निर्मिलेली होती असें सांगतात. तें कांहीं असो. त्या मूर्तीचें शिल्प अवर्णनीय होतें यांत शंका नाहीं.

"जान्वा च कुंचितस्त्वेको देवदेवस्य चक्रिणः ।
फणीन्द्रसंनिविष्टोऽङ्घ्रिर्द्वितीयश्च तथा ऽ नघ ।।

लक्ष्म्युत्सङ्गगतोऽङ्घ्रिस्तु शेषभोगप्रशायिनः ।
फणीन्द्रभोग-संन्यस्त-बाहुः केयूरभूषणः ।।

अङ्गुलीपृष्ठविन्यस्त-देवशीर्षधरं भुजम् ।
एकं वै देवदेवस्य द्वितीयं तु प्रसारितम् ।।

समाकुंचित-जानुस्थ-मणिबन्धेन शोभितम् ।
किंचिदाकुंचितं चैव नाभिदेश-करस्थितम् ।।

तृतीयं तु भुजं तस्य, चतुर्थं तु तथा शृणु ।
आत्तसन्तान-कुसुमं घ्राणदेशानुसर्पिणम् ।।

लक्ष्म्या संवाह्यमानाङ्घ्रिःपद्मपत्रनिभैः करैः ।
सन्तानमालामुकुटं हारकेयूरभूषितम् ।।

भूषितंच तथा देवमङ्गदैरङ्गुलीयकैः ।
फणीन्द्रफण-विन्यस्तचारुरत्न शिखोज्ज्वलम् ।।

अज्ञातवस्तुचरितं प्रतिष्ठापितमत्रिणा

— मत्स्य पु. अ. ११९

सहस्रमुख असलेल्या शेषानें आपलें लांबलचक असलेलें शरीर लंबवर्तुळाकार गुंडाळून त्याचा जणूं कांहीं पर्यंकच तयार केला आहे. त्या पर्यंकावर श्रीलक्ष्मीसह भगवान आदि विष्णु विराजमान झालेले आहेत. शेषाच्या कंठप्रदेशीं उसें करून विश्रांतीच्या स्वरूपांत ते थोडेसे आडवे झालेले आहेत. एक पाय आखडता

घेऊन गुडघा वर उभा केलेला आहे. दुसरा पाय शेषाच्या शरीरावर पसरलेला आहे. तो आदिमायास्वरूप श्रीलक्ष्मीदेवीनें आपल्या अंकावर घेतलेला असून ती आपल्या कोमल करांनीं संवाहन अर्थात् चेपणें, रगडणें या रूपानें सेवा करीत आहे. शेषशायी भगवंताचे भुजदंड, केयूर आणि अंगद या बाहुभूषणांनीं सुशोभित झालेले दिसत आहेत. बोटांतील आंगठ्यांमध्यें जडविलेलीं रत्नें आपल्या तेजानें भक्तजनांच्या नेत्रांना दिपवीत आहेत. आदिनारायणाच्या मस्तकावरील तो रत्नखचित मुकुट पहा. त्याच्या तेजानें तर सारें त्रिभुवनच कोंदलें गेलें आहे. मुखकांति अवर्णनीय आहे. मुखकमलाच्या ठिकाणीं कोटिकंदर्पांचें लावण्यच एकवटलेलें आहे. विशाल भालप्रदेशावरील ते कुरळे केश, गालांवर झळकणारें स्मित-हास्य, मकराकृति कुंडलें, कौस्तुभमणि, श्रीवत्सलांछन, वैजयंतीमाला, कटितटीं शोभणारा पीतांबर इत्यादि सर्वच कांहीं त्या मूर्तीमध्यें अलौकिक रूपानें विराजत होतें. एका हाताच्या बोटांचा पृष्ठभाग श्रीहरीच्या मस्तकाखालीं आधार म्हणून शोभत आहे. दुसरा हात पसरलेला असून त्याचें मनगट उभ्या असलेल्या गुडघ्यावर टेकविलेलें आहे. त्या मनगटावर रत्नजडित अलंकार (पोंचा) शोभत आहे. तिसरा हात थोडासा आकुंचित करून, नाभिप्रदेशाकडे वळविलेला आहे व चौथ्या हातांत कल्पद्रुमाचें उमललेलें फूल घेतलेलें असून तो हात नाकाकडे वळविलेला आहे. ज्याच्या वास्तविक स्वरूपाचा व चरित्राचा थांगपत्ताच लागत नाहीं अशी ती श्रीआदिविष्णूची मंगलमय मूर्ति प्रत्यक्ष अत्रिमहर्षींनींच आपल्या तपश्चर्येच्या वेळीं स्थापन केलेली त्या गुहेंत राजानें पाहिली. त्याचें मन प्रसन्न झालें. तेथेंच त्यानें तपश्चर्या केली. श्रीहरीच्या कृपेनें त्याची सर्व कुरूपता नष्ट होऊन त्याला उत्तम रूप प्राप्त झालें. तें इतकें उत्तम होतें कीं, प्रत्यक्ष स्वर्गलोकांतील अप्सराच तें रूप पाहून मोहित झाली व तिनें भूलोकावर येऊन त्या राजास वरिलें. रूपवान् व गुणवान् म्हणून सर्वत्र त्याचा सत्कार झाला. हें सर्व श्रीदत्तात्रेयांच्याच कृपाप्रसादाचें फल होय.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, हें सर्व वर्णन पुराणांतलें असल्यामुळें व पुराणांचा काळ बराच अलीकडचा असल्यामुळें आद्य अत्रिमुनींच्या काळांत अशी श्रीशेषशायी भगवंताची मूर्ति असणें कसें शक्य असेल? पण जरा सूक्ष्म विचार केल्यास या शंकेला अवसर उरत नाहीं. पुराणांची रचना जरी अलीकडच्या काळांतली आहे असें मानलें तरी तेवढ्यावरून पुराणांत वर्णन केलेल्या कथांचा किंवा त्या प्रसंगांतील पदार्थांचा तोच काळ मानावयाला पाहिजे असा नियम नाहीं. अतिप्राचीन काळांतील कथानकांचें अथवा वस्तूंचे वर्णन करण्यासाठीं पुराणकारांनीं पुराण–वाङ्मय निर्माण केलें असणें स्वाभाविक आहे. प्राचीन इतिहास सांगावयाची पौराणिक वाङ्मयाची प्रवृत्ति कोणाहि विचारवंताला अमान्य करतां येणार नाहीं.

विश्वकर्मा ही शिल्पकलेची अतिप्राचीन देवता असल्याचें सर्वमान्य आहे. सर्व शिल्पकारांचा तो देव असल्यामुळे त्याची शिल्पकला अतिप्राचीन व आदर्शभूत असणार हें निर्विवाद होय. शिवाय त्वष्टा, त्वक्षा इत्यादि शिल्पकार या अर्थाचे वाचक असलेले अनेक शब्द आपल्याला ऋग्वेदांत पहावयास सांपडतील. या शब्दांवरून ऋग्वेदाच्या काळांत शिल्पकलाविज्ञान अस्तित्वांत असल्याचें लक्षांत घेतां येतें. "भुवनानि निष्टतक्षुः" इत्यादि वेद-वाक्यांवरून अतिप्राचीन कालींहि शिल्पकला परिणत अवस्थेला पोहोचलेली होती असें दिसतें. अशा स्थितींत अत्रिमहर्षींनींहि आपल्या तपःसामर्थ्यानें तपश्चर्येच्या वेळीं ध्यानासाठीं वर वर्णन केल्याप्रमाणें शेषशायी श्रीविष्णूची मूर्ति निर्माण केली असणें हें कांहीं अशक्य नाहीं. यावर कोणी असें म्हणेल कीं, आज ज्या कांहीं शिल्पकलेंतील मूर्ति उपलब्ध आहेत त्या बुद्धकालांतील अथवा बुद्धोत्तर कालांतीलच असल्याचें आढळून येतें. अतिप्राचीन कालांतील मूर्ति किंवा अवशेष उपलब्ध नाहींत यावरून अतिप्राचीन कालांत शिल्पकला नसावी असें वाटतें; पण हेंहि म्हणणें फारसें बरोबर नाहीं. पृथ्वीच्या पोटांत काय आहे हें कोणीं पाहिलें आहे ? पुरातत्त्ववेत्ते ठिकठिकाणीं उत्खनन करून भूगर्भांतील प्राचीन वस्तूंचा शोध लावीत आहेत. एखाद्या उत्खननांत अतिप्राचीन कालचे शिल्पकलेचे अवशेष अथवा संपूर्ण कलाकृति उपलब्ध होण्याचीहि शक्यता आहे; नाहीं असें कसें म्हणतां येईल ? तात्पर्य, भारतीय शिल्पकला ही अतिप्राचीन असल्यामुळें अत्रिमहर्षींच्या तपश्चर्येच्या ठिकाणीं पुरुरव्यानें पाहिलेली मूर्ति ही काल्पनिक आहे अशी जर कोणी कल्पना करील तर ती कल्पना यथार्थ ठरणार नाहीं. यावर कोणी असें म्हणेल – कीं, संभावनाच करावयाची असेल तर ती वाटेल ती करतां येईल. पण हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. संभावना करावयाची झाली तरी ती शक्य कोटींतलीच करावयाची असते. अशक्य कोटींतील संभावना करणें ही गोष्ट वृथामनोरथाप्रमाणें अशक्य ठरते. क्वचित् हे सर्व नियम बाजूला राहून ईश्वरेच्छेनें अघटित घटनाहि घडून येतात ही गोष्ट निराळी. तात्पर्य, अत्रिमहर्षींच्या तपश्चर्येच्या ठिकाणीं अपूर्व कलाकृतीनें नटलेली श्रीशेषशायी भगवान् विष्णूची मूर्ति असणें ही कांहीं अशक्य गोष्ट नाहीं.

ऐरावतीच्या उगमस्थानीं असलेल्या हिमाचल प्रदेशांतील हा आश्रम हाच
अत्रिमहर्षींचा सर्वांत जुना व पहिला आश्रम असावा, असा तर्क करण्यास बराच
अवसर आहे. मेरु पर्वत, जो आजकाल पामीर पठार या नांवानें ओळखला जातो, तो
देवांचें आश्रयस्थान म्हणून वाङ्मयांत वर्णिला जातो. याच अभिप्रायाने प्राचीन
वाङ्मयामध्यें त्याला 'देवनिकायभूतः' असें विशेषण दिलेलें आढळतें. अत्रिमहर्षि हे
ब्रह्मदेवाचे पुत्र असल्यामुळें देवलोक हेच त्यांचें मूलस्थान, पण भूलोकांतील लोकांच्या
कल्याणाकरितां, ते अंतरिक्षमार्गानें मेरुपर्वतावर आले व तेथून ते भारतीयांच्या
भाग्यानें भारताकडे वळले. कांहीं अंतर तोडून आल्यानंतर त्यांना भूमातेचा मानदंड
असलेला हिमाचल प्रदेश दिसला. आशा रीतीनें ते पामीर पठारावरून हिमाचल

प्रदेशावर आले. त्यांच्या बरोबर नारद, वसिष्ठ, वामदेव, पुलस्त्य, पुलह इत्यादि अनेक ऋषिजन भारतामध्यें आले. त्यांनीं आपआपल्या अभिरुचीप्रमाणें निर-निराळ्या ठिकाणीं आश्रमांची स्थापना करून तपश्चर्या केल्या.

## अत्रिमुनींचा दुसरा आश्रम

अत्रिमुनींचे अनेक ठिकाणीं आश्रम असल्याचें पौराणिक वाङ्मयांत पहावयास सांपडतें. त्यांतील एका आश्रमाची कल्पना आम्हीं वर दिलीच आहे. दुसरा आश्रम, हिमाचल प्रदेशांतील उत्तुंग शिखरावर विराजत असलेल्या तुंगनाथाच्या दर्शनासाठीं जात असतांना मार्गांतच मंडलचट्टी नांवाचें एक मुक्कामाचें स्थान लागतें; या स्थानापासून मुख्य यात्रेच्या मार्गावर बाजूला सुमारें नऊ-दहा मैलांच्या अंतरावर आहे. येथे न रुळलेली अशी एक अस्पष्ट पायवाट दिसते. तेथे रोंवलेल्या—एका जीर्ण व अस्पष्ट अक्षरें असलेल्या लाकडी फलकावरून आम्हांला ही कल्पना आली. "अत्रि-मुनि के आश्रमकी ओर" अशीं अक्षरें त्या फलकावर होतीं. चौकशी अंतीं रहदारी नसलेला हा मार्ग अत्यंत अवघड असून कोणी जाणकार मार्गदर्शक बरोबर असल्या-शिवाय या अस्पष्ट मार्गानें जाणें श्रेयस्कर नाहीं असें कळल्यामुळें आम्हांला या ठिकाणीं जाण्याचें भाग्य लाभलें नाहीं. मीं एकदां रुळलेला मार्ग सोडून अशाच अस्पष्ट मार्गानें जाण्याचा प्रयत्न केला. थोडयाच वेळांत मी घनदाट अरण्यांत प्रवेश करीत आहे असें मला वाटूं लागलें. पायांखालचा अस्पष्ट मार्गहि अधिक अस्पष्ट होत असल्याचें आढळून आलें. तरीहि धैर्य करून मी पुढेंच निघालों तों समोरून एक जटाधारी श्याम-वर्ण तरुण व्यक्ति धांवत येत असल्याचें दिसलें. अंगावर फक्त एक लंगोटी आणि कमरेभोंवतीं छोटेंसें गुंडाळलेलें वस्त्र दिसलें. त्या व्यक्तीनें मला विचारलें, "कहाँ जा रहे हो ?" मीं लागलीच उत्तर दिलें, "जा रहा हूँ भगवानकी यात्रा करने के लिए।" ते अवधूत म्हणाले, "आगे मत जाना। आगे बाघ और रीछ बैठे हैं। फौरन लौटकर बडे मार्ग को मिल जाना।" इतकें बोलून ती व्यक्ति पुढें धांवतच सु
मोठ्यानें ओरडून म्हणालों, "जरा ठहर जाना, मैं भी साथ आता हूँ।" पण मुळें व म्हणणें त्यांनीं ऐकलें नाहीं व पाहतां पाहतां ते दृष्टीआड झाले! मीं विचार अशी

न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् । वचार
यं हि रक्षितुमिच्छन्ति बुद्धया संयोजयन्ति तम् ।। च्या

गुराखी ज्याप्रमाणें हातांत काठी घेऊन पशूंचें संरक्षण करतात त्याप्रमाणें चा कांहीं हातांत दंड घेऊन रक्षण करीत नसतात. एखाद्याचें रक्षण करावें असें जों देवांच्या मनांत येतें तेव्हां देव त्याला योग्य बुद्धि देऊनच त्याचे संरक्षण करीत असतात असा हा देवांचा स्वभावच आहे. तेव्हां देवानें या रूपानें भेटून आपल्याला ही बुद्धि दिली आहे असा विचार करीत मी त्या जटिल जंगलांतून बाहेर पडलों व मोठ्या रस्त्याला येऊन मिळालों, असो.

हिमालय म्हणजे जिकडे पहावें तिकडे असंख्य पर्वतशिखरांच्या पंगतीच पंगती एकामागें एक, एकामागें एक अशा क्रमानें खेचून वसलेल्या आहेत कीं काय असें वाटतें अथवा असंख्य गिरिशिखरांची दाटीवाटीनें वसलेली ती एक प्रचंड सभाच आहे कीं काय असेंहि वाटूं लागतें. अथवा असंख्य ऋषि-मुनि समाधि लावून अनंताचा अंत लावण्यासाठीं या ठिकाणीं कूटस्थ अचलस्वरूपानें विराजले आहेत असें वाटूं लागतें. तुंगनाथाच्या उत्तुंग शिखरावरून हें दृश्य पाहतांना मनाला जो आनंद वाटतो आणि जें समाधान वाटतें त्यांचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं. वर सांगितलेल्या मंडलचट्टी-जवळून अमृतकुंडाकडे जाण्याची जी एक न रुळलेली अस्पष्ट स्वरूपाची वाट लागते तीच वाट अत्रिमुनींच्या आश्रमाकडेहि जाते. या मार्गानें जात असतांना भोवतालीं पर्वतशिखरांची दाटी तर दिसतेच पण त्यावरोबर घनदाट जंगलेंहि दिसतात. सहा-सात मैल अंतर चालून गेल्यावर आपल्याला तीन शिखरें दिसतील. पर्वतप्रदेशांत जेथें जेथें भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा संबंध येतो त्या त्या ठिकाणीं प्रायः तीन शिखरें असतातच. चित्रकूट पर्वत, ऋक्ष पर्वत, सह्यपर्वत अर्थात् माहूरगड आणि गिरनार पर्वत या सर्व ठिकाणीं आपल्याला हेंच दृश्य पहावयास सांपडेल. हीं तीन शिखरें जणूं कांही अत्रिमहर्षींचा आश्रम या ठिकाणीं असल्याची साक्षच देत आहेत. हा सर्वच परिसर अत्रिमुनींचें आश्रमस्थान होता; तथापि आपल्याला पहिल्या प्रथमच महासती श्रीअनसूया देवी यांचें आश्रमस्थान दिसेल. याला या ठिकाणीं 'अनसूया मठ' असेंहि म्हणतात. त्यानंतर आपल्याला अत्रिमुनींचें आश्रमस्थान दिसेल. त्याच्याच जवळ श्रीगुरुदेव दत्तात्रेय यांचा आश्रम आणि अमृतकुंड यांचेंहि दर्शन घडेल. हें स्थान अत्यंत एकान्तस्वरूप असून मोठें रमणीय आहे. अमृतकुंड हें खरोखर अमृतकुंडच आहे. येथील वनश्री हीच सद्गुरूंचें कार्य करीत आहे. येथें आत्मसाक्षात्काराला ग्रंथाची किंवा शब्दांची आवश्यकताच रहात नाहीं. "गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु च्छिन्नसंशयाः" या वचनाची यथार्थ प्रतीति येथें येते. प्राचीन काळीं बाध्व नांवाच्या एका साक्षात्कारी अवधूताला दाल्भ्य नांवाच्या एका अधिकारी मुमुक्षून ब्रह्मसाक्षात्काराविषयीं प्रश्न केला असतां "अवचनेनैव ब्रह्म प्रोवाच" एकहि शब्द न उच्चारतां केवल मौनानेंच बाध्व अवधूतानें दाल्भ्य ऋषीला ब्रह्मसाक्षात्कार करून दिला! तीच अवस्था आजहि या अत्रिआश्रमांतील अमृतकुंडावर बसून केवळ येथील वनश्रीचें अवलोकन केलें तरी साधकाला प्राप्त होते. असें या स्थानाचें अलौकिक स्वरूप आहे. हें अत्रिमहर्षींचें दुसरें आश्रमस्थान होय.

अत्रिमहर्षींचें तिसरें आश्रमस्थान हिमाचल प्रदेशांतच एका ठिकाणी असल्याचें आढळून येतें. अम्बाला व कालका हीं ठिकाणें ओलांडून गेल्यानंतर आपल्याला महासू (संस्कृत-महाशिव) हें जिल्ह्याचें ठिकाण लागेल. तेथून सिमल्याला गेल्यानंतर सिमल्याच्या वायव्य दिशेला सुमारें सत्तर-पंचाहत्तर मैलांच्या अंतरावर आपल्याला मानससरोवराकडून वहात येत असलेली सतलज नदी दिसेल. संस्कृतमध्यें हिलाच

शतद्रु असें म्हटलेलें आहे. या शतद्रूच्या कांठीं कुरपान (कृपाण) नदीच्या संगमावर एक वसति आहे. या वस्तीचें नांव दत्तनगर असें आहे. यद्यपि दत्तनगर हें नांव अत्रिमुनींच्या वास्तव्यानंतरचा काळ व्यक्त करीत आहे; तथापि या ठिकाणीं श्रीदत्तात्रेय प्रभूंचें वास्तव्य होण्याच्या पूर्वीं अत्रिमुनींनीं व अनसूयेनें वास्तव्य केलें होतें असें सांगण्यांत येत आहे. हें स्थान अत्रिमुनि व अनसूयादेवी यांच्या वास्तव्यानें पुनीत झाल्यामुळेंच दत्तात्रेयांनींहि या ठिकाणीं वास्तव्य केलें असणें स्वाभाविक आहे. हें स्थान अतिप्राचीन असून या ठिकाणीं अत्रि, अनसूया व दत्तात्रेय यांच्या मूर्तीहि प्रतिष्ठापित झालेल्या आहेत. या मूर्ति कदाचित् उत्तर कालीं कोणातरी दत्तभक्ताकडून प्रतिष्ठापित झालेल्या असाव्यात. तथापि येथील शिल्प अतिप्राचीन असल्याचा शिल्पशास्त्रज्ञ निर्वाळा देत आहेत. या ठिकाणीं श्रीगोरक्षनाथांनींहि कांहीं काळ वास्तव्य केलें असलें पाहिजे असें येथें असलेल्या श्रीगोरक्षनाथांच्या मूर्तीवरून ध्यानांत येतें. नवनाथान्तर्गत श्रीगोरक्षनाथ हेहि दत्तगुरूंचे अनुगृहीत अनन्य भक्त होते व याच अभिप्रायानें या ठिकाणीं श्रीगोरक्षनाथ यांच्या मूर्तीची स्थापना झाली असणें हें स्वाभाविक आहे. गोरक्षनाथाप्रमाणेंच हें स्थान गोरक्षनाथांच्या पूर्वकाळांतहि ईश्वरावतारस्वरूप भगवान् श्रीपरशुराम यांनीं आपल्या वास्तव्यानें मंडित केलेलें होतें असें येथें असलेल्या भगवान् श्रीपरशुराम यांच्या मूर्तीवरून आपणांस लक्षांत घेतां येतें. येथें दृग्गोचर होणाऱ्याँ श्रीपरशुराम यांच्या मूर्तीमध्यें हा विषेश आहे कीं काळ, काम आणि परशुराम या तिन्ही देवता चिपळूणजवळ असलेल्या महेंद्र पर्वतावरील मूर्तीप्रमाणें पृथक् रूपानें न दिसतां दत्तात्रेयाप्रमाणें त्रिमूर्तीच्या रूपाने एकत्र समन्वित झालेल्या दिसत आहेत. पण ती दत्तात्रेयांची मूर्ति नसून परशुरामाचीच मूर्ति असल्याचें दिसून येतें. अशी त्रिमूर्तीच्या रूपानें समन्वित असलेली श्रीपरशुरामाची मूर्ति आपल्याला दुसरीकडे कोठें पहावयास सांपडणें कठीण आहे. अथवा परशुरामानें येथें तपश्चर्या करून श्रीदत्तात्रेयांचें अनन्य चित्तानें चिंतन केलें त्या भावपूर्ण चित्तानें व चिंतनानें श्रीपरशुरामहि श्रीदत्तात्रेयस्वरूप बनले व ध्येयमूर्तीप्रमाणें तेहि त्रिमूर्तिस्वरूप झाले असेंहि असणें शक्य आहे. हा सिद्धान्त उपासनाशास्त्राला धरूनच आहे. उपासक हा उपासनेच्या परिपक्व अवस्थेला पोहोंचला म्हणजे त्याच्या त्या अनन्य चिंतनानें तो उपास्यस्वरूप होतो. "म्हणा गोविंद गोविंद मना लागलिया छंद। मग गोविंद ते काया भेद नाहीं देवा तया" या संतवचनांत हाच सिद्धान्त ग्रथित केलेला आहे. अविच्छिन्न परंपरेनें चालत आलेल्या दंतकथांतूनहि ऐतिहासिक लोक सत्य इतिहासाचें संशोधन करीतच असतात. प्रस्तुत स्थलीं सांगितला जाणारा इतिहासहि याच स्वरूपाचा सांगितला जातो. या दत्तनगरांतील पुजारी ब्राह्मण स्वतःला परशुराम-ब्राह्मण म्हणवितात व ते अत्रिगोत्रोत्पन्नहि आहेत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. तात्पर्य, हिमाचल प्रदेशांतील सतलज (शतद्रु)च्या कांठीं असलेला दत्तनगरचा परिसर हा अत्रि-

मुनींचा आश्रमस्थान होता व पुढें दत्तात्रेय, परशुराम आणि गोरक्षनाथ यांच्याहि तपश्चर्येचें तो स्थान बनला. असें हें अत्रिमुनींचें तिसरें आश्रमस्थान होय.

आतां आपण अत्रिमुनींचे चौथें आश्रमस्थान पाहूं. हेंहि आश्रमस्थान हिमाचल प्रदेशांतच आहे. हिमालयाच्या कुशींत बदरीनारायणाच्याहि वरच्या बाजूस जेथे नर आणि नारायण हे दोन पर्वत एकत्र येतात व जेथून सत्पथ आणि स्वर्गारोहण या स्थाना-पर्यंत जावयाचा मार्ग आहे, या मार्गांत प्राचीन इतिहासाशीं संलग्न असलेलीं पुराण-प्रसिद्ध अशीं अनेक महत्त्वाची तीर्थे आहेत. जें जें तीर्थ ज्यांच्या ज्यांच्या नांवानें ओळखलें जातें त्या त्या तीर्थाचा त्या त्या देवतेशीं ऋषीशी, आश्रमस्थान अथवा तपश्चर्येचें स्थान या स्वरूपाचा संबंध आलेला असतोच.

श्रीबदरीनारायणाचें दर्शन घेऊन आपण ब्रह्मकपाल अथवा ब्रह्मकुंड या ठिकाणापासून अलकनंदेच्या उगमाकडे चाललों म्हणजे आपल्याला अनेक तीर्थस्थानें भेटतील. मार्ग अत्यंत कठीण. तिकडे वसति नसल्यामुळें व यात्रेकरूंहि फारसे जात नसल्यामुळें रस्ता अत्यंत अस्पष्ट पुसट पायवाटेच्या स्वरूपाचा दिसतो. मार्गदर्शक असल्याशिवाय काम भागतच नाहीं. मार्गदर्शकालासुद्धां कित्येक ठिकाणीं बर्फावरून तर्कानेंच वाट काढावी लागते. अशा अवघड ठिकाणीं आपण वर जाऊन पोहोंचल्यावर आपल्याला तेथें अत्रि-अनसूया तीर्थ दिसेल. येथेंच अत्रिमुनींनीं अनसूयेसह कांहीं काळ वास्तव्य करून तपश्चर्या केली असल्याचें सांगण्यांत येतें. याला प्राचीन वाङ्मयांत आधारहि उपलब्ध होत असल्यामुळें या स्थानाला अत्रि-अनसूयातीर्थ असें नांव पडलें आहे. अत्रिमुनि आणि अनसूया यांनीं येथें वास्तव्य केलें असल्यामुळेंच भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं देखील या परिसरांत कांहीं काळ वास्तव्य करून तपश्चर्या केली असल्याचें कळतें. दैत्यांच्या त्रासानें संत्रस्त झालेल्या देवराज इंद्रानें येथेंच दत्तात्रेयांचें दर्शन घेतलें व दत्तात्रेयांच्या कृपेनेंच तो जंभ दैत्याच्या संकटांतून मुक्त झाला. इंद्रानें कांहीं काळ तपश्चर्या केल्याचें सूचक इंद्रधारा तीर्थहि कांहीं अंतरावर येथें पहावयास सांपडतें. एका झऱ्यांतून दुधाप्रमाणें पांढरीशुभ्र जलधारा वहात असल्याचें दृष्टीस पडेल हेंच तें इंद्रधारातीर्थ होय. याला इंद्रपदतीर्थ असेंहि म्हणतात.

ईश्वरावतारस्वरूप श्रीनरनारायण यांची माता व श्रीधर्मऋषि यांची पत्नी श्रीमूर्तिदेवी यांचेंहि येथें एक छोटेंसें मंदिर आहे. या देवीला माता मूर्ति असेंच म्हणतात. येथूनच पुढें सत्पथाला मार्ग जातो. अलकनंदेच्या पैलतीरावर उभ्या असलेल्या नरनामक पर्वताच्या अत्युच्च शिखरावरून एक प्रचंड जलधारा खालीं उडी घेत आहे. या धारेला वसुधारा असें म्हणतात. ही सुमारें चारशें फुटांवरून खालीं उडी घेत आहे. बर्फाच्छादित दरीमध्यें उडी घेत असतांना या जलधारेचे अगदीं खसखसीसारखे सूक्ष्म कण बनतात. या कणांच्या स्पर्शानेंच यात्रेकरूला वसुधारा तीर्थाचें स्नान झाल्याचें समाधान मानावें लागतें. पुढें जाण्याचें धैर्यच होत नाहीं. बर्फाचे शिलाखंड सारखे वरून कोसळत असतात व धडाम्धुम् असे आवाजहि होत असतात. येथेंच अष्टवसूंनीं

तपश्चर्या केली असल्याचें सांगितलें जातें. वसुधारेच्या खालीं सरस्वतीच्या उगमस्थानीं व्यासमहर्षींचें आश्रमस्थान दिसेल.

माता-मूर्तीपासून सत्पथाकडे निघाल्यानंतर चार मैलांच्या अंतरावर आपल्याला लक्ष्मीवन दिसेल. सृष्टीचा महिमा मोठा विलक्षण आहे. येथें सभोंवार गवताची काडीही नसतांना भूर्जपत्राचे वृक्षमात्र मोठ्या डौलानें विराजत आहेत. याच वनाला लक्ष्मीवन असें म्हणतात. येथें लक्ष्मीधारा तीर्थ आहे. डाव्या हाताला नारायण पर्वत व उजव्या हाताला नर पर्वत उभे आहेत. त्यांचीं तीं गगनभेदी शिखरें पाहतांना नाकाचा शेंडा अगदी ऊर्ध्व दिशेलाच करावा लागतो !

थोडेंसें अंतर तोडल्यानंतर आपल्याला एक चक्राकार पटांगण दिसेल. यालाच चक्रतीर्थ असें म्हणतात. येथून सुमारें दीड-दोन कोसांच्या अंतरावर सत्पथ नांवाचें अत्यंत रमणीय स्थान आहे. मार्ग फारच क्लिष्ट आहे. सत् म्हणजे संतजन; त्यांचा हा पथ म्हणजे मार्ग. संतांचा मार्गहि असाच अवघड असतो. सर्व आशापाश तोडून व शेवटीं प्राणांवरहि उदार होऊन संतपद जोडावें लागतें. अथवा सत् म्हणजे परब्रह्म; त्याच्या प्राप्तीचा पथ म्हणजे मार्ग. त्यालाहि सत्पथ असें म्हणतात. हा मार्ग अवघड आहे. "दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति." जिवावर उदार व्हावें तेव्हांच या मार्गाला लागावे. "तुका म्हणे मिळे जिवाचियेसाठी; नाहीं तरी गोष्टी सांगू नये." हिंदीमध्यें याला सतोपंथ असें म्हणतात. या ठिकाणीं एक त्रिकोण सरोवर आहे. त्याचें पाणी पाचूप्रमाणें कांहीसे हिरव्या रंगाचे व अत्यंत स्वच्छ नि निर्मळ असतें. याला स्वर्णताल असेंहि म्हणतात. येथे योगिराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांनी कांही काळ वास्तव्य केलेलें आहे. यापुढचा मार्ग फारच कठीण आहे. येथून थोडें पुढें गेल्यानंतर एक हिमाच्छादित शिखर दृष्टीस पडतें. यालाच स्वर्गारोहण अशी संज्ञा आहे. सत्पथापासूनच हें शिखर दिसूं लागते. येथील चढण फार अवघड आहे. नाकाडासारखें टेकाड चढतांना पायांबरोबरच दोन्ही हातांचाहि उपयोग करावा लागतो. स्वर्गारोहण शिखराला बर्फाच्या लांब, रुंद व उंच उंच पायऱ्या असल्याचें दृश्य दिसतें. पांडवांनीं येथूनच स्वर्गारोहण केलें म्हणून या स्थानाला स्वर्गारोहण असें नांव पडलेलें आहे. या मार्गांत आपल्याला सोमतीर्थ आढळेल. सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे सख्खे बंधु आणि सोमवंशाचे मूळ पुरुष सोमराज यांनीं या ठिकाणीं तपश्चर्या केली असल्याचें सांगितलें जातें. हें तीर्थ म्हणजे एक वर्तुलाकार कुंड आहे. तें प्रायः बर्फाच्छादित असल्यामुळें कोरडेंच असतें. याच्या पुढें सूर्यकुंड आणि विष्णुकुंड लागतें. हें स्थान म्हणजे सर्व देवांची जणूं कांही तपोभूमीच आहे. अलकनंदेच्या दोन्ही किनाऱ्यांवर विराजत असलेले नर आणि नारायण हे दोन्ही पर्वत येथें एकत्र येऊन मिळतात. पुढें शिवलिंगाकार एक त्रिकोण पर्वत उभा असल्याचें दिसेल. येथेंच अलकनंदा आणि भागीरथी हे दोन प्रवाह क्षणभर एकत्र येऊन मिळतात व लागलीच भिन्नभिन्न मार्गांनी भारताच्या मदानावर येण्यासाठीं भरवेगानें धांवत सुटतात. भागीरथी गंगोत्रीच्या दिशेनें जाते

व अलकनंदा ही नर-नारायण पर्वतांच्या मधून बदरीनारायणाकडे येते. अलकनंदेच्या कांठीं पदयात्रा करीत असतांना पदापदाला अश्वमेध यज्ञ पूर्ण केल्याचें पुण्य लागतें, असें श्रीमद्भागवत या ग्रंथांत व्यासमहर्षींनीं सांगितलें आहे. कलियुगांत प्रत्यक्ष क्रियेइतकेंच कल्पनेलाहि स्थान असल्यामुळें आम्हीं वाचकांना अलकनंदेच्या या परिसरांत फिरविलें आहे. अत्रिमुनि आणि सती अनसूया यांची ही तपोभूमि, त्यांतील आश्रमस्थान आणि तपश्चर्येची जागा अतिरमणीय असल्यामुळें त्याचें जरा विस्तारानें वर्णन करण्याचा मनाला अनावर मोह निर्माण झाला याबद्दल वाचक क्षमा करतील असा विश्वास आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश, दत्तात्रेय, सोम, अत्रिमुनि आणि अनसूयादेवी या सर्वांचीच ही तपोभूमि असल्यामुळें या परिसराचा महिमा कांहीं आगळाच आहे.

आतां आपण अत्रिमुनींचें पांचवें आश्रमस्थान पाहूं. अत्रिमहर्षींनीं ऋक्ष पर्वतावरहि तपश्चर्या केल्याचा अनेक पुराणांतून उल्लेख आलेला आहे. हिमालय विंध्याचल, सह्याद्रि आणि मलय पर्वत हे ज्याप्रमाणें आपल्या प्राचीन नांवांनींच आजहि ओळखले जातात त्याप्रमाणें ऋक्षपर्वत आज आपल्या प्राचीन नांवानें ओळखला जात नाहीं. लोकांनीं त्याला प्रायः विंध्यपर्वतांत विलीन केलें आहे असें वाटतें. प्राचीन काळीं ऋक्षपर्वताची कुलपर्वतांत गणना केलेली होती असें पौराणिक वाङ्मयावरून दिसून येतें. कुलपर्वत याचाच अर्थ श्रेष्ठ पर्वत असा आहे. हे कुलाचल सात आहेत.

"सप्तार्णवाः सप्त कुलाचलाश्च सप्तर्षयो द्वीपवनानि सप्त ।
भूरादि कृत्वा भुवनानि सप्त कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम् ।। "

या प्रातःस्मरणांतील श्लोकावरून सात पर्वत प्रातःस्मरणीय असल्याचें लक्षांत येतें. आतां हे सात पर्वत कोणते असावेत, असा जेव्हां प्रश्न पुढें येतो तेव्हां त्या संबंधानें आलेल्या उल्लेखांत थोडासा मतभेद असल्याचें आढळून येतें. हिमालय, गंधमादन, नैषध, विंध्य, माल्यवान्, पारियात्रक आणि हेमकूट असा एक सप्तकुल पर्वतांचा गट आहे. तर दुसऱ्या गटामध्यें महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष, विंध्य आणि पारियात्र अशा सात पर्वतांचा अंतर्भाव आहे. यांत पहिल्या गटामध्यें ऋक्ष पर्वताचा उल्लेखच नाहीं. तसेंच दुसऱ्या गटामध्यें विंध्य आणि पारियात्र या दोन पर्वतांचा पुन्हां उल्लेख आलेला आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें शुक्तिमान् पर्वताचा पहिल्या गटांत उल्लेख नाहीं. यावरून रूढ असलेलीं नांवें मागें पडतात व प्रचारांत नसलेलीं नांवें रूढ होतात असें दिसतें. वस्तुतः कुलपर्वत सातच असल्यामुळें त्यांत गटांची कल्पना करण्याला वाव नाहीं. तथापि कांहीं लोक उत्तरापथवर्ती कुलाचल आणि दक्षिणापथवर्ती कुलाचल असा भेद कल्पितात. त्यांच्या मतें विंध्याचल हा उत्तरापथ आणि दक्षिणापथ यांचा मर्यादा पर्वत आहे. याच अभिप्रायानें विंध्य पर्वताची दोन्ही गटांत गणना केलेली

दिसते. ऋक्ष, पारियात्र आणि शुक्तिमान् हे तिन्ही पर्वत विंध्यपर्वताशीं संलग्न असल्यामुळें तेहि दक्षिणापथ आणि उत्तरापथ यांची मर्यादा दाखवीतच होते. कालांतरानें हे तिन्ही पर्वत विंध्याचल प्रदेशांत विलीन झाले व सर्वांना मिळून विंध्य ही एकच संज्ञा प्राप्त झाली. तात्पर्य हिमालय, गंधमादन, हेमकूट, नैषध आणि माल्यवान् हे सर्व पर्वत उत्तरापथवर्ती असून महेंद्र, मलय, सह्य इत्यादि पर्वत दक्षिणापथवर्ती आहेत. या सर्व पर्वतांच्या मध्यवर्ती असलेला विंध्य पर्वत आणि त्याच्याशींच संलग्न असलेले शुक्तिमान्, पारियात्र आणि ऋक्ष हे पर्वत उत्तरापथ आणि दक्षिणापथ यांची मर्यादा दाखवीत असल्यामुळें त्या सर्व पर्वतांचें एकीकरण होऊन त्यांना विंध्य पर्वत असें एकच नांव रूढ झालें. अशी ही परिस्थिति असल्यामुळें अत्रिमहर्षींचें आश्रमस्थान असलेला ऋक्ष पर्वत आज आपल्याला स्वतंत्रपणें पहावयास सांपडत नाहीं. एकाच नांवाचे अनेक पर्वत, अनेक नद्या व अनेक नगरें जेव्हां पुढें येतात तेव्हां आपल्याला अपेक्षित असलेल्या स्थलाचा निर्णय घेणें अवघड जातें. तथापि कांहीं व्यावर्तक लक्षणांवरून संशोधक लोक आपल्याला अपेक्षित असलेल्या स्थलाचा शोध करीत असतातच.

अत्रिमहर्षींनीं जेथें तपश्चर्या केली त्या ऋक्ष पर्वताचा निर्देश करतांना भागवतकार म्हणतात –

"ब्रह्मणा नोदितः सृष्टावत्रिर्ब्रह्मविदां वरः ।
सह पत्न्या ययावृक्षं कुलाद्रिं तपसिस्थितः ।।
तस्मिन् प्रसूनस्तबकपलाशाशोककानने ।
वार्भिः स्रवद्भिरुद्घुष्टे निर्विन्ध्यायाः समन्ततः ।।"
– भागवत ४।१।१७, १८)

सृष्टिनिर्मितीसाठीं ब्रह्मदेवानें प्रेरणा केल्यानंतर ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेले अत्रिमुनि हे आपल्या पत्नीसह कुलपर्वत म्हणून प्रसिद्ध असलेल्या ऋक्षपर्वतावर गेले. तेथें पानें, फुलें आणि फळें यांनीं समृद्ध असलेल्या अनेक प्रकारच्या वृक्षांचीं वनें होतीं. तालवृक्ष, अशोकवृक्ष व पलाशवृक्ष इत्यादि अनेक प्रकारचे वृक्ष होते. त्या वनांतून अनेक जलप्रवाह खळखळ शब्द करीत वाहत होते. निर्विध्या नदीचा परिसर होता तो. तेथेंच अत्रिमुनींनीं आश्रमाची योजना करून तपश्चर्या केली. या वर्णनावरून अत्रिऋषींची तपश्चर्या ऋक्षपर्वतावर पण निर्विध्या नदीच्या परिसरांत झाली हें उघड आहे. यावरून विंध्यपर्वत आणि ऋक्षपर्वत हे परस्पर-संलग्न असावेत असें दिसतें. अन्य पुराणांतून ऋक्षपर्वताशीं तापी, पयोष्णी इत्यादि नद्यांचाहि संबंध दाखविलेला आहे. यावरून ऋक्षपर्वत हा मध्यप्रदेशाच्या पूर्व बाजूला विंध्यपर्वताशीं संलग्न झालेला असावा असें दिसतें. याच अभिप्रायानें आधुनिक विद्वान् विंध्यपर्वताचा पूर्वभाग आणि दक्षिण-पूर्व भागांतील पर्वतराजी म्हणजेच

ऋक्षपर्वत होय असें मानतात. असो. आपले पिता ब्रह्मदेव यांच्या आज्ञेवरून पुत्रप्राप्तीसाठीं अत्रिमहर्षींनीं ऋक्षपर्वतावर निर्विंध्या नदीच्या परिसरांत आश्रम बांधला व तपश्चर्या केली ही गोष्ट निर्विवाद आहे. हेंच अत्रिमहर्षींचें पांचवें आश्रमस्थान होय. यानंतर अत्रिऋषींची स्वारी विंध्याचलाचा उपपर्वत असलेल्या सातपुड्यांतून संचार करीत करीत अनसूयेसह चित्रकूट पर्वतावर आली. त्या स्थानाची अपूर्व शोभा पाहून त्यांचें मन तेथेंच रमलें. तेथें त्यांनीं आश्रम स्थापून चिरकाल वास्तव्य केलें. श्रीरामचंद्र प्रभूंच्या रूपानें अवतरलेल्या परमेश्वराचें दर्शन घेण्याची मनीषा त्यांनीं चित्रकूट पर्वतावर असलेल्या आश्रमांतच पूर्ण करून घेतली ! हा सर्व वृत्तान्त वाल्मीकीय रामायणांत व त्याआधारें लिहिलेल्या इतर सर्व रामायणांतहि मुक्त कंठानें वर्णन केलेला आहे.

भारतांतील इतर सर्व ठिकाणांपेक्षां अत्रिमहर्षि चित्रकूट तर्वतावर फारच रमले व तेथें पुष्कळ दिवस राहिले असें पुराणेतिहासावरून स्पष्ट दिसतें. भगवान् रामचंद्र प्रभु यांनींदेखील आपल्या वनवासाच्या काळांत चित्रकूट पर्वतावर जितकें वास्तव्य केलें आहें तितकें दुसरीकडे कोठेंहि केलेलें आढळत नाहीं. असा हा चित्रकूट पर्वत प्राचीन काळीं अति रमणीय होता व आजहि ती त्याची रमणीयता अक्षुण्ण असलेली पहावयास सांपडते. जिज्ञासू जनांनीं चित्रकूट पर्वत अवश्य पहावा. चित्रकूट पर्वताच्या परिसरांत असलेल्या कामदवनांत आल्यावरोबर श्रीरामचंद्रप्रभूंचे वन-वासांतील सर्व कष्ट मावळले. श्रमांचा परिहार झाला. "जहौ च दुखं पुरविप्रवासात्" अशा शब्दांनीं रामाच्या मनाला वाटलेला विरंगुळा वाल्मीकिकवींनीं वर्णिलेला आहे. राम म्हणतात, लक्ष्मणा ! पहा, हा पर्वत किती सुंदर आहे ! अनेक वृक्ष आहेत, लता आहेत, वेली आहेत, विकसलेल्या पुष्पगुच्छांनी व फलभारानें नम्र झालेले हे वृक्ष जणूंकांहीं स्वागतच करीत आहेत. कंद, फळें आणि मुळें यांनीं जणूं कांहीं ते आतिथ्य करीत आहेत. अनेक ऋषिमुनींचा हा पर्वत उपजीव्य म्हणजे अन्नदाता व आश्रयदाता बनलेला आहे आणि ही चित्रकूटाच्या जवळून वाहणारी माल्यवती नदी पहा. किती गोड आहे पाणी तिचें ! हे पहा विविध प्रकारचे पक्षी. चातक, भारद्वाज, मोर, कोकिळा इत्यादि किती आनंदानें मधुर शब्दांनीं गात आहेत. तो मोर पहा घनगर्जना कांनी पडतांच एखाद्या सिंहासनाला प्रभावळ असावी त्याप्रमाणें आपला चित्रविचित्र रंगांनीं अंकित असलेला पिसारा उभा करून ठुमकत ठुमकत मोठ्या ऐटीनें एखाद्या नटाप्रमाणें तालबद्ध लयींत पावलें टाकून नृत्य करीत आहे ! मधून मधून केका (मोरांचा शब्द) करून तो मेघांच्या सादाला आपला प्रतिसादहि देत आहे. हरिणें, सांबरें, काळविटें, चित्ते, वाघ, अस्वलें आणि हत्तींचे कळपहि पण येथें असल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. ती पहा सिंह-गर्जना कानांवर येऊन आदळत आहे ! या कामदवनांतील भयानकतेंतहि रमणीयता वास करीत आहे. अनेक ऋषिमुनींचे आश्रम येथें विखुरलेले दिसत आहेत.

ऋषिजनांच्या वास्तव्यानें हा प्रदेश पावन झालेला आहे. तपस्वी लोकांच्या तपश्चर्या चित्रकूटाच्या पवित्रतेंत चांगलीच भर घालीत आहेत. राम म्हणतात, बा लक्ष्मणा ! अयोध्या सोडल्यापासून मला असें रमणीय स्थान कोठें दिसलेंच नाहीं. प्रवासांत आपल्याला फार कष्ट झाले. माझ्यामुळें तुला व आपल्यामुळें या सुकुमार राजकुमारीला—जानकीलाहि अति कष्ट भोगावे लागत आहेत. मला तर वाटलें होतें कीं, मी आतां या कष्टाच्या खायींत फार दिवस जगणार नाहीं. पण चित्रकूट पर्वताची अपूर्वता, अलौकिकता आणि कल्पनातीत रमणीयता पाहून मला जो आनंद झाला आहे तो अवर्णनीय आहे. या आनंदाच्या पौष्टिकानें " नूनं शक्ष्यामिजीवितुम् " (वाल्मीकि रामायण) मी आतां खात्रीनें पुष्कळ दिवस जगेन असें मला वाटत आहे. बा लक्ष्मणा ! तुला आणि जानकीलाहि पण माझ्याप्रमाणेंच वाटत असेल अशी माझी खात्री आहे. तर मग आतां आपण येथेंच कांहींकाळ वास्तव्य करूं. जंगलांतून धावडा, खैर, सागवान, लिंब वगैरे वृक्षांच्या सरळ व दुबेळकें असलेल्या मेढा करण्यास योग्य अशा टणक टणक फांद्या घेऊन ये. वासे करण्यास योग्य असे कळकहि आण. छोटया छोटया बांबूंच्या कांबटया तयार करून दोन-दोन कांबटयांच्यामध्यें वडाचीं, पळसाचीं आणि सागाचीं पानें घालून मोळाच्या दोरीनें पक्कें बांधून टाक. याप्रमाणें छत आणि कुडें तयार करून एक पर्णकुटी बनव. श्रीरामचंद्र प्रभूंची आज्ञा होतांच त्याप्रमाणें लक्ष्मणानें एक पर्णकुटी तयार केली. पर्णकुटी बांधून पूर्ण झाल्यानंतर श्रीराम, लक्ष्मण आणि सीतामाई यांनीं तेथें पुष्कळच वास्तव्य केलें. अशी आहे या चित्रकूटाची आकर्षकता.

जवळच कामदवनामध्यें भगवान् श्रीअत्रिमुनि यांचा आश्रम होता. महासती श्रीअनसूयादेवीदेखील तेथेंच होती. रामचंद्रप्रभूंनी अत्रिमुनींचा आश्रम शोधून काढला. अत्रिऋषींचें दर्शन घेतलें. अत्रिऋषींनाहि रामाच्या दर्शनानें फार आनंद झाला. आश्रमांतच काय पण आपल्या जीवनांतहि राम प्रकटला असें त्यांना वाटूं लागलें. त्या आनंदाच्या भरांत त्यांचे डोळे भरून आले, कंठ दाटला, वाणी मौनावली आणि अंगावर रोमांच उभे राहिले. रामानें साष्टांग प्रणिपात केला. अत्रिमुनींच्या पायांवर डोकें ठेवलें. अत्रींनीं रामचंद्राला उचलून उभे केलें. कडकडून मिठी मारली. अत्रिमुनींच्या प्रेमाश्रूंनीं रामचंद्रांच्या जटा ओल्या झाल्या. तर रामचंद्रांच्या आनंदाश्रूंनीं अत्रिऋषींचें पादप्रक्षालन झालें. तो आनंदाचा क्षण अवर्णनीय होता. जानकीनें अत्रिमुनींना नमस्कार केला. आशीर्वाद देऊन अत्रीमुनींनीं तिला हाताच्या संकेतानें झोपडींत जावयास सुचविलें. जानकी झोपडींत गेली तोंच पातिव्रत्याच्या तपानें तेजस्वी झालेली दिव्य सती अनसूया पुढें उभी असलेली तिनें पाहिली. जानकीनें भक्तिभावानें वंदन केलें. अनसूयेनें आशीर्वाद देऊन जानकीला आपल्या पोटाशीं धरलें. मस्तकावरून व पाठीवरून आपला प्रेमळ हात फिरविला. नेत्रांतून घळघळा वहात असलेल्या अश्रुधारांनीं तिचें मस्तक ओलेंचिंब केलें. अनसूया

म्हणाली, 'बाळ जानकी ! बैस या चटईवर. धन्य आहेस तं. पातिव्रत्याची धुरा शिरावर घेऊन पतीबरोबर वनवासाचे कष्ट भोगीत आहेस. राजकन्या व राजस्नुषा असल्याचा अणुमात्रहि अहंकार अंतःकरणांत न ठेवतां पतिसमवेत तूं जें वनवासाचें कष्टमय जीवन पत्करलें आहेस त्यामुळें तूं त्यागानें व कर्तव्यपरिपालनानें जगांत एक आदर्श स्त्री झाली आहेस.' पुढे अत्रिमर्हषि म्हणाले, "रामा, लक्ष्मणा, तुम्ही पण आंत जा. तिला नमस्कार करा. तिच्या पातिव्रत्याच्या व तपश्चर्येच्या प्रभावानें सतत दहा वर्षें अनावृष्टीमुळें प्राप्त झालेला दुष्काळाचा दुर्धर प्रसंग टळला. प्रत्यक्ष गंगाच प्रकट झाली. कंद, फळें, मुळें यांना जीवन मिळालें. सर्व प्राणी व ऋषिमुनी सुखानें जगले व आनंदानें राहिले. ती ही साध्वी व पतिव्रता असलेली अनसूया आंत आहे. 'सेयं मातेव तेऽनघ' तुम्हांला ती मातेप्रमाणें आहे. जा, आंत जा आणि दर्शन घ्या." दोघेहि आंत गेले. जानकीसह तिघांनींहि अनसूयेला नमस्कार केला. अनसूयेनें सर्वांना आशीर्वाद दिला. औक्षवंत व्हा. विजयी व्हा. सुखी व्हा व आनंदाने रहा. तुमचे लोककल्याणाचे सर्व मनोरथ पूर्ण होतील; असा आशीर्वाद देऊन अत्रिमुनि व अनसूया यांनीं त्यांच्या मुक्कामाची व्यवस्था केली. दुसरे दिवशीं अनसूयेनें सीतेला तेल लावून न्हाऊं घातलें. परिधान करण्याला वस्त्रें-प्रावरणें दिलीं. उटणें लावलें. तिच्या अंगावर अलंकार घातले. वनवासांतील व्रताला अनुसरून सर्वांना उत्तम भोजन दिलें. नंतर ते तिघेहि अत्रिमुनि आणि सती अनसूया यांना वंदन करून त्यांना धन्यवाद देत देत आपल्या पर्णकुटीकडे परतले. हा सर्व इतिहास चित्रकूटाच्या परिसरांतच घडून आलेला आहे. या सर्व गोष्टींची साक्ष कामदवन, कामदगिरि अथवा चित्रकूट पर्वत या ठिकाणीं असलेलीं सुप्रसिद्ध ऐतिहासिक पवित्रस्थळें अद्यापि देत आहेत.

अत्रिमुनींच्या आश्रमामध्यें असलेल्या मंदिरांत श्रीअत्रिमर्हषि, श्रीमहासती अनसूयादेवी, विश्वगुरु भगवान श्रीदत्तात्रेय, परमतेजस्वी तपोमूर्ति श्रीदुर्वासमर्हषि आणि अमृतांशु भगवान श्रीचंद्रमा अर्थात् सोम अशा पांच मूर्तींचें दर्शन आपल्याला घडतें. चित्रकूट हें रेल्वेस्टेशनच आहे. येथून जवळच चार मैलांवर श्रीजानकी-मातेच्या वास्तव्यानें पुनीत झालेल्या जागीं सीतापूर म्हणून लहानशी पण टुमदार वसती आहे. ही वसती पयस्विनीच्या तीरावर असून तेथें छोटेमोठे असे चोवीस घाट आहेत. त्यांमध्यें चार घाट अत्यंत महत्त्वाचे आहेत. एक राघवप्रयाग, येथें धनुष्याकार वळण घेऊन अनसूयेच्या तपोबलानें प्रकट झालेली मंदाकिनी पयस्विनीला येऊन मिळते. दुसरा कैलास घाट. तिसरा रामघाट. याच घाटावर श्रीरामचंद्रांचे अनन्यभक्त व तुलसीरामायणाचे रचनाकार संत श्रीतुलसीदासजी गोस्वामी राहात असत. त्यांना नित्य रामचंद्रांचें दर्शन घडत असे. "चित्रकूटके घाटपर भई संतनकी भीर। तुलसीदास चंदन घिसे तिलक देत रघुबीर" अद्यापि येथें भक्तांना रामचंद्रप्रभूंचा साक्षात्कार होतो ! चौथा घृतकुल्या घाट. घृतकुल्या म्हणजे तुपाचे

पाट. याच शब्दाच्या जोडीनें मधुकुल्या असाहि शब्दप्रयोग होत असतो. मधुकुल्या म्हणजे मधाचे पाट. दोन्ही शब्दांचा मिळून मिष्टान्नाची समृद्धि असा अर्थ करतात. एकाकाळीं या घाटावर मिष्टान्नाचीं संतर्पणें होत असलीं पाहिजेत. त्याचेंच स्मारक म्हणून या घाटाला हें नांव देण्यांत आलेलें असावें. विद्यमान काळांत अन्नधान्याच्या आशेनें गोडाऊनकडे वळलेल्या लोकांना पोळ्यांऐवजीं बंदुकीच्या गोळ्या व साखरे-ऐवजीं छर्रे खावे लागतात. अशा वेळीं घृतकुल्या मधुकुल्या या शब्दांचे अर्थ फक्त कोशांतच पहावे लागतात. चित्रकूट पर्वताच्या घृतकुल्या घाटाचा थाट असा दरिद्री नव्हता. घृतकुल्या मधुकुल्याचा थाट भक्तजनांसाठीं असला तरी विरक्तजन मात्र श्रीरामाच्या दर्शनासाठींच या ठिकाणीं ठाण मांडून बसलेले होते.

असें सांगतात कीं, विश्वकल्याणासाठीं परमेश्वरानें श्रीदत्तात्रेयांच्या रूपानें येथेंच अवतार घेतला. श्रीअत्रिमुनि व श्रीअनसूयादेवी यांच्या उदरीं जन्म घेऊन त्यांनीं आपलें बालपणहि याच अतिरम्य असलेल्या चित्रकूट पर्वतावर घालविलें. विद्याध्यनानंतर कांहीं काळ वास्तव्यहि येथेंच केलें. पुढें अवधूतवेषानें भारतभर परिभ्रमण करून भारताला उपकृत करण्याच्या उद्देशानें ते जेव्हां चित्रकूट पर्वत सोडून निघाले तेव्हां त्यांनीं माता श्रीअनसूयादेवी यांना मोठा मननीय उपदेश केलेला आहे. तो आम्ही दत्तात्रेय आणि अनसूया संवाद म्हणून पुढें देणारच आहोंत. अत्रिमुनींना त्यांनी सांगितलें कीं, द्वापार युगामध्यें भगवान् रामचंद्रप्रभु या चित्रकूट पर्वतावर येतील तेव्हां तुम्हीं त्यांचें दर्शन घ्यावें. तोंपर्यंत येथेंच असावें. हें स्थान सोडूं नये. दत्तात्रेयांच्या सांगण्याप्रमाणें अत्रिमुनींनीं पुढें येथेंच दीर्घकाल मुक्काम केला. अत्रिमुनींच्या बरोबर श्रीरामचंद्र प्रभूंच्या दर्शनासाठीं अनेक ऋषिमुनींनीं आपआपले आश्रम तयार करून येथेंच वास्तव्य केलें. तपोबलानें व योगबलानें दीर्घ-काल जीवनाचा प्रवाह टिकविला व अखेर श्रीरामचंद्र प्रभूंच्या दर्शनानेंच ते धन्य झालें. सर्वांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें. सर्व कामना तृप्त झाल्या. समाधान झालें. याच अभिप्रायानें या पर्वताला कामदगिरि असें म्हणतात व याच्या परिसरांतील अरण्याला कामदवन असें म्हणतात. या कामदगिरीची प्रदक्षिणा करतांना आपल्याला येथील सर्व ऐतिहासिक पवित्र स्थळांचें दर्शन घडतें. तीं स्थळें सीतापूर, रामघाट, राघवप्रयाग, कोटितीर्थ, जानकीकुंड, सीतारसोई, हनुमानधारा, अत्रि-अनसूया मंदिर, भरतकूप, रामशय्या, चरणचिन्ह, स्फटिकशिला इत्यादि अनेक आहेत. कठीण हृदय असलेल्या नास्तिकांच्याहि हृदयाला हेलावून सोडणारा रामा-यणांतील भरतभेटीचा प्रसंग याच चित्रकूट पर्वतावर घडून आलेला आहे. हा सर्व इतिहास चरणचिन्हाजवळ आल्यानंतर डोळ्यांपुढे उभा राहतो व आपलेंहि मन हेलावतें व डोळे प्रेमाश्रूंनीं भरून येतात. चित्रकूट पर्वताची ही अपूर्वता लक्षांत घेऊनच आम्हीं वाचकांना अत्रि-अनसूयेच्या आश्रमदर्शनाच्या निमित्तानें चित्रकूट पर्वतावर जरा अधिक फिरविलें आहे. चित्रकूटदर्शनानें सर्व श्रमांचा परिहार होतो

व जीवनाला नवचैतन्याचें स्फुरण लाभतें. जगद्विख्यात कविकुलगुरु श्रीकालिदास कवि यालाहि अभूतपूर्व मेघदूतासारख्या लोकप्रिय काव्यरचनेची स्फूर्ति मिळाली. तोच चित्रकूट पर्वत आम्हांलाहि भगवान श्रीदत्तात्रेय प्रभु यांचें अलौकिक चरित्र आणि तत्त्वज्ञान लिहिण्याचें स्फुरण देवो अशी चित्रकूटस्थ श्रीदत्तात्रेय प्रभु आणि श्रीरामचंद्र प्रभु यांच्या चरणारविंदी प्रार्थना करून आम्ही आतां गिरनार पर्वत, माहूरगड आणि शुचींद्रतीर्थ या पवित्र स्थळांच्या दर्शनाचा प्रयत्न करीत आहों.

## गिरनार पर्वत

निसर्गरम्य व सिद्धराज श्रीदत्तात्रेयप्रभु यांचें अत्यंत आवडतें स्थान म्हणून जर एखाद्या स्थळाचा निर्देश करावयाचा असेल तर गिरनार पर्वताचाच उल्लेख करावा लागेल, इतका गिरनार पर्वताशीं श्रीदत्तात्रेयांचा संबंध निगडित आहे. दत्तात्रेयांच्या अवतारकालापासून विद्यमान कालापर्यंत दत्तात्रेयांचें अविरत वास्तव्य येथें असल्याचें पहावयास सांपडतें. परम विरक्त सिद्धशिरोमणि श्रीगोरक्षनाथ प्रभु यांच्या कालापासून विद्यमान कालापर्यंत अर्थात् चालू शतकांतील श्रीजालवणकर महाराज, श्रीरघुनाथ निरंजनमहाराज इत्यादि थोर संतपुरुषांपर्यंत असंख्य भक्तांनीं येथें श्रीगुरुदेव दत्तात्रेय प्रभु यांचें प्रत्यक्ष दर्शन घेतलेलें आहे. तसें त्यांचें वास्तव्य तत्त्वतः सर्वत्रच आहे, तथापि गिरनार पर्वत हा त्यांचा आवडता पर्वत असल्याचे दिसतें. वस्तुतः गिरनार पर्वतानें आपल्या अद्वितीय सौंदर्यवैभवानें सर्वच देवांचीं, सिद्धांचीं व तपस्वी जनांचीं मनें आपल्याकडे आकृष्ट करून घेतलेलीं आहेत मग सामान्य मानव त्याच्याकडे आकृष्ट होईल यांत नवल कसलें? माघकवीनें तर आपल्या शिशुपालवध या संस्कृत महाकाव्यांत स्वतंत्र एक सर्ग (अध्याय) लिहून या पर्वताचें वर्णन केलेलें आहे. जिज्ञासूंनीं त्या काव्याचा चौथा सर्ग पहावा. या पर्वताला संस्कृत भाषेंत रैवतक असें नांव असल्यामुळें रैवतकवर्णन असेंच या सर्गाला नांव दिलेलें आहे. या पर्वताला उद्देशून कांहीं ठिकाणीं उज्जयंत पर्वत अथवा वस्त्रापथ पर्वत असेंहि नांव दिलेलें आढळतें. या पर्वतांतील एका विभागाला वस्त्रापथ क्षेत्र असेंहि म्हणतात.

असें सांगतात कीं, आशुतोष भगवान् महादेव हे प्रसन्न झाल्यानंतर सर्वांनाच वर देत असत. देव, दानव, मानव इत्यादि भेदभाव किंवा पक्षपात त्यांच्या ठिकाणीं नव्हता. शंकराकडून मिळालेल्या वराचा दैत्य दुरुपयोग करूं लागले व देवांना छळूं लागले. देवांनीं शंकरांकडे तक्रार केली. देवांच्या पक्षपाती बुद्धीबद्दल शंकरांना राग आला. ते देवांवर रुसले व गिरनार पर्वतावर जाऊन बसले! तेथें त्यांनीं आपल्या अंगावरील व्याघ्रचर्म, गजचर्म व कौपीन वगैरे सर्व कांहीं टाकून दिलें. ते मुळांतच विरक्त होते. आतां तर दिगंबरच बनले! गिरनार पर्वताचें भव्य वैभव पाहिल्या-नंतर व तेथील अपूर्व सृष्टिसौंदर्य अवलोकन केल्यानंतर मानवाचें मन हरपतें. तेथें

सहजच उन्मनीभाव प्राप्त होतो. ब्रह्मानंदीं टाळी लागते. देहभान उरत नाहीं, मग वस्त्रप्रावरणाचें भान कोठून राहणार ? सहजच तेथें दिगंबर अवस्था प्राप्त होते ! अत्रिपुत्र भगवान श्रीदत्तात्रेय तेथें गेले व तेहि दिगंबर बनले ! आतांपर्यंत लोक त्यांना दत्तच म्हणत होते पण आतां ते दत्तदिगंबर बनले !! तपस्व्यांची तपोभूमि व सिद्धांची आनंदभूमि असलेल्या गिरनार पर्वतावर जैनबंधूंचीं आराध्यदैवतें असलेले चोवीस तीर्थंकर गुरु गेले व तेहि तेथें दिगंबरच बनले ! त्यांच्या दर्शनासाठीं जाणारे जैनबांधव तत्त्वतः दिगंबरच बनावयाचे पण सांसारिक व्यवहारानें संसारांत त्यांना परत खेचल्यानंतर शांतीचें व वैराग्याचें प्रतीक म्हणून त्यांनीं शुभ्रवस्त्रांचें परिधान केलें व ते श्वेतांबर बनले. " असोनी संसारी जिह्वे वेगकरी " या ज्ञानेश्वर माऊलीच्या उक्तीप्रमाणें ते संसारांत राहूनच सुविचारानें आदरणीय अर्हत् देवाच्या सेवेंतच आपल्या मनाला, वाणीला व इंद्रियांना गुंतवूं लागले. गिरनार पर्वत जैन बांधवांचें सर्वोत्तम पवित्र क्षेत्र आहे.

भगवान शंकर गिरनार पर्वतावर निघून गेल्यानंतर देवांना मोठी चुटपुट लागली. शंकरांना परत कैलास पर्वतावर आणण्यासाठीं ते पार्वतीला शरण गेले. त्यांच्या विनंतीवरून देवी श्रीपार्वती गिरनार पर्वतावर आली. वस्त्रापथ क्षेत्रांत असलेल्या शंकरांना तिनें कैलास पर्वतावर येण्याची सर्व देवांची प्रार्थना सांगितली. तेव्हां शंकर म्हणाले, 'सर्व देव गिरनार पर्वतावर येऊन राहतील तर मीहि कैलास पर्वतावर राहीन.' अखेर अंशतः सर्व देव गिरनार पर्वतावर येऊन राहिले व भगवान् शंकर हे कैलास पर्वतावर राहिले. तेव्हांपासून गिरनार पर्वत सर्व देवांचें वास्तव्य-स्थान बनला. कैलास पर्वतावरून गिरनार पर्वतावर येऊन पार्वतीनें हें कार्य केलें याचें स्मारक म्हणूनच कीं, काय गिरनार पर्वतावर स्वतंत्र एक शिखर अंबिका शिखर म्हणूनच ओळखलें जातें. कोणी याला अंबाशिखर असेंहि म्हणतात. शाक्त सांप्रदायांत शक्तीच्या चोपन्न पीठांपैकीं हें एक पीठ मानलें जातें. दक्षयज्ञामध्यें सतीनें योगबलाने निर्माण केलेल्या अग्नीनें आपला देह दग्ध करून घेतल्यानंतर भगवान् शंकर सतीचा तो दग्ध देह खांद्यावर घेऊन भारतभर चोहीकडे फिरले. त्या वेळीं जेथें जेथें सतीच्या देहाचा अंश गळून पडला तेथें तेथें एक एक शक्ति पीठ निर्माण झालें. प्रकृत स्थळीं सतीचा उदरभाग गळून पडलेला असल्यामुळें येथेंहि एक शक्तिपीठ निर्माण झालें. गिरनार पर्वताच्या अंबिका शिखरावर असलेलें सुंदर अंबामातेचें मंदिर व देवी श्रीअंबामाता ही शाक्तांची व भक्तांची इष्ट देवता असून अनेकांची ती कुलदेवताहि आहे. सर्व भारतीयांना आदरणीय असलेल्या सर्व देवतांचें गिरनार पर्वत हा आश्रयस्थान आहे. भाविक मुसलमानहि या स्थानाला पवित्र मानतात व श्रीदत्तात्रेय प्रभूंच्या दर्शनाला ते येथें येतात.

चित्रकूट पर्वताप्रमाणेंच गिरनार पर्वतहि श्रीरामचंद्रप्रभूंना अत्यंत आवडला होता. त्यांनीं येथें आवर्जून कांहीं काळ वास्तव्य केलेलें होतें. गिरनार पर्वताच्या

पायथ्याशीं असलेली सीतामढी, रामकुंड, सीताकुंड, भरतवन व हनुमानधारा इत्यादि पवित्र स्थळें या गोष्टीची साक्ष देत आहेत. श्रीकृष्णप्रभूंचें तर मन या पर्वतावर फारच रमलेलें होतें. त्यांचा गृहस्थाश्रम द्वारकेंत असला तरी विश्रांति-स्थान म्हणून ते गिरनार पर्वतावरच विश्रांति घेत असत. माघकवि लिहीत आहे कीं, "दृष्टोऽपि शैलः स मुहुर्मुरारेरपूर्ववद्विस्मयमाततान। क्षणे क्षणे यन्नवतां-विधत्ते तदेव रूपं रमणीयतायाः॥" श्रीकृष्णानें गिरनार पर्वत पूर्वी अनेक वेळां पाहिलेला असला तरी पुन्हां तेथें विश्रांतीला आल्यानंतर त्याला तो अपूर्वच वाटत असे. चित्तामध्यें कांहीं निराळाच आनंद वृद्धिगत झाल्याचें प्रतीतीला येत असे. क्षणा-क्षणाला जेथें अपूर्वतेची प्रतीति येते आणि आनंद वृद्धिगत होतो तेंच रमणीयतेचें रूप समजावें. अशी ही गिरनार पर्वताची रमणीयता मोठी अपूर्व आहे. जवळच असलेल्या विशाल सागराच्या जलपृष्ठावर एकीकडे सूर्यबिंब उदयाला येत आहे तर दुसरीकडे चंद्रबिंब अस्ताला जात आहे अथवा चंद्रबिंब उदयाला येत आहे तर सूर्यबिंब अस्ताला जात आहे असा तो अपूर्व देखावा पाहिला म्हणजे मन मुग्ध होऊन जातें. हत्तीच्या पाठीवरून डाव्या–उजव्या बाजूस खालीं लोंबणाऱ्या दोन घंटा जशा शोभाव्यात तशीच ती गिरनार पर्वताची शोभा अपूर्व दिसते. याच पर्वतावर बलरामानें वानराचें रूप धारण करणाऱ्या द्विविद दैत्याचा वध केलेला आहे. प्राधान्यानें इंद्रनील रत्नांचा आकार असलेला हा पर्वत सर्व रत्नांचें व सुवर्णादि सर्व धातूंचें कोषागार आहे. अतिप्राचीन कालापासून नामवंत असलेल्या सिद्ध लोकांनीं व तपस्वीजनांनीं येथें वास्तव्य करून या भूमीला पुनीत केलें आहे. हा पर्वत तपस्व्यांची तपोभूमि, योग्यांची योगभूमि, ब्रह्मवेत्यांची साक्षात्कारभूमि व सिद्धांची मोक्षभूमि आहे. अनेक भक्तजन या पावन भूमींत येऊन कृतार्थ होतात. भक्तजनांनीं या पवित्र स्थळांच्या दर्शनाचा अवश्य लाभ घ्यावा.

प्रथम प्रभास क्षेत्राला जावें. तेथील तीर्थस्थानें पहावींत. तेथेंच श्रीसोमनाथाचें दर्शन घ्यावें. द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं हें एक ज्योतिर्लिंग आहे. तेथून जुनागड हें शहर गांठावें. जुनागड हें एक रेल्वेस्टेशन आहे. त्यामुळें तेथें पोहोंचणें अवघड नाहीं. जुनागडमध्यें इतर पाहण्यासारखें कांहीं फारसें नसलें तरी किल्ला आणि प्राणि-संग्रहालय पहावें. सुप्रसिद्ध भगवद्भक्त श्रीनरसीमेहता यांचें स्थान अवश्य पहावें. तेथें त्यांचें आराध्यदैवत भगवान् श्रीश्यामसुंदर यांचें मंदिर आहे. जवळच त्यांच्या घराचा ओटा सुरक्षित आहे. याच ओटयावर बसून ते भजन करूं लागले म्हणजे प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण गोपीजनांसह घेर धरून रासनृत्य करीत होते असें त्यांच्या भावपूर्ण भजनांवरून दिसून येतें. भक्तश्रेष्ठ श्रीनरसी मेहता यांची हुंडी प्रत्यक्ष द्वारकाधीश श्रीकृष्णप्रभूंनीं पटविली असल्याचें वर्णन त्यांच्या चरित्रांत केलेलें आढळतें. कोणीं एक सद्गृहस्थ आपल्याजवळचे पैसे एखाद्या धनिकाजवळ ठेवावे व त्यानें आपल्याला तितक्या रकमेची हुंडी द्यावी अशा विचारानें जुनागड नगरांत

चौकशी करूं लागला. कांहीं टवाळ थट्टेखोरांनीं त्या गृहस्थाला नरसी मेहतांकडे जावयास सांगितलें. नरसीबाबांनीं त्या थट्टेखोरांचा भाव ओळखला. ते त्या गृहस्थाला म्हणाले, " या लोकांनीं तुझी थट्टा केली आहे. मी गरीब माणूस. माझी पत काय ? मी हुंडी काय देणार ? ' पण त्या गृहस्थानें आपला आग्रह सोडला नाहीं. अखेर नरसी मेहतांनीं सावकार सांवळाशेट या नांवानें हुंडी दिली व द्वारकेंत ती हुंडी पटवून घेण्यास सांगितलें. तो गृहस्थ द्वारकेंत आला व त्याने सावकार सांवळाशेटची चौकशी केली. लोकांनीं त्याला सांगितलें कीं, या नांवाचा कोणी सावकार अथवा धनी व्यक्ति या ठिकाणीं नाहीं. तुमची कोणींतरी थट्टा केली आहे. हें ऐकून तो गृहस्थ अत्यंत दुःखी झाला व खिन्नवदन होऊन चिंता करीत बसला. इतक्यांत प्रत्यक्ष द्वारकाधीश भगवान् श्रीकृष्णच सावकार सांवळाशेटच्या रूपानें तेथें आले ! त्यांनीं त्या चिंताक्रांत मनुष्याची विचारपूस केली. तो म्हणाला, ' मी सावकार सांवळाशेटच्या नांवाची हुंडी घेऊन आलों आहे. ' पण या नांवाचें येथे कोणीच नाहीं असें म्हणतात. माझी मोठी फसगत झाली आहे. तेव्हां द्वारकाधीश म्हणाले, ' अरे तोच मी सांवळासावकार आहे. मला कळलें आहे कीं, कोणीतरी माझ्या नांवाची हुंडी घेऊन आलेलें आहे. त्याचाच मी शोध करीत आहें. ' असें म्हणून परमेश्वरानें ती हुंडी घेतली व त्या गृहस्थाची रक्कम चुकती केली ! भगवान् श्रीकृष्ण अदृश्य झाले. त्या गृहस्थानें खूप शोध केला पण पत्ता लागला नाहीं. अखेर त्या गृहस्थाची खात्री झालीं कीं, हा सांवळाशेट दुसरा–तिसरा कोणी नसून प्रत्यक्ष घनश्याम, श्यामसुंदर भगवान श्रीकृष्णच होता ! मीं त्याला साधा नमस्कारसुद्धां केला नाहीं. प्रत्यक्ष परमात्मा भेटूनहि मी आपला धनच मोजीत बसलों. त्याच्याकडे नीट पाहिलेंहि नाहीं, धिक्कार असो मला. असा त्याला पश्चात्ताप झाला. जवळ कांहीं नसता परमेश्वराच्या नांवानें हुंडी द्यावी व परमेश्वरानें ती भरावी असा अधिकार संत श्रीनरसी मेहता यांचा होता. " वैष्णव-जन तो तेने कहिए, जो पीड़ पराई जाने रे " हें प्रसिद्ध भजन त्यांचेंच आहे. हें दर्शन घेऊन आपण जवळच असलेल्या गिरनार पर्वताकडे वळावें. जुनागडचें प्राचीन नांव गिरिनगर होतें. गिरिनगरच्या सांन्निध्यांत हा गिरि म्हणजे पर्वत उभा असल्यामुळें या पर्वताला गिरनार पर्वत असें नांव पडलें असणें स्वाभाविक आहे. पौराणिक वाङ्मयावर आधारित असलेली दुसरी एक गोष्ट अशी ऐकावयास सांपडते कीं हा पर्वत हिमालयाचा पुत्र व पार्वतीचा भाऊ आहे. पार्वतीच्या विवाह-प्रसंगीं याच्याकडे देवांचें आतिथ्य आणि व्यवस्था ठेवण्याचें काम सोंपविलें होतें. तें त्यानें अत्यंत उत्तम रीतीनें पार पाडलें ! सर्व देव खूष झाले. विवाहसमारंभ संपल्यावर देवांनीं " आम्ही येतों, लोभवृद्धि असावी " असें म्हणून निरोप घेतला. पण प्रसन्न झालेले भगवान विष्णु हे तेवढ्यावरच थांबले नाहींत तर त्यांनीं त्या पार्वतीच्या भावाला कांहीं वर दिले. तुम्हीं आमची जी उत्तम व्यवस्था ठेवली

व आदरातिथ्य केलें त्याबद्दल आम्ही संतुष्ट होऊन तुम्हांला वर देत आहों. "आजपासून तुम्ही सर्व पर्वतांत अत्यंत पवित्र मानले जाल. सर्व सिद्धि तुमच्या अंकित होतील. जे कोणी तुमच्या परिसरांत तप करतील त्यांचें तपःसामर्थ्य वाढेल व तपाचें साफल्यहि त्यांना सत्वर प्राप्त होईल. लोक तुम्हांला या पुढें गिरिनारायण या नांवानें ओळखतील." असा हा भगवान श्रीविष्णूचा आशीर्वाद मिळाल्यामुळें लोक या पर्वताला गिरिनारायण या नांवानेंच ओळखूं लागले. पुढें गिरिनारायण या नांवाचाच अपभ्रंश होऊन गिरनार हेंच नांव सर्वांच्या मुखीं रूढ झालें.

गिरनारच्या पायथ्याशीं असलेल्या किल्ल्यांत अनेक गुहा आहेत, शिव–मंदिरेहि आहेत. विहिरी आहेत. गुहा पाहण्यासारख्या आहेत. किल्ल्यांच्या प्रवेशद्वारांतच श्रीगणेशाची व श्रीमारुतिरायाची भव्य मूर्ति आहे. गिरनार पर्वताच्या पायथ्याजवळ आल्यावर एका बाजूस आपल्याला दातारशिखर दिसेल. या शिखरावर असलेल्या गुहेंत 'दातार' नांवाचे एक सिद्ध दत्तात्रेयांचे भक्त रहात असत. फार जुन्या काळची गोष्ट आहे ही अथवा दातार शब्दाचा अर्थ उदार परमात्मा भगवान् श्रीदत्तात्रेय, त्यांचे हे शिखर म्हणून याला दातार शिखर म्हटले गेले असावे. तेथील वास्तव्यानें व पवित्र जलाच्या सेवनानें लोक कुष्ठरोगांतून मुक्त होतात अशी अद्यापिहि प्रतीति येते. दातार शिखराच्या खालच्या बाजूस बाघेश्वरी देवीचें व वामनेश्वर महादेवाचें मंदिर आहे. येथेंच मुचुकुंद राजानें स्थापन केलेल्या शिवलिंगाला मुचुकुंद महादेव असें म्हणतात. याच पर्वतावरील एका गुहेंत राजा मुचुकुंद हा विश्रांति घेत असतांना त्याच्या हातून श्रीकृष्णानें कालयवनाचा मृत्यू घडवून आणला. ही मुचुकुंद गुहा येथें प्रसिद्ध आहे.

गिरनार पर्वताच्या पायथ्याशींच एक दामोदरकुंड म्हणून मोठें कुंड आहे. तें अत्यंत पवित्र मानलें जातें. स्वर्णरेखा नांवाची एक लहान नदी अडवून एक छोटेंसें सरोवर तयार केलें आहे. यालाच दामोदरकुंड असें म्हणतात. या कुंडाचें वैशिष्ट्य हें आहे कीं येथें विसर्जित केलेल्या अस्थि विरघळून त्यांचें पाणी होतें. यामुळें दूरदूरचे लोक येथें येऊन अस्थिविसर्जन करतात. या कुंडावर राधादामोदराचें एक मंदिर आहे. जवळच रेवतीकुंडहि आपल्याला आढळेल. श्रीवल्लभाचार्यांचें हें अत्यंत आवडतें स्थान मानलें जातें. गिरनारच्या सभोंवार अनेक गुहा असून त्या गुहांतून अनेक देवतांचें दर्शन घडतें. त्यांत गणेश, देवी, पंचमुखी हनुमान, तसेच नीलकंठ महादेव व कालीमाता या प्रसिद्ध देवता आहेत.

मृगीकुंड, भवनाथ महादेव, वस्त्रापथेश्वर, मेघभैरव आणि लंबेहनुमान् इत्यादि देवतांचीं आपणांस सवड असेल त्याप्रमाणें दर्शनें घ्यावींत. जवळच जैनांचे तीर्थंकर गुरु श्रीआदिनाथ यांचेंहि मंदिर आहे. येथूनच गिरनार पर्वताची चढण सुरू होते. एकंदर गिरनार पर्वताचीं एकवीस शिखरें आहेत. त्यांत पांच शिखरें

 

प्रमुख आहेत. एक अंबाशिखर, दुसरें नेमिनाथशिखिर, तिसरें गोरखनाथशिखर, चौथें दत्तपादुकाशिखर आणि पांचवें कालिकाशिखर होय.

गिरनार पर्वताच्या पायथ्यापासून सर्वोच्च शिखरापर्यंत पायऱ्या असल्यामुळें प्रवास कष्टाचा असला तरी त्यांतल्या त्यांत तो बराच सुखाचा होतो. पायऱ्या नसतील त्या वेळेला हा प्रवास किती कष्टाचा असेल याची कल्पना पायऱ्या चढत असतांनाच येते. पर्वतावर चढणें जितकें कठीण असतें त्याहिपेक्षां पर्वतावरून उतरणें अवघड असतें. खडी चढण जेथें असेल तेथें आपल्याला याचा अनुभव येतो. पर्वत चढतांना एक डोक्याइतकी उंच काठी जवळ असणें फार उपयुक्त असतें. तशा काठ्या येथें पायथ्याशीं भाड्यानें मिळतात. सर्व प्रमुख ठिकाणांचें दर्शन घ्यावयाचें म्हटलें तर आपल्याला दहा-बारा हजार पायऱ्या चढाव्या लागतात व तितक्याच पायऱ्या उतराव्याहि लागतात. वर जातांना रस्त्याच्या सोयीप्रमाणें ज्या पायऱ्या आपल्याला उतराव्या लागतात त्या परत येतांना चढाव्या लागतातच. सर्व मिळून पायऱ्यांचा चढउतार पंधरा–सोळा हजार पायऱ्यांच्या घरांत जातो असे म्हणतात.

पायऱ्या चढतां चढतां दम लागतो. नाकीं नऊ येतात. दमछाट होते, जीव अगदीं मेटाकुटीस येतो. तेथें पायऱ्या मोजण्याकडे कोणाचें लक्ष असणार? जय अंबाजीकी, जय गोरखनाथजीकी, जय अलख निरंजन, जय गुरुदेव असेंच चिंतन मनांतून चाललेले असतें आणि तें स्वाभाविकहि आहे. मनुष्य तेथें येतो तो इष्ट देवतेच्या दर्शनासाठीं येतो. तो कांहीं पायऱ्या मोजण्यासाठीं येत नाहीं. परंपरेनें कानावर आलेली पायऱ्यांची संख्या लोक सांगतील ती आपल्याला ऐकावी लागते व त्यावर विश्वास ठेवावा लागतो.

प्रवास कितीहि परिश्रमाचा असला तरी आपण आपल्या उद्दिष्ट ठिकाणीं पोहोंचल्यानंतर श्री अंबामातेचें श्री गोरक्षनाथाचें आणि श्रीगुरुदेव दत्तात्रेय प्रभु यांच्या चरणपादुकांचें दर्शन झाल्यावर आपल्याला जें समाधान वाटतें, जो आनंद होतो त्या आनंदांत सारे कष्ट विरघळून जातात. धन्यता वाटते. जीविताचें साफल्य झालेंसें प्रत्ययास येते. आदिनाथ, नेमिनाथ, गोरक्षनाथ व श्रीदत्तात्रेयानंदनाथ यांनीं लोककल्याणाकरितां जे परिश्रम घेतले त्यापुढे आपण त्यांच्या वास्तव्यानें पुनीत झालेल्या स्थळांचें दर्शन घेण्यासाठीं जे परिश्रम घेत आहोंत तें कांहींच नव्हेत अशी आपल्या मनाची खात्री होते. सूर्यप्रकाशांत काजव्याचा प्रकाश जसा विरून जावा त्याप्रमाणें आपल्याला झालेले कष्ट मनांतल्या मनांत विरून जातात. साक्षात् ईश्वर-स्वरूप महाविभूतींच्या वास्तव्यानें पावन झालेल्या या स्थळांचें दर्शन घडल्यानंतर 'धन्य आपण दैवाचे' असे सहजच उद्गार आपल्या मुखांतून बाहेर पडले तर त्यांत नवल काय आहे? अशींच हीं स्थळें अपूर्व आहेत यांत शंकाच नाहीं.

जय गुरुदेवदत्त. चला. आपणांला आतां या गिरनार पर्वताच्या शिखरावर जावयाचें आहे. ह्या पहा पायऱ्या कशा मनोरम दिसत आहेत. जणूं कांहीं एखादा

प्रचंड हत्ती आपल्या शुंडादंडाच्या आधारें आपल्या मस्तकावर विराजत असलेल्या पवित्रस्थळीं तुम्हांला नेऊन पोहोंचविण्यासाठीं सिद्ध असल्यासारखा दिसत आहे. हा पर्वत मुळांतच काळचा पाषाणांचा. त्याच्या पायऱ्याहि तशाच काळचा पाषाणांच्या आहेत. पायऱ्यांची लांबी रस्त्याच्या सोयीप्रमाणें साधारणपणें सात-आठ फुटांची आहे. उंची सुमारें आठ-नऊ इंच आहे. ज्यांना इतक्या पायऱ्या चढण्याचें सामर्थ्य नसेल त्यांच्याकरितां हिमालयांतील प्रवासाप्रमाणें मनुष्यांकडून वाहिलीं जाणारीं डंडी-कंडी इत्यादि साधनें असतातच. त्याकरितां पैशाचें पाठबळ मात्र अवश्य पाहिजे. परंतु मानवाला वाहन करून केल्या जाणाऱ्या प्रवासापेक्षां यथाशक्ति आपल्या पायांनींच केला जाणारा प्रवास फार उत्तम हें निश्चित समजावें.

गिरनारपर्वत चढतांना जागोजागीं पाणपोई असल्यामुळें पाण्याची अडचण भासत नाहीं. पण खाण्यासाठीं मात्र कांहींतरी बरोबर घ्यावें लागतें. गिरनार पर्वत चढायला आरंभ केल्यानंतर जवळ जवळ अडीच हजार पायऱ्या चढल्यानंतर भर्तृहरीची गुहा लागते. या गुहेंत श्री भर्तृहरि आणि राजा गोपीचंद यांच्या मूर्ति आहेत. पुढें कांहीं अंतर वर चढून गेल्यानंतर आपल्याला जैन मंदिरें दिसतील. या मंदिरांची कलाकुसरी पाहण्यासारखी आहे. एक-दोन मंदिरें पाहिलीं म्हणजे सर्व पाहिल्यासारखीं होतात. त्यांत नेमिनाथांचें मंदिर मात्र अवश्य पहावें. चोहों बाजूस चोवीस तीर्थंकर गुरूंचींहि स्थानें आहेत. आदिनाथाचेंहि दर्शन आपल्याला येथेंच घडेल. महत्त्वाच्या तीर्थक्षेत्रांमध्यें पांडवांचा संबंध आला नाहीं असें स्थान विरळाच असेल. येथेंहि जवळच भीमकुंड आणि सूर्यकुंडहि आहे. सिद्धपुरुष श्रीराजुल यांची गुहा मोठी वैशिष्ट्यपूर्ण आहे. पण ही गुहा सरळ मार्ग सोडून जरा बाजूला आहे. चढउतारहि करावा लागतोच. जटाशंकर धर्मशाळेंत जरा विश्रांति घेऊन मग सातपुडा कुंडांकडे जावें. येथें सात खडकांखालून येणाऱ्या पाण्याचें कुंड आहे म्हणून या ठिकाणाला सातपुडाकुंड असें नांव पडलें. सातपुडा पर्वताशीं याचा कांहीं संबंध नाहीं. या कुंडांना पवित्र तीर्थ मानतात. या कुंडांच्या जवळच श्रीगंगेश्वर आणि श्री ब्रह्मेश्वर यांचीं मंदिरें विराजत आहेत. पुढें गेल्यानंतर थोडयाच अंतरावर श्रीदत्तात्रेय प्रभूंचें मंदिर दिसेल. जवळच श्रीसत्यनारायणाचेंहि मंदिर आहे. त्याचप्रमाणें शिवावतार श्रीभैरवनाथ आणि महारुद्र श्रीहनुमान यांचीं दर्शनें घेऊन आपण जरा पुढें गेलों म्हणजे महाकालीचें मंदिर दिसेल. येथें कालीमातेचें दर्शन घेऊन थोडी विश्रांति घ्यावी. या ठिकाणाला साचाकाकांचें ठिकाण असेंहि म्हणतात.

कालीमंदिरापासून बऱ्याच पायऱ्या वर चढून गेल्यानंतर आपल्याला अंबिकाशिखर लागेल. येथें चढून आल्यानंतर बराच चढ वर चढून आल्याचें आपणांस दिसून येईल. गिरनारच्या प्रवासांतील दुसरा टप्पा येथें पूर्ण होतो. पहिल्याच टप्प्याची चढण सर्वांत उंच आहे. चार हजार एकशें दहा पायऱ्या पहिल्या टप्प्यांत संपतात. तेथील जैन मंदिरें व इतर देवतांचीं मंदिरे पाहूनच आपण वर या अंबिका शिखरावर

आलेलों आहोंत. पहिल्या टप्प्यापासून अंबिकाशिखर हें सुमारें सातशें चाळीस पायऱ्या उंच आहे. समुद्रसपाटीपासून सुमारें तीन-साडेतीन हजार फूट उंचावर आपण आलों म्हणजे सभोंवारचें सृष्टिसौंदर्य मनाला आकर्षून घेतें. पर्वताच्या पायथ्यावर व मुळाशीं असलेलीं घनदाट जंगलें हीं जंगलें नसून जणूं कांहीं वन-राजांच्या राजधान्याच आहेत त्या. घनगर्जनेबरोबर वनराजाचीहि गर्जना कानावर येऊन आदळते तेव्हां "प्रकृतिः खलु सा महीयसः सहते नान्यसमुन्नतिं यथा" या भारविकवीच्या वचनाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून महत्त्वाकांक्षी लोक चडफडत असत नाहींत, तर ते प्रयत्नांची पराकाष्ठा करून उत्कर्षाच्या क्षेत्रांत चार पावलें आपली अधिक प्रगतीच करून घेतात. अंतरिक्षांत मेघनाद उमटला कीं, भूतलावर सिंहनादाच्या रूपानें त्याला प्रतिसाद मिळतोच.

अंबामातेच्या शिखरावर आल्याबरोबर मनाला मोठा आनंद वाटतो. थकून भागून आलेलें लेंकरूं आईच्या अंकावर जसें विश्रांति घेतें त्याचप्रमाणें गुरुदेवांच्या दर्शनाला निघालेल्या भक्तांना येथें विश्रांतीचा लाभ होतो. अंबिकाशिखरावर अंबामातेचे विशाल मंदिर आहे. अंबामातेची मूर्ति भव्य आणि ठसठशीत दिसते. समोरच गिरिजावाहन सिंहहि ऐटीनें विराजत आहे. अंबामातेच्या दर्शनानें मनाला समाधान वाटतें.

अंबामाता ही हिमालयाची कन्या व शंकराची पत्नी. गिरनार हा तिचा भाऊ. असें सांगतात कीं, पूर्वी पर्वतांना पंख होते. पंखांच्या साहाय्यानें पर्वत आकाशांत उडूं लागले. देवांना त्रास होऊं लागला. ते इंद्राला शरण गेले. इंद्रानें आपल्या वज्रानें पर्वतांचे पंखच तोडायला आरंभ केला, तेव्हां गिरनार घाबरला व समुद्रांत दडला. बरेच दिवस झाले, पार्वतीला तो भेटलाच नाहीं. तेव्हां पार्वती, हिमाचलराज, विष्णु आणि शंकर हे सर्व गिरनारच्या शोधास निघाले- शेवटीं त्यांनीं अन्तर्ज्ञानानें गिरनार येथें सागरांत लपला असल्याचें ओळखलें. श्रीविष्णूनें सागराला पांच योजनें दूर होण्याची आज्ञा केली. समुद्र दूर झाला व गिरनार सर्वांच्या दृष्टीस पडला. बरेच दिवस न भेटलेल्या भावाच्या भेटीनें पार्वतीला आनंद झाला. त्याला अभय देऊन पार्वतीनें तेव्हांपासून येथेंच कायमचें वास्तव्य केलें! तीच ही गिरनारच्या शिखरावर वसलेली अंबामाता होय.

चला, आतां आपल्याला गोरखनाथ-शिखरावर जावयाचें आहे. खालून वर चढणारे व वरून खालीं उतरणारे भक्तगण आपल्या मुखानें सतत श्रीगोरखनाथ प्रभूंचा जयजयकारच करीत असतात. गोरक्ष याचाच अपभ्रंश गोरख असा आहे. गोरक्षनाथांच्या मुखांतून "अलक्ष्य" असा शब्द वारंवार उच्चारला जात असे. किंबहुना ते पहिल्याप्रथम प्रकट झाले ते "अलख अलख" असा शब्द उच्चारीतच प्रकट झाले. अलक्ष्य या शब्दाचा लोकव्यवहारांत "अलक्ष" असा उच्चार होऊं लागला व "अलक्ष" या शब्दाचेंच लोकभाषेंत अलख असें रूप बनलें.

परमात्मा अथवा परब्रह्म हें कोणत्याहि इंद्रियानें जाणलें जात नाहीं अथवा कोणत्याहि गुणधर्मानें त्याची प्रतीति येत नाहीं. काळा-गोरा, आंबट-गोड, लहान-मोठा, अलीकडचा-पलीकडचा अथवा नकटा-देखणा अशा कोणत्याहि स्वरूपानें जें अनुभवाला येत नाहीं अथवा लक्षिले जात नाहीं त्याला "अलख" असें म्हणतात. अलख याच शब्दाचा पर्याय "निरंजन" असा आहे. निर्विकार आणि निराकार अशा तत्त्वालाच निरंजन असें म्हणतात. या जगांत "निरंजन" असें एकच तत्त्व आहे. त्यालाच तत्त्ववेत्ते परब्रह्म असें म्हणतात. "तें अलख निरंजन परब्रह्मतत्त्वच मी आहें" हे गोरक्षनाथांचें सांगणें आहे. याच अभिप्रायानें "अलख निरंजन" हे शब्द नेहमींच त्यांच्या मूखांतून बाहेर पडत असत. भक्तगण गोरखनाथांनाच अलख निरंजन मानून "जय अलख निरंजन" असा त्यांच्या नांवाचा जयघोष करतात. महायोगेश्वर श्री गोरक्षनाथप्रभु यांच्या दर्शनाच्या उत्साहानें आपण सहाशेंपन्नास पायऱ्यांचा सर्वांत उंच असलेला हा टप्पा सहज चढून जातों. येथें येऊन पोहोंचल्यानंतर मनाला वाटणारा आनंद अवर्णनीय आहे. आपण कितीतरी उंच आलों आहोंत. भोंवतालचा प्रदेश कितीतरी खालीं पाताळांत असल्यासारखें वाटतें. ढग दिसलेच तर ते आपल्यापेक्षां खालीं दिसतात. आपण मेघमंडलाचें अतिक्रमण करून वर आलों आहोंत असें वाटतें. जणूं कांहीं पर्वताच्या भोंवतालीं पिंजलेला पांढराशुभ्र कापूसच टाकलेला आहे अथवा आपण मेरुपर्वताच्या शिखरावर असून आसमंतांत सर्व बाजूंना क्षीरसागरच पसरलेला आहे कीं काय असें वाटतें. मेघमंडलें गिरनार पर्वताच्या शिखरांवरून परिभ्रमण करतात तेव्हां सूर्यकिरणांच्या संपर्कानें तीं शिखरें हिमालयाच्या शिखराप्रमाणें बर्फाच्छादित असल्यासारखीं दिसतात. कधीं कधीं केदारनाथाच्या सभोवार असलेल्या शिखरांप्रमाणें येथील सृष्टिसौंदर्य क्षणाक्षणाला परिवर्तन पावतें व अधिक अधिक आकर्षक बनतें. वाटतें येथून हलूंच नये.

गोरक्षशिखर काय किंवा श्रीदत्तपादुकाशिखर काय, हीं शिखरें अगदी सुळक्यासारखीं उभीं आहेत. तेथें पठार नाहीं. अधिक लोक तेथें सामावूं शकत नाहींत. दर्शन घेतलेले लोक खालीं उतरतात व खालीं असलेले लोक दर्शनासाठीं वर येतात असा हा भक्तांचा कार्यक्रम त्या स्थानाला अनुरूप असाच आहे. गोरखनाथांच्या शिखरावर आल्यानंतर तेथें आपल्याला श्रीगोरक्षनाथप्रभूंच्या चरण-कमलांचें दर्शन घडतें. येथेंच त्यांची धुनीहि आहे. येथें गोरखनाथांनीं तपश्चर्या केली असल्याचेंहि इतिहास सांगत आहे. सिद्धराज श्रीदत्तात्रय प्रभूंच्या चरित्रांत गोरखनाथांना फार मोठें स्थान आहे. गुरुदेव श्रीदत्तप्रभु यांच्या प्रधान शिष्यांपैकीं ते एक आहेत. येथेंच गोरखनाथांनीं दत्तात्रेयांकडून राजयोगाचा व अध्यात्मज्ञानाचा अद्वैततत्त्वाचा उपदेश घेतला. दत्तकृपेने ते महायोगीश्वर बनले. ते अलख निरंजन झाले. राजा भर्तृहरी व राजा गोपीचंद यांच्यासह नाथ संप्रदायांतील चौऱ्यांशी सिद्धांना याच ठिकाणीं श्रीगोरक्षप्रभूंनीं कृतार्थ केलें, धन्य केलें. असें हें

पवित्र ठिकाण आहे. आपण आतां दोन श्लोकांनीं त्यांच्या चरणारविंदीं वंदन करून त्यांचा निरोप घेऊं.

"योगाचार्य-सनातनं गुरुवरं योगीश्वरं ज्ञानदं
संहार-स्थिति-कारणं सुरगुरुग्रामोपजुष्टं शिवम् ।
शान्तं शुद्धमनादिबोधनिकरं लीलावतारं सदा
सर्वज्ञं यतिमंडलार्चित-पदं गोरक्षनाथं भजे ।।
नमो गोरक्षनाथाय गाथा कल्मषनाशिनी ।
यस्य ब्रह्माण्डभाण्डे हि भाति भास्वानिव स्फुटम् ।।"

श्रीगोरक्षनाथ प्रभु हे योगविद्येचे उपदेशक असून योगमार्गाचे प्रवर्तकहि आहेत. ते सनातन म्हणजे परब्रह्मस्वरूप आहेत. ते श्रेष्ठगुरु आहेत. सर्व योग्यांचे ते अधिपति असून आत्मज्ञानाचेहि ते नित्य दान करीत असतात. शंकराच्या रूपानें ते सर्व विश्वाच्या संहाराचें कारण असून विष्णूच्या रूपानें ते सर्व जगाच्या स्थितीचेंहि कारण आहेत. बृहस्पतीसारख्या ज्ञानीजनांचे समुदाय त्यांच्याभोंवतालीं बसलेले असून ते स्वतः शांत आणि शिवस्वरूप आहेत. शुद्ध आहेत. अनादि बोधाचा ते निकर म्हणजे निधि अथवा पुंज आहेत. ते सर्वकाळ लीलेनें अवतार धारण करतात. ते सर्वज्ञ आहेत. योगीजनांचा समुदाय नेहमीं त्यांच्या चरणारविंदांचें पूजन करीत असतो, अशा त्या गोरक्षनाथांना मी प्रेमभावें भजत आहें. ज्यांच्या चरित्राची व उपदेशाची गाथा त्रैलोक्यामध्यें तळपणाऱ्या सूर्याप्रमाणें सर्व कल्मषांचा नाश करीत असल्याचें स्पष्टपणें प्रतीतीला येतें त्या गोरक्षप्रभूंना माझा नमस्कार असो.

येथून परततांना एका शिळेखालून आपल्याला आडवें होऊन जावें लागतें. या खडकाला योनिशिला असें म्हणतात. येथें नेमिनाथांच्याहि पादुका असल्यामुळें जैन बंधूहि भक्तिभावें मोठ्या संख्येनें दर्शनाला येत असतात. पंथभेदाच्या अभिनिवेशाचें शेवाळ बाजूला केलें कीं या ठिकाणीं सर्वांचीं अंतःकरणें निर्मल भक्तिभावानें ओथंबलेलीं दिसतील. शुद्ध प्रेमानें तीं पूर्णपणें भरलेलीं दिसतील.

## दत्तपादुका शिखर

तसें पाहिलें तर गोरखनाथशिखरावरून दत्तात्रेयशिखर अगदीं जवळ दिसतें त्यांचें आंतराळिक अंतर फारच थोडें आहे. पण हें आंतराळिक अंतर तोडण्याचें कांहीं साधन नसल्यामुळें आपल्याला सुमारें सहाशें पन्नास पायऱ्या गेल्यामार्गानेंच खालीं उतरावें लागतें आणि तेथून पुन्हां अंदाजें साडेसातशें-आठशें पायऱ्या श्रीदत्त-पादुका शिखरावर जाण्यासाठीं चढावें लागतें. आपणांस अत्यंत अवघड वाटणारीं हीं स्थानें सिद्ध-मुनींचीं तपश्चर्येचीं स्थानें होतीं. ते तेथें कसे राहत असतील! स्नान व खाणेंपिणें इत्यादि व्यवहार ते कसे पार पाडीत असतील, हे त्यांचे परिश्रम लक्षांत घेतले म्हणजे "चणे खावे लोखंडाचे तेणें ब्रह्मपदीं नाचें" हें वचन

पूर्णपणें सत्य असल्याचें प्रचीतीस येतें. आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें हें तपश्चर्येचें स्थान होय. अगदीं शिखरांवर एक चौखांबी मेघडंबरीसारखें छोटेंसें मंदिर आहे. एक मोठी घंटाहि आहे. श्रीदत्तप्रभूंच्या चरणपादुकांचें तेथें आपल्याला दर्शन घडेल. बाकी सर्व देखावा श्रीगोरखनाथशिखराप्रमाणेंच आहे. जैनबांधवहि या ठिकाणीं बहुसंख्येनें येतात. वर्णधर्माच्या आणि आश्रमधर्माच्या पलीकडे असलेल्या अवस्थेंत गेलेले अवधूतकुलमुकुटमणि भगवान् श्रीदत्तात्रेय आणि अंतिम वयांतील भगवान् ऋषभदेव यांची अवस्था सारखीच होती. तोच मार्ग सर्वतीर्थंकर गुरुंनीं स्वीकारलेला होता. यामुळें जैनबांधवांच्या अंतःकरणांत श्रीगुरुदेव दत्तात्रेय यांच्याविषयीं आदरभाव असणें स्वाभाविक आहे. श्रीमुनिवर नेमिनाथ हे येथूनच मोक्षाला गेले असल्यामुळें जैनबंधूंना हें स्थान अत्यंत पूजनीय वाटणें हेंही स्वाभाविकच आहे. कांहीं लोक नेमिनाथांचें निर्याण पुढच्या शिखरावरून झालें असें मानतात. श्री दत्तपादुका शिखरापासून अनेक सिद्धमुनींनीं व योगीजनांनीं निर्वाणपदाचा लाभ घेतलेला आहे. यामुळें सर्व धर्मीयांना हें शिखर आदरणीय वाटत आहे. येथें आल्यानंतर विचारवंतांच्या अंतःकरणांत मूर्तिमंत वैराग्याचा आविष्कार होतो. पण तें वैराग्य चिरकाल टिकत नाहीं. प्रकृष्ट प्रकाश असलेला सूर्यहि काळ्याकुट्ट ढगाआड लोपलासा दिसावा त्याप्रमाणें अनंत जन्मांतील मलिन वासनांचीं पटलें त्या वैराग्याला आच्छादून टाकतात व मानव हा जड अंतःकरणानें निमुटपणें तेथून खालीं उतरूं लागतो.

गोरखनाथशिखर आणि दत्तपादुकाशिखर यांच्यामध्यें बऱ्याच पायऱ्या उतरून आल्यानंतर पुन्हां तीनशें पायऱ्यांचा चढ असलेलें एक शिखर दिसतें. या शिखरावर श्रीगोरखनाथ प्रभूंची धुनी आहे. कोणी तिला दत्तात्रेयांची धुनी मानतात. नाथसंप्रदायाला श्रीदत्तात्रेय प्रभूंनींच उज्ज्वल केलेलें आहे. नाथसंप्रदायांतील सर्व अधिकारी लोक दत्तगुरूंना आपलें आराध्य दैवत मानतात ही गोष्ट निर्विवाद आहे. धुनीशिखराचा टप्पा गांठला कीं, या प्रवासांतील सर्व टप्पे पूर्ण झाले असें समजावें. गोरखशिखर आणि दत्तशिखर यांच्या मधोमध आणखी एक शिखर आहे. याला नेमिनाथशिखर म्हणतात. याला पायऱ्या नाहींत. चढ मोठा व रस्ता अत्यंत अवघड आहे. वर नेमिनाथांच्या पादुका आहेत.

पूर्वीं सांगितलेल्या सातपुडा गोमुखकुंडापासून थोड्या अंतरावर सहस्राम्रवन आहे. श्री नेमिनाथांनीं येथेंच दिगंबरदीक्षा धारण केली असें म्हणतात. गोरक्षशिखर आणि दत्तशिखर यांच्या मधूनच एक मार्ग महाकालीशिखराकडे जातो. या मार्गांत मध्यें एक कमंडलुकुंड लागतें. पुढें डोंगरीपायवाटेनें जावें लागतें. चढ मोठा व रस्ता अवघड आहे. येथें शिखरावरील एका गुहेंत महाकालीची मूर्ति आहे. या ठिकाणीं फारच थोड लोक जातात. कमंडलुकुंडापासून एक रस्ता पांडवगुहेकडे जातो. हा रस्ता फारच अवघड आहे. पांडवांनीं येथें वास्तव्य केलें होतें असें म्हणतात. सातपुडा गोमुख-

कुंडापासूनच आपल्याला सीतामढीकडे जातां येतें. सीतामढी या शब्दाचा अर्थ सीतेची गुहा असा आहे. येथें श्रीरामप्रभु आणि श्रीजानकीमाता यांनीं वास्तव्य केलें होतें. सीताकुंड आणि रामकुंड अशीं हीं त्याची दोन मूर्तिमंत स्मारकेंच आहेत. येथें श्रीरामचंद्रप्रभूंचें मंदिरहि आहे. काय आश्चर्य आहे पहा! सीतामढीपासून पुढें कांहीं अंतरावर एक आम्रवृक्ष आहे. त्याला 'पोला आम" म्हणतात. या आम्रवृक्षाचें खोड अगदीं पोकळ आहे. त्याच्या मुळाशीं नेहमीं पाणी भरलेलें असतें. तें कधीं आटत नाहीं. या पाण्याचा लोक औषधाप्रमाणें उपयोग करतात. अशा रीतीनें शेंकडों वर्षें हा आम्रवृक्ष परोपकार करीत या ठिकाणीं उभा असल्याचें पहावयास सांपडतें. चित्रकूट पर्वताप्रमाणेंच हनुमानधारा नांवाचें येथें एक तीर्थ आहे. जवळच भरतवनहि आहे. हें सर्व पाहून झालें म्हणजे आपली गिरनार पर्वताची यात्रा पूर्ण होते. वाचक म्हणतील कीं, अत्रिमुनींच्या आश्रमस्थानाचा विषय चालू असतां हें मध्येंच गिरनार पर्वताचें दर्शन कां घडविलें ? गिरनार पर्वताच्या परिसरांत अथवा शिखरांवर कोठेंहि अत्रिमुनींचें अथवा श्री अनसूया देवीचें कांहींच स्मारक आढळत नाहीं ही गोष्ट खरी आहे हें खरें. पण गिरनार पर्वत हा भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें जागतेंजगतें आश्रयस्थान आहे. जेथें जेथें श्रीअत्रिमुनींनीं वास्तव्य केलें तेथें श्रीदत्तगुरूंनींहि वास्तव्य केलें. असल्याचें पहावयास सांपडतें. हिमालय, चित्रकूट, माहुरगड इत्यादि अनेक उदाहरणांवरून ही गोष्ट सिद्ध होत आहे. गिरनार पर्वत हा श्रीरामचंद्रप्रभूंच्या काळापासूनहि सिद्धांचें, योगीजनांचें व तपस्वी लोकांचें आश्रयस्थान असल्याचें सर्वमान्य आहे. अत्रिमुनि हे एक महान् योगी होते, तपस्वी होते व सिद्धहि होते हें त्यांच्या चरित्रावरून सुस्पष्टच दिसून येत आहे. अशा स्थितींत गिरनार पर्वताशीं अत्रिमहर्षींचा संबंध आला नाहीं अशी कल्पना करणें हें बरोबर होणार नाहीं. याच कारणास्तव परिस्थितिप्राप्त पुराव्यावरून हा पर्वत अत्रिमुनींचें आश्रमस्थान असला पाहिजे असें मानून आम्ही कल्पद्रुमाच्या वाचकांना गिरनार पर्वताचें दर्शन घडविलें आहे. श्रीगुरुदेव दत्त दिगंबर यांच्या जीवनचरित्रांत गिरनार पर्वताचें स्थान गिरनार पर्वताच्या शिखराइतकेंच उच्चतम आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन केव्हांना केव्हांतरी गिरनार पर्वताचें अवलोकन करणें आवश्यकच होतें. तें आम्ही अत्रिमहर्षींच्या निमित्तानें प्रसंगसंगतीनें याच ठिकाणीं केलें व वाचकांनाहि करविलें आहे. तरी गिरनार पर्वताचें प्रकृतस्थलीं केलेलें वर्णन असंगत आहे अशी कोणीं कल्पना करून घेऊं नये.

माहुरगड अथवा मातापूर :— सह्याद्रीच्या शिखरश्रेणीमध्यें माहुरगड नांवाचें एक शिखर प्रसिद्ध आहे. याच शिखराजवळ कालीशिखर, दत्तशिखर आणि अनसूयाशिखर अशीं तीन शिखरें आहेत. यांतील अनसूया शिखर हें अत्रिमुनींचें व महासती श्रीअनसूयादेवीचें आश्रमस्थान होतें. या ठिकाणीं अत्रिमुनींनीं तपश्चर्या केलेली होती. आजहि या शिखरावर श्रीअनसूयादेवीचें व श्री अत्रिमुनींचें मंदिर आहे. गिरनार पर्वताप्रमाणेंच सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनींहि येथील एका शिखरावर

वास्तव्य करून तपश्चर्या केली आहे. दत्तात्रेयांच्या वास्तव्यानें पावन झालेल्या शिखराला दत्तशिखर अथवा दत्तपादुकाशिखर असें म्हणतात. या सह्याद्रिपर्वताच्या परिसराला दत्तात्रेयांच्या इतिहासांत फार मोठें स्थान आहे. भगवान् श्रीपरशुराम यांचे वडील श्रीजमदग्नि महर्षि हे दत्तात्रेयांचे शिष्य होते. जगज्जननी श्रीरेणुकादेवी ही परशुरामाची माता होय. श्रीदत्तात्रेयांच्या सांगण्यावरून या ठिकाणीं श्रीजमदग्नि-मुनींनीं कांहीं काळ वास्तव्य केलें व तपश्चर्याहि केली. त्या वेळीं श्रीरेणुकादेवीचेंहि वास्तव्य येथेंच होतें. येथूनच पुढें ते नर्मदेच्या कांठीं हैहयराजाच्या राजधानीजवळ गेले व तेथें त्यांनीं आश्रम स्थापून चिरकाल तपश्चर्या केली. तात्पर्य, माहुरगडाचा परिसर हा अत्रिमुनींच्या व जमदग्निऋषींच्या तपश्चर्येनें आणि श्रीअनसूयादेवीच्या व श्रीरेणुकादेवीच्या वास्तव्यानें पावन झालेला आहे. अवतार भगवान् श्रीदत्तात्रेय आणि भगवान् श्रीपरशुराम यांनींहि पण आपल्या वास्तव्यानें त्याला भूषविलेलें आहे.

सह्याचलाची ही पावनभूमि एका काळीं अपूर्व वनश्रीनें नटलेली होती. येथील पुष्पवृक्ष व फलवृक्ष आपल्या पुष्पफलांच्या समृद्धीनें तपस्वीजनांचें जीवन समृद्ध करीत होते. लता, वेली, कंद आणि मुळें यांची रेलचेल असल्यामुळें विविध प्रकारचे वन्यपशु आणि पक्षी त्याचप्रमाणें ऋषि आणि मुनि हे या पावनभूमीचा आश्रय करीत असत. श्रीअत्रिमुनि व सती अनसूया, श्रीजमदग्नि व देवी रेणुकाभवानी, श्रीगुरुदेव दत्तात्रेय आणि वीरसम्राट भगवान् श्रीपरशुराम यांच्या वास्तव्यानें या भूमिला कांहीं आगळेंच महत्त्व प्राप्त झालेलें आहे. त्यांतहि विश्वगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय आणि जगज्जननी श्रीरेणुकामाता या दोन देवता अज्ञानाचा व संकटांचा परिहार करणाऱ्या असल्यामुळें त्यांच्या वास्तव्यानें हा परिसर बहुसंख्य लोकांच्या आदराचें स्थान बनला आहे. परशुरामाची जननी श्रीरेणुकादेवी ही तर असंख्य कुटुंबांची कुलदेवता आहे. अशा या अनेक देवतांनीं मंडित केलेल्या व अत्रिमुनि आणि श्रीअनसूया यांचें आश्रमस्थान असलेल्या या माहुरगडाचें आपण दर्शन घेऊं.

श्रीरेणुका जगन्माता दत्तात्रेयो महामुनिः ।
देवदेवेश्वरो यत्र तन्मातृक्षेत्रमुच्यते ।।

मातृक्षेत्रालाच मातृपूर—मातापूर अथवा माहुर असें म्हणतात. स्कंद पुराणांतील रेणुका-माहात्म्यांत या क्षेत्राचें वर्णन आलेलें आहे. त्याचप्रमाणें कालिकाखंडांत माहुर-क्षेत्राचा आमलकीग्राम म्हणून उल्लेख केलेला असून त्याचा महिमा फार मोठा अस-ल्याचें वर्णन केलेलें आहे. ज्याप्रमाणें काशीक्षेत्र हें शंकराच्या त्रिशूलावर विराजित असल्याचें "त्रिकण्टकविराजिते" या त्याच्या विशेषणावरून दिसून येतें. त्याच प्रमाणें माहुरक्षेत्र हें श्रीविष्णूच्या सुदर्शनचक्रावर विराजित असल्याचें वर्णिलेलें आहे. महाराष्ट्राचें हृदय असलेल्या मराठवाडा विभागांतील नांदेड जिल्ह्यांतील किनवट तालुक्यांत या क्षेत्राचा अन्तर्भाव झालेला आहे. विदर्भ प्रदेशांतून या क्षेत्राकडे

पाहिल्यास हें क्षेत्र यवतमाळ या जिल्ह्याच्या जवळ येतें. पुसद, यवतमाळ, अकोला, अमरावती अथवा औरंगाबाद, परभणी, नांदेड या ठिकाणांहून एस्. टी. मार्गानें आपल्याला माहुरक्षेत्राला जातां येतें. पौराणिक दृष्टचा या क्षेत्राचें क्षेत्रफळ साडेतीन गव्यूति म्हणजे सात कोस असल्याचें सांगितलें जातें. या क्षेत्राच्या पूर्वेकडे हाटकेश्वर नांवाचें महादेवाचें स्थान असून तेथें वज्रगंगा अर्थात् वंजरानदी -- या नदीचा एक प्रपात म्हणजे धवधबा आहे. याला यवनांच्या काळांत "शेख फरीद" असें नांव दिलें गेलें. (शेख म्हणजे पवित्र वृत्तीनें राहणारा फकीर अथवा साधु आणि फरीद म्हणजे एकटा किंवा सडा फटिंग. अवलिया अथवा अवधूत. भगवान् दत्तात्रेयच येथें या रूपानें दर्शन देत असले पाहिजेत.) दक्षिणेकडे विमलेश्वर हें स्थान असून तें पैनगंगेच्या कांठीं फुलसावंगी गांवाजवळ आहे. पश्चिमेकडे दर्दरेश्वर हें स्थान वऱ्हाडांतील इझनी गांवाजवळ पर्वतीय प्रदेशांत असून उत्तरेकडे सिद्धेश्वर आणि कापेश्वर हीं स्थानें वऱ्हाडांतच पैनगंगच्या कांठीं आहेत. वऱ्हाडांतील मेहकर आणि लोणी या क्षेत्रांजवळ लोणार नांवाचें एक क्षेत्र आहे. येथें श्रीविष्णूनें लवणासुराचा वध केला. त्या वेळीं ब्रह्मदेवाला मोठा आनंद झाला. ब्रह्मदेवानें मोठ्या मनोभावानें श्रीविष्णूची पूजा केली. आपल्या कमंडलूंतील जलानें स्नान घातलें. तीच ही श्रीविष्णूंच्या चरणकमलांपासून प्रसृत झालेली गंगा पैनगंगा या नांवानें लोकभाषेंत प्रसिद्धीला आली. या क्षेत्राला तीन बाजूंनी पैनगंगेचा प्रवाह असल्यामुळें जणूं कांहीं पैनगंगा माहुरक्षेत्राला प्रदक्षिणाच घालीत आहे कीं काय असें वाटतें. मात्र प्रत्यक्ष माहुर गांवापासून हा प्रवाह दूरच आहे. चारी दिशांना असलेलीं हीं स्थानें जणूं कांहीं माहुर क्षेत्राच्या चारी दिशांच्या चतुर्द्वार मर्यादाच दाखवीत आहेत.

कृतयुगांत माहुर क्षेत्र हें आमलकीग्राम या नांवानें ओळखलें जात असे. त्रेतायुगांत याला सिद्धपूर असें नांव पडलें. द्वापारयुगांत तें देवनगर या नांवानें ओळखलें जाऊं लागलें व आज कलियुगांत तें मातापूर अथवा माहुर या नांवानें ओळखलें जात आहे. शक्तीच्या साडेतीन पीठांपैकी हें एक पीठ असल्यामुळें शाक्त संप्रदायांत तुळजापूर आणि कोल्हापूर या क्षेत्रांइतकेंच याहि स्थानाला महत्त्व आहे. वाहतुकीच्या अथवा रहदारीच्या मार्गापासून हें स्थान दूर असल्यामुळें दूरदूरच्या यात्रेकरूंची रहदारी येथें जरी कमी प्रमाणांत असली तरी तेवढ्यानें स्थानमाहात्म्याला तिळमात्रहि न्यूनता येत नाहीं.

आंध्रप्रदेशांतील आदिलाबाद या शहरापासून श्रीक्षेत्र माहुर हें स्थान पासष्ट मैल आहे. वाटेंत शरभंग ऋषींचा आश्रम आणि उनकेश्वर या पवित्र क्षेत्रांचें दर्शन घडतें. येथें गरम पाण्याचें कुंड असून त्यांतील पाण्यानें कुष्ठरोगाचा निरास होतो असें म्हणतात. प्राय : इतरत्र पिंडीच्या रूपानें शंकराची स्थापना झालेली असते तर उनकेश्वर मंदिरांत आपल्याला भगवान् श्रीशंकर मूर्तीच्या रूपानें सुप्रतिष्ठित असलेले दृष्टीस पडतील. हा येथील विशेष होय. जवळच मांडवी गांव आहे. आदर्शग्राम

म्हणून महाराष्ट्रराज्यानें या गांवाचा पुरस्कार देऊन गौरव केलेला आहे. हाच रस्ता थेट माहुरपर्यंत जातो.

किनवटवरूनहि माहुरला एक रस्ता जातो. किनवट हा नांदेड जिल्ह्यांतील तालुका असून तें मध्यरेल्वेचें एक स्टेशन आहे. किनवटकडून माहुरला जाणारा रस्ता दाट जंगलांतून जातो. झाडी अगदीं किर्र. माहुरच्या आसपासच्या जंगलांतूनहि वाघ, चित्ते, हरिण, सांवर, रानडुकरें, कोल्हे, लांडगे, ससे आणि सायाळ इत्यादि वन्यपशूंची वस्ति फार मोठी आहे. ढाण्या वाघांचेंहि दर्शन क्वचित् येथें घडतें. उंच, धिप्पाड व अंगावर काळे पट्टे असलेल्या वाघाला ढाण्या वाघ असें म्हणतात. असा वाघ क्वचित् रात्रीच्या वेळीं श्रीरेणुकामातेचें दर्शनहि घेऊन जातो असें लोकांच्या सांगण्यावरून कळतें. या जंगलांत चोरांचीहि पण वस्ती पुष्कळ आहे. अनेक दृष्टींनीं रहदारीला हा मार्ग कठीण असल्यामुळें या मार्गानें यात्रेकरूंची जा-ये फारच थोड्या प्रमाणांत असल्याचें दिसून येतें.

आपण माहुरला पोहोंचल्यानंतर माहुर क्षेत्र हें अगदीं जुन्यापुराण्या खेड्याच्या रूपांत असलेलें आपल्याला दिसून येईल. येथील पुरोहितवर्ग अगदीं शांत व निरुपद्रवी आहे. अल्पसंतोषानें राहून ते यात्रेकरूंचीं कर्तव्यें पार पाडतात. गांवाबाहेर जवळच श्रीदत्तात्रेयप्रभूंचें एक मंदिर आहे. येथील दत्तात्रेयाला देवदेवेश्वर दत्त असें म्हणतात. दत्तात्रेयांच्या सोळा अवतारांपैकीं देवदेवेश्वर हा एक दत्तात्रेयांचा अवतार आहे.

महानुभाव-संप्रदायाचे आद्यप्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी यांनीं हें स्थान वसविलें आहे असें सांगितलें जातें. मंदिराच्या खालच्या बाजूस एक तळें असून त्याला पद्मतीर्थ असें म्हणतात. या तीर्थाचा पुराणांतहि निर्देश आहे. या तळयांत पांढरीं आणि तांबडीं कमळें विपुल प्रमाणांत प्रफुल्लित होतात तेव्हां त्याची शोभा मोठी अद्‌भुत दिसते. या तळयाजवळच एक कुटी असून भगवान् श्रीदत्तात्रेय कोल्हापुराहून आणलेली भिक्षा येथें सेवन करीत होते असें म्हणतात. देवदेवेश्वरदत्ताचें स्वरूप एकमुख व चतुर्भुज असल्याचें एक चित्रहि येथें मोठें सुंदर दिसतें. दत्तमंदिराच्या मागच्या बाजूस एक शंकराचें मंदिर असून त्यांतील महादेवाला देवळेश्वर असें म्हणतात.

चला, आतां आपण श्रीरेणुकामातेच्या दर्शनाला जाऊं. श्रीरेणुकादेवीचें मंदिर सह्याचलाच्या एका शिखरावर आहे. या शिखराचा सिंहाद्रि अथवा सिंहाचल या नांवानेंहि उल्लेख केलेला आढळतो. मला तर वाटतें, श्रीरेणुकाशिखर कालिकाशिखर, दत्तपादुकाशिखर, अनसूयाशिखर आणि कैलासटेकडी व गुणवती-टेकडी इत्यादि सर्व शिखरांनीं अंकित असलेल्या सह्याचलाच्या या पर्वतश्रेणीलाच सिंहाद्रि अथवा सिंहाचल असें नांव असावें. देवीचें वाहन असलेला सिंह आणि सिंहा-सारखेच भयंकर वाघ असल्यामुळें या पर्वतराजीला सिंहाचल असें नांव अन्वर्थ असल्यामुळें योग्यच ठरेल.

श्रीरेणुकामातेच्या दर्शनाला जाण्यापूर्वी रेणुकापहाडाच्या पायथ्याशीं असलेल्या तळयावर यावें. या तळयाला मातृतीर्थ असें म्हणतात. या तीर्थाचें मातृगयेइतकेंच माहात्म्य असल्यामुळें या ठिकाणीं स्नान करून पिंडदान करावें असें शास्त्रांत सांगितलेलें आहे. हें तळें बरेंच मोठें असून याला तीन बाजूंनीं घाटहि बांधलेले आहेत. तेथील लोक या मातृतीर्थाला मोवाळें असें म्हणतात. स्नानादि विधि उरकून येथूनच रेणुकाशिखर चढावें लागतें. हें शिखर समुद्रसपाटीपासून सुमारें दोन हजार सहाशें फूट उंच आहे. बारक्या मोटारी वरपर्यंत जातील असा रस्ता आतां तयार झाला असून विद्युत्प्रकाशाचीहि व्यवस्था झालेली आहे.

श्रीरेणुकादेवीच्या दर्शनास जातांना मार्गांतच आपल्याला श्रीझंपटनाथाचें अगदीं छोटेंसें मंदिर दिसेल. अवश्य दर्शन घ्या. ते या माहुरक्षेत्राचे संरक्षक आहेत. शहराच्या संरक्षणाधिकाऱ्याला कोतवाल असें म्हणतात. ही एक क्षेत्रपालदेवता आहे. जसे काशीक्षेत्राचे कालभैरव, तसेच माहुरक्षेत्राचे झंपटनाथ म्हणजे हे एक भैरवच आहेत. एकाकी तपस्व्याप्रमाणें जनसंपर्कापासून दूर असलेल्या या आमच्या माहुरक्षेत्राला लोकदृष्टचा काशीसारखें वैभवाचें स्थान नसलें तरी पारमार्थिक दृष्टीनें माहुरक्षेत्र हें काशी क्षेत्रापेक्षांहि कांकणभर जास्त महत्त्वाचें आहे. याच अभिप्रायानें पुराणांतरीं "काशीक्षेत्राद्यवाधिकम्" म्हणजे माहुरक्षेत्र हें काशीक्षेत्रापेक्षां एका जवानें अथवा यवानें अधिक महत्त्वाचें आहे असें वर्णन केलेलें आहे. श्रीझंपटनाथाचें दर्शन घेऊन आपण हळूहळू सर्व चढ चढून वर आल्यानंतर मंदिराजवळ आपल्याला प्रसादाची मिठाई, हळदी–कुंकू, शेंदूर, नारळ, फुलें, माळा, उदबत्ती, कापूर इत्यादि पूजासाहित्याचीं दुकानें लागतील. मंदिरांत देवीच्या गाभाऱ्याजवळ गेल्यानंतर सिंदूरर्चचित भव्य अशा श्रीरेणुकामातेच्या मुखवटयाचें आपल्याला दर्शन घडतें.

मातृवियोगाच्या असह्य व्यथेनें व्याकुळ होण्याचा अवघड प्रसंग परशुरामावर आला असतां रेणुकामातेनें त्याला पोटाशीं धरून कुरवाळीत आश्वासन दिलें. बाळ! जगाची रहाटी लक्षांत घे. खेद करूं नकोस. परशुरामाचें एवढयानें समाधान होईना. मातेनें आश्वासन दिलें. एक महिन्यानें तूं मला हाक मार. मी तुला दर्शन देईन. माता अंतर्धान पावली, पण मातेच्या भेटीसाठीं आतुर झालेल्या परशुरामाला महिनाभर धीर धरवला नाहीं व तेराव्या दिवशींच परशुरामानें आईला हांक मारली. त्या वेळीं रेणुकामाता पूर्ण रूपानें अभिव्यक्त न होतां आकंठ स्वरूपांतच प्रकट झाली. त्याच स्वरूपांत आज भक्तजनांना तिचें या ठिकाणीं दर्शन घडत आहे.

श्रीरेणुकामातेचें मुख-कमल अत्यंत भव्य आणि तेजस्वी आहे. त्यांत चैतन्य भरलेलें आहे. पहातांक्षणींच चित्ताचा लय लागतो, विश्वाचा विसर पडतो, देहभान रहात नाहीं व भेदभावहि उरत नाहीं. हात जोडून भक्तिभावानें स्तवन करूं





दत्तात्रेयांचे निवासस्थान माहूर येथील श्रीरेणुकामाता

लागलें असतां अंग थरारतें. रोमांच उभे राहतात. नेत्रांतून अश्रूधारा वाहतात. कंठ सद्‌गदित होतो. शब्द उमटत नाहीं. असा हा या तुच्छ लेखकालाहि अनुभव आलेला आहे. मग सद्भक्तांच्या अंतःकरणाची काय अवस्था होत असेल याची वाचकांनीं कल्पना करावी. तानाजी देशमुख नांवाच्या एका पुरातन भक्ताच्या शब्दांतच आम्ही ती अवस्था वाचकांपुढें ठेवीत आहों.

### आ र ती

लो लो लागला, अंबेचा भेदाभेद कैंचा ।
आला कंटाळा विषयाचा, धंदा मूळ मायेचा ।। लो लो ।। धृ० ।।

प्रपंच खोटा हा मृगपाणी घोरे फिरतो प्राणी ।
कन्या–सुत–दारा–धन माझें मिथ्या वदतो वाणी ।।
अंतीं नेतिल हें यमदूत न ये संगे कोणी ।
निर्गुण रेणूका कुळदेवी जपतों मी निर्वाणीं ।। लो लो ।। १ ।।

पंच भूतांचा अधिकार, केलासे सत्वर ।
नयनीं देखिला आकार अवघा तो ईश्वर ।।
नाहीं सुख–दुःख देहाला कैंचा अहंकार ।
पाहे परमात्मा तो ध्यानीं भासे शून्याकार ।। लो लो ।। २ ।।

ध्याता मुद्रा ही उन्मनी लागे अनुसंधानीं ।
निद्रा लागली अभिध्यानी जेका नीरंजनीं ।।
लीला वर्णीता स्वरुपाची शिणली शेषवाणी ।
देखिलि भवानी जननी त्रैलोक्य पावनी ।। लो लो ।। ३ ।।

गोंधळ घालिन मी अंबेचा, घोष अनुहाताचा ।
दिवट्या उजळुनि या, सदोदित, पोत चैतन्याचा ।।
अहं–सोहं हे उदो उदो, बोले चारी वाचा ।। लो लो ।। ४ ।।

पाहतां मुळ पीठ पर्वत सकळांमध्यें श्रेष्ठ ।
जेथें जगदंबा अवधूत दोघे भोपी भट ।।
जेथें मोवाळे विंजाळें प्रणिता पाणी लोट ।
तेथें तानाजी देशमुख झाला ब्रह्मनिष्ठ ।। लो लो ।। ५ ।।

लो शब्दाचा अर्थ लय असा आहे. अंबेच्या स्वरूपीं चित्ताचा लय लागल्यानंतर मी–तूं व माझें–तुझें हा भेदभाव उरत नाहीं. विषयाचा कंटाळा म्हणजे उबग येतो. आदिमायेच्या चिंतनाशिवाय मनाला दुसरा धंदा म्हणजे व्यापार सुचतच नाहीं. मृगपाणी म्हणजे मृगजळ. तें जसें खोटें असतें त्याचप्रमाणें हा प्रपंच खोटा आहे. या खोट्या प्रपंचांत प्राणी [illegible] फिरत असतो. कन्या, पुत्र,

पति अथवा पत्नी आणि धनदौलत, जीवाला यमदूत घेऊन जातात तेव्हां बरोबर कोण येणार ? कोणी नाहीं. हें सर्व लक्षांत घेऊन निर्वाणीं म्हणजे अंतीं मी निर्गुण म्हणजे परब्रह्मस्वरूप कुलदेवता श्रीरेणुकामाता हिचाच सतत जप करीत आहें. या विश्वावर पंचमहाभूतांनीं आपला अधिकार जमविला आहे; अर्थात् विश्व हें पांचभौतिक आहे. पण सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केल्यास "आकार" म्हणजे नामरूपात्मक विश्वप्रपंच, हा ईश्वर म्हणजे परब्रह्मस्वरूप आहे. दोरीवर भासणारा सर्प जसा दोरीहून निराळा नाहीं त्याचप्रमाणें ईश्वराच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारा प्रपंच ईश्वराहून निराळा नाहीं. अवघा म्हणजे सर्व कांहीं तो ईश्वरच आहे सुखदुःखें देहाला नाहींत कारण तो जड आहे. जीवालाहि नाहींत कारण तो परब्रह्मस्वरूप आहे ! मग अहंकार कसला धारण करतां ? तो परमात्मा ध्यानीं आणून पहा. शून्याकार म्हणजे निराकार. तो निराकार परमात्माच सर्वत्र विविधाकारानें प्रतीतीला येत आहे. अथवा शून्य म्हणजे पूर्ण, परमात्मा. "खं ब्रह्म" हें श्रुतिवचन प्रसिद्धच आहे. जगन्मातेच्या कृपेनें चित्ताचा लय लागला कीं सारें विश्व पूर्ण परब्रह्मस्वरूपच भासतें.

ही रेणुकेची मुद्रा म्हणजे मूर्ति. हिचें ध्यान करीत असतां मन उन्मन होऊन जातें. त्या अवस्थेला उन्मनीभाव असें म्हणतात. या अवस्थेंत मन "अनुसंधानीं" म्हणजे परब्रह्माशीं. आणि "लागे" म्हणजे एकरूप होऊन जातें. या अवस्थेला निद्रा अथवा समाधि असें म्हणतात. अशी ही निरंजनीं म्हणजे शुद्ध ब्रह्मामध्यें मातेच्या कृपेनें समाधि लागते. या ठिकाणी अभिध्यान शब्दाचा अर्थ चिंतन समजावा. अनन्य चिंतनानें हें सर्व घडून येतें. जिची लीला वर्णन करतांना शेषाचीहि वाणी कुंठित होते तीहि त्रैलोक्याला पावन करणारी जगज्जननी श्रीरेणुका भवानी मी आज या मूळ पीठावर अधिष्ठित असलेली अवलोकन करीत आहे.

मी अंबेचा गोंधळ घालीन त्या वेळीं अनहत नादाचे ध्वनि उमटतील. सदोदित चैतन्याच्या दिवटचा आणि पोत म्हणजे जीर्ण वस्त्राचा केलेला जाडजूड टेंभा. तो मी प्रज्वलित करीन.

त्या वेळीं मी भक्तिभावानें नाचूं लागलों म्हणजे माझ्या परा, पश्यन्ती, मध्यमा-आणि वैखरी या चारी वाणी अहं–सोहं अथवा सोहं–सोहं–सोहंच्या रूपानें उदो उदो हे शब्द प्रकट करीत राहतील.

माहुर येथील मूळपीठ पर्वत अर्थात् रेणुकाशिखर पाहिलें असतां सर्वांत श्रेष्ठ असल्याचें दिसून येईल. येथें श्रीजगदंबा आणि अवधूत भगवान् दत्तात्रेय हे दोघेंहि भोपी आणि भट या रूपांनीं वावरत आहेत. येथें देव आणि भक्त यांच्यांत अभेद आहे असा याचा अर्थ समजावा. भोपी म्हणजे गळ्यांत कवडयांच्या माळा घालून व हातांत पोतबंद घेऊन नाचणारा देवीचा भक्त. भट म्हणजे पुजारी. मोवाळें म्हणजे मातृतीर्थ. आणि विंजाळे तळें म्हणजे ब्रह्मतीर्थ. हेंच या ठिकाणचे प्रणितापात्र

म्हणजे यज्ञकर्मांतील जलपात्र असून त्यांतील पवित्र पाणलोटांत अवगाहन करून भक्त तानाजी देशमुख ब्रह्मनिष्ठ बनला! असा हा माहुरगडावरील रेणुकेचा महिमा आहे.

रेणुकामातेच्या मंदिरामागें परशुरामाचेंहि मंदिर असून जवळच परशुराम-कुंडहि आहे. अलीकडे सर्वत्रच पाण्याची टंचाई जाणवते. ती येथेंहि आहेच. रेणुकेच्या मंदिराजवळच लक्ष्मी आणि तुकाईदेवी यांचीं मंदिरें आहेत. मोवाळच्यावरून रेणुका-शिखर चढतांना उजव्या हातास एक खोल दरी दिसते. हिला मूलदरी असें म्हणतात. येथेंच श्रीजमदग्निमहर्षि यांचा अंत्यसंस्कारविधि झाला. श्रीरेणुकामातेचेंहि सती जाण्याचें हें स्थान होय.

श्रीरेणुकादेवीचें दर्शन घेऊन आपण परतलों म्हणजे समोरच आपल्याला एक उंच शिखर दिसेल. या शिखराला कालिकाशिखर असें म्हणतात. या शिखरावर एक किल्ला आहे. फारच थोड्या असलेल्या प्राचीन किल्ल्यांमध्यें या किल्ल्याची गणना केली जाते. याच्या तटाची भिंत तेवीस फूट रुंद आहे. याच्याच एका बुरुजांत श्रीकालीमातेची मूर्ति प्रतिष्ठापित झालेली आहे. मंदिर छोटेंसें आहे. किल्ला चढतांना चढ चांगलाच जाणवतो. या किल्ल्यांतील खोल्या अद्यापि बऱ्या स्थितींत आहेत. या किल्ल्यांत एक छोटेंसें तळें असून त्यास विजाळें अथवा ब्रह्मतीर्थ असें म्हणतात. औरंगजेब हा दक्षिणेचा सुभेदार असतांना येथें एक श्रीपरमानंद भारती नांवाचे थोर सत्पुरुष राहत होते; त्यांची येथें समाधि आहे. यांनींच दत्त-पादुका शिखरावरील देवस्थानाची व्यवस्था गोसावी महंतांच्या स्वाधीन केली असें म्हणतात. हीं दोन्ही स्थानें अद्यापि याच महंतांच्या स्वाधीन आहेत.

किल्ल्याचा प्रवास उरकल्यानंतर श्रीदत्तशिखर व श्रीअनसूयाशिखर या ठिकाणचा प्रवास करावा. दत्तशिखराच्या पायथ्याशीं खालच्या बाजूस एक प्रचंड विहिरीसारखा जलाशय आहे. या जलाशयास सर्वतीर्थ असें म्हणतात. पाणी उत्तम आहे. असें सांगतात कीं, भगवान् श्रीपरशुराम यांनीं आपल्या मातापितरांच्या अंत्य-संस्कारविधीसाठीं पृथ्वीमध्यें बाण मारून या ठिकाणीं सर्व तीर्थांना एकत्र केलें व मातापितरांच्या सर्व अंत्यसंस्कारविधींतील श्राद्धकर्में येथेंच पूर्ण केलीं. पुढें त्या सर्व तीर्थांना लोककल्याणासाठीं येथेंच कायमचें स्थापित केलें. खालच्या बाजूस जवळच एक अमृतकुंड आहे. याच कुंडावर दत्तात्रेय प्रभु आणि श्रीपरशुराम यांची प्रथम भेट झाली असें म्हणतात. येथें थोडा वेळ विश्रांति घेऊन कांहीं अल्पोपहार करून मग श्रीदत्तपादुका शिखर चढावें. दत्तपादुकाशिखरावर प्रशस्त पठार आहे. येथें गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं तपश्चर्या केली असल्याचें सांगितलें जातें. मंदिराचा परिसर प्रशस्त असून मंदिराची व्यवस्थाहि चांगली आहे. येथें महंतांचे मठहि बरेच असून ते बऱ्या स्थितींत आहेत. दत्तसंप्रदायांतील महंत गोसावी मंडळींचें हें दत्तात्रेयांचें आद्यपीठ समजलें जातें. या ठिकाणीं दत्तजयंतीच्या वेळीं

बऱ्याच मोठ्या प्रमाणावर यात्रा भरते. साठ–सत्तर हजार लोक यात्रेस येतात असें शोधाअंतीं कळलें. येथें श्रीदत्तात्रेयांच्या पादुका असून पूजा-अर्चा वगैरे उत्तम रीतीनें होत असल्याचें दिसून आलें. दत्तात्रेय शिखरावर श्रीचिंतामणी गणेश, श्रीभैरवनाथ आणि श्रीकामाक्षादेवी यांचीं लहान मंदिरें आहेत. हीं दर्शनें घेऊन मग जवळच असलेल्या अनसूया शिखराला जावें. येथें श्रीमहासती अनसूया देवीचें मंदिर आहे. श्रीअत्रिमुनींचें हें आश्रमाचें व तपश्चर्येचें स्थान श्रीदत्तात्रेयांच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचें आहे. महाराष्ट्र राज्य सरकारच्या प्रसिद्धि विभागानें तर हें स्थान भगवान् दत्तात्रेयांचें जन्मस्थान म्हणूनच निर्दिष्ट केलेलें आहे. दत्तजन्माच्या संदर्भांत यासंबंधानें विशेष विचार होईलच. या सह्याचलाच्या परिसरांत माहुरच्या उत्तरेकडे पांडवलेणीं आहेत. या लेण्यांना कोणी जैनलेणीं म्हणतात तर कोणी बौद्धलेणीं असेंहि समजतात. वनदेव, रामतीर्थ, जमदग्नीचें खोरें, ऋणमोचन, भानुतीर्थ इत्यादि अनेक स्थळें येथें पाहण्यासारखीं आहेत. आधुनिक काळांतील सुप्रसिद्ध विष्णुकवि यांचा मठ येथील मोवाळें तीर्थाजवळच आहे. येथें एक धर्मशाळाहि आहे. आश्विन, कार्तिक आणि मार्गशीर्ष या महिन्यांत येथील सृष्टिसौंदर्य फारच आकर्षक असतें. या सह्याचलाच्या शिखरांवर श्रीअत्रिमुनि व श्रीअनसूयादेवी यांनीं बराच काळ वास्तव्य केलें असावें असें इतिहासावरून दिसतें.

## नर्मदा तीरावरील आश्रम

"रेवा तटे तपः कुर्यात्" असें शास्त्रवचन सुप्रसिद्ध आहे. अनेक देव, देवता व ऋषिमुनि यांनीं नर्मदेच्या कांठीं तपश्चर्या केली होती असें स्कंद पुराणाच्या रेवाखंडांत सविस्तर वर्णिलेलें आहे. इतरहि पुराणांतून या गोष्टीचा प्रसंगानुरूप थोडाबहुत उल्लेख असतोच. हा नर्मदेचा महिमा लक्षांत घेऊन अत्रिमुनींनींहि नर्मदेच्या कांठीं तपश्चर्या केली असणें स्वाभाविक आहे. स्कंदपुराण, वायुपुराण इत्यादि पौराणिक वाङ्मयांत आलेल्या उल्लेखांवरूनहि वरील कल्पनेला पुष्टीच मिळते.

बडोद्यापासून कांहीं मैल अंतरावर आपल्याला चांडोद या नांवाचें गांव आढळेल. हिंदी भाषेंत याला चाणोद असें म्हणतात. चांडोद हें एक नर्मदाकांठचें अत्यंत पवित्र क्षेत्र आहे. येथें शिवनारायण, बालाजी इत्यादि देवतांचीं अनेक मंदिरें आहेत. त्याचप्रमाणे चंडादित्यतीर्थ, चंडिकादेवीतीर्थ, चक्रतीर्थ इत्यादि सात तीर्थेंहि आहेत. प्रत्येक पूर्णिमेला येथें यात्राहि भरत असते. प्राचीन काळीं अनेक देवांनीं व ऋषिमुनींनीं येथें तपश्चर्या केली असून आधुनिक युगांतील महान् योगी श्रीबाबू अरविंद घोष यांनींहि पण या ठिकाणीं तपश्चर्या केली असल्याचें त्यांच्या जीवनेतिहासांत आढळून येतें. नर्मदेचा कांठ म्हणजे सृष्टिसौंदर्याचें एक उत्कृष्ट दालनच आहे. चांडोद येथील सृष्टिसौंदर्यहि अत्यंत आकर्षक आहे. चांडोदपासून पुढें कांहीं मैल अंतरावर आपल्याला कोटीश्वर नांवाचें एक तीर्थक्षेत्र आढळेल. कोटीश्वराच्या

समोरच नर्मदेचा प्रवाह विभागला गेला असून त्या स्थानाला कांहींसें बेटाचें स्वरूप आलेलें आहे. चांडोदहून येथपर्यंतचा प्रवास आपल्याला सडकेनें अथवा नावेनेंहि करतां येतो. जेथें पायाची गति कुंठित होते तेथें नौकेनें जाणें अपरिहार्यच असतें. याच ठिकाणीं अत्रिमुनींचा आश्रम होता. याच ठिकाणीं पुत्रप्राप्तीकरतां अत्रिमुनींच्या आज्ञेवरून अनसूयामातेनें तपश्चर्या केलेली आहे. महासती श्रीअनसूयादेवी या परमपतिव्रता असल्यामुळें अत्रिमहर्षींना सोडून त्या कधींहि दूर राहिल्या नाहींत. अनसूयेच्या विनंतीला मान देऊन श्रीअत्रिमहर्षींनींहि येथें राहण्याचें मान्य केलें. अनसूयेच्या प्रार्थनेवरून अत्रिमुनींनींहि पण या ठिकाणीं आश्रम निर्माण करून तपश्चर्या केली असल्याचा उल्लेख स्कंदपुराणामध्यें आलेला आहे. अनसूयेची तपश्चर्या फलद्रूप होऊन त्रिमूर्तींनीं दत्तात्रेयाच्या रूपानें येथेंच अवतार घेतला असेंहि म्हटलें जातें. या सर्व इतिहासाची साक्ष म्हणून हें ठिकाण 'अनसूया' याच नांवानें ओळखलें जातें. येथें अनसूयादेवीचें मंदिर असून त्यांत श्रीअनसूयामातेची मूर्ति विराजत असलेली आपल्याला पहावयास सांपडतें.

येथें श्रीअनसूयामातेच्या मुखकमलावर कांहीशी उग्रतेची छटा उमटलेली दिसत आहे. तें ठीकच आहे. करारी वृत्तीनें लोककल्याणाकरितां अंगीकारलेलें कार्य यशस्वी रीतीनें पार पाडावयाचें असेल तर मार्दवाच्या साहचर्याला काठीण्य, सौम्यपणाच्या साहचर्याला उग्रपणा आणि दयेच्या जोडीला नैष्ठुर्य हें आवश्यक असतें. विकारांच्या विनियोगावरच त्यांची उपयुक्तता अथवा अनुपयुक्तता अवलंबून असतें. ज्या विकाराचें पर्यवसान उत्तम फलाचा लाभ करून देण्यांत होत असतें तो विकार आदरणीय ठरतो, व ज्या विकाराचा शेवट अधोगतीमध्यें होतो तो विकार त्याज्य ठरतो. या दृष्टीनें पाहतां प्रस्तुत स्थलीं अनसूयेच्या मुखावर दिसणारी उग्रतेची छटा ही तिच्या करारी वृत्तीची द्योतक आहे. अनसूयेच्या करारी वृत्तीला पातिव्रत्याचें प्रबल अधिष्ठान होतें. पातिव्रत्यमूलक सदाचार, स्वधर्ममूलक तपोनिष्ठा आणि लोककल्याणमूलक करारी वृत्ति या त्रयींतूनच अनसूयेच्या उदरीं त्रिगुणात्मक त्रिमूर्तीचा दत्तात्रेयाच्या रूपानें अवतार झालेला आहे.

अनसूया हें स्थान एरंडी नदी आणि श्रीनर्मदा माता यांच्या पवित्र संगमाच्या अगदीं जवळच आहे. अनसूया मंदिराच्या समोरच नर्मदेच्या उत्तर-तटावर सुवर्णशिला नांवाचें एक छोटेंसें क्षेत्र आहे. या क्षेत्राजवळच एरंडी नदी आणि नर्मदा यांचा सुरेख संगम आहे. अनसूयेच्या पातिव्रत्यप्रभावानें प्रसन्न झालेल्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तींनीं अनसूयेच्या विनंतीवरून एरंडी नदीच्या रूपानें येथेंच कायमचें वास्तव्य केलेलें आहे. त्रिमूर्तिस्वरूप एरंडी नदीचा महिमा पुराणांतरीं फार मोठा वर्णिलेला आहे. एरंडी नदी आणि नर्मदा यांच्या या पवित्र संगमाला हत्याहरण तीर्थ असें म्हणतात. हेंच आमच्या अत्रिमहर्षींचें आश्रमस्थान होय. हत्याहरणतीर्थ हें केवळ हत्यादोषाचेंच हरण करीत नसून तें पुत्रकामनेनें प्रवृत्त होऊन या

ठिकाणीं तप करणाऱ्यांना पुत्रहि देतें व त्यांचे सकल मनोरथ पूर्ण करतें असा अनेक भक्तांचा अनुभव आहे. आश्विन शुद्ध सप्तमीला दरवर्षी या ठिकाणीं मोठी यात्रा भरत असते. प्रायः सर्व यात्रेकरू अनसूयादेवीचा उल्लेख अनसूयामाता अथवा अनसूयामाई या शब्दानेंच येथें करीत असल्याचें दिसून येतें.

## महीसागर संगमावरील अत्रिऋषींचा आश्रम

स्कंदपुराणांतील माहेश्वर खंडांत आलेल्या वर्णनावरून अत्रिमहर्षींचा महीसागर संगमावरहि एक आश्रम होता व तेथेंहि त्यांनीं तपश्चर्या केली असल्याचें दिसून येतें. नर्मदेच्या उत्तरेकडे खंबायतचें आखात सुप्रसिद्ध आहे. या आखाताच्या जवळ असलेल्या खाडीस ज्या ठिकाणीं मही नांवाची नदी येऊन मिळते त्या ठिकाणाला महीसागर संगम असें म्हणतात. रेवासागर संगमाच्या उत्तर दिशेला खंबायतच्या जवळच आपल्याला हा संगम पहावयास सांपडेल. महीनदीला कांहीं ठिकाणीं माही असेंहि म्हटलेलें आढळतें. लोकभाषेंत प्रायः माही हाच शब्द सर्वतोमुखीं रूढ आहे. महीनदी ही आकृतीने लहान असली तरी प्रकृतीनें गंभीर म्हणजे खोल आहे. तिचा महिमाहि अगाध आहे. जी नदी प्रत्यक्ष स्वतः सागराला जाऊन मिळते त्या नदीला महानदी असें म्हणतात. या व्याख्येप्रमाणें पहातां माहीनदी ही महानदी आहे. विष्णूची पत्नी भूदेवी. तिचेंहि नांव महीच आहे. महीसागर संगमाचा महिमाहि मोठा अगाध आहे.

प्रभास-दशयात्राभिः सप्तभिः पुष्करस्य च ।
अष्टाभिश्च प्रयागस्य तत्फलं प्रभविष्यति ।।
वस्त्रापथस्य तिसृभिर्गङ्गायाः पंचभिश्च यत् ।
काश्याः षड्भिस्तथायत्स्याद्गोदावर्याश्च पंचभिः ।।
महीसागर-यात्रायां भवेत्तच्चावधारय ।।

स्कंद पु. माहेश्वर खंड (कौ). ५८।६१–६४
(वेंकटेश्वर प्रेस.)

प्रभासतीर्थाची दहा वेळा व पुष्करतीर्थाची सात वेळा यात्रा केली असतां जें फळ मिळतें तें फल महीसागर संगमाची एक वेळ यात्रा केली असतां मिळतें. वस्त्रापथ क्षेत्राच्या तीन यात्रा व गंगेच्या पांच यात्रा व काशीच्या सहा यात्रा आणि गोदावरीच्या पांच यात्रा, आणखी किती तरी तीर्थक्षेत्रांचा उल्लेख करून त्यांच्या अनेक वेळां यात्रा केल्या असतां जें फळ मिळतें तेंच फळ महीसागर संगमाची यात्रा केली असतां मिळतें; असें महीसागर संगमाचें महत्त्व मुक्तकंठानें वर्णिलेलें आहे. असें हें महत्त्वाचें स्थान अत्रिमहर्षींच्या दृष्टींतून सुटणें शक्य नव्हतें. अत्रिमुनींनीं बराच काळ येथें वास्तव्य करून तपश्चर्या केलेली आहे. महीनदीची अधिष्ठात्री देवता महीदेवी ही चारहि युगांची देवी मानली जाते. मालव देशांतील अर्थात्

माळव्यांतील एका पर्वतांतून ही नदी उगम पावून सुमारें तीनशें-वीस मैल प्रवास करीत येथें असलेल्या आखाताजवळ सागरास येऊन मिळते. या नदीच्या कांठीं अनेक क्षेत्रें आहेत. विश्वनाथ, धारनाथ, वैजनाथ, वारिनाथ, भूतनाथ, सोमनाथ, कामनाथ, त्र्यंबकनाथ आणि सिद्धनाथ या नांवांनीं प्रसिद्ध असलेलीं नऊ शिवमंदिरें आहेत. यांतील देवांना नऊ नाथ असें म्हणतात. त्याचप्रमाणें चौऱ्यांशीं सिद्धांचेंहि वास्तव्य या पवित्र नदीच्या तीरावर असल्याचें सांगितलें जातें. येथें शिवमंदिराबरोबरच पुष्कळशीं देवीचींहि मंदिरें आहेत. यांमध्यें शत्रुघ्नी देवीचें स्थान अत्यंत अलौकिक आहे. ही देवी इकडे शत्रुघ्नीमाता या नांवानें प्रसिद्ध आहे. धारनाथापासून शत्रुघ्नीमातेच्या मंदिरापर्यंतच्या परिसराला गुप्त तीर्थ असें म्हणतात. महीगंगेच्या प्रवाहांत रविवारीं स्नान केल्यास तें अत्यंत पुण्य कारक मानलें जातें. शत्रुघ्नीमातेच्या मंदिराजवळ महीनदीचा डोह फारच मोठा आहे. सुसरी असल्यामुळें येथें स्नानादि व्यवहार जपूनच करावे लागतात. अशा या पवित्र महीनदीच्या मुखाजवळच अत्रिमहर्षींचा आश्रम होता.

अत्र तीर्थे पुरा पार्थ, अत्रिणा विहितं तपः ।
कोटितीर्थाद्दक्षिणतः स्थापितं लिङ्गमुत्तमम् ।।
अत्रीश्वराभिसंज्ञं तु महापापहरं परम् ।
स्थापयित्वा च तल्लिगमग्रे चक्रे सरोवरम् ।।

स्कं. पु., माहेश्वर खंड, अ. ५२, श्लो. १७।१८

याच पवित्र तीर्थावर अत्रिमहर्षींनीं पूर्वीं तप केलें. कोटितीर्थाच्या दक्षिणेकडे त्यांनीं एका शिवलिंगाची स्थापना केली. तें शिवलिंग "अत्रीश्वर" या नांवानें प्रसिद्धीस आलें. या श्रेष्ठ शिवलिंगाच्या दर्शनानें महापातकांचा नाश होतो. अत्रिमहर्षींनीं शिवलिंगाची स्थापना करून तेथेंच एक मोठें सरोवरहि निर्माण केलें. सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय याच ठिकाणीं जन्मास आले असेंहि कांहीं लोकांचें म्हणणें आहे.

## शुचीन्द्रं क्षेत्र

आणखी एक अत्यंत महत्त्वाचें व प्रमाणांचें पाठबळ असलेलें अत्रिमहर्षींच्या तपश्चर्येचें व आश्रमाचें स्थान वाचकांच्या निदर्शनास आणून आम्ही हा विषय येथेंच आटोपता घेत आहोंत. हें स्थान भारताच्या दक्षिण-समुद्राच्या तीरावर त्रिवेंद्रं आणि कन्याकुमारी यांच्यामध्ये "शुचीन्द्रं" या नांवानें सुप्रसिद्ध आहे. कन्याकुमारीपासून सुमारें आठ-नऊ मैलांवर असलेलें हें तीर्थक्षेत्र फारच रमणीय आहे. येथील मंदिरें, सभामंडप आणि गोपुरें यांची शिल्पकला अत्यंत आकर्षक आहे. सभामंडपांतील खांबांची रचना तर अशी वैशिष्ट्यपूर्ण आहे कीं, त्या खांबांवर आघात केले असतां खांबांतून सप्तस्वरांचा सुस्पष्ट आविष्कार होतो. त्यांना म्युझिकल् पिलर्स

( Musical pillars ) असें म्हणतात. विजापूरच्या गोल घुमटामध्यें एका ध्वनीचे अनेक प्रतिध्वनि उमटविण्याचें सामर्थ्य आहे, पण त्यांत आपल्याला सप्त-स्वरांचा साक्षात्कार होणार नाहीं. शुचीन्द्रं येथील त्रिमूर्तींच्या सभामंडपांतील खांब मात्र आपल्याला क्रमानें षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद या सातहि स्वरांचा साक्षात्कार करून देतात. हें अद्‌भुत रचनाचातुर्य मदुरा-मीनाक्षी सोडून भारतांतच काय पण जगांतहि दुसरीकडे आपणांस कोठें पहावयास सांपडणार नाहीं, असें हें विलक्षण त्रिमूर्ति मंदिर आहे. या मंदिरांतील देवतेला त्या प्रांतांतील भाषेंत "स्थानुमालयन्" अथवा स्थाणुमळायम् असें म्हणतात. स्थाणु म्हणजे शिव, माल् म्हणजे विष्णु आणि अयन् म्हणजे ब्रह्मदेव. या तिन्ही शब्दांचें संकलन करून स्थाणुमालयन् असा एकच शब्द बनला. तोच लोकांच्या मुखांतून स्थाणुमळायम् असा उच्चारला जातो. तात्पर्य, ब्रह्मा, विष्णु आणि शंकर या तिन्ही देवतांचा आविष्कार या मंदिरांतील शिवलिंगांतून होत असल्याचें पहावयास सांपडतें. याच अभिप्रायानें भक्तजन येथील शिवलिंगाला हरिहरविभु अथवा हरिहरपितामह असें म्हणतात. कोणी स्थाणुस्वामी असेंहि म्हणतात, तर कोणी त्याला "वडकेडम्" असेंहि म्हणतात.

वडक् आणि केडम् या दोन शब्दांचा मिळून वडक्केडम् असा एकच शब्द बनतो व तोच लोकव्यवहारांत वडकेडम् असा उच्चारला जातो. वडक् म्हणजे वर अर्थात् सर्वांपेक्षां वर म्हणजे श्रेष्ठ असलेलें आणि केडम् म्हणणे क्षेत्र. सर्वोच्च क्षेत्र अथवा सर्वोच्च दैवत असा त्याचा अर्थ होतो. शुचीन्द्रं हें क्षेत्र सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ मानलें जातें व त्या ठिकाणीं असलेलें दैवत महाज्योतिर्लिंगरूप त्रिमूर्ति भगवान् श्रीदत्तात्रेय हेंहि श्रेष्ठच आहेत. याच अभिप्रायानें तें क्षेत्र आणि तेथील देवता या दोघांनाहि उद्देशून वडक्केडम् अथवा वडकेडम् हा एकच शब्द उपयोगांत अधिक आणिला जातो.

ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या तिघांनींहि शुचींद्रं येथें अत्रिमुनींना व महासती श्रीअनसूयादेवी यांना दर्शन दिलें. अत्रिमुनींच्या तपश्चर्येनें व अनसूयेच्या प्रखर पातिव्रत्यानें संतुष्ट होऊन त्यांना इष्ट वर दिला. स्वतःलाच त्यांनीं अत्रि-मनींना व अनसूयेला समर्पण करून घेतलें. अत्रिमुनींच्या इच्छेप्रमाणें ते तिन्ही देव एकरूप होऊन अत्रिमुनींच्या सान्निध्यांत सदैव विराजमान होऊन राहिले. तेंच हें आमचें त्रिमुखी भगवान् दत्तात्रेय आराध्य-दैवत होत. याप्रमाणें त्रिमुखी दत्तात्रेयांच्या रूपानें परमेश्वर अत्रिमुनींच्या सान्निध्यांत सदैव विराजमान झाले खरें, पण तेवढ्यानें महासती श्रीअनसूयादेवी यांचें अंतःकरण संतुष्ट झालें नाहीं. अनसूयेनें त्या तिन्ही देवांची प्रार्थना केली कीं, तुम्ही तिघांनींहि माझ्या उदरीं पृथक पृथक् जन्म घ्यावा. मी माता या नात्यानें तुमचें भरण-पोषण केलें, तुम्हांला अंकीं खेळविलें, तुमचें कोडकौतुक केलें तरच माझ्या मनाला संतोष वाटेल. अनसूयेची ही प्रार्थना ऐकल्यानंतर संतुष्ट झालेल्या त्या ब्रह्मा-विष्णु-महेश स्वरूप

त्रिमूर्तीनें अनसूयेच्या उदरीं पृथक् पृथक् रूपानें जन्म घेतला. त्यांत ब्रह्मदेव चंद्राच्या रूपानें, विष्णु दत्ताच्या रूपानें आणि महेश्वर हे दुर्वास मुनींच्या रूपानें अवतरले. हे तिघेहि अत्रिमुनींचे पुत्र असल्यामुळें त्यांना चंद्रात्रेय, दत्तात्रेय आणि दुर्वास आत्रेय अशा संज्ञा प्राप्त झाल्या. हे तिघेहि प्रत्येकीं एकमुख व द्विभुज असल्यामुळें या अवस्थेंतील भगवान् दत्तात्रेय हे एकमुख व द्विभुज असेंच असल्याचें दृष्टीस पडतें. एकमुख व दोन हात असलेले भगवान् दत्तात्रेयच अद्यापि कित्येक भक्तजनांची ध्येयमूर्ति असल्याचें आढळून येतें. पुढें कालांतरानें हें तिघेहि थोर झाल्यानंतर आपआपल्या कार्यासाठीं आश्रम सोडून दूर जावयास निघाले तेव्हां अनसूया माता ही अत्यंत खिन्न झाली. मातेचा खेद पाहून भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणाले, “आई! तूं खिन्न होऊं नकोस, चिंता करूं नकोस. मी तुझ्याच जवळ राहतों. चंद्र आणि दुर्वास यांना मात्र आपआपलें कार्य करण्यासाठीं आश्रम सोडण्यास अनुमति दे आणि आशीर्वाद दे.” पुढें चंद्र आणि दुर्वास हे दोघेहि अनसूयेजवळ आले. त्यांनीं अनसूयामातेच्या चरणीं प्रणिपात केला. सांगितलें, ‘आई! चिंता करूं नकोस, तुला आमचा सर्वस्वीं वियोग न व्हावा म्हणून आमच्या मूळ स्वरूपांतील दोन-दोन हात त्यांतील आयुधांसह आम्ही दत्तात्रेयाला अर्पण करीत आहोंत’ असें म्हणून चंद्रानें अथवा सोमानें म्हणा, आपल्या मूळ ब्रह्मदेवाच्या स्वरूपांतील दोन हात अक्षमाला आणि कमंडलु यांसह अर्पण केलें. दुर्वासमुनींनीं आपल्या मूळ शंकराच्या स्वरूपांतून दोन हात, डमरू आणि त्रिशूल या आयुधांसह अर्पण केलें. दत्तात्रेय हे स्वतः विष्णुस्वरूप असल्यामुळें त्यांच्या हातांत शंख आणि चक्र हीं दोन आयुधें आहेतच. अशा रीतीनें अनसूयेच्या ध्यानासाठीं व समाधानासाठीं सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे एकमुख व षड्भुज बनले. हेंच ध्यान अनेक भक्तजनांना रुचलें व त्यांनीं दत्तात्रेयांची याच स्वरूपांत ध्यानधारणा केली. आजहि अनेक ठिकाणीं एकमुख व षड्भुज अशाच दत्तात्रेयांच्या मूर्ति उपलब्ध होत असल्याचें आढळून येतें. हेंच ध्यान लक्षांत घेऊन श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांनींहि खालील श्लोकांत त्यांचें वर्णन केलेलें आहे.

> माला कमण्डलुरधःकरपद्मयुग्मे, मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
> यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशङ्खचक्रे, वंदे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।।

ज्याच्या खालच्या दोन हातांत माला आणि कमंडलु आहे, मध्यभागीं असलेल्या दोन हातांत डमरू आणि त्रिशूल आहे, त्याचप्रमाणें वर असलेल्या दोन हातांत उत्तम शंख आणि चक्र आहे; अत्रिमुनींना अभीष्ट वर देणाऱ्या व सहा भुजांनीं युक्त असलेल्या श्रीदत्तात्रेयांना मी वंदन करीत आहें असा या श्लोकाचा अर्थ आहे. या श्लोकांत मुखाचा उल्लेख नसला तरी संप्रदाय परंपरेनें एकमुखी दत्तात्रेयांच्याच ध्यानाचा हा श्लोक मानला जातो.

कांहीं भक्तजनांनीं अत्रिमुनींना इष्ट असलेल्या त्रिमूर्तिस्वरूप भगवान् श्रीदत्तात्रेय यांचेंच ध्यान केलेलें आहे. श्रृंगेरी पीठावरील एक जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य दत्तात्रेयांचें ध्यान करतांना म्हणतात —

शीर्षत्रयेण सहितं शीर्षं वेदत्रयस्य नतलोकान् ।
संबोधयन्तमनिशं भावयतु स्वान्तमादराद्यमिनम् ॥

ज्याला तीन मस्तकें असून जो साक्षात् तिन्ही वेदांचें मस्तक अर्थात् प्रधान प्रतिपाद्य आहे, जो नम्र असलेल्या भक्तजनांना आत्मस्वरूपाचा बोध करून अज्ञाननिद्रेंतून जागृत करीत आहे त्या, संयमशीलांचा सम्राट असलेल्या श्रीदत्तात्रेयांचें ध्यान माझ्या चित्तानें सतत करीत असावें; असा या श्लोकाचा अर्थ आहे. श्रीजनार्दनपंत यांचीहि आराध्यमूर्ति त्रिमुख आणि षड्‌भुज अशीच होती. त्या वेळच्या त्यांच्या प्राचीन चित्राचें छायाचित्र भक्तजनांच्या अवलोकनाकरितां आम्ही याच ग्रंथांत स्वतंत्रपणें दिलें आहे तें अवश्य पहावें. संत तुकाराममहाराज यांनींहि पण "तीन शिरें सहा हात। तया माझा दंडवत" या अभंगांत तीन मुखें व सहा हात असलेल्या दत्तात्रेयांचेंच ध्यान केलेलें आहे.

वक्त्रत्रयधरं देवं षड्ढस्तं नवलोचनम् ।
ब्रह्म-विष्णु-महेशान-रूपिणं प्रणमाम्यहम् ॥ दत्तात्रेय सर्वस्व २२।१

ज्यानें तीन मुखें धारण केलेलीं आहेत, तसेंच ज्याला सहा हात असून नऊ नेत्र आहेत अशा त्या ब्रह्मदेव, विष्णु आणि महेश्वर – स्वरूप असलेल्या अत्रिपुत्र दत्तात्रेयाला मी प्रणाम करीत आहें. असा या श्लोकाचा अर्थ आहे. प्रत्येक मुखाला तीन नेत्र असतात या अभिप्रायानें दत्तात्रेयाला या ठिकाणीं "नवलोचनं" असें विशेषण दिलेलें आहे. अथवा नवलोचन शब्दाचा अर्थ टवटवीत, पाणीदार डोळे असलेला असाहि करावा.

आद्य शंकराचार्यांनींहि आपल्या स्तोत्रवाङ्मयांत त्रिमूर्ति शब्दाचा प्रयोग केलेला आहे. मात्र तो शंकराच्या स्तोत्रांत आहे. निर्गुण-निराकार व दृश्य वस्तूंहून व्यावृत्त म्हणजे निराळें असलेलें परब्रह्मतत्त्वच सृष्टीच्या उत्पत्तीची, स्थितीची आणि प्रलयाची व्यवस्था लावण्यासाठीं गुणभेदानें ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र अथवा महेश्वर या रूपानें नटलें. अत्रिमुनींच्या प्रार्थनेवरून जेव्हां ते तिन्ही देव एकरूप झाले तेव्हां त्यांना त्रिमूर्ति असें नांव पडलें. तिघेहि तत्त्वतः एकरूप असल्यामुळें या तिघांपैकी कोणालाहि उद्देशून त्रिमूर्ति हा शब्द लावीत असल्याचें आढळून येतें.

न भूमिर्नचापो न वह्निर्नवायुर्नचाकाशमास्ते न तन्द्रा न निद्रा ।
न चोष्णं न शीतं न देशो न वेषो न यस्यास्ति मूर्तिस्त्रिमूर्तिं तमीडे ॥

तिसऱ्या चरणांत "चोष्णं"च्या ठिकाणीं मुळांत "ग्रीष्मो" असा शब्द योजलेला आहे. वाचकांनीं अभिरुचीप्रमाणें योग्य तो शब्द घ्यावा. वेदसारशिवस्तव

या स्तोत्रामध्यें आचार्यांनीं वरील श्लोकानें त्रिमूर्तिस्वरूप शंकराचें स्तवन केलेलें आहे. कालिदासानें ब्रह्मदेवाला उद्देशूनहि त्रिमूर्ति या शब्दाचा उपयोग केलेला आहे. इंद्राला बरोबर घेऊन सर्व देव ब्रह्मलोकाला जातात व ब्रह्मदेवाची प्रार्थना करतात—

नमस्त्रिमूर्तये तुभ्यं प्राक्सृष्टेः केवलात्मने ।
गुणत्रयविभागाय पश्चाद्भेदमुपेयुषे ।। कुमारसंभव २।४

हे ब्रह्मदेवा ! सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी तुम्ही केवल एकमेव अद्वितीय परब्रह्मरूप होता. पुढें त्रिगुणात्मक सृष्टि निर्माण करण्याकरितां सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचा भेद केला व नंतर गुणभेदानुरूप ब्रह्मदेव, विष्णु आणि शिव या रूपानें नटला. त्या त्रिमूर्तिस्वरूप तुम्हांला आमचा नमस्कार असो. ब्रह्मदेवाप्रमाणें व शंकराप्रमाणें विष्णूलाहि त्रिमूर्तिस्वरूप मानणें हें ओघानेंच येतें. तत्त्वतः एकरूप पण गुणभेदानें त्रिमूर्तिस्वरूप बनलेले हे तिन्ही देव पुन्हां एकरूपानें केव्हांपासून प्रतीतीला येऊं लागले, हा प्रश्न शिल्लक राहतोच. याच प्रश्नाचें उत्तर घेण्यासाठी वाचकांनीं शुचीन्द्रं या क्षेत्राचा पुरातन इतिहास अवश्य पहावा.

अत्रि आणि श्रीअनसूया या थोर दांपत्यावर त्यांची तपश्चर्या आणि पातिव्रत्य पाहून आत्यंतिक रीतीनें संतुष्ट झाल्यामुळें ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या तिन्ही देवांनीं त्यांना एखादा वर मागावयास सांगितलें. तेव्हां अत्रिमुनि म्हणाले, "तुम्हा त्रिमूर्तींचें एकरूपानें मला सातत्यानें दर्शन घडावें." अशी ही अत्रिऋषींची प्रार्थना ऐकल्यानंतर त्रिमूर्तींनीं तें मान्य केलें. अत्रिमुनींना त्रिमूर्तिस्वरूपांत आपलें कायमचें दर्शन व्हावें म्हणून ते तिन्ही देव स्वायंभुव मन्वन्तरांतील कृतयुगाच्या आरंभीं चिरकाल जिवंत राहणाऱ्या व प्रणवाचें आद्य स्वरूप असलेल्या शुन्चीद्रं क्षत्रांतील अश्वत्थ वृक्षांतून त्रिमुख असलेल्या स्वयंभू महाज्योतिर्लिंगाच्या रूपानें प्रगट झाले. तेंच आमचें आराध्यदैवत भगवान् श्रीदत्तात्रेय होत. अनसूयेला मात्र एवढ्यानें संतोष झाला नाहीं. तिनें तिन्ही देवांनीं आपल्या उदरीं पुत्ररूपानें जन्मास यावें अशी प्रार्थना केली. अनसूयेची प्रार्थना ऐकून ते तिन्ही देव अत्रिमुनींपासून अनसूयेच्या उदरीं पृथक् पृथक् रूपानें जन्माला आले. ब्रह्मदेव चंद्ररूपानें, भगवान् विष्णु हे दत्तरूपानें व महादेव हे दुर्वासमुनींच्या रूपानें जन्माला आले. असा हा शुचीन्द्रं क्षेत्रांतील दत्तात्रेयाच्या जन्माचा इतिहास आहे. शुचीन्द्रं क्षेत्राच्या स्थलपुराणांत अथवा संस्कृत भाषेंत पण मल्याळी लिपींत असलेल्या स्थान-माहात्म्यांत हा इतिहास आपल्याला पहावयास सांपडेल.

(The Sucindram temple Legends Chapter – Page 90-91) Supremely pleased with the noble couple, the Devas permit them to ask for any boon they may like to have. Atri desires that they be blessed with the external Darshan of the three murtis, while Anasuya wishes that the three Gods are to be born as

her Children. Their requests are complied with and the Tri-murtis themselves appear as the three Sons of Atri and Anasuya in the form of Chandra, Dattatriya and Durvasa. Furthermore, in order to afford them perpetual darshan, the Trimurtis consent to manifest themselves in a svayambhu Mahalinga along with, and in front of, an eternally alive Asvatha tree ( Ficue religose ) which is of the form of the primary pranava.

तात्पर्य, अत्रिमहर्षींना प्राप्त झालेल्या वरदानांतूनच त्रिमूर्ति या शब्दाचा व त्रिमुखी भगवान् दत्तात्रेयांचा आविष्कार झालेला आहे. त्याचप्रमाणें परमेश्वराच्या लालनपालनाचा आनंद आपल्याला मिळावा या अनसूयेच्या आकांक्षेंतून द्विभुज व एकमुख असलेल्या दत्तात्रेयांचा आविर्भाव झालेला आहे. एकमुख व द्विभुज दत्तात्रेयांनीं अनेकांना अध्यात्मतत्त्वाचा उपदेश करून कृतार्थ केलेलें आहे. ऐहिक व पारलौकिक सिद्धींचे प्रदान करूनहि कित्येकांचें जीवन धन्य केलेलें आहे.

व्याख्यामुद्रां करसरसिजे दक्षिणे संदधानो
जानुन्यस्तावरकरसरो-जात वामोन्नतांसः ।
ध्यानाधारात्सुखपरवशा-दर्धमामीलिताक्षो
दत्तात्रेयो भसितधवलः पातु नः कृत्तिवासाः ।।

तर्जनी आणि मध्यमा हीं दोन बोटें एकमेकांशीं जोडून उभीं करावींत. अंगुष्ठ' अनामिका आणि कनिष्ठिका या तीन बोटांचे अग्रभाग एकमेकांशीं जुळवावेत आणि तो उजवा हात उजव्या खांद्याशीं समांतरांत उभा करावा. या आकृतीस व्याख्या-मुद्रा असें म्हणतात. तींच उभीं असलेलीं दोन बोटें एकमेकांहून अलग केलीं म्हणजे ती द्वैत-मुद्रा होते. गुरुदेव दत्तात्रेय आणि सद्‌गुरु दक्षिणामूर्ति यांची व्याख्या-मुद्रा आहे तर मध्वाचार्यांची द्वैत-मुद्रा असलेली दृष्टीस पडेल.

दत्तात्रेयांनीं उजव्या करकमलामध्यें व्याख्यामुद्रा धारण केलेली आहे. डावें करकमल डाव्या गुडघ्यावर ठेवलेलें असून ज्यांचा डावा खांदा उंचावलेला दिसत आहे, ध्यानांत निमग्न असल्यामुळें होणाऱ्या आनंदानें ज्यांचे नेत्र अर्धे झांकल्यासारखे दिसत आहेत, त्याचप्रमाणें सर्वांगीं भस्म चर्चिल्यामुळें ज्यांचा वर्ण धवल अर्थात् कृष्णवर्णाची छटा ज्यांत मिश्रित झालेली आहे असा शुभ्र स्वरूपाचा दिसत आहे, तसेंच शंकराप्रमाणें गजचर्म ज्यांनीं पाठीवर धारण केलेलें आहे ते भगवान् दत्तात्रेय आमचें रक्षण करोत, असा या ध्यानाचा अर्थ आहे. त्यांत दत्तात्रेय हे द्विभुज असल्याचें स्पष्ट दिसत आहे. तात्पर्य, भगवान् दत्तात्रेय हे त्रिमुख व षड्भुजहि आहेत. एकमुख व षड्भुजहि आहेत आणि एकमुख व द्विभुजहि आहेत. आपआपल्या अभिरुचीप्रमाणें त्यांच्या कोणत्याहि स्वरूपाचें ध्यान केलें तरी त्याचें उत्तमच फल मिळतें यांत संशय नाही.

शुचीन्द्रं येथें आविर्भूत झालेल्या शिवलिंगाच्या मुळाचा भाग ब्रह्मदेवाचा मानला जातो. मध्यभाग श्रीविष्णूचा आणि अग्रभाग शंकराचा मानला जातो. अर्थात् मूलभाग श्रीब्रह्मदेव, मध्यभाग श्रीविष्णू आणि अग्रभाग श्रीशंकर असा या ठिकाणचा त्रिमूर्तिस्वरूपाचा मूळ आविष्कार आहे. पुढें अनसूयेच्या प्रार्थनेवरून ते तिघेहि अत्रिमुनींपासून अनसूयेच्या उदरीं जन्माला आले व अत्रिमुनींच्या इच्छेनें ते तिघेहि एकरूप होऊन त्यांनीं अत्रिमुनींना व इतरहि भक्तजनांना निरंतर दर्शन देण्यासाठीं या क्षेत्रांत कायमचें वास्तव्य केलें. तेच हे स्थाणुमालयन् अथवा स्थाणुमाळयम् म्हणजे त्रिमूर्तिस्वरूपानें विराजत असलेले भगवान् श्रीदत्तात्रेय होत. ते प्रथम कृतयुगामध्ये स्वयंभू महाज्योतिर्लिंगस्वरूपानें अश्वत्थ वृक्षांतून प्रकट झाले. पिंडीच्या आकारानें प्रकट झालेल्या या स्वयंभू शिवलिंगामध्यें ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तिन्ही देवतांच्या मुखांचे आकार भक्तजनांना प्रत्यक्ष दिसूं लागले. याच कारणास्तव या स्वयंभू महाज्योतिर्लिंगाला हरिहरविभु अथवा हरिहरपितामह असें म्हटलें गेलें. विभु अथवा पितामह या शब्दांचा अर्थ ब्रह्मदेव असा आहे.

वृक्षाच्या मुळापासून शाखा फुटेपर्यंतच्या भागाला आपण बुंधा अथवा खोड असें म्हणतों. या बुंध्याला संस्कृत भाषेमध्यें स्थाणु असें नांव आहे. शुचीन्द्रं या क्षेत्रांत अश्वत्थ वृक्षाच्या खोडापासून प्रथम कृतयुगांत या त्रिमूर्तिस्वरूप शिवलिंगाचा आविर्भाव झाला असल्यामुळें या शिवलिंगाला स्थाणु अथवा स्थाणुस्वामी असें म्हटलें जाणें हें स्वाभाविकच आहे. तिन्ही देवतांचें संकलन करून "स्थाणुमालयन्" हें नांव तेथील लोकभाषेंत रूढ झालें. या त्रिमूर्तीनीं अत्रिमहर्षींना येथेंच आत्मसमर्पण केलें असल्यामळें व अत्रींचे पुत्र या रूपानें ते आविर्भूत झाले असल्यामुळें लोक त्यांना दत्तात्रेय असें म्हणूं लागले.

कृतयुगामध्यें अश्वत्थ वृक्षाशीं संलग्न होऊन या त्रिमूर्तींचा शिवलिंगरूपानें आविर्भाव झाला. त्रेतायुगामध्यें अश्वत्थाच्या जागीं तुलसीवृक्ष प्रकट झाला. भक्तजनांना त्या तुलसीवृक्षाखालीं असलेल्या स्वयंभू महाज्योतिर्लिंगांतच त्रिमूर्तीचा साक्षात्कार होऊं लागला. पुढें द्वापारयुगांत तुलसीवृक्षाची जागा बिल्ववृक्षानें घेतली. अर्थात् तुलसीवृक्षाच्या जागीं बिल्ववृक्ष प्रकट झाला व त्या बिल्ववृक्षाखालीं असलेल्या त्याच स्वयंभू ज्योतिर्लिंगांत भक्तजांना त्रिमूर्तीचें दर्शन होऊं लागलें. पुढें कलियुगामध्यें भगवान् दत्तात्रेय यांनीं याच ठिकाणीं प्रथम राजवृक्षाचा म्हणजे औदुंबर वृक्षाचा आश्रय घेतला. अर्थात् बिल्ववृक्ष नाहींसा होऊन त्या ठिकाणीं राजवृक्ष दिसूं लागला, असें या क्षेत्राच्या प्राचीन इतिहासांत आढळून येतें. तात्पर्य, त्रिमूर्तिस्वरूप भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं क्रमशः शुचीन्द्रं क्षेत्रामध्ये कृतयुगांत अश्वत्थ वृक्षाखालीं स्वयंभू महाज्योतिर्लिंगरूपानें प्रकट होऊन भक्तजनांना दर्शन दिलें. त्रेतायुगामध्यें तेथेंच तुलसीवृक्षाखालीं प्रकट होऊन दर्शन दिलें. द्वापारयुगामध्ये बिल्ववृक्षाखालीं प्रकट होऊन दर्शन दिलें आणि कलियुगामध्यें राजवृक्षाखालीं अर्थात

औदुंबर वृक्षाखालीं प्रकट होऊन दर्शन दिलें असा हा शुचीन्द्रं या क्षेत्रांत असलेल्या अत्रिमुनींच्या आश्रमांतील दत्तात्रेयांचा इतिहास आहे.

## औदुंबर वृक्ष

आतां या ठिकाणीं "राजवृक्ष" या शब्दाचा अर्थ औदुंबरवृक्ष कसा होतो तें आपण पाहूं. राजवृक्ष या शब्दाचा अर्थ बाहवा अथवा खिरणीचा वृक्ष असा आहे. बाहव्याच्या शेंगांतील मगज मृदुविरेचन म्हणून आयुर्वेदांत वर्णिलेला आहे. स्त्रियांची, बालकांची, श्रीमंतांची आणि राजेलोकांची प्रकृति नाजुक असल्यानुळें त्यांना मृदुविरेचनासाठीं बाहव्याच्या शेंगांतील मगजाचा उपयोग होतो. याच अभिप्रायानें बाहव्याच्या झाडाला राजवृक्ष असें म्हटलें आहे. खिरणीच्या वृक्षांना लिंबोळ्यांच्या आकारांचीं फळें येतात व तीं पिकलीं म्हणजे पिवळीं होतात व फार मधुर लागतात. राजे लोकांना तीं फार आवडतात आणि सुलभहि असतात. इतरांना तीं आवडत असलीं तरी दुर्लभ असल्यामळें खिरणीच्या झाडांना राजादन अथवा राजवृक्ष असें म्हणतात. या दोन्ही वृक्षांचा देवतांशीं कांहींहि संबंध नसल्यामुळें प्रकृतस्थळीं त्यांचा कांहीं उपयोग नाहीं.

"वृक्षाणां राजा राजवृक्षः" अशी राजवृक्ष या शब्दाची व्युत्पत्ति आहे. या दृष्टीनें पाहतां मोठे मोठे व देवतांशीं संबद्ध असलेले आणि तसेच लोकांना आदरणीय व पूजनीय असलेले वृक्षच राजवृक्ष म्हणून ओळखले जातात. अशा वृक्षांमध्ये वड, पिंपळ, उंबर, बेल, पळस, तुळस, चंदन इत्यादि वृक्षांचा अंतर्भाव होतो. यांमध्यें प्रकृतस्थळीं राजवृक्ष या शब्दाचा अर्थ करतांना बाहव्याचें अथवा खिरणीचें झाड असा अर्थ करतां येत नाहीं. कारण तो अर्थ प्रकृतस्थळीं अनुपयुक्त आहे, हें आपण वर पाहिलेंच आहे. अश्वत्थवृक्ष, तुलसीवृक्ष आणि बिल्ववृक्ष हे तिन्ही वृक्ष क्रमानें ब्रह्मदेव, विष्णु आणि महादेव यांनीं आश्रिलेले आहेतच. चंदनवृक्ष हा नागराजांचे अधिष्ठान असल्यामळें त्याचा कोणी सहसा आश्रय घेत नाहीं. पलाश म्हणजे पळस. हा यज्ञीय वृक्ष म्हणून पवित्र असला तरी आश्रयाच्या दृष्टीनें तो फारसा उपयुक्त नाहीं. आतां राहतां राहिले वड आणि उंबर. भगवान् दत्तात्रेय हे अवधूत असल्यामुळें ते सदासर्वकाळ सर्वत्र संचार करीत राहणार. त्यांना जेव्हां कोठें बसावेसें वाटेल अथवा विश्रांति घ्यावीशी वाटेल त्या वेळीं ते वड किंवा औदुंबरवृक्ष या दोन वृक्षांपैकीं औदुंबर वृक्षच पसंत करतील. कारण औदुंबराची छाया शीतल आहे आणि त्वचाहि शीतल आहे. हिरण्यकशिपूच्या देहाचें नखांनीं विदारण करून त्याचा अंत केल्यानंतर आपल्या नखांचा दाह श्रीनरसिंह भगवान् यांनीं आपलीं नखें उंबराच्या त्वचेंतच रोवून शांत केला. उंबराला सदासर्वकाळ फळें असतात व तीं पिकलीं म्हणजे अंजिराप्रमाणें मधुर लागतात. उंबराच्या खालीं प्रायः पाणीहि जवळच असतें. औषधिशास्त्राच्या दृष्टीनेंहि औदुंबर वृक्ष फारच उपयुक्त आहे.

मानवी जीवनांत उंबराच्या वृक्षाचा जितका उपयोग होतो तितका दुसऱ्या कोणत्याहि वृक्षाचा होत नाहीं; असें म्हटल्यास त्यांत कांहीं अतिशयोक्ति होणार नाहीं. या वृक्षाला यज्ञीय वृक्ष असें म्हणतात. याच्या काष्ठापासून यज्ञीयपात्रें तयार करतात. याचें लांकूड अत्यंत चिवट असतें. प्राचीन काळीं उंबराच्या काष्ठांचेच दरवाजे करीत असत. पळस, खैर, पिंपळ व वड यांच्यापेक्षां उंबराच्या समिधा अत्यंत श्रेष्ठ मानल्या जातात. आरोग्य सुरक्षित राखण्याच्या दृष्टीनें तर औदुंबरवृक्षाचा फारच उपयोग होतो. औदुंबर वृक्षाचा आयुर्वेदाने क्षीरीवृक्षांत अन्तर्भाव केलेला आहे. क्षीरीवृक्ष हे स्वत: चिरजीवी असून त्यांचा योग्य रीतीनें उपयोग करणाऱ्या मानवालाहि ते चिरजीवी बनवितात. वड, उंबर, पिंपळ, प्लक्ष म्हणजे पायरी अथवा नांदुरकी, त्याचप्रमाणें खिरणी इत्यादि क्षीरीवृक्षांमध्यें औदुंबरवृक्ष हा उपयुक्ततेच्या दृष्टीनें सर्वांत श्रेष्ठ आहे. आबालवृद्ध सर्वांनाच हा वृक्ष परिचित असल्यामुळें याची ओळख करून देण्याची आवश्यकता नाहीं.

याचीं फळें अंजिरांच्या फळांसारखीं दिसतात. कच्चेपणीं तीं हिरवीं असून पक्व अवस्थेंत त्यांना तांबूस रंग येतो. पिकलेलीं फळें खावयास मधुर असल्यामुळें लहान मुलें व मोठीं माणसेंहि तीं आवडीनें खातात. कच्चीं फळें तुरट असतात. त्यांची भाजी फार चांगली होते. याचा चीक प्रथम दुधासारखा पांढराशुभ्र दिसतो व नंतर तो पिवळसर रंगाचा होतो. म्हणून या वृक्षाला संस्कृतमध्ये हेमदुग्ध असें म्हटलेलें आहे. याच्या पिकलेल्या फळांत बहुधा चिलटाप्रमाणें सूक्ष्म अशीं असंख्य कीटकें असतात म्हणून याला "क्रमिफल:" असेंहि म्हटलेलें आहे.

"उदुम्बरो हिमो रूक्षो गुरुः पित्तकफास्त्रजित् ।
मधुरस्तुवरो वर्ण्यो व्रणशोधनरोपण:" ।। – भावप्रकाश

औदुंबर हा शीतवीर्य असून गुणांनी तो गुरु आणि रूक्ष आहे. त्याचा रस मधुर आणि कषाय म्हणजे तुरट आहे. तो आपल्या गुरुगुणानें व मधुर रसानें वातदोषाला जिंकील. तो शक्तीनें शीत व रसानें मधुर असल्यामुळें पित्ताला जिंकील आणि रूक्ष गुणामुळें व कषाय रसामुळें कफदोषाला जिंकील. पित्त आणि रक्त यांचा घनिष्ठ संबंध असल्यामुळें औदुंबराच्या सेवनानें पित्तविकारांबरोबरच रक्तविकारहि नाहींसे होतात. असा हा औदुंबरवृक्ष वात, पित्त आणि कफ या तिन्ही दोषांपासून निर्माण होणाऱ्या विकारांना नाहीसें करणारा आहे.

अंगावर कोठेंहि सूज आलेली असल्यास उंबराचा चीक लावावा. त्यामुळें सूज उतरते व वेदनाहि कमी होतात. व्रण, करट, केस्तूड अथवा बेंड झालें असल्यास औदुंबराच्या कोवळ्या डिऱ्या (फांद्यांच्या शेवटचीं टोकें) कुटून त्याचा काढा करावा व त्या पाण्यानें व्रण धुवून काढावा. यामुळें व्रण शुद्ध होतो. व्रणावर उंबराचा चीक लावल्यानें व्रण भरून येतो. उंबराची साल उगाळून लावल्यास करट, केस्तूड वगैरे निमित्तानें आलेली सूज कमी होते अथवा व्रणाला लौकर पक्वता येऊन त्यांतील पू निचरून

जातो, वेदना थांबतात व आराम वाटतो. व्रण बरा झाल्यानंतरहि त्या जागीं साल उगाळून लावल्यास आणि वरचेवर उंबराच्या आंतरसालीच्या काढ्यानें व्रणाची जागा धुतल्यास शरीरावरील व्रणाचा डागहि नाहींसा होतो.

उंबराचीं पिकलेलीं फळें फार खाऊं नयेत. त्यानें जाठराग्नि मंद होतो व मलाचा अवष्टंभहि होतो. पिकलेलीं फळें अथवा त्या फळांचें चूर्ण खडीसाखरेच्या चूर्णाबरोबर औषधाप्रमाणें परिमित प्रमाणांत खाल्ले तर त्याचा फार चांगला उपयोग होतो. शुक्र धातूचा पातळपणा नाहींसा होऊन वीर्य घन आणि सुदृढ बनतें. स्वप्नावस्था हा दोष नाहींसा होतो.

देवी, गोवर आणि कांजिण्या येऊन गेल्यानंतर उंबराच्या सालीचे गंध उगाळून सर्वांगाला लावावें. तास अर्धा तास थांबून नंतर उंबराचीं पानें कुटून तापविलेल्या पाण्यानें स्नान करावें. अथवा स्नानाच्या पाण्यांत उंबराची अन्तरसाल घालून उकळी येईपर्यंत पाणी तापवावें व त्या पाण्यानें रुग्णाला स्नान घालावें म्हणजे त्वचेवर दिसणारे फोडांचे डाग नाहीसे होतात. अन्तरसालीप्रमाणेंच उंबराच्या झाडाच्या कोवळ्या कोवळ्या डिऱ्या (फांद्यांचे अग्रभाग) यांचाहि उपयोग करतात. डिऱ्या कुटून त्या कल्काचा व्रणाच्या मुखावर लेप केला असतां व्रण लौकर भरून येतो. उंबराच्या पानांच्या काढ्यानेंहि व्रण धुवून काढण्याची पद्धति आहे.

अतिसार रक्तातिसार, प्रवाहिका (आव मुर्डा इत्यादि), ग्रहणी विकारांच्या प्रथमावस्थेंतहि उंबराच्या सालीचा काढा द्यावा, अथवा उंबराच्या झाडाचा चीक रोग्याच्या वयाप्रमाणें व शक्तीप्रमाणें पांच ते दहा थेंब बत्ताशांत घालून दिला असतां त्याचा चांगला उपयोग होतो. या अवस्थेंत उंबराच्या कच्च्या फळांची भाजीहि देण्याची पद्धति आहे. याच उपचारानें स्त्रियांचा रक्तप्रदरहि थांबतो. हा विकार "अंगावरचें जातें" या शब्दांनीं सांगितला जातो. या विकारांत स्त्रिया अत्यंत अशक्त व निरुत्साही बनतात. वरील उपचार त्यांनाहि उपयुक्त होतो. उंबराच्या सालीच्या काढ्यानें रक्तप्रदराप्रमाणें श्वेतप्रदरहि बरा होतो. लहान मुलांना दांत येत असतांना जे अनेक विकार उद्भवतात अशा वेळीं उंबराचा चीक बत्ताशांतून खावयास द्यावा. सर्व विकार नाहींसे होऊन दांत सुखानें येतात. गर्भपोषणांतहि या उपचाराचा फार चांगला उपयोग होतो.

उंबराचीं पिकलेलीं फळें खडीसाखरेच्या चूर्णाबरोबर खाल्लीं असतां तळहात, तळपाय, पोट, डोळे व टाळू या ठिकाणीं होत असलेला दाह थांबतो. सालीचें चूर्ण तीन ते सहा मासे, काढा पांच ते दहा तोळे अथवा चीक दहा ते वीस थेंब, रोग्याचें प्रकृतिमान पाहून तें द्यावें. त्यानेंहि दाह शांत होतो. उंबराच्या सालीचा अथवा फळांचा काढा खडीसाखरेच्या चूर्णाबरोबर द्यावा. अथवा त्या काढ्यांत अगदीं थोडासा उत्तम सुगंधि तांदळाचा जरा असट भात द्यावा म्हणजे गर्भ स्थिर राहतो. त्याचा स्राव अथवा पात होण्याची भीति राहत नाहीं.

मधुमेहामध्येंहि उंबराचा चांगलाच उपयोग होतो. उंबराच्या सालीचें चूर्ण, डिऱ्यांचा काढा अथवा चीक यांचा उपयोग करतात. लहान मुलांना जेव्हा मुडदुस होतो, मुलें सारखी क्षीण व कृश होत जातात, खाल्लेप्यालेले अंगीं लागत नाहीं, हात-पायाच्या काडच्या बनतात व पोट मात्र नगाऱ्यासारखें फुगते अशा वेळीं उंबराच्या चिकाचा अथवा काढचाचा फार उपयोग होतो. गंडमाळा या विकारांतहि उंबराचा चीक लावला असतां सर्व गांठी बसतात. छातीला उंबराचा चीक लावला असतां छातीचें दुखणेंहि नाहीसें होतें. आश्विन महिन्यांत अथवा कार्तिक मासांत उंबराच्या मुळाला थोडासा घाव केला असतां पाण्याची धार लागते. तें पाणी प्यावयास दिलें असतां कडकी व रक्तदोष नाहींसे होतात. यानें पूयप्रमेह अथवा गर्मीसारखे दुर्धर विकारहि नाहींसे होतात. उंबराची साल चेचून रात्रीं पाण्यांत भिजत घालावी व दुसरे दिवशीं सकाळीं ते पाणी प्यावें म्हणजे स्त्री कितीहि अत्यार्तव दोषानें पीडित असेल तर तिची ती पीडा नाहींशी होईल. उंबराच्या सालीचा रस तुपांत घालून ऊन करून प्यावयास द्यावा. चांगला चार पांच तोळे तो पाजावा म्हणजे बचनाग, सोमल इत्यादि जहाल विषांचीहि बाधा नाहींशी होते. असा हा औदुंबरवृक्ष गुणांनी बहुमोलाचा असल्यामुळेच भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं त्याचा अंगीकार केलेला आहे व याच गुणांमुळें तो "राजवृक्ष" या संज्ञेस पात्र झाला आहे. या सर्व दृष्टींनीं विचार करतां अवधूतकुल—मुकुटमणि भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं औदुंबर वृक्षाचा आश्रय करणें हें स्वाभाविकच आहे. अशा रीतीनें परिशेष-न्यायानें राजवृक्ष या शब्दाचा अर्थ कृतस्थलीं औदुंबरवृक्ष असाच ठरतो व तोच वृक्ष वैवस्वत मन्वन्तराच्या आद्य कलियुगापासून दत्तात्रेयांचा प्रिय वृक्ष ठरलेला आहे. हें शुचींन्द्रच्या प्राचीन इतिहासा-वरून लक्षांत येतें.

कोणत्याहि वस्तूचा अथवा शब्दाच्या अर्थाचा निर्णय करतांना ती वस्तु पाहिल्याबरोबर अथवा शब्द उच्चारल्याबरोबर जो अर्थ प्रतीतीला येतो त्या अर्थाचा प्रमाणान्तरानें बाध झाल्यानंतर व दुसरा कोणताहि अर्थ घेणें योग्य ठरत नसेल तर जो अर्थ शिल्लक राहील व योग्य ठरेल तोच त्या वस्तूचा अथवा शब्दाचा अर्थ मानावा लागतो. हा निर्णय ज्या रीतीनें घेतला जातो त्या रीतीला परिशेष-न्याय असें म्हणतात. तात्पर्य, अस्थिर संसाराची निर्मिति करणाऱ्या ब्रह्मदेवाला संसाराचें प्रतीक म्हणून अश्वत्थ वृक्ष आवडणें हें स्वाभाविक आहे. अश्वत्थवृक्ष हा ब्रह्मदेवाचा आवडता वृक्ष म्हणूनच ब्रह्मदेवानें अश्वत्थ वृक्षाच्या मुळाशींच वास्तव्य केलेलें आहे. ब्रह्मदेवाच्या पाठोपाठ अश्वत्थाच्या मध्यभागीं विष्णूनें वास्तव्य केलें व अग्रभागीं शंकरानें वास्तव्य केलेलें आहे. अशा रीतीनें अश्वत्थ वृक्ष हा तिन्ही देवतांचा आश्रयस्थान बनला म्हणून त्याला वृक्षराज असें म्हटलेलें आहे.

"मूलतो ब्रह्मरूपाय मध्यतो विष्णुरूपिण
अग्रतः शिवरूपाय वृक्षराजाय ते नमः"

अश्वत्थवृक्षाचें दर्शन घेतांना हा श्लोक म्हटला जात असल्याचें ऐकण्यांत येतें. या वरील श्लोकांत संपूर्ण अश्वत्थ वृक्षच त्रिमूर्तिस्वरूप असल्याचें स्पष्टच सांगितलें आहे. तिन्ही देवतांचें रूप अश्वत्थामध्यें असलें तरी तो प्राधान्यानें ब्रह्म-देवाचाच वृक्ष मानला जातो. अश्वत्थवृक्षाचें हें महत्त्व लक्षांत घेऊनच कृतयुगामध्यें शुचींद्रं क्षेत्रांत अश्वत्थवृक्षाच्या आश्रयानें प्रथम अत्रिमुनींना त्रिमूर्तीचा साक्षात्कार झाला व नंतर सर्व भाविकांना तें दर्शन घडूं लागलें.

तुलसीवृक्ष विष्णूला अत्यंत प्रिय आहे. आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावानें विष्णूलाहि प्रभावित करणारी वृंदा ज्या ठिकाणीं सती गेली त्या ठिकाणीं तुळस प्रकट झाली. वृंदा ही जलंधर दैत्याची पत्नी. ती अनसूयेप्रमाणेंच परम पतिव्रता होती. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावानें तिचा पति जलंधर दैत्य देवांना अजिक्य झाला. देवांच्या प्रार्थनेवरून विष्णूनें अगदीं तंतोतंत जलंधराचेंच रूप धारण केलें. वृंदेला हें विष्णूचें कपट ओळखतां आलें नाहीं. हा आपला पति जलंधरच आहे असें समजून ती मुग्ध झाली व तिचें चित्त चंचल झालें. इकडे देवांशीं युद्ध करण्यांत गुंतलेला जलंधर दैत्य हतबल होऊन युद्धांत ठार झाला. देव विजयी झाले. अशा रीतीनें देवांचें कार्य साधलें खरें पण विष्णूला मात्र आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. पुढें जेथें वृंदा सती गेली तेथेंच प्रकट झालेल्या तुलसीवृक्षाच्या छायेंत भगवान् विष्णु हे वृंदेचें चिंतन करीत आदरानें निरंतर राहिले. आरोग्याच्या दृष्टीनें उपयुक्त असलेले अलौकिक गुणधर्म, सौगंध्य आणि मोहक मंजरींचा समुच्चय यांमुळें तुलसीवृक्ष विष्णूला अत्यंत प्रिय झाला व तसाच तो आजहि आहे. तुलना करण्याच्या दृष्टीनें दुसरा कोणताहि वृक्ष तुलसीवृक्षाच्या तुलनेला पुढें येऊंच शकत नाहीं. याच अभिप्रायानें या वृक्षाला तुलसी असें म्हटलेलें आहे. तुळशीची बरोबरी करण्यासाठीं जो वृक्ष पुढें येतो तो गुण-धर्मांनीं व योग्यतेनें तुलसीपेक्षां कमीच ठरतो असा तुलसीचा महिमा आहे. " तुलां सादृश्यं स्यति नाशयति इति तुलसी " अशी तुलसी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. तुलना करण्याकरितां पुढें येणाऱ्या वृक्षांचा ती नाश म्हणजे पराभव करते म्हणून तिला तुलसी असें म्हटलेलें आहे. एकदां सत्यभामेनें श्रीकृष्णाची सुवर्णतुला करण्याचा समा-रंभ योजला. विधिपूर्वक पूजन करून तराजूच्या एका पारड्यांत श्रीकृष्णाला बसविलें आणि दुसऱ्या पारड्यांत सोन्याच्या चिपांवर चिपा रचल्या पण श्रीकृष्णाचें पारडें तिळमात्रहि जागचें हलेना. सत्यभामा पेंचांत पडली ! ही श्रीकृष्णाची सुवर्णतुला पूर्ण कशी होणार ? इतक्यांत रुक्मिणी तेथें आली व तिनें परमेश्वराचें भक्तिपूर्वक स्मरण करून एक तुलसीदल त्या सुवर्णराशीवर ठेविलें. तावडतोब श्रीकृष्णप्रभूंची सुवर्णतुला पूर्ण झाली व सत्यभामेचा संकल्प कडेस गेला. असा हा तुलसीदलाचा महिमा आहे. याच कारणामुळें त्रेतायुगांत शुचीन्द्रं या क्षेत्रांत त्रिमूर्तीचा आविर्भाव तुलसीवृक्षांतून झाला असल्याचें वर्णिलेलें आहे.

तुलसीवृक्षाप्रमाणेंच बिल्ववृक्षदेखील लोकोपयोगी व विविध गुणधर्मांनीं

युक्त असल्यामुळें शंकरांना अत्यंत प्रिय आहे. एक बिल्वदल जरी शंकराला अर्पण केलें तरी तें तीन जन्मांत घडलेल्या पापांचा निरास करतें. यावरून तें शंकरांना किती प्रिय आहे याची कल्पना करावी. बिल्वदल हें तीन दलांनीं युक्त असल्यामुळें त्याला त्रिदल असें म्हणतात. विश्वाच्या उत्पत्तीला, स्थितीला आणि प्रलयाला कारणीभूत असलेले सत्त्व, रज आणि तम हे तीन गुणच जणूं काय बिल्वदलाच्या रूपानें साकारलेले आहेत म्हणून त्याला त्रिगुणाकार असें म्हणतात. बिल्वदलांतील तीन पानें हीं शंकराच्या नेत्रांप्रमाणेंच दिसतात. शंकराचा तिसरा डोळा हा भालप्रदेशीं बिल्वदलांतील वरच्या दलाप्रमाणें उभाच असतो. बिल्वदल हें शंकराच्या नेत्रांचें प्रतीक असल्यामुळें त्याला "त्रिनेत्रं" असें म्हटलेलें आहे. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक अशा तीन प्रकारच्या दुःखांचा निरास करणारें तें बिल्वदल तीन आयुधांचें अथवा त्रिशूलाचें प्रतीक असल्यामुळें त्याला "त्रियायुध" असें म्हटलेलें आहे. शंकराला बिल्वदल समर्पण केल्यानें त्रिविध दुःखांचा परिहार होतो असाहि त्याचा अर्थ आहे. त्रि अधिक आयुध यांचा संधि त्र्यायुध असा न करतां त्रियायुध असा केला आहे तो आर्षसंधि समजावा. अति प्राचीन काळांत "त्रियायुषं" अथवा "वरेणियं" असे संधि आढळतातच. त्याचप्रमाणें हाहि संधि समजावा. इतक्या गुणांचें व त्रियांचे प्रतीक असलेलें एक बिल्वदल जरी शिवाला अर्पण केलें तरी तें तीन जन्मांच्या पातकांचें निरसन करतें. "त्रिदलं त्रिगुणाकारं त्रिनेत्रं च त्रियायुधम्‌-त्रिजन्मपापसंहारमेकबिल्वं शिवार्पणम्" असा हा बिल्ववृक्षाचा महिमा असल्यामुळें द्वापारयुगांत भगवान् दत्तात्रेय हे शुचीन्द्रं क्षेत्रांत बिल्ववृक्षाच्या आश्रयानें त्रिमूर्ति ज्योतिर्लिंग स्वरूपानें प्रकट झाले.

अश्वत्थ, तुलसी आणि बिल्व या तिन्ही वृक्षांचें स्थान कलियुगामध्यें औदुंबरवृक्षानें घेतलें असल्यामुळें औदुंबरवृक्ष हा कलियुगांतील कल्पवृक्ष झाला आहे. या औदुंबररूपी कल्पवृक्षांतूनच भगवान् श्रीदत्तात्रेय हे शुचीन्द्रं क्षेत्रांत त्रिमुख महाज्योतिर्लिंगाच्या रूपानें अत्रिमुनींना दर्शन देण्यासाठीं प्रकट झाले व भक्तजनांना अनुगृहीत करण्यासाठी तसेच ते तेथें विराजत आहेत. त्याचप्रमाणें, औदुंबरवृक्षाखालीं विधिपूर्वक अनुष्ठान करून दत्तात्रेयांच्या मंत्राचा जप केल्यास तो मंत्र लौकर सिद्ध होतो व सफलहि होतो. औदुंबरवृक्षाखालीं श्रीदत्तात्रेय प्रभूंची विधिपूर्वक उपासना केली असतां ती सत्वर फलद्रूप होते व दत्तात्रेयांचा साक्षात्कारहि होतो असा अनेक भक्तांचा अनुभव आहे. याच कारणास्तव सर्वत्र दत्तात्रेयांच्या चित्रांमध्यें व मूर्तीच्या सांन्निध्यांतहि तसेंच जेथें जेथें श्रीदत्तात्रेयांच्या पादुका असतील तेथें प्रायः आपल्याला औदुंबरवृक्ष असल्याचें दृष्टीस पडतें.

## शुचीन्द्रं हें नांव कसें झालें ?

इंद्र हा देवांचा राजा. तो देवांचा राजा झाला खरा पण तो इंद्रियदमनांत आणि मनोनिग्रहांत कच्चा होता. मनोनिग्रह आणि इंद्रियनिग्रह हे यशस्वी जीवनाचे

दोन आधारस्तंभ आहेत. हे निग्रह ज्याला साधले नाहींत त्याच्या जीवनाचा गाडा कधीं सुरळीत चालणार नाहीं. मग तो इंद्र असो अथवा साधा सेवक असो. हा नियम सर्वांना अबाधित आहे. एकदां इंद्र हा इंद्रियांच्या आहारीं गेला. कांहींतरी क्षुद्र विचार करीत बसला. इतक्यांत नारदमुनि तेथें आले. इंद्रानें वंदन करून त्यांचें स्वागत केलें. उच्च आसनावर त्यांना बसविलें. अर्घ्य, पाद्य, मधुर फळें आणि पाणी देऊन कुशल प्रश्न विचारले. 'महाराज! आपण चोहोंकडे फिरतां, तरी एखादी मनोरंजक वार्ता सांगा.' नारद म्हणाले, "देवराज! काय सांगूं तुला! मृत्युलोकामध्यें फिरतां फिरतां गौतम मुनींच्या आश्रमांत गेलों. त्यांच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत आहें तोंच पर्णकुटीच्या आंतल्या बाजूस दिव्य प्रकाश झळकल्यासारखें दिसलें. बोलतां बोलतां जरा आंत ओझरती नजर टाकली तों काय सांगूं! एक अत्यंत लावण्यवती आणि सुस्वरूप अशी सुंदर स्त्री दृष्टीस पडली. अरे! ती ब्रह्मदेवाची कन्या अहल्या! जणूं कांहीं ब्रह्मदेवानें आपलें सर्व कौशल्य एकवटून ती मूर्ति रचली आणि जगांतील सारें सौंदर्य त्या मूर्तींत ओतलें आहे असें वाटूं लागलें! अरे! एवढा मी विरक्त पण माझेंहि मन तिला पाहून बावरलें! वाटलें, मला ही स्त्री मिळाली असती तर ब्रह्मचर्याश्रमाचा संकल्प मीं झुगारून टाकला असता. हरि हरि म्हणत वीणा खांद्यावर घेवून त्रैलोक्यामध्यें वणवण करीत फिरण्याची ही दगदगहि पण मीं टाळली असती. या स्त्रीच्या सान्निध्यांत सुखाचा संसार करीत बसलों असतों. खरोखर अशा अत्युत्कृष्ट स्त्रीरत्नाचा लाभ ज्याला झाला तो धन्य होय. धिक्कार असो आमच्या जीवनाला. पण आतां काय उपयोग? चला आपलें हरिनाम गाऊं या." असें म्हणून नारदांनीं तंबोऱ्याच्या तारा छेडल्या व हरिनारायण हरिनारायण हीं अक्षरें म्हणत त्यांनीं पहाडी खमाजाची एक दीड सप्तकी लांब पल्ल्याची तान भिरकावली आणि ते इंद्राचा निरोप घेऊन निघून गेले.

नारदमुनींच्या मुखांतून अहल्येचें तें अलौकिक रूप ऐकून इंद्र बेचैन झाला! त्याचें चित्त तिच्या रूपावर बहाळलें. तो अगदीं मुग्ध झाला. त्याला कांहीं सुचेना. अन्न गोड लागेना, पाणी गोड लागेना, राज्य-वैभवांत मन रमेना. उर्वशी, रंभा, मेनका इत्यादि शेंकडों अप्सरा सेवेला होत्या. पण व्यर्थ. सारें त्रैलोक्य त्याला उदास दिसूं लागलें. मला ती अहल्या कशी मिळेल? अहल्या अहल्या हें एकच चिंतन तो करूं लागला.

गौतमऋषींची पत्नी प्रातःस्मरणीय श्रीअहल्या ही अत्यंत रूपवती होती हीं गोष्ट खरी आहे, पण ती अत्यंत पतिव्रताहि होती. ती इंद्राला कशी वश होणार? एकदां गौतमऋषि स्नानसंध्येच्या निमित्तानें आश्रमाबाहेर गेले आहेत व आश्रमांत अहल्येशिवाय दुसरें कोणी नाहीं अशी संधि साधून इंद्रानें गौतमऋषींचें रूप धारण केलें. अगदीं तंतोतंत तेंच रूप, तोच वेष आणि तोच शब्द! अशा थाटांत इंद्राची स्वारी आश्रमांत प्रविष्ट झाली. कपटी इंद्र गौतमांचा वेष घेऊन आश्रमांत

शिरला आणि गौतमांच्याच आवाजांत म्हणाला, "अग ए ! कोठें आहेस तूं ? चल लौकर ये." अहल्या स्वयंपाकघरांतून माजघरांत आली. पुढच्या ओटीवर पाहाते तों गौतमांची स्वारी उभी आहे ! अहल्येला इंद्राचे हें कपट ओळखतां आलें नाहीं. ती आश्चर्यानें म्हणाली, "अय्या ! हें काय ? आत्ताच जायचं झालं होतं अन् इतक्या लौकर परत यायचं कसं झालं ?" कपटी इंद्र म्हणाला, "अगऽ काय सांगूं तुला ! मी सरोवरावर स्नानाकरितां गेलों, तों तेथें एक सुंदर स्त्री स्नान करून वस्त्रान्तर परिधान करण्याकरितां सरोवराच्या बाहेर आली. तिचें तें ओलेतीचें रूप पाहून माझें मन चंचल झालें. तिला स्पर्श करण्याकरितां पाऊल पुढें पडणार तोंच मी आपल्या मनाला आवरलें. याहिपेक्षां रूपवती व सुंदर स्त्री आपल्या घरीं असतां आपण परस्त्रीकडे धांव कां घ्यावी ? असा विचार करून मीं मनाला आवरलें आणि घरीं परत आलों. तूं स्नान कर म्हणजे ओलेतीच्या रूपांत मी तुला पाहीन. मधुर मीलनाची माझी मनीषा . . .इतक्यांत अहल्या म्हणाली, "इश्श ! हें काय ! भलतंच कांहीं तरी ! आपल्यासारख्या मनोनिग्रही व इंद्रियनिग्रही असलेल्या तपस्व्याला हें शोभणार नाहीं. धर्मशास्त्रानें विहित असलेल्या गोष्टीहि काळवेळ पाहूनच आचराव्या लागतात. हें मीं काय आपणांस सांगावयास पाहिजे ?" पण गौतमऋषि होते कोठें ते ? तो कपटी इंद्र होता. ती त्या कपटी इंद्राच्या कारस्थानाला बळी पडली. इंद्र हा आपलें कपट-कार्य उरकून निघणार तोंच गौतमऋषींची स्वारी अकस्मात् दत्त म्हणून आश्रमांत येऊन उभी राहिली. त्यांना पाहतांच इंद्र घाबरला व गौतमांची नजर चुकवून त्यानें बोक्याचें रूप घेतलें. म्यॉंव म्यॉंव करीत तो तेथून पळाला ! अहल्येचा निरुपाय झाला. ती घाबरली व गौतमांच्या चरणीं प्रणिपात करून भीत भीत तिनें सर्व वृत्तान्त निवेदन केला.

गौतममुनींनीं अन्तर्दृष्टीनें पाहिलें. या घटनेंत प्रधान अपराधी इंद्र आहे ही गोष्ट खरी, पण अगदीं लेशतः का होईना अहल्येचाहि अपराध आहेच. कळत अथवा नकळत घडलेल्याहि पापांचें परिमार्जन होणें आवश्यक असतें. हिला जर प्रायश्चित्त दिलें नाहीं तर शीलसंरक्षणाचें महत्त्वहि लोकांच्या लक्षांत कसें येणार ? असा विचार करून गौतममुनींनीं अहल्येला "त्वं शिला भव" असा शाप दिलाच. पश्चात्ताप पावून अहल्येनें गौतममुनींचे पाय धरले व क्षमा मागितली. मुनि म्हणाले, "द्वापारयुगीं श्रीरामचंद्र प्रभु येथें येतील, तोंपर्यंत तूं शिलेप्रमाणें निश्चल राहून कांहीं न खातांपितां रामनाम स्मरण करीत बैस. श्रीरामचंद्रप्रभूंच्या चरणकमलांच्या रजःकणांचा पावन स्पर्श होतांच तूं पवित्र होशील व सुखरूपहि होशील." "अहल्या शिळा राघवें मुक्त केली । पदीं लागतां दिव्य होवोनि गेली ।।" असा हा इतिहास सुप्रसिद्धच आहे.

गौतमऋषींनीं आतां इंद्राचा विचार करण्यास आरंभ केला. आश्रमांतील शिष्यांना हांक मारली. अरे ! तो म्यॉंव म्यॉंव करीत पळालेला बोका कोठें आहे ? पाहा. तोच इंद्र असला पाहिजे. लबाड, बोक्याचें रूप घेऊन माझ्या समोरून पळाला.

आणा त्याला धरून. हे गौतमांचे शब्द कानीं पडतांच बोकोबा घाबरले. आतां आपली घडगत नाहीं असें समजून त्यानें इंद्रगोप-किडयाचें रूप घेतलें. इंद्रगोप हा किडा प्राकृतिक शुद्ध रक्ताच्या थेंबासारखा तांबडालाल असतो. तो मखमलीसारखा मऊ आणि चमकदार असतो. मुळें त्याला मखमली किडा असेंच म्हणतात. पावसाळयाच्या आरंभीं मृगनक्षत्राचे एक-दोन पाऊस झाल्यानंतरच हे किडे जन्मास येतात म्हणून यांना मृगाचे किडे असेंहि म्हणतात. हे किडे बागेंत गवताच्या आड लपूनछपून असतात. इंद्रहि तसाच इंद्रगोपाचें रूप घेऊन गौतमऋषींच्या आश्रमांतील हिरवळींत लपून राहिला. थोडा वेळ का होईना, या किडयांनीं इंद्राला जणूं कांहीं थोडा वेळ झांकून ठेवलें म्हणून या किडयांना इंद्रगोप असें नांव पडलें. तांवडया गुंजेसारखा बारीक किडा, तो गौतमऋषींच्या शिष्यांना ओळखतां आला नाहीं. शेवटीं गौतमांनीं दरडावून म्हटलें, चोरा! कोठें आहेस तूं ? येतोस कीं नाहीं समोर. नाहीं तर असशील तेथें मी तुला शापानें भस्मसात् करून टाकीन.

इंद्रगोप-किडयाच्या रूपांत असलेल्या इंद्रानें गौतमांचे ते शब्द ऐकतांच तो घाबरला. गौतमांच्यापुढें हात जोडूनच तो प्रकट झाला. तो दोरीनें बांधलेल्या धनुष्यासारखा वांकला. त्याचें शरीर थरथर कांपूं लागलें. अंगाला दरदरून घाम सुटला. भयानें जीभेची बोबडी वळली. चांचरत चांचरत म्हणाला, "महाराज! क्षमा करा. मी अपराधी इंद्र आहे." गौतम म्हणाले, "काय ? तूं देवांचा राजा इंद्र! ज्यानें त्रैलोक्याला सन्मार्गाचें वळण लावावयाचें तोच जर असा कपटी आणि कुमार्गगामी झाला तर त्याच्या हातून त्याचें कर्तव्य पार कसें पडणार ? तो देवांचा राजा असला तरी त्यालाहि योग्य तें शासन झालेंच पाहिजे. असें म्हणून गौतममुनींनी 'सहस्र भगवान भव' – तुझ्या अपराधाचें फळ म्हणून तुझ्या शरीराला हजार क्षतें पडतील," असा शाप दिला. "ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति" श्रेष्ठ ऋषींच्या शब्दाच्या पाठोपाठ अर्थ हा धांवतच असतो. अर्थात् ते म्हणतील तें खरेंच होत असतें. या न्यायानें पाहतां पाहतां इंद्राच्या शरीराला सहस्र भगें पडलीं! तो महाव्याधीनें नखशिखान्त व्यापला.

इंद्राला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. मी नारदांना मनोरंजनाची गोष्ट सांगा असें न म्हणतां आत्मकल्याणाचा एखादा प्रश्न विचारला असता तर त्यांत माझें आत्मकल्याणच झालें असतें. मनोरंजनाच्या आहारीं जाऊन मीं माझ्यावर ही केवढी आपत्ति ओढवून घेतली आहे! खरोखर मनोरंजनांत आनंद नसून तो मनोनिग्रहांत, सुविचारांत आणि सदाचारांत आहे. हें लक्षांत घेऊन जे कोणी वागतील ते सुखी होतील. आतां मीं काय करावें ? काय केलें असतां माझी या व्याधींतून व पापांतून सुटका होईल ? असा विचार करून इंद्रानें शेवटीं गौतमऋषींचेच पाय धरले! "महाराज! क्षमा करा. मला या व्याधींतून आपण मुक्त करा व या पापांतूनहि मुक्त होण्याचा उपाय सांगा. काय केलें असतां मी शुचि म्हणजे पवित्र होईन तें मला

आपण सांगा." इंद्रानं प्रणिपात करून क्षमा-प्रार्थना केल्यानंतर गौतमऋषींचें अंत:करण द्रवलें. त्यांनीं "तुझ्या शरीरावरील सर्व क्षतें डोळे होतील" असा इंद्रास उश्शाप दिला. इंद्र शापांतून मुक्त झाला. त्याच्या देहाला हजार डोळे दिसूं लागले. तेव्हांपासूनच लोक त्याला सहस्राक्ष असें म्हणूं लागले.

आपल्या शरीरावरील सर्व क्षतें डोळ्यांप्रमाणें सुंदर दिसूं लागलीं खरी, पण हीहि एक प्रकारची विद्रूपताच आहे हें शल्य त्याच्या मनाला डाचूं लागलें. शिवाय आपण केलेल्या पापांतून आपली सुटकाहि होणें आवश्यक आहे असेंहि त्याला वाटूं लागलें. तो आपले गुरु बृहस्पति यांना शरण गेला. बृहस्पति म्हणाले, "इंद्रा! मी सांगतों त्या ठिकाणीं जा. तेथील सरोवरामध्यें स्नान करून परमेश्वराची आराधना कर म्हणजे तूं पूर्णपणें शुद्ध होशील. तुझी सर्व पापांतून सुटका होईल." असें म्हणून बृहस्पति म्हणाले, "दक्षिण सागराच्या तीरावर एक अरण्य आहे. त्या अरण्याला ज्ञानकानन असें म्हणतात. तें एक अत्यंत श्रेष्ठ कोटीचें पावनक्षेत्र असल्यामुळें त्याला ज्ञानवनक्षेत्र असेंहि म्हटलें आहे. ज्ञानारण्य, बोधवन, विद्यारण्य इत्यादि अनेक नांवांनीं या अरण्याचा उल्लेख केला जातो. याच अरण्यांत अत्रिमुनींनीं तप करून दत्तात्रेयासारखा विश्ववंद्य पुत्र प्राप्त करून घेतला म्हणून या अरण्याला 'सन्तानकानन' असेंहि म्हटलेलें आहे." बृहस्पति म्हणाले, "हे इंद्रा! तूं त्या अरण्यांत जा. तेथें तुला एक विशाल सरोवर दिसेल. या सरोवराला प्रज्ञातीर्थ असें म्हणतात. या प्रज्ञातीर्थालाच कोणी देवतीर्थ अथवा पवित्र तीर्थ असेंहि म्हणतात. अत्रिमुनींच्या तपश्चर्येनें आणि श्रीअनसूयेच्या पातिव्रत्यानें संतुष्ट होऊन परमेश्वरानें अत्रिमुनींना व अनसूयेला येथेंच त्रिमुखी महाज्योतिर्लिंगाच्या रूपानें प्रकट होऊन दर्शन दिलें म्हणून या सरोवराला त्रिमुखी तीर्थ असेंहि म्हणतात."

बृहस्पति म्हणाले, "इंद्रा! चिंता करूं नकोस, मी तुझ्याकरितां योग्य प्रायश्चित्ताची योजना करीन. मी अग्नीसारखा पवित्र आहें. माझ्या शब्दावर विश्वास ठेव. ज्ञानपूर्वक केलेल्या या पापकर्माचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं तूं ज्ञानकाननामध्यें जा. तेथें पद्मलोचन परमेश्वराची तूं अनन्यचित्तानें आराधना कर. ज्ञानकाननांतील प्रज्ञातीर्थांत अवगाहन करून तेथें केलेली श्रीहरीची आराधनाच तुला सर्व पापांतून मुक्त करील. तेथेंच तूं पूर्णपणें शुद्ध होशील. मनांतील रुखरुख मावळेल. 'तथैवाहं करिष्यामि प्रायश्चित्तं सुरेश ते। ज्ञानपूर्वं कृतस्यास्य कर्मणो ज्ञानकानने॥ मद्रूपाग्निमुखात्सम्यक् शुद्धो भव शचीपते। संमानय सुरश्रेष्ठ तदर्थं पद्मलोचनम्॥'"

देवगुरु श्रीबृहस्पतींची ही आज्ञा ऐकतांच देवराज इंद्र स्वर्गलोकांतून मृत्युलोकामध्ये आला. मृत्यूच्या कराल दाढेंपासून सुटका करून घेण्यासाठीं अमरांनाहि मृत्युलोकींच यावें लागतें. संसारारण्यांतून पार पडण्यासाठीं मृत्युलोकांतील ज्ञानारण्यच शोधावें लागतें. विद्यारण्यांतच अविद्येचा नाश होतो. प्रज्ञातीर्थांत केलेलें अवगाहनच अज्ञानाचें निरसन करतें. अज्ञानाच्या निरासांतूनच जिवाला सबाह्याभ्यन्तर

शुद्धीचा लाभ होतो. सबाह्याभ्यन्तर शुद्ध झालेले जीवचैतन्य आणि परमात्मचैतन्य यांच्यामध्यें कांहीं भेदच उरत नाहीं. आनंदं ब्रह्म, प्रज्ञानं ब्रह्म, अहं ब्रह्म, सर्वं खल्विदं ब्रह्म हेंच त्या अवस्थेचें स्वरूप बनतें.

गुरुदेवांनीं सांगितल्याप्रमाणें ज्ञानकाननाचा व प्रज्ञातीर्थाचा शोध करीत इंद्राची स्वारी भारतांत आली. भारतांतील तीर्थ-क्षेत्रें व देवता आणि त्यांनाहि पावित्र्य आणि महत्त्व प्राप्त करून देणारे साधु-संत-महात्मे व तत्त्वचिंतक ठिक-ठिकाणीं विराजत असलेले त्यानें पाहिले. श्रद्धापूर्वक होणारीं यज्ञयागादि कर्में आणि भक्तिपूर्वक चाललेले हरिकथा-महोत्सव त्यानें पाहिले. भारतांतील अपूर्व सृष्टि-सौंदर्य, पर्वत, नद्या, अरण्यें त्यानें पाहिलीं. त्याचें मन आनंदानें फुलून गेलें. तो आपल्या मनाशींच म्हणतो आहे, खरोखर किती भाग्यवंत आहेत हे लोक! यांची पुण्याई अपूर्व आहे! परमात्मा जणूं कांहीं यांच्यावर आपण होऊन प्रसन्न झाला आहे. ज्यांना भारताच्या प्रांगणांत मानवदेह लाभला ते खरोखर धन्य होत. परमेश्वराच्या प्राप्तीला मानवदेहाइतकें दुसरें उत्कृष्ट साधन नाहीं. भारतीयांचें भाग्य पाहून आम्हांला मोठा हेवा वाटतो. आम्हीं मोठमोठे दुष्कर यज्ञ केले. खडतर तपें आणि व्रतें केलीं, महादानें दिलीं, स्वर्गलोक जिंकला, इंद्रपद मिळविलें. सर्व कांहीं केलें, पण हें सारें व्यर्थ आहे. नेमकें जें करावयास पाहिजे, तेंच आम्हीं केलें नाहीं. आम्ही इंद्रियांच्या अधीन झालों, विषयभोगामध्यें रमलों. श्रीहरीच्या चरणकमलांचें विस्मरण झालें! धिक्कार असो आम्हांला. अमृत आहे, अप्सरा आहेत, नंदनवन आहे आणि सर्व भोगावयास आकल्प आयुष्यहि आहे. पण हें सर्व असूनहि मनाला शांति नसेल तर याचा काय उपयोग? 'पुनरपि जननं पुनरपि मरणं'ची यातायात टळत आहे काय? दुःखदावानलांतून होरपळून निघण्याची पाळी चुकेल काय? पुन्हां दुःखाचें तोंड पाहण्याची पाळी येणार नाहीं याची खात्री आहे काय? हें कांहीं नसेल तर त्या स्वर्गीय सुखांचा काय उपयोग?

इंद्र म्हणतो, "अजरामर होऊन स्वर्गलोक जिंकावा आणि पुन्हां जन्म-मरण-रूपी दुःखाच्या खाईंत पडावें यापेक्षां क्षणभंगुर मानवदेह पत्करून भारतभूमींत जन्माला यावें आणि सत्संग व सर्वत्याग या मार्गानें विष्णुपदाला पोहोंचून सर्व दुःखां-तून मुक्त व्हावें आणि शाश्वत सुखाचा लाभ घ्यावा, हेंच उत्तम आहे, असें मी समजतों. आपण केलेलें सर्व कर्म अनासक्त वृत्तीनें परमेश्वराला अर्पण करून शहाणे लोक एका क्षणांतच या मर्त्य देहानें श्रीहरीच्या पदाचा लाभ करून घेतात. याच पदाला अभयपद अथवा अमृतपद असें म्हणतात. याप्रमाणें श्रीहरीच्या गोड कथा जेथें नाहींत तो स्वर्गलोक सुखसाधन-सामग्रीनें संपन्न असला तरी काय कामाचा? श्रीहरीच्या सगुण स्वरूपाच्या लीला वर्णन करणारे संत आणि निर्गुण स्वरूपाचें चिंतन करणारे तत्त्वचिंतक जेथें नाहींत तो स्वर्गलोक सुखसमृद्ध असला तरी काय कामाचा? विषसंपृक्त असलेल्या पंचपक्वान्नाच्या ताटाप्रमाणें तो त्याज्यच होय.

जेथें श्रीहरीला उद्देशून यज्ञयाग होत नाहींत, मोठमोठे उत्सव होत नाहींत, दानधर्म नाहीं, नामसंकीर्तन नाहीं तो इंद्रलोक असला तरी खुशाल सोडून द्यावा."

भारताच्या आध्यात्मिक वैभवाचे गोडवे गात गात भारतांतील अनेक तीर्थ-क्षेत्रांना भेटी देऊन इंद्राची स्वारी अखेर शुचीन्द्रं क्षेत्रांत आली. या क्षेत्राला अद्यापि शुचीन्द्रं हें नांव मिळालेलें नव्हतें. त्या वेळीं तें एक अरण्य होतें. तें ज्ञानकानन या नांवानें ओळखलें जात होतें. बृहस्पतींनीं सांगितल्याप्रमाणें या अरण्यांतील एका विशाल सरोवरावर इंद्र येऊन पोहोंचला. आपल्या गुरूंनीं सांगितलेल्या खाणाखुणां-वरून हेंच तें प्रज्ञातीर्थ होय हें त्यानें लक्षांत घेतलें. कोणत्याहि प्रकारची शंकाकुशंका मनांत न आणतां शुद्ध श्रद्धेनें त्या प्रज्ञातीर्थांत स्नान करावें व पद्मलोचन अर्थात् पुंडरी-काक्ष भगवान् श्रीविष्णु यांची आराधना करावी, असा त्याचा नित्यक्रम चालू होता. इंद्राचा शुद्ध भाव पाहून भगवान् विष्णु प्रसन्न झाले. इंद्रास त्यांनीं दर्शन दिलें. श्री-हरीला पाहतांच इंद्रानें प्रणिपात केला. हात जोडून नम्र भावानें तो पुढें उभा राहिला. भगवान् विष्णु म्हणाले," इंद्रा ! ज्ञानपूर्वक घडून आलेल्या पापांतून मुक्त होण्यासाठींच या प्रज्ञातीर्थाची योजना केलेली आहे. तूं या तीर्थांत स्नान करून मी प्रसन्न होईतों-पर्यंत माझी आराधना केलीस यामुळें तूं आतां शुचिर्भूत म्हणजे पवित्र झाला आहेस. तुला आतां दुःखाचें भय उरलें नाहीं. जा, आनंदानें राज्य कर. हे इंद्रा ! तूं या तीर्थांत स्नान केल्यामुळें व माझी आराधना केल्यामुळें शुचि म्हणजे शुद्ध झालास म्हणून हें तीर्थ आणि हें क्षेत्र यापुढें 'शुचीन्द्रं' याच नांवानें ओळखलें जाईल." याप्रमाणें इंद्रास वर देऊन भगवान् विष्णु अन्तर्धान पावले. याच वेळेपासून या स्थानाला शुचीन्द्रं असें नांव पडलें.

## दिव्य परीक्षा

क्षणिक सुखाकरितां केलेल्या पातकांतून इंद्राची एवढ्यावरच सुटका झाली नाहीं. त्याला एका दिव्य परीक्षेंतूनहि पार पडावें लागलें आहे. इंद्र स्वर्गलोकीं जाऊन आपल्या पदावर आरूढ झाला, पण देवांचा त्याच्या पवित्रपणावर विश्वास बसेना. देवसभेंत तो एक चर्चेचा विषय बनला. अखेर शंकरांनीं सांगितलें, " इंद्रा ! तूं एक सोन्याचा नंदी कर. काशीहून कैलास पर्वतावर जा. तेथें उमामहेश्वराचें दर्शन घे, तेथून पायीं प्रवास करीत ज्ञानवनक्षेत्रांतील प्रज्ञाकुंडावर जा, स्नान कर, भली मोठी कढई तुपानें गच्च भरून भट्टीवर ठेव, तो सोन्याचा नंदी त्यांत मधोमध ठेव, तुपाला चांगली उकळी फुटल्यानंतर तीनशें लोकांसमक्ष कढईंत उतरून तो नंदी हातानें वर काढ म्हणजे तुझ्या शुद्धतेची सर्वांना खात्री पटेल." शंकरांच्या सांगण्याप्रमाणें इंद्रानें हें दिव्य केलें. तें लोकांनीं पाहिलें. अन्तरिक्ष मंडलांतून देवांनीं पाहिलें. इंद्र शुचिर्भूत आहे याची सर्वांना खात्री पटली. ही सर्व घटना याच क्षेत्रांत घडल्यामुळें या क्षेत्राला शुचीन्द्रं असें नांव पडलें. इंद्र येथें शुचि म्हणजे शुद्ध झाला म्हणून शुचीन्द्रं हें त्याचें

नांव सार्थ झालें. इंद्राच्या आज्ञेनें विश्वकर्म्यानें या ठिकाणीं त्रिमूर्तींचें सुंदर मंदिर बांधलें. असें सांगतात कीं, मारुतिरायांनीं लंका दहन केल्यानंतर लंकेंतून जें उड्डाण केलें ते याच तीर्थावर उतरले व येथेंच स्नान करून ते शुद्ध झाले. याचें स्मारक म्हणून या ठिकाणीं सतरा-अठरा फूट उंचीची भव्य अशी मारुतिरायांची मूर्ति पाहवयास सांपडते. एवढी मोठी मारुतीची मूर्ति अन्यत्र कोठें सहसा आढळून येत नाहीं.

आजहि या क्षेत्रांतील एकाच प्राकारांत असलेलीं भव्य मंदिरें व गोपुरें पाहण्यासारखीं आहेत. या प्राकाराचें क्षेत्रफळ ब्याण्णव हजार नऊशें चौरस फूट आहे. त्याच्या दक्षिणोत्तर भिंती चारशेंदोन फूट असून पूर्व-पश्चिम भिंती दोनशें तेहतीस फूट आहेत. यावरून या मंदिराच्या भव्यतेची कल्पना येते. येथील मुख्य मंदिर स्थाणुस्वामी भगवान् श्रीशंकर-त्रिमुखी महाज्योतिर्लिगाच्या रूपानें प्रकट झालेले भगवान् दत्तात्रेय यांचें आहे. दुसऱ्या मंदिरांत भूदेवी व श्रीदेवी यांच्यासह असलेली चतुर्भुज भगवान् श्रीविष्णु यांची प्रेक्षणीय दिव्य मूर्ति आहे. तिसऱ्या मंदिरांत भगवान् ब्रह्मदेव आहेत. येथील गरुडमूर्तीहि पण मारुतिरायांच्या मूर्तीप्रमाणेंच अत्यंत उंच आणि भव्य आहे. त्रिमुखी शिवलिंगापुढें विराजत असलेला नंदीहि पण प्रेक्षणीय आहे. श्रीपार्वतीदेवी आणि नटराज तसेंच सुब्रह्मण्यं म्हणजे कार्तिकस्वामी आणि श्रीगणपति याहि देवतांचीं येथें आपल्याला दर्शनें घडतील. मंदिरांजवळच असलेलें विशाल सरोवर व त्यांत पडलेलीं मंदिरांचीं प्रतिबिंबें पाहून मनाला आनंद वाटतो. प्रज्ञातीर्थ अथवा शुचीन्द्रतीर्थ ज्याला म्हणतात तेंच हें सरोवर होय. येथेंच अत्रिमुनींचा आश्रम होता, येथेंच त्यांनीं तपश्चर्या केली, येथेंच त्यांना त्रिमूर्तींचें दर्शन घडलें व येथेंच त्यांनीं श्रीदत्तात्रेयांच्या रूपानें त्रिमूर्तींचा शाश्वत समन्वय घडवून आणला.

याच शुचीन्द्रं तीर्थावर वेदव्यास वसिष्ठमुनि व वामदेव इत्यादि थोर विभूतींनीं द्वापारयुगांत तपश्चर्या व भगवदाराधना केलेली आहे. आद्य शंकराचार्यांना श्रीशिवानें प्रणवोपदेश केलेला आहे. असा हा शुचीन्द्रं या तीर्थाचा व तेथील देवतेचा महिमा आहे. आचार्य म्हणतात –

नमोस्तु वागीशहरीश्वराय नगेन्द्रचापाय नदीधराय ।
नाम्ना शुचीन्द्रेश इतिस्तुताय ज्ञानाटवीशाय नमःशिवाय ।।

वागीश म्हणजे ब्रह्मदेव, हरि म्हणजे विष्णु आणि ईश्वर म्हणजे महादेव. या त्रिमूर्तिस्वरूप परमेश्वराला माझा नमस्कार असो. ज्यानें आपल्या हातांत धनुष्य म्हणून मेरु पर्वत धारण केलेला आहे, मस्तकावर नदी म्हणजे गंगा धारण केलेली आहे, शुचीन्द्रेश या नांवानें ज्याचें स्तवन केलें जातें आणि ज्ञानाटवीचा म्हणजे ज्ञानकाननाचा–ज्ञानारण्याचा जो ईश म्हणजे अधिपति आहे त्या शिवस्वरूप त्रिमूर्तीला – शुचीन्द्रं क्षेत्राच्या अधिष्ठात्री देवतेला मी नमस्कार करतों.



# तृतीयस्कंध

## दत्तात्रेयांचें ऐतिहासिकत्व

दत्तात्रेयासंबंधानें विचार करतांना कांहीं आधुनिक विद्वान् दत्तात्रेय ही कोणी ऐतिहासिक व्यक्ति नसून, ती एक काल्पनिक व्यक्ति आहे, असा आक्षेप घेतात. दत्तात्रेय ही व्यक्तीच जर काल्पनिक आहे, तर मग दत्तात्रेयांच्या अवतार-प्रसंगाचा अथवा कार्याचा एवढा ऊहापोह कशाला करावयाचा ? पण हा आक्षेप अत्यंत चुकीचा आहे. दत्तात्रेयांचें ज्ञानदानाचें कार्य कल्पारंभापासून आजपर्यंत अव्याहतपणें चालू असल्याचें इतिहासांत स्पष्टपणें आढळत असतांना दत्तात्रेयांना काल्पनिक व्यक्ति मानणें ही कल्पनाच निराधार व मिथ्यास्वरूपाची ठरते.

कादंबरीकारानें कल्पिलेल्या एखाद्या कथाप्रसंगाला कल्पना असें नांव दिलें जातें. त्या कल्पनेंत कल्पिलेल्या व्यक्तीला काल्पनिक असें म्हणतात. काल्पनिक व्यक्तीवर आधारलेले कथाप्रसंगहि काल्पनिकच असतात. त्यांना वस्तुनिष्ठा किंवा वास्तविकता नसते. अशा व्यक्तींना किंवा प्रसंगांना इतिहास या दृष्टीनें कांहीं मूल्य नसतें. इतिहासाची गोष्ट मात्र तशी नसते. इतिहास हा वस्तुनिष्ठ असतो. इतिहासांतील व्यक्ति वास्तविक असतात व घडून आलेले प्रसंगहि वास्तविकच असतात, म्हणूनच त्याला इतिहास असें म्हटलें जातें. इतिहासांतील व्यक्ति जर काल्पनिक असतील आणि वर्णिलेले कथाप्रसंगहि काल्पनिकच असतील तर तो इतिहास होऊं शकणार नाहीं. त्याला नाटक, लघुकथा किंवा कादंबरी अशीं नांवें दिलीं जातात. ज्या वर्णनांतील व्यक्ति वास्तविक असून कथाप्रसंगहि वस्तुनिष्ठ असतो त्या वर्णनाला वृत्तान्त अथवा इतिहास असें नांव दिलें जातें.

कांहीं ग्रंथ असे असतात कीं, त्यांतील कांहीं व्यक्ति आणि वर्णिलेले प्रसंग काल्पनिक असतात तर कांहीं व्यक्ति आणि वर्णिलेले प्रसंग सत्यस्वरूपाचे असतात. अशा संमिश्र ग्रंथांनाहि नाटक किंवा कादंबरी असेंच नांव दिलें जातें. कित्येक वेळेला वस्तुनिष्ठ सत्यस्वरूपाचें वर्णन करतांना वाचकांचें मन रमविण्यासाठीं कवीला काल्पनिक व्यक्तींची व कथाप्रसंगांची जोड द्यावी लागते. अशा वेळीं वर्ण्यविषयांतील वास्तविकता किती आणि काल्पनिकता किती, हें विचारवंत वाचकांना आपल्या बुद्धीनेंच शोधावें लागतें.

मेघदूत काव्यांतील मेघाचें दूतत्व हें काल्पनिक असल्यामुळें सत्य मानलें जात नाहीं. पण दूतांगद नाटकांतील अंगदाचें दूतत्व हें वस्तुनिष्ठ असल्यामुळें ऐतिहासिक सत्यस्वरूपाचें आहे असेंच मानलें जातें. वेणीसंहार व शाकुंतल या नाटकांतील द्रौपदी आणि कीचक त्याचप्रमाणें दुष्यन्त आणि शकुंतला हीं पात्रें वस्तुनिष्ठ

असल्यामुळें सत्यस्वरूपाचीं आहेत, तर एकच प्याला या नाटकांतील सुधाकर आणि सिंधु, तसेंच संशयकल्लोळ नाटकांतील आश्विनशेट आणि रेवती हीं पात्रें केवळ काल्पनिक असल्यामुळें तीं सत्यस्वरूपाचीं मानतां येत नाहीत. तात्पर्य, वस्तुस्थितीवर आधारलेले कथाप्रसंग हे जसे सत्यस्वरूपाचें असतात तसे ते केवळ कविकल्पनेवर आधारलेले असतील तर सत्य स्वरूपाचे होऊं शकत नाहीत.

रामायणांतील राम अथवा भागवतांतील श्रीकृष्ण या व्यक्ति व त्यांचीं चरित्रें वस्तुनिष्ठ कल्पनेवर आधारित असल्यामुळें जशीं सत्यस्वरूपाचीं मानलीं जातात तशीं केवळ कवि-कपोलकल्पित असलेल्या व्यक्ति व त्यांचीं चरित्रें सत्यस्वरूप मानलीं जात नाहींत. इतिहास या दृष्टीनें पाहतां अशा काल्पनिक व्यक्तींना किंवा प्रसंगांना कांहीं मूल्य दिलें जात नाहीं. ध्येयवादाच्या अथवा मनोरंजनाच्या दृष्टीनें त्यांतील कल्पना व रचनाचातुर्य हें वाचकाच्या कुतूहलाचा विषय बनतात ही गोष्ट निराळी. तात्पर्य, ग्रंथांत वर्णिलेल्या ज्या व्यक्तींना अथवा प्रसंगांना अन्य प्रमाणांचें पाठबळ मिळतें त्याच व्यक्ति व तेच प्रसंग ऐतिहासिक दृष्टीनें सत्यस्वरूपाचे ठरतात. ज्यांना कवि-कल्पनेव्यतिरिक्त इतर प्रमाणांचें पाठबळ मिळत नाहीं त्या व्यक्ति व ते प्रसंग सत्यस्वरूपाचे ठरत नाहींत. या दृष्टीनें पाहिलें असतां गुरुमूर्ति भगवान् श्रीदत्तात्रेय ही व्यक्ति काल्पनिक नसून, ती विशिष्ट स्वरूपानें विशिष्ट प्रकारचें लोकोपकारक कार्य करीत असलेली ऐतिहासिक स्वरूपाची एक सत्य व्यक्ति आहे असें मानावें लागतें.

अति प्राचीन कालीं या भूमंडलावर ज्ञानदान करण्यासाठीं व लोककल्याणासाठीं ज्या थोर व्यक्ति अवधूतरूपानें परिभ्रमण करीत होत्या त्यांमध्ये श्रीदत्तात्रेय यांचाहि उल्लेख आढळतो. ज्ञान, वैराग्य, दया आणि परोपकार या गुणांनीं त्या व्यक्ति फारच उच्च कोटीच्या होत्या म्हणून त्या व्यक्तींचा 'सिद्धेशाः' अर्थात् सिद्धराज या विशेषणानें निर्देश केलेला आहे. त्या सर्व व्यक्ति प्राचीन इतिहासांत सुप्रसिद्ध असल्यामुळे ऐतिहासिक स्वरूपाच्याच आहेत. वाचकांना कल्पना यावी म्हणून आम्ही त्या परमसिद्ध अवधूतांची नांवेंच खालीं देत आहोंत.

१. सनत्कुमार, २. नारद, ३. ऋभु, ४. अंगिरा, ५. देवल, ६. असित, ७. अपान्तरतम, ८. व्यास, ९. मार्कंडेय, १०. गौतम, ११. वसिष्ठ, १२. परशुराम, १३. कपिल, १४. शुकदेव, १५. दुर्वासमुनि, १६. याज्ञवल्क्य, १७. जातूकर्ण्यऋषि, १८. अरुणि, १९. रोमशमुनि, २०. च्यवनऋषि, २१. श्रीदत्तात्रेय महामुनि, २२. आसुरिमुनि, २३. पतंजलिमुनि, २४. वेदशिराऋषि, २५. पंचशिरामुनि, २६. कोशल देशांतील हिरण्यनाभ, २७. श्रुतदेव आणि २८. ऋतध्वज राजा इत्यादि.

कुमारो नारद ऋभुरंगिरा देवलोऽसितः ।
अपान्तरतमो व्यासो मार्कण्डेयोऽथ गौतमः ।।
वसिष्ठो भगवान् रामः कपिलोबादरायणिः ।
दुर्वासा याज्ञवल्क्यश्च जातूकर्ण्यस्तथाऽरुणिः ।।

रोमशश्च्यवनो दत्त आसुरिः सपतंजलिः ।
ऋषिर्वेदशिरा बोध्योमुनिः पंचशिरास्तथा ।।
हिरण्यनाभः कौशल्यः श्रुतदेव ऋतध्वजः ।
एते परेच सिद्धेशाश्चरन्ति ज्ञानहेतवः ।।

— भागवत, ६–१५–१२ ते १५

या श्लोकांत निर्दिष्ट केलेला अनुक्रम हा कालदृष्टीनें केलेला नाहीं. तो केवळ यादृच्छिक आहे. कालाच्या वृष्टीनें विचार केल्यास दत्तात्रेयांचा उल्लेख ऋभुमहर्षींच्या जवळच व्हावयास पाहिजे होता. गुरुपरंपरा या ग्रंथामध्यें गुरुदेव दत्तात्रेय हे ऋभु-महर्षींचे शिष्य असल्याचा उल्लेख केलेला आहे. व्यास आणि शुकाचार्य या व्यक्ति इतिहासाच्या दृष्टीनें पुष्कळच अलीकडच्या कालांतील आहेत. या इतिहाससिद्ध सिद्धराजांच्या यादींत दत्तात्रेयांचा उल्लेख असल्यामुळें दत्तात्रेय ही कोणी काल्पनिक व्यक्ति नसून, ती एक अविरत ज्ञानदानाचें कार्य करणारी फारच थोर विभूति आहे असें सिद्ध होतें. दत्तात्रेयांच्या या विभूति-वैभवानुळेंच ते एक इतिहाससिद्ध सर्व दैवतांमध्यें अत्यंत श्रेष्ठ दैवत मानलें गेलेलें आहेत.

जाबालोपनिषदामध्येंहि दत्तात्रेयांचा परमहंस म्हणून परिगणित असलेल्या ऐतिहासिक थोर व्यक्तींमध्यें अंतर्भाव केलेला आढळतो. "तत्र परमहंसा नाम संवर्तकारुणिश्वेतकेतु दुर्वास-ऋभु-निदाघ-जडभरत-दत्तात्रेय रवतक प्रभृतयः अव्यक्त लिंगाः अव्यक्ताचाराः अनुन्मत्ता उन्मत्तवदाचरन्तः" वेडे नसूनहि वेड्याप्रमाणें आचरण करणारे, ज्यांच्या आचारांचा सामान्य जनांना थांगपत्ताच लागत नाहीं व ज्यांचीं लक्षणेंहि लक्षांत येत नाहींत असे हे परमहंसकोटींत प्रविष्ट झालेले जीवन्मुक्त महात्मे भूतलावर लोककल्याणाकरितांच परिभ्रमण करीत असतात. असे लोक फारच थोडे असतात. अति प्राचीनकाळीं संवर्तक, अरुणि, श्वेतकेतु, दुर्वास, ऋभु, निदाघ, जडभरत, दत्तात्रेय आणि रैवतक वगैरे असे हे सिद्ध कोटींतले परमहंस महात्मे सुप्रसिद्ध होते. त्यांतीलच एक श्रीदत्तात्रेय महामुनि हे ज्ञानदानाच्या द्वारां अनुग्रह करून लोककल्याणाचें कार्य अद्यापि करीतच आहेत.

भक्तानुकम्पी भगवान्दत्तात्रेयो मुनीश्वरः ।
नानारूपधरो भूत्वा पर्यटत्यवनीतले ।।

भक्तजनांवर अनुग्रह करणारे मुनीश्वर भगवान् दत्तात्रेय हे अनेकरूपें धारण करून या भूतलावर पर्यटण करीत असतात. याची प्रचीती कित्येकांना आजहि येत असल्याचें पाहवयास सांपडतें. तात्पर्य, वरील सर्व विवेचनावरून दत्तात्रेय ही कोणी एक काल्पनिक व्यक्ति नसून, महायोगेश्वर विलक्षण शक्तिशाली सिद्धराज परमहंस अवधूत अशी एक थोर महाविभूति आहे ही गोष्ट निर्विवाद होय.

वर दिलेल्या भागवतांतील श्लोकांतला 'एते परे च' या ओळींतील परे हा शब्द आणि जाबालोपनिषदांतील गद्यांतला 'प्रभृतयः' हा शब्द, हे दोन्ही शब्द

भविष्यकालांत प्रकट होणाऱ्या सिद्ध पुरुषांचे द्योतक आहेत. राजा ऋषभदेव व सदाशिवेन्द्रसरस्वती यांच्यापासून तों श्रीरंगावधूतांपर्यंत ही अवधूतांची परंपरा अव्याहतपणें चालत आलेली आहे. यांतच श्रीगौरांगचैतन्य महाप्रभु, तैलंगबाबा, रामकृष्ण परमहंस, माणिक प्रभु, श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीजनार्दनस्वामी, एकनाथ-महाराज, श्रीदासोपंत, साईबाबा, उपासनीबाबा व रघुनाथ निरंजन या सर्व थोर विभूतींचा अन्तर्भाव समजावा. ही सिद्ध अवधूतांची अथवा परमहंसांची परंपरा विद्यमानकालींहि प्रचलित आहे. ती अशीच पुढेंहि प्रचलित राहील.

पीठापूरचे श्रीपाद श्रीवल्लभ, विदर्भांतील कारंजाचे श्रीनरसिंहसरस्वती-स्वामी, माणगांवचे श्रीवासुदेवानंदसरस्वती, अक्कलकोटचे श्रीस्वामीसमर्थ अक्कल-कोटकर महाराज, शेगांवचे श्रीगजाननमहाराज, फलटणचे सिद्धपुरुष श्रीहरिबाबा व मिरजेचे श्रीअण्णाबुवा या सर्व सिद्धपुरुषांचे ऐतिहासिक व्यक्तिमत्त्व जसें सर्वमान्य आहे तसेंच तें भगवान् श्रीदत्तात्रेय यांचेंहि आहे. तात्पर्य, सिद्धांच्या मालिकेंत परिगणित असलेले अवधूतकुलमुकुटमणि सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय ही व्यक्ति काल्पनिक नसून, ती एक सर्वमान्य ऐतिहासिक सत्यस्वरूपाची महाविभूति आहे, असें मानणें ओघानेच प्राप्त होत आहे. कार्तवीर्य सहस्रार्जुन राजा, भगवान् श्रीपरशुराम, यदुराजा, गोरक्षनाथ व सिद्धनागार्जुन या व्यक्ति जर ऐतिहासिक आहेत, तर मग त्यांना उपदेश करून त्यांच्यावर अनुग्रह करणारे श्रीदत्तात्रेय हे काल्पनिक कसे असूं शकतील ? राम, कृष्ण, बुद्ध इत्यादि अवतार जर इतिहास-सिद्ध आहेत तर मग भागवतांत वर्णन केलेल्या अवतारमालिकेंतील दत्तात्रेयांचा सहावा अवतार हाच तेवढा काल्पनिक कसा मानतां येईल ? दत्तात्रेयांना काल्पनिक मानणें ही केवळ कपोलकल्पना असून, ती कल्पकाच्या कोत्या बुद्धीचेंच लक्षण ठरेल यांत तिळमात्र संशय नाहीं. या सर्व विवेचनावरून गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय ही काल्पनिक देवता नसून, ती एक ईश्वरावतारस्वरूप ऐतिहासिक थोर व्यक्ति आहे, महाविभूति आहे, सर्वमान्य देवता आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे असेंच म्हणावें लागतें.

## श्रीदत्तात्रेयांचें वैदिकत्व

कांहीं लोक दत्तात्रेय ही अवैदिक देवता असल्यामुळें ती पूज्यच नाहीं, मग तिच्या चरित्राचा, तत्त्वज्ञानाचा, स्थानाचा व उपासनापद्धतीचा विचार कशाला करावयाचा असा आक्षेप घेतात. पण जरा विचार केल्यास याहि आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं असेंच आढळून येईल. अविचाराने केलेले आक्षेप हे अज्ञानावर, अभि-निवेशावर अथवा विद्वेषांवर आधारित असतात आणि त्याचमुळें ते निरर्थक अथवा फोल ठरतात. दत्तात्रेय ही देवता अवैदिक आहे असें म्हणणाऱ्यांचा रोख विशेषेंकरून दत्तात्रेयांच्या षड्भुज व त्रिमुख स्वरूपाला उद्देशून असतो हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

हा आक्षेप घेणारे लोक प्रायः माध्व संप्रदायांत असल्याचें आढळून येतें. असें सांगतात कीं, वैष्णव संप्रदायाचे एक विद्वान् आचार्य गोमांतक प्रदेशांतील साखळी या गांवीं असलेल्या एका पुरातन दत्तमंदिरांत गेले. तेथील त्रिमुखी व षड्भुज अशी दत्तात्रेयांची मूर्ति त्यांनीं पाहिली. ते लागलीच संतापले. म्हणाले, ही अवैदिक मूर्ति आहे. अशा मूर्तीची पूजा करणें निषिद्ध आहे. अशा मूर्तीची जे पूजा करतात त्यांचा अधःपात होतो. त्यांना पाप लागतें इत्यादि. सदर श्रीवैष्णवाचार्यांनीं शांतपणें जरा विचार केला असता तर आपलें अज्ञान त्यांच्या लक्षांत आलें असतें व आपला संताप अनाठायीं व व्यर्थ आहे हेंहि त्यांना कळलें असतें.

कोणत्या देवतेचें कोणतें प्रतीक वैदिक समजावयाचें व कोणतें प्रतीक अवैदिक समजावयाचें ? वेदांमध्यें ज्या देवतांच्या प्रतीकांचें जें स्वरूप वर्णिलेलें असेल तेंच स्वरूप वैदिक व त्याहून निराळें असलेलें स्वरूप अवैदिक असें म्हणावयाचें असेल तर मग सदर वैष्णवाचार्यांना पूजनीय असलेलीं किती तरी वैदिक देवतांचीं प्रतीकें वेदांत त्यांचें वर्णन नसल्यामुळें अवैदिक मानावीं लागतील.

इंद्रनीलरत्नाप्रमाणें चकाकणारी नयनमनोहर अंगकांति, नीलकमलाच्या अथवा जवसाच्या फुलाप्रमाणें त्या अंगकांतीच्या साहचर्यानें दिसणारी देहाची कोमलता, कमलदलाप्रमाणें शोभणारे विशाल नेत्र, अष्टमीच्या चंद्राप्रमाणें असलेला प्रशस्त भालप्रदेश आणि त्याच्या वरच्या बाजूस असलेले कुरळे केस, मस्तकावर खुलून दिसणारा रत्नजडित देदीप्यमान मुकुट, कंठामध्यें विराजत असलेलें कौस्तुभरत्न, वक्षस्थळींचें श्रीवत्सलांछन म्हणजे भृगुमहर्षीचें पदचिन्ह, रुंद वक्षस्थल, लांब बाहु, खोल नाभि, नाभिस्थलाच्या वरच्या बाजूस असलेलें वलित्रय, डाव्या खांद्यावरून उजव्या कटिभागाकडे वळणारें यज्ञोपवीत, विद्युल्लतेप्रमाणें कटितटीं चकाकणारा जरीकांठी पीतांबर, कमरेवर शोभणारी नक्षीदार सुवर्णमेखला, भुजदंडांवरील अंगद, मनगटावरील रत्नजडित पोचा, बोटांतील रत्नखचित अंगुलीयकें, दोन्ही खांद्यांवरून गुडघ्यांकडे ज्याचे पदर लोंबत आहेत असा भरजरी शेला, सुवर्णसंपुटा-प्रमाणें शोभणारे वर्तुलाकार गुडघे, कासवाच्या पृष्ठभागाप्रमाणें उंचवटेदार असलेले पायांचे पृष्ठभाग, पोवळ्याप्रमाणें आरक्तवर्ण असलेले तळहात आणि तळपाय व त्यांवर चंद्रिकेप्रमाणें झळकणारी नखकांति अशी ही सर्वांगसुंदर भगवान् श्रीविष्णूची मूर्ति. शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें धारण करून आपल्यापुढें उभी असलेली दिसली तर अशा प्रतीकाचें वर्णन वेदांत आढळत नाहीं म्हणून ही मूर्ति अवैदिक किंवा अपूज्य आहे असें म्हणावयास हे विद्वान् वैष्णवाचार्य तयार होतील काय ?

यावर कोणी असें उत्तर देतील कीं, अहो, वरील श्रीविष्णूचें रूप वेदांत वर्णिलेलें नसलें तरी तें पुराणांत वर्णिलेलें आहे व शिष्ट लोकांनाहि तें संमत आहे म्हणूनच आम्ही ही सगुण विष्णूची मूर्ति वैदिक व पूजनीय मानतों. वेदांप्रमाणेंच पुराणें व शिष्टाचार हीं शास्त्रज्ञांना प्रमाण म्हणून मान्य आहे. भागवतादि पुराणांत

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें श्रीविष्णूचीं वर्णनें आढळतात व वेदोक्त कर्माचें आचरण करणारे शिष्ट लोकहि अशाच विष्णूची पूजा करतात म्हणूनच विष्णूची मूर्ति वैदिक मानली जाते.

वर सांगितलेल्या युक्तिवादाप्रमाणें विचार केल्यास त्रिमुखी व षड्भुज असलेली दत्तात्रेयांची मूर्ति देखील वैदिकच आहे असें मानावें लागतें. ब्रह्माण्डपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, मत्स्यपुराण इत्यादि अनेक पुराणांतून भगवान् श्रीदत्तात्रेय यांना तीन मुखें व सहा हात असल्याचें वर्णन केलेलें आहे. विद्वान्, साधु-संत, महात्मे व भगवद्भक्त अशाहि मूर्तीची पूजा करीत असतात. मग अशा शास्त्रोक्त व शिष्टसंमत मूर्तीला ती अवैदिक व अपूज्य आहे असें कसें म्हणतां येईल ?

ब्रह्मोपेन्द्रेशरूपं च क्वचिदेकं पृथक् क्वचित् ।
क्वचिन्मूर्तित्रयधरमेकरूपं त्रिशीर्षकम् ।।
क्वचिद्गौरं क्वचिच्छ्यामं क्वचिदारक्तवर्चसम् ।
कौमोदकीशंखमालाडमरूं च कमण्डलुम् ।।
शूलायुधधरं षड्भिर्भुजैश्चित्रैस्त्रिवर्णकैः दिव्यस्रगम्बर धरम् ।
दिव्यमाल्यविभूषितम् ।।

भगवान् श्रीदत्तात्रेय ऋषिजनांना कसे दिसले, याचें वर्णन करतांना ब्रह्मांडपुराणांत असें म्हटलें आहे कीं, ब्रह्मदेव, उपेंद्र म्हणजे विष्णु आणि ईश म्हणजे महादेव हे तिघेहि कधीं एकरूप दिसले तर ते कधीं पृथक् रूपानेंहि दिसले. क्वचित् ते त्रिमूर्तिरूपानें दिसले तर क्वचित् एकरूपानेंहि दिसले. क्वचित् त्यांना एकच मुख होतें तर क्वचित् तीन मुखें होतीं. त्यांची अंगकांति अंशतः गौरवर्ण होती तर अंशतः श्यामवर्ण होती. क्वचित् त्यांचा वर्ण आरक्तहि दिसत होता. कौमोदकी नांवाची गदा, शंख, अक्षमाला, डमरू, कमंडलु आणि त्रिशूल हीं आयुधें त्यांनीं आपल्या सहाहि हातांत धारण केलेलीं होतीं. यांत गदा आणि शंख हीं विष्णूचीं आयुधें आहेत, अक्षमाला आणि कमंडलु हीं ब्रह्मदेवाचीं चिन्हें आहेत तर डमरू आणि त्रिशूल हीं शंकराचीं चिन्हें आहेत. गौरवर्ण हा शंकराचा असून श्यामवर्ण हा विष्णूचा आहे. त्याचप्रमाणें आरक्तवर्ण हा ब्रह्मदेवाचा समजावा. त्याचप्रमाणें ही मूर्ति 'त्रिशीर्षक' म्हणजे तीन मस्तकें असलेली अशी दिसली. त्या मूर्तीने पीतांबर परिधान केलेला असून, अंगाला सुगंधी उटी लावलेली होती. त्या मूर्तीने अलौकिक पुष्पमाला गळचांत धारण केलेली असून, कल्पवृक्षाच्या दिव्य फुलांनीं ती मूर्ति सुशोभित असलेली दिसली. क्वचित् ते एकमुख व द्विभुज असेहि दिसत.

तेजोमण्डलमध्यस्थमुद्यन्तमिव भास्करम् ।
त्रिवर्णं त्रियुगंव्यंशं त्रिगुणेशं त्रयीमयम् ।।
आदिमध्यान्तरहितमनन्तेति च विश्रुतम् ।
ब्रह्मोपेन्द्रेशरूपंच क्वचिदेकं पृथक् क्वच ।।

तेजोमंडलामध्यें विराजत असलेले भगवान् दत्तात्रेय हे उदयाला येणाऱ्या सूर्याप्रमाणें दिसले. त्यांची अंगकांतीहि तीन प्रकारची होती. ते अंशतः नीलवर्ण दिसत होते तर अंशतः श्वेतवर्ण म्हणजे पांढऱ्या रंगाचे दिसत होते. अंशतः त्यांची अंगकांति रक्तवर्णहि होती. क्रमशः विष्णु, शंकर आणि ब्रह्मदेव यांचीच ती अंगकांति होय. 'त्रियुग' या शब्दाचा अर्थ तिन्हीत्रिकाल असा आहे. सर्वकाल म्हणजे केव्हांहि ते प्रकट होतात. 'त्र्यंशं' ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तिघांचेहि अंश तेथें समन्वित झालेले आहेत.

'त्रिगुणेश' म्हणजे सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांचे ते अधिपति आहेत. अथवा त्रिगुणस्वरूप असलेल्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश यांचेहि ते अधिपति म्हणजे तुरीय ब्रह्मस्वरूप आहेत. तुरीय शब्दाचा अर्थ चौथा असा आहे. पण शुद्ध परब्रह्माच्या ठिकाणीं संख्येचा संबंध नसल्यामुळें प्रकृतस्थळीं तुरीय शब्दाचा अर्थ त्रिगुणातीत असाच समजावा. श्रीदत्तात्रेय प्रभु हे तिन्ही गुणांच्या पलीकडचे असून, सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांवर त्यांचें प्रभुत्व आहे असा त्रिगुणेश या शब्दाचा अर्थ समजावा. 'त्रयीमय' या ठिकाणीं त्रयी शब्दाचा अर्थ वेद असा आहे. त्रयीमय म्हणजे वेदस्वरूप असा अर्थ समजावा. जरी वेद संख्येनें चार असले तरी ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद या तीन वेदांनाच कांहीं विशिष्ट दृष्टीनें प्राधान्य दिलें जातें. अथर्ववेदाचा या तीन वेदांतच अंतर्भाव करून वेदांचा त्रयी या शब्दानें उल्लेख केला जातो. अथर्वऋषीने पृथक् संशोधन केलेलें असल्यामुळें अथर्ववेदाला चौथा वेद असेंहि मानलें जातें. असा हा त्रयी शब्दाचा अर्थ लक्षांत घ्यावा. दत्तात्रेयांना आदि मध्य आणि अंत नसल्यामुळें ते अनंत या नांवानें ओळखले जातात. ब्रह्मा, विष्णु आणि महेशस्वरूप असलेले भगवान् दत्तात्रेय हे क्वचित् एकरूप दिसतात तर क्वचित् पृथक् रूपानेंहि प्रतीतीला येतात. तात्पर्य, ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या तिन्ही देवतांचें समन्वित स्वरूप म्हणजेच भगवान् श्रीदत्तात्रेय होत. ते प्रत्यक्ष वेदस्वरूप असल्यामुळे त्यांना अवैदिक मानणें हें अविचाराचेंच लक्षण ठरेल. ब्रह्मांड पुराणाचा हा अभिप्राय आणखी इतरहि कांहीं पुराणांतून प्रगट झालेला असल्यामुळें तीन शिरें व सहा हात असलेली श्रीदत्तात्रेयांची मूर्ति व तिची उपासना ही अवैदिक आहे अशी वेडेपणाची कल्पना कोणी करून घेऊं नये. यावर कोणी अशी शंका घेईल कीं, दत्तात्रेयांना ज्याप्रमाणें तीन शिरें व सहा हात आहेत त्याप्रमाणें सहा पाय कां नाहीत ? पण ही शंका बरोबर नाही. परमात्मस्वरूपाचा आधार प्रवृत्तिधर्म व निवृत्तिधर्म असे दोनच धर्म आहेत हें दाखविण्याकरितां दत्तात्रेय दोनच पायांवर उभे राहिले आहेत. यामुळे दत्तात्रेयांना सहा पाय न दाखवितां दोनच पाय दाखविले जातात.

यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो राम आणि कृष्ण इत्यादि देवतांचीं वर्णनें उपनिषदांतून आढळतात. उपनिषदें हीं वेदस्वरूप असल्यामुळे व त्यांतून श्रीराम व

श्रीकृष्ण इत्यादि देवतांची उपासना वर्णिलेली असल्यामुळे त्या देवता व त्यांची उपासना वैदिक मानणें योग्य आहे; पण दत्तात्रेयांच्या बाबतींत तसें काय आहे? यावर उत्तर असें आहे कीं, ज्याप्रमाणे श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादि देवतांच्या संबंधानें उपनिषद्वाङ्मय उपलब्ध आहे त्याचप्रमाणें श्रीदत्तात्रेयांसंबंधानेहि उपनिषद्-वाङ्मय उपलब्ध आहे. दत्तात्रेयोपनिषद्, अवधूतोपनिषद् इत्यादि अनेक उपनिषदां-तून श्रीदत्तात्रेय या देवतेचें मुक्तकंठानें वर्णन केलेलें आहे. निर्मल दृष्टीनें तें आपण अवश्य अवलोकन करावें. आपल्या अज्ञानाचा अनर्थ दुसऱ्यावर लादणें हें बरें नव्हे.

शिष्टाचाराच्या दृष्टीनें विचार केल्यास तीन मुखें व सहा हात असलेले श्रीदत्तात्रेयांचें स्वरूप अनेक शिष्टजनांनीं मान्य केलेलें आहे व त्याची पूजाअर्चाहि त्यांनीं केलेली आहे. आजहि त्रिमुख व षड्भुज अशा दत्तात्रेयांची वैदिक पद्धतीनें पूजाअर्चा सर्वत्र चालू आहे व ती शिष्टसंमतहि आहे. अशा स्थितींत त्रिमुखी व षड्भुज मूर्ति अवैदिक मानणें व तिची पूजा करणाऱ्यांचा उपहास करणें हें केवळ स्वतःच्या अज्ञानाचें व दुरभिनिवेशाचेंच प्रदर्शन करणें होय. असे लोक कितीहि वाव-दूकपणें शास्त्राची बडबड करीत असले तरी दत्तभक्तांनीं व इतर जिज्ञासूजनांनीहि त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें हेंच श्रेयस्कर होय.

वेदांच्याच संरक्षणासाठीं दत्तात्रेयांचा अवतार असल्यामुळें दत्तात्रेयांची मूर्ति अवैदिक व अपूज्य आहे असें म्हणणें हें अत्यंत अज्ञानाचें व कृतघ्नपणाचें लक्षण ठरेल. सुप्रसिद्ध माघकवि आपल्या शिशुपालवध महाकाव्यांत स्पष्टच वर्णन करीत आहेत —

संप्रदायविगमादुपेयुषी-रेष नाशमविनाशविग्रहः ।
स्मर्तुमप्रतिहत स्मृतिः श्रुतीर्दत्त इत्यभव दत्रिगोत्रजः ।। (१४–७९)

संप्रदाय म्हणजे उपदेशपरंपरा. अर्थात् शुद्ध आचारांची व विचारांची सात-त्यानें अनुवृत्ति चालत राहणें. ही परंपरा खंडित होत चालल्यामुळें वेदच नष्ट होणार कीं काय, अशी परिस्थिति निर्माण झाली असतां, ती लोककल्याणोपयोगी परंपरा सुरक्षित राखण्याकरितां अर्थात् वेदांचें संरक्षण करण्याकरितां भगवंतानें हा दत्ताचा अवतार घेतला आहे. वेदांचा नाश टाळण्याकरितां हा अवतार आहे. या अवताराचें हें वैशिष्ट्य आहे कीं, दत्तात्रेयांचा देह हा कधींच नाश पावणारा नाहीं. म्हणून याला अविनाश-विग्रह असें म्हटलें आहे. या ठिकाणीं विग्रह शब्दाचा अर्थ शरीर अथवा देह असा आहे. याच अभिप्रायानें दत्तात्रेयांना 'अविनाश' असें म्हटलें जातें. अविनाश हें त्यांचें नांवच आहे. नांवाप्रमाणें त्यांचें सामर्थ्यंहि आहे. याच अभि-प्रायानें दत्तात्रेयांना 'अप्रतिहतस्मृति' असें म्हटलेलें आहे. त्यांची स्मरणशक्ति कधींच कुंठित होत नसल्यामुळें वेदांच्या उपदेशाची परंपरा ते अविच्छिन्नपणें चालू ठेवतात, असा हा अत्रिकुलोत्पन्न दत्तात्रेयांचा अवतार आहे. तात्पर्य, वेदसंप्रदायाचें संरक्षण करण्याकरितां वैदिककुलांत अवतरलेल्या दत्तात्रेयांना अथवा त्यांच्या मूर्तीला अवैदिक समजणें हें वदतो व्याघातासारखें निरर्थक आणि उपेक्षणीय आहे यांत संशय नाहीं.

## शुचिन्द्रं येथे घडलेली घटना

शुचीन्द्रं या क्षेत्रामध्यें पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या केली असतां ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे तिघेही प्रसन्न झाले व त्यांनीं पृथक् पृथक् रूपानें श्रीअत्रिमुनि आणि महासती श्रीअनसूयादेवी यांना दर्शन दिलें. अत्रिऋषींना आनंद वाटला. उभयतांनीं त्यांचें स्वागत केलें. "तुम्ही तिघांनींहि एकरूप होऊन नित्य माझ्या सान्निध्यांत असावें" अशी अत्रिऋषींनीं प्रार्थना केल्यानंतर ते तिघेहि देव एकरूप झाले आणि अत्रिमहर्षींच्या सान्निध्यांत नित्य राहूं लागले. सर्जनशक्ति, पालनशक्ति आणि संहरणशक्ति या तिन्ही शक्तींचा समन्वय होऊन एकमेकींच्या आनुकूल्यानें विश्वकल्याणात्मक कार्य सर्वकाळ प्रचलित राहवें व सर्व विश्वाचें कल्याण व्हावें हीच अत्रिमहर्षींची मनीषा होती. पुढें हेंच रूप अत्रिमहर्षींचें ध्येय बनलें व तेंच दत्तात्रेय रूपानें प्रकट झालें. तीन मुखें व सहा हात हें याच रूपाचें प्रतीक होय.

अनसूयेला मात्र एवढ्यानें संतोष वाटला नाहीं. तिनें त्या तिघा देवांना "तुम्ही पुत्ररूपानें माझ्या पोटीं जन्म घेऊन माझी कूस पावन करावी." अशी त्यांची प्रार्थना केली. अनसूयेच्या इच्छेप्रमाणें ते तिघेहि यथावसर दत्त, दुर्वास आणि सोम या रूपांनीं अनसूयेच्या उदरीं प्रकट झाले. त्यांत दत्त हा विष्णूचा अवतार असून दुर्वास हा शंकराचा अवतार होय. सोम म्हणजे चंद्र हा ब्रह्मदेवाचा अवतार समजावा. असा हा कथाप्रसंग 'शुचीन्द्रं टेम्पल' या प्रबंधांत स्थानमाहात्म्य अथवा स्थलपुराण या ग्रंथाचा आधार घेऊन वर्णिलेला आहे. तोहि वाचकांनी लक्षांत घ्यावा म्हणजे 'तीन शिरें सहा हात' या गुपिताचा उलगडा होईल.

## श्रीदत्तात्रेयांचें जन्मस्थान

श्रीदत्तप्रभूंचें ऐतिहासिक व्यक्तिमत्त्व, वैदिकत्व आणि पूजनीयत्व सिद्ध झाल्यानंतर त्यांच्या जन्मस्थानाचा, चरित्राचा व तत्त्वज्ञानाचा विचार करणें हें क्रमप्राप्तच आहे. अत्रिमुनींनीं अनेक ठिकाणीं आश्रम करून तपश्चर्या केलेल्या होत्या. त्यांचीं अनेक आश्रमस्थानें आपण पाहिलीं आहेत. आपण पाहिलीं त्याच्यापेक्षां तीं किती तरी अधिकहि असण्याची शक्यता आहे. त्यांतल्या त्यांत अधिक प्रसिद्ध असलेल्या स्थानांचाच आम्हीं वाचकांना परिचय करून दिलेला आहे. अत्रिमहर्षींच्या कांहीं तपश्चर्या अध्यात्मविद्येच्या प्राप्तीसाठीं होत्या. कांहीं तपश्चर्या मंत्रसिद्धीसाठी, तर कांहीं तपश्चर्या मुक्तिप्राप्त होण्याकरितांहि त्यांनीं केलेल्या होत्या असा उल्लेख आढळतो. त्या सर्व तपश्चर्यांमध्यें दत्तात्रेयांसारखा लोककल्याणकारी व साक्षात् परमात्मस्वरूप सुपुत्र आपल्या उदरीं जन्माला यावा या उद्देशानें त्यांनी जी तपश्चर्या केली ती त्यांच्या जीवनांत अत्यंत श्रेष्ठ ठरली आहे.

परमेश्वराच्या इतर अवतारांपेक्षां श्रीदत्तात्रेयांच्या रूपानें झालेल्या अवताराचें वैशिष्टच कांहीं आगळेंच आहे. परमेश्वराचे इतर अवतार कार्यपरत्वें प्राप्त झालेल्या

तात्कालिक अडचणींचें व संकटांचें निरसन करून देवांना व मानवांना त्यांचें व्यावहारिक जीवन सुखी करून देण्याकरितां झालेले आहेत. देवांचा व भक्तकुलमुकुटमणि असलेल्या प्रल्हादाचा छळ करणाऱ्या हिरण्यकशिपूला मारण्यासाठीं नरसिंहाचा अवतार, उन्मत्त क्षत्रियांचा दर्प हरण करण्यासाठी परशुरामाचा अवतार, रावण, कुंभकर्ण इत्यादि राक्षसांचा संहार करण्याकरितां श्रीरामाचा अवतार, कंस आणि चाणूर, शिशुपाल आणि वक्रदंत, शाल्व आणि भौमासुर, जरासंध आणि कालयवन यांच्या निर्दलनासाठीं श्रीकृष्णाचा अवतार. याप्रमाणें विविध अवतार आणि त्यांचीं कार्यें आपल्या दृष्टीस पडतात. यद्यपि रामगीता भगवद्‌गीता, इत्यादि स्वरूपांनीं कांहीं पारमार्थिक मार्गदर्शनाचेंहि कार्य श्रीरामचंद्रप्रभु व श्रीकृष्णप्रभु यांनीं केलेलें आहे असें दृष्टीस पडलें, तथापि सृष्टीच्या आरंभकालापासून प्रलयकालापर्यंत अज्ञानी जीवांच्या अज्ञानाचें निरसन करणें हेंच ज्यांच्या अवताराचें प्रधान कार्य आहे असा जर कोणता अवतार असेल तर तो सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचाच अवतार होय यांत तिळमात्र संशय नाहीं.

अत्रिमहर्षींना व महासती श्रीअनसूयादेवी यांना श्रीदत्तात्रेयांसारखा अलौकिक व अनंतकाल लोककल्याणाचें कार्य करणारा परमात्मस्वरूप पुत्र प्राप्त होण्यासाठीं मोठी खडतर तपश्चर्या करावी लागली आहे. तपानें देह शुद्ध होतो. तपानें अंतःकरणहि शुद्ध होतें. तपानें मानव हा सबाह्याभ्यंतर शुद्ध होतो. मात्र तें तप शुद्ध आणि सात्त्विक असावें लागतें. अल्पस्वल्प शुद्ध व सात्त्विक विचारांनीं केलेलें तप मनाला अधिक शुद्ध बनवितें व नितान्त शुद्ध मनानें केलेलें तप स्वतः अत्यधिक शुद्ध बनतें. याप्रमाणें मनानें तपाची व तपानें मनाची उत्तरोत्तर शुद्धि वाढत जाते. शुद्ध मनानें तप करणाराच काय, पण त्याचें कुलहि पवित्र बनतें. अशीं पवित्र कुलें ज्या देशांत असतात तो देशहि पावन बनतो. आणि अशाच पावन देशांत व पवित्र कुलांत भगवंताचे व भगवद्भक्तांचे अवतार होत असतात.

अत्रिमुनींना अनेक स्त्रिया होत्या व अनेक पुत्रहि होते. पाहा —

> अत्रेर्वंशं प्रवक्ष्यामि तृतीयस्य प्रजापतेः ।
> तस्य पत्न्यस्तु सुन्दर्यो दशैवासन् पतिव्रताः ।।
> अत्रेस्तु बहवः पुत्राः श्रूयन्ते मनुजाधिप ।।
> सर्वे वेदविदः सिद्धाःशान्तात्मानो महर्षयः ।।

अत्रिमहर्षि हे तिसरे प्रजापति असून त्यांना दहा स्त्रिया होत्या. त्या सर्वच अत्यंत सुंदर व पतिव्रता होत्या. त्यांच्यापासून झालेला अत्रींचा कन्या-पुत्र परिवारहि बराच मोठा होता. अत्रिऋषींचे सर्व पुत्र वेदवेत्ते, सिद्ध आणि शांत स्वभावाचे होते. मोठमोठ्या विद्वानांनाहि ते मार्गदर्शन करीत असत. संसार मोठा विचित्र आहे. संसाराची झळ परमेश्वरालाहि लागते, मग इतरांची कथा काय ? अत्रींच्या मनाला संसारांत समाधान नव्हतें. जो मुलगा लोककल्याणासाठीं झटत नाहीं, परोपकार

करीत नाहीं, लोकांच्या उपयोगाला येत नाहीं तो काय कामाचा! असे सुपुत्र कितीहि असले तरी ते निरर्थकच होत. शेवटीं अत्रिमहर्षि हे चिरंतन लोककल्याण-कारी पुत्राच्या प्राप्तीकरितां तप करण्यास निघाले.

अत्रिमुनींनी निघतांना अनसूयेला मात्र आपल्या बरोबर घेतलें. 'समान-शीलेव्यसनेषु सख्यं' या न्यायानें तीच एक बरोबर घेण्याला पात्र होती. अनसूयेला पुत्र नव्हता. तिलाहि परमेश्वरासारखा दिव्य पुत्र आपल्याला असावा अशी महत्त्वा-कांक्षा होतीच. समानध्येयानें व एकमेकांशीं अनुकूल्यानें वागणाऱ्या पति-पत्नींचेंच साहचर्य संसारामध्यें सफल व सुफल होत असतें. पतिदेवांची बरोबर येण्यास अनुमति मिळतांच अनसूयेला अत्यंत आनंद झाला. पुत्रप्राप्तीच्या निमित्तानें तप करण्या-करितां दोघेंहि निघालीं.

आतापर्यंत अत्रिमुनींनीं मंत्रसिद्धीसाठीं, तत्त्वज्ञानासाठी व मुक्ति प्राप्त करून घेण्यासाठीं अनेक ठिकाणीं तपश्चर्या केल्या होत्या. त्या सर्व भारताच्या उत्तर दिशेकडील प्रदेशांत होत्या. या वेळीं मात्र ते भारताच्या मध्य प्रदेशाकडे वळले आणि श्री विंध्याचलवासिनी आदिशक्तीचें आवडतें स्थान असलेल्या विंध्य पर्वताच्या पूर्वेकडे असलेल्या ऋक्ष पर्वतावर आले. या सर्व स्थानांचा मागील स्कंधांत वाचकांना परिचय झालाच आहे. ऋक्षसंज्ञक कुलपर्वतावर अत्रिमहर्षींनीं केलेलें तप, त्यांना झालेला साक्षात्कार आणि मिळालेलें वरदान या सर्व गोष्टींचा सुंदर वृत्तान्त आम्ही वाचकांना सविस्तरपणें निवेदन करणारच आहोंत. अत्रिमुनि अनसूयेला बरोबर घेऊन तेथून जे निघाले ते चित्रकूट पर्वतावर आले. हा त्यांचा अत्यंत आवडता पर्वत. येथेंहि त्यांनीं तपश्चर्या केली व मिळालेल्या वराचें दृढीकरण करून घेतलें. तेथून ते निघाले व नर्मदेच्या कांठीं आले.ते थे कांहीं काळ वास्तव्य करून ते महीसागरसंगमा-वर गेले. तेथेंहि त्यांनीं कांहीं काळ तपश्चर्या केली व तेथून ते सह्याद्रीचाच एक अंश असलेल्या सिंहाचलावर आले. येथील अनसूया शिखरावर त्यांनीं पुष्कळच वास्तव्य केलेलें आहे. तेथून ते निघाले तें शुचींद्र क्षेत्राला आले. या सर्व स्थानांचा वाचकांना परिचय झालाच आहे. दत्तात्रेयप्रभूंच्या जन्मस्थानाचा विचार करतांना हीं सर्व स्थानें अत्यंत महत्त्वाचीं आहेत.

वर निर्दिष्ट केलेल्या स्थानांपैकींच कोठें तरी एका ठिकाणीं श्रीदत्तात्रेयप्रभूंचा जन्म झालेला आहे यांत संशय नाहीं. भगवान् श्रीदत्तात्रेय हे नक्की कोठें जन्माला आले हें सांगणें अत्यंत कठीण आहे. सृष्टीची घडामोड सारखी चाललेली असते. 'पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरिताम्' हीं भवभूतीची उक्ति प्रसिद्ध आहे. भगवान् रामचंद्र जानकीदेवीला व लक्ष्मणाला बरोबर घेऊन दंडकारण्याच्या दिशेनें जात असतांना त्यांना मार्गांत जीं जीं स्थानें आढळलीं तीं तीं रावण-कुंभकर्णाचा वध करून जानकीसह परत अयोध्येला जात असतांना, पुष्पक विमानांतून जानकीला दाखवीत असतां रामचंद्र म्हणत आहेत, "जानकी! अवघ्या चौदा वर्षांत पाहा

सृष्टीची किती घडामोड झालेली आहे! पूर्वी जेथें नद्यांचे प्रवाह वाहत होते तेथें आतां वाळवंटें दिसत आहेत!" अवघ्या चौदा वर्षांतील वनवासाच्या काळांतली ही घटना आहे; तर मग लाखो वर्षांच्या काळांत केवढी घडामोड होणें शक्य आहे याची वाचकांनींच कल्पना करावी. हजार-पांचशें वर्षांतल्या ऐतिहासिक व्यक्तींच्या जन्माच्या काळाचा व ठिकाणांचा निश्चित पत्ता लागत नाहीं; तर मग स्वायंभुव मन्वन्तराच्या काळांतलें दत्तात्रेयांच्या जन्माचें ठिकाण नक्की कसें हातीं लागणार?

संशोधकानें नेहमीं समन्वयाचीच दृष्टि ठेवून संशोधन करावें. विरोधाच्या दृष्टिकोनांतून विचार केल्यास सत्य हें बाजूलाच राहण्याचा संभव फार असतो. खंबायतच्या आखाताजवळ असलेला महीसागरसंगम हेंच दत्तात्रेयांचें जन्मस्थान होय असा निष्कर्ष काढण्यास कांहीं लोक स्कंदपुराणाचा आधार घेतात. नारदपुराणाच्या आधारें कांहीं लोक दत्तात्रेयांचा जन्म माहूरगडाजवळ असलेल्या अनसूया शिखरावर झाला असें मानतात, तर शुचीन्द्रं या क्षेत्राच्या स्थानमाहात्म्यावरून अथवा स्थलपुराणांवरून श्रीदत्तात्रेयप्रभु हे शुचीन्द्रं क्षेत्रांतच जन्माला आले असें मानतात. कांहीं लोक चित्रकूट पर्वताचाहि दत्तात्रेयांच्या जन्माशीं संबंध जोडतात. पण त्याला फारसा आधार उपलब्ध होत नाहीं. अत्रिमहर्षींनीं दत्तासारखा लोककल्याणकर्ता असा पुत्र प्राप्त व्हावा म्हणून कांही काळ चित्रकूट पर्वतावर तपश्चर्या केली ही गोष्ट खरी आहे. अत्रिमुनींनीं आपलें उत्तरायुष्यहि चित्रकूट पर्वतावर घालविलें आहे हीहि गोष्ट खरी आहे. पण तेवढ्यावरून दत्तात्रेयांचा जन्म चित्रकूट पर्वतावरच झाला असेल असें म्हणतां येत नाहीं.

अनादि कालापासून श्रद्धेवर आधारित असलेले लोकांचे विचारप्रवाह, ज्यांना मूलभूत श्रुति, स्मृति अथवा पुराणें यांसारखे कांहीं आधार नसतात अथवा शब्दकथा म्हणजे मूलभूत कांहीं आधार नसतांना केवळ शब्दपरंपरेनें अर्थात् कर्णोपकर्णीं चालत आलेल्या गोष्टी ज्यांना आपण किंवदंती अथवा दंतकथा असें म्हणतों त्याहि कित्येक वेळेला सत्य इतिहासाचें स्वरूप शोधून काढण्यास उपयोगाला येतात. प्रकृतस्थलीं महीसागरसंगमावर अथवा चित्रकूट पर्वतावर दत्तात्रेयांचा जन्म झाला असावा असें मानण्याला उपयुक्त अशा कांहीं दंतकथाहि प्रचलित नाहींत. आतां राहतां राहिलीं दोन ठिकाणें. एक माहूर क्षेत्र आणि दुसरें शुचीन्द्रं तीर्थ.

नारदपुराणाच्या आधारें दत्तात्रेयांच्या जन्माचा विचार करणारे लोक दत्तात्रेयांचा जन्म माहूरगडावर झाला असें मानतात, तर शुचीन्द्रं क्षेत्राच्या स्थानमाहात्म्यावरून विचार करणारे लोक दत्तात्रेयांचा जन्म शुचीन्द्रं या क्षेत्रांतच झाला असें मानतात. आमच्या मतें समन्वयवादाच्या दृष्टीनें पाहिल्यास दोन्हीं ठिकाणीं दत्तात्रेयप्रभूंचा जन्म झाला असें मानण्यांत कांहींच अनुपपत्ति येत नाहीं. यावर वाचक म्हणतील कीं हें खरें कसें असूं शकेल? त्यावर आमचें म्हणणें असें –

नारदपुराणांतील व शुचीन्द्रं स्थानमाहात्म्यांतील दत्तजन्माच्या कथा जवळ जवळ सारख्याच आहेत. त्यांत थोडेंबहुत कांहीं अंतर म्हणजे फरक आहे, नाहीं असें नाहीं. नारदपुराणाच्या मतें अनसूयेच्या सत्त्वहरणाची परीक्षा माहूर क्षेत्रांत झाली तर शुचीन्द्रंपुराणाच्या मतें ती शुचीन्द्रं या क्षेत्रांतच झाली. क्षणभर हा वाद बाजूला ठेवूं. शुचीन्द्रं या क्षेत्रांत अत्रिमुनि तप करीत असतांना त्यांना ब्रह्मा, विष्णु आणि महादेव या तिन्ही देवांनीं दर्शन दिलें. श्रीमद्भागवतांतहि अशीच कथा आहे. अत्रि म्हणाले, मी तर एकाचेंच ध्यान करीत आहें. तुम्ही तिघेजण कोण आहां? तेव्हां त्या तिन्हीं देवांनीं स्व-स्वरूपाचा परिचय करून दिला. अत्रिमुनींना मोठा आनंद वाटला. नंतर अत्रिमहर्षींनीं त्यांचा आदरसत्कार करून त्यांची प्रार्थना केली. आपण तिघांनींहि एकरूप होऊन नित्य माझ्या सान्निध्यांत वास्तव्य करावें. तिन्ही देवांनीं तें मान्य केलें. अनसूया तेथें होतीच. तिनें लागलीच प्रणिपात करून वर मागितला, "माझें एवढ्यानें समाधान होणार नाहीं. आपण माझ्या उदरीं जन्म घ्यावा. मीं आपलें लालनपालन करावें, न्हाऊमाखू घालावें, काजळ लावावें, पोटभर पाजावें, पाळण्यांत घालावें, गाणीं म्हणावींत, झोके द्यावेत, खेळवावें, हे सर्व कोड-कौतुक केल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं." हें तिचें भाषण ऐकून तिन्ही देव तिच्या अलौकिक पातिव्रत्यानें प्रसन्न होऊन अत्रिमुनींच्या देहांत तेजोरूपानें प्रविष्ट झाले व अत्रिमुनींच्या द्वारां ते अनसूयेच्या उदरीं आले. ही सर्व घटना शुचीन्द्रं या क्षेत्रांत घडल्यामुळें दत्तात्रेयांचा गर्भजन्म शुचीन्द्रं या क्षेत्रांत झाला. नंतर अत्रिमुनि व अनसूया हीं मातापूर क्षेत्रांत आलें. तेथेंच अनसूयेला नऊ मास पूर्ण होऊन प्रत्यक्षपणें दत्तात्रेयांचा जन्म झाला. अशा रीतीनें दत्तात्रेयांचा जन्म शुचीन्द्रं या क्षेत्रांतहि झाला व माहूर क्षेत्रांतहि झाला असें मानलें म्हणजे नारदपुराणाच्या व शुचीन्द्र-माहात्म्याच्याहि सत्यत्वाला बाध येत नाहीं व वास्तववादालाहि तें विसंगत होत नाहीं. अशी ही सकृद्दर्शनीं विसंगत वाटणारी पण तत्त्वतः सुसंगत असलेली दत्तात्रेयांच्या जन्माची उपपत्ति वाचकांनीं लक्षांत घ्यावी.

## दत्तात्रेयांचा जन्म

आतां आपल्याला सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या जन्माचा विचार करावयाचा आहे. दत्तात्रेयांच्या जन्मासंबंधानें अनेक कथा आहेत. त्या विविध पुराणांतून वर्णिलेल्या आहेत. दत्तात्रेयांचा उल्लेख आणि प्रसंगोपात्त थोडेंबहुत चरित्र तर जवळ जवळ चौदा पुराणांतून वर्णिलेलें आहे. मुद्गलपुराण, गणेशपुराण, कूर्मपुराण, वायुपुराण, अग्निपुराण, शिवपुराण, विष्णुपुराण, विष्णुधर्मोत्तरपुराण, स्कंदपुराण, मार्कंडेयपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, ब्रह्माण्डपुराण, महाभागवत, देवीभागवत आणि महाभारत, हरिवंश, भविष्यमहापुराण इत्यादि सर्व पुराणग्रंथांतून दत्तात्रेयांचा महिमा मुक्तकंठानें वर्णिलेला आहे. ब्रह्मांडपुराणांत तर दत्तात्रेयांचा महिमा वर्णन

करणारे 'दत्तात्रेयमाहात्म्य' या नांवाचें पासष्ट अध्यायांचें एक स्वतंत्रच प्रकरण आहे. या प्रकरणाला दत्तात्रेयपुराण म्हटलें तरी चालेल. या प्रकरणांत अनुल्लिखित असलेला व इतर पुराणांत निर्दिष्ट केलेला दत्तात्रेयांचा इतिहास संकलित करून तो या ब्रह्मांडपुराणांतील दत्तमाहात्म्यास जोडला तर त्याला दत्तात्रेयमहापुराण म्हणतां येईल असें हें ब्रह्मांड पुराणांतील दत्तमाहात्म्य आहे. या सर्व वाङ्मयाचा अभ्यास केल्यास श्रीदत्तात्रेयांचें बरेंच मोठें चरित्र हातीं लागतें.

महाविष्णुस्वरूप भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें लीलाचरित्र अगाध आहे. कारण तें अवतारकालापासून विद्यमान कालापर्यंत अविच्छिन्न परंपरेनें चालूच आहे. अशा या विशाल चरित्राचें साकल्यानें कोण आकलन करूं शकेल ? जेथें आकलन करणेंच कठीण आहे तेथें तें वर्णन करणें अथवा लिहिणें तर त्याहूनहि फारच कठीण असणें हें स्वाभाविक आहे. मोठमोठ्या सुज्ञ नि चतुर लेखकांनाहि तें अवघड तर मग माझ्यासारख्या अनभिज्ञ जनाची कथा काय ? पण प्रभुकृपेचा महिमा मोठा अगाध आहे. परमेश्वराच्या कृपेनें पंगूहि पर्वताला उल्लंघूं शकतो. थोटाहि सागराचा पैलपार गांठूं शकतो व मुकाहि वाचस्पतिसमान वक्ता होऊं शकतो. इतिहासहि अनुकूल साक्ष देऊन या विधानांचें समर्थनच करील. सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कृपेचा आधार घेऊनच मी जिज्ञासू वाचकांना दत्तात्रेयांच्या विशाल चरित्राचा संक्षेपानें परिचय करून देत आहें. मी कोण, आणि काय करणार ? प्रेरक आणि प्रवर्तक असलेल्या परपेश्वराचेंच हें कर्तृत्व आहे. त्या कर्तृत्वाच्या अभिव्यक्तीला मी केवळ निमित्तमात्र आहें. यांत कांहीं प्रमाद असेल तर तो निमित्तभूत असलेल्या लेखकाचा दोष आहे असें समजावें व क्षमा करावी. यांतील वास्तव इतिहासाची अभिव्यक्ति ही दत्तप्रभूंची कृपा समजून तिचा आदर करावा.

## अत्रिमहर्षींची तपश्चर्या

महासती श्रीअनसूयादेवी यांना बरोबर घेऊन अत्रिमहर्षि तपश्चर्येस निघाले. अनसूयेलाच त्यांनीं बरोबर कां घेतलें ? तपश्चर्येच्या काळांत अनसूया हीच एक आपल्याला सर्वस्वीं अनुकूल राहून आपली तपश्चर्या पूर्णपणें सफल होण्याला उपयोगी पडेल अशी अत्रिमुनींची खात्री होती. अत्रिमहर्षींच्या इतर स्त्रियांना पुत्र होते, त्यामुळें त्या पुत्रप्राप्तीविषयीं उदासीन राहतील हें स्वाभाविकच आहे. अनसूयेला मात्र पुत्र नसल्यामुळें ती आपल्या उदरीं अत्रिमुनींच्या महत्त्वाकांक्षेप्रमाणें लोककल्याणकर्ता व सर्वगुणसंपन्न असा चिरायु पुत्र जन्माला यावा असें वाटत होतें. शिवाय प्रत्यक्ष परमात्माच पुत्ररूपानें आपल्या पोटीं जन्माला येण्याच्या दृष्टीनें अनसूया हीच योग्य आहे, इतर स्त्रियांच्या ठिकाणीं ती योग्यता नाहीं असेंहि अत्रिमुनींना वाटत होतेंच. उत्तम पुत्र जन्माला येण्याच्या दृष्टीनें पित्याबरोबर मातेचीहि तपश्चर्या असणें अत्यंत आवश्यक आहे. बीजाच्या व क्षेत्राच्या शुद्धीचें एकचित्तानें केली जाणारी

खडतर तपश्चर्या हेंच एक उत्तम साधन आहे. कोणाच्या धाकदपटशानें नव्हे, तर स्वभावतःच अनसूया ही महासती व महापतिव्रता होती. तिचा अधिकार असाधारण होता. याच हेतूनें अत्रिमुनींनीं तपश्चर्येच्या काळांत तिला आपल्या बरोबर घेतलें होतें.

पुत्रप्राप्तीकरितां अत्रिमुनींनीं अनसूयेसह ऋक्ष पर्वत, चित्रकूट पर्वत, एरंडी-नर्मदासंगम, महीसागरसंगम, सिंहाचल आणि शुचिन्द्रं क्षेत्र इतक्या ठिकाणीं तपश्चर्या केलेली आहे. यांत एरंडी-नर्मदासंगमावर तर अनसूयेनें एकटेच राहून तपश्चर्या केलेली आहे. अनसूयेसारख्या पतिव्रता स्त्रीला पतीला सोडून अरण्यामध्यें एकटें राहण्यांत किती कष्ट झाले असतील याची सहृदय वाचकांनीं कल्पनाच करावी. अनसूयेने ते कष्ट सोसून एकाग्र चित्तानें घोर तपश्चर्या केली. एरंडीसंगमाचा महिमा मोठा अगाध आहे. या ठिकाणीं केलेली तपश्चर्या ही इतर ठिकाणच्या तपश्चर्येपेक्षां कोटि पटींनीं मोठी मानली जाते. स्कंदपुराणांतील ईश्वर-पार्वती संवादामध्यें या स्थानाचा माहिमा फारच मोठा वर्णिलेला आहे.

रेवायाश्चोत्तरे कूले तीर्थं परमशोभनम् ।
भ्रूणहत्याहरं देवि कामदं पुत्रवर्धनम् ।।
सर्वं कोटिगुणं प्रोक्तं दानश्राद्धादिकं कृतम् ।।

महादेव म्हणाले, "हे पार्वती, अत्रिनांवाचा ब्रह्मदेवाचा एक मानसपुत्र महान तपस्वी होता. तो नित्य देवतापूजन व अतिथींचा सत्कार करीत असे. त्याच्या घरीं अग्निहोत्रहि असे. त्याची पत्नी अनसूया ही महासती व पतिव्रता म्हणून प्रख्यात होती. ती सर्वगुणसंपन्न होती.

पतिव्रता पतिप्राणा पत्युः कार्यहिते रता ।

स्वाभाविकच ती अत्रिमुनींची अत्यंत आवडती होती. नर्मदेच्या कांठीं ते आले असतां एके दिवशीं अनसूयेला म्हणाले,

सौम्ये शुभे प्रिये कान्ते चारु सर्वांगसुंदरी ।
विद्याविनयसंपन्ने पद्मपत्रनिभेक्षणे ।।

आपल्याला पाहिजे असा पुत्र अद्यापि प्राप्त होत नाहीं. काय करावें बरें ? रात्रंदिवस मी चिंता करीत असून चिंतेनें माझें शरीर शुष्क होत चाललें आहे. कोठेंहि मन लागत नाहीं व कांहींहि रुचत नाहीं; कांहीं सुचत नाहीं. अनसूया म्हणाली, "पतिदेव ! आपणांस जसें दुःख होत आहे तसेंच तें मलाहि होत आहे. माझ्या उदरीं पुत्रसंतति नसल्यामुळें मी आपणांपेक्षांहि अधिक दुःखी आहे. आपण इतर भार्यांच्या पोटीं जन्माला आलेल्या पुत्रांनीं पुत्रवान् तरी आहां, पण माझ्या पोटीं पुत्रच नसल्यामुळें मला किती दुःख होत असेल याची आपण कल्पना करा."

अत्रि म्हणाले, "प्रिये ! मी जन्मभर तप करीत आलों आहें. व्रतें केलीं, उपवास केले, अनेक प्रकारचे नियम पाळले; खाणेंपिणें, पूजाअर्चा सर्व कांहीं

शास्त्रोक्त पद्धतीनें केलें. पण अद्यापि यश मिळत नाहीं. अनसूये मी थकलों. आतां तूं तरी तप कर." अनसूया म्हणाली –

अनुज्ञाता त्वया ब्रह्मंस्तपस्तप्स्यामि दुष्करम् ।
पुत्रार्थित्वं समुद्दिश्य तोषयामि सुरोत्तमान् ।।

"महाराज ! मला पुत्र व्हावा अशी अपेक्षा आहे. आपणांसहि त्रैलोक्याला पावन करणारा विश्वगुरु असा पुत्र पाहिजे आहे. तर मग मी तप करतें. आपण मला अनुज्ञा द्या. माझी पुत्रकामना पूर्ण व्हावी म्हणून व आपलेंहि त्रैलोक्य-कल्याणाचें ध्येय पूर्ण व्हावें म्हणून मी त्रैलोक्याचे स्वामी असलेल्या तिन्ही देवांना, ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर यांना संतुष्ट करण्याकरितां खडतर तप करीन व त्यांना संतुष्ट करीन. तुमचे व माझे मनोरथ पूर्ण करणारा असा उत्तम पुत्र आपल्याला व्हावा असा वर मी त्यांना मागून घेईन."

अत्रि म्हणाले, प्रिये धन्य आहेस तूं.

साधु साधु महाप्राज्ञे मम सन्तोषकारिणि ।
आज्ञात त्वं मया भद्रे पुत्रार्थं तप आश्रय ।।

"प्रिये अनसूये ! धन्य आहेस तूं; मोठी शहाणी आहेस. माझ्या मनाला संतोष वाटेल असेंच तुझें वागणें असतें. हे कल्याणकारिणी प्रिये ! मी तुला पुत्र-प्राप्तीसाठीं तप करण्याची अनुज्ञा देतों. तूं तपाचा आश्रय कर."

न भार्यासदृशो बन्धुस्त्रीषु लोकेषु विद्यते ।

प्रिय पत्नीसारखा हितचिंतक या त्रैलोक्यांत दुसरा कोणी असूं शकत नाहीं. पतिराजांचें भाषण ऐकून अनसूयेनें त्यांना भावपूर्ण नमस्कार केला. ती नर्मदा नदीच्या कांठीं आली. नर्मदेचें दर्शन होतांक्षणींच सर्व पापांचा संचय नष्ट होतो. स्नान करतां-क्षणींच अश्वमेध महायज्ञाचें पुण्य लागतें, असा नर्मदेचा महिमा आहे. नर्मदेचें जल प्राशन केलें तर सोमयागाचें फल मिळतें व शेंकडों कोस अंतरावरून केवळ स्मरण केलें तरी शिवलोकाची प्राप्ति होते. अशा या नर्मदेच्या उत्तर कांठावर जेथें एरंडी नदीचा संगम आहे तेंच ठिकाण अनसूयेनें तपश्चर्येकरितां निश्चित केलें. व्रतस्थ राहून व नियमांचें परिपालन करून ती तप करूं लागली. पहांटेच उठावें; शुचिर्भूत होऊन प्रातःस्मरण करावें, स्नान करून इष्ट देवतांची आराधना करावी, स्तुतिस्तोत्रें म्हणावींत, नियमानें जप करावा आणि कंद, फळें, मुळें व पालेभाज्या खाऊन राहवें."

शंकर म्हणतात, हे पार्वती ! उन्हाळ्यामध्यें तिनें पंचाग्निसाधन केलें. पाव-साळ्यांत पाऊस सहन करून ओल्या वस्त्रानेंच तप केलें. हिवाळ्यामध्यें तर आकंठ पाण्यामध्यें उभें राहून अथवा बसून तप केलें. अशा रीतीनें अनेक वर्षें लोटल्यानंतर रुद्र, विष्णु आणि ब्रह्मदेव हे तिघेहि तिच्या पुढें प्रकट झाले. अनसूयेनें पाहिलें. जप थांबविला. ती उठून उभी राहिली. अर्घ्य-पाद्य समर्पण करून तिनें त्या तिन्ही देवांचें

स्वागत केलें. कंद, फळें व मुळें खावयास दिलीं. प्यावयास पाणी दिलें. ते तृप्त झाल्यानंतर त्यांना प्रदक्षिणा घातली व प्रणिपात केला. आज माझा जन्म सफल झाला. आज माझें तप सफल झालें असे समाधानाचे शब्द तिच्या मुखांतून बाहेर पडले.

देव म्हणाले, " अनसूये ! धन्य आहेस तूं. केवढें तुझें हें खडतर तप ! " अनसूया म्हणाली, " महाराज आपलें मनोरथ पूर्ण करून घ्यावयाचे असतील तर मानवांना तपाशिवाय दुसरें साधन नाहीं. तपानेंच विद्या मिळते, धन मिळतें. तपानेंच सर्व सुखें प्राप्त होतात व तपानेंच गुणवान् पुत्राचा लाभ होतो. तपानेंच स्वर्ग मिळतो व मोक्षहि मिळतो. देव हो, तपानेंच सर्व मनोरथ पूर्ण होतात, असा माझा दृढ विश्वास आहे. " ब्राह्मणरूपानें प्रकट झालेले ते तिन्ही देव अनसूयेस म्हणाले, " हे पतिव्रते ! कोणत्या हेतूनें तूं एवढे तपश्चर्येचे क्लेश सहन केलेस ? तुला काय पाहिजे आहे तें सांग. " अनसूया म्हणाली, " महाराज ! आपण कोण आहां ? आपण आपलें खरें रूप झांकलेलें आहे असें वाटतें; तरी आपण आपल्या मूळ रूपानें प्रगट होऊन मला दर्शन द्यावें. " ही अनसूयेची विनंती ऐकतांच ते तिन्ही देव आपआपल्या आयुधांसह आपल्या मूळ रूपानें प्रकट झाले.

चतुर्भुज भगवान् विष्णु, ज्यांनीं आपल्या हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म धारण केलेले आहे. जंवसाच्या फुलाप्रमाणें ज्यांची अंगकांति नीलवर्ण दिसत आहे, ज्यांनीं रेशमी आणि जरीकांठी सुंदर पीतवस्त्र परिधान केलेलें आहे. शेलाहि पण अंगावरचा तसाच आहे. ते गरुडावर आरूढ झालेले असून त्यांच्या सान्निध्यांत लक्ष्मीहि विराजत आहे, अशी ती श्रीहरीची मूर्ति अनसूयेनें अवलोकन केली. जवळच कमलाप्रमाणें कोमल आणि सुंदर असलेल्या चार मुखांनीं विराजणारा ब्रह्मदेवहि तिला दिसला. त्याच्या हातांत अक्षमाला आणि कमंडलु असून तो हंसावर आरूढ झालेला होता. सावित्रीहि त्याच्या सान्निध्यांत विराजत होतीच. जवळच भगवान् शंकरहि प्रकट झालेले तिला दिसले ! ते धवलवर्ण असलेल्या नंदीवर आरूढ झालेले होते. त्यांना पांच मुखें असून दहा हात होते. त्रिशुलादि सर्व आयुधें हातांत घेऊन त्यांनीं आपल्या मुकुटाप्रमाणें शोभणाऱ्या जटाजुटांमध्यें चंद्राची कोर धारण केलेली होती. ते त्रिलोचन असून गंगाधरहि होते. अशा थाटांत उमेसह शंकराचेंहि दर्शन झालें !

अनसूया म्हणाली, "आपण कोण आहां ?" ब्रह्मदेव म्हणाले, " मी चतुरानन सृष्टिविधाता आहें. पावसाळा हें माझेंच रूप आहे. कारण तो सृष्टीचा जनक आहे. " विष्णु म्हणाले, " मी चराचर विश्वाचा पालक असून विश्वंभर हेमंत म्हणजे हिंवाळा हें माझेंच रूप आहे. कारण हिंवाळ्यामध्यें सृष्टीचें पोषण होत असतें. " शंकर म्हणाले, " हे तपस्विनी ! मी सर्व सृष्टीचा लय करणारा रुद्र असून उन्हाळा हें माझेंच रूप आहे. उन्हाळ्यांत सर्व सृष्टीचें कर्शन होत असतें. सर्व सृष्टि क्षीण आणि जीर्णहि होत असते. एकाच कालाचीं हीं तीन रूपें आहेत. याचप्रमाणें एकाच

परमेश्वराच्या आम्ही तीन मूर्ति आहोंत. तुला काय वर पाहिजे आहे तो मागून घे." लागलीच अनसूया म्हणाली –

यदि तुष्टास्त्रयो देवा मम भक्तिप्रचोदिताः ।
मम पुत्रा भवन्त्वेव हरिरुद्रपितामहाः ।।

माझ्या भक्तीनें प्रेरित होऊन आपण मला प्रसन्न झालां आहांत तर आपण तिघेहि पुत्ररूपानें माझ्या पोटीं जन्म घ्या म्हणजे माझ्या सर्व आकांक्षा पूर्ण झाल्या असें मी समजेन, 'ईप्सितं तच्च दातव्यं' भक्ताला अभीष्ट असेल तोच वर समर्थांनीं द्यावयास पाहिजे; यांतच समर्थांचें समर्थपण असतें. आपणच माझ्या पोटीं पुत्ररूपानें अवतरून माझी पुत्रकामना पूर्ण करावी. ही अनसूयेची प्रार्थना ऐकून तिन्ही देवांनीं तथास्तु म्हणून वर दिला व ते तिघेहि देव एकरूप होऊन अन्तर्धान पावले.

या वेळीं अत्रिमहर्षि हे जवळच असलेल्या महेंद्र पर्वतावर होते. इतिहासांत अनेक महेंद्र पर्वत असल्याचे उल्लेख आढळतात त्यांतलाच हा एक होय. अनसूया तेथें गेली व तिनें घडलेला सर्व वृत्तान्त अत्रिमहर्षींना सांगितला. अत्रिमहर्षि त्या वेळीं एका शिळेवर बसलेले होते.

शिलातलनिविष्टोऽसौ दृष्टः कान्तो महायशाः ।
हृष्टचित्तोऽभवद्देवि ! उत्तिष्ठोत्तिष्ठ साऽब्रवीत् ।।

महादेव म्हणाले, पार्वती अनसूयेनें सांगितलेला वृत्तान्त ऐकतांच अत्रिमुनींना इतका आनंद झाला कीं, त्या आनंदाच्या भरांत ते देहभानहि विसरले ! अनसूया म्हणाली, "महाराज उठा, सावध व्हा." अत्रि म्हणाले, "प्रिये अनसूये ! धन्य आहेस तूं. यद्यपि स्त्रियांनी तप करावयाचें नसतें; तथापि तुझा विशिष्ट अधिकार लक्षांत घेऊन मीं तुला तप करण्याची अनुज्ञा दिली. तूं आपल्या तपःप्रभावानें सिद्ध झाली आहेस. ते तिन्ही देव पुत्ररूपानें तुझ्या पोटीं अवतीर्ण होतील व तुझे सर्व मनोरथ पूर्ण करतील.

अयोनिजा भविष्यन्ति तव पुत्रा वरानने !

अत्रि म्हणाले, हे सुमुखी अनसूये ! वस्तुतः ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे तिन्ही देव अयोनिज आहेत. तथापि तुझ्या तपानें प्रसन्न झालेले ते तुझ्या पोटी निश्चित जन्म घेतील यांत तिळमात्र संशय नाहीं. त्यानंतर या तिन्ही देवांनीं योग्य काळीं महासती श्रीअनसूयादेवी हिच्या उदरीं जन्म घेतला. त्यांत प्रथम ब्रह्मदेव जन्माला आले. त्यांनाच कोणी चन्द्रमा अथवा चंद्र असेहि म्हणतात, तर कोणी सोम असेंहि म्हणतात. दुसरे पुत्र म्हणजे साक्षात् भगवान् शंकरच होत. त्याचें नांव दुर्वास असें ठेवण्यांत आलें. हा सृष्टिसंहारकर्ता स्वयंसाक्षात् महेश्वरच होय. आणि तिसरा पुत्र म्हणजे आपलें आराध्यदैवत भगवान् श्रीदत्तात्रेयच होय. हा विश्वव्यापी जगन्नाथ

स्वयंसाक्षात् जनार्दनच होय. यालाच विष्णु अथवा मधुसूदन असें म्हणतात. याच इतिहासाच्या अनुरोधानें पुढे शिवप्रधान त्रिमुखी भगवान् श्रीदत्तात्रेय हे अनेकांचें आराध्यदैवत बनलें. पाहा –

आद्यः पुत्रोऽनसूयायाः स्वयं साक्षात् पितामहः ।
चंद्रमा इति विख्यातः सोमरूपो नृपात्मज ।।
द्वितीयस्तु महादेवि ! दुर्वासानामनामतः ।
सृष्टिसंहारकर्ता च स्वयं साक्षान्महेश्वरः ।।
दत्तात्रेयस्वरूपेण भगवान् मधुसूदनः ।
जगद्व्यापी जगन्नाथः स्वयं साक्षाज्जनार्दनः ।।

अशा रीतीनें दिलेल्या वरदानामुळें वचनबद्ध होऊन ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे तिन्ही देव अनसूयेच्या उदरीं जन्म घेऊन या भूतलावर अवतरले. त्यांत सोम हा सोमवंशाचा मूळ पुरुष राजा झाला, दुर्वासमुनि हे तपस्वी बनले आणि दत्तात्रेय हे अवधूत बनून सर्व विश्वाच्या उद्धाराकरितां जगभर संचार करीत राहिले. असा हा दत्तजन्माचा इतिहास स्कंदपुराणांतील अवंती खंडांतल्या १०३ या अध्यायांत वर्णिलेला आहे. रेवासागर संगमापासून जवळ असलेल्या सुवर्णशिला तीर्थाच्या समीप नर्मदेच्या उत्तर तीरावर हें स्थान आहे. अनसूयेच्या उदरीं देवांनीं येथें पुत्ररूपानें जन्म घेतला म्हणून हें तीर्थ पुत्रप्राप्तिकर आहे असें मानलें जातें.

महीसागरसंगम आणि चित्रकूट पर्वत या ठिकाणांचाहि इतिहास जवळ जवळ वर वर्णन केलेल्या इतिहासासारखाच आहे. त्यामुळें त्यांचें पृथक् वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं.

या ठिकाणीं कोणी अशी शंका घेतील कीं, अखेर खरें ठिकाण कोणतें ? नर्मदातट, महीसागरसंगम का चित्रकूट ? यावर उत्तर असें कीं, अत्रिमुनींची आणि अनसूयेची तपश्चर्या व त्यांना मिळालेलें वरदान या गोष्टी निरनिराळ्या वेळीं तिन्ही ठिकाणीं घडून आल्या असें मानावयास कांहींच हरकत नाहीं. प्रत्यक्ष दत्तात्रेयांचा जन्म अद्यापि पुढेंच व्हावयाचा आहे. पुनः पुन्हां वरदानाच्या रूपानें देवांना वचनबद्ध करून घेतलें जात आहे एवढाच याचा अर्थ येथें वाचकांनीं लक्षांत घ्यावा.

## ऋक्ष पर्वतावरील तपश्चर्या

अत्रिमुनींनीं पुत्रप्राप्तीसाठीं ऋक्ष पर्वतावर तपश्चर्या केली याचा उल्लेख मागें आलाच आहे. श्रीमद्भागवतपुराण, शिवपुराण आणि ब्रह्मांडपुराण या तिन्ही पुराणांत वर्णिलेला प्रसंग जवळ जवळ सारखाच आहे. आम्ही प्रकृत स्थलीं शिव-पुराणांतील शतरुद्रसंहितेच्या आधारें हा दत्तात्रेयांच्या जन्माचा इतिहास लिहीत आहोंत. धर्माच्या संरक्षणासाठीं भगवान् शंकर दुर्वासाच्या रूपानें व भगवान् विष्णु हे दत्तात्रेयांच्या रूपानें कसे अवतरले, असा प्रश्न पुढें आला असतां नंदीश्वर वर्णन

करीत आहेत. अत्रिमुनि हे ब्रह्मदेवाचे सुविख्यात पुत्र होते. ते मोठे तपस्वी ब्र कलों. आतां आणि समर्थ होते. कर्दममुनींची द्वितीय कन्या अनसूया हिच्याशीं त्यांचा वि झालेला होता. ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून उत्तम पुत्राच्या प्राप्तीसाठीं अत्रिमु हे तप करण्याकरितां ऋक्षकुल पर्वतावर गेले. या पर्वताला कोणी ऋक्ष पर्वत तर कोणी त्र्यक्ष पर्वत असेंहि म्हणत असत. आम्हीं वाचकांना या पर्वताची ओळख पूर्वीं करून दिलेलीच आहे. अपूर्व वनश्रीनें नटलेल्या या पर्वताच्या शिखरां-वरून अनेक जलधारा उड्या घेत खालीं येत होत्या. त्यांतच निर्विंध्या नांवाची एक सुप्रसिद्ध नदी होती. त्याच नदीच्या कांठीं अत्रिमुनींनीं तपश्चर्या करण्यास आरंभ केला. या वेळीं अत्रिऋषींनीं आपली पत्नी महासती अनसूया हिलाहि बरोबर घेतलेलें होतें. अत्रिऋषींच्या तपश्चर्येमध्यें अनसूयेनें त्यांना फारच साहाय्य केलेलें आहे. पतीच्या ध्येयानें तीहि प्रेरित झालेली असल्यामुळें आपल्यावर ईश्वराचा अनुग्रह व्हावा आणि ईश्वरासारखा सर्वगुणसंपन्न असा पुत्र आपल्याला प्राप्त व्हावा अशीच तिचीहि पण मनीषा होती. दोघेंहि एकाच ध्येयानें प्रवृत्त होऊन ईश्वराची आराधना करीत असल्यामुळें त्यांची आराधना यशस्वी होण्याला फारसा अवधि लागला नाहीं.

अत्रिमुनींनीं रोज पहांटेंच उठावें, प्रातःस्मरण, शौच, मुखमार्जन, स्नानसंध्या इत्यादि नित्याचें आन्हिक उरकून तपाला आरंभ करावा. निर्विध्या नदीच्या कांठींच ते तपश्चर्या करीत होते. थंडी, ऊन, वारा व पाऊस याची पर्वा न करतां ते नित्य यथाशास्त्र प्राणायाम करून जप करीत असत.

य एक ईश्वरः कश्चिदविकारो महाप्रभुः ।
स मे पुत्रवरं दद्यादिति निश्चितमानसः ।। – शिवपुराण

या विश्वाचें अधिष्ठान असलेला, निर्विकार आणि महाप्रभु असा जो कोणी ईश्वर आहे त्यानें प्रसन्न होऊन मला पुत्रप्राप्तीचा वर द्यावा. असा संकल्प करून दृढनिश्चयानें ते तप करीत होते. भागवतकारांनीं तर म्हटलें आहे –

अतिष्ठदेकपादेन निर्द्वन्द्वोऽनिल भोजनः ।

एका पायावर उभे राहून व केवळ वारा खाऊन अत्रिमुनींनीं तप केलें आहे. हात जोडून परमेश्वराचें ते ध्यान करीत होते व प्रार्थना करीत होते –

शरणं ते प्रपद्येऽहं य एवजगदीश्वरः ।
प्रजामात्मसमां मह्यं प्रयच्छत्विति चिन्तयन् ।।

शिवपुराणामध्यें केवल पुत्रप्राप्तीची कामना व्यक्त होत आहे; तर भागवता-मध्यें ईश्वरासारखा सर्वगुणसंपन्न पुत्र व्हावा अशी अत्रिमुनींची मनीषा असल्याचें दिसत आहे हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें. अत्रिमुनींच्या तपानें व प्राणायामांचें सामर्थ्य असें होतें कीं, त्यामुळें त्यांच्या मस्तकांतून अग्नीच्या ज्वाला बाहेर पडूं लागल्या

आणि त्यामुळें सारें त्रिभुवन व्याकुळ होऊं लागलें ! इंद्रादि सर्व देव ब्रह्मदेवाला शरण गेले. देवांचें गाऱ्हाणें ऐकल्यानंतर ब्रह्मदेव सर्व देवांना आपल्याबरोबर घेऊन विष्णुलोकाला गेले. सर्वांनीं विष्णूला नमस्कार केला. ब्रह्मदेवानें सर्वांचें दुःख विष्णूला निवेदन केलें. सर्व देवांसह ब्रह्मदेवाला बरोबर घेऊन विष्णु हे तावडतोव शिवलोकाला गेले. तेथें सर्वांनीं शंकरांची स्तुति केली. शंकरांनीं सर्वांचें दुःख ऐकून घेतलें. शेवटीं ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या तिघांनीं विश्वाच्या कल्याणाचा विचार करण्याकरितां स्वतंत्र एक बैठक घेतली. जणू कांहीं त्रिसदस्य मंडळच होतें तें.

अथतत्र समेतास्तु ब्रह्मविष्णुमहेश्वराः ।
मुने संमन्त्रयांचक्रुरन्योऽन्यं जगतां हितम् ।।
तदा ब्रह्मादयो देवास्त्रयस्ते वरदर्षभाः ।
जग्मुस्तदाश्रमं शीघ्रं वरं दातुं तदर्थये ।।

तिन्ही देवांनीं विचार केला. अत्रिऋषींच्या तपश्चर्येचा हा प्रभाव आहे. त्यांना इष्ट वर दिल्याशिवाय जगाला शांति लाभणार नाहीं. असा एकमतानें विचार करून सर्व देवांना आश्वासन दिलें. त्या श्रेष्ठ देवांचा निरोप घेऊन सर्व देव आपआपल्या स्थानाला निघून गेले. नंतर ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे तिघेहि ठरल्याप्रमाणें आपआपलीं वाहनें व आयुधें बरोबर घेऊन अत्रिऋषींच्या आश्रमांत आले. त्यांना पाहून अत्रिमुनींना आनंद झाला. उठून अभ्युत्थान दिलें. स्वागत केलें. साष्टांग प्रणिपात केला. स्तुति केली. हात जोडून नम्र भावानें अत्रि म्हणाले, "महाराज ! आपण चराचर विश्वाचे अधिपति व समर्थ आहां. जगाच्या सृष्टि, स्थिति आणि प्रलय या तीन अवस्थांचे अधिष्ठाते आहां. आपल्या दर्शनानें मी धन्य झालों. पण महाराज क्षमा करा. मीं तर एकाचेंच ध्यान केलें आहे. पुत्रप्राप्तीसाठीं अनसूयेसह मी एकाचेंच ध्यान करीत असतां आपण तिघांनींहि माझ्या आश्रमांत येण्याचे कष्ट घेतले. मी आपणांपैकीं कोणाचें ध्यान करीत होतों बरें ? माझा हा संशय दूर करावा व माझे पुत्रप्राप्तीचे मनोरथ पूर्ण करावेत. आपण वरदर्षभ म्हणजे वर देणाऱ्या देवतांमध्ये श्रेष्ठ आहां.

हें अत्रिमुनींचें भाषण ऐकून ते तिन्ही देव म्हणाले, "हे ऋषिश्रेष्ठा, तुम्हीं जसा संकल्प केला आहे तसेंच सर्व कांहीं घडून आलेलें आहे. ज्या एका ईश्वराचें तुम्ही चिंतन करीत आहां त्याच ईश्वराचे आम्ही तिघेहि अंश आहोंत. आम्ही तिघेहि एकच आहोंत. मुनिश्रेष्ठा ! आम्ही तिघेहि तुमच्या पोटीं जन्म घेऊन या भूमंडलावर अवतीर्ण होऊं आणि तुम्हां उभयतांची अर्थात् मातापितरांची सर्व कामना पूर्ण करून तुमची कीर्ति वाढवूं व ती अजरामर करूं. असें म्हणून ते सर्व देव आपआपल्या स्थानाला गेले. अत्रिमुनींनाहि इष्टवर मिळाल्यामुळें ते तपश्चर्येपासून परावृत्त झाले व सर्वांना समाधान वाटलें !

अथ ब्रह्मा हरिः शंभुरवतेरुः स्त्रियां ततः ।
पुत्ररूपैः प्रसन्नास्ते नानालीला प्रकाशकाः ।।
विधेरंशाद्विधुर्जज्ञेऽनसूयायां मुनीश्वरात् ।
विष्णोरंशात्स्त्रियां तस्यामत्रेर्दत्तो व्यजायत ।।
संन्यासपद्धतिर्येन वर्धिता परमा मुने ।
दुर्वासा मुनिशार्दूलः शिवांशाज्जन्म लब्धवान् ।।

यानंतर ब्रह्मदेव, विष्णु आणि शंभु हे तिन्ही देव प्रसन्न होऊन अनसूयेच्या उदरीं पुत्ररूपानें अवतरले. त्यांचीं चरित्रें प्रसिद्धच आहेत. त्यांतहि दत्तात्रेयांचें लीलाचरित्र अगाध आणि लोकोत्तर आहे. साक्षात् विष्णूच्या अंशापासूनच भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा आविष्कार झालेला आहे. कांहीं ठिकाणीं तर दत्तात्रेयांना विष्णूचा अंशावतार न मानतां प्रत्यक्ष भगवान् विष्णुच पूर्णरूपानें अनसूयेच्या पोटीं अवतरले असें म्हटलेलें आहे. श्रीकृष्ण हे ज्याप्रमाणें षोडशकल पूर्णावतार आहेत त्याचप्रमाणें दत्तात्रेय देखील षोडशकल पूर्णावतारस्वरूप आहेत असेंच ते मानतात. दत्तात्रेयांच्या लीलाचरित्रांत ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, ह्लादिनीशक्ति इत्यादि सर्व शक्तींचा पूर्ण आविष्कार असल्यामुळें दत्तात्रेय हे स्वतःसिद्ध स्वयंपूर्ण षोडशकलावतार आहेत असें मानणेंच सयुक्तिक ठरतें. याच अभिप्रायानें 'कृष्णस्तु भगवान् स्वयं' या वचनाप्रमाणेंच 'दत्तस्तुभगवान् स्वयं' हेंहि वचन प्रमाण म्हणून उद्‌धृत केलें जातें. दत्तात्रेयांचें ज्ञानोपदेशाचें चिरंतन कार्य व लोककल्याणकारी अद्‌भुत चरित्रवैशिष्ट्य लक्षांत घेतां हे दत्तात्रेय पूर्णावतारस्वरूप आहेत असें मानणेंच उचित ठरतें.

या ठिकाणीं विष्णूचा अनुक्रम दुसरा दिला असल्यामुळें कित्येक उपासक विष्णुप्रधान त्रिमूर्तीची कल्पना करून दत्तात्रेयांची आराधना करतात तर कित्येक भक्त स्कंदपुराणाच्या अनुरोधानें शिवप्रधान त्रिमूर्तीचें प्रतीक मानून दत्तात्रेयांची आराधाना करतात. वस्तुतः विश्वव्यापी अनादि व अनंत असलेल्या परमेश्वराला दिशेच्या दृष्टीनें व कालाच्या दृष्टीनें परत्व आणि अपरत्व अर्थात् पलीकडचा किंवा अलीकडचा असा भेद कांहींच उपपन्न होत नसल्यामुळें तेथें अनुक्रमाची कल्पनाच करतां येत नाहीं. त्यामुळें विष्णु मधला, शिव शेवटचा अथवा शिव मधला आणि विष्णु शेवटचा असा भेद कल्पिणें हें अनभीज्ञतेचें व उत्तान दृष्टीचें लक्षण ठरेल. तरी त्रिगुणात्मक त्रैमूर्ति ही पृथक्‌पणानें प्रतीतीला येत असली तरी ती तत्त्वतः एकरूपच आहे. अनुक्रम अथवा श्रेष्ठत्व-कनिष्ठत्व ही कल्पना बाजूस ठेवून त्रैमूर्तीचें तात्त्विक एकरूपच लक्षांत घ्यावें व दत्तात्रेयांची आराधना करावी हेंच श्रेयस्कर होय.

श्रीमद्‌भागवतकारांनीं ही "सोमोऽभूद्‌ब्रह्मणोंशेन दत्तोविष्णोस्तु योगवित् । दुर्वासाः शंकरस्यांशः ।" या श्लोकाने ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर हाच त्रिमूर्तीचा क्रम दाखविला आहे. हा क्रम बहुधा उत्पत्ति, स्थिति आणि लय हा सृष्टीचा क्रम

लक्षांत घेऊनच योजला असावा असें असलें तरी " सत्संकल्पस्य ते ब्रह्मन् यद्वै ध्यायति ते वयम् " हें तिन्ही देवांनीं मिळून दिलेलें उत्तर वस्तुस्थितीला धरून असल्यामुळें हे तिन्ही देव एकरूपच आहेत हेंच वाचकांनीं लक्षांत घ्यावें. अत्रिमुनींनीं सत् म्हणजे परब्रह्मतत्त्व परमात्मा. त्याच्याच दर्शनाविषयीं संकल्प केलेला होता; आणि म्हणूनच देव म्हणाले, " तूं ज्या एका तत्त्वाचें ध्यान केलें आहेस तेंच एक परमात्म तत्त्व आम्ही तिघेजण तुझ्या पुढें उभे आहोंत. " अशा स्थितींत या तिन्ही देवतांमध्ये गौण आणि मुख्य अशी भेददृष्टि ठेवणें हें संकुचितपणाचें लक्षण ठरेल. म्हणून सुज्ञ भक्तांनीं समन्वय तत्त्वाचा अवलंब करूनच भगवान् श्रयीदत्तात्रेय यांची भक्ति करावी. भविष्य-पुराणांतील दत्तात्रेयांच्या जन्माचा कथाप्रसंग अगदी निराळाच आहे. कामक्रोधादि विकारांचें प्रावल्य किती विचित्र असतें याचें जणू कांहीं हें एक विचारवंतांनाहि विचारांत टाकणारें उदाहरणच आहे. विवेकाचें अधिष्ठान सोडून जे कामविकाराच्या आहारीं जातात ते देव असले तरी फजित होतात. तेहि कामविकाराच्या पायीं आत्मनाश ओढवून घेतात. मग इतरांची कथा काय ?

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्धयेनमिहवैरिणम् ।।

काम आणि क्रोध हे मानवांचे महान् वैरी असल्याचा इशारा भगवान् श्रीकृष्णानेंहि वरील भगवद्गीतेच्या श्लोकांत स्पष्टच दिलेला आहे. रजोगुण प्रबल झाला कीं त्यापासून काम आणि क्रोध जन्माला येतो. हे दोन्ही मानवाचे वैरी मोठे खादाड आणि अत्यंत पापी आहेत. ही गोष्ट लक्षांत घेऊन मानवानें सदैव सावधच असावें. या कामानें ब्रह्मदेवाचें मातेरें केलें ! इंद्र, चंद्र इत्यादि देवांनाहि दरारा बसवला ! विष्णूचीहि फट्फजिती झाली व आत्माराम वैराग्यशील अशा शंकरांचीही गाळण उडाली. मग सामान्य मानवाची कथा काय ? " विश्वामित्र-पराशर यांसारखे महान् तपस्वी देखील " स्त्रीमुखपङ्कजं सुललितं दृष्ट्वैव मोहं गताः " स्त्रियांचें स्मितहास्ययुक्त भावपूर्ण सुंदर मुखकमल अवलोकन करतांच मोहून गेले व फजित पावले. मग इतरांची कथा काय ? असाच हा एक प्रसंग आहे.

बृहस्पति वसूंना म्हणाले, सूता ! एकदां अत्रिमहर्षि अनसूयेसह गंगेच्या कांठीं तपश्चर्या करीत होते. तप करतां करतां अत्रिमुनि ब्रह्मचिंतनांत निमग्न झाले व त्यांची समाधि लागली.

तदा ब्रह्माहरिः शंभुः स्वस्ववाहनमास्थिताः ।
वरं ब्रूहीतिवचनं तमाहुस्ते सनातनाः ।।

इतिश्रुत्वा वचस्तेषां स्वयंभूतनयो मुनिः ।

नैव किंचिद्वचःप्राह संस्थितः परमात्मनि ।।

तस्य भावं समालोक्य त्रयो देवाः सनातनाः ।
अनसूयां तस्य पत्नीं समागम्य वचोऽब्रुवन् ।।

अत्रिमहर्षींची समाधि लागली असतां ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र हे तिघेहि देव अत्रिऋषींना वर देण्यासाठीं अत्रिऋषींच्या आश्रमांत आले. ते तिघेहि आपआपल्या वाहनांवर आरूढ होऊन आले होते. अत्रींच्या पुढे उभे राहून ते म्हणाले, "वरं ब्रूहि" आपल्याला पाहिजे असेल तो वर मागून घ्या. अत्रिमुनि कांहींच बोलले नाहींत. ते ब्रह्मचिंतनांत तन्मय झालेले होते. देहभान उरलेलें नव्हतें. गाढ समाधि लागलेली होती. अत्रींची ही अवस्था पाहून ते तिन्ही देव अनसूयेकडे वळले. अनसूयाहि पूजा-अर्चा करीत बसलेली होती. तिचें तें आगळेंच झळकत असलेलें स्वरूप-सौंदर्य आणि लावण्य पाहून तिन्ही देवांचीं मनें चंचल झालीं. रजोगुण उफाळला. अन्तःकरणांत कामविकाराचें काहूर माजलें ! पतंगाचा दोरा तुटावा त्याप्रमाणें त्यांच्या मनांचीं संयमाचीं बंधनें तुटलीं व तीं मनें दुष्ट विकारांच्या झंजावातानें पछाडलीं जाऊन वायुवेगानें अधोगतीला लागलीं ! वेडेवांकडे हावभाव करीत श्रीशंकर अनसूयेच्या पुढें नागडें-उघडें नाचूं लागले ! विष्णूनें शंकराला साथ देऊन मृदंगनादाच्या भरांत गायन व नृत्य करून अश्लील शृंगारांत भर टाकली. ब्रह्मदेवाला तर काम हाच परब्रह्म आहे असें वाटूं लागलें ! अशा रीतीनें कामविकाराच्या प्रवाहांत तिन्ही देव सर्वस्वीं वाहवले !

अनसूयेची त्यांनीं अश्लील प्रार्थना केली ! परिणाम व्हायवयाचा तोच झाला. परमेश्वराची माया मोठी अनिवार आहे. कधींहि कोणावरहि न संतापणारी ती अनसूया या तिन्ही देवांवर अत्यंत संतापली ! तुमचा नाश होईल असा तिनें शाप दिला ! देव घाबरले व त्यांनी अनसूयेच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला, दंडवत घातले. क्षमा-याचना केली ! तेव्हां अनसूया म्हणाली, "जा, तुम्ही जिवंत राहाल, पण अपूज्य व्हाल. कोणी तुमची पूजा-अर्चा करणार नाहीं. तुम्हांला कोणी मानणार नाहीं." हेंहि देवांना रुचलें नाही. त्यांनीं पुन्हां अनसूयेची प्रार्थना केली ! ते म्हणाले, "माते ! हें अवमानित जिणें काय कामाचें ? कृपा करून आमचें पूज्यत्व तूं सुरक्षित ठेव." तेव्हां अनसूया म्हणाली. "जा, यापुढें ब्रह्मदेवाचें फक्त प्रधान मस्तक पूज्य राहील. विष्णूचे फक्त चरण पूजिले जातील व शिवलिंग-पूजनानेंच शिवाला संतुष्ट राहवें लागेल. अशी अनसूयेनें व्यवस्था केली; पण देवांना हेंहि रुचलें नाहीं. यांत आपला उपहासच होईल. आपल्याला आपल्या पूर्वीच्या अधिकारानेंच राहतां आलें पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें ! पुन्हां ते अनसूयेला शरण आले ! साष्टांग प्रणिपात केला ! अहंकार गळाला, अभिमान मावळला. हात जोडून अनसूयेच्या पुढें ते उभे राहिले. नम्रपणानें स्तुति करूं लागले —

इति श्रुत्वा वचो घोरं नमस्कृत्य मुनिप्रियाम् ।
पुष्टिदुष्टिवितनत्राश्च वेदपाठश्च ऋङ्मयः ।।

आतां ते तिन्ही देव पश्चात्तापानें शुद्ध झालेले होते. ते चुकून वाममार्गानें गेलेले होते. अनसूयेला त्यांची ती दयनीय अवस्था पाहून कींव आली. सोनें जसें तावून-सुलाखून शुद्ध करावें लागतें त्याप्रमाणें या तिन्ही देवांचें पूर्ण शुद्धीकरण होण्याच्या दृष्टीनें व आपली पुत्रकामना सफल होण्याच्या दृष्टीनें अनसूया म्हणाली –

अनसूया तदाप्राह भवन्तो मम पुत्रकाः ।
भूत्वा शापं मदीयं च त्यक्त्वा तृप्तिमवाप्स्यथ ।।

तुम्ही पुत्ररूपानें माझ्या पोटीं जन्म घ्यावा म्हणजे या शापांतून मुक्त व्हाल. एवढेंच नव्हे, तर तुम्हां तिघांनाहि योगाभ्यास करून या पापांतून मुक्त व्हावें लागेल. देहशुद्धि व मनःशुद्धि प्राप्त करून घेण्याला योगाभ्यासाशिवाय दुसरें उत्कृष्ट साधन नाहीं. अनसूयेचें हें वचन ऐकून –

इत्युक्ते वचनेब्रह्मा चन्द्रमाश्च तदा ह्यभूत् ।
दत्तात्रेयो हरिः साक्षाद्दुर्वासा भगवान् हरः ।।

पुढें योग्य कालीं ब्रह्मदेव चंद्राच्या रूपानें, विष्णु दत्तात्रेयाच्या रूपानें व भगवान् शंकर हे दुर्वासाच्या रूपानें अनसूयेच्या पोटीं अवतरले व योगी बनून अनसूयेच्या शापांतून मुक्त झाले.

## अनसूयेस देवांचें वरदान

दत्तात्रेयांच्या जन्माशीं संबंधित अशी एक मोठी बोधप्रद कथा मार्कंडेय-पुराणांत आलेली आहे. फार पूर्वींची गोष्ट आहे. प्रतिष्ठानपुरामध्यें कोणी एक कौशिक नांवाचा ब्राह्मण राहत असे. तो मोठा विद्वान्, रूपवान् व धनवानहि होता. त्याचा एका कुलीन घराण्यांतील सुशील व सुस्वरूप अशा ब्राह्मणकन्येशीं विवाह झाला. तिचें नांव सुमति होतें. कांहीं दिवस त्यांचा प्रपंच थाटामाटानें व सुखासमाधानानें चालला. सुमति जशी सुस्वरूप होती तशीच ती मोठी पतिव्रताहि होती. पतीला देव मानून ती त्याची मोठ्या भक्तिभावानें सेवाशुश्रूषा करीत असे. पहांटेच उठणें, हातपाय धुण्यास व तोंड धुण्यास पाणी देणें, स्नानाची तयारी करणें, स्वतः स्नान करून शुचिर्भूतपणें पतीसाठी संध्येचें आसन घालणें, धोतराच्या निऱ्या करून ठेवणें, संध्येचीं व पूजेचीं उपकरणीं स्वच्छ घासून व्यवस्थित मांडणें, गंध उगाळून देणें, रांगोळी घालणें, फुलें, तुळशी, दूर्वा, बेल व फुलवात वगैरे ठेवणें, स्वयंपाकपाणी करून नैवेद्य-वैश्वदेवाची तयारी करणें, प्रेमानें जेवण वाढणें, आला-गेला अतिथि व पैपाहुणा यांची योग्यतेनुरूप व्यवस्था ठेवणें, झाडलोट करून बैठक घालणें, भोजनानंतर तांबूल देणें, इत्यादि सर्व प्रकारची सेवा ती अगदीं मन लावून करीत होती. कांहीं कमी नव्हतें, तरी पण दुर्दैव ओढवलेंच.

यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता ।
एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ?

तारुण्य, पैसा, प्रभुत्व आणि अविवेकीपणा यांतील कांहींहि एक जरी वांट्यास आलें तरी तें जीवनाची गाडी विनाशाकडे नेऊं शकतें. मग चारी गोष्टी एकत्र आल्या तर काय अनर्थ ओढवेल हें सांगणें कठीण आहे.

कौशिक ब्राह्मण तारुण्याच्या भरांत आला. जवळ पैसा मुबलक होता. घरांत तोच एक कर्ता असल्यामुळें प्रभुत्वहि त्याच्याकडेच आलें होतें. कोणाचा धाक उरला नाहीं. अशांत तेथें अविवेकीपणाहि येऊन ठेपला ! मग काय विचारतां ? तारुण्य-मदानें उन्मत्त झालेला तो ब्राह्मण बाहेरख्याली बनला ! मानिनीच्या पाठोपाठ मदिराहि येतेच. या दोन्ही दुर्व्यसनांच्या पायीं त्याचें आरोग्य पार विलयाला गेलें. तशांतच दुर्दैवानें दुर्धर व्याधीनें त्याच्यावर झडप घातली ! "सोऽन्यजन्मकृतैः पापैः कुष्ठरोगी ततोऽभवत्" पूर्वजन्माचें पाप उदयाला आलें व तो कुष्ठरोगी बनला. जवळचा पैसाहि नाहींसा झाला. अशा स्थितींत त्याला कोण विचारणार ? अशी जरी त्याची स्थिति झालेली होती तरी त्याची पत्नी सुमति ही त्याला पूर्वींप्रमाणेंच देव समजून भजत होतीच. त्याला ती स्नान घालीत असे. बडके-मलमूत्र वगैरे घाण काढून त्याला ती स्वच्छ ठेवीत असे. तिळमात्रहि किळस न मानतां वाहणारें रक्त पुसून जखमा स्वच्छ करीत असे. हातपाय चेपून गोड भाषणानें त्याचें मनहि रमवीत असे. अशा रीतीनें नम्रपणानें व प्रेमानें त्याच्याशीं वागूनहि तो मात्र तिच्यावर रागावतच होता. तिची निर्भर्त्सना करीत होता व क्रोधाच्या भरांत मारीतहि होता ! अशाहि स्थितींत ती त्याला दैवत मानूनच भजत होती !

अतितीव्रप्रकोपत्वा न्निर्भर्त्सयति दारुणः ।
तथापि प्रणतासाध्वी तममन्यत दैवतम् ।।

आपाततः हें कोणाला बुद्धिग्राह्य वाटणार नाहीं. तें बावळटपणाचें व खुळचट-पणाचें लक्षण वाटेल. पण तो तिचा बावळटपणाहि नव्हता व खुळचटपणाहि नव्हता. ती एक तिची निरपेक्षपणानें व कर्तव्यबुद्धीनें चाललेली शुद्ध सात्त्विक तपश्चर्याच होती ! पाश्चात्त्य संस्कृतीनें पछाडलेल्या व केवळ ऐहिक विषयभोगांनाच पुरुषार्थ मानणाऱ्या लोकांच्या हें लक्षांत येणार नाहीं.

एक पाश्चात्त्य महिला होती. दुर्दैवानें तिचा पति आजारी पडला व त्यांतच तो मेला. मरतांना त्यानें पत्नीजवळ एकच इच्छा व्यक्त केली. – "निदान माझें थडगें सुकेपर्यंत तरी तूं दुसरें लग्न करूं नकोस असें तो म्हणाला." ती होय म्हणाली. थोड्या वेळानेंच तो मेला. कबरस्तानमध्यें त्याला पुरलें व त्यावर थडगें बांधलें. सर्व लोक आपआपल्या उद्योगाला निघून गेल्यानंतर ती तरुणी स्मशानांत बसून त्या थडग्यावर पंखा हलवीत बसली. जवळूनच एक सहृदय आर्य संस्कृतीचा मनुष्य चालला होता. त्यानें तें पाहिलें. तो आपल्या मनाशीं पुटपुटला, बहुधा ह्या स्त्रीचा पति मेला असावा. ही कोणी एक मोठी पतिव्रता असावी. केवढें तिचें हें आपल्या पतीवर प्रेम आहे ! हवेंत उष्मा आहे. पतीला उकाडा होऊं नये म्हणून ती पतीच्या थडग्यावर पंख्यानें

वारा घालीत बसली असावी ! तो तिच्या जवळ आला. सहानुभूतीनें त्यानें त्या स्त्रीस विचारलें कीं, "बाई ! कोणाला वारा घालतां तुम्ही ? आणि आतां या तुमच्या वारा घालण्याचा उपयोग काय ? तुम्हाला ऊन्ह लागत आहे. तरी तुम्ही विवेकानें धीर धरून घरीं परत जावें." त्यावर ती तरुणी म्हणाली, "या थडग्याखालीं माझ्या पतीचें प्रेत पुरलें आहे. पतीनें मरतांना माझ्याकडून वचन घेतलें आहे कीं, निदान माझें थडगें सुकेपर्यंत तरी तूं दुसऱ्याशीं लग्न करूं नकोस. तेव्हां त्याच्या वचनांतून मुक्त होण्याकरितां मी या थडग्यास वारा घालीत बसलें आहें. थडगें सुकतांच मी दुसरें लग्न करण्यास मोकळी होईन !" हें उत्तर ऐकून त्या सद्गृहस्थास काय वाटलें असेल हें निराळें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. तात्पर्य, पाश्चात्त्य संस्कृतीनें पछाडलेल्या लोकांना पातिव्रत्याचें मर्म कळणार नाहीं.

विषयकामनेच्या पूर्तीसाठीं पतिसेवा करावयाची नसून पतिसेवेनें उत्तम गति मिळते म्हणूनच ती करावयाची असते. पतिसेवेनें पतिव्रतेला संकल्पसामर्थ्य लाभतें, तिला वाक्सिद्धि प्राप्त होते, ती योग्याप्रमाणें समर्थ बनते व परमेश्वरालाहि ऋणी करून घेते. सुमति ही पातिव्रत्यानें अशाच योग्यतेला पोहोंचलेली होती.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, सुमति जर अशी प्रभावी पतिव्रता होती तर मग तिनें आपल्या पतीला रोगमुक्त कां नाहीं केलें ? प्रश्न बरोबर आहे. पण विचारवंत लोक बलवत्तर प्रारब्धकर्माचा भोगानेंच क्षय होत असतों हें जाणत असतात. प्रारब्धकर्माच्या भोगाचा प्रतिबंध केला तर तें उर्वरित प्रारब्धकर्म पुन्हां जन्म घ्यावयास भाग पाडतें व पुन्हां संसारचक्राचें रहाटगाडगें सुरू होतें. याकरितां बलवत्तर प्रारब्धकर्म भोगीतभोगीतच शहाणे लोक आयुष्याच्या अंतिम क्षणापर्यंत भगवन्नामस्मरण करीत राहतात व शेवटीं भगवत्कृपेनें मुक्त होतात. याच अभिप्रायानें सुमतीनें आपल्या पतीच्या बलवत्तर प्रारब्धाचा प्रतिबंध केला नाहीं.

एके दिवशीं तो कौशिक ब्राह्मण ओटीवर बसला असतां एक सुस्वरूप वेश्या दारावरून जात असलेली त्यानें पाहिली. त्याचें चित्त तिच्याकडे वेधलें. तो सुमतीला म्हणाला, आज रात्रीं तूं मला तिच्याकडे नेऊन पोचव. ती जर मला पुन्हां पाहवयास मिळाली नाहीं, आलिंगावयास मिळाली नाहीं तर मी उद्यां मरेन. कामातुर पतीचें तें वचन ऐकून ती पतिव्रता व्याकुळ झाली. निरुपाय म्हणून तिनें घरांतील द्रव्य गोळा करून गाठोशीं बांधलें व पचंग खोवून व पतीस खांद्यावर घेऊन मध्यरात्रीनंतर ती त्या वेश्येच्या घरीं जावयास निघाली. वाटेंतच अणिमांडव्यऋषींना खोट्या चोरीचा आळ आल्यामुळें सुळावर चढविलें गेलें होतें. अणिमांडव्यऋषींना कौशिकाचा धक्का लागला. गडद अंधकारामुळें सुमतीला मार्ग बरोबर दिसला नाहीं व ही दुर्घटना घडून आली. त्या धक्क्यानें मांडव्यऋषींचा जीव कासावीस झाला व त्यांनीं "ज्या कोणाचा मला धक्का लागला असेल तो सूर्योदय होतांच मरण पावेल" असा शाप दिला. सुमतीनें तो शाप ऐकला. तो भयंकर शाप होता. स्त्रियांचें

 

सर्व भाग्य त्यांच्या सौभाग्यकुंकुमतिलकामध्येंच सामावलेलें असतें. वैभव आहे, रूप आहे, सौंदर्य आहे, उत्तम वस्त्रें आहेत, अलंकार आहेत, सर्व कांहीं आहे; पण कपाळीं सौभाग्याचा कुंकुमतिलक जर नसेल तर बाकीचें सर्व व्यर्थ आहे. सुमतीला तो शाप ऐकून दुःख झालें. ती म्हणाली, " सूर्यच मी उदयाला येऊं देत नाहीं. मग माझे पति कसे मरण पावतील ? " असें म्हणून तिनें आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावानें सूर्याची गति कुंठित करून टाकली ! बराच काळ लोटला तरी सूर्यच उदयाला येईना ! जिकडे तिकडे अंधारच अंधार. सूर्योदयच नाहीं, मग संध्या कशी करावयाची ? अर्घ्य कोणाला द्यावयाचे ? होमहवन कसें करावयाचें ? सूर्योदयाच्या अभावीं लोकांचे दैनंदिन व्यवहारहि थांबले ! होमहवनाच्या अभावीं देवांनाहि उपास पडूं लागले !

निःस्वाध्यायवषट्कारं स्वधास्वाहाविवर्जितम् ।
कथं नु स्खलितं सर्वं न गच्छेत्संक्षयं जगत् ? ।।

स्वाध्याय वषट्कार स्वाहाकार व स्वधाकार यांच्या अभावीं सर्व जगाचा क्षय होतो कीं काय, अशी मोठी भयानक अवस्था निर्माण झाली ! देव घाबरले.

नैवाप्यायनमस्माकं विना होमेन जायते ।
वयमाप्यायितामर्त्यैर्यज्ञभागैर्यथोचितैः ।।

वृष्टयादिनानुगृण्हीमो मर्त्यान्सस्याभिवृद्धये ।
निष्पादितास्वौषधीषु मर्त्यायज्ञैर्यजन्ति नः ।।

होमहवन यज्ञयागादिकांच्या रूपानें आम्हांला आहुति मिळाली नाहीं तर आमचें पोषण कसें होणार ? यथोचित यज्ञयागादि कर्मांनीं मानवांनीं आमचें पोषण केलें तरच आम्ही देखील योग्य वृष्टि करून धनधान्याची समृद्धि करूं. धान्य-समृद्धीनंतर मानवांनींहि होमहवन करून आम्हांला तृप्त करावें. " परस्परंभावयन्तः श्रेयः परंमवाप्स्यथ " हा न्यायच आहे.

आम्हीं देवांना द्यावें व देवांनीं आम्हांला द्यावें, हें नीतीला धरूनच आहे.

अधोहिवर्षामवयं मर्त्याश्चोर्ध्वं प्रवर्षिणः ।
तोयवर्षेण हि वयं हविर्वर्षेण मानवाः ।।

आम्ही अधोवृष्टि अर्थात् खालीं वृष्टि करणारे आहोंत व मानव हे ऊर्ध्ववृष्टि करणारे आहेत. मानवांनीं यज्ञयागादि कर्में करून हविर्द्रव्यांची आहुतींच्या रूपानें स्वर्गलोकांत वृष्टि करावी व आम्ही मानवांच्या कल्याणासाठीं अंतरिक्षांतून भूलोका-वर पर्जन्यवृष्टि करावी. याप्रमाणें देव आणि मानव यांनीं एकमेकांना उपकृत करून आनंदानें राहवें असा ईश्वरी संकेतच आहे. देवांचे हे विचार अत्यंत मार्मिक असून, मानवांनीं ते नेहमींच लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

सहज जातां जातां या ठिकाणीं देवांकडून व्यक्त झालेले विचार प्रसंगसंगतीनें आम्ही वाचकांच्या पुढें ठेवीत आहोंत. वाचकांनीं त्यांचा अवश्य विचार करावा.

अतिवृष्टि कां होते, अनावृष्टि कां होते, अकालवृष्टि कां होते, दुष्काळ कां पडतो, हवा कां विघडते, रोगाच्या सांथी कां उद्भवतात, भूकंप कां घडतात, सामुदायिक अपघात कां होतात, आगी कां लागतात, वादळें कां होतात, या सर्वांचें मूळ कारण मानवांकडून केली जाणारी ईश्वरी संकेतांची पायमल्ली हेंच होय.

येऽस्माकं न प्रयच्छन्ति नित्यनैमित्तिकाः क्रियाः ।
ऋतुभागं दुरात्मानः स्वयं वाश्नन्ति लोलुपाः ।।
विनाशाय वयं तेषां तोयसूर्याग्निमारुतान् ।
क्षितिं च संदूषयामः पापानामपकारिणाम् ।।
दुष्टतोयादिदोषेण तेषां दुष्कृतकर्मणाम् ।
उपसर्गाः प्रवर्तन्ते मरणाय सुदारुणाः ।।

देव म्हणतात, जे दुष्ट लोक नित्यनैमित्तिक कर्में करीत नाहींत, यज्ञयागादि कर्में करून आम्हांला अन्न देत नाहींत, धनाचा आणि विषयांचा लोभ ठेवून स्वतःच खात-पीत बसतात, चैन करतात, त्यांचा नाश करण्याकरितां आम्ही पाणी, सूर्य, अग्नि, वायु म्हणजे हवा आणि पृथ्वी यांना दूषित करतों व अपकृत्य करणाऱ्या त्या दुष्टांना शासन करतों. हवा, पाणी वगैरे दूषित झाल्यानंतर नाना प्रकारचे भयंकर उपसर्ग सुरू होतात. त्याच उपद्रवांतून मानवांचें मरण ओढवतें.

ये त्वस्मान्प्रीणयित्वा तु भुंजतेशेषमात्मना ।
तेषां पुण्यतमाँल्लोकान् वितरामो महात्मनाम् ।।

जे आम्हांला संतुष्ट करून मगच स्वतः भोजन करतात त्याच थोर लोकांना आम्ही उत्तम फळें देतों व त्यांचें जीवन सुखी करतों. जिज्ञासू जनांनीं मार्कंडेय-पुराणाचा सोळावा अध्याय पाहवा.

यावर कोणी असें म्हणेल कीं, यांत देवांचा संबंध काय? भूगर्भांत असलेल्या उष्णतेच्या कमी-अधिक दाबामुळें व भूमंडलावर होणाऱ्या तपमानाच्या कमी-अधिक प्रमाणांमुळें निसर्गतःच या गोष्टी घडून येतात. पण सूक्ष्म विचारांतीं हें म्हणणें निरुपयोगी ठरतें. भुमंडलावरील तपमान व भूगर्भांतील उष्णता यांच्यामध्येंहि कमी-अधिकपणा कां निर्माण व्हावा? याला काय उत्तर आहे? कोणी म्हणेल, 'निसर्ग' हेंच त्याचें उत्तर आहे; पण हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. जडाची प्रवृत्ति चेतनाच्या प्रेरणेशिवाय होत नसते हा नियम सर्व शास्त्रज्ञांना मान्य आहे. तुमचा तो निसर्ग जड आहे कां चेतन आहे? तो जर जड असेल तर त्याचा प्रवर्तक कोणी तरी चेतन मानावाच लागेल. निसर्ग जर चेतन असेल व तो जर सर्वज्ञ आणि सर्वसमर्थ असेल तर मग निसर्ग आणि परमात्मा यांच्यांत कांहींच फरक राहत नाहीं. निसर्ग आणि परमात्मा हा केवळ नाममात्र विवाद ठरतो. तात्पर्य, परमात्मा च सर्व घडामोडींच्या मुळाशीं कारण आहे ही गोष्ट निर्विवाद होय. व्यष्टीच्या

व समष्टीच्या सुखासाठीं ईश्वराला भजणें व त्याच्या नियमांचें नीतिधर्माचें परिपालन करणें हाच एक उपाय आहे.

सुमतीच्या प्रतिबंधानें सूर्योदय न झाल्यामुळें घाबरलेले देव ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेवानें देवांचें गाऱ्हाणें ऐकलें. सर्व देवांना बरोबर घेऊन ब्रह्मदेव शंकरांकडे गेले. शंकर म्हणाले, या संकटांतून मुक्त होण्याचा मार्ग विष्णूच काढूं शकतील, तरी आपण सर्व तिकडेच जाऊं, असें म्हणून सर्व देव विष्णूकडे आले. विष्णु म्हणाले, 'उष्णमुष्णेन शाम्यति' या न्यायानें तेजाची शांति तेजानेंच होऊं शकते व तपाचा प्रशम तपानेंच होऊं शकतो. पातिव्रत्याच्या प्रभावानें निर्माण झालेलें हें संकट पातिव्रत्याच्या प्रभावानेंच नाहींसें होऊं शकेल. दुसरा उपाय नाहीं.

पतिव्रताया माहात्म्यान्नोद्गच्छति दिवाकरः ।
तस्य चानुदयाद्धानिर्मर्त्यानां भवतां यथा ।।
तस्मात्पतिव्रतामत्रेरनसूयां तपस्विनीम् ।
प्रसादयत वै पत्नीं भानोरुदयकाम्यया ।।

पतिव्रतेचा प्रभाव फार मोठा असतो. पतिव्रतेच्या प्रभावानेंच सूर्य उदयाला येत नाहीं व सूर्य उदयाला न आल्यामुळें तुम्ही व तुमच्याप्रमाणेंच सर्व मानवहि संकटांत पडले आहेत; तरी सूर्योदय होण्यासाठीं आपल्याला अत्रिमहर्षींची पत्नी अनसूया हिलाच शरण गेलें पाहिजे. ती मोठी तपस्विनी व तेजस्विनी आहे. तिच्या पातिव्रत्याचा प्रभाव अत्यंत श्रेष्ठ कोटीचा आहे; तर मग आपण तिकडेच जाऊं या, असें भगवान् विष्णूंनी सांगितल्यावर ते सर्व देव अत्रिमहर्षींच्या आश्रमांत आले. अनसूयेला नमस्कार करून त्यांनीं तिची स्तुति केली. देवांच्या स्तुतीनें प्रसन्न झालेली अनसूया देवांस म्हणाली, देव हो ! या. तुमचें मी स्वागत करतें. तुम्ही संकटानें गांजलेले दिसत आहां. तुम्हांला जें कांहीं पाहिजे असेल तें सांगा. 'प्राहेष्टं व्रियतामिति' अनसूया म्हणाली, देव हो ! तुम्हांला जो इष्ट वर पाहिजे असेल तो तुम्ही मागून घ्या.

अयाचन्त दिनं देवा भवत्विति यथा पुरा ।

देव म्हणाले, माते अनसूये, पूर्वीप्रमाणें रोजच्या रोज सूर्योदय होऊं दे. तुझ्या कृपेनें सूर्योदय झाला म्हणजे आम्ही सर्व सुखी होऊं.

देवांचें हें भाषण ऐकून अनसूयेनें देवांना बरोबर घेतलें व ती प्रतिष्ठानपुरामध्यें सती सुमतीच्या निवासस्थानीं आली. सुमतीनें अनसूयेचें स्वागत केलें. अनसूयेनेंहि सुमतीला कुशल प्रश्न विचारले. आगत-स्वागत व कुशल प्रश्न झाल्यानंतर अनसूयेनें सुमतीचें तिच्या उत्कृष्ट पातिव्रत्याबद्दल अभिनंदन केलें. अनसूया म्हणाली, "सुमति ! तूं सूर्योदय होण्याचें थांबविल्यामुळें मोठा अनर्थ ओढवला आहे. देव आणि मानवच काय, पण सारें जग सूर्योदयाच्या अभावीं मोठें कष्टी झालेलें आहे. तूं

सर्वांच्या कल्याणासाठीं सूर्याचा प्रतिबंध दूर कर आणि सूर्योदय होऊं दे." सुमतीनें अनसूयेला सर्व वृत्तान्त सांगितला. ती म्हणाली, "देवी अनसूये, स्त्रीजीवनांत सौभाग्याचा महिमा काय आहे हें मीं कांहीं आपणांस सांगावयास नको. आपण सर्व कांहीं जाणतच आहां. आणि मांडव्याच्या शापानें माझे पतिराज मरण पावतील व मला वैधव्याचे कष्ट भोगावे लागतील. अशा स्थितींत मीं काय करावें हें तुम्हीच मला सांगा." अनसूया म्हणाली, "साध्वी पतिव्रते! तूं तिळमात्रहि चिंता करूं नकोस. सूर्यनारायणाचा प्रतिबंध काढून घे. सूर्योदय होतांच तुझा पति मरण पावला तर मी त्याला माझ्या पातिव्रत्याच्या प्रभावानें जिवंत करीन. माझ्या शब्दांवर विश्वास ठेव."

सुमतीनें अनसूयेच्या म्हणण्याप्रमाणें सूर्यनारायणाच्या गतीचा प्रतिबंध दूर केला. भगवान् सूर्यनारायण उदयास आले! सर्वांना आनंद झाला! पण सुमतीचा पति तावडतोब गतप्राण होऊन पडला! सुमति शोकाकुल झाली. अनसूयेनें तिचें सांत्वन केलें व दिलेल्या आश्वासनाप्रमाणें हातांत उदक घेऊन संकल्प केला.

यथा भर्तृसमं नान्यमपश्यं पुरुषं क्वचित् ।
रूपतः शीलतो बुद्ध्या वाङ्माधुर्यादिभूषणैः ।।
तेन सत्येन विप्रोऽयं व्याधिमुक्तः पुनर्युवा ।
प्राप्नोतु जीवितं भार्यासहायः शरदां शतम् ।।
यथा भर्तृसमंनान्यमहं पश्यामि दैवतम् ।
तेन सत्येन विप्रोऽयं पुनर्जीवत्वनामयः ।।
कर्मणा मनसा वाचा भर्तुराराधनं प्रति ।
यथा ममोद्यमो नित्यं तथाऽयंजीवताद् द्विजः ।।

— मार्कण्डेयपुराण, अ. १६

मी रूपानें, शीलानें, बुद्धीनें व वाङ्माधुर्यादि गुणांनीं क्षणभरहि अन्य पुरुषाला मनांत आणलें नाहीं हें सत्य आहे. सर्वसाक्षी परमेश्वराला स्मरून मी सांगतें, हें सत्य असेल तर त्या सत्यानें हा ब्राह्मण सर्व व्याधींतून मुक्त व्हावा. त्याला पुन्हां नवतारुण्य प्राप्त व्हावें व तो जिवंत होऊन आपल्या भार्येसह शंभर वर्षें सुखानें नांदावा.

मीं पतीला दैवत मानून त्यांची सेवा केली. पतिव्यतिरिक्त इतर कोणालाहि मीं दैवत मानलें नाहीं, हें जर सत्य असेल तर हा ब्राह्मण पुन्हां जिवंत होऊं दे व निरोगी होऊं दे.

मनानें, वाणीनें व क्रियेनें मी नेहमीं पतीचीच आराधना करण्याचा प्रयत्न केला. हें जर सत्य असेल तर हा ब्राह्मण सत्वर जिवंत व्हावा. असा संकल्प करून अनसूयेनें आपलें पुण्य पणाला लावलें व उजव्या हाताच्या ओंजळींत पाणी घेऊन तें संकल्पोदक सोडलें! सती अनसूयेच्या पुण्यप्रभावानें तो कौशिक ब्राह्मण एका क्षणांत

जिवंत झाला आणि झोपेंतून उठावें त्याप्रमाणें तो उठून बसला! त्याच्या शरीरावर तारुण्याचें तेज मुसमुसत होतें व रोगाचें तिळमात्रहि चिन्ह दिसत नव्हतें! अशा थाटांत त्या सुमतीच्या पतीला पाहिल्याबरोबर सर्वांचा आनंद द्विगुणित झाला! भूतलावरून मानवांनीं व स्वर्गांतून देवांनीं अनसूयेवर पुष्पवृष्टि केली. शिंगें वाजूं लागलीं. नगारे व नौबती झडूं लागल्या. अप्सरा नाचूं लागल्या. गंधर्व गाऊं लागले! ब्राह्मण वेदघोष करूं लागले! अशा रीतीनें जिकडे तिकडे आनंदच आनंद व्यक्त होऊं लागला!

आनंदांत निमग्न झालेले सर्व देव अनसूयेला म्हणाले, देवी अनसूये! धन्य आहेस तूं. सर्वांचें जीवन तूं सुखी केलें आहेस. "वरं ब्रूहि वरं ब्रूहि" तुला काय पाहिजे असेल तो वर मागून घे. आम्ही प्रसन्न आहोंत. अनसूया म्हणाली —

यदि देवाः प्रसन्नामे पितामहपुरोगमाः।
तद्यान्तु मम पुत्रत्वं ब्रह्मविष्णुमहेश्वराः।।

जर ब्रह्मदेवादि सर्व देव माझ्यावर संतुष्ट आहेत तर त्यांच्या वरदानानें ब्रह्मा, विष्णु आणि भगवान् सदाशिव हे माझ्या पोटीं पुत्ररूपानें जन्माला यावेत. अनसूयेचे हे शब्द ऐकतांच सर्वांनी "तथास्तु तथास्तु" म्हणून आशीर्वाद दिले. ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे सर्व देवांच्या प्रार्थनेवरून वचनबद्ध झाले. सर्व देवांनीं अनसूयेला नमस्कार केला! देव भक्तांचा व भक्त देवांचे. कोण मोठा व कोण लहान? देवांच्या पायीं भक्त नम्र होतात तर भक्तांच्या ठायीं देवहि नम्र होतात! असा हा एकात्मतेचा भाव मोठा विलक्षण आणि अनिर्वचनीय आहे.

सर्व देव अनसूयेचा निरोप घेऊन आपआपल्या स्थानाला आनंदानें निघून गेले. पुढें कालांतरानें योग्य समयीं भगवान् ब्रह्मदेव हे अनसूयेच्या उदरीं चंद्ररूपानें अवतरले. भगवान् विष्णु हे दत्तात्रेयांच्या रूपानें अवतरले तर भगवान् शंकर हे दुर्वासमुनींच्या रूपानें अवतरले. असा हा पातिव्रत्याच्या प्रभावांतून मिळालेलें वरदान व त्यांतून झालेला सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा जन्म अत्यंत बोधप्रद असल्यामुळें आम्ही वाचकांच्या पुढें ठेवला आहे. वाचकांनीं त्यांतून अवश्य बोध घ्यावा.

## नारदपुराणांतील दत्तजन्म

नारदपुराणांतील दत्तजन्माची कथा प्रायः सर्वांना परिचितच आहे. कीर्तनकार, प्रवचनकार व पुराणिकवर्ग प्रायः हीच कथा चटकदारपणें खुलवून सांगत असतात. या कथेचा प्रमाणभूत मूळ भाग आम्हांला पाहवयास सांपडला नाहीं चोहोंकडे शोध केला, पुष्कळांना विचारलें, पण अनसूयेच्या सत्त्वहरणपरीक्षेंतून झालेल्या दत्तजन्माला आधारभूत असें प्रमाण कोठेंहि उपलब्ध नाहीं. 'आनंदाश्रम', पुणें व श्रीभांडारकर संशोधन-मंदिर, पुणें या दोन्ही संस्थांत नारदपुराणाचें हस्तलिखित

उपलब्ध असल्याचें आढळून आलें; पण हीं दोन्ही हस्तलिखितें खंडित असल्यामुळें त्यांत दत्तजन्माचें आख्यान उपलब्ध नाहीं. बृहन्नारदीयपुराण म्हणून एक संपूर्ण मुद्रित पुराण उपलब्ध आहे, पण त्यांत अनसूयेची सत्त्वहरणपरीक्षा आढळत नाहीं. गुरुचरित्रकारांनीं मात्र या कथेचा उल्लेख केलेला आहे. कदाचित् त्यांना मूलभूत प्रमाण उपलब्ध झालें असावें. गुरुचरित्र हा ग्रंथ शास्त्रनिष्ठ असून, अत्यंत प्रमाणभूत आहे. ग्रंथकर्त्याचा त्यांत बहुश्रुतपणा प्रत्ययाला येत असून, त्या ग्रंथाला दैवी शक्तीचें अधिष्ठानहि लाभलेलें आहे. अशा स्थितींत त्या ग्रंथांत आदिगुरु श्रीदत्तात्रेयप्रभु यांच्या जन्माचा वर्णिलेला कथाप्रसंग प्रमाणभूत आहे असें मानणें, हें औचित्याला धरूनच होईल. दत्तावतारस्वरूप परमपूज्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती ( टेंबेमहाराज ) यांनीं गुरुचरित्राचा संस्कृतमध्यें अनुवाद केला आहे. त्यांत वरील कथेचा अनुवाद करणें हें ओघानेंच प्राप्त झालें आहे. तथापि प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज यांचा व्यासंग, विद्वत्ता, स्वभाव आणि अधिकार या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां ते प्रमाणविरहित असलेल्या कथाप्रसंगाचा अनुवाद करणार नाहींत हें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें. शिवाय "सतां हि सन्देहपदेषु वस्तुषु प्रमाण-मन्तःकरणप्रवृत्तयः" एखाद्या बाबतींत योग्यायोग्यतेचा संशय निर्माण झाला असतां सज्जनांच्या अन्तःकरण प्रवृत्ति ह्याच प्रमाणभूत ठरतात. हे कविकुलगुरु कालिदासाचें वचनहि लक्षांत घेण्यासारखें आहे. याच अभिप्रायानें आम्ही महासती श्रीअनसूयेच्या सत्त्वहरण-प्रसंगांतून भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु यांचा अवतार कसा झाला तें सादर करीत आहोंत.

विश्वकल्याणासाठीं वीणा खांद्यावर घेऊन भगवद्गुणसंकीर्तन करीत देवर्षि नारदमहामुनि हे अत्रिमुनींच्या आश्रमांत आले. महर्षि नारद हे ब्रह्मदेवाचे पुत्र असून, अत्रिमुनींचे ते थोरले बंधु होत. अनसूयेचे दीर असून, पुढे जन्माला येणाऱ्या दत्तात्रेयांचे ते चुलते होत. लोककल्याणासाठीं ते नेहमीं पर्यटन करीत असत. इकडच्या गोष्टी तिकडें सांगणे व तिकडच्या गोष्टी इकडे सांगणें, या गोष्टी सहजच त्यांच्या हातून होत असत. त्यामुळें लोक त्यांना कळलाव्या असें म्हणतात. आपाततः त्यांची कृति कळलावेपणासारखी दिसली, तरी तिचा परिणाम हितावहच होत असे. त्यामुळें त्यांना कळलाव्या समजणें हें अज्ञानाचेंच द्योतक होय.

अत्रिमुनि आणि अनसूयादेवी यांनी नारदांचें हार्दिक स्वागत केलें. त्यांच्या स्वागताचा स्वीकार करून नारदांची स्वारी ब्रह्मदेवांकडे गेली. सावित्रीसह ब्रह्मदेव स्वसदनांत विराजमान असतां नारदांनीं तेथें अनसूयेच्या गुणांचें वर्णन केलें ! मोठी बोधप्रद आहे ही कथा. असूया, ईर्ष्या, द्वेष आणि मत्सर हे विकार एकमेकांना पोषक असून, ते देवांचाहि घात करतात, मग मानवांची कथा काय ? या कथानकावरून मानवांनीं असूया, ईर्ष्या, द्वेष आणि मत्सर या विकारांपासून अत्यंत सावधपणानें यांतच दूर राहवें त्यांचें हित आहे.

नारदांच्या तोंडून अनसूयेचे गुण ऐकल्यानंतर आनंदच व्हावयास पाहिजे; पण सावित्रीला मात्र आनंद न वाटतां वैषम्यच वाटूं लागलें. ती संतापून म्हणाली, "नारदा! अनसूयेच्या ठिकाणीं असे कोणते गुण आहेत, कीं त्यामुळें ती तुम्हांला एवढी जगाआगळी वाटूं लागली?" नारद म्हणाले, "माते! मी त्रैलोक्यांत फिरून पाहिलें; पण अनसूयेसारखी सर्वगुणसंपन्न स्त्री मला कोठें आढळली नाहीं. तिचा पातिव्रत्यधर्म हा पराकोटीचा आहे. तिच्यासारखी पतिव्रता मला कोणी दिसली नाहीं. स्वरूप, सौंदर्य आणि लावण्यांतहि ती सर्वांआगळीच आहे. आल्यागेल्याचा सत्कार व आदरातिथ्य यांमध्यें ती नेहमीं तत्पर असतें. सर्वांशीं ती नेहमीं गोड बोलेल, कधीं कोणावर रागावणार नाहीं, तिच्या मनांत कशाचाहि लोभ नाहीं, मोह नाहीं, पतीलाच ती आपलें परम दैवत मानून पतीची सेवा करते, गृहकृत्यांत दक्ष राहून सर्वांचीं मनें ती संभाळते. आपल्या पातिव्रत्यानें सर्व देवांना तिनें प्रसन्न करून घेतलेलें आहे. तिच्या पातिव्रत्याचा प्रभाव फारच मोठा आहे. ती नेहमीं सत्य बोलतें व तिचें बोलणें सर्वांना प्रिय वाटतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तिच्यासारखी तीच एक या जगांत सर्वगुणसंपन्न आहे." हें नारदाचें भाषण ऐकून सावित्री अधिकच प्रक्षुब्ध झाली. स्वाभाविकच आहे. एखाद्या स्त्रीपुढें दुसऱ्या स्त्रीचें गुणवर्णन केलें तर तें त्या स्त्रीला रुचत नाहीं. तिला वाटतें, मीच सर्व स्त्रियांमध्यें सर्व गुणांनीं श्रेष्ठ आहें. सावित्रीचीहि अशीच स्थिति झाली. ती म्हणाली, "नारदा, आतां यापुढें अधिक बोलशील तर मी तुला शाप देईन." नारद म्हणाले, "आगोदर माझें बोलणें खोटें ठरवा आणि मग शाप द्या. माझें बोलणें असत्य असेल तर तुमचा शाप मला बाधेल; नाहीं तर त्या शापाचा काय उपयोग? तुमचा शाप खरा व्हावयाचा असेल तर तुम्ही आगोदर माझें बोलणें खोटें ठरवा." असें म्हणून नारद कैलासाला गेले.

कैलास पर्वतावर भगवान् शंकर हे पार्वतीसह आनंदांत इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसले होते. नारदांची स्वारी येतांच दोघांनींहि त्यांचें यथोचित स्वागत केलें. स्वागत झाल्यानंतर ते म्हणाले, "नारदा! तुम्ही नेहमींच सर्वत्र हिंडत-फिरत असतां. एखादी नवलाची गोष्ट दृष्टीस पडली असेल तर सांगा." नारदमुनींनीं पूर्वींप्रमाणेंच येथेंहि अनसूयेच्या गुणांचें मुक्तकंठानें वर्णन केलें! शंकरांना तें रुचलें, पण पार्वतीला मात्र तें रुचलें नाहीं. ती नारदावर रागावली व शाप देऊं लागली. इतक्यांत नारद म्हणाले, "आगोदर माझें म्हणणें खोटें ठरवा आणि मगच मला शाप द्या. माझें म्हणणें खरें ठरलें तर तुमच्या शापाचा काय उपयोग?" असें म्हणून नारद तेथून निघाले व विष्णुलोकाला गेले.

वैकुंठनगरीच ती! मूर्तिमंत लक्ष्मीच तेथें नांदत असल्यामुळें तिच्या वैभवाचें काय वर्णन करावें? नारदाची स्वारी नारायणाचे गुण गातगातच लक्ष्मी-नारायणांच्या

सान्निध्यांत येऊन पोहोंचली. वैष्णवश्रेष्ठ असलेल्या त्या नारदमुनींना पाहिल्याबरोबर श्रीविष्णूंना मोठा आनंद झाला. भक्तांच्या हृदयांत विष्णु व विष्णूंच्या हृदयांत भक्त, मग तेथील प्रेमाचें भरतें कोण वर्णन करूं शकणार ? त्या प्रेमाला सीमा नाहीं व त्याचें वर्णन करण्याला शब्दहि नाहींत.

नारदाचें यथोचित स्वागत झाल्यानंतर नारदांनीं तेथेंहि पण तोच विषय काढला ! पतिपरायण, परमसाध्वी श्रीअनसूया हिच्या अंगीं असलेले श्रेष्ठ गुण श्रवण करून विष्णूला मोठा आनंद वाटला; पण लक्ष्मीचें चित्त विषण्ण झालें. स्वभावच तो स्त्रियांचा! दुसऱ्या स्त्रीचें केलेलें गुणवर्णन त्यांना कधीं खपणार नाहीं. लक्ष्मीचेंहि तेंच झालें. तिला राग आला व अनसूयेबद्दल तिच्या मनांत असूया निर्माण झाली. नारदाला ती शाप देणार तोंच नारद म्हणाले, " आईसाहेब ! आधीं माझें म्हणणें खोटें आहे हें सिद्ध करा आणि मगच शाप द्या. नाहीं तर तुम्हीं दिलेला शाप व्यर्थच ठरेल. "

नारद निघून गेल्यानंतर ही वार्ता लक्ष्मीनें पार्वतीकडे कळविली. पार्वतीनें ती सावित्रीकडे कळविली. नारदानें केलेल्या अनसूयेच्या गुणगौरवानें आपल्याला कमीपणा येत आहे, अशी त्यांची कल्पना झाली. त्या तिघींनाहि अनसूयेबद्दल असूया वाटूं लागली. एखाद्याचा गुणोत्कर्ष सहन न होणें याला असूया म्हणतात. असूयेंतूनच ईर्ष्या निर्माण होते. इतरांपेक्षां लोकांनीं आपल्याला अधिक गुणवान् समजावें यासाठीं केल्या जाणाऱ्या प्रयत्नांना ईर्ष्या किंवा ईर्षा असेंहि म्हणतात. दुसऱ्याइतका उत्कर्ष आपल्याला नाहीं साधला, तर दुसऱ्याचा अपकर्ष करण्याचा प्रयत्न करीत राहणें याला मत्सर असें म्हणतात. ईर्ष्येच्या पोटींच मत्सराचा जन्म होतो व मत्सरांतून द्वेषाची उत्पत्ति होते. ज्याच्याबद्दल असूया, ईर्ष्या अथवा मत्सर वाटत असेल त्याला वरचेवर त्रास देत राहणें याला द्वेष असें म्हणतात. हे चारहि विकार म्हणजे चांडाळचौकडीच आहे. या सर्वांचा जनक आहे अहंकार ! अहंकार हाच मानवांचा मोठा शत्रु आहे. देवांचाहि तो शत्रु आहे. सर्वांचाच तो शत्रु आहे, म्हणून हितेच्छु लोकांनीं आगोदर अहंकारालाच जिंकावें.

उमा, रमा आणि सावित्री यांचा अहंकार बळावलेला होता. असूया, ईर्ष्या इत्यादि विकारहि त्याच पायीं बळावलेले होते. ज्याला ईश्वर पाहिजे असेल त्यानें या सर्वांपासून पूर्णपणें अलिप्त राहिलें पाहिजे. हें शिकविण्यासाठींच कीं काय, परमेश्वरानें दत्तात्रेयाच्या रूपानें अवतार घेण्यापूर्वींच दत्तजन्माशीं या कथानकाचा प्रसंग योजून ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर यांची फटफजिती उडविली. सावित्री, रमा व उमा यांचा अहंकार समूळ नष्ट केला व असूया, ईर्ष्या, मत्सर आणि द्वेष यांचे दुष्परिणाम दाखवून सर्वांनीं या विकारांपासून अलिप्त राहावें असा जणूं कांहीं जगाला धडाच दिला आहे.

अहंकाराच्या आहारीं गेलेल्या वरील तिन्ही देवता या एकत्र जमल्या व अनसूयेचा पाडाव करून नारदाला कसें खोटें ठरवितां येईल याचा त्या विचार करूं लागल्या. त्रिमूर्तींच्या तिन्ही गृहदेवतांची जणूं कांहीं ती शिखर-परिषदच भरली होती. त्यांनीं खूप खूप विचार केला, पण अनसूयेला आपल्याला जिंकतां येईल असा कांहीं उपाय त्यांच्या हातीं लागेना! अखेर उमाकाकूंनीं एक क्लृप्ति काढली. आपण सर्वांनीं मिळून ही जबाबदारी आपआपल्या यजमानांकडेच सोपवावी. त्यांना काय करावयाचें असेल तें ते करतील. आपल्या आकांक्षा पूर्ण करणें हें त्यांचेंच काम आहे. या प्रस्तावाला रमाकाकूंनीं जोरदार समर्थन करून अनुमोदन दिलें. सावित्रीबाईंनींहि त्याला पुष्टि दिली. आपआपल्या यजमानांकडे हें कार्य सोपवावें हा प्रस्ताव एकमतानें संमत झाला. आतां हें काम आपआपल्या यजमानांना सांगावें कसें हा प्रश्न पुढें आला. सरळ सांगावें तर ते मानणार नाहींत. अनसूया ही आम्हां सर्वांपेक्षां सर्व गुणांनीं श्रेष्ठ आहे यांत ते आनंदच मानतील. त्यांना आमच्या नाजुक मनाची काय कल्पना असणार! ते कांहीं सरळ सांगण्यानें ऐकणार नाहींत. लहान मुलांचें बल रडण्यांत असतें, तर स्त्रियांचें बल रुसण्यांत असतें. आपण आपआपल्या सदनांत रुसून बसावें. तिकडून चौकशी करण्याकरितां येणें झालें म्हणजे आपण आपला हेतु त्यांना सांगावा. त्रिजगताच्या अधिष्ठात्री देवता आम्ही तिघीजणी त्रैलोक्यांत सर्वश्रेष्ठ असतांना आमच्यापेक्षांहि लोकांमध्यें अधिक गौरविली जाणारी अनसूया कोण? तिची सत्त्वपरीक्षा घेऊन तिच्या सत्त्वाचें हरण तुम्हीं केलेंच पाहिजे," असें आपण त्यांना सांगूं. आपली ही युक्ति सफल झालीच पाहिजे. परिषद संपली. त्या तिन्ही देवता आपआपल्या लोकाला गेल्या व आपआपल्या सदनांत जाऊन रुसून बसल्या. ब्रह्मदेव आपलें कार्य आटोपून शिणूनभागून रोजच्या-प्रमाणें घरांत आले, पण आज सावित्रीबाईंचा पत्ताच नव्हता! ब्रह्मदेव म्हणाले, "मी घरांत आल्याबरोबर स्मितहास्य करीत सामोरी येणारी सावित्री आज दिसत नाहीं! नाहीं तर रोज ती हंसत हंसत सामोरी यावयाची, पाणी द्यावयाची, चांदीच्या ताटांत मधुर फळांच्या फोडी आणून द्यावयाची, गोड गोड गोष्टी सांगा-वयाची. आज हें कांहींच नाहीं!" चौकशी केली तेव्हा समजलें कीं, बाईसाहेब रुसल्या आहेत. कां बरें, काय झालें रुसावयास? असें म्हणत म्हणत ब्रह्मदेवांची स्वारी सावित्रीच्या जवळ गेली. अनुनय व मनधरणी करीत ते म्हणाले, "बाईसाहेब, आज तुम्ही कां रुसला आहांत? काय झालें, कोठें बिघडलें? तुम्ही मला सांगा. त्रैलोक्यां-तील कोणतीहि वस्तु एकां क्षणांत मी आपल्याला आणून देईन." सावित्री ताबडतोब म्हणाली, "एवढ्या समर्थांची मी पत्नी असतांना त्या अनसूयेच्या गुणगौरवाची गाथा आमच्या समक्ष तुमच्यापुढें गायिली जावी व आम्ही तिच्यापेक्षां कनिष्ठ ठरण्याची आमच्यावर पाळी यावी! आम्हांला याची लाज वाटत आहे. त्या नारदाचें म्हणणें खोटें ठरलें पाहिजे. जा, तुम्ही तिच्या सत्त्वाची परीक्षा घ्या व तिचें सत्त्वहरण करा,

तरच मला संतोष वाटेल. सर्व स्त्रियांमध्यें सर्व गुणांनीं मीच श्रेष्ठ ठरली पाहिजे." ब्रह्मदेव म्हणाले, "एवढेंच ना? मग त्यांत काय मोठें एवढें अवघड आहे? जातों. मी प्रयत्न करतों. तूं रुसवा टाकून आनंदानें राहा."

तिकडे कैलासलोकीं व वैकुंठलोकींहि अशीच घटना घडली. ब्रह्मा, विष्णु आणि महेष हे तिन्ही देव मोठ्या अडचणींत पडले. अनसूयेचें सत्त्वहरण करणें हें अत्यंत अवघड आहे व तें न घडलें तर घरांतला रुसवा काढणें हेंहि अवघडच आहे. स्त्रियांच्या छंदानें वागणाऱ्या पुरुषांची कशी त्रेधा उडते व फटफजिती होते हेंहि दत्तजन्माच्या निमित्तानें घडलेल्या या प्रसंगाच्या मिषानें पाहवयास सांपडत आहे. स्त्रियांचा छंद पुरवावा, पण त्यांत आत्मनाश होतां कामा नये इकडे पुरुषांनीं अवश्य लक्ष पुरविलें पाहिजे. त्रिभुवनाचे अधिपति असलेले हे तिन्ही देव स्त्रियांच्या नादीं लागले व अनसूयेचीं बाळें होऊन राहिले!

तिन्ही देवांनीं एकत्र येऊन अनसूयेच्या सत्त्वहरणाची क्लृप्ति योजिली. अत्रिमुनि आश्रमांत नसतील अशा वेळीं आपण आश्रमांत जावें आणि अनसूयेला नग्नभिक्षेची याचना करावी. अनसूया ही परम पतिव्रता आहे. त्याचप्रमाणें तिचा आतिथ्यधर्महि पराकोटीचा श्रेष्ठ आहे. ती नग्न होऊन भिक्षा घालील तर तिच्या पातिव्रत्याला बाध येईल. भिक्षा न घालतां आम्हांला विमुख करील, तसेंच परत पाठवील, तर तिच्या आतिथ्य व्रताला बाध येईल. अशा रीतीनें तिच्या सत्त्वाचें हरण होऊन आपणां सर्वांचा कार्यभाग उरकेल. यापेक्षां दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं. असा विचार करून ते तिघेहि त्रिभुवनाचे ईश्वर असूनहि भिक्षुक बैरागी बनले. त्रिभुवनांचे अधिपति असूनहि ब्रह्मदेव, विष्णु आणि महेश्वर यांच्यावर भिक्षुवेष धारण करून भीक मागण्याची पाळी आली, तर मग स्त्रियांच्या नादीं लागणाऱ्या सामान्य मानवाची कथा काय? स्त्रियांचा छंद पुरविण्याचा नाद, असूया ईर्ष्या इत्यादि विकारांचे दुष्परिणाम आणि पातिव्रत्याचा प्रभाव इत्यादि अनेक गोष्टींचे उत्कटत्वानें होणारे परिणाम आपल्याला या घटनेंत पाहवयास सांपडत आहेत. अत्रिऋषींची स्वारी तपश्चर्येच्या निमित्तानें आश्रमापासून दूर गेलेली होती. आश्रमांत फक्त पतिभक्तिपरायण महासती श्रीअनसूयादेवी एकटीच होती. ते तिघेहि देव भिक्षुवेषानें अत्रिमुनींच्या आश्रमांत आले. "भवती भिक्षां ददातु" याचा अर्थ आपण आम्हांला भिक्षा घालावी, असा आहे. विष्णूनें सवाल टाकल्याबरोबर लागलीच ब्रह्मदेव म्हणाले "ॐ भवति भिक्षां देहि" ॐ हा प्रणवाचा पर्याय आहे. तों ईश्वराचा वाचक आहे. ॐ या शब्दानें ईश्वराचें परब्रह्माचें स्मरण करून 'भवति' म्हणजे हे पूज्य माते! आम्हांला भिक्षा घाल अथवा मला भिक्षा घाल, असा याचा अर्थ आहे. या ठिकाणीं भवति हें संबोधन आहे. शंकरानींहि पण आपल्या निराळ्याच थाटांत "अ ऽऽलख निरंजन" अशी आरोळी ठोकली! अलख म्हणजे कधींहि डोळ्याला न दिसणारें, मनालाहि पूर्णपणें आकलन न होणारें आणि निरंजन म्हणजे

पाप-पुण्य, सुख-दुःख, जन्म-मृत्यु, जरा-व्याधि इत्यादि कोणत्याहि संसारधर्मानें मलिन न होणारें अर्थात् अत्यंत निर्मल शुद्धब्रह्म. असा या शब्दांचा अर्थ आहे.

अतिथींचा सवाल ऐकतांक्षणींच अनसूयेनें बाहेर डोकावलें तों तीन अतिथि–अत्यंत दिव्य, तेजस्वी, असे तिच्या दृष्टीस पडले. तिनें त्या अतिथींचें स्वागत केलें. हातपाय धुवावयास व चूळ भरावयास पाणी दिलें व बसावयास चटई अंथरली. खावयास फळें पुढें ठेवून प्रत्येक अतिथीस नम्र होऊन नमस्कार केला. कुशल प्रश्न विचारले.

स्वागतं वोऽद्य किं कार्यं मुनिस्तु तपसे गतः ।

महाराज ! मी आपलें स्वागत करतें. आपण कोठून आलां ? आपणांस काय पाहिजे आहे ? आश्रमांतील मुनि तप करण्याकरितां गेले आहेत. येतील दोन तासांनी. बसा आपण. यावर ते अतिथि म्हणाले,

त ऊचुः साध्वि नो विघ्नस्तपःसक्तमना मुनिः ।
कदाऽऽयातीत्यतो देहि क्षुधितेभ्योऽन्नमाशवलम् ।।

'हे साध्वी ! तपश्चर्येमध्यें रत असलेले अत्रिमुनि केव्हां येतील हें सांगतां येत नाहीं. आम्ही तर भुकेनें व्याकुळ झालेलों आहोंत. आम्हांला सत्वर पोटभर जेऊं घाला. हीच आमची अपेक्षा आहे. ठीक आहे, असें म्हणून अनसूया स्वयंपाक-गृहांत गेली. अगदी थोड्या वेळांत पण उत्तम स्वयंपाक तयार केला. चटणी, कोशिंबीर, वडा, भाजी, कढी, आमटी, साधा भात, मसालेभात, वरण, पोळी, सुधारस आणि गहुल्याची खीर हे सर्व पदार्थ तयार केले. तूप तर घरचेंच; आश्रमांतील गायींचें साजूक आणि ताजें तयारच होते. मधुर दही आणि साखरहि पण वाढण्यासाठीं तयार ठेवलीच होती. पाट मांडले, बसावयास एक व टेकावयास एक. रांगोळीच्या कमानी काढून त्या गुलालानें भरल्या. मध्यें पाट मांडून त्यावर केळीचीं पानें घातलीं. सर्व पदार्थ वाढून झाल्यानंतर अतिथींना पाय धुवावयास पाणी ठेवलें. "सर्व तयारी झाली आहे, आतां आपण पाय धुवावेत" अशी तिनें अतिथींना विनंती केली. पण अतिथि कसले ते ? अनसूयेचें सत्त्वहरण करण्याकरितां भिक्षु-वेष धारण करून आलेले कपटी देव होते ते ! महासती अनसूया ही ऋजु-स्वभावाची स्त्री होती. देवांचें कपट तिच्या लक्षांत आलें नाहीं. अतिथि उठले व पाय धुवून आपआपल्या पाटावर बसले. आतां हीच वेळ आहे अनसूयेच्या सत्त्वहरणाची असें ठरवून ते अनसूयेला म्हणाले –

त आहुः साध्वि नो देहि नग्ना भूत्वेत्यपेक्षितम् ।
नेदं चेद्ब्रोचतेऽन्यत्र गच्छामः क्षुधिता इतः ।।

"हे महासती अनसूये ! नग्न होऊन तूं आम्हांला भिक्षा घालावी अशी आमची अपेक्षा आहे. हेंच आमचें आज इच्छा-भोजन आहे. हें जर तुझ्याच्यानें झालें

नाही, तुला हें जर रुचलें नाहीं, तर आम्ही असेच भुकेले भोजन न करतां येथून दुसरीकडे निघून जाऊं."

हें अतिथींचें भाषण ऐकून अनसूया आश्चर्यचकित झाली. यांची अपेक्षा मान्य करावी तर आपल्या पातिव्रत्याला तें बाधक होईल. वरें, ती अमान्य करावी तर भुकेले अतिथि घरांतून विमुख होऊन जातील. हेंहि आपल्या गृहस्थाश्रमधर्माच्या दृष्टीनें वरें नाहीं. त्यानें आपल्या आतिथ्यव्रताला बाध येईल. शिवाय ज्या गृहस्थाश्रमाच्या घरांतून अतिथि माध्यान्हकाळीं विमुख होऊन परत जातो तो त्यांचें पुण्य घेऊन जातो असें धर्मशास्त्र सांगत आहे. काय करावें वरें? दोन्हीं बाजूंनीं हें माझ्यावर मोठें संकटच आलें आहे. अशा संकटाला शास्त्रामध्यें 'उभयतःपाशा रज्जु' असें म्हटलेलें आहे. कोणीकडेहि मान वळविली तरी गळचांत गळफास हा पडणारच. याच परिस्थितीला उद्देशून मराठीमध्यें 'इकडे आड नि तिकडे विहीर' ही म्हण रूढ झालेली आहे. अनसूयेची अशीच अवस्था झाली!

अतिथींचें म्हणणें ऐकून अनसूयेला हसूं आलें. ती मनांत म्हणाली, परम तपस्वी असलेल्या अत्रिमहर्षींच्या संगतीनें व सेवेनें मी अत्यंत पवित्र आहें. यांची अपेक्षा मीं पूर्ण केली नाहीं तर ते काय करतील? शाप देऊन निघून जातील तर तो शाप मला बाधणार नाहीं. कारण माझी सत्यनिष्ठा व पावित्र्य अढळ आहे. मला कोणाच्याहि शापाची भीति नाहीं. अथवा ज्या अर्थी एखाद्या अल्लड बाळाप्रमाणें भलता हट्ट धरून हे अडून बसले आहेत त्या अर्थी हे वयानें मोठे असले तरी हीं माझीं बाळेंच आहेत असें सममजून मी यांना नग्न होऊन वाढलें तर काय होईल? याप्रमाणें अनसूया विचार करूं लागली असतां तिला एकदम स्मरण झालें कीं, तपाला जातांना मीं अत्रिमुनींच्या चरणांचें प्रक्षालन करून तें तीर्थ एका कमंडलूंत भरून ठेवलेलें आहे. "संकटकाळीं तूं याचा उपयोग कर म्हणजे संकटाची तुला भीति राहणार नाहीं." असें अत्रिमुनींनीं मला सांगून ठेवलेलें आहे. तर मग मीं त्या तीर्थाचा उपयोग कां न करावा? असा विचार करून अनसूया देवघरांत गेली. देवाला व अग्निनारायणाला नमस्कार करून तिनें अत्रिमुनींचें चरणोदक प्राशन केलें, व तोच तीर्थोदकाचा कमंडलु हातांत घेऊन बाहेर आली आणि आपल्या हातांत कमंडलूंतील तीर्थ घेऊन तिनें तें त्या अतिथींवरहि शिंपडलें! काय मौज झाली पाहा. अत्रिमुनींच्या चरणोदकाचा अतिथींना स्पर्श होतांच ते तिघेहि अतिथि बाळरूपाला प्राप्त झाले! तीं तिन्ही बाळें जमिनीवर उताणी पडून नुकत्याच जन्मलेल्या व भुकेने व्याकुळ झालेल्या अर्भकाप्रमाणें रडूं लागलीं!

तदैव ते भवन्बाला निर्विकारऽअपीश्वराः।
जगत्सृडीश्वरहराः पातिव्रत्यप्रभावतः॥

जगत्सृज म्हणजे सृष्टिकर्ता ब्रह्मदेव, ईश्वर म्हणजे विष्णु आणि हर म्हणजे शंकर हे तिघे जगाचे ईश्वर म्हणजे स्वामी असूनहि अत्रिमुनींच्या चरणोदकाच्या

प्रभावानें व अनसूयेच्या पातिव्रत्याच्या प्रभावानेंहि ताबडतोब बालस्वरूपाला प्राप्त झाले व निर्विकार बनले ! अशा रीतीनें एकीकडे सत्यनिष्ठेचें, तपाचें व पातिव्रत्याचें बल व दुसरीकडे सृष्टीच्या उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय यांचें एकवटलेलें बल, या दोन्ही बलांचा झगडा चालला असतां असत्संकल्पामुळें त्या तिन्ही देवांचें बल पराभूत झालें. सत्संकल्पावर आधारित असलेलें तपाचें व पातिव्रत्याचें बल विजयी झालें आणि महासती श्रीअनसूयादेवी ही संकटांतून मुक्त झाली ! अनसूयेनें ताबडतोब अतिथींना दिलेल्या वचनाप्रमाणें आपलें वस्त्र बाजूला ठेवून त्या तिन्ही बाळांना पोटभर स्तन्य पाजून तृप्त केलें !

कांहीं लोक असें सांगतात कीं, अनसूयेनें अतिथींना थोडा वेळ थांबण्याची विनंती केली. ती ताबडतोब अत्रिमुनींच्याकडे गेली व तिनें मुनींना संकटाची कल्पना दिली. अत्रिमुनि म्हणाले, " चिंता करूं नकोस. त्यांच्या जटेंत अगोदर तेल ओत, मग अभ्यंग करून त्यांना स्नान घाल आणि त्यानंतर त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना भोजन दे." अनसूया आश्रमांत परत आली व तिनें " तुम्हांला मी प्रथम अभ्यंग करून स्नान घालतें व नंतर तुमच्या इच्छेप्रमाणें मी तुम्हांला भोजन देतें " असें सांगितलें. अनसूयेचें म्हणणें ऐकून देवांना वाटलें, यांत आपला विजयच आहे. आंधळा मागतो एक डोळा व देव देतो दोन डोळे. आपण केवळ नग्नपणानें भिक्षा मागत आहोंत आणि ही तर आपल्याला नखशिखान्त अभ्यंगहि करीत आहे आणि नग्नावस्थेत भोजनहि देत आहे. यांपैकीं कोणतीहि एक गोष्ट सत्त्वहरणाला पुरी आहे. मग दोन्हीं गोष्टी घडून आल्या तर 'अधिकस्याधिकं फलम्' म्हटल्याप्रमाणें फारच बरें होईल. असें समजून त्यांनीं अनसूयेला अभ्यंग करण्याची अनुमति दिली. अनसूयेनें त्यांच्या मस्तकांवर तेल ओततांक्षणींच ते तिघेहि देव एकदम बालस्वरूपाला प्राप्त झाले ! अनसूयेनें त्यांचें सर्वांग माखून त्यांना स्नान घातलें व त्यांच्या इच्छेप्रमाणें अंगावरील वस्त्र बाजूला ठेवून त्यांना स्तनास लावलें व पोटभर पाजून तृप्त केलें ! याप्रमाणें प्रेमाचा पान्हा स्वमुखीं घेऊन तो त्रैलोक्याचा राणा तृप्त झाला !

अनसूया त्या मुलांचें लालन-पालन प्रत्यहीं करीत आहे, पण तिच्या मनाला समाधान नव्हतेंच. तिला जाणीव होतीच, हें परकीय धन केव्हां हातचें निघून जाईल याचा भरंवसा नाहीं; आणि शेवटीं झालेंहि तसेंच.

तिकडे उमा, रमा आणि सावित्री आपआपल्या ठिकाणीं बसून सारख्या मार्गप्रतीक्षा करीतच होत्या. आतां येतील, मग येतील, अनसूयेचें सत्त्वहरण केल्याची बातमी सांगतील. अनसूयेचा कमीपणा व आमचा मोठेपणा जगजाहीर होईल. असा विचार करीत सचिंत अंतःकरणानें त्या बसल्या आहेत, परंतु कोणाचाहि पत्ता नाही. ना ब्रह्मदेव, ना विष्णु, ना शंकर. अधिकच काळजी वाटूं लागली ! त्या तिघी एकत्र जमल्या. विचार करूं लागल्या. इतक्यांत नारदाची स्वारी आली. नारदाबद्दल तिघींच्याहि मनांत राग होता; पण निरुपायास्तव तो उघड न करतां त्यांचें लटकें

स्वागत करून त्या म्हणाल्या, "नारदा! बरेच दिवस लोटले. अजून त्यांच्या स्वाऱ्या परत आल्या नाहींत. तुम्हांला कांहीं कल्पना असेल तर सांगा." नारदमुनि त्या तिघींना उद्देशून म्हणाले, "बाईसाहेब! नुकताच मी अत्रिमुनींच्या आश्रमांत पुन्हां जाऊन आलों. मला तेथे असें समजलें कीं, अनसूयेच्या आश्रमांत कोणी तरी अति दिव्य तेजस्वी तीन पुरुष, वैराग्यांच्या रूपाने भिक्षा मागावयास आले. त्यांनीं अनसूयेला नग्न होऊन भिक्षा वाढण्याची विनंती केली. नग्न होऊन आम्हांला भिक्षा नाहीं घातली तर आम्ही तुला शाप देऊं असा धाकहि घातला! परिणाम असा झाला कीं, अनसूयेनें आपल्या पातिव्रत्याच्या प्रभावानें त्या तिघांनाहि बाळें व्हावयास भाग पाडलें व आतां ते तिघेहि अनसूयेच्या घरीं खेळत आहेत! अनसूया त्यांना पाजते, न्हाऊं घालते, पाळण्यांत घालते, झोके देते, अंगाई गाते. तीं तिन्ही मुलें मीं पाहिलीं. त्यांचें तें दिव्य आणि अलौकिक तेज पाहून हे प्रत्यक्ष ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वरच असावेत असें वाटलें. पाहा तुम्ही. जा एकदा अनसूयेच्या आश्रमांत आणि आपआपल्या पतिराजांना ओळखून खात्री करून घ्या."

देवर्षि नारदांचें हें भाषण ऐकतांच त्या तिघींच्याहि तोंडचें पाणीच पळालें! अगबाई! "काय सांगत आहां नारदा हें तुम्ही!" असें म्हणून त्यांनीं आक्रोश करावयास आरंभ केला! "आम्ही करायला गेलों काय आणि हें झालें काय? आमचा मोठा घात झाला. आमचे पतिराज आतां आम्हांला कसे मिळतील? आम्हांला जर ते पूर्ववत् भेटले नाहींत तर आमचा संसारच धुळीस मिळाला असें म्हणण्याची पाळी येईल." नारद म्हणाले, "बाईसाहेब! तुम्ही महाशक्तिशालिनी त्रैलोक्याच्या माता! तुम्ही सर्वांना बोध करावयाचा असा तुमचा अधिकार. मग तुम्हीच जर शोक करूं लागला तर तुम्हांला धीर कोणी द्यावयाचा? चला, उठा, या अहंकारानें कोणाचें बरें केलें आहे? द्या अहंकार टाकून आणि जा त्या अनसूयेकडे. धरा तिचे पाय आणि करा सुखाचा संसार.

नारदाच्या सांगण्याप्रमाणें त्या तिघीहि नारदाला बरोबर घेऊन अनसूयेच्या आश्रमाला आल्या. अनसूयेनें सर्वांचें स्वागत केलें. पण त्या स्वागतांत तिघींनाहि कांहीं गोडी लागली नाहीं. त्यांचीं मुखें म्लान झालेलीं होतीं. अनसूयेनें सासूबाईंचें नातें लक्षांत घेऊन नमस्कार केला व नम्रपणें विचारलें, तुम्ही कशाची चिंता करीत आहां, मला सांगा. मीं यथाशक्ति प्रयत्न करून तुमच्या चिंतेचा परिहार करीन. त्या तिघींनीहि आपला मोठेपणाचा अभिमान बाजूला ठेवून अनसूयेला नमस्कार केला. "बाईसाहेब, आमचे पतिराज आपल्या घरीं विराजत असल्याचें कळतें तरी ते आमचे आम्हांला आपण कृपा करून परत द्यावेत. आमच्याकडून कांहीं अपराध झाला असेल तर त्याची क्षमा करावी." अनसूयेनें तीन बाळें त्यांच्यापुढें आणून ठेवलीं व म्हणाली, "हे पहा, घ्या तुमचे तुम्ही ओळखून!" आपल्या पतिराजांची ती अवस्था पाहून त्यांना पुन्हां रडूं कोसळलें व हुंदके देत त्या म्हणाल्या, "बाई अनसूये! हे तर

आम्हांला ओळखावयासहि येत नाहींत. शिवाय या अवस्थेंत यांना घेऊन आम्ही काय करणार? हा एक जगांत मोठा उपहासाचा विषय होईल! तरी ज्या पातिव्रत्याच्या प्रभावानें तूं यांना बाळें केलीं आहेस त्याच पातिव्रत्याच्या प्रभावानें तूं यांना पूर्ववत् करून आम्हांला दे व चुडेदान केल्याचें पुण्य घे. बाई! तूंच हें करूं शकशील. आमचे तुला शतशः प्रणाम."

अनसूयेनें त्या तिघींचे हे केविलवाणे शब्द ऐकल्यानंतर तिला त्यांची दया आली. ती ताबडतोब उठली व देवघरांत जाऊन तिनें अत्रिमुनींच्या चरणोदकानें भरलेला कमंडलु आणला. अत्रिमुनि व नारदमुनि तेथें उभे होते. उमा, रमा व सावित्री याहि तेथें उभ्या होत्या. सर्वांच्या समक्ष अनसूयेनें उजव्या हातावर तें पाणी ओतून घेतलें. आपल्या प्रभावी पातिव्रत्याला स्मरून तिनें संकल्प केला व तपानें पुनीत झालेल्या अत्रिमुनींचें पादोदक त्या तिन्ही बाळांच्या अंगावर शिंपडलें. ती म्हणाली, "ज्याप्रमाणें तुम्ही अत्रिमुनींच्या तीर्थोदकानें व माझ्या संकल्पानें बाळें झालां त्याच-प्रमाणें तुम्ही आज श्रीअत्रिमुनींच्या पादोदकानें व माझ्या संकल्पानें पुन्हां पूर्ववत् आपआपल्या अवस्थेला प्राप्त व्हा." असें म्हणून तिनें तें पाणी त्या तिन्ही बाळांच्या अंगावर छिडकलें. पाहतां पाहतां तीं तिन्ही बाळें भिक्षुरूपांत प्रकट न होतां आप-आपल्या ब्रह्मा, विष्णु आणि महेश या रूपानें प्रकट झाले!! सर्वांचीं अंतःकरणें आनंदानें ओथंबलीं! उमा, रमा आणि सावित्री यांचा आनंद तर गगनांत मावेना! त्यांनीं ताबडतोब अनसूयेला नमस्कार करून हार्दिक धन्यवाद दिले! अत्रिमुनींना नमस्कार केला. नारदालाहि नमस्कार केला. वडील-धाकुटेपणाचा भेदभाव मावळ-लेला होता. आपआपल्या पतिराजांना नमस्कार केला व एकमेकींनाहि त्यांनी नमस्कार केला! देवांनाहि आपआपल्या पत्नींचा अहंभाव मावळला व असूया, द्वेष आणि मत्सर इत्यादि विकारहि मावळले आणि त्या आता निर्मल व निर्विकार बनल्या हें पाहून मोठा आनंद वाटला.

आपआपल्या लोकाला जाण्यासाठीं निरोप घेण्याकरितां ते अनसूयेकडे वळून म्हणाले, "माते! आतां आम्हांला तुम्ही निरोप द्या. झालें गेलें विसरा, क्षमा करा. अनसूया चटकन् म्हणाली, "आतां तुम्ही आपआपल्या स्थानाला जाणार. माझ्या आश्रमांतला हा पाळणा रिकामा झाला! घर शून्य झालें! 'अपुत्रस्य गृहं शून्यम्' हें तुम्हीं जाणतच आहां, मीं काय तुम्हांला हें सांगावयास पाहिजे? तुम्ही आतांच मला माते म्हणून संबोधलें! हे आपले शब्द खरे करा व मग निरोप घ्या." अनसूयेचे हे शब्द ऐकतांच तिन्ही देवांनीं अनसूयेला वर दिला. आम्ही तिघेंहि पुत्ररूपानें तुमच्या पोटीं लवकरच जन्म घेऊं. तुम्हीं चिंता करूं नये. तिन्ही देवांकडून वरदान मिळाल्या-नंतर अत्रि व अनसूया यांना आनंद झाला. आणि त्यांनीं उमा, रमा व सावित्री यांच्यासह तिन्ही देवांचा सत्कार करून व खाऊपिऊं घालून त्यांना निरोप दिला. ते देव आपआपल्या स्त्रियांना बरोबर घेऊन आपआपल्या लोकाला निघून गेले.

हा सर्व इतिहास माहुरगडाच्या परिसरांत घडून आला असावा असें अनेक विद्वानांचें मत आहे. माहुरगडाच्या पुढें कालिका शिखराला लागून जी शिखरराजी दिसते त्यांतच अनसूया-शिखर म्हणून एक सुप्रसिद्ध शिखर आहे. हेंच तें या सर्व ऐतिहासिक घडामोडींचें स्थान होय. देव गेल्यानंतर शून्यवत् भासणाऱ्या त्या आश्रमांत अत्रींला राहवेना व अनसूयेचेंहि मन तेथें रमेना. अशा स्थितींत आपली पुत्रकामना पूर्ण व्हावी म्हणून अत्रिमुनि व अनसूया हे दोघेहि शुचीन्द्र क्षेत्राला गेले. शचीन्द्र क्षेत्राचा इतिहास आणि त्या ठिकाणीं अत्रि व अनसूया यांनीं केलेलें तप, त्याचप्रमाणें त्यांना झालेलें देवदर्शन आणि मिळालेला वर या सर्व गोष्टींचा इतिहास आम्हीं पूर्वी निवेदन केलाच आहे. अत्रि आणि अनसूया यांना निरनिराळ्या प्रसंगांनी वेळोवेळीं मिळालेल्या वरदानांचा फलद्रूप होण्याचा काळ जवळ आलेला होता. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' या भगवंतानीं केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणेंहि अवतार घेण्याला योग्य काळ प्राप्त झाला होता.

## दत्तात्रेयांच्या अवताराचें कारण

दत्तात्रेयानें अनसूयेच्या उदरीं अवतार कां घेतला? केवळ अत्रि आणि अनसूया यांना वेळोवेळीं आपण वरदान दिलें आहे, हेंच एक दत्तात्रेयांच्या अवताराचें कारण नसून, आणखी कांहीं अपरिहार्य कारणें निर्माण झालेलीं होतीं, त्यामुळेंहि परमेश्वराला अवतार घेणें भागच होतें. हरिवंशाच्या पहिल्याच पर्वांत एकेचाळिसाव्या अध्यायांत म्हटलें आहे कीं —

भूयो भूतात्मनो विष्णोः प्रादुर्भावो महात्मनः।
दत्तात्रेय इतिख्यातः क्षमया परया युतः॥

सर्वभूतान्तरात्मा विश्वव्यापी भगवान् विष्णु विश्वकल्याणाकरितां पुन्हां प्रादुर्भूत झाले ते दत्तात्रेय या नांवानें प्रसिद्धीस आले. ते अत्यंत क्षमाशील होते, नव्हे आहेतच. याच ठिकाणीं पुढें जें वर्णन केलेलें आहे त्यावरून श्रीदत्तात्रेयांच्या अवताराच्या वेळीं सामाजिक परिस्थिति कशी होती व दत्तात्रेयांच्या रूपानें प्रभूला अवतार कां घ्यावा लागला याचें मोठें मार्मिक वर्णन केलेलें आहे.

तेन नष्टेषु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च।
चातुर्वर्ण्ये तु संकीर्णे धर्मे शिथिलतां गते॥

अभिवर्धति चाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते।
प्रजासु शीर्यमाणासु धर्मे चाकुलतां गते॥

सहयज्ञक्रिया वेदाः प्रत्यानीता हि तेन वै।
चातुर्वर्ण्यमसंकीर्णं कृतं तेन महात्मना॥

दत्तात्रेयांनीं अवतार घेतला त्या वेळीं वेद प्रायः नष्टप्राय झालेले होते. सत्ययुग असूनहि त्याला कलियुगाची कळा आलेली होती! चातुर्वर्ण्य संकीर्ण झालेले

 

होते. ब्राह्मणांचीं कर्मे ब्राह्मणांनीं सोडून दिलेलीं होतीं. स्नान नाहीं, संध्या नाहीं. जप, तप, पूजा, अनुष्ठान नाहीं. वेदाध्ययन नाहीं, अध्यापन नाही. शास्त्रें संपुष्टांत आलीं. यज्ञयागादि कर्मे नाहींत. दानधर्म नाहीं. प्रतिग्रह घेण्यांत मात्र हात पुढें सरसावलेले. चांगल्या कामांच्या निमित्तानें अनुदानें मिळविलीं जातात, पण त्याप्रमाणें त्यांचा विनियोग होत नाहीं व चांगलीं कामें घडून येत नाहींत. कोणी कोणाच्या दुःखाची पर्वा करीत नाहीं. नीतिधर्म उरला नाहीं. पापपुण्याची भीति राहिली नाहीं. समाजाची धारणा नाहीं. समाज विस्कळीत झाला. कोणी कोणाची विचारपूस करीत नाहीं. क्षत्रिय. वैश्य आणि शूद्र हेहि आचारभ्रष्ट झाले. आनुवंशिक ज्ञानपरंपरा व कलानैपुण्य संपलें. धर्म म्हणजे आपआपलें कर्तव्यकर्म. त्यामध्यें शैथिल्य निर्माण झालें. अधर्म वाढला. सत्य विलयाला गेलें. खोटेपणाला स्थायीभाव प्राप्त झाला. भ्रष्टाचाराला ऊत आला. सामान्य प्रजाजन अत्यंत दुःखी व कष्टी होऊं लागले. अशी ही सामाजिक दुरवस्था व राष्ट्राची दैना पाहून दत्तात्रेयांना दया आली व त्यांनीं लोकसेवेसाठींच अनसूयेच्या पोटीं जन्म घेतला. नष्ट झालेले वेद पुन्हां मिळविले, ते शोधून काढले, विसरलेले स्मृतिपथांत आणून दिले. यज्ञयागादि प्रक्रिया जागृत ठेवल्या. स्वधर्माची स्थापना केली. समाजांतील वैमनस्य मिटवून सर्वांना आपआपल्या धर्माकडे अर्थात् कर्तव्यकर्माकडे वळविलें. समाजांतील वरच्या थरापासून खालच्या थरापर्यंत सर्वांशीं समरस होऊन सामाजिक वैमनस्य मिटविलें व सर्व समाजाला सुखी केलें. अशी आहे ही दत्तात्रेयांची अवतार-कथा.

## दत्तात्रेय अवतरले

अवतार घेण्याला योग्य काळ प्राप्त झाल्याबरोबर परमेश्वरानें अत्रिमुनींना व अनसूयेला दर्शन दिलें. तें दर्शन समन्वित त्रिमूर्तींचें होतें. त्रिगुणात्मक त्रैमूर्तींचें तें मंगलमय ध्यान पुढें प्रकट झाल्याबरोबर अत्रींना मोठा आनंद झाला! "देवा! हेंच तुझें आनंदमय आणि मंगलमय असलेलें कोमल रूप. गोजिरें ध्यान नेहमींच माझ्या डोळ्यापुढें असूं दे." देव तथास्तु म्हणाले. लागलीच अनसूया पुढें झाली आणि म्हणाली, "देवा! मला विसरलांत का? तुम्हीं माझ्या उदरीं पुत्ररूपानें अवतरण्याचें दिलेलें वचन केव्हां पूर्ण करणार?" देव म्हणाले, "आत्ताच आम्हीं तिघांनींहि तुम्हाला आत्मसमर्पण केलेलें आहे. आम्हीं तुम्हांला स्वतःच स्वतःला देऊन टाकलें आहे. आम्हीं तुम्हाला दत्त झालों म्हणून दत्त या नांवानेंच आम्हीं जगांत प्रसिद्धीला येऊं." असें म्हणून ती त्रिमूर्ति तेथेंच अंतर्धान पावली. पाहतां पाहतां तेज अत्रिमुनींच्या देहांत सामावलें! त्याच तेजानें तेजाळलेलें बीज अत्रिमुनींनीं अनसूयेच्या उदरीं ठेवलें. अत्रिमुनि अनसूयेसह माहुरगडास पुन्हां परत आले. अनसूयेच्या उदरीं विसावलेलें तें तेज शुक्लपक्षांतील चंद्राच्या कलेप्रमाणें दिवसानुदिवस वृद्धिगत होऊं लागलें! सृष्टिनियमाप्रमाणें आतां अनसूया अधिकच तेजस्वी दिसूं लागली!

विश्वंभराचा भार तिनें आतां विश्वाच्या कल्याणासाठींच आपल्या उदरांत धारण केलेला होता. सच्चिदानंदाचा प्रकाश तिच्या मुखावर झळकत होता ! तिची गति मंदावलेली होती तरी स्फूर्ति मात्र विद्युच्छक्तीप्रमाणें गतिशील होती. तिला आतां डोहाळे होऊं लागले ! काय असणार बरें हे डोहाळे ?

डोहाळे याला संस्कृतमध्यें 'दौहृद' शब्द आहे. दोन हृदयांचा भाव तेथें व्यक्त होत असतो. एक मातेचें हृदय आणि दुसरें गर्भगत व्यक्तीचें हृदय. गर्भांत असलेल्या अर्भकाचें हृदयच जणूं कांहीं मातेच्या हृदयाशीं समरस होऊन आपले विचार व्यक्त करीत असतें. अशीहि वस्तुस्थिति असल्यामुळेंच गर्भिणीला होणाऱ्या डोहाळ्यांच्या लक्षणांवरूनच सुविचक्षण लोक जन्माला येणाऱ्या मुलाचा स्वभाव ओळखत असतात. दशरथानें कौसल्येला डोहाळे विचारतांच कौसल्या म्हणाली, "आणा रे आणा धनुष्यबाण । करूं रावणाचें निर्दालन ।।" दशरथाला वाटलें, हिला वेड लागलें कीं काय ? पण वसिष्ठांनीं सांगितलें, " राजा ! हें वेड नव्हे. हीं पुढें जन्माला येणाऱ्या मुलाच्या पराक्रमाचीं सूचक चिन्हें आहेत." प्रकृतस्थलीं अत्रि-मुनींनीं अनसूयेला डोहाळे विचारतांच ती म्हणाली, "अंगाला भस्म लावावें, अवधूत बनावें व जगाला सदुपदेशानें सुखी करावें." हें उत्तर ऐकतांच अत्रीनें जे जाणा-वयाचें तें ताडलें. अवांतर डोहाळे थाटामाटानें साजरे झाले. सभोवारच्या आश्र-मांतून राहणाऱ्या ऋषिपत्नींनीं अनसूयेचीं डोहाळ-जेवणें अहमहमिकेनें पार पाडलीं. चांदणें-भोजन, झोपाळ्यावरचें जेवण, बागेंतले फराळ, वनभोजन, फुलांचे अलंकार, पानांचीं तोरणें इत्यादि. लाडू, जिलेबी, करंज्या, बासुंदी, श्रीखंड, पापड, लोणचीं, चटण्या, कोशिंबिरी, कुर्डया, सांडगे, नाना प्रकारच्या भाज्या, कढी, आमटी, साधा भात, साखरभात, खीर, शेवया, साजुक तूप, दही-साखर, साय-साखर, पुरणाची पोळी इत्यादि जें जें ज्यांना शक्य झालें तें तें अनसूयेला देऊन सर्वांनीं तिचें मोठें कोडकौतुक केलें.

## दत्तजन्माचा मुहूर्त

दत्तजन्माचें स्थान शुचीन्द्रं क्षेत्र मानावें का माहुर क्षेत्र मानावें ? याला प्रमाणें तर दोन्हीं बाजूंनीं पाहवयास सांपडतात. समन्वयाच्या दृष्टीनें याचा निर्णय आम्हीं पूर्वीं दिलेलाच आहे, तो वाचकांनीं लक्षांत घ्यावा. श्रीवासुदेवानंदसरस्वतींच्या मतानें तर हा जन्म माहुर क्षेत्रांतच झालेला आहे असें दिसतें.

गोदावर्या महानद्या उत्तरे सिंहपर्वते ।
सुपुण्ये माहुरपुरे सर्वतीर्थसमन्विते ।।
जज्ञेऽत्रेरनसूयायां प्रदोषे बुधवासरे ।
मार्गशीर्ष्यां महायोगी दत्तात्रेयो दिगंबरः ।।

जी नदी साक्षात् समुद्राला जाऊन मिळते तिला महानदी असें म्हणतात. गोदावरी ही एक अशीच महानदी आहे. ती नाशिकजवळ असलेल्या ब्रह्मगिरि अथवा त्र्यंबकेश्वर पर्वतापासून उगम पावते आणि महाराष्ट्र व आंध्र या प्रदेशांतून वाहत वाहत राजमहेंद्रीजवळ पूर्वसागराला जाऊन मिळते. नांदेडजवळ गोदावरीच्या उत्तर दिशेला सह्याद्रीची एक रांग पसरलेली आहे. याच पर्वतश्रेणीला उद्देशून प्राचीन वाङ्मयामध्यें सिंहाचल, सिंहाद्रि अथवा सिंह पर्वत असे शब्द आलेले आढळतात. या पर्वताच्या कुशींत माहुर अथवा मातापूर नांवाचें क्षेत्र प्रसिद्ध आहे. तें पद्मतीर्थ, मातृतीर्थ आणि सर्वतीर्थ अशा अनेक तीर्थांनीं युक्त असून, तें अत्यंत पवित्र क्षेत्र आहे. तें साडेतीन पीठांपैकीं आदिशक्तीचें एक पीठ आहे. या ठिकाणीं असलेली एकवीरा अथवा श्रीरेणुकादेवी ही असंख्य लोकांची कुलस्वामिनी आहे. याच पावन क्षेत्रांत सद्गुरु योगेश्वर भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा अनसूयेच्या उदरीं जन्म झाला. तो महिना मार्गशीर्षाचा होता. दिवस पौर्णिमेचा होता. बुधवार होता त्या दिवशीं. पश्चिमेकडे भगवान् सूर्यनारायण अस्ताला चालले होते, तर दुसरीकडे पूर्व दिशेच्या क्षितिजावर पूर्णचंद्राचें बिंब उदयाला येत होतें. दोन्ही दिशा आरक्तवर्ण झालेल्या होत्या. आकाशांत जणूं कांहीं देवांनीं गुलालाची उधळण केलेलीं होती! प्रदोषकाळ म्हणजे सायंकाळची वेळ होती ती. अशा सुमुहूर्तावर अज्ञजनांच्या अन्तःकरणांतील अज्ञानतिमिराचा निरास करण्याकरितां प्रत्यक्ष प्रबोधचंद्रस्वरूप महायोगी भगवान् श्रीदत्तात्रेय अवतरले!

पहिल्या प्रथम अत्रिमुनि आणि अनसूया यांना भगवान् दत्तात्रेय कसे दिसले ते पाहा –

मालां कुण्डीं च डमरूं शूलं शंखं सुदर्शनम् ।
दधानः षड्भुजैस्त्र्यात्मा योगमार्गप्रवर्तकः ।।
भस्मोद्धूलितसर्वांगो जटाजूट विराजितः ।
रुद्राक्षभूषित तनुः शांभवीमुद्रया युतः ।।
भक्तानुग्रहकृन्नित्यं पापतापार्तिभंजनः ।
बालोन्मत्तपिशाचाभः स्मर्तृगामी दयानिधिः ।।

त्रिगुणात्मक त्रैमूर्ति म्हणजे भगवान्, ब्रह्मा, विष्णु आणि शंकर या तिघांच्या एकीभूत रूपानें नटला होता! त्र्यात्मा म्हणजे मूर्तित्रयस्वरूप षड्भुज आणि त्रिमुख असें तें रूप होतें. रुद्राक्षमाला, कमंडलु, डमरू, त्रिशूळ, शंख आणि चक्र अशीं आयुधें आणि चिन्हें हातांमध्यें धारण केलेलीं होतीं. योगमार्गाचा प्रवर्तक असलेल्या त्या प्रभूनें सर्वांगीं भस्म चर्चिलें होतें. मस्तकावर जटाभार मुकुटाप्रमाणें शोभत होता. कंठामध्यें धारण केलेल्या रुद्राक्षमाळेनें त्यांच्या देहाला कांहीं आगळीच शोभा आलेली होती. मुखांवर शांभवी मुद्रा विलसत होती. भुवयांच्या

मध्यभागीं अथवा भुवयांवरच दृष्टि स्थिर करावी व हृदयाकाशांत असलेल्या परमात्मस्वरूपाचें तन्मयतेनें अखंड चिंतन करावें याला शांभवी मुद्रा असें म्हणतात. हीच दत्तात्रेयांच्या मुखावर दिसत होती. त्यांची आकृतीच त्यांच्या स्वभावावर प्रकाश टाकीत होती. भक्तांवर नित्य अनुग्रह करण्याची प्रवृत्ति स्मित हास्याच्या रूपानें मुखांवर झळकत होती. कायिक, वाचिक आणि मानसिक पापें, तसेंच आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक ताप यांपासून होणाऱ्या दुःखांतून सोडवून शरणागतांचें परित्राण म्हणजे संरक्षण हेंच कार्य, करीत असलेले दिसतात. ते दिसावयाला बाल, वेडा किंवा पिशाच यांच्यासारखे दिसले तरी, स्मरण केल्याबरोबर धांवत येणारे मोठे दयानिधि आहेत. त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर हे लक्षांत येत होतें. हेंच त्रैमूर्तीचें मूर्त स्वरूप संत तुकाराम महाराज यांनींहि ध्यायिलेलें व वंदिलेलें आहे.

तीन शिरें सहा हात । तया माझा दंडवत ।।
काखें झोळी पुढें श्वान । नित्य जान्हवीचें स्नान ।।
माथा शोभे जटाभार । अंगीं विभूति सुंदर ।।
शंख चक्र गदा हातीं । पायीं खडावा गर्जती ।।
तुका म्हणे दिगंबर । तया माझा नमस्कार ।।

अनसूयेनें हें त्रैमूर्तीचें सगुण स्वरूप पाहिल्याबरोबर हात जोडून प्रणाम केला. रामजन्माच्या वेळीं कौसल्येला व कृष्णजन्माच्या वेळीं देवकीला असाच प्रथम सगुण स्वरूपाचा साक्षात्कार झालेला होता. ही गोष्ट अध्यात्मरामायण आणि श्रीमद्भागवत या ग्रंथांवरून पाहवयाला सांपडते. दत्तजन्माच्या वेळींहि प्रथम असाच अनसूयेला श्रीहरीच्या सगुण स्वरूपाचा साक्षात्कार झाला. अनसूयेनें भक्तिपूर्वक प्रणाम करून प्रार्थना केली. महाराज, हें तर अत्रिमहर्षींच्या नित्य ध्यानांतलें आपलें स्वरूप आहे. मी तर आपलें माता या नात्यानें सर्व प्रकारचें कौडकौतुक करूं इच्छितें. तरी आपण बालरूप घेऊनच माझ्या उदरीं अवतरावें व मला धन्य करावें. अनसूयेची ही प्रार्थना ऐकतांच भक्तवत्सल भगवान् श्रीहरि अनेक वेळां इष्ट वर देऊन वचनबद्ध झाल्यामुळें त्याच क्षणीं बालरूप घेऊन अवतरले! भगवान् स्वयं अजन्मा असूनहि भक्तकाजासाठीं जन्माला आले.

दाही दिशा प्रसन्न दिसूं लागल्या. सज्जनांचीं मनें प्रसन्न झालीं. कुमुदिनी उमलल्या. पाखंडयांचीं मनें कोमेजलीं. देव आनंदले, मानव आनंदले, भक्त आनंदले. अत्रि आणि अनसूया यांचा आनंद तर गगनांत मावेना. आश्रमांतला आनंद ओसंडत होता. अत्रिमुनि आले. इतरहि ऋषि आले. ब्राह्मण आले. सुवासिनी आल्या. दारीं हेलांचा पाट वाहूं लागला! हळदी-कुंकू, सौभाग्यवायनें, साखर, सुपारी, नवीं लुगडीं, ब्राह्मणांचा आशीर्वाद-मंत्रांचा घोष, जातकर्म संस्कार, दक्षिणा, वस्त्रें, महावस्त्रें,

विद्वत्सत्कार, सगळी एकच घाई-गर्दी उसळली ! नौबदा झडूं लागल्या. मंगल वाद्यें वाजूं लागलीं. देवांनीं पुष्पवृष्टि केली. गंधर्व गाऊं लागले. अप्सरा नृत्य करूं लागल्या. त्या आनंदाचें वर्णन कोण करणार ? श्रुति मौनावली. शेष थकला. प्रत्यक्ष आनंद-कंदाचाच अवतार तो ! !

## दत्तात्रेयांचा नामकरण-संस्कार

वस्तुतः ब्रह्मदेव, विष्णु आणि रुद्र म्हणजे महादेव. या तिघांनींहि अत्रि आणि अनसूया यांना स्वात्मसमर्पण केलें असल्यामुळें त्या तिघांच्याहि समन्वित स्वरूपाला उद्देशून दत्त असें एकच नांव रूढ झालें व तें तसें होणें योग्यच आहे. तथापि प्रत्यक्ष जन्म घेतांना तिघांनीं पृथक् पृथक् जन्म घेतला. त्यांत ब्रह्मदेवाच्या अंशापासून सोमाचा म्हणजे चंद्राचा जन्म झाला. विष्णूच्या अंशापासून प्रत्यक्ष दत्तात्रेयांचाच जन्म झाला व शंकरांच्या अंशापासून दुर्वास ऋषींचा जन्म झाला. ब्रह्मदेवाचा अंश गौरवर्ण चंद्राप्रमाणें आल्हाददायक, अत्यंत सौम्य म्हणजे सुंदर म्हणून त्याला सोम किंवा चंद्र असें नांव देण्यांत आलें. शंकरांचें दुसरें नांव रुद्र. रुद्र शब्दाचा अर्थ भयंकर असा आहे. रुद्रांशानें अवतरलेल्या दुर्वासमुनींमध्यें तो गुणधर्म अधिक स्पष्ट दिसत होता. दुर्वासमुनि अत्यंत कोपिष्ठ होते. यद्यपि त्यांचा कोप हा अनुग्रहकारकच होता. त्यापासून शेवटीं कल्याणच निष्पन्न होत असे. तथापि सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या उग्र स्वरूपावरून त्यांना दुर्वास असेंच नांव देण्यांत आलें. राहतां राहिले तिसरे चिरंजीव. ते तर प्रत्यक्ष भगवान् श्रीविष्णूच होत. 'दत्तस्तु भगवान् स्वयम् ।' स्वतः भगवान् श्रीविष्णूच पूर्ण रूपानें अत्रि व अनसूया यांना स्वात्म समर्पण करून त्यांच्या उदरीं अवतरले म्हणून ते दत्त याच नांवानें संबोधले जाऊं लागले. हे तिघेहि तत्त्वतः एकच. ज्याप्रमाणें गंगा, यमुना आणि सरस्वती या तिन्ही नद्या त्रिवेणी संगमांत एकत्र झाल्यानंतर त्यांचें पृथक्त्व उरत नाहीं व त्या तिन्ही नद्या गंगा या एकाच नांवानें ओळखल्या जातात त्याचप्रमाणें प्रकृतस्थलीं ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तिन्ही देवांचा एकत्र झालेला समागम अथवा एकवटलेलें रूप म्हणजेच भगवान् दत्तात्रेय होत. म्हणून ते दत्त याच नांवानें ओळखले जाऊं लागले व तशींच त्यांची पृथक् अवस्थेंत नांवें ठेवण्यांत आलीं. दत्त याच नांवानें घुगऱ्या वांटल्या गेल्या. हेच दत्तात्रेय आपले चरित्रनायक आहेत.

नवजात शिशु भगवान् दत्तात्रेय यांचें कमलाप्रमाणें कोमल, नाजुक आणि गोजिरवाणें असलेलें तें चिमुकलें रूप पाहून कोणाचें बरें मन आकृष्ट होणार नाहीं ? अंवतीभवतीं असलेल्या ऋषिकन्या व ऋषिकुमार यांचा तर त्या बाळाभोंवतीं सारखा घोळकाच असे. तेल लावायला, न्हाऊं घालायला, काजळ लावायला व पाळण्यांत घालून झोके द्यायला तर त्या ऋषिकुमारांच्या माता अहमहमिकेनें आश्रमांत जमत असत. आज तर नामकरण-संस्काराचाच दिवस ! मग काय विचारतां ? गर्दीला व आनंदाला सुमारच उरला नाहीं !

अनसूयेनें दत्तात्रेयाला मांडीवर घेतलें. तेलानें टाळू भरली. कर्णपूरण केलें. सर्वांगाला तेल लावलें. थाटामाटांत सर्व सुवासिनींनीं मिळून दत्तात्रेयाला न्हाऊं घातलें. पुसलें. कान फुंकले. हा सर्व कार्यक्रम सनईच्या सुस्वरनादांत मोठ्या तन्मयतेनें चाललेला होता. चिमुकल्या मऊ मऊ सुंदर रेशमी वस्त्रांनीं आच्छादून दत्तात्रेयाला पाळण्यांत घातलें. देवांच्या शिल्पकारानें तयार केलेला मोठा सुंदर नक्षीदार व रंगीत पाळणा होता तो. चिमुकल्या गाद्यागिरद्या घालून तो सजविला होता. सभोंवार तोरणें लावून छोट्याशा छताला चिमण्या, पोपट वगैरे चित्रें लटकविलेलीं होतीं! त्यांत दत्तात्रेयाला ठेवणार तोंच अनसूयेला आठवण झाली, बाळाला भूक लागली असेल माझ्या, असें म्हणत तिनें दत्ताला आपल्या अंकावर घेतलें आणि त्याच्या मुखांत स्तन दिला. चुरुचुरु चिमुकल्या मुखानें दत्तानें स्तनपान करण्यास आरंभ केला! स्वयं विश्वंभर असूनहि ते आज अनसूयेच्या अंकावर स्वतःचें उदरभरण करीत आहेत. बाळ होऊन मातेचें स्तनप्राशन करण्यांत जो आनंद आहे तो निर्विकारपणें स्वस्वरूपांत राहून आपल्याला मिळणार नाहीं, असें समजूनच की काय, तो परमात्मा दत्तरूपानें अनसूयेच्या उदरीं जन्माला आला व तिच्या स्तनप्राशनानें तृप्त झाला! दत्तात्रेयाचें स्तनपान चालू असतां अनसूयेला जो आनंद व जी धन्यता वाटत होती ती शब्दानें वर्णन करणें अशक्य आहे. "बाळ तृप्त झालं, झोपेला आलं" असें म्हणून तिनें दत्तात्रेयाला पाळण्यांत घातलें. झोपण्यापूर्वी दत्ताला काजळ लावण्यास ती विसरली नाही. काजळ हा नेत्राचा तर उपचार आहेच, पण तेंच काजळाचें बोट गालाला लावलें तर दुष्ट दृष्टीचा दोष लागण्याचीहि भीति नसते.

## पाळणा

दत्ताला पाळण्यांत घातल्यानंतर अंगाई-गीतें म्हणण्याची जणूं कांहीं चढाओढच सुरू झाली. माहूरचे सुप्रसिद्ध कवि भक्त विष्णुदास पाळणा गात आहेत —

जो जो जो जो रे श्रीदत्ता। त्रैमूर्ति अवधूता बाळा जो जो रे ।।ध्रु.।।

श्रीगुरु सिंहाद्री पर्वतीं। भक्तास्तव अवतरती।
लक्ष्मी सावित्री पार्वती। करिती मंगळ आरती ।। १ ।।

श्रीमंगळद्वारीं नाचती। गणपति सरस्वती।
चौघडे वाजती वाजंत्री। सुरवर पुष्पें वाहती ।। २ ।।

श्रमती श्रुतिवेद गुणगाता। त्रैमूर्ति अवधूता।
करितां भवसृष्टि श्रमलासी। बाळा जो जो रे ।। ३ ।।

कमलासनीं बसलासी। निर्गुणसगुणा बा सजलासी।
शेषावरीं निजलासी। बाळा जो जो रे ।। ४ ।।

सन्मुख ठेवुनिया नंदीसी । नांदसि गिरिकैलासी ।
तो धरणीवरि तूं आलासी । त्रिगुणात्मक झालासी ।
तूं गुरु अनाथांच्या नाथा । त्रैमूर्ती अवधूता ।। ५ ।।
निजरे निजबाळा श्रमहरणा । देवाचतुरानना ।
निजरे निजबाळा खगवहना । श्रीलक्ष्मीमनमोहना ।। ६ ।।
निजरे निजबाळा सुखसदना । उन्मनि न करी रुदना ।
आनंद घनदाटे तुज पाहतां । त्रैमूर्ती अवधूता ।। ७ ।।
त्रिगुणात्मक त्रिवेणी, ही गंगा । प्रकटे खळमळभंगा ।
सहस्रकमळदळीं तूं भृंग । होऊनि राहसी दंग ।। ८ ।।
घेऊनि अनसूया बोसंगा । दे घुटि करि तुटि अंगा ।
विष्णुदास म्हणे दे जागा । निश्चलपदीं सुखसंगा ।। ९ ।।

आमचे चरित्रनायक दत्तात्रेय असल्यामुळें आम्ही दत्ताच्या नांवांतच दंग झालों. पण आईला सगळीं लेकरें सारखींच असतात. वडील, धाकटा, देखणा, नकटा हा भाव तिच्या अंतःकरणांत नसतो. अनसूयामातेनें तिन्ही बाळांचे सारखेंच कौतुक केलें. तिन्ही बाळांना प्रशस्त पाळण्यांत घालून ती झोके देत आहे.

अकोल्याचे उदीयमान नवकवि श्री. अरविंद तांबे आपल्या श्रीगीतदत्तायनांत गात आहेत –

### अंगाईगीत

जो जो बाळांनो ! गा तें अंगाई गातें अंगाई ।।
नीज दाटली येते जांभई । आनंदें डोले अनसूयामाई
गातें अंगाई गातें अंगाई ।। ध्रु. ।।
बाळ एक हा श्यामलमूर्ति ।
दुज्या बालका राजस कान्ति ।।
गौरवर्णी तो शोभे संगतीं ।
साध्वीच्या गेहीं आले अतिथि ।।
अघटित कैसें घडलें ग बाई ।
जो जो बाळांनो ! गातें अंगाई गातें अंगाई ।।
बाळें गोजिरीं चित्तासी भुलवीं ।
रूपें पाहतां नयनास सुखवी ।।
त्यांना गे आमुची दृष्ट न व्हावी ।
कूस मायेची भरली राहावी ।।
सांभाळ आतां अनसूयामाई, सांभाळ बाई ।
जो जो बाळांनो ! गातें अंगाई ।।

इतक्यांत जवळच्या आश्रमांतील चार वर्षांची छोटी छकुली आली व अल्लड-पणें पाळण्याची दोरी चिमुकल्या हातांत घेऊन झोके देत देत आपल्या बोबड्या शब्दानें गाऊं लागली –

कलिअंगाई सुखें लाजसा दत्ता । नीज ले नीज अवधूता ।। धृ ।।
किति गोल तुझा पापा लागे बाई । बोबले बोल सुखदायी ।।
तूं आवलता अत्‌लींचा । तुजकले जीव आईचा ।।
लालका असती सकलांचा । ये हंसतांना पूलचि आनंदाचा ।।
चांदोबा तूं या घलचा ।।

ठकाबाईंचा थाट कांहीं निराळाच. दत्ताला झोप लागत नाहीं, तो रडतो आहे असें पाहून हातांतलें काम बाजूला ठेवलें आणि पाळण्याजवळ आल्या. हातानेंच पाळण्याला झोके देत नाचत नाचत म्हणूं लागल्या –

निज रे निज रे माझ्या बाळा । लागू देरे तुझा डोळा ।।
खेळून् खेळून् शिणलासी । झोप तुज नये कशी ? ।। इत्यादि.

रंगूबाई आल्या. त्या दत्ताच्या रंगांतच रंगल्या ! उगा उगा. हात रे काऊ ! माझ्या बाळाला कोणी हिडिस् फिडिस् केलं ?

पाणी आलं डोळ्याला, काजळ सारं वाहून गेलं ! निजा गाईऽ गाईऽऽ

जू बाळा जू जू रे जू

दत्तमंदिरीं झाला आनंद । नैवेद्या गर्जे कर्ण्याचा नाद ।।
पुत्र जन्मला देखोनि नयनीं । हिरा शोभला जैसा कोन्दणीं ।।
पूर्वेचा चांद जातो अस्मानी । देखोनी दत्ताला लज्जित मनीं ।।
रत्नजडित पान, शोभतें भाळीं । नयनाच्या कोरां काजळ घालीं ।।
दंडी बाजूबंद मुद्रिका करीं । वाळ्याचा नाद उमटतो द्वारीं ।।
जू बाळा जू जू रे जू ।।

अनसूया आली. दत्ताला तिनें पाळण्यांतून उचलून घेतलें. कुरवाळीत पाठी-वरून हात फिरवीत म्हणते, कां माझा तान्हूला आज इतका रडतोय् ! दत्तात्रेयांच्या मुखाकडे पाहत अनसूया म्हणते, अगबाई ! बाळ माझं आज कोमेजलंय्. चेहरा मलूल झाला आहे. कोणाची तरी दृष्ट लागली आहे याला. बाळाची दृष्ट उतर-लीच पाहिजे. कोणी म्हणेल कसली दृष्ट नि बिष्ट ? पण छे ! या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. दृष्टीनें वेली कोमेजतात. दृष्टीनें वेलींवरचीं फळें नासतात. दृष्टीनें गाईंच्या कासा आटतात. दृष्टीनें पाषाणाच्याहि मूर्ति भंगतात ! हा सर्व अनुभव प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असतां दृष्टीनें काय होतें हें म्हणणेंच अविचाराचें ठरेल. माझ्या बाळला दृष्टच झाली आहे, ती उतरलीच पाहिजे. त्याशिवाय याच्या अंगीं लागणार नाहीं, असा विचार करीत ती म्हणते –

दृष्ट उतराहो दत्तावरून ।
दृष्ट उतराहो सांवळ्यावरून ।।

मीठमोहऱ्या हातांत घेऊन अनसूया सायंकाळीं दत्ताची दृष्ट काढीत आहे -

उतरितें दृष्ट मीठ मोहऱ्या अग्नीला ।
कोणाची झाली दृष्ट माझ्या या सोनियाला ।।
खाईना पीईना बाळ झाला मलूल ।
माझं ग तान्हं बाळ एका दिवसांत कोमेजलं ।।

असें आहे हें मातेच्या मायेचें रूप.

## दत्ताचें बाळपण

तीन महिन्यांच्या अंतीं या अंगावरून त्या अंगावर होणें, पालथें पडणें, हळूच नागोबाप्रमाणें मान वर करून इकडे-तिकडे पाहणें इत्यादि सर्व गोष्टी विकासाला धरून सृष्टिक्रमाच्या अनुरोधानें होऊं लागल्या. वस्तुतः जेथें जन्म नाहीं आणि मृत्यूहि नाहीं मग विकारात्मक अस्तित्वाची सत्ता तेथें कशी असणार ? अस्तित्वच जेथें नाहीं तेथें वृद्धि म्हणजे वाढ, विपरिणाम म्हणजे परिपक्वावस्था व अपक्षय म्हणजे झिजणें, क्षीण होत राहणें हें कसें संभवणार ? अग्नीला स्वतःचा आकार नसतो, पण तो ज्या आश्रयानें प्रतीतीला येतो त्याच आश्रयाचा आकार अग्नीवर आरोपीला जातो. ओंडका वर्तुळाकार असला तर ओंडक्याच्या आश्रयानें असलेला अग्नि देखील वर्तुळाकार भासतो. ओंडका चपटा असेल तर त्यांतील अग्नीहि चपटा दिसतो ! वस्तुतः गोलपणा किंवा चपटेपणा अग्नीला नाहीं. याचप्रमाणें शुद्ध चित्स्वरूप असलेल्या दत्तात्रेयांनाहि जन्म नाहीं, वृद्धि नाहीं व विपरिणामहि नाहीं. केवळ देहाचे असलेले हे विकार देहाच्या सान्निध्यामुळे शुद्ध आत्मस्वरूप असलेल्या दत्तात्रेयांच्या ठिकाणीं आरोपूनच दत्त जन्मला, वाढला, मोठा झाला इत्यादि व्यवहार होत आहेत.

दत्तात्रेयांचा स्थूल देह सुद्धा तुमच्या आमच्या देहाप्रमाणें प्रारब्ध कर्माच्या आधीन नसून तो त्यांच्या योगवैभवामुळें स्वसंकल्पबलानेंच बनलेला आहे. त्यामुळें त्या देहाच्या बाल्यादि अवस्था देखील स्वसंकल्पबलानेंच सिद्ध होत असतात. अज्ञानी लोकांना त्याची कल्पना नसल्यामुळें ते सामान्यपणें सृष्टिक्रमाच्या अनुरोधानेंच सर्व घडामोडी होत असल्याचें मानीत असतात. नाटकांतील नटांचीं कामें तत्त्वतः सत्य नसलीं तरी तीं सत्यस्वरूपाच्या थाटानेंच घडून येत असतात. याच न्यायानें आतां श्रीदत्तात्रेयांच्या चरित्राची घडण होत आहे.

आतां आपले चरित्रनायक श्रीदत्तप्रभु हे रांगूं-फिरूं लागले ! भोंवतालच्या आश्रमवासिनी वेळ नसला तरी कांहीं ना कांहीं तरी निमित्त काढून अनसूयेच्या आश्रमांत येत असत. दत्ताला पाहिल्याशिवाय आणि कडेवर घेतल्याशिवाय त्यांना

चैनच पडत नसे. आश्रमांत यावें, दत्ताला उचलून घ्यावें, कुरवाळावें, छातीशीं दृढ धरावें, मटामट चुंबनें घ्यावींत. अशा रीतीनें सर्वजनांना दत्तात्रेयांचा सहजच छंद लागला होता. होताच तसा तो आनंदाचा कंद. आतां आश्रमाच्या परिसरांत इकडे-तिकडे तो धांवूं लागला, फिरूं लागला. आश्रमांतील गाई, वासरें, हरिणांचीं पाडसें, मोर आणि पोपट व घरांतील माऊ आणि तिचीं पिलें यांच्याशींहि खेळण्यांत तो रमून जात असे. खेळण्यांत तो रमला म्हणजे त्याला खाण्यापिण्याचीहि आठवण होत नसे. अनसूयेनेंच लक्ष ठेवून त्याच्या खाण्यापिण्याच्या वेळा सांभाळाव्यात. अत्रिमुनि त्याला दत्त म्हणून हाक मारीत असत, तर अनसूयेचें त्याचें आवडतें नांव अविनाश असें होतें. सामान्य लोक तर त्याला दिगंबर याच नांवानें हाक मारीत असत. बालपणीं बाल्यावस्थेमुळें स्वाभाविकच ते दिगंबर असत. तर पुढच्या काळांत लोककल्याणासाठीं ते दिगंबर बनले.

एकदां नैवेद्य-वैश्वदेव उरकला. अत्रिमुनि आतां जेवावयास बसणार तोंच त्यांना दत्ताची आठवण झाली. अनसूयेला त्यांनीं हाक मारली, "दत्त अजून आला नाहीं, कोठें आहे तो, हाक मार त्याला," असें अत्रिमुनि म्हणाले, लागलीच अनसूया दत्तात्रेयाला पाहण्यासाठी आश्रमाच्या बाहेर आली तों स्वारी लांब कोठें बोरीच्या झाडाखालीं पिकलेलीं बोरें वेंचण्यांत दंग असलेलीं दिसली. अविनाश, अविनाश करीत ती दत्तात्रेयाजवळ आली. अरे जेवायची वेळ झाली. ते तिकडे ताटावर बसून सारखी तुझी वाट पहात आहेत, आणि तूं इकडे बोरें गोळा करण्यांत गुंतला आहेस. कांहीं खाण्यापिण्याची शुद्ध आहे का नाहीं तुला ? चल लवकर असें म्हणून तिनें दत्तात्रेयाच्या हातांतील बोरें घेतलीं व त्याला कडेवर घेऊन आश्रमांत आली. हातपाय धुवून दत्तात्रेयाला अत्रिमुनींच्या जवळ जेवावयास बसविलें. कधीं कधीं अनसूया गाणीं म्हणत म्हणत त्याला भरवीतहि असे. दत्तात्रेयांना गाणें ऐकण्याचा बालपणापासून फारच नाद होता. असा नाद होता म्हणूनच तर ते पुढच्या काळांत फार मोठे गवई झाले आहेत, असें आपणांस आढळून येईल. बालपणाचा अवखळपणा दत्तात्रेयांच्या ठिकाणीं मुळींच नव्हता असें मात्र नाहीं. ते कधीं कधीं हट्टहि धरून बसत असत. त्यांच्या हट्टीपणामुळेंच बालपणीं त्यांना उन्मत्त म्हणजे वेडा असें म्हणत असत व लहरीपणामुळें पिशाच असें म्हणत असत. मोठेंपणींहि लोककल्याणाचें कार्य करीत असतांना ते देहभान विसरूनच कार्य करीत असत म्हणून लोक त्यांना उन्मत्त अर्थात् वेडा असें म्हणत असत. ते वायुवेगानें धांवत असत व अचाट कृत्यं करीत असत. म्हणून लोक त्यांना पिशाच म्हणूं लागले.

बालपणचे संस्कार मोठेपणींहि दिसून येतात व मोठेपणांतील गुणदोषांचीं बीजें हीं लहानपणींहि सूक्ष्मरूपानें असतात.

दत्तात्रेयांना गाईंचा नाद फार होता. गाई घेऊन ते आश्रमाभोंवतीं फिरत असत. गाईंच्या धारा काढून ते यथेच्छ दूध पीत असत तर कधीं कधीं गाईंच्या

आंचळालाच वासराप्रमाणें तोंड लावून घुटुघुटु दूध पीत असत. याच कारणामुळे दत्तात्रेयांच्या पुढील जीवनांत ही गाय त्यांच्या नित्य सान्निध्यांत असल्याचें दिसून येतें. गाईचें दूध आईच्या दुधाप्रमाणें सर्वांनाच हितावह असतें; पण त्यांतल्या त्यांत दगदगीचीं आणि बुद्धीचीं कामें करणाऱ्यांना तें अधिक हितावह असतें.

## गाईच्या दुधाचे गुण

आयुर्वेदांत आणि अत्रिसंहितेंतहि गाईच्या दुधाचे गुणधर्म फारच उत्तम वर्णिलेले आहेत –

गव्यं पवित्रं च रसायनं च पथ्यं च हृद्यं बलपुष्टिदं स्यात् ।
आयुःप्रदं रक्तविकार-पित्त-त्रिदोष-हृद्रोग-विषापहं स्यात् ।।

– अत्रिसंहिता

गाईचें दूध अत्यंत पवित्र असून तें एक रसायन आहे. ज्याचें सेवन केलें असतां जरा म्हणजे अकालीं येणारें म्हातारपण आणि व्याधि म्हणजे शारीरिक रोग यांचा नाश होतो त्याला रसायन असें म्हणतात. योग्य प्रमाणांत योग्य वेळीं नित्य नियमानें गाईचें दूध सेवन केलें तर अकालीं वार्धक्य येत नाहीं व सामान्यपणें इतर व्याधीहि होत नाहींत. गाईचें दूध पथ्य म्हणजे हितकर असून तें हृदयाला बल देणारें आहे. गाईच्या दुधानें सर्व अवयवांचें पोषण होऊन शरीराचेंहि बल वाढतें. वातदोषाचे, पित्तदोषाचे व कफदोषाचेहि विकार गाईच्या दुधानें थांबतात व हृद्रोग आणि विषबाधा यांच्यावरहि त्याचा चांगला उपयोग होतो.

पथ्यं रसायनं बल्यं हृद्यं मेध्यं गवां पयः ।
आयुष्यं पुंस्त्वकृद्वात-रक्त-पित्तविकारनुत् ।।

विशेषेंकरून गाईचें दूध मेध्य म्हणजे बुद्धीला हितावह असतें. कोणतीहि वस्तु पाहिल्यानंतर व ऐकल्यानंतर त्या वस्तूचें यथार्थ आकलन होणें याला बुद्धि असें म्हणतात, तर तें झालेलें ज्ञान अन्तःकरणांत स्थिर राहण्याची शक्ति येणें याला मेधा असें म्हणतात. याच बुद्धीमध्ये नव्या नव्या उत्तम कल्पनांचा आविष्कार होण्याचें सामर्थ्य निर्माण होणें याला प्रज्ञा असें म्हणतात. जणूं कांहीं बुद्धीचा हा क्रमशः होणारा विकासच होय. या सर्व गोष्टी नित्य नियमानें योग्य प्रमाणांत व योग्य रीतीनें गाईचें दूध प्राशन केल्यानें घडून येतात. याच अभिप्रायानें गाईच्या दुधाचें वर्णन करतांना 'बुद्धि वर्धकं मेधाकरं प्रज्ञाजननम्' अशीं आयुर्वेदांत विशेषणें दिलेलीं आढळतात.

गाईचें दूध हें वीर्यवर्धक असल्यामुळें त्यानें षांढव्याधीचाहि निरास होतो. ओजोवृद्धि होऊन मनुष्याच्या मुखावर तेज अथवा कांति झळकूं लागते. प्रवाळ भस्माबरोबर गाईचें दूध घेतल्यास रक्तदाबाचे विकार, मळमळ येणें, चक्कर येणें,

झोक गेल्यासारखें वाटणें इत्यादि लक्षणें कमी होतात. पोटांत दुखण्याची जाणींव झाल्याबरोबर गाईच्या थोडचा दुधांतून एक-दोन चमचे गाईचेंच तूप घ्यावें म्हणजे अंतर्मार्ग साफ राहून तेथें अंतर्विद्रधि, अंतर्व्रण अथवा कॅन्सरसारख्या विकारालाहि प्रतिबंध होतो. सितोपलादि चूर्णाबरोबर गाईचें दूध घेतल्यास प्राथमिक अवस्थेंतील क्षय आणि कांस म्हणजे खोकला नाहींसा होईल. गाईच्या गरम दुधांत थोडेंसें हळदीचें चूर्ण व वदामाचें चूर्ण घालून तें झोपण्याच्या पूर्वी घेतल्यास सर्दी, खोकला व घसा खवखवणें हीं लक्षणें नाहींशीं होतील. शतावरीचें चूर्ण व खडीसाखरेचें चूर्ण घालून गाईचें दूध घेतल्यास कृशता कमी होऊन उत्तम शक्ति येते. अर्धशिसी अथवा नेहमीं डोकें दुखण्याची व्यथा असेल तर रात्रीच्या वेळीं गाईचें दूध थोडें आटवावें व त्यांत थोडें खडीसाखरेचें चूर्ण घालून तें उशाशीं झांकून ठेवावें. पहाटे तीनच्या सुमारास तें दूध घेऊन त्यावर एक चांगली झोंप काढावी म्हणजे वर सांगितलेली डोकेंदुखी थांबेल. गाईचें दूध रसानें व विपाकानें मधुरच असल्यामुळें पित्त-विकाराचा निरास करणें हा त्याचा स्वभावच आहे. याच गुणांनीं व स्निग्ध-पणामुळेंहि तें वातविकारालाहि जिंकतें. तें लघु म्हणजे लवकर पचणारें व दीपन म्हणजे जाठराग्नीला प्रदीप्त करणारें असल्यामुळें कफाचाहि तें निरास करतें.

पहाटेच्या वेळेला गाईचें दूध जड आणि विष्टंभकारक अर्थात् वातावरोध व मलावरोध करणारेंहि असल्यामुळें पचावयास कठीण जातें म्हणून तें सकाळीं साडेआठ, नवाच्या सुमारास घ्यावें असेंहि सांगितलेलें आहे. गायीचें धारोष्ण दूध तर अमृतासारखेंच असल्याचें वर्णन केलेलें आहे. 'धारोष्णममृतोपमम्'. 'धारोष्ण-ममृतं पयः' इत्यादि वचनें आयुर्वेदांत प्रसिद्ध आहेत.

कांहीं स्त्रियांना प्रदर-विकाराचा बराच त्रास होत असतो. त्याला अंगावरचें जाणें असें म्हणतात. हा विकार दोन प्रकारचा असतो. एकाला श्वेतप्रदर व दुसऱ्याला रक्तप्रदर असें म्हणतात. हा विकार कसल्याहि प्रकारचा असला तरी गाईचें दूध त्याला फार उपयुक्त आहे. दोन-तीन वर्षांची जुनी पण, रोजच्या रोज स्वयंपाक होत असलेली चूल शोधावी. तिच्या आंतील बाजूची माती खरडून घ्यावी. ती अगदी बारीक करून वस्त्रगाळ करावी. चिंचोक्याइतकें चूर्ण मधांत कालवून चाटावें व वर गाईचें दूध घ्यावें म्हणजे प्रदर-रोगाचें निर्मूलन होतें. गाईचें ताक मूळव्याधीवर व संग्रहणी विकारावर फारच उपयुक्त आहे. किती वर्णन करावें या गाईच्या दुधाचें ! अशी ही गाय देवांच्या व मानवांच्या जीवनांत कामधेनूच आहे. मात्र तळें राखील तो पाणी चाखील हें विसरतां कामा नये. ही गाईची उपयुक्तता पाहूनच सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं बालपणापासूनच आपलें जीवन नित्य गोमातेच्या सान्निध्याशीं निगडित केलेलें आहे. आजहि गाय त्यांच्या सान्निध्यांत असतेच. कोणी म्हणतात धरणीमाता अर्थात् पृथ्वी हीच गोमातेच्या रूपानें नित्य दत्तात्रेयांच्या सान्निध्यांत राहिली आहे. तें कांहीं असो. आपल्या अंगच्या विशिष्ट गुणांनी औदुंबर

वृक्ष हा दत्तात्रेयांना आवडला व तो कल्पवृक्ष ठरला. त्याचप्रमाणें गोमाताहि दत्तात्रेयांना आवडली व ती कामधेनु ठरली.

## दत्तात्रेयांची बालक्रीडा

बालपण म्हटलें कीं, बालपणांतील खेळ डोळ्यांपुढें उभे राहतात. गोट्या, चेंडू, लगोऱ्या, विटीदांडू, लपंडाव अथवा शिवणापाणीचा खेळ, लंगडी, हुतुतू, खो-खो, सूरपारंब्या, आट्यापाट्या इत्यादि खेळ प्रायः सर्व मुलें बालपणीं खेळतच असतात. अगदीं खेळांपासून अलिप्त असणारें जड-भरतासारखें बालपण क्वचितच पाहवयास सांपडेल. श्रीकृष्णाच्या बाललीला तर पराकोटीला पोहोंचलेल्या होत्या. त्याला इतिहासांत तोडच नाहीं ! विनोदी आणि खोडकर तर भलताच होता तो. एकदां बऱ्याच गौळणी कृष्णाबद्दल गाऱ्हाणीं घेऊन यशोदेकडे आल्या. यशोदेनें कृष्णाला लगबगीनें कडेवर घेतलें व ती अंगणांत आली. त्या गौळणींनीं यशोदेला घेरूनच टाकलें ! राधिका आली. म्हणाली, काल माझ्या घरीं आला नि मला खूप त्रास दिला. यशोदा कृष्णावर रागावली आणि म्हणाली, अरे ! मीं तुला बजावलें होतें ना ? कोणाच्या घरीं तूं जाऊं नको म्हणून. मग राधिकेच्या घरीं कां गेलास ? तूं अपराधिक होऊं नकोस असें मीं सांगितलें होतें ना ? मग ऐकलें का नाहींस माझें सांगणें ? लागलीच कृष्ण म्हणाला, आई ! मी तर तुझ्या सांगण्याप्रमाणेंच वागलों. कृष्णाने 'अपराधिक' या शब्दाचा अपराध करणारा असा यशोदेला अभिप्रेत असलेला अर्थ बाजूलाच ठेवला आणि अपराधिक म्हणजे ज्याच्यापासून राधिका अप म्हणजे दूर झाली आहे तो, अर्थात् राधेपासून दूर असलेला असा अर्थ केला आणि यशोदेला सांगितलें, आई ! मी तुझ्या सांगण्याप्रमाणेंच वागलों. मी अपराधिक न होतां 'सराधिक' म्हणजे राधिकेसहित असलेला असाच झालों ! हें उत्तर ऐकून राधिका गालांतल्या गालांत हंसली व यशोदा गप्प बसली !

दुसऱ्या गौळणीनें गाऱ्हाणें केलें. काल माझ्या घरीं आला आणि माझ्या खांद्यावरचा पदरच ओढला यानें ! यशोदा कृष्णावर रागावून म्हणाली, कां रे असा खोडसाळपणा केलास ? कृष्ण म्हणाला, नाहीं आई ! मीं खोडी केली नाहीं. तिनेंच ' अंसंगतं शुकं अपनय ' असें मला सांगितलें. तिचा अभिप्राय असा होता कीं, अंस म्हणजे खांदा, गत म्हणजे असलेला शुक म्हणजे पोपट आणि अपनय म्हणजे दूर कर. अर्थात् खांद्यावर बसलेला पोपट घालवून लाव, असा तिचा अभिप्राय होता. पण कृष्णानें मात्र, अंसंगतं म्हणजे अं या अक्षरानें संगत म्हणजे युक्त असलेलें शुक अर्थात् अंशुक म्हणजे वस्त्र असा अर्थ करून तिच्या खांद्यावरचा पदर ओढला व आपल्या खोडीचें समर्थन केलें ! कृष्णाचा हा युक्तिवाद ऐकून गाऱ्हाणें सांगणारी गौळण खजिल झाली व गप्प बसली.

तिसरी म्हणाली, ' अहो बाई ! काल हा माझ्या घरीं आला व यानें माझा लोण्याचा गोळाच खाल्ला ! यशोदा म्हणाली, बऽऽरं, मी मारून देतें अं. कां रे

कृष्णा ! केवढा होता तो लोण्याचा गोळा ! " असें म्हणत यशोदा कृष्णाला कडेवर घेऊं लागली गाऱ्हाणें सांगणारी ती गवळण जवळच उभी होती. कृष्णानें चपळाई करून आपला हात तिच्या स्तनावर ठेवला आणि म्हणाला, " आई ! एवढा गोळा होता ग तो. तेथें उभ्या असलेल्या गौळणींच्या समुदायांत एकच हंशा पिकला ! गाऱ्हाणें करणारी गौळण लाजली व दूर झाली. गाऱ्हाणीं संपलीं व सगळ्याच आपआपल्या घरीं गेल्या.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे विष्णूचे अवतार. श्रीकृष्णहि विष्णूचेच अवतार. बालपणीं खेळ खेळणें हा स्वभावच त्यांचा. सर्व जीव हे विष्णूचेच अंश असल्यामुळें सर्व जिवांमध्यें बालपणीं खेळण्याची प्रवृत्ति दिसून येते. त्याचें हें मर्म वाचकांनीं लक्षांत घ्यावें. आपण जर विष्णूचे अंश नसतो तर आपल्यामध्येंहि बालपणीं खेळ-ण्याची प्रवृत्ति निर्माण झाली नसती. जें पिंडीं तें ब्रह्मांडीं व जें ब्रह्मांडीं तेंच पिंडीं हा नैसर्गिक नियम असल्यामुळें ईश्वर जसा लीलेनें आपल्याप्रमाणें नटतो तसा आपणहि प्रयत्न केल्यास अभ्यासानें आपण परमात्मस्वरूप होऊं शकतों. नर करणी करे सो नर का नारायण होय !

दत्तात्रेयांच्या बाललीला या श्रीकृष्णांच्याइतक्या जरी नसल्या तरी त्या इतर अवतारांच्या मानाने पुष्कळच पाहवयास सांपडतात. दत्तात्रेयांना लहान मुलांत खेळण्याचा फारच छंद होता. डाव जिंकणें, दुसऱ्या फळीवर मात करणें, आपल्यावर आलेलें राज्य दुसऱ्यावर घालवून राज्यांतून मोकळें होणें अथवा राज्य फेडणें या गोष्टी मोठ्या शिताफीनें ते करीत असत. खेळतांना ते कधीं चिडावयाचे नाहींत. भांडाभांडी अथवा मारामारी करावयाचे नाहींत. खेळांतहि कधीं खोटें बोला-वयाचे नाहींत. खेळांतहि खोटेपणा करावयाचे नाहींत. बहुसंख्येने लहान अथवा समवयस्क मुलांना एकत्र करून त्यांच्यामध्यें नाना प्रकारचे खेळ खेळत राहणें हें त्यांना फार आवडत असे. अगदीं लहान मुलांसारखे ते वागत असत. याच हेतूनें त्यांना 'अतिबालक' असें म्हटलेलें आहे. 'बालप्रियः' हें तर त्यांचें नांवच आहे. यावरून त्यांना लहान मुलांत खेळणें किती आवडत होतें याची कल्पना येते.

बालक्रीडो बालरतो बालसंघवृतो बली ।
बाललीलाविनोदश्च बालो बालाढ्य एव च ॥

हीं दत्तात्रेयांचीं नावें त्यांच्या बाल्यावस्थेंतील वृत्तीवर चांगलाच प्रकाश टाकीत आहेत. लहान मुलांच्या संघटना करणें, लहान मुलांबरोबर खेळणें, त्यांच्यांत तन्मय होऊन जाणें, नाना प्रकारचे खेळ व थट्टामस्करीहि करीत राहणें या सर्व गोष्टी दत्तात्रेयांच्या बाल्यावस्थेंतील चरित्रांत पाहवयास सांपडतात. त्या वेळीं सर्व त्यांना 'बाल' याच नांवाने संबोधीत असत.

दत्तात्रेय हरे कृष्ण उन्मत्तानन्ददायक ।
दिगंबर मुने बाल पिशाच ज्ञानसागर ॥

दत्तात्रेयांच्या या बत्तीस अक्षरी प्रभावी नाममंत्रांत त्यांच्या 'बाल' या नांवाचा समावेश आहे. आजच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास ते त्या वेळीं बाळांच्या मेळाव्यांत बाळासाहेब म्हणूनच ओळखले जात होते. ते कुस्ती खेळण्यांत व मुष्टियुद्धांतहि मोठे निष्णात होते. ते मोठे चपळ होते. धांवत होते, पळत होते. तात्पर्य, दत्तात्रेयांना खेळ फार आवडत होते व स्वतः खूप खेळतहि होते ही गोष्ट निर्विवाद होय. मानवी जीवनांत आरोग्याच्या दृष्टीनें, शरीरवृद्धीच्या दृष्टीनें आणि बुद्धिविकासाच्या दृष्टीनेंहि खेळण्याचा फारच उपयोग होतो. खेळण्यानें मुलांच्या मनांतील एकलकोंडेपणा नाहींसा होऊन मुलें मोकळ्या मनाचीं बनतात. तीं कुढत बसत नाहींत. मनाचा मोकळेपणा हा आरोग्याच्या दृष्टीनें फारच उपयुक्त असतो. जणूं कांहीं याच गोष्टींचा सर्वांना धडा देण्यासाठीं भगवान् दत्तात्रेय स्वतः बालपणीं खूपच खेळले. ते मोठे विनोदी होते. मनुष्यांनीं विनोदी असावें. विनोदानें चारचौघांत मिळूनमिसळून वागतां येतें. मनमोकळें असण्याला विनोदाची फार मदत होते. जीवन सुखी होण्याला विनोदाचा फार उपयोग होतो. विनोदाची ही उपयुक्तता लक्षांत घेऊनच भगवान् श्रीकृष्ण आणि भगवान् श्रीदत्तात्रेय हे स्वतःच विनोदी जीवनांत राहिले व लोकांना त्यांनीं विनोदी असण्याचा धडा घालून दिला. मोठेपणीं देखील मायेनें बालरूप धारण करून तेखेळतच होते ! ते बालपणापासूनच मोठे मायावी म्हणजे आपलें खरें स्वरूप ओळखूं न येऊं देणारे असें होते. असें आहे हें श्रीदत्तात्रेयांचें बालपण.

## दत्तात्रेयांचा व्रतबंध व अध्ययन

आतां भगवान् श्रीदत्तात्रेय हे व्रतबंध म्हणजे उपनयन संस्कार करण्यास योग्य झाले. याच संस्कारास मुंज असें म्हणतात. बटूच्या कमरेला या संस्कारांत मुंजाची म्हणजे मोळाची दोरी बांधली जाते. याच अभिप्रायानें या संस्काराला मौंजीबंधन संस्कार असेंहि म्हटलें जातें. हा संस्कार वयाच्या पांचव्या वर्षापासून सोळाव्या वर्षापर्यंत योग्य मुहूर्तावर केव्हाहि केला जातो. आपल्या मुलानें ब्रह्मवर्चस्वी व्हावें अशी इच्छा असेल तर त्याचा उपनयन संस्कार पांचव्या वर्षींच करावा असें सांगितलेलें आहे. अत्रिमहर्षींना आपला मुलगा ब्रह्मवर्चस्वी व्हावा असें वाटणें स्वाभाविकच होतें. आणि म्हणूनच त्यांनीं पांचव्याच वर्षी दत्तात्रेयांची मुंज करण्याचें योजिलें. अनसूयाहि पण आतां माझा दत्तबाळ मुंजीला आला. आतां त्याची मी मुंज झालेली पाहीन. तो विद्वान् होईल. त्याचे दोन हाताचे चार हात होतील. बाकी होता तो सहा हातांचा म्हणा ! पण अनसूयेला त्याचें भान कोठें आहे ? मायेचें वेड आणि वेडांतले मनोरथ यांतून देवांनाहि मोकळें होतां आलें नाहीं, मग इतरांची कथा काय ?

उत्तम मुहूर्त पाहिला. सभोंवारचे व दूरचेहि ऋषि, मुनि, तपस्वी, विद्वान् वैदिक, शास्त्री-पंडित या सर्वांना सपत्नीक व सशिष्यपरिवार निमंत्रणें दिलीं गेलीं.

आप्तेष्ट, सोयरे धायरे, स्नेही, सुपरिचित व ऋणानुबंधी या सर्वांना निमंत्रणें गेलीं. भव्य मांडव उभारला गेला. आचार्य, पुरोहित मंडळी उपस्थित झाली. निमंत्रित सर्व लोक उपस्थित झाले. 'अत्रि आणि सर्वांशीं मैत्री' मग तेथें समुदायाच्या उपस्थितीला काय न्यूनता असणार? जणूं कांहीं सारा माहूरगड जनता-सागरांत निमग्न झाला! कामधेनूनें व कल्पवृक्षानें ज्याचा आश्रय घ्यावा, तोच जेथें चरित्र-नायक बटु म्हणून विराजत आहे तेथील समारंभांत काय उणें असणार? दत्तात्रेयांची मुंज थाटानें पार पडली! सर्व सोहळा अनसूयेच्या इच्छेप्रमाणें साजरा झाला. विद्वान् ब्राह्मण, शास्त्री-पंडित यांच्या मानाप्रमाणें संभावना झाल्या. ऋषि-मुनींचे आदर-सत्कार झाले. सोयरे-धायरे आणि आप्तेष्ट यांचेहि यथोचित मानसन्मान झाले. अत्रिमुनींनीं योग्यतेनुरूप वस्त्रालंकार देऊन सर्वांना संतुष्ट केलें, तर अनसूयेनेंहि सौभाग्यवायनें व वस्त्रालंकार देऊन सर्व सुवासिनींना संतुष्ट केले. देवादिकांनी व अभ्यागतांनींहि बटुवर्य भगवान् श्रीदत्तात्रेय यांना आशीर्वाद देऊन आपआपल्या परीनें भिक्षावळ घातली आणि अत्रिमुनींचा व अनुसूयेचा निरोप घेऊन् सर्वजण आप-आपल्या स्थानाला परत गेले.

दत्तात्रेयांना विद्याध्ययनासाटीं आपल्या आश्रमाच्या बाहेर कोठें जावें लागलें नाहीं. अत्रिमुनींचा आश्रम म्हणजे एक विद्यापीठच होतें. गायत्रीमंत्राचा उपदेश तर त्यांना प्रत्यक्ष अत्रिमहर्षींकडूनच झालेला होता. या मंत्राची तर त्यांनीं पुढें फारच मोठी उपासना केली. नित्य गायत्रीमंत्राचा जप आणि गायत्रीमंत्राचीं पुरश्चरणेंहि त्यांनीं केलेलीं आहेत. यावरून गायत्रीमंत्राचें महत्त्व वाचकांनीं जरूर लक्षांत घ्यावें. उपनयन संस्कार होऊन ज्यांना गायत्रीमंत्राचा उपदेश मिळाला आहे ते खरोखरच मोठे भाग्यवंत होत. रोज यथाशक्ति कांहीं ना कांहीं तरी गायत्रीमंत्राचा जप ब्राह्मणांनी अवश्य करावा. जो गायत्रीमंत्राला मुकला तो ब्राह्मण्यालाहि मुकला असें समजावें, असा शास्त्राचा आदेश आहे. गायत्रीमंत्र ज्याचा सुटला त्यानें पुन्हां उपनयन करून तो मंत्र घ्यावा असें त्या मंत्राचें महत्त्व आहे. गायत्रीमंत्राची अल्प-स्वल्पका होईना, जो उपासना करीत असेल तोच ब्राह्मण या संज्ञेला पात्र होतो. जे स्वतःला ब्राह्मण म्हणवितात, पण गायत्रीमंत्र मात्र येत नाहीं ते ब्राह्मण कसले? असा गायत्रीमंत्राचा महिमा आहे. दत्तात्रेयप्रभूंच्या दैनंदिन जीवनांत संध्या आणि गाययत्रीमंत्राचा जप कधीं चुकलेला दिसत नाहीं. वस्तुतः दत्तात्रेय हे स्वतःसिद्ध, स्वयंप्रकाश, सच्चिदानंदरूप परब्रह्मच असल्यामुळें त्यांना प्रातःस्नान, संध्या, गायत्री-जप इत्यादि शास्त्रविहित नित्यकर्मांचें बंधन कसें संभवेल? आणि त्याचें प्रयोजन तरी काय आहे? तथापि 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः' या न्यायानें, स्वतःला आवश्यकता नसली तरी लोककल्याणाकरितां ते नियमांचें बंधन पत्करून वागत असत, याच कारणामुळें दत्तात्रेयांच्या जीवनांत स्नान-संध्या, जप-तप, पूजा-अर्चा इत्यादि सर्व गोष्टींचें आचरण पूर्ण कसोशीनें होत असल्याचें दृष्टीस पडतें.

दत्तात्रेय सहस्रनामांमध्यें त्यांना धर्म, धर्मी, धर्मगोप्ता, धर्मभीरु, असें म्हटलेलें आहे. यावरून ते स्वतः काळजीपूर्वक धर्माचरण करीत असत. धर्माचीं बंधनें पाळीत असत. ते धर्मभीरु होते म्हणूनच लोक त्यांना मूर्तिमंत धर्मच म्हणत असत.

'बुद्धिमान्' हें तर दत्तात्रेयांचें नांवच आहे यावरून ते अत्यंत बुद्धिमान् होते व फारच थोडचा दिवसांत विद्येच्या क्षेत्रांत त्यांनीं मिळविलेल्या प्रावीण्यावरूनहि ते अत्यंत बुद्धिमान् होते असेंच म्हणावें लागतें. फारच थोडचा दिवसांत त्यांनीं संपूर्ण वेदविद्या हस्तगत केली. ते वेदविद्येमध्यें पारंगत झाले. त्यांची वेदांची तयारी पाहून लोक त्यांना वैदिक अथवा वेदात्मा म्हणजे मूर्तिमंत वेद असेंच म्हणूं लागले. वेदांचीं सहा अंगें आहेत. शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, ज्योतिष आणि निरुक्त अशीं त्यांचीं नांवें आहेत. वेद म्हणण्याची पद्धति व वेदांचा अर्थ लावण्याकरितां त्यांचें अध्ययन अत्यंत उपयुक्त असतें. तेंहि दत्तात्रेयांनीं फारच थोडचा वेळांत हस्तगत केलें. वेदांचा अर्थ लावण्याकरितां पूर्वमीमांसाशास्त्राचा फारच उपयोग होतो म्हणून दत्तात्रेयांनीं वेद आणि वेदांगें यांच्या पाठोपाठ पूर्वमीमांसाशास्त्राचेंहि उत्तम अध्ययन केलें. त्यांची बुद्धि स्वाभाविकच तर्कनिपुण होती. त्यावर त्यांनीं न्यायशास्त्राचें उत्तमच अध्ययन केलें होतें. मग काय विचारतां ! दत्तात्रेयांची बुद्धि प्रमाण-विचार आणि प्रमेय-विचार या दोन्ही विचार-क्षेत्रांत फारच निष्णात बनली ! अशा रीतीनें भगवान् दत्तात्रेय हे फारच थोडचा काळांत सर्व शास्त्रांमध्यें पारंगत बनले. सांख्यशास्त्राचे आद्य प्रवर्तक आचार्य कपिलमहामुनि हे तर दत्तात्रेयांचे सख्खे मामाच होते, त्यामुळें सांख्य-शास्त्राचा ठेवा त्यांच्या मामांकडून त्यांना सहजच मिळाला. अत्रिमुनि हे स्वतः महा-वेदान्ती होते. त्यामुळें वेदान्तविद्येचें ज्ञान त्यांना घरींच मिळालें. दत्तात्रेयांनीं योग-विद्येचा अभ्यास प्रत्यक्ष शंकरांकडेच केला व ते महायोगेश्वर बनले. योगीराज हें तर त्यांचें नांवच आहे. नांवाप्रमाणें कृति करून त्यांनीं आपल्या नांवांना सार्थक्य आणलें आहे.

राजयोगाबरोबरच भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं हठयोगाचाहि उत्तमच अभ्यास केला होता. त्यांचा हठयोगाचा अभ्यासहि कैलास पर्वतावर साक्षात् शंकरांच्याच सान्निध्यांत झाला होता. हठयोगाच्या अभ्यासानें, शरीर, शरीरांतील नाडचा आणि मन शुद्ध होऊन तें राजयोगाच्या अभ्यासानें शुद्ध चित्स्वरूपाशीं समरस होऊन जातें. चित्स्वरूपाशीं होणाऱ्या सामरस्यानें प्रत्यक्ष स्वस्वरूपाचा आनंद प्रतीतीस येतो. याच प्रतीतीला विज्ञान असें म्हणतात. विज्ञान शब्दाचा अर्थ अनुभव असा असून वैज्ञानिक शब्दाचा अर्थ अनुभवी असा आहे. भगवान् दत्तात्रेय हे केवळ शाब्दिक वेदान्ती न राहतां ते अनुभवी अथवा साक्षात्कारी वेदान्ती बनले. दत्तात्रेयांनीं हा विज्ञानाचा लाभ विज्ञानेश्वर आदिगुरु भगवान् श्रीशंकर यांच्याकडूनच घेतला.

गोदावरीच्या कांठीं शनिमहाराजांचें राक्षसभुवन हें सुप्रसिद्ध क्षेत्र आहे. याच क्षेत्राजवळ असलेल्या पांचाळेश्वर क्षेत्रांत दत्तात्रेयांनीं निदिध्यासन करावी आणि

जवळच गोदावरीच्या उत्तर-तीरावर असलेल्या विज्ञान-क्षेत्रांत आपेगांवीं विज्ञान प्राप्तीसाठी विज्ञानेश्वर भगवान् महादेव यांची सेवा करावी. असा हा नित्याचा कार्य-क्रम चालू असतां एके दिवशीं विज्ञानेश्वर महादेव प्रसन्न झाले आणि त्यांनीं श्री-दत्तात्रेयांना विज्ञानाचा म्हणजे निजबोधाचा साक्षात्कार करून दिला ! तेव्हांपासूनच त्या स्थानीं असलेल्या शंकराच्या प्रतीकाला विज्ञानेश्वर असें नांव पडलें. हा सर्व इतिहास श्रीगोदावरीमाहात्म्यांत आपणांस पाहवयास सांपडेल. विज्ञानेश्वराच्या कृपेनें आतां भगवान् श्रीदत्तात्रेय हे स्वतःच विज्ञानेश्वर बनले ! "आपणांसारिखे करिती तात्काळ, नाहीं काळ वेळ तया लागी" हें संतवचन सुप्रसिद्धच आहे. योग्यता पाहून प्रसन्न झालेल्या विज्ञानेश्वरानें आपलें आदिगुरुत्वहि दत्तात्रेयांच्याच स्वाधीन केलें ! याच वेळेपासून सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे आदिगुरु म्हणून ओळखले जाऊं लागले. आतां ते विश्वगुरु बनले.

दत्तात्रेयांना विद्याध्ययन करीत असतांना कधीं आश्रमांत राहवें लागत असे, तर कधीं आश्रमाच्या बाहेरहि जावें लागत असे. असें करणें हें स्वाभाविकच आहे. आश्रमाच्या बाहेरून दत्तात्रेय हे आपल्या आश्रमांत परत आले म्हणजे सर्वांना मोठा आनंद होत असे. दत्तात्रेयांनीं आपल्या आश्रमांत राहूनच सर्व पुराणें व उपपुराणें यांचाहि अभ्यास केला. पुराणें अठरा आहेत हें सुप्रसिद्धच आहे. पुराणांबरोबरच श्रीदत्तात्रेयांनीं धर्मशास्त्राचाहि अभ्यास केला. आचारकांड, व्यवहारकांड आणि प्रायश्चित्तकांड, या तिन्ही कांडांत सर्व धर्मशास्त्र सामावलेलें आहे. धर्मशास्त्रांतील तिन्ही कांडांचा अभ्यास करून संपूर्ण धर्मशास्त्र दत्तात्रेयांनीं अवगत करून घेतलें. याप्रमाणें गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय आतां चौदा विद्यांमध्यें पूर्ण निष्णात झाले.

दत्तात्रेयांना संगीत विद्येचाहि छंद फार मोठा होता. संगीताकडे जो आकृष्ट झाला नाहीं अथवा संगीतामध्यें जो रमला नाहीं असा सहसा कोणी पाहवयास सांप-डणार नाहीं. मग दत्तात्रेय त्याला अपवाद कसे ठरतील ? तंबोरे लावावयाचे, ते साथीदारांच्या हातांत द्यावयाचे. एकाला पखवाज अथवा मृदंग द्यावयाचा आणि स्वतः दत्तात्रेय गावयास बसावयाचे. त्यांचा आवाज फारच मधुर असे. 'वीणा-ध्वनिः' हें त्यांचें विशेषणच आहे. तंबोऱ्याच्या स्वराशीं त्यांचा स्वर इतका एकरूप होत असे कीं, ऐकणाऱ्याला हा तंबोरा वाजत आहे, का कोणी गात आहे, असा भ्रम होत असे. तारसप्तकांतील षड्‌जाशीं भिडून त्यांनीं आपला आवाज दीर्घकाळ एकरूप केला कीं, त्यांचें व ऐकणाऱ्यांचेंहि मन नादब्रह्मांत समरस होऊन जात असे. ते अनेक राग गात असत. 'नानारागार्णवान्तगः' ते अनेक रागांच्या सागराच्या पैलतीराला पोहोचलेले होतें. तथापि भूप, वसंत आणि मालव इत्यादि कांहीं राग तर त्यांचे विशेष आवडते राग होते. ते स्वतः वीणा हातांत घेऊनहि गात होते. त्यांनीं वीणा हातांत घेतला कीं, ते फारच सुंदर दिसत असत. 'वीणाप्रचंड सौन्दर्यः' अशा थाटांत त्यांचें वर्णन केलेलें आढळतें.

भगवान् सद्‌गुरु श्रीदत्तात्रेय हे योगविद्येमध्यें अत्यंत निष्णात होते हें सांगण्याची तर आवश्यकताच नाहीं. त्यांच्या अवतारकार्यांतील योगविद्येचा प्रचार हा तर मुख्यच भाग आहे. योगी, योगिराज, योगेश्वर इत्यादि त्यांचीं अनेक नांवें योगविद्येंतील त्यांचें निपुणत्व व्यक्त करीत आहेत. ते स्वतःच योगविद्येमध्यें निष्णात होते असें नसून योगविद्येचा अहोरात्र ते प्रचारहि करीत होते. असंख्य योगीजनांना त्यांनी योगविद्या शिकवून योगानंदाचें प्रदान केलेलें आहे. मंत्र, तंत्र, यंत्र इत्यादि प्रक्रियेवर ज्यांचा असाधारण अधिकार होता त्या नवनाथ संप्रदायाचेहि आदिगुरु श्रीदत्तात्रेय प्रभु हेच आहेत.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, नवनाथपरंपरेचे आदि गुरु भगवान् श्रीशंकर आहेत, तेथें दत्तात्रेयांचा काय संबंध आहे ? भगवान् शंकर हे पार्वतीला उपदेश करीत असतां मत्स्येंद्रनाथांनीं जवळच असलेल्या जलाशयांतील मत्स्याच्या उदरांत गुप्तपणें राहून तो ऐकला व तेथूनच नाथपरंपरा सुरू झाली. दत्तात्रेयांचा तेथें कांहीं संबंध येत नाहीं; पण ही शंका बरोबर नाहीं. नाथसंप्रदायाचा सूक्ष्म अभ्यास केल्यास असें आढळून येईल कीं, मत्स्येंद्रनाथांनीं मत्स्याच्या उदरीं राहून गुप्तपणें शंकरांचा उपदेश श्रवण केला खरा, पण तो शंकरांना संमत झाला नाहीं. शंकरांनीं मत्स्येंद्रनाथांना दत्तात्रेयांकडे पाठविलें आणि गुरुदेव श्रीदत्तात्रेय यांच्याकडूनच उपदेश घ्यावयास भाग पाडले. दत्तात्रेयांकडून मत्स्येंद्रनाथांना अध्यात्मविद्येचा व योगविद्येचा उपदेश मिळाला. नंतर मंत्र, तंत्र व यंत्र इत्यादि शाबरी विद्येचाहि उपदेश श्रीदत्तात्रेयांकडूनच मत्स्येंद्रनाथांना झालेला आहे. असा हा इतिहास असल्यामुळें नाथसंप्रदायाचें आदि गुरुत्व हें भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु यांच्याकडेच येत आहे. या वस्तुस्थितीमुळें वरील शंकेला कांहीं अवसर उरत नाहीं.

'अचिन्त्यमूलिकायंत्रः' 'मूलिकायंत्रकोविदः' हीं दत्तात्रेयांचीं विशेषणें त्यांचा जडीबुटींच्या अथवा काष्ठौषधींच्या विज्ञानांत आणि यंत्र, तंत्र व मंत्र यासंबंधीच्या विज्ञानांतहि असाधारण अधिकार होता हें पाहवयास पुरेसें प्रमाण म्हणून आपल्या उपयोगाला येतील. आयुर्वेद हा अत्रिमहर्षींच्या संशोधनाचा एक विषय असल्यामुळें साहजिकच दत्तात्रेयांचा त्याहि विद्येंत असाधारण अधिकार होता. आयुर्वेदाबरोबरच रसविद्येंतहि ते निपुण होते. सिद्धनागार्जुनाला प्रसन्न होऊन त्यांनीं रसविद्येचा त्याला उपदेश केला आणि सर्व जनतेच्या कल्याणासाठीं त्यांनीं ती विद्या नागार्जुनाच्याद्वारां सर्वांना सुलभ करून ठेवली आहे. अशा रीतीनें भगवान् श्रीदत्तात्रेय हे अत्यल्प कालावधींतच सर्व विद्यांमध्ये निष्णात झालेले आपणांस पाहवयास सांपडतात. वस्तुतः भगवान् दत्तात्रेय हे पूर्णावतारस्वरूप असल्यामुळें सकल ज्ञानशक्ति हा त्यांचा सहजसिद्ध गुण आहे. त्यामुळें त्यांना अभ्यासाची अथवा गुरुसान्निध्याची काय आवश्यकता आहे ? त्यांना त्याची मुळींच आवश्यकता नाहीं, तथापि अध्ययन व अध्यापन यांची संप्रदायपरंपरा अविच्छिन्न

राखण्यासाठीं पूर्णावतारस्वरूप असलेल्या दत्तात्रेयांनींहि गुरूंच्या सान्निध्यांत राहून गुरु-शुश्रूषा केली व थोडयाच काळांत सर्व विद्या आत्मसात करून घेतल्या.

आतां यावर कोणी अशी शंका घेईल कीं, उपनिषदें, वेदांगें, कल्पसूत्रें, सहा शास्त्रें, स्मृति व पुराणें इ. सर्व वाङ्मय हें तर अलीकडच्या काळांतलें आहे. दत्तात्रेयांचा अध्ययनकाल हा तर अतिप्राचीन आहे. अशा स्थितींत दत्तात्रेयांनीं या ग्रंथांचें अध्ययन केलें असें कसें म्हणतां येईल ? प्रश्न अगदी बरोबर आहे; पण या प्रश्नानें दत्तात्रेयांनीं वरील सर्व विद्यांचें अध्ययन केलें या विधानास बाध येण्याचें कांहींच कारण नाहीं. निरनिराळीं तत्त्वें आणि विद्या यांचें प्रतिपादन करणारे ग्रंथ हे जरी अलीकडच्या काळांतले आहेत असें मानलें तरी त्या ग्रंथांतील तत्त्वें आणि त्या विद्या यांचाहि काल अलीकडचाच आहे असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. कदाचित् कांही तत्त्वें अथवा विद्या या अलीकडच्या काळांतल्या आहेत असें जरी प्रबल प्रमाणांनीं सिद्ध झालें तरी सर्वच तत्त्वें आणि सर्वच विद्या या अलीकडच्या काळांतल्या आहेत असें कधींच सिद्ध होणार नाहीं. तात्पर्य, अलीकडच्या काळांतील ग्रंथ दत्तात्रेयांच्या अध्ययनकालांत उपलब्ध नसले, तरी त्या ग्रंथांतील तत्त्वें आणि त्या विद्या प्राचीन कालापासूनच उपलब्ध असल्यामुळें दत्तात्रेयांनीं त्यांचें अध्ययन केलें होतें असें म्हणण्यांत कांही प्रत्यवाय आहे अशी शंका घेण्याचें कांहींच कारण नाहीं.

## दत्तात्रेयांचा स्वभाव

अनेक ग्रंथांतून विखुरलेल्या श्रीदत्तात्रेयांच्या चरित्राचें संकलन केल्यानंतर आपल्याला असें आढळून येईल कीं, दत्तात्रेयांचा स्वभाव अत्यंत दयाळु आणि मनमिळाऊ होता व आजहि तो तसाच आहे. दीनबंधु, कृपानिधि, भक्तवत्सल इत्यादि विशेषणें दत्तात्रेयांचा दयाळुपणा सुस्पष्ट दाखवीत आहेत, तर 'बहुप्रिय' हें त्यांचें विशेषण त्यांचा स्वभाव मनमिळाऊ असल्याचेंच दाखवीत आहे. बहुप्रिय याचा अर्थ अनेक लोक आपल्या भोंवतीं असावेत अथवा अनेक लोकांच्या मेळाव्यांत आपण असावें असेंच त्यांना वाटत असे. लोक त्यांना वेडा-पिसा समजून कित्येक वेळां त्यांच्या मागें लागत असत. अशां वेळीं आमचे चरित्रनायक भगवान् दत्तात्रेय हे धूम ठोकून पळत असत. लोकांनीं त्यांच्या मागें पळावें, त्यांच्या अंगावर धूळ फेकावी, चिखल अथवा शेण टाकावें, खडे मारावेत. असें असलें तरी दत्तात्रेय हे कधीं कोणावर रागावले नाहींत वा कधीं कोणाला उलटूनहि बोलले नाहींत. 'प्रहसन्' ते नेहमीं हंसतच असावयाचे. अगदीं जोरात हंसत असत. कोणीं त्यांची कितीहि थट्टा केली तरी त्यांच्या ध्यानीं-मनीं त्याचें कांहीं नसावयाचें; यावरून त्यांचा मनमिळाऊ स्वभाव आपल्याला लक्षांत घेतां येतो. नेहमीं प्रसन्न असावें, हंसतमुख असावें, गोड बोलावें आणि मनमिळाऊपणानें सर्वांशीं वागावें. जणूं कांहीं हाच उपदेश भगवान् श्रीदत्तात्रेय आपल्या आचरणांतून सर्वांना देत आहेत. ते पुष्कळ वेळां एकान्तांत एकटेच बसत असत. बालपणापासूनच

कोणत्याहि विषयाची आसक्ति त्यांच्या अंतःकरणांत नव्हती. ते विद्यार्थी होते तरी परमार्थी होते, असें त्यांचें वर्णन केलेलें आहे. परमार्थी शब्दाचा अर्थ तत्त्वार्थी असा समजावा. कोणत्याहि विद्येचीं मूलभूततत्त्वें हातीं लागेतोंपर्यंत त्या विद्येचें परिशीलन करीत राहणें याला 'तत्त्वार्थी' अथवा परमार्थी असें म्हणतात. कोणतीहि विद्या हस्तगत करतांना त्या विद्येचीं जीं साधनें असतील त्यांच्याशीं विद्यार्थ्यांनीं समरस व्हावें लागतें. विद्यार्थी हा परमार्थी न होतां तो परीक्षार्थी बनला कीं, साधनांची उपेक्षा होते. विद्येचें रहस्य त्याच्या हातीं लागत नाहीं. परीक्षा पास झाली की, विद्यार्थी प्रायः विद्येला मुकतोच. हें दत्तात्रेयांना रुचत नव्हतें म्हणून विद्यार्थिदशेंत ते मन लावून विद्याध्ययनच करीत असत. असाच त्यांचा स्वभाव होता.

## शास्त्रचर्चा

दत्तात्रेय हे मितभाषी होते पण प्रसंग पडलाच तर ते खूप शास्त्रार्थहि करीत असत. कोणाचे कितीहि व कसलेहि संशय असले तरी ते त्या सर्व संशयांचें सहजच निरसन करीत असत. जीवनामध्यें अंतःकरण निःसंदिग्ध असणें अत्यंत आवश्यक असतें. संशय वाढला आणि बळावला कीं तेथें नाशच ओढवतो. अंतःकरण जसजसें निःसंदिग्ध होत जाईल तसतसा आनंद व समाधान वाढतच जातें. अंतःकरणाची पूर्ण निःसंदिग्धता मिळविणें हीच आनंदाची पूर्णता होय. संशय हा अंतःकरणाचा मल आहे. जसजसे अंतःकरणांतील संशय मावळतील तसतसें अंतःकरण निर्मल होत जातें. अंतःकरण पूर्णपणें निर्मल झालें कीं, त्यांतच विश्वाच्या मूलभूत तत्त्वाचें पूर्ण प्रतिबिंब प्रतीतीला येतें. त्याच तत्त्वाला सत्तत्त्व, चित्तत्त्व, परब्रह्म अथवा परमात्मा असें म्हणतात. तोच सर्व रूपांनीं नटला आहे व सर्व कांहीं तोच आहे याची सुस्पष्ट प्रतीति भगवान् श्रीदत्तात्रेय जिज्ञासू जनांना आणून देत असत. संवर्त ऋषि, शांडिल्य ऋषि इत्यादि त्या वेळचे नांवाजलेले मोठमोठे अधिकारी ऋषि दत्तात्रेयांकडे येत असत व आपआपला संशय फेडून घेत असत. हें सर्व पाहून अनसूयेला मोठें कौतुक वाटत असे.

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना एकाच ठिकाणीं बसून राहणें रुचत नसे. ते मधून मधून तीर्थयात्रेच्या मिषानें दूरदूरचा प्रवास करूं लागले. ते प्रवासाला निघाले कीं, त्यांच्या विरह-व्यथेनें अनसूया मातेचें चित्त व्याकुळ होत असे. दूरचा प्रवास करण्यासाठीं आईची अनुमति मिळविणें हें दत्तात्रयांना मोठें अवघड जात असें. दत्तात्रेय हे अत्यंत बुद्धिमान्, योगिराज व सिद्धिसंपन्न होते. त्यांनीं महासती श्री-अनसूयादेवीची प्रार्थना केली कीं, "हे माते! तूं मला दूरदूरच्या तीर्थयात्रेची परवानगी दे. तूं माझ्याबद्दल तिळमात्रहि चिंता करूं नकोस." आई म्हणाली, बाळ! तुला पाहिल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होत नाहीं. मी तरी काय करूं?" यावर श्रीदत्तात्रेय म्हणाले, "आई! ज्या ज्या वेळीं तूं माझें स्मरण करशील त्या त्या वेळीं मी तुझ्या सान्निध्यांत उपस्थित राहीन. रोज म्हणालीस तर रोज मी तुला भेटेन, पण

तूं मला आशीर्वाद दे आणि दूरदूरच्या तीर्थक्षेत्रांमध्यें प्रवास करण्यास अनुमति दे." अशा रीतीनें दत्तात्रेयांना आश्वासन मिळाल्यानंतर त्यांचा आग्रह व दृढनिश्चय लक्षांत घेऊन अनसूयेनें त्यांना दूरदूरच्या तीर्थयात्रांची परवानगी दिली. आतां ते अनसूयेला आणि अत्रिमुनींना वंदन करून तीर्थयात्रेला निघाले.

## दत्तात्रेयांची तीर्थयात्रा

दत्तात्रेयांना गिरिकंदरांमध्ये एकान्तांत वास्तव्य करणें फार आवडत असे. त्यांचा गिरि-शिखरांवरहि संचार होत असे. भारतांतील अत्युच्च गिरि-शिखरें प्रायः त्यांच्या संचारानें पावन झालेलीं आहेत. सह्याद्रि, हिमालय, विंध्याचल, श्रीशैल पर्वत, वेंकटगिरी आणि मेरु पर्वत अर्थात् हल्लींचें पामीर पठार हीं त्यांचीं नेहमींचीं फिरण्याचीं स्थानें असत. अत्रिऋषींनीं तपश्चर्येच्या निमित्तानें जेथें जेथें गिरि-शिखरांवर वास्तव्य केलेलें होतें तेथें तेथें श्रीदत्तात्रेयप्रभूंनींहि वास्तव्य केलेलें आहे. तीं सर्व स्थानें वाचकांच्या परिचयाचीं झालेलींच आहेत. दत्तात्रेयांची पर्वत-शिखरांवर राहण्याची आवड ही त्यांना दिलेल्या विशेषणांवरून सहजच दिसून येते. 'सह्याद्रि-निलयः', 'वेंकटाचलवासकः', 'श्रीशैलवनचारी', 'श्रीमेरुनिलयः' इत्यादि अनेक विशेषणें श्रीदत्तात्रेयांच्या गिरि-शिखर संचाराचा स्वभाव व्यक्त करीत आहेत. विशेषतः दत्तात्रेयांच्या वास्तव्याचे पर्वत प्रायः त्रिकूट अथवा त्रि-शिखर अशाच स्वरूपाचे ते निवडीत असत. इतर सर्व पर्वतांपेक्षां सह्याद्रि हा त्यांचा अत्यंत आवडता असल्याचें त्यांच्या अवधूत-अवस्थेंतील दिनचर्येवरून पाहवयास सांपडतें. ती दिनचर्या दत्तात्रेयांच्या अवधूत-अवस्थेंतील संचारांत पुढें यावयाचीच आहे.

श्रीअत्रिमहर्षि व माता अनसूयादेवी यांच्या चरणीं वंदन करून भगवान् श्रीदत्तात्रेय तीर्थयात्रेस निघाले. वस्तुतः ते स्वतःच तीर्थांचें तीर्थ, क्षेत्रांचें क्षेत्र व पावनांचें पावन-स्थान असल्यामुळें त्यांना तीर्थक्षेत्रांमध्ये परिभ्रमण करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. तथापि त्यांनीं तीर्थयात्रा केली ती केवळ तीर्थक्षेत्रांना पावन करण्याकरितांच केली. तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं यात्रिकांना पावन करण्याचें जें सामर्थ्य आलेलें आहे तें त्यांच्या संचारानें व अनुग्रहानेंच आलेलें आहे.

भगीरथ राजानें प्रयत्नांची पराकाष्ठा करून गंगेला प्रसन्न करून घेतलें व "भूमंडलावर अवतरून आई गंगे ! तूं माझ्या पूर्वजांचा उद्धार कर" अशी तिची प्रार्थना केली. त्या वेळीं गंगा म्हणाली, "अनेक पापीजन माझ्यामध्यें स्नान करून आपल्या पापांचें प्रक्षालन करतील, पण त्यांनीं माझ्या ठिकाणीं प्रक्षालित केलेल्या त्या पापांचें मीं कोठें परिमार्जन करावें ?" गंगेचा हा प्रश्न ऐकून भगीरथानें उत्तर दिलें, "आई गंगे ! भारतामध्यें परम विरक्त तत्त्ववेत्ते, ऋषि-मुनि, साधु-संत व सिद्ध महात्मे असे अधिकारी आहेत कीं, ते ज्या वेळीं तुझ्यामध्यें अवगाहन करतील त्या वेळीं तुझ्या पापांचें प्रक्षालन होऊन जाईल. तूं काळजी करूं नकोस." तात्पर्य,

सिद्धराज योगेश्वर भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कृपेनें सिद्ध झालेले संत-महात्मे हे जर सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ असलेल्या गंगेलाहि पावन करूं शकतात तर मग प्रत्यक्ष भगवान् दत्तात्रेय हे तीर्थक्षेत्रांना पावन करतील हें काय सांगावयास पाहिजे ? किंबहुना तीर्थक्षेत्रांना पावन करण्याकरितांच दत्तात्रेयांनीं तीर्थयात्रा केली असें म्हणणेंच सोपपत्तिक ठरेल.

माहूर क्षेत्र सोडून श्रीदत्तात्रेय तीर्थयात्रेला निघाले ते प्रथम दक्षिण दिशेकडेच वळले. ते स्वतःच दक्षिणामूर्तिस्वरूप आहेत. दक्षिणा शब्दाचा अर्थ उपनिषदामध्यें बुद्धि असा केलेला आहे. सद्गुरुंची दृष्टि बुद्धीकडे असणें हें स्वाभाविकच आहे. त्यांतल्या त्यांत महाराष्ट्र व त्यांतहि कृष्णाकाठ हा दत्तात्रेयांचा अत्यंत आवडता प्रदेश होय. याच अभिप्रायानें "कृष्णातट निकट वृक्षछायातले हरिहार अवतार जगको उधारे" असें एका भक्तानें वर्णन केलेलें आहे, तें अगदीं बरोबर आहे, असेंच म्हणावें लागतें. नाशिक क्षेत्रावरून ते त्र्यंबकेश्वर क्षेत्रीं गेले. ब्रह्मगिरीवर गोदावरी-गंगेच्या उगम-स्थानीं असलेल्या श्रीत्र्यंबकेश्वराचें दर्शन घेऊन ते जवळच असलेल्या नील पर्वतावर गेले. तेथें नीलांबा देवीचें स्थान आहे. देवी अर्थात् मंगलमय दिव्य शक्तीनें संपन्न असलेली देवता, तिला शक्ति असेंहि म्हणतात. या ठिकाणीं तिला नीला अथवा नीलांबा असेंहि म्हणतात. तिची दत्तात्रेयांनीं उपासना केली. दत्तात्रेय हे स्वतः शक्तीचे उपासक असून त्यांनीं सर्व शक्तिपीठांना भेटी दिलेल्या आहेत. भगवान् श्रीपरशुराम यांना शक्तितत्त्वाचा उपदेश करून त्यांच्या द्वारां शक्तितंत्राचा लोककल्याणासाठीं पुष्कळच प्रचार केलेला आहे. श्रीशक्तिदेवीच्या उपासनेलाच श्रीविद्येची उपासना असें म्हणतात. श्रीनीलांबिकेच्या सान्निध्यांत असलेलें दत्तात्रेयांचें जागृत स्थान हें याच इतिहासाची साक्ष देत आहे. दत्तात्रेय हे तीर्थयात्रा करीत असतां त्यांनीं जिज्ञासू जीवांना तत्त्व-ज्ञानाचा तर उपदेश केलाच, पण व्यावहारिकदृष्टचा उपयुक्त असलेल्या शक्तीच्या लाभासाठीं त्यांनीं जागोजागीं आखाडेहि स्थापिले. दत्तात्रेय हे स्वतः मल्लविद्येमध्यें अत्यंत निष्णात होते. कुस्तीमध्यें व मुष्टियुद्धामध्येंहि ते निपुण होते. ते स्वतः आखा-ड्यांत कुस्ती खेळत व मुष्टियुद्धहि खेळत असत. आपल्याप्रमाणेंच ते इतरांनाहि त्या विद्येमध्यें तरबेज करीत होते. 'मुष्टियुद्धकरः' आणि 'द्वंद्वयुद्धप्रवर्तकः' हीं दोन विशेषणें त्यांच्या या कार्यावर प्रकाश टाकीत आहेत. दुर्बलाचा वाली कोणी नसतो. भडकलेल्या अग्नीला वारा साहाय्य करतो, अग्नीला अधिक भडकवितो, पण तोच वारा दिव्याच्या रूपानें कृश असलेल्या अग्नीचा दीपज्योतीचा नाश करतो, म्हणून कोणीहि दुर्बल राहूं नये, प्रत्येकानें बलवान् व्हावें असाच दत्तात्रेयांचा प्रयत्न असे. दत्तात्रयांच्या याच विचारांची छाया समर्थांच्याहि विचारांत प्रतिबिंबित झालेली पाहवयास सांपडते.अशक्ताच्या पदरीं नेहमी खेद आणि उद्विग्नता हीं असावयाचीच

उदंड शक्तिचीं कामें मर्द मारूनि जातसे ।
नामर्द काय तें लंडी सदा कुश्चीत लालची ॥

कोण पुसे अशक्ताला रोगीसे वराडी दिसे ।
कळा नाहीं कांती नाहीं युक्तिबुद्धी दुरावली ।।
शक्तीनें मिळती राज्यें युक्तीनें यत्न होतसे ।
शक्तियुक्ति जये ठायीं तेथें श्रीमंत धांवती ।।

असे हे समर्थांचे विचार दत्तात्रेयांच्याच विचारांचें मूर्तिमंत प्रतीक आहेत. दत्तात्रेयांनीं समाजाला शक्तीचे उपासक बनवून बलवान् केले. बलवान् अथवा बली हें दत्तात्रेयांचें नांवच आहे. नांवाप्रमाणेंच त्यांचें स्वरूपहि होतें. दशनामी निर्वाण संप्रदायाचे आखाडे आजहि कोठें कोठें आपणांस पाहवयास सांपडतात तें दत्तात्रेयांच्याच कार्याची परंपरा सुचवीत आहेत.

भगवान् दत्तात्रेय हे तीर्थयात्रेच्या निमित्तानें फिरत असतां जनजागृतीचेंहि कार्य फार मोठ्या प्रमाणावर करीत असल्याचें पाहवयास सांपडतें. कर्मकांड, तत्त्वज्ञान, भक्ति व राजयोग यांवर ते प्रवचनें करीत असत. हठयोगाच्या प्रक्रियेचीं प्रात्यक्षिकेंहि ते करून दाखवीत असत. रामायण, महाभारत, भागवत आणि योग-वासिष्ठ हे ग्रंथ निर्माण होण्याच्या पूर्वीं त्यांतील विषयांवर ते प्रवचन करीत असत व प्रत्यक्ष या ग्रंथांची रचना झाल्यावर हे ग्रंथहि ते सांगत असत. अठरा पुराणें व सहाहि शास्त्रें याहि विषयांवर त्यांची निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांतून चर्चा चालत असे. अशा रीतीनें भगवान् दत्तात्रेयप्रभु तीर्थयात्रेच्या काळांतच सर्व लोकांमध्ये अत्यंत प्रिय झालेले होते. सर्व सिद्धींचे ते आश्रयस्थान असल्यामुळें सिद्धि मिळवूं इच्छिणारे लोक व सिद्ध लोकहि त्यांना देव मानून त्यांची सेवा करीत असत. त्यांच्या अंगीं असलेल्या अपूर्व योगसामर्थ्यामुळें मोठमोठे योगीहि त्यांना अत्यंत पूज्य मानून त्यांचा सत्कार करीत असत. याप्रमाणें सिद्ध योगी व सर्वसामान्यजनहि दत्तात्रेयांना देव मानून त्यांचा आदर करूं लागले. ते जेथें जेथें जात असत तेथील लोकांना त्यांनीं येथेंच राहवें असें वाटत असे; अशी त्यांनी अल्प काळांतच लोकमान्यता संपादन केलेली होती. याच अभिप्रायानें त्यांना ‘ लोकपूजितः ’ असें म्हटलेलें आहे.

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय तीर्थयात्रा करीत असतांना जेथें जेथें त्यांना दीन, दुःखी, दरिद्री, रोगपीडित व आडले-जाकसले लोक दिसत असत तेथें तेथें ते लोकांच्या दुःखाचा परिहार करीत असत, मंत्र तंत्र यंत्र व जादूटोणा इत्यादि जो जो उपाय त्यांना योग्य वाटेल तेथें तेथें त्या त्या उपायांची योजना ते करीत असत. योग्य औषधोपचारांचीहि योजना करून ते लोकांना दुर्धर व्याधींतूनहि मुक्त करीत असत. दत्तात्रेयप्रभूंचें सारें जीवनच लोकोपकारार्थ होतें. अशा थाटांत गुरुदेवांची तीर्थयात्रा चाललेली होती. औंढ्या-नागनाथ, परळी-वैजनाथ आणि वेरूळ-घृष्णेश्वर या ज्योतिर्लिंगांचें दर्शन घेऊन दत्तात्रेयांची स्वारी त्र्यंबकेश्वराला आली. पांचाळेश्वर, विज्ञानेश्वर, राक्षसभुवन आदि तीर्थक्षेत्रें अवलोकन करीत ते तुळजापूर क्षेत्रीं आले. श्रीभवानीमाता हें त्यांचें

इष्ट दैवत असल्यामुळें तेथें त्यांनीं कांहीं काळ वास्तव्य केलें. तेथून ते गाणगापुरास गेले. तेथें भीमा-अमरजा-संगमीं स्नान करून ते परतले. पंढरपूर क्षेत्राला भेट देऊन विश्वगुरु भगवान् दत्तात्रेय हे आतां मार्गांतील अवांतर क्षेत्रांचें अवलोकन करीत करीत भीमाशंकरला येऊन पोहोंचले. या क्षेत्राला डाकिनी क्षेत्र असें म्हणतात. विशाल सह्याद्रीचें हें एक अत्यंत रमणीय शिखर आहे. येथील नैसर्गिक वनश्री व अनुपम सौंदर्य पाहून श्रीदत्तात्रेयप्रभु कांही काळ तेथें रमले असणें हें स्वाभाविकच आहे. द्वादश ज्योतिर्लिंगांपैकींच हें एक स्थान असून भीमरथी अर्थात् भीमा नदीचा उगम येथूनच होत आहे. गुरुदेव भगवान् दत्तात्रेय हे तेथून निघाले ते श्रीशैल पर्वतावर आले. येथें त्यांनी मल्लिकार्जुनाचें दर्शन घेतलें. हेंहि द्वादश ज्योतिर्लिंगांपैकींच एक स्थान आहे. ही तपस्व्यांची तपोभूमि आहे. ऋषिमुनिजनांपासून सामान्य तपस्व्यांपर्यंत असंख्य लोकांनीं या ठिकाणीं तपश्चर्या केलेली आहे. अनेक तपस्वी येथें तप करून सफल मनोरथ झालेले आहेत. जगद्‌गुरु आद्य श्रीशंकराचार्य यांनाहि हें स्थान अत्यंत आवडलेलें होतें. याच ठिकाणीं श्रीदत्तात्रेय प्रभूंनीं पुढील काळांत रससिद्ध नागार्जुनाला दर्शन देऊन रसशास्त्राचा उपदेश केला असल्याचें दिसून येतें.

हंपी विरूपाक्ष, स्वामी पुष्करिणी तीर्थ, सुब्रह्मण्यं क्षेत्र, सिंहाचल, भद्राचल, अरुणाचल, गुरुवायूर इत्यादि तीर्थक्षेत्रांचे अवलोकन करीत करीत ते पूर्णा नदीच्या कांठीं असलेल्या कालटी क्षेत्रालाहि गेले. कालटी काय किंवा अन्य इतर क्षेत्रें काय, ज्यांना ज्यांना त्या वेळीं क्षेत्राचें स्वरूप आलेलें नव्हतें त्या त्या स्थानांनाहि भेटी देऊन त्यांच्या भावी काळांतील उत्कर्षाचें बीज तेथें पेरलें आणि म्हणूनच तीं स्थानें भविष्य काळांत दर्शनीय तीर्थक्षेत्रें म्हणून उदयास आलीं.

तिरुपति बालाजी, वेंकटाचल, मलयाचल, चंद्रगिरि, कुंभकोणम्, अहोबल क्षेत्र इत्यादि क्षेत्रें पाहत पाहत बालयोगी भगवान् दत्तात्रेय हे त्रिवेंद्रम् शुचीन्द्रंच्या दिशेनें वळले. शिवकांची व विष्णुकांची हींहि क्षेत्रें त्यांनीं पाहिलींच. कामाक्षी, मीनाक्षी वगैरे देवतांचीं दर्शनें घेण्यास ते विसरले नाहींत. शुचींद्रं हें तर त्यांचें अत्यंत आवडतें व पहिलें अवतारस्थान होय. तेथून ते कन्याकुमारीच्या दर्शनास गेले. सेतुबंध रामेश्वर हे गुरुदेव दत्तप्रभु यांचें अत्यंत आवडतें स्थान होय. बारा ज्योतिर्लिंगांत श्रीरामेश्वराचा अंतर्भाव आहेच. 'सेतुतीर्थकृतस्नानः', 'अहोबलनिवासी', 'स्वामिपुष्करिणीप्रियः', 'कुंभकोणनिवासी', 'कांचीवासी' इत्यादि विशेषणें श्रीदत्तात्रेयांच्या वरील प्रवासाचींच निदर्शक आहेत. हरिहर, उडुपी, तंजावर, शरावती तीर्थ, तुंगभद्रा व कावेरी हीं सर्व स्थाने पाहत पाहत सिद्धराज श्रीदत्तात्रेय हे शृंगेरीला गेले. शृंगेरीचा महिमा कांहीं आगळाच आहे. विभांडक ऋषि व त्यांचे पुत्र ऋष्यश्रृंगमुनि यांची ही तपोभूमि आहे. वाराहि तुंगभद्रा इत्यादि पवित्र प्रवाहांचें उगमस्थान असलेला वराहगिरि येथून जवळच आहे. वराहगिरि व शृंगगिरि यांच्या शिखरांचें दृश्य तर इतकें रमणीय आहे कीं, तें पाहतां पाहतां प्रेक्षकांना तेथून हला-

वैसेंच वाटत नाहीं. आजच्या ऱ्हासकाळांतहि ही आकर्षकता आहे तर मग प्राचीन काळांत हीं गिरिशिखरें किती रम्य असतील याची वाचकांनींच कल्पना करावी. हीं सर्व स्थानें पाहून भगवान् दत्तात्रेय परतले व गोकर्णाला आले.

गोकर्णमहाबळेश्वराचेंहि माहात्म्य कांहीं आगळेंच आहे. येथें भगवान् दत्तात्रेयांनीं कांहीं काळ वास्तव्य करून तपश्चर्या केलेली आहे. श्रीगोकर्णमहाबळेश्वराच्या मंदिरांत दत्तात्रेयांच्या तपश्चर्येचें स्थान अद्यापि पाहवयास सांपडतें. श्रीदत्तात्रेयांनीं या ठिकाणीं प्रणवसहित शिवषडक्षरी मंत्राचा जप करून तपश्चर्या केली असल्यामुळें येथील दत्ताला षडक्षरी दत्त असें म्हणतात. कोणी तरी तज्ज्ञ सांगणारा भेटल्याशिवाय ही माहिती सहजासहजीं मिळत नाहीं.

गोकर्णांतील तपश्चर्या संपवून भगवान् दत्तात्रेय हे गोमांतक (गोवा) प्रदेशांत गेले. तेथें त्यांनी श्रीशांतादुर्गेचें दर्शन घेतलें. श्रीविद्येचेंच तें प्रतीक असल्यामुळें व श्रीविद्या ही दत्तात्रेयांची उपास्यदेवता असल्यामुळें श्रीदत्तप्रभु तेथें कांहीं काळ रमले हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहींच. तेथून दत्तात्रेयांची स्वारी मांगीश अर्थात् मंगेश महादेवाच्या दर्शनास आली. मा म्हणजे लक्ष्मी, महामाया. तिच्यामुळें भगवान् विष्णु हे अंगी म्हणजे देहवान् अथवा साकार बनले म्हणून मांगी या शब्दाचा अर्थ विष्णु असा होतो. या विष्णूनें शंकराला स्वतःसह साऱ्या विश्वाचा ईश म्हणजे अधिपति मानलेलें आहे. याच अभिप्रायानें महादेवाला विश्वनाथ अथवा विश्वेश्वर असें म्हणतात. तात्पर्य, मांगी म्हणजे विष्णु; आणि त्यांचा ईश म्हणजे अधिपति भगवान् सदाशिव. याच अभिप्रायानें प्रकृत स्थळीं मंगेश महादेवाला मांगीश असें म्हटलेलें आहे.

भगवान् दत्तात्रेय हे मंगेशाचें दर्शन घेऊन निघाले ते अर्बुद पर्वताकडे वळले. दक्षिणेंतील चिदंबरम्, श्रीरंगम् इत्यादि क्षेत्रें त्यांनीं पाहिलेलींच होतीं. आतां ते अर्बुद पर्वतावर आले.

प्राचीन काळचा अर्बुद पर्वत हाच विद्यमान काळांत अबूचा पहाड या नांवानें ओळखला जातो. अरवली पर्वताचाच हा एक भाग आहे. येथील मुख्य देवता अर्बुदादेवी असून ती ज्ञानाची अधिष्ठात्री देवता मानली जाते. याच अभिप्रायानें अर्बुदादेवीच्या टेकडीला ज्ञान-टेकडी असेंहि म्हटलें जातें. ज्ञानाची अधिष्ठात्री देवता ही श्रीविद्येचेंच स्वरूप असल्यामुळें भगवान् श्रीदत्तात्रेय हे या अबूच्या पहाडाकडे आकृष्ट झाले. येथील वनश्री, पर्वताच्या पायथ्याशीं असलेलीं घनदाट अरण्यें आणि पर्वताच्या उतरणीवर दाटीवाटीनें उभे असलेले वृक्ष यांमुळें हा पर्वत रसिक जनांच्या मनाला आपल्याकडे खेचून घेतो. हा पर्वत वसिष्ठ ऋषींची व भृगु ऋषींची तपोभूमि आहे. अलीकडे या पर्वतावर जैनांचीं व आर्य वैदिकधर्मीयांचीं अत्युत्कृष्ट व शिल्पकलापूर्ण अशीं सुंदर मंदिरें मोठ्या डौलानें विराजत असलेलीं पाहवयास सांपडतात. अशा या रम्य स्थळीं गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय फारच रमले. या पर्वताच्या

मुख्य शिखराला गुरुशिखर असेंच म्हणतात. या शिखरावर गुरुदेव श्रीदत्तप्रभु यांच्या पादुकांची नित्य पूजा होत असते. हें गुरुपादुका-शिखर समुद्रसपाटीपासून पांच हजार सहाशें पन्नास फूट उंच आहे. येथील हवापाणी उन्हाळ्यामध्यें महाबळेश्वरची अथवा दार्जिलिंगची आठवण करून देण्याइतकें उत्कृष्ट आहे. येथें परशुराम-कुंड, अग्नि-कुंड, कपिल तीर्थ आणि कनक तीर्थ हीं सुप्रसिद्ध तीर्थस्थानें आहेत. अशा या रम्य ठिकाणीं योगिराज श्रीदत्तगुरु यांचें वास्तव्य होणें हें स्वाभाविकच आहे.

अर्बुद पर्वताप्रमाणेंच गिरनार पर्वत हाहि श्रीदत्तात्रेयांच्या वास्तव्यानें पावन झालेला आहे. या पर्वताचें विस्तृत वर्णन मागें द्वितीय स्कंधांत आलेलेंच आहे. गिरनार पर्वताची यात्रा आटोपून दत्तगु  हे सोरटी सोमनाथाच्या दर्शनास गेले. सोमनाथ हें बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक स्थान आहे. या ठिकाणीं साष्टांग प्रणिपात करून दत्तात्रेयांनीं श्रीसोमनाथाची फारच नम्रपणें अत्यंत सुंदर स्तुति केलेली आहे. अर्थाकडे लक्ष देऊन भावपूर्ण अंतःकरणानें जे कोणी सोमनाथाचें या स्तोत्रानें स्तवन करतील त्यांचीं सर्व दुःखें दूर होतील. त्यांना आत्मज्ञानाचा लाभ होऊन त्यांचें जीवन आनंदमय होईल. अत्रिमहर्षींच्या सांगण्यावरून आत्मज्ञानाचा लाभ होण्यासाठीं दत्तात्रेयांनीं गोदावरीच्या तीरावर याच स्तोत्रानें शंकराची आराधना केली व शंकराच्या कृपेनें आत्मज्ञान होऊन ते ब्रह्मसाक्षात्कारी झाले. ज्या ठिकाणीं शंकराच्या कृपेनें दत्तात्रेयांना आत्मसाक्षात्कार झाला तें ठिकाण आत्मतीर्थ म्हणून गोदावरीच्या कांठीं विख्यात आहे. सोमनाथ हें शंकराचेंच नांव असल्यामुळें शंकराच्या सान्निध्यांत अथवा कोठेंहि अंतःकरणांत शंकराचें स्मरण करून हें स्तोत्र म्हणावें. हें स्तोत्र ब्रह्मपुराणांत ११७ व्या अध्यायांत पाहवयास सांपडेल.

संसारकूपे पतितोऽस्मि दैवान्मोहेन गुप्तो भवदुःखपङ्के ।
अज्ञाननाम्ना तमसाऽऽवृतोऽहं परंन विन्दामि सुराधिनाथ ।। १ ।।

सोम शब्दाचा अर्थ आल्हाद देणारा असा आहे. भगवान् शंकर हे भक्तजनांना चंद्राप्रमाणें आल्हाद देतात म्हणून त्यांना सोम असें म्हणतात. नाथ शब्दाचा अर्थ संरक्षण करणारा स्वामी असा आहे. भगवान् शंकर हे भक्तजनांना आनंद देऊन त्यांचें संरक्षण करतात म्हणून शंकरांना सोमनाथ असें म्हटलेलें आहे. हे शंकरा! आपण सर्व देवांचे अधिनायक आहां म्हणून आपणास सुराधिनाथ असें म्हणतात. हे सुराधिपते महादेवा! मी दुर्दैवानें या संसाररूपी अरुंद तोंडाच्या खोल विहिरींत पडलों आहे. संसाररूपी दुःखाच्या गाळांत मोहानें मला रुतविलें आहे. मला मोहानें आच्छादून टाकलें आहे. मी अज्ञान नांवाच्या अंधकारानें सर्व बाजूंनीं वेढला गेलों आहें. मला या संसारांत उत्कृष्ट सुखाचा लाभ होत नाहीं.

भिन्नस्त्रिशूलेन बलीयसाऽहं पापेन चिन्ताक्षुरपाटितश्च ।
तप्तोऽस्मि पंचेन्द्रियतीव्रतापैः श्रान्तोऽस्मि संतारय सोमनाथ ।। २ ।।

हे सोमनाथा ! पापरूपी बलिष्ठ शत्रूनें माझ्यावर सारखे त्रिशुळाचे प्रहार चालविले आहेत. जणूं काही त्यानें मला फोडून टाकलें आहे. चिंतारूपी तीक्ष्ण वस्तऱ्याच्या धारेनें मी छेदिला जात आहें. माझा कंठ कापला जात आहे. पंच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे मला तीव्र तापानें होरपळून काढीत आहेत. मी थकलों; जीव माझा मेटाकुटीस आला आहे. हे सोमनाथा, आपण मला या संकटांतून तारा.

बद्धोऽस्मि दारिद्र्यमयैश्चबंधैर्हतोऽस्मि रोगानलतीव्रतापैः ।
क्रान्तोऽस्म्यहं मृत्युभुजंगमेन भीतो भृशं किं करवाणि शंभो ।। ३ ।।

दत्तात्रेय म्हणतात, हे शंभो सोमनाथा ! मी दारिद्र्याच्या पाशांनीं बद्ध झालों आहें. रोगरूपी अग्नीच्या तीव्र तापांनीं मी अगदीं हतबल झालों आहें. मृत्युरूपी सर्पानें माझ्या देहाला वेटोळीं घातलीं आहेत. मी अगदीं गांगरून गेलों आहें. शंकरा ! काय करूं मी ? सोमनाथा ! आपणच मला तारा.

भवाभवाभ्यामतिपीडितोऽहं तृष्णाक्षुधाभ्यां च रजस्तमोभ्याम् ।
ईदृक्षया जरयाचाभिभूतः पश्यावस्थां कृपया मेऽद्यनाथ ।। ४ ।।

भव म्हणजे उत्कर्ष, अभव म्हणजे अपकर्ष अथवा भव म्हणजे जन्म व अभव म्हणजे मृत्यु असाहि अर्थ केला तरी चालेल. हे नाथ ! मी उत्कर्षापकर्षाच्या अथवा जन्ममरणाच्या चरकांत पिळून निघत आहें. तृष्णा आणि क्षुधा यांच्या कचाट्यांत मी सांपडलों आहें. जात्यांत भरडल्या जाणाऱ्या धान्याप्रमाणें रजोगुण आणि तमोगुण मला भरडून काढीत आहेत. आणि ही पहा अशा तऱ्हेची जरा माझ्याकडे धांवत येत आहे. तिला पाहून मी घाबरलों आहें. हे परमेश्वरा, कृपा करून पाहा माझी काय अवस्था झाली आहे ती.

कामेन कोपेनच मत्सरेण दम्भेन दर्पादिभिरप्यनेकैः ।
एकैकशः कष्टगतोऽस्मि विद्धस्त्वं नाथवद्वारय नाथशत्रून् ।। ५ ।।

हे प्रभो शंकरा ! काम, क्रोध, मत्सर, दंभ, दर्प आणि आदि शब्दांनीं लोभ, मोह, असूया, ईर्ष्या इत्यादि विकार लक्षांत घ्यावेत अशा अनेक विकारांपैकी एका एका विकारानेंहि मला कष्टविलें आहे. अगदीं 'विद्धः' म्हणजे विदीर्ण करून टाकलें आहे. हे विश्वनाथा ! एखाद्या पालकानें आपल्या पाल्याचें रक्षण करावें त्याप्रमाणें तुम्ही माझ्या शत्रूंचें निरसन करून माझें रक्षण करावें.

कस्यापि कश्चित्पतितस्य पुंसो दुःखप्रणोदी भवतीति सत्यम् ।
विनाभवन्तं मम सोमनाथ कुत्रापि कारुण्यवचोऽपि नास्ति ।। ६ ।।

एखादा पडला-सवरला तर त्याला उचलून धरणारा या जगांत कोणी न कोणी तरी असतोच ही गोष्ट सत्य आहे. पण हे सोमनाथा ! आपल्यांवाचून मला या जगांत दुसरा कोण आहे ? कोणीहि नाहीं.

कोठेंहि दयेचा शब्दहि कानावर येत नाहीं.

तावत्स:कोपो भयमोहदु:खान्यज्ञानदारिद्र्यरुजस्तथैव ।
कामादयो मृत्युरपीह यावन्नमः शिवायेति न वच्मि वाक्यम् ।। ७ ।।

हे सोमनाथा ! जोंपर्यंत मी तुमचा मंत्र असलेलें ॐ नमःशिवाय हें वाक्य उच्चारीत नाहीं तोंपर्यंतच तो कोपरूपी शत्रु मला छळतो. भय, मोह आणि दुःखें त्याचप्रमाणें अज्ञानाची व दारिद्र्याचीहि पीडा तोंपर्यंतच ताप देते. तसेंच कामादि विकार आणि मृत्यूहि पण मला छळतो. ॐ नमःशिवाय हें वाक्य उच्चारलें कीं मी त्यांच्या तापांतून मुक्त होतों.

नमेऽस्ति धर्मोनच मेऽस्ति भक्तिर्नाहं विवेकी करुणा कुतो मे ।
दाताऽसि तेनाशु शरण्य चित्ते निधेहि सोमेति पदं मदीये ।। ८ ।।

दत्तात्रेय म्हणतात, हे भगवन् सोमनाथ ! माझ्या हातून कांहीं धर्माचें आचरण झालें नाहीं व मला तुमची कांहीं भक्तीहि घडली नाहीं. हे महेश्वरा ! कर्तव्याकर्तव्याचा विचार अर्थात् ज्याला विवेक म्हणतात तोहि माझ्या ठिकाणीं नाहीं ! हे परमेश्वरा ! तथापि मी तुम्हांला एक प्रार्थना करीत आहें. तुमची 'दाता' म्हणून त्रैलोक्यांत ख्याति आहे. तुम्हीच या विश्वामध्यें आश्रय घेण्याला योग्य आहां, म्हणून मीं तुमचा आश्रय घेतला आहे. शरण्य शब्दाचा अर्थ आश्रय घेण्याला योग्य अथवा रक्षण करणारा असाहि आहे. हे दीनवत्सला ! तुम्हांला माझी एकच प्रार्थना आहे. कृपा करून माझ्या चित्तामध्यें सोमनाथ हें तुमचें नांव सदैव असूं द्या. तुमचें नांव माझ्या चित्तांत ठेवून देण्याचें कार्य तुम्ही आशु म्हणजे लवकर करावें हीच माझी विनंती आहे.

याचे नचाहं सुरभूपतित्वं हृत्पद्ममध्ये मम सोमनाथ ।
श्रीसोमपादाम्बुजसंनिधानं याचे विचार्यैव च तत्कुरुष्व ।। ९ ।।

हे विश्वेश्वरा सोमनाथा ! मी तुमच्याजवळ साम्राज्यपदाची अथवा इंद्रपदाचीहि याचना करींत नाहीं. फक्त एकच याचना करतों. ती म्हणजे माझ्या हृत्कमलामध्यें श्रीसोमनाथांच्या चरणकमलांचें नित्य सान्निध्य असावें एवढीच एक याचना आहे. हे सोमेश्वरा ! आपण विचार करा. विचार करून जें करावेंसें वाटेल तें करा. पण माझी याचना पूर्ण कराच. आपणावांचून कोण त्राता आहे ? सांगा, मी कोणाला शरण जाऊं ? सोमनाथ आणि सोमेश्वर हे दोन शब्द एकाच अर्थाचे आहेत हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

यथा तवाहं विदितोऽस्मि पापस्तथापि विज्ञापनमाशृणुष्व ।
संश्रूयते यत्र नतः शिवेति तत्र स्थितिः स्यान्मम सोमनाथ ।।१०।।

हे सोमनाथा सोमेश्वरा! मी पापी आहें हें जरी तुम्हाला माहीत आहे, तरी पण माझी ही विज्ञापना तुम्ही ऐकाच. ज्या ठिकाणीं शिव अथवा नमः शिवाय अथवा ॐ नमः शिवाय हीं अक्षरें माझ्या कानांवर येतील तेथेच मला राहण्याचा योग येऊं द्या. शिवनामस्मरण जेथें नित्य कानांवर येईल; परमेश्वरा! तेथेंच माझ्या राहण्याची योजना करा. बेळगांवच्या जवळ असलेल्या बाळेकुंद्री या गांवीं श्रीदत्तावतारस्वरूप असलेल्या श्रीपंत बाळेकुंद्रीकर महाराज यांचें संस्थान आहे. अत्यंत निवान्त आणि रमणीय असें हें स्थान आहे. येथें ब्रह्मलीन श्रीपंत बाळेकुंद्रीकर महाराज यांच्या प्रतीकापुढे चोवीस तास अखंडपणें एकतारीवर "ॐ नमः शिवाय" याच मंत्राचें नित्य भजन चालू असतें. एकतारी खांद्यावर घेऊन "ॐ नमः शिवाय" या भजनाच्या नादांत देहभानहि विसरून जातें, असा आमचा अनुभव आहे. महाराज स्वतः दत्तात्रेयांचे अनन्य भक्त असून, त्यांची दत्तप्रेमलहरी ही रचना अत्यंत रसाळ असूनहि त्यांनीं या ठिकाणीं अखंड शिवनामाची प्रथा कां चालू ठेवली असावी? या प्रश्नाचें उत्तर भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्यांच शब्दांत या स्तोत्रांत आपल्याला पाहावयास सांपडत आहे. प्रत्यक्ष दत्तात्रेयांनीच सोमनाथाचा अर्थात् विश्वनाथ भगवान् श्रीशंकर यांचा हा महिमा वर्णन केलेला आहे. हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

गौरीपते शंकर सोमनाथ विश्वेश कारुण्यनिधेऽखिलात्मन् ।
संस्तूयते यत्र सदेति तत्र केषामपि स्यात्कृतिनां निवासः ।। ११ ।।

भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणतात, हे विश्वनाथा शंभो! ज्या ज्या ठिकाणीं भक्तजनांकडून हे गौरीपते! हे शंकर! हे सोमनाथ! हे विश्वेश! हे कारुण्यनिधे! अखिलात्मन् उमानाथ! अशा रीतीनें नित्य स्तवन केलें जात असेल त्या त्या ठिकाणीं मला निवास करण्याचें भाग्य लाभूं दे. कारण अशा ठिकाणीं कोणातरी फारच थोड्या भाग्यवंत लोकांचा निवास होत असतो. या ठिकाणीं 'कृति' शब्दाचा अर्थ पुण्यवान् भाग्यवान् असा समजावा.

यद्यपि दत्तात्रेयांनीं ही शंकराची स्तुति गोदावरीच्या कांठीं असलेल्या आत्मतीर्थावर केलेली आहे, तथापि या स्तोत्रांत सोमनाथ या शब्दाचा वारंवार उल्लेख आलेला असल्यामुळें प्रत्यक्ष सोमनाथसंज्ञक ज्योतिर्लिंगाच्या दर्शनाच्या वेळीं या स्तोत्रानें स्तुति करणें हें स्वाभाविक असल्यामुळें आम्हीं वाचकांची उत्सुकता लक्षांत घेऊनच हें स्तोत्र येथे उद्धृत केलेलें आहे.

याप्रमाणें सोमनाथाचें स्तवन करून आणि दर्शन घेऊन दत्तात्रेयांची स्वारी प्रभासतीर्थावर गेली. तेथून ते द्वारकाबेटाकडे वळले. यावर कोणीं असें विचारतील कीं, अहो! दत्तात्रेयांची ही तीर्थयात्रा कृतयुगाच्या आरंभीच्या काळांत झाली. द्वारका ही तर द्वापारयुगाच्या अंतिम काळांत कृष्णानें वसविलेली. मग

दत्तात्रेय द्वारकेला गेले असें कसें म्हणतां येईल ? शंका अगदीं बरोबर आहे. याच हेतूनें आम्हीं वर द्वारकाबेटाचा निर्देश केलेला आहे. दत्तात्रेयच श्रीकृष्णरूपानें अवतरले आणि त्यांनीं गोकुळ, वृंदावन, मथुरा आणि द्वारका या ठिकाणीं राहून अवतारकार्य केलेलें आहे. दत्तात्रेयांच्या दशनामी मंत्रामध्यें कृष्ण हें एक दत्तात्रेयांचें नांव म्हणून उल्लेखिलेलें आहेच. तात्पर्य, आपल्या भावी अवतारांतील हें एक लीला-स्थान म्हणून द्वारकाबेटावर दत्तात्रेयांचें जाणें हें स्वाभाविकच आहे. हाच न्याय इतर ठिकाणींहि लक्षांत घ्यावा. त्यानंतर असंख्य तपस्वीजनांची तपोभूमि असलेल्या नर्मदेच्या काठीं भगवान् दत्तात्रेय आले. नर्मदासागरसंगमाच्या उत्तर कांठावरून अमरकंटकापर्यंत व अमरकंटकापासून तें संपूर्ण नर्मदेचा दक्षिण कांठ फिरून नर्मदा-कांठचीं सारीं तीर्थक्षेत्रें दत्तात्रयांनीं अवलोकन केलीं. काश्मीर प्रदेशांतहि त्यांनीं संचार केला होता. काश्मीरमधील जनतेलाहि उपदेश करून त्यांनीं लोकजागृतीचें कार्य केलेलें आहे. अद्यापिहि काश्मीरमधील जनता दत्तात्रेयांना दत्तभट्टारक या नांवानें ओळखतात. भट्टारक शब्दाचा अर्थ राजा असा आहे. महाराष्ट्रांतहि दत्ता-त्रेयांना उद्देशून दत्तराज या शब्दाचा प्रयोग होतच असतो. काश्मीरमधील अमर-नाथ व इतर सर्व तीर्थक्षेत्रें आटोपून भगवान् दत्तात्रेय हे हरिद्वारला आले.

हरिद्वारहून सप्तस्रोत व हृषिकेश करून दत्तप्रभु आतां यमुनोत्तरीच्या मार्गाला लागले. श्रीकृष्णप्रभूंची आवडती नदी यमुना अथवा कालिंदी हिचें हें उगम-स्थान फारच रमणीय आहे. सभोंवारचीं सर्व शिखरें बर्फाच्छादित असतांना मध्येंच निमुळत्या दरींतून वाहणाऱ्या यमुनेच्या हिमजलप्रवाहाला खेटूनच असलेलीं कढत पाण्याचीं कुंडें, कारंज्याप्रमाणें खडकांतून वर उसळणारे कढत पाण्याचे टपोरे थेंब व गगनाशीं भिडूं पाहणाऱ्या त्या उष्णजलाच्या वाफा या सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे मन आश्चर्यानें थक्कच होऊन जातें. यमुनेच्या कांठीं असलेले ऋषि-मुनींचे आश्रम पाहत पाहत भक्तजनांना व ऋषिजनांना पावन करीत दत्तात्रेयांची स्वारी वृद्ध-केदारनाथ, तुंगनाथ व अत्रि आश्रम येथें येऊन पोहोंचली. गंगोत्तरी व गोमुख इत्यादि पवित्र पण अवघड स्थळांचेंहि त्यांनीं अवलोकन केलें. उत्तर-काशी व त्रियुगी-नारायणाचेंहि त्यांनीं दर्शन घेतलें.

मंदाकिनीच्या कांठीं विराजत असलेलें व हिमालयाच्या हिमाच्छादित अत्युच्च शिखरांनीं वेढलेलें श्रीकेदारनाथांचें स्थान दत्तात्रेयांनीं अवलोकन केलें. येथील सृष्टिसौंदर्य तर फारच अलौकिक आहे. तें वर्णन करून सांगण्यासारखें नाही. प्रत्यक्षच तेथें जाऊन पाहवयास पाहिजे. श्रीकेदारनाथ व त्यांच्या परिसरांत असलेलीं इतर तीर्थें व दैवतें पाहून आमचे चरित्रनायक भगवान् दत्तात्रेय हे आतां बदरीनारायणाच्या दर्शनाला निघाले. अलकनंदेचा तो कांठ. धन्य ती अलकनंदा ! जिच्या कांठीं प्रवास करीत असतांना पावलापावलाला अश्वमेधयज्ञाचें फळ मिळतें अशी ग्वाही पुराणें देत आहेत. अलकनंदेच्या कांठीं विराजत असलेला

बदरिकाश्रम हा भगवद्‌वतारस्वरूप असलेल्या नरनारायणांची तपोभूमि आहे. सनकसनंदनापासून तों विद्यमानकालीन तत्त्ववेत्त्यापर्यंत सर्व तत्त्ववेत्त्यांचें तें तत्त्वचिंतनाचें स्थान आहे. विश्वगुरु, महान् तत्त्ववेत्ते, विरक्त आणि तपस्वी असलेले भगवान् श्रीदत्तात्रेय हे या ठिकाणीं कांहीं काळ राहिले हें स्वाभाविकच आहे. बदरिकाश्रमापासून सर्व तीर्थें पाहत पाहत ते वर सत्पथापर्यंत पोहोंचले. या सर्व स्थानांचा द्वितीय स्कंधांत वाचकांना परिचय झालेलाच आहे. तेथून वसुधारेला येऊन ते खालीं उतरले. वाटेंत विष्णुप्रयाग, नंदप्रयाग, कर्णप्रयाग, रुद्रप्रयाग व देवप्रयाग हीं सर्व संगमस्थानें त्यांनीं पाहिलीं. तेथून ते नेपाळच्या भागांत श्रीपशुपतिनाथाच्या दर्शनाला गेले. बारा ज्योतिर्लिंगांपैकींच हें एकस्थान आहे. पशुपतिनाथांचें दर्शन घेऊन ते मुक्तिनाथ, दामोदरकुंड आणि शालिग्राम शिलापर्वतापर्यंत गेले. दामोदर कुंड हें गंडकीच्या उगमस्थानींच असल्यामुळे दत्तात्रेयांनीं गंडकीच्या कांठींहि प्रवास केलाच. कलकत्त्यास कालीमातेचें दर्शन घेऊन ते जगन्नाथपुरीला गेले.

जगन्नाथपुरीला येण्याच्या पूर्वींच त्यांनीं मानस सरोवर, गौरीकुंड आणि कैलास पर्वत या ठिकाणांना भेटी दिलेल्या होत्याच. जन्नाथपुरीची यात्रा संपवून ते परत मध्य-भारताकडे आले. याप्रमाणें दत्तात्रेय प्रभूंनीं विद्याध्ययन झाल्यानंतर भारतभर प्रवास करून संपूर्ण भारताचें तीर्थयात्रेच्या मिषानें अवलोकन केलें. ज्यांचे भक्तहि आपल्या भेटीनें तीर्थक्षेत्रांना पावन करतात ते परिपूर्ण परब्रह्मस्वरूप भगवान् दत्तात्रेय आपल्या भेटीनें तीर्थक्षेत्रांना पावन करतील यांत काय आश्चर्य आहे? भगवान् दत्तात्रेय यांची तीर्थयात्रा मुमुक्षु लोकांना केवळ धडा देण्यासाठीच होती. संसारांत आसक्त असलेलें मन संसार सोडून सहसा बाहेर पडत नाहीं. त्याला संसारांतून बाहेर काढून तीर्थक्षेत्रांमध्यें रमवावें. तीर्थक्षेत्रांमध्यें असलेल्या साधुसंतांच्या दर्शनानें व सदुपदेशानें मन निर्मल होतें. त्यावर भक्तीचे व तत्त्वज्ञानाचे संस्कार उमटतात. आणि त्यांतूनच आत्मसाक्षात्कार होऊन जीविताच्या साफल्याचें समाधान लाभतें.

## दत्तात्रेयांचा गृहस्थाश्रम

अनसूयामातेला दिलेल्या वचनाप्रमाण पितृभक्त भगवान् दत्तात्रेय हे तीर्थयात्रेच्या काळांत आईनें स्मरण केल्याबरोबर तिला दर्शन देत होतेच; पण या वेळीं संकल्पित सर्व तीर्थयात्रा संपवून ते परत आले आहेत हें पाहून महासती श्रीअनसूयामातेला जो आनंद झाला तो अवर्णनीय होता. गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं आश्रमांत राहून अध्यापनाचें कार्य हातीं घेतलें. "स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्" विद्वानांनीं अध्ययन आणि अध्यापन यांत खंड पडूं देऊं नये. या वेदवचनाला अनुसरून दत्तात्रेयप्रभूंचें अध्ययन आणि अध्यापन चालू होतेंच. प्रौढ विद्यार्थी व विद्वान् ऋषि-मुनि यांच्याबरोबर शास्त्रार्थ चर्चाहि नेहमीं चालत असे. सतत मनन-

शील असणें हा तर दत्तात्रेयांचा स्वभावच होता. ते नेहमीं मनन करीत असल्यामुळेंच लोक त्यांना मुनि असेंच म्हणूं लागले. 'दिगम्बरः', "मुनिः", 'बालः' हीं दत्तात्रेयांचीं नांवें सुप्रसिद्धच आहेत. प्राचीन वाङ्मयांतहि दत्तमुनि अथवा दत्तमहामुनि हे शब्द-प्रयोग आढळतातच. यावरून दत्तात्रेयांचा स्वभाव किती मननशील होता याची स्पष्टच कल्पना येते.

दत्तात्रेयांसारखा विद्वान्, देखणा व विविध कलांमध्यें निपुण असलेला जामात आपल्याला लाभावा असें अनेक वधूंच्या पित्यांना वाटूं लागलें. ते अत्रिमुनींच्या आश्र-मांत येऊन अत्रिमहर्षींची आणि अनसूयेची त्याप्रमाणें प्रार्थनाहि करूं लागले. त्या वेळीं वर-पिताहि वधूच्या पित्याकडे जाऊन वधूची मागणी करीत असे, पण भगवान् दत्तात्रेय हे जात्याच विरक्त स्वभावाचे होतें, त्यामुळें ही गोष्ट घडून येणें शक्य नव्हतें. अत्रिमुनि तर या बाबतींत मौनच धारण करून बसले ! अनसूयेला मात्र स्वस्थ राहवलें नाहीं. दत्तात्रेयांचा झालेला विवाह आपण पाहवा यासाठीं तिचें मन उत्कंठित झालेलें होतें.

चंद्र आणि दुर्वास यांव्यतिरिक्त अत्रिमुनींपासून अनसूयेला आणखी सात पुत्र झाले होते असें म्हणतात, पण त्यांचें वर्णन आढळत नाहीं. अनसूयेला एक मुलगीहि होती. तिला अमला, विमला अथवा विमलात्रेयी असें म्हणत असत असा पुराणां-तरीं उल्लेख आढळतो. चंद्र आणि दुर्वास हे पूर्वीच अत्रिमुनींचा आश्रम सोडून गेलेले होते. जातांना मातेला आपल्या विरहाची जाणीव होऊं नये म्हणून त्यांनीं दत्ता-त्रेयांच्या स्वरूपांत छायारूपानें वास्तव्य केलें. चंद्र अथवा सोम हा ब्रह्मदेवाचा अंश म्हणून अक्षमाला आणि कमंडलु हीं दोन लक्षणें दत्तात्रेयांच्या हातांत दिसूं लागलीं. त्याचप्रमाणें दुर्वास हा शंकराचा अंश म्हणून त्रिशूल आणि डमरू हीं लक्षणें दिसूं लागलीं. आणि "दत्तस्तु भगवान् स्वयम्" या वचनाप्रमाणें दत्तात्रेय हे स्वयं विष्णूचेच अवतार असल्यामुळें विष्णूचीं शंख आणि चक्र हीं दोन आयुधें दिसूं लागलीं. हा सर्व छायारूपाचा प्रकार असल्यामुळें प्रत्यक्षांत दत्तात्रेय हे एकमुखानेंच वावरत होते. छायारूप हें ध्यानगम्य असल्यामुळें ध्यानस्थ दत्तात्रेयांच्या ठिकाणीं ध्यानस्थ भक्तालाच त्यांच्या आयुधांसहित सहा भुजांचा साक्षात्कार होत असे. व्यवहारांत मात्र दत्तात्रेय हे एकमुखी व षड्भुज अथवा द्विभुज असेच दिसत असत.

चंद्र आणि दुर्वास हे अत्रिमुनींचा आश्रम सोडून गेल्यानंतर दुर्वास हे एक थोर मुनि आणि तपस्वी बनले व चंद्र हा सोमवंशाचा मूळ पुरुष बनला. त्याच्या वंशाची एक परंपरा ब्राह्मणरूपानें विराजली व दुसरी परंपरा क्षत्रिय रूपानें प्रसिद्धीस आली. ब्राह्मण हें चंद्रात्रेय या नांवानें प्रसिद्धीस आले, तर क्षत्रिय हे सोमवंशांतले राजे म्हणून ओळखले गेले. याप्रमाणें चंद्र आणि दुर्वास निघून गेल्यानंतर अनसूयेला संतुष्ट ठेवण्याची जबाबदारी त्रिमूर्तींतील मध्यमपुत्र भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्यावरच येऊन पडली.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे मुळांतच विरक्त होते. विरक्त राहून व अवधूत बनूनच त्यांना विश्वोद्धाराचें आपलें कार्य चालवावयाचें होतें. गृहस्थाश्रमाचें बंधन स्वीकारावयास ते स्वाभाविकपणें सिद्ध होणें शक्यच नव्हतें. पण आईचा मात्र " बाळ ! तूं आतां गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. तूं लौकर गृहस्थाश्रमीं हो, " असा सारखा आग्रह सुरू झाला. दत्तात्रेयांचें सारें जीवन-चरित्र निरखून पाहिलें असतां ते गृहस्थाश्रमापासून आलिप्त असावेत असाच विश्वास वाटतो. वाचकांना विश्वास वाटावा असेंच त्यांचें जीवन चरित्र वैराग्यपूर्ण आहे. दत्तात्रेयांच्या गृहस्थाश्रमावर बहुधा कोणाचा विश्वासहि बसणार नाहीं, इतके ते गृहस्थाश्रमापासून अलिप्त राहिले आहेत. भक्तवत्सल भगवान् भक्तीनें भक्तांचाहि दास बनतो व वाटेल तें काम करतो. भक्त सांगतील तसे वागतो. येथें तर अनसूयेचा प्रत्यक्ष माता या नात्यानेंच संबंध होता. माझ्या बाळानें विवाह करावा, माझ्या हाताखालीं सून यावी, मला नातवंडें व्हावींत, अशी इच्छा आईच्या अंतःकरणांत असणें हें स्वाभाविकच आहे. आतां ही गोष्ट कशी घडून येणार ? दत्तात्रेय हे तर अत्यंत विरक्त होते व ज्ञानी होते. सर्वांनाच ते योग्य मार्गदर्शन करीत होते, उपदेश करीत होते. त्यांना कोणी काय सांगावें ?

अत्रिमहर्षींनीं दत्तात्रेयांना गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या बाबतींत चार शब्द सांगण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. धर्मशास्त्राचे आदेश सांगितले, बाळा दत्ता ! तूं सर्व जाणतच आहेस. वेदांचे आदेश मीं तुला सांगावयास पाहिजे आहेत अशांतला कांहीं भाग नाहीं. " आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवत्सेत्सीः " विद्याध्ययन झाल्यानंतर आचार्यांना इष्ट असलेलें धन गुरुदक्षिणा म्हणून अर्पण करावें. अनुरूप कन्येशीं विवाह करून गृहस्थाश्रमाचा अंगीकार करावा. वंशपरंपरेचा धागादोरा अविच्छिन्न ठेवावा. तो तोडूं नये. जन्माला येणारा प्रत्येक द्विज हा जन्मापासूनच तीन ऋणांनीं बांधलेला असतो. एक ऋषि-ऋण, दुसरें पितृ-ऋण आणि तिसरें देव-ऋण. वेदांचें अथवा सद्विद्येचें अध्ययन करून ऋषि-ऋणांतून मुक्त व्हावयाचें असतें. गृहस्थाश्रम स्वीकारून श्राद्धादि कर्में करून व पुत्रोत्पत्तिद्वारां पितृ-ऋणांतून मुक्त व्हावयाचें असतें आणि यज्ञयागादि अनुष्ठानांचें आचरण करून देव-ऋणांतून मुक्त व्हावयाचें असतें. या तीन ऋणांतून मुक्त होऊनच मनाला मोक्षमार्गाकडे वळवावयाचें असतें असें शास्त्राचें सांगणें आहे. मानवानें प्रथम ब्रह्मचर्याश्रमांत राहून विद्याध्ययन करावें. विद्याभ्यास पूर्ण झाल्यानंतर " गृही भूत्वा वनी भवेत् " म्हणजे योग्य कन्येशीं विवाह करून गृहस्थाश्रमांत राहवें. गृहस्थाश्रम पूर्ण झाल्यानंतर ' वनी भवेत् ' म्हणजे वानप्रस्थाश्रम स्वीकारून राहवें. वानप्रस्थाश्रमांत राहणाऱ्या लोकांनी तीर्थक्षेत्रांत, अरण्यांत अथवा गिरिकुहरांत वास्तव्य करून वैराग्याचा व त्यागाचा अभ्यास करावा लागतो. वानप्रस्थाश्रमाच्या काळांत पत्नीची इच्छा असल्यास तिच्यासह अथवा तिची इच्छा नसल्यास एकट्यानेंच व्रती बनून वैराग्यपूर्ण जीवन कंठावें लागतें. या आश्रमांतील लोकांना वनांतच [illegible] राहवें लागतें. वनांतच

जीवन कंठावें लागतें. याच हेतूनें या आश्रमाला वानप्रस्थ असें नांव दिलें गेलें आहे. "वनी भूत्वा प्रव्रजेत्" वानप्रस्थाश्रमांत राहून विवेकयुक्त वैराग्य अंगीं बाणलें म्हणजे मग 'प्रव्रजेत्' म्हणजे चतुर्थाश्रमी व्हावें. चतुर्थाश्रमालाच संन्यास असें म्हणतात.

यावर दत्तात्रेय म्हणाले, तात ! आपण म्हणतां तें खरें आहे. तथापि "यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्" म्हणजे ज्या दिवशीं चित्तामध्यें वैराग्य पूर्णपणें प्रतिबिंबित होईल त्याच दिवशीं संन्यास घ्यावा, असेंहि शास्त्र सांगत आहे. शास्त्राचें हें दोन्ही प्रकारचें सांगणें युक्तियुक्तच आहे. जोंपर्यंत अंगीं वैराग्य मुरलें नाहीं तोंपर्यंत क्रमानें गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थाश्रम स्वीकारून वैराग्याचा व त्यागाचा अभ्यास करावा; पण ब्रह्मचर्याश्रमांत असतांनाच जर खरेंखुरें पूर्ण वैराग्य प्राप्त झालें, तर मग ज्या दिवशीं पूर्ण वैराग्याची प्राप्ति होईल त्याच दिवशीं संन्यास घेण्याला काय हरकत आहे ? कांहींच हरकत नसल्यामुळें त्याच दिवशीं संन्यास घ्यावा असाच शास्त्राचा अभिप्राय आहे. तर मग आपण मला चतुर्थाश्रम स्वीकारण्याची अनुमति देण्यास काय हरकत आहे ? मला पुष्कळ बंधु असल्यामुळें वंशविच्छेद होण्याची अथवा पिंडदान आणि पितृतर्पणहि लुप्त होण्याची भीति नाहीं. अत्रिमुनींना अनसूयेपासून दहा पुत्र झालेले होते. इतरहि स्त्रियांपासून त्यांना अनेक पुत्र झालेले होते.

अत्रेस्तु बहवः पुत्राः श्रूयन्ते मनुजाधिप ।
सर्वे वेदविदाःसिद्धाः शान्तात्मानो महर्षयः ।।

— महाभारत, आदिपर्व, अ. ६६

हे धर्मराजा ! अत्रिमुनींना पुष्कळ पुत्र होते असें ऐकलें जातें. ते सर्व वेदवेत्ते महर्षि असून सिद्ध आणि शांत प्रकृतीचे होते. ते उदारबुद्धीचे असल्यामुळें मोठे महात्मे म्हणून समजले जात होते. अनसूयेपासूनहि अत्रिमुनींना दहा पुत्र झालेले होते. "अत्रेः पुत्रा दशैवासन्" इत्यादि पुराणवचनें प्रसिद्ध आहेत. त्यांत पहिले तीन पुत्र प्रत्यक्ष परमेश्वराचें अवतारच होतें.

अत्रेः पत्न्यनसूया त्रीन्, जज्ञे सुयशसः सुतान् ।
दत्तं दुर्वाससं सोममात्मेशब्रह्मसंभवम् ।।

अत्रिमुनींची पत्नी अनसूया हिनें विष्णु, शिव आणि ब्रह्मदेव यांच्या अंशापासून अवतीर्ण झालेल्या अशा तीन पुत्रांना जन्म दिला. ते तिघे दत्त, दुर्वास आणि सोम या नांवांनी प्रसिद्धीस आले. या वचनांत तीन या संख्येचा निर्देश केलेला असला तरी तो त्रिमूर्तींच्या अवताराच्या दृष्टीने केलेला आहे. अवतार या दृष्टीनें तिघांना प्राधान्य आहे. बाकीचे सात पुत्र अवतारांत परिगणित नाहींत, एवढाच त्याचा अर्थ समजावा. तात्पर्य, दत्तात्रेयाचा प्रश्न ऐकून अत्रिमुनि निरुत्तर झाले. शेवटीं "तुम्ही

आई तुला सांगेल त्याप्रमाणें तूं कर " असें म्हणून अत्रिमुनींनी दत्तात्रेयांना अनसूयेकडे पाठविलें.

## ' मातेचें महत्त्व

आई हें एक मुलांचें सर्वोच्च न्यायालय आहे. आचार्य म्हणजे गुरु. त्यांच्यापेक्षां शतपटींनीं पिता श्रेष्ठ व पित्यापेक्षां शतपटींनीं माता श्रेष्ठ होय, असें धर्मशास्त्राचें वचन आहे. दत्तात्रेय हे धर्मशास्त्रज्ञ आणि विनयशील असल्यामुळें ते मातेच्या आज्ञेचा कधींहि भंग करणार नाहींत अशी अत्रिमुनींची खात्रीच होती. व्यवहारांतहि मुलें वडिलांच्यापेक्षां आईच्याच शब्दाला अधिक मान देतात, असाच अनुभव येतो. आईचें सामर्थ्य मोठें आहे. आईच मुलाचें मन वळवूं शकते. भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या बाबतींतहि हाच अनुभव आला. अत्रिमुनींच्या आज्ञेप्रमाणें भगवान् दत्तात्रेय हें अनसूया-मातेकडे आले. त्यांनी साष्टांग प्रणिपात केला व हात जोडून नम्रपणानें म्हणाले, " आई ! तुझ्या चरणीं माझी एक नम्र विनंती आहे. माझी इच्छा तूं पूर्ण करशील ना ? तूं सांगशील तें मी करीन. मी कधीं तुझा शब्द मोडला नाहीं. मी कधीं तुझ्या आज्ञेच्या बाहेर वागलों नाहीं. वेदांप्रमाणें तुझा शब्द प्रमाण मानून मी तुझ्या आज्ञेंत राहिलों आहें. तुझ्या सांगण्याप्रमाणें वागलों आहें. माझें तुला एकच मागणें आहे. मी तुला अधिक कांहीं मागत नाहीं. ऐकशील ना तूं माझें ? " दत्तात्रयांचें हें बोलणें ऐकून हा आतां मला काय मागणार आहे हें त्या चतुर मातेनें तावडतोब ताडलें.

कोणतीहि माता मुलाचें विद्याध्ययन झाल्यानंतर त्यानें गृहस्थाश्रम स्वीकारावा हीच अपेक्षा करणार, हें स्वाभाविकच आहे. आपण सुनमुख पहावें. सुनेनें आपल्या हाताखालीं नांदावें. आपण नातवंडाचें मुखावलोकन करावें. या सर्व अपेक्षा सृष्टिक्रमाला अनुलक्षून मातेच्या ठिकाणीं असतातच. माता अनसूया म्हणाली, " बाळा ! काय तुला मागावयाचें आहे तें माग. माझ्या दृष्टीनें जें योग्य असेल तें मी तुला देईनच. आतांपर्यंत तुझ्या सर्व इच्छा मी नाहीं का पुरविल्या ? भगवान् श्री-दत्तात्रेय म्हणाले, " आई ! तूं माझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या आहेस. आतां एकच मागणें आहे माझें तुला. तेवढी माझी इच्छा तूं पूर्ण कर. " पूर्णकाम आणि आप्तसंकल्प या शब्दांनी वेद ज्याचें वर्णन करीत आहेत तो परमात्मा आपली इच्छा पूर्ण करण्याकरितां आईची प्रार्थना करीत आहे ! वस्तुतः जगाचा जनक तो ! त्याला जन्म कोण देणार ? त्याला कसली आई आणि कसले वडील ? तथापि तो परमात्मा दत्तात्रेयांच्या रूपानें अनसूयेच्या उदरीं अवतरला. " अनसूयास्तनं पपौ " अनसूयेचें स्तन्य प्राशन करून तृप्त झाला, कौसल्येच्या उदरीं अवतरला आणि तिच्या कडेवर बसला. देवकीच्या उदरीं अवतरला आणि यशोदेच्या अंकावर खेळला; पाठीशीं झोंबला ! स्वतः विश्वंभर असूनहि त्यानें आपल्याला आई आई म्हणत, आईनें कालविलेल्या दूध-भातानें व दहीभातानें भरवून घेतलें ! केवढी ही परमेश्वराची भक्तवत्सलता !

आई हा शब्दच असा कांहीं आहे कीं, तो उच्चारल्याशिवाय मनाला समाधानच व्हावयाचें नाहीं ! परिश्रम करून थकलेला माणूस विश्रांति घेण्यासाठीं जेव्हां खालीं बसतो तेव्हां त्याच्या मुखांतून आईग हा शब्द सहजच बाहेर पडत असतो. "क्षुधा-तृषार्ता जननीं स्मरन्ति" तहानेनें व भुकेनें तसेंच दुःखांनींहि व्याकुळ झालेले लोक आईचीच आठवण करीत असतात. असें आहे आईचें महत्त्व.

अविनाश भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें भाषण ऐकून सती अनसूया म्हणाली, "एक गोष्ट सोडून तुला काय पाहिजे असेल तें तूं मागून घे." दत्तात्रेयप्रभूंनी आईचा अभिप्राय ओळखला. तथापि निरुपाय होऊन त्यांनीं आपली इच्छा आईपुढें व्यक्त केलीच. दत्तात्रेय म्हणाले, "आई, तुझ्या कृपेनें मी लहानाचा मोठा झालों. विद्याध्ययन केलें विविध कलांचा अभ्यास केला. योगाभ्यास केला. सिद्धिहि मिळविल्या. जगभर पर्यटनहि केलें. अनेक ठिकाणीं असंख्य लोक गाढ अज्ञानरूपी अंधकाराच्या खाईत खितपत पडलेले आहेत. त्यांची ती घोर अज्ञानदशा पाहून मनाला कींव येते. असें वाटतें की, सर्वसंगपरित्याग करून जगभर पुन्हां फिरावें. सदुपदेश करून सर्वांना सन्मार्ग दाखवावा. दुःखाच्या खाईंतून सर्वांना वर काढावें. सर्वांचा उद्धार करावा. तरी तूं मला संन्यास घेण्याची परवानगी दे. मी संन्यास घेऊन जगभर फिरेन आणि परिव्राट् परिव्राजक बनून सर्वांचा उद्धार करीन." अनसूया म्हणाली, "बाळ ! तुझी इच्छा फारच उत्तम आहे. परोपकारार्थ प्राणपणानें झटणें हें तर आपल्या कुलाचें ब्रीदच आहे. अत्रिमुनींनींहि जन्मभर हेंच कार्य केलें आहे. पुत्र या नात्यानें त्यांचें ध्येय पूर्ण करणें हे तुझें कर्तव्यच आहे. मी तुझ्या ध्येयाच्या आड येत नाहीं; पण बाळ, त्यासाठीं संन्यास कशाला घ्यावयास पाहिजे ?" दत्तात्रेय म्हणाले, "आई ! मोहपाशांत गुंतलेलें मन आपल्या ध्येयाप्रमाणें एकनिष्ठेनें कार्य करूं शकत नाहीं. मी सांसारिक मोहपाशांतून मुक्त असावें असें मला वाटतें." अनसूया म्हणाली, "तर मग अत्रिमुनीं-कडे जाऊनच तूं त्यांची परवानगी घे." दत्तात्रेय म्हणाले, "आई ! त्यांनींच तर मला तुझ्याकडे पाठविलें आहे. तूं जो कांहीं निर्णय देशील तोच मला मानावा लागेल." अनसूया म्हणाली, "बाळ ! गृहस्थाश्रमांतील सुखदुःखें अनुभवल्याविना मनाला दृढ वैराग्य लाभत नाहीं." दत्तात्रेय म्हणाले, "आई ! माझे मामा भगवान् कपिल महामुनि यांनीं कोठें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला ? गृहस्थाश्रम न स्वीकारतांच ते आश्रम सोडून निघून गेले ! मग मला काय हरकत आहे ?" अनसूया म्हणाली, "बाळ, अविनाश ! गृहस्थाश्रम न स्वीकारतां राहणें हें एक मोठें अग्निदिव्य आहे. तुझ्या मामाला जें झेपलें तें तुला झेपलेच असा नियम नाहीं. शिवाय लोककल्याणासाठीं समाजांत राहून कार्य करावयाचें असेल, तर गृहस्थाश्रमाचा स्वीकार करणें हेंच श्रेयस्कर होय. विलयाला गेलेल्या वर्णाश्रमधर्माची पुन्हां संस्थापना करावयाची असेल, तर तुला स्वतःला गृहस्थाश्रमाचा अंगीकार करावाच लागेल. आपण दुसऱ्याला जो उपदेश करणार तो स्वतः आचरावाच लागतो. स्वतः वर्णाश्रमधर्माचें परिपालन

न करतां दुसऱ्याला त्याचा उपदेश करणें हा दंभ ठरेल. बाळ ! तुला कोणीं दांभिक म्हटलें तर तें मला बरें वाटणार नाहीं, तरी तूं गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. सर्व आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम हा मोठा श्रेष्ठ आश्रम आहे. इतर सर्व आश्रमांचा गृहस्थाश्रम हा आधार आहे. गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून तूं आदर्श गृहस्थाश्रम चालवून दाखव. पितृ-ऋणांतून मुक्त हो आणि मग चतुर्थाश्रम स्वीकारून जगाच्या कल्याणासाठीं जगभर फिरत राहा.

भगवान् श्रीदत्तात्रेय यांना अनसूयामातेचा हा आदेश अमान्य करणें अशक्य झालें. "अहं भक्तपराधीनः" हें परमेश्वराचें ब्रीदवाक्य आहे. तो परमात्मा विश्वनियंता असूनहि भक्तांचा दास बनतो ! एक वेळ स्वतःची प्रतिज्ञा तो बाजूला ठेवील, पण भक्तांचा शब्द कधींं मोडणार नाहीं. दत्तात्रेयांनी मातेची आज्ञा शिरसावंद्य मानून आपली मान तुकविली. अत्रिमुनींना जें साधलें नाहीं तें अनसूयेला साधलें. अखेर शक्तितत्त्वाचा विजय झाला. अत्रिमुनि हे शिवतत्त्वस्वरूप होते तर अनसूया ही शक्तितत्त्वस्वरूप होती. कर्तृत्व, धर्तृत्व, हर्तृत्व आणि नियंतृत्व हे सर्व धर्म शक्तितत्त्वाच्या अधीन असतात. माता ही शक्तिस्वरूप आहे म्हणूनच तिचा अधिकार फार मोठा आहे. श्रीदत्तात्रेयप्रभूंची गृहस्थाश्रमाला अनुमति मिळाल्यावरोबर अनसूयेला. अत्रिमुनींना आणि इतर सर्व आश्रमवासीजनांना मोठा आनंद झाला. श्रीदत्तात्रेयप्रभु यांचें लग्नकर्तव्य आहे ही वार्ता सर्वत्र पसरली व अनुरूप असलेल्या वधूंचे पिते अत्रिमुनींच्या भेटीस येऊं लागले. यद्यपि विरक्ताला कन्या देऊं नये असें धर्मशास्त्रांत सांगितलेलें आहे, तथापि सर्वगुणसंपन्न, दिव्य अलौकिक आणि भगवत्स्वरूप असलेल्या दत्तात्रेय प्रभूंशीं आपला सोयरेपणाचा संबंध जुळुन यावा, असें सर्वांनाच वाटूं लागलें. हें स्वाभाविक आहे. अखेर कुल, शील, वय आणि रूप इत्यादि सर्व अनुरूप गुण लक्षांत घेऊन श्रीदत्तात्रेयप्रभूंचा एका ऋषिकन्येशीं मोठ्या थाटामाटानें विवाह साजरा झाला. ज्यांच्या मुंजीचाच थाट अवर्णनीय होता त्यांच्या लग्नाच्या थाटाचें काय वर्णन करावें ? वाचकांनींच ती कल्पना केलेली बरी.

या ठिकाणीं कित्येक भाविक वाचक आणि श्रीसद्‌गुरुभगवान् दत्तात्रेय यांचे भक्त यांच्या मनाला धक्का बसण्याची शक्यता आहे. कारण श्रीदत्तात्रेय ही देवता प्रायः बालब्रह्मचारी अथवा अवधूत या स्वरूपांतच पाहावयास सांपडते. हंस, परमहंस अथवा आश्रमातीत अवधूत या वृत्तीच्या अर्थात् वर्तनाच्या विशिष्ट अवस्था आहेत. यांत गृहस्थाश्रमाचा संबंध असूं शकत नाहीं. सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय बहुधा याच अवस्थेंत पाहवयास सांपडत असल्यामुळें त्यांच्या गृहस्थाश्रमाची कल्पना सहसा येत नाहीं. असें असलें तरी सिद्धराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या जीवनांत काजव्याप्रमाणें क्षणभर चमकणारा गृहस्थाश्रमी जीवनाचा क्षण भासला दिसला तरी तेवढ्यावरून आपल्या उपास्य देवतेला तिळमात्रहि न्यूनता येत नाहीं, हें भाविक भक्तांनीं लक्षांत घ्यावें. किंबहुना आदर्शभूत पूर्णजीवन या दृष्टीनें पाहतां दत्तात्रेयांच्या

जीवनांतील अत्यल्प काल असलेला गृहस्थाश्रमाचा संबंध हा भूषणास्पदच आहे असें म्हणावें लागतें. केवळ शाब्दिक उपदेशापेक्षां आधीं केलें, मग सांगितलें, हा न्याय अधिक श्रेष्ठ आहे. या दृष्टीनें पाहतां गुरुदेव श्रीदत्तात्रेयप्रभु यांचा गृहस्थाश्रम हा त्यांच्या देवत्वाला अथवा गुरुपणाला तिळमात्रहि उणीव आणीत नसून, उलट त्यांचा मोठेपणाच त्यांत दिसून येतो. कांहीं झालें तरी आईचा शब्द मोडावयाचा नाहीं हें उदात्त तत्त्वच यांत प्रतिबिंबित झालेलें आहे.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे महाविष्णूचा अवतार आहेत ही गोष्ट निर्विवाद असल्यामुळें, दत्तात्रेयप्रभूंची भार्या होण्याचें भाग्य ज्या ऋषिकन्येला लाभलें, ती ऋषिकन्या प्रत्यक्ष लक्ष्मीचाच अवतार असली पाहिजे, यांत तिळमात्रहि संशय नाहीं. कित्येक वेळेला दत्तात्रेयप्रभूंनी आपल्या सान्निध्यांत असलेली ही स्त्री आपली नाहीं असें सांगून, आपल्या पाठीमागें लागणाऱ्या लोकांच्या, घोळका करून पाठीमागे लागण्याचा अतिरेकी प्रवृत्तीला आळा घालण्याचा प्रयत्न केला आहे असें दिसून येतें. मला अवधूत व सिद्ध महात्मा समजून माझ्याभोवतीं वृथा गर्दी करणाऱ्या या अनधिकारी लोकांचा घोळका कमी व्हावा असा त्यांत दत्तात्रेयांचा हेतु होता. त्याप्रमाणें कांहीं लोक दत्तात्रेयांना सोडून निघूनहि जात होते. पण कांहीं एकनिष्ठ असलेल्या लोकांनीं दृढ भक्तीनें दत्तात्रेयांचे चरण धरावेत आणि महाराज ! आपल्या सान्निध्यांत आपल्या वामांकीं विराजत असलेली ही स्त्री सामान्य कोणी तरी परकी स्त्री नसून, ती प्रत्यक्ष लक्ष्मीच आहे, अशी स्तुति केली असल्याचेंहि दिसून येत आहे. दत्तात्रेयांच्या ध्येयमूर्तीचा निर्देश करतांना अग्निपुराणांत तर वामांकी लक्ष्मी विराजत असलेल्या द्विभुज दत्तात्रेयांचीच अर्चामूर्ति शिल्पकारांनीं तयार करावी असें सांगितलेलें आहे.

वामपादो धृतःशेषे दक्षिणः कूर्मपृष्ठगः ।
दत्तात्रेयो द्विबाहुःस्याद् वामोत्सङ्गे श्रिया सह ।।

— अग्निपुराण, अ. ४९

भगवान् श्रीदत्तात्रेय हे सिंहासनावर विराजमान झालेले असून त्यांनीं दोन्ही-पाय खालीं सोडलेले आहेत. डावा पाय शेषावर ठेवलेला असून, उजवा पाय कासवाच्या पाठीवर ठेवला आहे. जणू कांहीं धरणीधर शेष आणि मंदार पर्वताला आपल्या पृष्ठभागावर धारण करणारा कूर्म म्हणजे कासव हे दोघेहि भगवान् श्रीदत्तात्रेय यांचे पादपीठ म्हणजे सिंहासनावर बसले असतांना पायाखालचा आधार बनलेले आहेत. या वर्णनावरून सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे लक्ष्मीसह सिंहासनावर विराजमान असलेले सुस्पष्टच दिसत आहेत.

गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं मातुश्रींच्या आज्ञेवरून फारच थोडा काळ का होईना, पण गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आणि गृहस्थाश्रमोचित सर्व कर्तव्य-कर्में करून गृहस्थाश्रमीयांना आदर्श गृहस्थाश्रम स्वतःच्या आचरणानें दाखवून दिला.

पहाटेच उठून प्रातःस्मरण, शौच, मुखमार्जन, स्नान, संध्या, जप, तप, पूजा, अनुष्ठान, वैश्वदेव, अतिथिपूजन, भोजन, विश्रांति, अध्ययन, अध्यापन आणि शास्त्र-चर्चा इत्यादि सर्व कर्में ते कसोशीनें पार पाडीत असत. नित्यनैमित्तिक कर्मांत कधीं त्यांनीं प्रमाद होऊं दिला नाहीं. अशा रीतीने गृहस्थाश्रमांतील जीवनक्रम चालू असला तरी विश्व-कल्याणासाठीं विश्वभर संचार करण्याचे वेध त्यांच्या मनाला सारखे लागलेलेच होते. त्यांचा अवतारच त्याकरितां होता. गृहस्थाश्रमांतून लौकर मुक्त होण्याची संधि ते पहातच होते. गार्हस्थ्यजीवनांत समाजांतील वर्णाश्रम धर्माची विस्कळीत झालेली घडी त्यांनीं सुव्यवस्थित केली. " धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा " धर्म हाच सर्व विश्वाच्या सुव्यवस्थित जीवनाचा खरा आधार आहे. हा सिद्धान्त त्यांनीं सर्व समाजांना पटवून दिला. सप्तस्वरांतील स्पंदनांचें संख्यावैषम्य हें ज्याप्रमाणें सुस्वर संगीताच्या निर्मितीला कारण होत असतें त्याचप्रमाणें चातुर्वर्ण्य-व्यवस्थाहि समाजाच्या सुव्यवस्थित जीवनाची निर्मिति करीत असते. धर्माची घडी विस्कळीत झाली कीं, अर्थ आणि काम म्हणजे जीवनांतील सुखाचीं साधनें यांचीहि घडी विस्कळीत होते. धर्म, अर्थ आणि काम यांची घडी विस्कळीत झाली कीं, त्यांतूनच मनाची अस्वस्थता निर्माण होते. मन अस्वस्थ झालें कीं, मोक्षाचाहि मार्ग दुष्कर होतो. हें सर्व लक्षांत घेऊन भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं वर्णाश्रमधर्माची घडी नीटनेटकी केली. लोकांना स्वधर्माकडे व सदाचारांकडे प्रवृत्त केले. सर्वस्वीं निर्दोष असलेलें वैदिक वाङमय हाच खरा धर्माचा व तत्त्वज्ञानाचा आधार होय ही गोष्ट लक्षांत घेऊन दत्तात्रेयांनीं वैदिक वाङमयाचें पुनरुज्जीवन केलें. लोकांच्या उपेक्षेनें लुप्तप्राय होत चाललेल्या वेदांचा दत्तात्रेयांनीं उद्धार केला. लोकांना वैदिक वाङमयाच्या अभ्यासाकडे प्रवृत्त केलें. आधिदैविक दृष्टीनें जनतेच्या सुखासाठीं उपयुक्त असलेली यज्ञयागादि कर्मांचीहि परंपरा त्यांनीं प्रचलित केली. लोककल्याणासाठीं क्षेमराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं केलेल्या या कार्याचें हरिवंशामध्यें मोठें सुंदर वर्णन केलें आहे. जिज्ञासू जनांसाठीं त्यांतील कांहीं श्लोक खालीं देत आहे.

भूयो भूतात्मनो विष्णोः प्रादुर्भावो महात्मनः ।
दत्तात्रेय इति ख्यातः क्षमया परया युतः ॥

तेन नष्टेषु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च ।
चातुर्वर्ण्ये तु संकीर्णे धर्मे शिथिलतां गते ॥

अभिवर्धतिचाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते ।
प्रजासु शीर्यमाणासु धर्मेचाकुलतां गते ॥

सहयज्ञक्रिया वेदाः प्रत्यानीता हि तेन वै ।
चातुर्वर्ण्यमसंकीर्णं कृतं तेन महात्मना ॥

—हरिवंश, पर्व १, अ. ४१

सर्व प्राणिमात्रांचा आत्माच असलेल्या त्या उदार बुद्धीच्या विष्णूनें लोक-कल्याणासाठीं स्वतःला पुन्हां प्रकट करून घेतलें. तो श्रीहरीचा आविर्भाव दत्तात्रेय या नांवानें प्रसिद्धीस आला. त्याची क्षमाशीलता फारच उत्कृष्ट कोटीची होती. दत्तात्रेय म्हणजे मूर्तिमंत क्षमाच होय. त्या दत्तात्रेयानें फारच मोठें कार्य केलें व अद्यापीहि तो तें कार्य करीत आहेच. वेद आणि वेदांतील यज्ञयागादि प्रक्रिया पार विलयाला गेल्या होत्या. चातुर्वर्ण्य गडबडलें, गोंधळलें होतें. धर्माला फारच शैथिल्य आलेलें होतें. अधर्माचा सर्वत्र फैलाव झालेला होता. समाजांतील नीतिमत्ता नष्टप्राय झालेली होती. खरेंपणाला कोठेंच ठावठिकाणा उरलेला नव्हता. खोटेपणाला तर जणूं कांहीं स्थायीभावच प्राप्त झालेला होता. भ्रष्टाचार शिगेला पोहोचलेला असल्यामुळे धर्माची शोचनीय अवस्था झालेली होती. कोणी कोणाला पुसेना व कोणी कोणाच्या उपयोगाला येईना अशी ही राष्ट्राची दुर्धर अवस्था झालेली पाहून दत्तात्रेयांना दया आली. यज्ञयागादि कर्मांसह नष्ट झालेल्या वेदांचा दत्तात्रेयांनीं पुनरुद्धार केला. गुरुदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं चातुर्वर्ण्याची घडी नीटनेटकी बसवून धर्माची संस्थापना केली. अधर्माच्या प्रवृत्तीचा पूर्णपणें निरास करून टाकला. श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या प्रयत्नानें अधर्माचें तिमिर मावळलें. सुविचारांच्या उषःकालानें दिशा फाकल्या आणि पाठोपाठ स्वधर्मरूपी सूर्याचा उदय झाला! सर्वांचीं अन्तःकरणें प्रकाशलीं व सर्वजण आप-आपल्या इष्ट दिशेनें वाटचाल करून आपल्याला इष्ट असलेलें निःश्रेयसाचें ध्येय गाठूं लागले. अशी ही दत्तात्रयप्रभूंची स्वधर्मसंस्थापनेची कामगिरी मोठी अपूर्व आहे.

याप्रमाणें गृहस्थाश्रमाची धुरा स्वीकारून धर्मसंस्थापनेच्या द्वारां लोक-कल्याणाचें काम करीत असतां भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु यांना पुत्ररत्नाचा लाभ झाला. ते पितृ-ऋणांतून मुक्त झाले. पितृ-ऋणांतून मुक्त न होता आल्यामुळें जें दुःख होत असतें त्याला 'पुत्' नांवाचा नरक असें म्हटलें जातें. पुत्रप्राप्तीनें पितरांची या नरकांतून सुटका होत असल्यामुळें जन्माला आलेल्या मुलाला पुत्र असें म्हटलें जातें. "त्रायते पुन्नामनरकात्तस्मात्पुत्र इतीर्यते" अशी पुत्र शब्दाची व्युत्पत्ति आहे. मुलगा हा 'पुत्' नांवाच्या नरकापासून म्हणजे दुःखापासून आपल्या मातापितरांचें परित्राण करतो म्हणून त्याला पुत्र असें म्हटलें जातें. असा हा पुत्र शब्दाच्या निरुक्तीचा अर्थ आहे. आपण गृहस्थाश्रमांतून मुक्त होण्यास आता मोकळे झालों म्हणून दत्तात्रेयांस आनंद झाला; तर अत्रि आणि अनसूया यांना आपणांस पौत्र अर्थात नातू झाला म्हणून आनंद झाला. भगवान् श्रीदत्तात्रेय हे सर्वप्रिय असल्यामुळें त्यांना पुत्र झाला हें ऐकून सर्वांनाच आनंद झाला.

स्वायंभुवोऽत्रिः कौरव्य परमर्षिः प्रतापवान् ।
तस्य वंशे महाराज दत्तात्रेय इति स्मृतः ॥

दत्तात्रयस्य पुत्रोऽभून्निमिर्नाम तपोधनः।
निमेश्चाप्यभवत्पुत्रः श्रीमान्नाम श्रिया वृतः ।।
— अनुशासनपर्व, अ. ९१

हे कुरुकुलोत्पन्ना महाराजा ! स्वयंभू म्हणजे ब्रह्मदेव. त्यांच्यापासून अत्रि-मुनींचा जन्म झालेला असल्यामुळें अत्रिऋषींना स्वायंभुव असें म्हटलेलें आहे. अत्रि हे मोठे प्रतापशील ऋषि होते. त्यांच्यापासून अनसूयेच्या उदरीं दत्तात्रेयांचा जन्म झाला. सर्व लोक त्यांना दत्तात्रेय असेच म्हणत होते. दत्तात्रेयांच्या पोटीं निमि नांवाचा पुत्र जन्माला आला. तो मोठा तपस्वी होता. निमीपासून श्रीमान् नांवाचा पुत्र जन्माला आला. तो नांवाप्रमाणें श्रीमान् आणि सर्वगुणसंपन्न असाव होता.

नातवाचे व पणतूचे जातकर्मादि सर्व संस्कार यथासांग पार पडले हें निराळें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. श्रीमान् जन्माला आल्यानंतर अत्रिमहर्षि आणि अनसूया यांच्यावर सुवर्णपुष्पांची वृष्टि करून व्यावहारिक व शास्त्रोक्त सर्व सोहाळे यथासांग पार पडले.

## श्रीदत्तात्रेयांचा राज्याभिषेक

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं कांहीं अल्पकाळ कां होईना राज्यसिंहा-सनावर आरूढ होऊन साम्राज्यवैभवाचाहि लाभ घेतला असल्याचें परिस्थितिजन्य पुराव्यावरून आढळून येतें. राज्याभिषेक झाल्यानंतर लोक दत्तात्रेयांना दत्तराज या नांवानें संबोधूं लागले. अद्यापीहि लोकव्यवहारामध्यें दत्तात्रेयांना उद्देशून दत्तराज हा शब्द उपयोगांत आणतात हें प्रसिद्धच आहे. नेपाळ राज्यांत तर दत्तात्रेयांना दत्त-भट्टारक अशीच संज्ञा आहे. तेथें दत्तात्रेयाचें मंदिर असें कोणी म्हणणार नाहीं. तर 'दत्तभट्टारजीका मंदिर' असाच व्यवहार अद्यापिहि होत असल्याचें दिसून येतें. संस्कृत भाषेमध्यें भट्टारक शब्दाचा अर्थ पट्टाभिषेक झालेला राजा असाच आहे. दत्ता-त्रेयांचा एक बंधु सोम हा तर सोमवंशाचा आद्य राजाच होता. दत्तात्रेयांना प्रत्यक्ष राजभूमि अथवा राज्य नव्हतें. शहरें, गांवें, जमीन-जुमले त्यांच्या नांवावर असल्याचें कोठेंहि आढळून येत नाहीं, ही गोष्ट खरी आहे; तथापि गुरुराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा अतिप्राचीन कालांतील एक शिष्य राजा अलर्क या नांवानें प्रसिद्ध होता. मदालसेला चार पुत्र होते. (१) विक्रांत, (२) सुबाहु, (३) शत्रुमर्दन व चौथा अलर्क. तो सार्वभौम सम्राट् ऋतध्वज राजाचा पुत्र असल्यामुळें पित्याच्या पश्चात् पहिल्या तिघांनीं राज्यपद नाकारल्यामुळें तोच सार्वभौम राजा झाला. एकदां तो अत्यंत संकटांत सांपडला असतां राज्यवैभव सोडून कोठें जीवाला शांति मिळेल काय अशा तळमळीनें हिंडूं लागला. तेव्हां त्याला एकदम आईची आठवण झाली. "तूं अत्यंत संकटानें जेव्हां ग्रासला जाशील तेव्हां या सोन्याच्या ताइतांतील चिठ्ठी काढून वाच आणि त्याप्रमाणें वाग; म्हणजे तुला शांति मिळेल." हें आईचें वचन

त्याला आठवलें. त्यानें ती चिठ्ठी काढून वाचली. त्या चिठ्ठींत लिहिलें होतें कीं, "तूं जेव्हां अत्यंत संकटांत सांपडशील तेव्हां सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना शरण जा. त्यांचा उपदेश ऐक. ते सांगतील त्याप्रमाणें वाग. म्हणजे तूं सर्व संकटांतून मुक्त होशील व तुझ्या जीवाला शांति मिळेल." हें वाचताक्षणीं राजा अलर्क दत्तात्रेयांचा शोध करीत निघाला. अंतःकरणांतील उत्कट तळमळ व योग्य प्रयत्नांची पराकाष्ठा मनुष्य गांठूं लागला कीं त्याचे न्याय्य मनोरथ पूर्ण करण्याची परमेश्वरानें योजना योजलेलीच असते असें निश्चित समजावें. जणूं कांहीं हा निसर्गनियमच आहे. अलर्काला दत्तात्रेयांचें दर्शन झालें. तो त्यांच्या चरणीं मातेच्या आज्ञेप्रमाणें अनन्यभावानें शरण गेला, सेवा केली व त्यांचा उपदेश ऐकला.

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या उपदेशानें अलर्काचें समाधान झालें, त्याच्या मनाला पूर्ण शांति मिळाली. काशीराजाच्या साहाय्यानें सुबाहूनें जिंकून घेतलेलें त्याचें राज्य त्याला मोठ्या आदरानें परत दिलें. अलर्काचें नष्ट झालेलें वैभव पुन्हां पूर्ववत् थाटानें विलसूं लागलें. आपले सद्गुरु समर्थ श्रीरामदासस्वामी यांना ज्याप्रमाणें छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांनीं आपलें राज्य समर्पण केलें होतें त्यचप्रमाणें राजा अलर्क यानेंहि सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कृपेनें प्राप्त झालेलें हें सर्व राज्यवैभव खरोखर तत्त्वतः त्यांचेंच आहे असें मानून आपलें सर्व साम्राज्यवैभव सत्तेसह सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या चरणीं समर्पण केलें. राजा अलर्काचा हा निर्णय अत्यंत स्वाभाविक आहे, असेंच कोणाहि विचारवंताला मान्य करावें लागेल. दत्तात्रेयसहस्रनामांतहि दत्तात्रेयांचा पृथ्वीपति या नांवानें उल्लेख केलेला आढळतो "नानावीर्यधरश्चैव शक्रेशः पृथ्वीपतिः" राज्याभिषेक केलेल्या सार्वभौम राजाला उद्देशूनच पृथ्वीपति हा शब्द योजिला जातो. "योगी भोगपरो राजा धृतिमान् मतिमान् सुखी" या दुसऱ्या दत्तात्रेयसहस्रनामांतहि दत्तात्रेयांचा राजा या नांवानेंच स्पष्ट उल्लेख केलेला आढळतो.

दत्तात्रेयं हृदिदधदृषभं स्वर्णसिंहासनस्थं ।

"स्वर्णसिंहासनस्थं ऋषभं दत्तात्रेयं हृदि दधत् भक्तगणः आप्तकामः भवति इति तदर्थः" स्वर्णसिंहासनावर विराजमान असलेल्या सर्वश्रेष्ठ श्रीदत्तात्रेयांना हृदयामध्यें धारण करणारा भक्तगण दत्तात्रेयांच्या कृपेनें पूर्णकाम अर्थात् सफलमनोरथ होतो. असा या वरील श्लोकाच्या चरणाचा अन्वयार्थ आहे. या चरणांतील स्वर्णसिंहासनस्थ हें दत्तात्रेयांचें विशेषण प्रकृतस्थलीं लक्षांत घेण्यासारखें आहे. पट्टाभिषेक झालेला राजा हाच सुवर्णसिंहासनावर विराजमान होऊं शकतो. पट्ट शब्दाचा अर्थहि राज्याभिषेकाकरितां केलेलें सुवर्णसिंहासन असाच आहे. या सर्व विवेचनावरून राजा अलर्क यानें दत्तात्रेयांना आपलें राज्य समर्पण करून राज्याभिषेक केला होता व दत्तात्रेयप्रभु हे सुवर्णसिंहासनावर आरूढ झालेले होते ही गोष्ट स्पष्ट होत आहे.

"राजा प्रकृतिरंजनात्" या कविकुलगुरु कालिदासाच्या वचनाप्रमाणें दत्तात्रेयप्रभूंनीं आपल्या प्रजाजनांना रमविलें व पूर्ण सुखी केलें. म्हणूनच त्यांना राजा हें अन्वर्थ नांव प्राप्त झालें. रामराज्याप्रमाणेंच दत्तात्रेयप्रभूंच्या राज्यांतहि सर्व प्रजाजन अत्यंत आनंदांत होते. कांहीं विद्वान लोक अत्रिमहर्षि हे प्रजापति व राजे असल्यामुळें दत्तात्रेयांकडे वारसाहक्कानेंच राज्य आलेलें होतें असें मानतात.

श्रीदत्तात्रेय यांचा उल्लेख मुनि अथवा महामुनि याहि शब्दांनीं अनेक ठिकाणीं केलेला आढळतो. ऋषि या शब्दानेंहि त्यांचा कांहीं ठिकाणीं निर्देश केलेला आहे. यावरून दत्तात्रेयांचें जीवन ऋषि-मुनिस्वरूपाचें असल्याचें स्पष्टच दिसून येत आहे. दत्तात्रेय महामुनि हे यज्ञयागादि श्रौतस्मार्त कर्मामध्येंहि अत्यंत निष्णात् होते. पृथु राजाच्या यज्ञामध्यें अत्रिऋषींच्या बरोबर दत्तात्रेयहि उपस्थित होते. तेथें यज्ञकर्मांत चुकत असलेल्या ऋत्विजांना योग्य सूचना देऊन प्रमादापासून त्यांना सुरक्षित ठेव-ल्याचा श्रीमद्भागवतांत उल्लेख आहे. याप्रमाणें श्रीदत्तात्रेयांनीं पृथुराजाला चुकीच्या यज्ञकर्मापासून सुरक्षित ठेविलें. दत्तात्रेयांच्या या असाधारण योग्यतेमुळें पृथुराजाहि दत्तात्रेयांचा शिष्य बनला.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे जसे योगिराज होते तसेच ते राजयोगीहि होते. राज-योगी श्रीदत्तराज हे स्वभावतःच वीतराग असल्यामुळें विरक्तांचे ते मुकुटमणि होते. ते राज्यवैभवांत गुंतून राहणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं तें सर्व राज्यवैभव "तूंच हें राज्य सावधानतेनें नीट सांभाळ" असें म्हणून जसेंच्या तसें अलर्काच्या स्वाधीन केलें व आपण स्वतः अवधूत बनून लोककल्याणासाठीं विश्वंभर संचार करूं लागले. दत्तात्रेयांचें जीवन आतां आश्रमबंधनाच्या बाहेर गेलेलें होतें. याच अभिप्रायानें दत्तात्रेय यांचा आश्रम कोणता ? या प्रश्नाचें उत्तर "तस्यायं पञ्चमाश्रमः" या शब्दांनीं दिलेलें आढळतें. म्हणूनच त्यांना पञ्चमाश्रमी असें म्हणतात.

## अवधूतचर्या

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे अवधूतरूपानें इतस्ततः पर्यटन करीत असतां एकदां सहजच ते एका प्रचंड वटवृक्षाच्या छायेंत शिळेवर सुखासीन बसले होते. त्यांचे डोळे पापण्यांना पापण्या न लागतां कांहींसे उघडचा अवस्थेंत होते. दृष्टि किंचित् ऊर्ध्व दिशेकडे झुकलेली होती. माथ्यावर जटाभार शोभत होता. मुखावर एक प्रकारचें अलौकिक तेज झळकत होतें. कंठामध्यें रुद्राक्षमाला विसलत होती. सर्वांगाला भस्म र्चाचलेलें होतें. डाव्या मांडीवर डावा हात उताणा असून जुळलेल्या बोटांचा अग्रभाग कांहींसा खालीं झुकलेला होता. ती त्यांची सहज अवस्थेंतील अभयमुद्राच होती. उजवा हात कोंपरापासून थोडासा वरच्या बाजूला वळलेला होता. तळहात नागाच्या फडीप्रमाणें समोरून पाहणाऱ्यांना दिसत होता. मिळतींजुळतीं बोटें उभीं असलेलीं कांहींशीं पुढच्या बाजूस झुकलेलीं होतीं. ही त्यांची जणूं कांहीं वरदमुद्राच

होय. डाव्या खांद्यावरून उजवीकडे कटिभागाच्याहि थोडें खालपर्यंत पोहोंचलेलें यज्ञोपवीत त्यांच्या गळयांत विराजत होतें. जवळच कमंडलु आणि त्रिशूळ असल्याचें पहावयास सांपडत होतें सभोंवारच्या परिसरांत गाई मुक्त मनानें चरत होत्या. मोरांनीं आपल्या केकावाणीनें दाही दिशांचीं अंतराळें मधून मधून दुमदूमून टाकलेलीं होतीं. जवळच कुत्रींहि विश्रांति घेत होतीं. वृक्षांच्या घनदाट छायेंत निरनिराळ्या लहानमोठ्या फांद्यांवर अनेक पक्षी विसावलेले होते. कांहींशा अंतरावर अश्वत्थ, औदुंबर, प्लक्ष म्हणजे पिंपरीचे वृक्ष यांनाच कोठें कोठें नांदुरकी असेंहि म्हणतात; पळस, खैर, इत्यादि अनेक वृक्ष दृष्टीस पडत होते. छोट्या छोट्या सरोवरांतून कमळें फुललेलीं होतीं. कृष्णतुलसीचीं झाडें मंजुळांनी बहरलेलीं होतीं. अनेक प्रकारच्या सुगंधी पुष्पांचे गुच्छ पुष्पलतांच्या व पुष्पवृक्षांच्या अग्रभागीं टवटवीतपणें अपूर्व शोभा देत होते. अशा त्या रमणीय स्थलीं अवधूतकुलावतंस सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांची भावसमाधि लागलेली होती. दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं उत्कंठित झालेले ऋषिमुनि व सिद्ध योगी हळूहळू तेथें येऊ लागले. पाहतां पाहतांवराच मोठा समुदाय एकत्र जमला. ते सर्व दत्तात्रेयप्रभूंच्याच कृपेनें योगसिद्धि व ज्ञान आणि विज्ञान यांनीं संपन्न झालेले होते. ते अनेक शास्त्रांमध्यें निष्णात् होते. तसेच ते योगविद्येमध्येंहि प्रवीण होते. दत्तात्रेयांच्या अनुगृहीत मंडळींमध्यें नारद, शांडिल्य, संवर्त, सांकृति, जाबालि बाभ्व, दाल्भ्य, गालव, देवल, दलादन, अष्टावक्र, गर्ग, दधीचि आणि परशुराम इत्यादि अनेक ऋषिमुनि होते. त्याचप्रमाणें प्रल्हाद, अलर्क, आयु, यदु, नहुष, पृथु आणि कार्तवीर्य प्रभृति राजेमहाराजेहि होते. तसेच अनेक संशोधक, विद्वान् आणि सदाचारसंपन्न असेहि लोक होते. नाथसंप्रदायांतील नऊ नाथांवरहि दत्तात्रेयांची अनुग्रहदृष्टि होतीच. या सर्वांनीं दत्तात्रेयांची उपदेशपरंपरा अविच्छिन्न चालू ठेविलेली आहे; ही गोष्ट इतिहासांत पाहवयास सांपडते.

वर निर्दिष्ट केलेल्या दत्तात्रेयप्रभूंच्या सांनिध्यांत एकत्र झालेल्या ऋषिमुनींनीं व सिद्धजन आणि योगिजन यांनीं दत्तात्रेयांना पाहिल्यानंतर हात जोडले व साष्टांग प्रणिपात केला. दत्तात्रेयांना पाहून त्या सर्वांना जो आनंद झाला तो त्यांच्या अंतःकरणांतून ओसंडत होता. त्या सर्वांचीं मुखें आनंदानें प्रसन्न झालेलीं होतीं. त्यांनीं दत्तात्रेयांची प्रार्थना केली. पौराणिक वाङमयांतील सुप्रसिद्ध नैमिषारण्यच होतें हें. तेथें जमलेल्या सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, ऋभु, नारद इत्यादि सर्व संडळींनीं दत्तात्रेयांना हात जोडून प्रणिपात केला व ते म्हणाले –

## दत्तात्रेय स्तोत्र

नमस्ते पुण्डरीकाक्ष दत्तात्रेय जगद्‌गुरो ।
यत्प्रसादादनुप्राप्ताः सिद्धेशाः सिद्धिमुत्तमाम् ।।



– ब्रह्मांड. ९–४५

हे कमललोचना, जगद्गुरो दत्तात्रेया ! तुम्हांला आमचा नमस्कार असो. तुमच्या कृपेनें मोठमोठे सिद्ध महात्मे यांना उत्तम सिद्धीचा लाभ झालेला आहे.

नमो नमः कारणकारणाय निष्कारणायामितविक्रमाय ।
श्रीशार्ङ्गचक्रासिगदाधराय नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। १ ।।

हे परमपुरुषा दत्तात्रेया ! तुम्ही या विश्वाच्या मुळाशीं असलेल्या महत्तत्त्व, अहंकारतत्त्व आणि पंचमहाभूतें इत्यादि जगाला कारणीभूत असलेल्या सूक्ष्म तत्त्वाचेंहि जनक आहां. तुम्हांला मात्र या जगांत कोणीच कारण नाहीं. म्हणून तुम्ही कारणाचेंहि कारण असून स्वतः मात्र निष्कारण म्हणजे कारणरहित आहां. तुमच्या पराक्रमाला परिमिति नाहीं. तुम्ही आपल्या हातांत शार्ङ्गधनुष्य, चक्र, खड्ग आणि गदा हीं आयुधें धारण केलेलीं आहेत. त्या पुरुषोत्तमस्वरूप तुम्हांला आमचा नमस्कार असो.

सदुद्भवस्थाननिरोधलीलारासाय तस्मै चक्रमेश्वराय ।
गुणारणिच्छन्नचिदुष्मपाय नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। २ ।।

सत्स्वरूपानें म्हणजे कार्यरूपानें प्रतीतीला येणाऱ्या या विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि निरोध म्हणजे लय या तिन्हींच्या रूपानें जणू कांहीं तुमची लीलाच चाललेली आहे. विश्वाची वरचेवर होणारी निर्मिति हा जणु तुमचा खेळच चाललेला आहे. त्या तुम्हांला आमचा नमस्कार असो. तुम्ही जणु कांहीं सर्व प्राणिमात्रांच्या देहेन्द्रियादि संघातांनीं झाकलेले चैतन्यरूपी अग्नीच आहां. अरणि म्हणजे घर्षणानें अग्नि निर्माण करण्याचें शमि, खैर इत्यादि वृक्षांचें विशिष्ट आकाराचें लाकूड, घुसळण्याच्या रवीच्या आकाराचा विशिष्ट खांब, घुसळण्याची दोरी आणि तो खांब वरून दाबून धरण्याची फळी, या सर्वांना अरणि असें म्हणतात. त्यांत असलेला अग्नि घर्षणानें प्रकट होत असतो. हें घर्षण रवीच्या आकाराच्या घुसळ-खांब्यानें होत असतें. गुप्त असलेला अग्नि जसा घर्षणानें अरणीमध्यें प्रकट होतो त्याचप्रमाणें देहेन्द्रियादि समुदायामध्यें झाकलेला आत्मा सुविचारानें प्रकट होत असतो. म्हणून चैतन्यरूपी दत्तात्रेयाला गुणारणिच्छन्न-चिदुष्मप असें म्हटलेलें आहे. उष्मप शब्दाचा अर्थ अग्नि असा समजावा. हे चिदग्निरूपा दत्तात्रेया तुम्हांला आमचा नमस्कार असो.

यद्ब्रह्म वेदान्तविदो वदन्ति सांख्या यदाहुः पुरुषं प्रधानम् ।
पातञ्जलाः परमात्मानमाहुर्नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। ३ ।।

हे दत्तात्रेया ! वेदवेदान्ततत्त्ववेत्ते तुम्हांला ब्रह्म असें म्हणतात, आणि त्याचप्रमाणें सांख्यतत्त्ववेत्ते प्रधानपुरुष असें म्हणतात. पातंजल योगशास्त्राचे अनुयायी तुम्हांला ईश्वर अथवा परमात्मा असें म्हणतात. सर्व तत्त्ववेत्त्यांचें अंतिम तत्त्व असलेल्या तुम्हांला आमचा नमस्कार असो.

यं यज्ञियावयवं यज्ञरूपं वदन्ति ये यज्ञवितानविज्ञाः ।
धर्मात्मकं कर्म-परा यमाहुर्नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। ४ ।।

हे प्रभो दत्तात्रेया! तुम्ही प्रत्यक्ष यज्ञस्वरूप असून यज्ञाचे अवयव–स्रुक्, स्रुवा इत्यादि यज्ञपात्रें हीं तुमच्या नाक, कान, मुख इत्यादि अवयवस्थानीं आहेत, असें यज्ञकर्मामध्यें निष्णात् असलेले लोक वर्णन करतात. कर्मकांडामध्यें निपुण असलेले लोक तुम्हांला धर्म म्हणजे पुण्यस्वरूप मानतात; अथवा मीमांसक तुम्हांला कर्मरूप मानतात. या पुरुषोत्तमस्वरूप असलेल्या तुम्हांला आमचा नमस्कार असो.

शून्यात्मकं शून्यविवादिनो यं विज्ञानमित्येव तथा परे ये ।
पञ्चात्मकं यं प्रवदन्ति केचिन्नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। ५ ।।

हे प्रभुवरा दत्तात्रेय महाराजा! शून्यवादी बौद्ध लोक तुम्हांला शून्यतत्त्व-स्वरूप मानतात. त्याचप्रमाणें विज्ञानवादी बौद्ध तुम्हांला क्षणिक विज्ञानस्वरूप मानतात. चार्वाक लोक पृथ्वी, जल, तेज आणि वायु या चार महाभूतांच्या संयोगा-पासून निर्माण होणारें चैतन्य हाच आत्मा असून तेंच तुमचें स्वरूप आहे असें मानतात. या ठिकाणीं श्लोकामध्यें पंचात्मक हा शब्द लोकव्यवहारांत रूढ असलेल्या पंचमहाभूतें या शब्दाला अनुलक्षून लिहिलेला आहे. वस्तुतः चार्वाक मतामध्यें प्रत्यक्ष हेंच एक प्रमाण असल्यामुळें आणि आकाशाचें प्रत्यक्ष ज्ञान कधीं होत नसल्यामुळें ते आकाश मानीत नाहींत. दहीं आणि गूळ यांच्या मिश्रणापासून जशी मादक शक्ति निर्माण होते त्याप्रमाणें देहरूपानें आकारलेल्या चार भूतांच्या संयोगापासूनच चैतन्य-शक्ति प्रकट होते. त्या चैतन्यालाच ते आत्मा असें म्हणतात. या दृष्टीनें पाहतां पंचा-त्मकंच्या ऐवजीं भूतात्मक असाच शब्द असणें योग्य होईल. असो. सद्गुरो! त्या चैतन्यस्वरूप तुम्हांला आमचा नमस्कार असो.

यं विश्वकायं प्रवदन्ति वेदास्त एव नेत्यादि निषेधयन्ति
अगोचरं वाङ्मनसोर्यमाहुर्नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ।। ६ ।।

"सर्वं खल्विदं ब्रह्म" "आत्मैवेदं सर्वम्" इत्यादि वाक्यांनीं हे प्रभो वेद तुमचेंच वर्णन करतात. विश्वरूपानें नटलेल्या तुम्हांला ते विश्वकाय अथवा विराट-तत्त्वकाय या शब्दांनीं संबोधितात. तेच वेद "नेति नेति" इत्यादि वाक्यांनीं दृश्य प्रपंचाचा निरास करून अधिष्ठानरूपानें शिल्लक राहिलेल्या परमात्मतत्त्वालाच ते परब्रह्म अथवा परमात्मा असें म्हणतात. तुम्ही वाणि आणि मन यांच्या आकलन-शक्तीच्या पलीकडचे आहां. हे दत्तात्रेया तेंच परब्रह्म तुम्ही आहां. तुम्हांला आमचा नमस्कार असो.

त्वां केचिद्गुणवद्द्रव्यमाहुर्विशेषज्ञा वस्तुनो नैकरूप्यम् ।
सर्वात्मानं सर्ववादिप्रसिद्धं सर्वाधारं [illegible] महदेवं मताःस्म ।। ७ ।।

हे आनंदकंदा सद्गुरो ! कोणी तुम्हांला बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म आणि भावना या गुणांनीं विशिष्ट असलेलें एक प्रकारचें द्रव्य म्हणजेच आत्मा व तोच आत्मा द्वेष, दुःख व अधर्म इत्यादि दोषांनीं रहित असला म्हणजे त्याला परमात्मा असें म्हणतात. हें वैशेषिकांचें व नैयायिकांचें मत आहे. ते वस्तु म्हणजे आत्मा कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि धर्मांनीं युक्त असा मानतात. त्यांच्या मतें जीवात्मे अनेक असून परमात्मा एकच आहे व तो जीवांहून भिन्न आहे. वस्तुतः हे प्रभो, तुम्ही सर्वांचे आधार आहां. हे गुरुदेवा, विवाद करणाऱ्या सर्व शास्त्रज्ञांना अंतिम तत्त्वाच्या रूपानें तुम्हीच मान्य आहां. तुम्हीच सर्व देवांचे देव आणि परब्रह्म आहां. तुम्हांला आमचा नमस्कार असो.

अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स श्रुणोत्यकर्णः ।
यमाहुरग्र्यं पुरुषं महांतं नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय ॥ ८ ॥

हे परमेश्वरा ! तुम्ही विभु म्हणजे व्यापक अर्थात् सर्वव्यापी असल्यामुळें निरवयव आहां. तुम्हांला हात-पाय वगैरे अवयव नाहींत. तथापि तुम्ही अति वेगानें धांवता. दूरच्या वस्तु जवळ घेता. डोळे नाहींत पण सर्व कांहीं पाहता. तुम्हांला कान नसूनहि सर्व कांहीं ऐकता. तुम्हांला शास्त्रज्ञ सर्वश्रेष्ठ अथवा अनादि असें म्हणतात. तुम्हांला तत्त्ववेत्ते आणि पौराणिक महापुरुष असें म्हणतात. हे परमपुरुषा, तुम्हांला आमचा नमस्कार असो.

यं ज्योतिषां ज्योतिरेकं वदन्ति श्रुतिर्जीवनं जीवजात्याश्रितानाम् ।
यमेकं विना नान्यदस्तीत्यभाणि नताःस्मो भवंतं नताःस्मो नताः स्मः ॥ ९ ॥

हे दत्तात्रेया ! सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्र, तारांगण, आकाशगंगा, दीप आणि अग्नि इत्यादि तेजस्वी आणि प्रकाशयुक्त असलेल्या पदार्थांना प्रकाशित करणारे महा-तेजस्वी तुम्हीच आहां. जीवसमुदायांमध्यें घटक असलेल्या सर्व जीवांचें जीवन तुम्हीच आहां. तुमच्यावांचून या जगांत तत्त्वतः सत्य असें दुसरें कोणीच नाहीं, असें वेदांनीं तुमचें वर्णन केलेलें आहे. प्रभो, तुमच्या चरणीं लीन होऊन आम्ही तुम्हांला पुनःपुन्हां नमस्कार करीत आहोंत.

पीताम्बरालंकृतपृष्ठभागं भस्मावगुंठामलरुक्मदेहम् ।
सहस्रभानुप्रतिमप्रभासं भजाम सर्वे वयमादिदेवम् ॥ १ ॥

हे सद्गुरो दत्तात्रेया ! तुमची अंगकांति तापविलेल्या सोन्याप्रमाणें देदीप्य-मान असून तुमच्या निर्मल देहावर सर्वांगीं भस्म चर्चिलेलें आहे. तुमच्या शरीराचा पृष्ठभाग पिवळ्या रेशमी वस्त्रानें सुशोभित झालेला आहे. हजार सूर्यांच्या एकवट-लेल्या तेजाप्रमाणें तुमचें तेज दिसत असून तें एकत्रित झालेल्या हजारों चंद्रांच्या

कांतीप्रमाणें चित्ताला आल्हाद देत आहे. आदिदेवस्वरूप असलेल्या त्या तुम्हांला आम्ही अनन्य चित्तानें भजत आहों.

यस्याङ्घ्रियुग्मं हृदि भावयन्तो योगेश्वरा योगरता निरीहाः ।
सुदुश्चिकित्स्यस्य भवाऽऽमयस्य भिषक्तमं त्वां शरणं व्रजेम ।। ११ ।।

हे महाप्रभो दत्तात्रेया ! मोठे मोठे योगी एका आसनावर स्थिर राहून आपल्या हृदयामध्यें तुमच्या दोन्ही चरणकमलांचें एकाग्र चित्तानें ध्यान करतात व योगाभ्यासामध्यें रमतात. तुम्ही असाध्य अथवा कष्टसाध्य असलेल्या संसाररूपी रोगाचा निरास करणारे उत्तम वैद्य आहां. भवरोगांतून मुक्त होण्यासाठीं आम्ही तुमच्या चरणीं शरण आलों आहोंत.

यं वै श्वसन्तमनुविश्वसृजः श्वसन्ति यं चेकितानमनुचित्तय उच्चकन्ति ।
यं नो विदुर्भुवन भोग वितानविज्ञा यो वेत्ति तान् भुवनभोगचरित्रसंघान् ।। १२ ।।

हे सर्वेश्वरा, सद्‌गुरो देवदेवा ! तुम्ही या विश्वांतील सर्व जीवांचे नियामक असून हे सर्व जीव तुमच्या अधिकाराखालीं तुम्ही वागवाल त्याप्रमाणें वागणारे आहेत. अर्थात् तुम्ही जीवमात्रांचे नियंते असून जीव हे नियम्य आहेत. तुम्ही सर्व स्थावरजंगम अर्थात् जड आणि अजड वस्तूंचे प्रकाशक असून सर्व स्थिरचर विश्व तुमच्यामुळेंच भासत आहे. तुमच्यामुळेंच तें प्रतीतीला येत आहे. तुम्ही सर्व जगाचे साक्षी असल्यामुळें सर्वज्ञ आहां. तुम्ही हालचाल करूं लागला म्हणजे ब्रह्मदेव, दक्ष, मरीच इत्यादि प्रजापति आपआपलीं कामें करूं लागतात. अर्थात् परमेश्वराच्या प्रेरणेनेंच ब्रह्मदेवादि सर्व प्रजापतींची विश्वाच्या उत्पत्तीसाठीं हालचाल सुरू होत असते. 'श्वसन्' म्हणजे श्वासोच्छ्‌श्वास करणारा, जगणारा अथवा कार्य करणारा आणि श्वसंति म्हणजे श्वासोच्छ्‌श्वास करतात, जगतात अथवा कार्य करतात; असे या शब्दांचे अर्थ समजावेत. त्याचप्रमाणें चेकितान म्हणजे पाहणारा अथवा प्रकाशमान् होणारा. सूर्य प्रकाशला म्हणजे घटादि पदार्थ जसे प्रकाशतात त्याचप्रमाणें हे दत्तयोगेश्वरा, तुम्ही प्रकटला म्हणजे तुमच्या चित्प्रकाशानें प्राणिमात्रांच्या चित्तवृत्ति जाग्या होतात. चित्तयः म्हणजे चित्ति अर्थात चित्ताच्या हालचाली. उच्चकंति म्हणजे उदयाला येतात, भासूं लागतात, असा याचा अर्थ समजावा. हे गुरुश्रेष्ठा, भुवन म्हणजे उच्चावच यच्चयावत व्यक्तींचें आणि समुदायांचें राहण्याचें आश्रयस्थान अर्थात भूरादि चौदा लोक आणि त्या लोकांमध्यें राहणारे सर्व लोक हें तुम्हांला ओळखूं शकत नाहींत. तुम्ही मात्र त्या सर्वांना, त्यांच्या स्थानांना व त्यांच्या सुखदुःखादि भोगांना त्याचप्रमाणें त्यांच्या सर्व चरित्रसमूहांना म्हणजे आचारविचारांना पूर्णपणें जाणत आहां. त्याचप्रमाणें सर्वशक्तिमान् आणि सर्वनियंते आहां. त्या तुम्हांला आम्ही भक्तिभावानें नम्र होऊन प्रणाम करीत आहोंत.

यस्यामलं भुवि यशः प्रथितं पुराणं ये शीलयंत्यनुदिनं गतरागरोषाः ।
हित्वा सुदुस्त्यजमिदं गृहमन्धकूपं संयांत्यपावृतमृतं तमजं नताःस्म ॥ १३ ॥

हे दयासागरा दत्तात्रेया ! आपली निर्मल कीर्ति संपूर्ण भूमंडलावर पसरलेली आहे. विरक्त लोक नित्य, निरंतर तुमच्या सर्वत्र विस्तारलेल्या यशाचें अमृताप्रमाणें रोजच्या रोज प्राशन करीत असतात. राग-द्वेष आणि कामक्रोध या विकारांना जिंकून ते तुमच्या अत्यंत प्राचीनकालापासून सर्वत्र प्रसिद्ध असलेल्या कीर्तीचें परिशीलन करीत असतात. ते तुमच्या गुणगौरवाचें नित्य वर्णन करीत राहतात. परिशीलन म्हणजे श्रवणकीर्तनादि रूपानें केला जाणारा अभ्यास. ते अति अंधकूपाप्रमाणें असलेल्या घरदार इत्यादि दुस्त्यज परिवाराला सोडून सत्यस्वरूप असलेल्या आणि सर्वत्र उघड असलेल्या परमात्मपदाला पोहोंचतात. असा ज्याच्या यशाचा महिमा आहे त्या तुम्हांला आम्ही नमस्कार करीत आहोंत.

ध्यायंति यं भवति ये हृदि रूढभावा
भक्त्याऽर्चयन्ति गुणिनं गुणविप्रमुक्ताः ।
ये चाप्नुवन्ति विलयं विबुधैकवन्द्यं
यस्मात्पुनर्न परिवर्तमवाप्नुवन्ति ॥ १४ ॥

हे दीनबंधो दत्तात्रेया, 'भवति' — भवत् शब्दाच्या सप्तमीचें एकवचन. भवति म्हणजे आपल्याविषयीं ज्यांच्या अंतःकरणांत भक्तीचा वृक्ष डौलानें डोलत आहे ते निरंतर भक्तीनें तुमचेंच पूजन करीत असतात. हे परमेश्वरा ! तुम्ही सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांचे नियंते आहांत, म्हणून तुम्हांला गुणी असें म्हणतात. जे कोणी गुणी असलेल्या तुमचें चिंतन करतात ते त्रैगुण्याच्या पाशांतून मुक्त होतात, आणि त्यांना, सर्व देवांना व तत्त्ववेत्त्यांना प्रामुख्यानें वंद्य असलेल्या परब्रह्मपदाची प्राप्ति होते. तें परब्रह्मपद सर्वांचा आधार आहे. तेथें जे पोहोंचतात त्यांना पुन्हां या संसारचक्रामध्यें परिभ्रमण करण्याची पाळी येत नाहीं. हे दत्तात्रेया, हा सर्व तुमचाच प्रभाव आहे. तुम्हांला आमचा नमस्कार असो.

चैतन्यमेकममलं हृदि भावयन्ति
ये योगिनो जितमरुन्मनसो विरागाः ।
ते नैकजन्मशमलं सहसैव हित्वा
ब्रह्मात्मभावमतुलं सहजं भजन्ते ॥ १५ ॥

हे परमहंसा, दयाघना, दत्तात्रेया ! जे योगी सर्व प्रकारची विषयासक्ति सोडून प्राणायामाच्या अभ्यासानें प्राणाला आणि मनाला जिंकतात व आपल्या हृदयामध्यें केवल शुद्ध चैतन्यस्वरूप असलेल्या तुमच्या स्वाभाविक अनुपमेय स्वरूपाचें ध्यान करतात; ते अनेक जन्मांचीं पापें एकदम नाहींशी करून आनंदमय ब्रह्मस्वरूपाशीं एकरूप होऊन राहतात.

तं वै भजाम गुणसंगगृहीतदेहं
विश्वोद्भवं सकलजीवनिकाय केतम् ।
पद्मासनं दनुजदेवसमर्चितांघ्रि
सिद्धेश्वरैर्मुनिभिरात्मरहः प्रकाशम् ।। १६ ।।

आतां ब्रह्मदेव, विष्णु आणि महेश्वर या तिन्ही देवांच्या रूपानें नटलेल्या दत्तात्रेयांची क्रमानें पृथक् पृथक् देवतांचें वर्णन करून स्तुति करीत आहेत. त्यांत प्रथम ब्रह्मदेवरूपी दत्ताची सोळाव्या श्लोकानें स्तुति केलेली आहे. गुणसंग म्हणजे रजोगुणाचा अभिनिवेश, अर्थात् रजोगुणाच्या उत्कर्षाबद्दलचा अहंकार. त्यामुळें परमेश्वरानें ब्रह्मदेवाचें रूप धारण करून विश्वाची उत्पत्ति केली. जो सर्व जीवांचा आधार असलेल्या चौदाहि भुवनांचा आश्रयस्थान आहे, अर्थात् विराटरूपानें नटलेला आहे; ज्यानें स्वतः विष्णूच्या नाभिस्थानापासून उत्पन्न झालेल्या कमलाचा आश्रय केलेला आहे, म्हणूनच ज्याला कमलासन अथवा पद्मासन असें म्हणतात, देवदानवांनी ज्याच्या चरणकमलांचें पूजन केलेलें आहे, तसेच सिद्धेश्वर आणि ऋषिमुनि यांच्या द्वारां अज्ञजनांना आत्मतत्त्वाचें गूढ उकलून सांगितलें त्या ब्रह्मदेवस्वरूप असलेल्या दत्तात्रेयाला आम्ही भजत आहोंत.

यन्नामामंगलघ्नं श्रुतमथ गदितं यत्प्रभा दिग्गजांता ।
यद्भक्ताः शुद्धचित्ता जललवतरलं संभवं न स्पृशन्ति ।।
विष्णुं वन्द्यं सुरेशं दितिजदनुजसत्रासहेतुं परेशं ।
साष्टांगं तं च सर्वे वयमखिलभवावर्तशान्त्यै नमामः ।। १७ ।।

ज्याचें नांव ऐकलें असतां सर्व प्रकारच्या अशुभांचा नाश होतो, सर्व पापांचा निरास होतो, ज्याची दिव्यकीर्ति दाही दिशांना व्यापून राहिलेली आहे, दिग्गजापर्यंत पसरलेली आहे, ज्याचे भक्त चित्त शुद्ध झाल्यामुळें संसारसागराला सहज तरून जातात, संसारदुःखाच्या लेशालाहि स्पर्श करण्याची त्यांच्यावर पाळी येत नाहीं; तो विष्णुस्वरूपी दत्तभगवान्—सर्व विश्वाला व्यापून राहत असल्यामुळें त्याला विष्णु असें म्हणतात. तो साऱ्या विश्वाला वंदनीय आहे. तो सुरेश म्हणजे देवांचाहि स्वामी आहे. त्याचा दैत्य आणि दानव यांना सारखाच धाक वाटत असतो. तो जगाचाहि सर्वश्रेष्ठ स्वामी आहे. म्हणून त्याला परेश असें म्हणतात. सर्व संसारचक्राचा उपशम होण्यासाठीं आम्ही त्या विष्णुस्वरूपी दत्तात्रेयांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात करीत आहोंत.

क्षीरेच्छया शरणदः शरणं प्रपन्नं
विप्रात्मजं समनुकंप्य महानुभावः ।
क्षीरांबुधिः सकरुणोदिशदाशुतोषं
श्वेतांतकांतकमतं [illegible] स्म ।। १८ ।।

अठराव्या श्लोकांत शंकररूपी दत्तात्रेयांची स्तुति करीत आहेत. उपमन्यु नांवाचा एक ऋषिपुत्र होता. वडील अत्यंत गरीब होते. घरीं खाण्यापिण्याचीहि भ्रांत म्हणजे अडचण होती. खावयास अन्न व प्यावयास दूधहि मिळत नसे. एकदां तो दुधासाठीं हट्ट घेऊन बसला असतां बिचाऱ्या आईनें पाण्यांत पीठ कालवून तें पांढरें पाणी दूध म्हणून प्यावयास दिलें. खऱ्या दुधाची चव त्याला माहीत नसल्यामुळें तो तें पीठ कालवलेलें पाणीच दूध समजून रोज पीत असे. एकदां तो आपल्या वडिलां- बरोबर एका राजाच्या येथें गेला असतां त्याला खरें दूध प्यावयास मिळालें. तो घरीं परत आल्यानंतर आईनें त्याला नेहमीप्रमाणें पाण्यांत पीठ कालवून दूध म्हणून प्यावयास दिलें. खऱ्या दुधाची चव त्याला माहीत झाल्यामुळें तो आईनें दिलेलें दूध न पिता 'मला खरें दूध दे' असें म्हणून हट्ट करूं लागला. अखेर गरिबीनें गांजलेल्या त्या मातेनें बाळास सांगितलें, 'बाळ, आपण पूर्वजन्मीं व या जन्मींहि शंकराची आराधना केली नाहीं. तूं शंकराची आराधना कर म्हणजे तुला उत्तम दूध मिळेल. आईचे हे शब्द ऐकून त्यानें शंकराची आराधना केली. आशुतोष भगवान् शंकर तावडतोब प्रसन्न झाले. शंकरांनीं त्या उपमन्यु बाळाला दुधाचा समुद्र अर्थात क्षीर- सागर देऊन तृप्त केलें,' अशी एक कथा प्रसिद्ध आहे. ही कथा भक्तजनांनीं अवश्य लक्षांत घ्यावी.

त्याचप्रमाणें श्वेत नांवाचा एक राजा होता. तो शंकराचें तन्मयतेनें नित्य ध्यान करीत असे. त्याला मारण्याकरितां मृत्यूनें अनेक वेळां प्रयत्न केला; पण हा राजा प्रत्येक वेळीं समाधि लावून बसत असल्यामुळें त्याला मारण्याचा मृत्यूला अव- सरच मिळेना. एकदां मृत्यूनें त्याच्या ब्रह्मरंध्रावरच घाला घालून त्याच्यावर आपले पाश टाकले. त्या वेळीं तो श्वेतराजा शंकराला शरण गेला. भक्तवत्सल भगवान् शंकर तेथें प्रकट झाले व त्रिशूळानें त्यांनीं मृत्यूला मारून टाकलें. ही गोष्ट समाधिस्थ असलेल्या श्वेतराजाच्या लक्षांत आली नाहीं. मरतां मरतां मृत्यूनें श्वेतराजाच्या अंतःकरणांतील ध्येयमूर्तीला म्हणजे शंकराला ओढून बाहेर काढलें तेव्हां तो राजा ध्यानसमाधींतून जागृत झाला. त्या वेळीं भगवान् शंकर हे मृत्यूच्या हातांतील रत्न घेऊन मृत्यूवर प्रहार करीत आहेत असें त्यानें पाहिलें. भगवान् शंकर यांचा प्रत्यक्ष बाह्यसाक्षात्कार झाल्यामुळें श्वेतराजाला अत्यंत आनंद झाला. आनंदानें त्याचे नेत्र भरून आले. अंगावर रोमांच उभें राहिलें. प्रेमानें हृदय भरून आलें. संतोषानें नयन प्रफुल्लित झाले. वाणी सद्गदित झाली. कसे तरी अडखळत अडखळत शंकराची त्यानें स्तुति केली. शंकर प्रसन्न झाले. ते राजाला म्हणाले, 'तुला पाहिजे तो इष्ट वर मागून घे.' तेव्हां राजा म्हणाला, 'माझ्या निमित्तानें मृत्यूला मरण आलें व मृत्यूच्या निमित्तानें मला तुमचें प्रत्यक्ष दर्शन झालें. म्हणून तो मृत्यु जिवंत व्हावा व मला तुमच्या सान्निध्याचा नित्य लाभ घडावा, हे दोन वर आपण मला द्या.' हे ऐकून शंकर अत्यंत प्रसन्न झाले व त्यांनीं मृत्यूला जिवंत

केलें आणि श्वेतराजाला आलिंगन देऊन सदेह आपल्या कैलासलोकाला नेलें व आपल्या सन्निध्यांत ठेवलें. अशा रीतीनें शंकरानें श्वेत राजाच्या अंतकाचा म्हणजे मृत्यूचा अंत केला. म्हणून शंकराला मृत्युंजय असें नांव पडलें. त्याचप्रमाणें मार्कंडेय ऋषीलाहि शंकरांनीं मृत्यूच्या पाशांतून सोडविलें असल्यामुळें शंकरांना मृत्युंजय असें नांव पडलें. स्वतः भगवान् शंकर यांचा अंत म्हणजे नाश कधींच होत नसल्यामुळें त्यांना अनंतक असें म्हटलेलें आहे. अशा या भक्तवत्सल आणि आशुतोष असलेल्या शिवस्वरूपी दत्तात्रेयांच्या चरणीं नम्र होऊन आम्ही प्रणिपात करीत आहोंत.

## दत्तात्रेयांचें ऋषिजनांना दर्शन

एकदां नैमिषारण्यामध्यें ऋषि, मुनि, तपस्वी, योगी, सिद्ध आणि थोर महात्मे आपलीं नित्यनैमित्तिक स्नान, संध्या, होमहवन इत्यादि कर्में उरकून स्वस्थपणें बसले असतां शांत चित्तानें वासुदेवाचें ध्यान करून विचार करूं लागले. इतक्यांत मंद, शीतल आणि सुगंधयुक्त असे, मनाला प्रसन्न करणारे वारे वाहूं लागले. आकाश अनिर्वचनीय अशा दिव्य तेजानें व्यापून गेलें. हें अनिर्वचनीय दिव्य तेज दुसरें कोणाचें असणार ? साक्षात् परमात्माच अखंड मंडलाकार अशा या दिव्य तेजाच्या रूपानें ऋषिजनांना दर्शन देण्याकरितां प्रकट होत होता. आपल्या मायावैभवानें प्रकट होणाऱ्या परमात्म्याचें तें अलौकिक दिव्य तेज डोळ्यांना दिपवून टाकूं लागलें. त्या तेजाच्या पुढें चंद्र, सूर्य, अग्नि, ग्रहमंडल आणि नक्षत्रमंडल यांचें तेज फिकें वाटूं लागलें. जणूं कांहीं आकाशांत हजार सूर्य एकदम उदयाला आले आहेत कीं काय असा भास होऊं लागला. आश्चर्य असें कीं, तें तेज एवढें प्रचंड होतें तरी त्यांत प्रखरता नव्हती. " मार्तंड जे तापहीन " या श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या उक्तीचा तेथें प्रत्यक्ष अनुभवच येत होता.

तें तेज कांहीं क्षणांनीं मूर्त स्वरूपांत परिणत झालें. क्षणांतच तें उदयाला येणाऱ्या सूर्यमंडलामध्ये विराजित असलेलें दिसलें. क्वचित् तें एकमूर्तिस्वरूप तर क्वचित् त्रिमूर्तिस्वरूप असें दिसूं लागलें. जणूं कांहीं सूर्यमंडलवर्ति नारायणच होते तें. प्रत्यक्ष आदिनारायणच दत्तात्रेयांच्या रूपानें प्रकट झालेले पाहून सर्व मुनिजनांना अत्यंत आनंद झाला. हात जोडून नम्रपणानें ते म्हणाले, " हे देवदेवेशा, जगद्गुरो, आज तुमच्या दर्शनानें आमचें जीवन धन्य झालें आहे. कृपा करून तुम्ही आपल्या स्वरूपाचा व कार्याचा संक्षेपानें आम्हांला परिचय करून द्यावा. अशी आम्हा सर्वांची आपल्या चरणीं नम्र विनंती आहे. ऋषिजनांचें हें भाषण ऐकून दत्तात्रेय म्हणाले—

दत्तात्रेयस्वरूपेण योगादेशकरो विभुः
अवतीर्य चराम्यत्र योगिनां सिद्धिसाधकः ॥



— ब्रह्मांड. १-१-२९

मी प्रत्यक्ष सच्चिदानंदरूप परिपूर्ण परमात्मा असून अत्रिमहर्षि आणि श्रीसती अनसूया यांच्या उदरीं अवतीर्ण झालों आहें. मला दत्तात्रेय असें म्हणतात. प्राधान्यानें योगमार्गाचा उपदेश करून योगिजनांना सिद्धि प्राप्त करून देण्याकरितां या त्रैलोक्यामध्यें मी परिभ्रमण करीत असतों. माझे अवतार असंख्य असून चरित्रेंहि अनंत आहेत. तीं मलाहि साकल्यानें वर्णन करून सांगतां येणार नाहींत. तर तुम्ही सर्व व्यासमुनींचा शिष्य आणि रोमहर्षणाचा पुत्र असलेल्या सूताकडूनच हें सर्व ऐकून घ्या. तो अत्यंत बुद्धिमान् असून इतिहासांत आणि पुराणविद्येमध्यें निष्णात आहे. तो माझा आवडता भक्त असून माझ्याच कृपेनें सर्वज्ञ झालेला आहे. दत्तात्रेयांच्या या उत्तरावरून दत्तात्रेयांच्या शिष्यपरंपरेमध्यें सूतांचें स्थान अत्यंत उच्च कोटीचें असल्याचें दिसून येतें. दत्तात्रेय म्हणाले, "हे ऋषिजनहो! तुम्ही केलेल्या स्तोत्राचा जे पाठ करतील त्यांचे सर्व मनोरथ सत्वर पूर्ण होतील" असें सांगून दत्तात्रेय अंतर्धान पावले.

यानंतर ऋषिमुनींचे शिष्य व पुत्र दर्भ, समिधा, तुलसी, फुलें, दूर्वा, बेल इत्यादि पूजासामग्री घेऊन अरण्यांतून परत आले. येतांना पळसाचीं पानें व कंद, फळें, मुळें वगैरे वस्तूहि त्यांनीं बरोबर आणल्या होत्या. मुलांचीं मुखें अत्यंत प्रसन्न दिसत होतीं. हंसत हंसतच तीं मुलें म्हणालीं, 'अहो, आज मोठी गंमतच आम्हीं पाहिली. कालपर्यंत जें अरण्य आम्हांला अत्यंत रुक्ष व भयंकर दिसत होतें तेंच आज अत्यंत टवटवीत आणि आल्हाददायक असें दिसलें. जेथें क्रूर पशु, सर्प, विंचू इत्यादि विषारी प्राणी दिसत असत तेथें आज आम्हांला हें कांहीं दिसलें नाहीं. डांस नव्हते, चिलटें नव्हतीं, कोठें उद्विग्नता आढळली नाहीं. पुष्करण्या, विहिरी, तळीं अत्यंत स्वच्छ पाण्यानें भरलेलीं दिसलीं. कमळेंहि खूपच उमललेलीं होतीं. लता, वेली, पुष्पगुच्छांनीं बहरलेल्या होत्या. वृक्षांच्या शाखा फळभारांनीं नम्र झालेल्या होत्या. आज आम्हांला कंदमुळेंहि खूपच मिळालीं. विविध प्रकारचीं फुलें व तुलसीमंजिरी यांची तर जिकडे तिकडे रेलचेल दिसत होती. मनाला प्रसन्न करणारा असा हा बदल एकाएकीं कसा बरें घडून आला?

मुलांचें हें भाषण ऐकून ऋषि म्हणाले, 'हा देवदर्शनाचा सुपरिणाम आहे. आत्तांच आम्हांला परमेश्वरानें दत्तात्रेयप्रभुंच्या रूपानें व विश्वरूपानेंहि दर्शन दिलें. दत्तात्रेयांचें तें तेज अत्यंत अनिर्वचनीय व प्रसन्न होतें. थोड्याच वेळांत वृक्ष, लता वेली, पशुपक्षी सर्व कांहीं आम्हांला दत्तरूपच दिसत होतें. जिकडे पहावें तिकडे दत्तच दत्त असें हें मंगलमय दृश्य आम्हीं पाहिलें. क्षणभर आम्ही गोंधळलों. आम्हांला कांहींच सुचेना. अखेर परमेश्वरानें आपली माया आवरून आम्हांला दत्तात्रेयांच्या रूपानें दर्शन दिलें व उपदेश केला. दत्तात्रेय म्हणाले –

यूयं समाप्य कर्मेदं भुक्त्वा भोगाननुत्तमान् ।
मदनुग्रहतः प्राप्य ज्ञानं विज्ञानसंयुतम् ॥ ३३ ॥

देहांते मत्परानंदस्वरूपं परमं पदम् ।
मनोवाचामविषयं यास्यथात्रैव सुव्रताः ॥ ३४ ॥

" हे ऋषिजनहो ! तुम्ही माझ्या प्राप्तीकरितां नित्य, नैमित्तिक आणि यज्ञ-यागादि मोठमोठीं कर्में केलीं. भक्तियुक्त अंतःकरणानें मला शरण आलांत. मी तुमच्यावर प्रसन्न झालों आहें. आतां तुम्ही हीं सर्व कर्में संपवून व उत्तम भोग भोगून माझ्या कृपेनें लवकरच ज्ञानविज्ञानसंपन्न व्हाल. अन्तसमयीं देह सुटतांना तुम्हांला सच्चिदानंदरूप अशा माझ्या स्वरूपाचें स्मरण होईल आणि तुम्ही मनाला व वाणीलाहि आकलन न होणाऱ्या माझ्या सुखमय स्वरूपाला प्राप्त व्हाल. त्यालाच परमपद असें म्हणतात. हे सुजनहो ! तें तुम्हांला याच जन्मांत व याच देहांत प्राप्त होईल." असें सांगून श्रीदत्तात्रेयप्रभु हे पाहतां पाहतां दिसेनासे झाले. ते अन्तर्धान पावले. ऋषिमुनींचें हें भाषण ऐकून त्या ऋषिपुत्रांना व शिष्यजनांना अत्यंत खेद झाला. ते म्हणाले, ' अरेरे धिक्कार असो आम्हांला. आम्ही श्रीदत्तात्रेयप्रभु यांच्या दर्शनाला मुकलों. ऐनवेळीं आम्हांला दुर्दैवानें अरण्यांत जाण्याची बुद्धि झाली. आम्ही आश्रमांत असतों तर आम्हांलाहि सर्वांप्रमाणें विश्वरूपी दत्तात्रेयप्रभूंचें दर्शन झालें असतें. या अलभ्य लाभाला आम्ही अंतरलों. आतां काय करावें बरें ?" मुलांचा हा पश्चात्ताप पाहून ऋषींना कळवळा आला. ते म्हणाले, " मुलांनो, तुम्ही कोणत्याहि प्रकारें तिळमात्रहि काळजी करूं नका. जो लाभ आम्हांला घडला तो तुम्हांला घडणार नाहीं असें कसें होईल ? तुम्हीहि आमच्याप्रमाणेंच आपआपल्या कर्मांमध्यें नित्य तत्पर राहून स्वधर्माचरणानें आणि वेदशास्त्रांच्या अध्ययनानें अत्यंत शुद्ध व निर्मळ असेच आहां. तरी आमच्याप्रमाणेंच तुम्हांलाहि देवदेवेन्द्र श्रीदत्तात्रेयप्रभु यांचें दर्शन निश्चित होईल. आम्ही ज्या स्तोत्रानें त्रैलोक्याधिपति असलेल्या दत्तात्रेयांची स्तुति केली तें स्तोत्र सर्व मनोरथ पूर्ण करील असें दत्तात्रेयांनीं आश्वासन दिलेलें असल्यामुळें त्याच स्तोत्रानें आपण परमेश्वराची स्तुति करूं या. परमेश्वर दत्तात्रेयांच्या रूपानें पुन्हां दर्शन देतील असा आमचा विश्वास आहे." असें म्हणून ऋषिमुनींनीं सर्व शिष्यांसह व पुत्रांसह वरील स्तोत्रांनीं परमेश्वराचा धांवा करण्यास आरंभ केला. थोड्याच वेळानें दिशा उजळूं लागल्या, प्रकाश फाकला; दिव्य पण सौम्य अशा अलौकिक तेजानें सर्व दिङ्मंगल व्यापून गेलें. या वेळीं सर्व ऋषिजनांनीं, त्यांच्या पुत्रांनीं व शिष्यांनींहि साहजिकच आपले नेत्र अर्ध्या अधिक प्रमाणांत मिटून घेतले. अन्तर्हृदयाकाशांत ते दत्तात्रेयांचें एकाग्र मनानें चिंतन करूं लागले. इतर कोणताहि विषय मनांत न आणतां आपलें मन आपल्या इष्टदेवतेचें चिंतन करण्यांत तन्मय करणें यास ध्यान असें म्हणतात. ध्यानामध्यें ध्येयतत्त्वाशीं मनानें समरस होणें यालाच समाधि असें म्हटलेलें आहे. साधक जसा जसा समाधिअवस्थेंत प्रवेश करतो तशीं तशीं अनेक लक्षणें प्रतीतीला येऊं लागतात. क्वचित् प्रसंगीं अलौकिक दिव्य तेजानें तेवत असलेली दीपज्योति दृष्टीस पडेल तर क्वचित् अनेक दिव्य रूपांचीं

दर्शनें घडतील. शुक्ल, पीत, रक्त आणि नील अशीं तीं रूपें असतील. क्वचित् प्रसंगीं पृथक् पृथक् अनेक सुगंधांचा अथवा संमिश्र अशा अलौकिक सुगंधाचा अनुभव येईल; तर क्वचित् प्रसंगीं भेरी (चौघडा), मृदंग, शंख, बासरी, सनई, समुद्राच्या लाटा, दुंदुभि (नगारा), झांगड (भाकरीच्या आकाराची मोठी झांज), डमरू, तबला, कुडबुडे, कर्णा, घंटा, किनरी, वीणा, घुंगरू, भुंग्याचा आवाज अर्थात् गुंजारव इत्यादि अनेक ध्वनि ऐकूं येतील. हे सर्व ध्वनि देहामध्ये आंतल्या आंतच उमटत असल्यामुळें यांना अनाहत ध्वनि असें म्हणतात. दत्तात्रेयप्रभूंच्या ध्यानामध्यें निमग्न असलेल्या ऋषिजनांना व ऋषिकुमारांना या सर्व गोष्टींचा अनुभव येऊ लागला.

पाहतां पाहतां सर्व विश्वाला व्यापून टाकणाऱ्या दिव्य तेजोमंडलांत दत्तात्रेय-प्रभूंच्या विराट् स्वरूपाचें दर्शन होऊं लागलें. अनेक मूर्ति, अनेक आकृति, असंख्य नेत्र, असंख्य कान, असंख्य मुखें, त्याचप्रमाणे, विविध प्रकारचे हात पाय दिसूं लागले. त्या सर्वांत दत्तात्रेयांचेंच स्वरूप भासत होतें. हत्ती, घोडे, वाघ, सिंह इत्यादि क्रूर पशु आणि हरिणें, ससे, गाई इत्यादि सौम्य प्राणीहि दृष्टीस पडूं लागले. हंस, मोर, कोकिळा, भारद्वाज इत्यादि असंख्य पक्ष्यांचींहि स्वरूपें दिसत होतीं. त्या सर्वांत दत्तात्रेयांचेंच दर्शन घडत होतें. ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आणि त्या सर्वांचे द्वारपाल जय, विजय, नंदी, भृंगी, हंस, गरुड आणि वृषभ त्याचप्रमाणें अष्टदिक्पाल, अष्ट-दिग्गज, अष्टवसु, अकरा रुद्र, बारा आदित्य आणि एकूणपन्नास मरुद्गण म्हणजे वायुदेवता, वड, पिंपळ, पळस इत्यादि असंख्य वृक्ष आणि लतावेली, त्याचप्रमाणें ग्रह, नक्षत्र आणि असंख्य तारागण, सूर्य, चंद्र, अग्नि या सर्वांचीं स्वरूपें दिसत असून त्या सर्वांमध्ये दत्तात्रेयांचें रूप गोंवलेलें दिसत होतें. एकाच काळीं व एकाच स्थळीं दिसत असलेलें परमेश्वराचें हें विराट् स्वरूप पाहणें त्यांना अशक्य झालें. गांगरलेल्या अंतःकरणानें त्यांनीं आपले डोळे पूर्ण मिटून घेऊन वरील स्तोत्रांनीं पुनः परमेश्वराची प्रार्थना केली. त्यांची ही अवस्था पाहून दयासागर असलेल्या दत्ता-त्रेयांना दया आली. आकाशवाणीच्या रूपानें 'भिऊ नका' असें सर्वांना आश्वासन देऊन डोळे उघडा असें सांगितलें. परमेश्वराचा हा आदेश होताच सर्वांनीं आपले डोळे उघडले. परमेश्वरानें आपली माया आवरून सर्वांना सौम्य स्वरूपांत आपल्या नितान्त रमणीय अशा कोमल रूपानें दर्शन दिलें. अष्टमीच्या चंद्राप्रमाणें विशाल भालप्रदेश, कमलदलाप्रमाणें विस्तृत नेत्र, मस्तकावर कुरळे केस आणि देदीप्यमान; रत्नजडित सुवर्णाचा मुकुट, कानांमध्ये तळपणारीं मकराकार कुंडलें, पिकलेल्या तोंडलीच्या फळाप्रमाणें आरक्तवर्ण अधरोष्ठ, सरळ पण अग्रभागी पोपटाच्या चोचीप्रमाणें किंचित वक्र आणि टोंकदार असें चाफ्याच्या कळीप्रमाणें असलेलें नाक, धनुष्याकार भुंवया, कस्तूरी तिलकानें युक्त असें उभें केशरी गंध, स्मित हास्यामुळें किंचित् विकसित झालेल्या अधरबिंबावर प्रतिबिंबित झालेली कुंदाच्या फुलाप्रमाणें शुभ्र असलेल्या दंतपंक्तीची कांति, कंठामध्यें विराजत असलेला कौस्तुभ

मणि, डाव्या खांद्यावरून उजवीकडे कटिप्रदेशापर्यंत लोंबणारें सुवर्णतंतूंचें यज्ञोपवीत, हातांमध्यें क्रमशः चक्र आणि शंख, डमरू आणि त्रिशूळ त्याचप्रमाणें अक्षमाला आणि कमंडलु, कटिभागीं जरीकांठी रेशमी दुपट्टा, पोंवळ्याप्रमाणें आरक्त वर्ण, हातांच्या व पायांच्या बोटांची नखकांति मोत्यांप्रमाणें शुभ्र अशी सर्वांगसुंदर दत्तात्रेयांची मूर्ति पुढें उभी असलेली सर्वांनीं पाहिली. दत्तात्रेयांच्या या सौम्य स्वरूपाचें दर्शन झाल्याबरोबर ऋषींच्या स्त्रियांसह सर्वांना जो आनंद झाला तो त्यांच्या हृदयांत मावत नव्हता. म्हणून कीं काय विकसित झालेल्या नेत्रांच्या व मुखांच्या द्वारां तो बाहेर ओसंडत होता. अंगावर रोमांच उभे राहिले होते. सर्वांनीं उठून उच्च स्वरानें दत्तात्रेय यांचा जयजयकार केला. 'जयजगद्गुरो, जय दत्तात्रेया, जय देवदेवेश्वरा' असा एकच ध्वनि सर्वत्र दुमदुमला. 'जय दत्तदत्त जय दत्तदत्त' या भजनामध्यें तन्मय होऊन ते सर्व आबालवृद्ध ऋषिमुनि आनंदानें नाचूं लागले. सर्वांनीं दत्तात्रेयांच्या चरणीं हात जोडून साष्टांग प्रणिपात केला. दत्तात्रेयांच्या विश्वरूप दर्शनानें व मूलभूत सौम्य स्वरूपाच्या दर्शनानें ते सर्व धन्य झाले.

वरील स्तोत्र अत्यंत प्रभावी आहे. रोज स्नान करून शुचिर्भूतपणानें तुपाचा दिवा लावून देवापुढें बसावें व अर्थाकडे दृष्टि ठेवून हें स्तोत्र सोळा वेळां म्हणावें. सोळा दिवसांतच दत्तात्रेयांचें दर्शन होईल. दत्तात्रेयांचें दर्शन तरी घडेल अथवा दृष्टांतामध्यें आदेश तरी मिळेल.

एकदां ते सर्व ऋषिमुनि आपआपलीं संध्या, होमहवन इत्यादि नित्यकर्मे आटोपून नैमिषारण्यामध्यें शांत चित्तानें बसले असतां अकस्मात् त्या ठिकाणीं सूतांची स्वारी आली. सूतांना पाहिल्याबरोबर सर्वजण उठून उभे राहिले. सूतांचें स्वागत करून त्यांना उच्च आसनावर बसविलें. अर्घ्य, पाद्य, जल, फळें व मुळें समर्पण करून सूतांचा सर्वांनीं सत्कार केला. नम्रपणानें ते शौनकादि ऋषि म्हणाले, "हे सूता, तुम्ही प्रत्यक्ष व्यासमुनींचे शिष्य असून तुमच्यावर दत्तात्रेयांचा मोठा अनुग्रह झालेला आहे. धन्य आहां तुम्ही. खरोखर दत्तात्रेयांनीं कृपा करूनच तुम्हांला आमच्याकडे पाठविलें आहे. तरी दत्तात्रेयांचा सर्व इतिहास आणि लीलाचरित्रें तुम्ही आम्हांला वर्णन करून सांगावींत." शौनकादिकांचें हें म्हणणें ऐकून सूतानें क्षणभर दत्तात्रेयांचेंच ध्यान केलें. दत्तात्रेयांच्या चरणीं वंदन करून सूत म्हणाले, "हे शौनकादि ऋषिजनहो! तुम्ही पुढें ठेवलेला विषय अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याच्या श्रवणानें सर्व दुरितांचा निरास होऊन मानवांना मुक्तीचा लाभ होतो. सर्व दुःखांतून पूर्णपणें जीवाची सुटका होऊन जीवाला नित्य आणि सर्वोत्कृष्ट आनंदाचा लाभ होणें यालाच मुक्ति असें म्हणतात. मी नारायणांच्या व दत्तात्रेयांच्या चरणीं वंदन करून तुम्हीं पुढें ठेवलेल्या विषयाचें यथामति वर्णन करतों."

दत्तात्रेयांचें चरित्र महासागराप्रमाणें अपरंपार आहे. माझी बुद्धि अत्यंत अल्प आहे. मी दत्तात्रेयांच्या अगाध गुणांचें वर्णन करणें म्हणजे मुंगीच्या शेळीनें प्रचंड

कोहळा गिळण्याचा प्रयत्न करण्यासारखेंच होय; अथवा मेरु पर्वताला मोहरीच्या उदरांत दडवून ठेवण्याचा प्रयत्न करण्याप्रमाणें अत्यंत हास्यास्पद आहे. पांगळ्यानें हिमालयाचें उच्च शिखर उल्लंघिण्याचा प्रयत्न करणें यासारखाच माझा हा प्रयत्न हास्यास्पद ठरेल. जीं फळें उंच व धिप्पाड मनुष्यांच्याहि हाती लागत नाहींत तीं फळें अत्यंत ठेंगण्या मनुष्यानें आपल्या हातानें मिळविण्याचा प्रयत्न करणें जसें निरर्थक ठरेल; तसेंच सूर्याच्या प्रकृष्ट प्रकाशांत काजव्यानें आपल्या प्रकाशाचें प्रदर्शन करणें याचप्रमाणें माझा हा प्रयत्न व्यर्थ ठरेल. तथापि दत्तात्रेय प्रभूंच्या चरणीं शरण जाऊन त्यांच्याच कृपेनें मला हा प्रश्न सोडविण्याची शक्ति येईल. असा विचार करून सूतानें दत्तात्रेयांची प्रार्थना केली —

दत्तात्रेय नमस्तेऽस्तु विष्णवे प्रभविष्णवे ।
अनसूयाहृदानंददायिने नंदिरूपिणे ॥ ७ ॥

हे विश्वव्यापनशील दत्तात्रेया, या सर्व विश्वाचा विभव विस्तार तुमच्यामुळेंच झालेला आहे. आपण अनसूयेच्या हृदयाला आनंद तर देताच पण सर्व विश्वालाहि सुखी करता. नंदि शब्दाचा अर्थ सुख असा आहे. हे प्रभो आपण अविनाशी सुख-स्वरूप आहां. मी तुम्हांला नमस्कार करतों.

असें म्हणून सूतानें प्रथम दत्तात्रेयांना नमस्कार केला. नंतर इष्ट देवतांचें व सर्व गुरूंचें स्मरण करून त्यांनाहि नमस्कार केला. त्यानंतर श्रोते असलेल्या नैमिषा-रण्यवासी शौनकादि सर्व ऋषींनाहि नमस्कार केला.

संतोष्याहं महेशानं दत्तात्रेयं जगद्गुरुम् ।
वर्णये महिमानं वः सर्वार्थपरिबृंहितम् ॥

विश्वाचा महान् अधिपति आणि जगाचा गुरु असलेल्या दत्तात्रेयाला संतुष्ट करून, हे मुनिजनहो, मी तुम्हांला सर्वांगपरिपूर्ण असें दत्तात्रेयांचें चरित्र वर्णन करून सांगतों. एकाग्र मनानें व शांत चित्तानें तें तुम्हीं ऐकावें. याप्रमाणें सूतानें सर्व ऋषि-जनांना, ऋषिकुमारांना आणि आश्रमांतील माता-भगिनींना अत्यंत शांत चित्तानें व एकाग्र मनानें दत्तात्रेयांचें चरित्र श्रवण करण्याची नम्र सूचना दिली व नंतर महायोगिराज श्रीदत्तप्रभु यांचें सांगोपांग चरित्र वर्णन करून सांगितलें.

लोककल्याणासाठीं अवधूतरूप धारण करून सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं सोमवंशांतील व सूर्यवंशांतीलहि अनेक राजेमहाराजे यांच्यावर अनुग्रह करून त्यांना राज्यवैभवाच्या उच्च शिखरावर नेऊन पोहोंचविलें आहे. पराजितांना विजय प्राप्त करून दिला. राज्यभ्रष्टांना पुन्हां राज्यपदें प्राप्त करून दिलीं. निपुत्रिकांना पुत्र देऊन त्यांना वंशविच्छेदाच्या भयापासून मुक्त केलें. धनहीनांना श्रीमंत केलें. निर्वंश होण्याच्या अवस्थेंत असलेल्यांच्या वंशवेली मांडवावर नेऊन पोहोंचविल्या

व त्या फलद्रूप केल्या. निरुत्साही लोकांना उत्साही बनविलें. उद्विग्नांचें चित्त प्रसन्न केलें. आळशांना कार्यप्रवण बनविलें. उद्योगहीनांना उद्योगी बनविलें. पामरांना अमरेन्द्राचें वैभव दिलें. मंदमतींना बुद्धिमान केलें. अज्ञजनांना ज्ञानी बनविलें. मूढमति असलेल्यांना आत्मसाक्षात्कारी केलें. पाखंड्यांना धर्मनिष्ठ बनविलें. नास्तिकांना आस्तिक केलें. चुकलेल्यांना मार्गदर्शन केलें. भ्रांतांचा मतिभ्रंश घालविला. अधन्यांना धन्य केलें. याचकांचे सर्व मनोरथ पूर्ण करून त्यांना तृप्त केलें.

सर्वेऽपि सुखनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ।।

सर्वांनींहि सुखी असावें, सर्वांनीं निरोगी असावें, सर्वांचें कल्याण व्हावें आणि कोणीहि दुःखी नसावें हा दत्तात्रेयांचा चार कलमी कार्यक्रम यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठींच ते सतत प्रयत्नशील असत. हीं चार कलमें म्हणजे अवधूतशिरोमणि भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या जीवनांतील चतुःसूत्रीच होय.

## दत्तात्रेयांचा अनुयायी वर्ग

ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असलेल्या सनकसनंदनापासून विद्यमान कालांतील अन्त्यज वर्गापर्यंत सर्व लोकांनीं दत्तात्रेयांचें अनुयायित्व स्वीकारलें असल्याचें दत्तात्रेयांच्या इतिहासांत आपल्याला पाहावयास सांपडतें. भारतांत प्रचलित असलेल्या बऱ्याचशा सांस्कृतिक संप्रदायांपैकीं कांहीं संप्रदाय दत्तसंप्रदायालाच प्रत्यक्षपणें अनुसरतात; तर कांहीं संप्रदाय अप्रत्यक्षपणें दत्तात्रेयांच्या संप्रदायाला अनुसरणारे आहेत. उदाहरणार्थ, गिरि, पुरी, उदासी, भारती, दशनामी, गोसावी इत्यादि संप्रदाय दत्तात्रेयांना आपलें प्रत्यक्ष आराध्य दैवत मानतात; तर नवनाथसंप्रदायांतील आणि महानुभाव संप्रदायांतील लोक आदिनाथ भगवान् शंकर आणि भगवान् श्रीकृष्ण यांना आराध्यदैवत मानून शंकराच्या आज्ञेनें आणि श्रीकृष्णाच्या साहचर्यानें दत्तात्रेयांचीहि आराधना करीत असतात. कांहीं संप्रदायांत देवीच्या, पांडुरंगाच्या अथवा श्रीगणपतीच्या आराधनेबरोबरच श्रीदत्तात्रेयांचीहि आराधना ते करीत असतात. श्रीसंत एकनाथमहाराज यांची प्रधान उपास्यदेवता श्रीकृष्ण आणि देवी असून गुरुपरंपरेनें दत्तात्रेयांचीहि उपासना ते करीत असतात. श्रीदासोपंत व त्यांचे अनुयायी इष्ट देवता म्हणून दत्तात्रेयांची उपासना करतात तर कुलदेवता म्हणून देवीचीहि उपासना ते करीतच असतात. स्वतः भगवान् दत्तात्रेय हे देवीचेच उपासक असल्याचें दिसून येतें. भार्गवकुलोत्पन्न भगवान् श्रीपरशुराम यांना श्रीविद्येची अर्थात् श्रीललितामहात्रिपुरसुंदरीदेवीची उपासना दत्तात्रेयांनींच दिलेली असल्याचें परशुरामकल्पसूत्र या तांत्रिक ग्रंथावरून दिसून येतें. मुंबईजवळील कुल्यचि श्रीसंतत्र्यंबकरायमहाराज हे तर वरवर पाहतां गणेशभक्त पण त्यांनीं स्वतः गणेशरूपानें दत्तात्रेयांचीच उपासना केल्याचें दिसून येतें. पुणें येथील कसबा पेठेंत असलेलें पुरातन

त्रिशुंड गणपतीचें मंदिर पाहा. तेथील त्रिशुंड गणपतीची मूर्ति दत्तात्रेयांच्याच स्वरूपाची साक्ष देत आहे. याप्रमाणें भगवान् दत्तात्रेय हे अनेक देवतांच्या रूपानें नटले असल्यामुळें अनेक देवतांचे भक्त दत्तात्रेयांचेच अनुयायी झालेले आहेत. शिव आणि विष्णु हीं दोन दैवतें तर दत्तात्रेयांच्याच स्वरूपांत अंतर्भूत झालेलीं असल्यामुळें शिवभक्त आणि विष्णुभक्त हे दत्तात्रेयांच्याच अनुयायी वर्गांत समाविष्ट होतात. आदिसिद्ध भगवान् दत्तात्रेय हे एक महान् व अनुपम सिद्धपुरुष अथवा सिद्धराजच असल्यामुळें योगाभ्यास करूं इच्छिणारे अनेक साधकहि दत्तात्रेयांचे भक्त व अनुयायी बनले.

दत्तात्रेयांच्या स्वभावाचें स्वरूप पाहवयाचें झाल्यास तें आद्य शंकराचार्यांच्या आनंदलहरींतील खालीं दिलेल्या श्लोकांत पाहवयास सांपडेल.

मौने मौनी गुणिनिगुणवान् पण्डिते पण्डितश्च
दीने दीनः सुखिनि सुखवान् भोगिनि प्राप्तभोगः ।
मूर्खे मूर्खो युवतिषु युवा वाग्मिनि प्रौढवाग्मी
धन्यः कोऽपि त्रिभुवनजयी योऽवधूतेऽवधूतः ॥

मौन व्रत धारण करणाऱ्या एखाद्या मौनी मनुष्याजवळ दत्तात्रेय गेले तर तेहि त्याच्या जवळ मौनच धारण करून बसतील. कांहीं खाणाखुणा करून सांकेतिक रूपानें त्यांच्यांत कांहीं संभाषण झालें तर तें त्यांच्या मौनाला बाध आणूं शकत नाहीं. तात्पर्य, दत्तात्रेय हे "मौने मौनी" अशाच थाटानें वागत होते. "गुणिनि गुणवान्"—कोणी बहुगुणी मनुष्य भेटला तर दत्तात्रेय हे त्याच्यापेक्षां आपल्याजवळ कितीतरी अधिक गुण आहेत असेंच आपलें स्वरूप दाखवतील. मात्र त्याच्या मनाला धक्का लागूं देणार नाहींत. "पंडिते पण्डितश्च" पंडित म्हणजे एखाद्या शास्त्राचा सखोल अभ्यास केलेला चतुर शास्त्रज्ञ. अशा मनुष्याजवळ दत्तात्रेय गेले तर आपणहि त्या शास्त्राचा गाढ अभ्यास केलेला आहे ही गोष्ट त्याच्या मनाला न दुखवितां त्याच्या प्रतीतीला आणून देतील. त्यामुळें नाना व्याधींनीं ग्रस्त झालेले लोक तसेच भूत-प्रेत-पिशाचबाधा अथवा शत्रूंनी केलेल्या अभिचारकर्माला जारण-मारण-उच्चाटन इत्यादि प्रयोगाला बळी पडून पीडित झालेले लोक दत्तात्रेयांना शरण जाऊन स्वतःला सर्व संकटांतून मुक्त करून घेत असत. दत्तात्रेयांच्या प्रभावानें सर्व उपचारांना लवकरच गुण येत असल्यामुळें विविध समाजांतील पुष्कळच लोक दत्तात्रेयांचे अनुयायी बनत असत.

दत्तात्रेय हे वीतराग अवधूत असल्यामुळें त्यांना कोणत्याच गोष्टीचा संग्रह करण्याची तिळमात्रहि गरज भासत नसे. ते अत्यंत निःस्पृह असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं परिस्थितिमूलक, जातिमूलक, वयोमूलक अथवा लोभमोहादि विकारमूलक कोणत्याहि प्रकारचा भेदभाव नसल्यामुळेंच ते सर्व लोकांना अत्यंत प्रिय वाटत होते.

याच कारणानें समाजांतील सर्व थरांचे बहुसंख्य लोक त्यांचे भक्त बनत गेले व त्यांचा अनुयायी वर्ग संख्येनें खूपच मोठा होत गेला. भगवान् श्रीकृष्ण सोडून इतर कोणत्याहि देवतेमध्यें सर्वसामान्य जनांना आपल्याकडे आकृष्ट करून घेणारे मोहक गुण पहावयास सांपडत नाहींत; म्हणून इतर सर्व देवतांपेक्षां दत्तात्रेयांचा अनुयायी वर्ग समाजांतील सर्व थरांत बहुसंख्येनें निर्माण होणें हें स्वाभाविकच आहे.

"पानी तेरा रंग कैसा ? जिसमें मिलावो वैसा" असाच दत्तात्रेयांचा स्वभाव असल्यामुळें दत्तात्रेयांचा कोणाशीं विरोध नाहीं व कोणाचा दत्तात्रेयांशींहि विरोध नाहीं. पाण्याचा ज्या द्रव्याशीं संबंध येईल त्या द्रव्याशीं तें तर विरोध करीत नाहींच उलट ज्या द्रव्यामध्यें पाणी मिसळावें त्या द्रव्याचा गुणधर्मच तें वाढवीत असतें. याच अभिप्रायानें ज्या औषधाला कांहीं अनुपान नसेल तें औषध पाण्याबरोबरच घ्यावयाचें सांगितलेलें असतें. याच अभिप्रायानें आयुर्वेदामध्यें पाण्याला "योगवाहि" असें म्हटलेलें आहे. ज्या ज्या औषधाबरोबर योजना करावी त्या त्या औषधाचे उपयुक्त गुणधर्म वाढविणाऱ्या द्रव्याला "योगवाहि" असें म्हणतात. दत्तात्रेयांचा स्वभाव योगवाहीच आहे. जो जो त्यांच्या संपर्कांत येईल त्याच्या त्याच्या स्वभावामध्यें योग्य गुणधर्माची ते वाढच करीत असतात.

पाणी हें चराचर विश्वाचें जीवन असल्यामुळें पाणी आणि जीवन हे दोन्ही शब्द कोशामध्यें पर्यायवाचक असल्याचें सांगितलें आहे. दीनांचे दयाळू व गरिबांचे कनवाळू भगवान् दत्तात्रेय हे जगाचें जीवनच आहेत यांत संशय नाहीं. याच दृष्टीनें त्यांचें अनुयायित्व अनेक सांप्रदायिकांनीं स्वीकारलेलें आहे.

दत्तात्रेय हे सर्वांना प्रिय असल्यामुळें कोणीं असें समजूं नये कीं, ते 'गंगा गये गंगादास जमना गये जमनादास' अशा स्वरूपाचे होते. त्यांना स्वतःचें विशिष्ट स्वत्व असें कांहीं नव्हतें, अशी कल्पना कोणी करील, तर तें अगदींच चूक ठरेल. दत्तात्रेयांचें असाधारण स्वत्व त्यांच्या चरित्रांत ठिकठिकाणीं प्रभावीपणें उमटलेलें पाहवयास सांपडतें. साऱ्या त्रैलोक्याला पादाक्रांत करून इंद्रासह सर्व देवांना ज्यानें जिंकलें, देवांचें सारें वैभव हिरावून घेऊन सर्व देवांना ज्यानें देशोधडीस लावलें त्या जंभासुराचा त्याच्या अनुयायांसह दत्तात्रेयांनीं क्षणभरहि हातांत शस्त्र न धरतां मोठ्या युक्तीनें चुटकीसरसा नाश करून टाकला; त्या दत्तात्रेयांना स्वतःचें स्वत्व नाहीं हें म्हणणें अत्यंत अविवेकाचें लक्षण ठरेल.

सप्त द्वीपांचा अधिपति अथवा नवखड पृथ्वीचा सार्वभौम सम्राट राजा कार्तवीर्य सहस्रार्जुन याच्यावर अनुग्रह करून त्याला वैभवाच्या परमोच्च पदावर नेऊन पोहोंचविलें आणि तो उन्मत्त होताच परशुरामाकडून त्याचा समूळ नाशहि करून टाकला. हें आपलें निर्विवाद निग्रहसामर्थ्यहि दत्तात्रेयांनीं दाखवून दिलें असतां केवळ त्यांच्या कनवाळू स्वभावामुळें त्यांना स्वतःचें स्वत्व नाहीं असें म्हणणें हें एक अविवेकमूलक धाष्टर्याचेंच लक्षण ठरणार नाहीं काय ? तात्पर्य, श्रीदत्तात्रेयप्रभु

हे स्वत्वहीन नसून त्यांच्या स्वत्वाचें कांहीं आगळेंच वैशिष्टच होतें, हेंच कोणालहि मान्य करावें लागेल. तात्पर्य, अशा निग्रहानुग्रहसमर्थ असलेल्या दत्तदेवाचें अनुयायित्व अनेकांनीं स्वीकारलें हें एक त्यांचें स्वाभाविकच कृत्य आहे.

## कार्तिकस्वामी आणि सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय

भगवान् श्रीशंकर आणि पार्वती यांचे पुत्र आणि वयाच्या सातव्या दिवशींच तारकासुराचा वध करणारे श्रीकार्तिकस्वामी यांना उद्देशून स्कंद, कुमार आणि षडानन अशींहि नांवें योजिलीं जातात. त्यांचें विशिष्ट अलौकिक व दिव्य सामर्थ्य लक्षांत घेऊन देवांनीं बालपणींच त्यांना देवांचें सेनापतिपद बहाल केलेलें होतें. म्हणून त्यांना सेनानी अथवा देवसेनापति याहि नांवांनीं संबोधिलें जातें.

पुढें सेनापति आणि गणपति दोघेंहि वयांत आल्यानंतर त्यांच्या विवाहाचा प्रश्न पुढें आला तेव्हां ते दोघेंहि "माझें लग्न अगोदर झालें पाहिजे, माझें लग्न अगोदर झालें पाहिजे," असें म्हणत अहमहमिकेनें पुढें आले व मी मी म्हणत भांडूं लागले. शंकर आणि पार्वती यांच्यापुढें मोठा पेंचप्रसंग निर्माण झाला. 'दोघेंहि आपलींच मुलें. त्यांची समजूत कशी काढावी व हें भांडण कसें मिटवावें असा ते विचार करीत असतां एक तडजोडीची युक्ति निघाली. शंकर म्हणाले, "तुम्हां दोघांपैकीं जो अगोदर पृथ्वीप्रदक्षिणा करून येईल त्याचें लग्न अगोदर केलें जाईल." ही तडजोड सर्वांना मान्य झाली. कार्तिकस्वामी मनांत म्हणाले, "हा गणपति स्वतः तुंदिलतनु. याचें वाहन मूषक म्हणजे उंदीर. हा काय पृथ्वीप्रदक्षिणा करणार? माझें वाहन मोर आहे. तो गरुडाप्रमाणें भरारी मारून चटकन् परत येईल व माझें लग्न निश्चितच अगोदर होईल." असें म्हणून कार्तिकस्वामी मोरावर बसून पृथ्वीप्रदक्षिणेला निघाले. गणपतीहि उंदरावर बसून निघाले.

गणपति हे सिद्धीचे व बुद्धीचे अधिपति असल्यामुळें ते अत्यंत बुद्धिमान् होते. रस्ता चालतां चालतां थोडच्याच अंतरावर जाऊन त्यांनीं विचार केला कीं, 'पृथ्वी ही अत्यंत विशाल आहे. माझें वाहन असलेला मूषक म्हणजे उंदीर हा अत्यंत लहान आहे. तेव्हा आपल्या हातून पृथ्वीची प्रदक्षिणा होणें अशक्य आहे.' असा विचार करून ते तावडतोब परतले आणि कैलासपर्वतावर जेथें शंकर आणि पार्वती हीं दोघें बसलीं होतीं तेथें आले. त्यांनीं तावडतोब माता पार्वती आणि पिता भगवान् शंकर यांना प्रदक्षिणा घातली व साष्टांग नमस्कार केला. हात जोडून पुढें उभे राहिले आणि म्हणाले, 'झाली माझी पृथ्वीप्रदक्षिणा. आतां माझें लग्न लवकर करून द्या.' भगवान् शंकर म्हणाले, "अरे, आतांच तूं पृथ्वीप्रदक्षिणेला निघाला होतास. मग तुझी पृथ्वीप्रदक्षिणा इतक्या लवकर कशी संपली?" यावर गणपतिबाप्पा म्हणाले, "बाबा, तुम्हींच आईला नुकतीच एक आचारसंहिता शिकविली. त्यांत तुम्हीं असें

सांगितलें आहे कीं, जो कोणी आईवडिलांना प्रदक्षिणा घालून नमस्कार करतो, त्याला पृथ्वीप्रदक्षिणा केल्याचें श्रेय मिळतें. मी त्याप्रमाणें तुम्हांला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला आहें. तेव्हां माझी पृथ्वीप्रदक्षिणा पूर्ण झाली. नाहीं म्हणाल तर तुम्ही खोटें बोललां असें सिद्ध होईल. 'नानृतात्पातकं परम्' अशी तुमचीच शिकवण आहे. तर मग आतां माझें लग्न करून द्या." हें गणपतीचें म्हणणें ऐकून शंकर आणि पार्वती आश्चर्यचकित झाले. आणि त्यांना गणपतीचें लग्न अगोदर करून देणें भाग पडलें. गणपतीचा विवाह थाटामाटांत साजरा झाला. पाठीमागून कांहीं दिवसांनीं कार्तिकस्वामींची स्वारी पृथ्वीला प्रदक्षिणा घालून कैलासपर्वतावर परत आली. तेव्हां त्यांना सारा वृत्तांत समजला.

गणपतीचें लग्न आपल्या अगोदर झालेलें ऐकून ते देवांचे सेनापति रुसले आणि क्रौंच पर्वताच्या गुहेंत जाऊन बसले. सेनापति नसल्यामुळें देवसैन्यांत औदासीन्य पसरलें. दैत्यांबद्दलची मूर्तिमंत भीति देवांच्या समोर उभी राहिली. अशा स्थितींत निर्वाणीचा सखा एकच एक दयासागर सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना सोडून दुसऱ्या कोणाला शरण जाणार ?

जंभासुराकडून पीडित झालेले इंद्रादि देव दत्तात्रेय यांना शरण गेले आणि दुःखांतून मुक्त झाले. राजा अलर्क दत्तात्रेयांनाच शरण गेला आणि दुःखांतून मुक्त झाला. दुःखी असलेला आयु राजा दत्तात्रेयांनाच शरण गेला आणि दुःखांतून मुक्त झाला. प्रल्हाद, यदु, नहुष इत्यादि सार्वभौम राजेंहि दत्तात्रेयांनाच शरण गेले व दुःखातून मुक्त झालेले आहेत. मग आपणहि त्याच दत्तात्रेयांना शरण जाऊन या संकटांतून मुक्त व्हावें असा सर्व देवांनीं विचार केला व ते दत्तात्रेयांना शरण गेले. हात जोडून त्यांनीं दत्तात्रेयांची स्तुति केली –

नमो नमः कारणविग्रहाय स्वरूपतुच्छीकृतविग्रहाय ।
विज्ञानधाम्ने सुरसिद्धसाध्यनिषेविताङ्घ्रेऽनुग्रहाण भक्तान् ।।

हे सद्गुरु दत्तात्रेया, आपण भक्तजनांना संकटांतून मुक्त करण्याकरितांच विग्रह म्हणजे देह धारण केलेला आहे. आपण स्वरूपतः आपल्या उपस्थितीनेंच भक्तांच्या संकटांना दूर करतां. हे परमेश्वरा, आपण विज्ञानाचें म्हणजे आत्मसाक्षात्काराचें धाम म्हणजे अधिष्ठान आहांत. सुर म्हणजे देव, सिद्ध, साध्य, गंधर्व इत्यादिकांनीं ज्याच्या चरणकमलाचा आधार घेतलेला आहे ते तुम्ही आम्हांला प्राप्त झालेल्या या संकटांतून मुक्त करा. कार्तिकस्वामींचा रुसवा काढून त्यांनीं आपलें कर्तव्य पार पाडावें असा त्यांच्यावर अनुग्रह करा. दत्तात्रेय म्हणाले, 'देवहो ! तुम्ही निश्चितपणें आपआपल्या स्थानाला जा. मी कार्तिकस्वामीचा रुसवा काढून पूर्ववत् तो तुमचें सर्व कार्य करील व दैत्यांच्या भीतीपासून तुम्हांला मुक्त करील अशी व्यवस्था करतों.' असें आश्वासन देऊन सद्गुरु दत्तात्रेय क्रौंच पर्वतावरील गुहेंत गेले आणि

त्यांनीं अध्यात्मज्ञानाचा उपदेश करून कार्तिकस्वामींचा रुसवा काढला व सर्व देवांना दैत्यांच्या भीतींतून सोडविलें.

क्रौंच पर्वतावर जाऊन भगवान् दत्तात्रेय म्हणाले, हे कार्तिकस्वामिन् षडानना ! तूं फार रुसला आहेस आणि येथे येऊन बसला आहेस. अरे! जरा विचार तरी कर. सुविचारानेंच मनुष्य सुखी होऊं शकतो. सुविचारानेंच मनुष्याला देवपण येऊं शकतें. सुविचारानेंच सर्व संकटांवर मात करतां येते. सुविचारानेंच जगांत मोठेपणा मिळूं शकतो. सुविचारानेंच मनुष्य संपन्न बनतो. सुविचारानेंच तो नेता बनतो. सुविचारानेंच तो विजयी बनतो. सुविचारानेंच तो लोकप्रिय बनतो. सुविचारानेंच तो धन्य होतो. सुविचारानेंच सर्व जीवन आनंदमय व यशस्वी होऊं शकतें.

हे षडानना ! तूं कोणावर रुसला आहेस आणि कां रुसला आहेस हें मला सांग.

आत्मानमेव वीक्षस्व आत्मानं बोधय स्वकम् ।
स्वमात्मानं स्वयं भुङ्क्ष्व स्वस्थो भव षडानन ।।

बाळा षडानना, उगीचच तूं इतका चिंतामग्न झालेला आहेस. अरे तूं प्रथम स्वतःचाच विचार कर. तूं स्वतःचेंच रूप नीट ओळखून घे. तूं स्वतः आत्मस्वरूपाच्या यथार्थ साक्षात्कारानें होणारा आनंद स्वतःच अनुभव; म्हणजे स्वतःच जाणून घे. त्यामुळें तुझ्या मनाला स्वस्थता वाटेल. आत्मस्वरूपाच्या यथार्थ साक्षात्काराशिवाय मनाला केव्हांहि शांतता अथवा स्वस्थता लाभूं शकत नाहीं.

हे कुमारा षडानना ! आत्मज्ञान हेंच एक सर्व प्रकारच्या शांतीचें निःसंदिग्ध साधन आहे. असेच प्रश्न शंकराचार्यांनी एका साधकाला विचारून त्याला आत्म-साक्षात्कार करून दिलेला आहे. आचार्य म्हणतात –

कस्त्वं कोऽहं कुत आयातः का मे जननी को मे तातः ।
इति परिभावय सर्वमसारं विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम् ।।
– चर्पट० १२

तूं कोण आहेस ? मी कोण आहे ? अरे साधका, तूं आपल्याशींच विचार कर. मला जन्म देणारी आई कोण आहे ? वडील तरी कोण आहेत ? मी कोठून आलों आहें आणि मला कोठें जावयाचें आहे ? या सर्व गोष्टींचा विचार कर. विचारा-अंतीं तुला असें आढळून येईल कीं, हें सर्व असार आहे. यांत कांहीं तथ्य नाहीं. या सर्व विश्वाकडे पाहिलें असतां स्वप्नांत दिसणाऱ्या सृष्टीपेक्षां तत्वतः सत्य असें कांहींच दृष्टीस पडत नाहीं. म्हणून या विश्वाला असार असें म्हटलेलें आहे. असार शब्दाचा अर्थ तथ्यविरहित म्हणजेच खोटें असा आहे. ज्याला सर्व दुःखांतून व चिंतेंतून मुक्त व्हावयाचें असेल त्यानें प्रथम 'मी'चाच विचार करावयास पाहिजे. आपण व्यवहारांत नेहमीं 'मी मी' असा उल्लेख करीत असतों. 'मी जेवलों,' 'मी झोंपलों,' 'मला आनंद वाटला' या सर्व वाक्यांत आपण मी मी असा उल्लेख केलेला

आहे, तो मी कोण याचा आपण कधीं विचार केला आहे काय ? हात, पाय, कान, नाक व डोळे यांपैकीं कोणी मी आहे काय? विचारांतीं असें आढळून येईल कीं, हे सर्व देहाचे अवयव आहेत अथवा इंद्रियें आहेत. एखाद्या अपघाताच्या प्रसंगीं आपला अवयव तुटला अथवा नाहींसा झाला तर तेवढ्यानें मी नष्ट होत नाहीं. हात-पाय गेले तरी चालतील पण मी मात्र जिवंत असावें असेंच आपण म्हणत असतों. यावरून अवयव अथवा इंद्रियें यांच्याहून मी कोणीतरी निराळा आहें ही गोष्ट सहजच लक्षांत घेतां येतें. तसेच देहालाहि पण मी म्हणतां येत नाहीं. माझें घर, माझें शेत या व्यवहारांत घर आणि शेत यांच्याहून मी कोणीतरी निराळा आहे हें जसें दृष्टोत्पत्तीस येतें त्याचप्रमाणें 'माझा देह' असाहि आपण व्यवहार करीत असल्यामुळें मी देहाहून निराळा आहे ही गोष्ट सहजच लक्षांत येते. हाच न्याय प्राण, मन आणि बुद्धि यांच्याहि बाबतींत लक्षांत घ्यावा. जन्म आणि मरण हे देहाला असतात. या देहांत नांदणाऱ्या मीला जन्महि नाहीं आणि मरणहि नाहीं. ज्यांना आपण जननीं अथवा जनक म्हणतों ते ह्या देहाचे जननी अथवा जनक असतात. मी चा तत्त्वतः त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं; हें पूर्ण सत्य आहे.

ज्याच्यामुळें ह्या देहाची अथवा इंद्रियांची हालचाल होते आणि सुखदुःखें प्रतीतीला येतात त्याला आत्मा असें म्हणतात. तोच मी आहें. जसा जसा तूं विचार करशील तसें तसें हें कोडें उलगडत जाईल व तुला मी कोण आहे ही गोष्ट सुस्पष्टपणें कळून येईल. मग तुझी चिंता मावळेल व तुला पूर्ण स्वास्थ्य मिळेल.

बाळा षडानना ! हा आत्मा स्वतः जन्ममरणरहित व सुखदुःखरहित आहे. त्याला कोणी शत्रु-मित्र नसतात व आप्तेष्टांचाहि तत्त्वतः त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं.

न मानसं कर्म शुभाशुभं मे न कायिकं कर्म शुभाशुभं मे ।
न वाचिकं कर्म शुभाशुभं मे ज्ञानामृतं शुद्धमतीन्द्रियोऽहम् ।। १८ ।।

ज्याच्या योगानें स्वभावतः जड असलेल्या देहाला, अवयवांना, इंद्रियांना, प्राणांना, मनाला आणि बुद्धीला आपआपलें कार्य करण्याची प्रेरणा मिळते आणि सामर्थ्यहि मिळतें तो आत्मा शुद्ध चैतन्यरूप आहे. या चैतन्याला चिच्छक्ति असें म्हणतात. हा आत्मा अनंत आणि आकाशासारखा सर्वव्यापी आहे. त्यालाच आपण मी मी असें म्हणत असतों. देह, इंद्रियें आणि मन यांच्याकडून होणाऱ्या कोणत्याहि बऱ्यावाईट कर्मांचा आत्म्याशीं संबंध नसल्यामुळें मानसिक कर्मापासून मी म्हणजे आत्मा अलिप्त आहे. त्याचप्रमाणें देहाकडून घडणाऱ्या कोणत्याहि शुभाशुभ कर्मांचा माझ्याशीं कांहीं संबंध नाहीं. त्याचप्रमाणें वाचेकडून उच्चारल्या जाणाऱ्या बऱ्यावाईट शब्दांचाहि माझ्याशीं तत्त्वतः कांहीं संबंध नाहीं. मी शुद्ध ज्ञानस्वरूप, आनंदस्वरूप आणि इंद्रियातीत केवल सत्स्वरूप आहे.

अखण्डाकाशरूपोऽस्मि ह्यखण्डाकारमस्म्यहम् ।
प्रपञ्चमुक्तचित्तोऽस्मि प्रपञ्चरहितोऽस्म्यहम् ।।

हे षडानना ! तूं आपल्याशींच विचार करून पाहा. तुला असें आढळून येईल कीं, मी अवयवरहित असल्यामुळें माझें रूप आकाशाप्रमाणें अखंड आहे. माझा आकार कोठेंच खंडित झालेला नाहीं. प्रपंचाचा माझ्याशीं कांहीं संबंध नाहीं. संसार-प्रपंचा-पासून माझें चित्त सर्वस्वीं मुक्त आहे. मी प्रपंचरहित आहें. तूं काय किंवा मी काय आपला कोणाशींच संयोगहि नाहीं व वियोगहि नाहीं. तूं कोणी निराळा नाहींस. मीहि कोणी निराळा नाहीं. जगहि कोणी निराळें नाहीं. हे सर्व केवळ आत्माच आहे. 'आत्मैवेदं सर्वम्' या शब्दस्पर्शादि विषयांचा तुझ्याशीं कांहीं संबंध नाहीं. तूं कोणी नाहींस. मी कोणी नाहीं व हें जगहि कांहीं नाहीं. अथांग आणि अपरंपार सागराप्रमाणें आत्माच सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे. तोच परम सत्य आहे, आणि तोच आत्मा तूं आहेस. मग तूं विनाकारण कां चिंता करीत आहेस ? व्यर्थ कां दुःख भोगीत आहेस ? तरी या सर्वांबद्दलची आसक्ति सोडून दे आणि सुखी हो. हें सर्व विश्व ब्रह्मस्वरूप आहे. अर्थात् आत्मस्वरूपच आहे. नांवें आणि रूपें हीं काल्पनिक असल्यामुळें तीं खोटीं आहेत. त्यांत तूं गुंतूं नकोस. स्वप्नांतील सृष्टि, व्यवहार आणि सुखें व दुःखें हीं जशीं खोटीं असतात. त्याचप्रमाणें जागृत अवस्थेंतील व्यवहार आणि सुखें हींहि सर्व खोटींच असतात, हें निश्चित लक्षांत घे. वृथा चिंता करूं नकोस आणि दुःखहि भोगूं नकोस. जसा जसा तूं विचार करशील तसें तसें तुला हें कळून येईल. ऊठ. आपल्या प्राप्त कर्तव्यकर्माच्या मार्गाला लाग. यांतच तुझें कल्याण आहे. — दत्तात्रेयांचा हा उपदेश ऐकून कार्तिकस्वामींनीं उठून दत्तात्रेयांना नमस्कार केला.

भवताऽनुगृहीतोऽस्मि करिष्ये वचनं तव ।

असें म्हणून दत्तात्रेयांना साष्टांग प्रणिपात केला आणि पूर्ववत् देवांचें सेनापतिपद स्वीकारून ते आपल्या कार्याला लागले.

हा सर्व उपदेश अवधूतगीता या ग्रंथांत ग्रथित केलेला आहे. अधिक जिज्ञासूंनीं श्री. मारुति नारायण पवार यांनीं प्रकाशित केलेला स्वामी व श्रीचंद्रानंदसरस्वति यांनीं मराठींत अनुवादित केलेला अवधूत गीता हा ग्रंथ अवश्य पहावा. त्यांतल्या त्यांत हा मराठी अनुवाद उत्तम आहे.

## भक्तिमार्गाचे आद्य प्रवर्तक भगवान् श्रीदत्तात्रेय

यद्यपि आदिनाथ भगवान् श्रीशंकर यांच्याकडूनच भक्तिमार्गाचा उगम झालेला इतिहासांत पाहावयास सांपडतो, तथापि सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या-वरच श्रीशंकरांनीं ही कामगिरी पुढें सोंपविलेली असल्यामुळें भगवान् श्रीदत्तात्रेय यांनींच योगमार्गाबरोबर भक्तिमार्गालाहि चालना दिली व सनक-सनंदनादिकां-

पासून अनेक ऋषिमुनींना या संप्रदायाकडे वळविलें. याच हेतूनें आम्हीं वर दत्तात्रेयांना भक्तिमार्गाचे आद्य प्रवर्तक असें म्हटलेलें आहे.

पूर्वी शांडिल्य या नांवाचे एक नामवंत ऋषि होऊन गेले. ते वेद, वेदांगें व शास्त्रें यांत पारंगत होते. आश्रमधर्माचें काटेकोरपणें नित्य परिपालन करून ते आपलें जीवन सफल करण्याचा प्रयत्न करीत होते. ते सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांची एकनिष्ठ सेवा करीत असत. ज्ञानयुक्त वैराग्य व संन्यास यांचा आश्रय करूनहि त्यांना योग्य तें समाधान लाभेना. चारहि वेदांत तर्क चालवूनहि त्यांना विद्या म्हणजे जगांतील सद्वस्तूंचे अर्थात् सत्याचें ज्ञान सांपडेना. सत्य म्हणजे काय ? हें विश्व सत्य आहे काय ? का या विश्वाच्या पलीकडे आणखी कांहींतरी सत्य निराळें आहे ?— असा त्यांच्या बुद्धींत गोंधळ उत्पन्न झाला. शेवटीं गुरूवांचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून समाधान नाहीं ही गोष्ट लक्षांत घेऊन ते महामति अथर्व ऋषींच्या जवळ गेले; आणि नम्रपणें हात जोडून म्हणाले, “ महाराज ! मला आपण ब्रह्मविद्येचा उपदेश करा. त्याशिवाय मला आत्यंतिक कल्याणाचें दुसरें साधन दिसत नाही. ” ही शांडिल्यांची विनंति ऐकून अथर्वमुनि म्हणाले, “ बा शांडिल्यमुने, ती विद्या, त्यागपूर्वक श्रद्धा, भक्ति व ध्यान यांचा अवलंब केल्याशिवाय प्राप्त होत नाहीं. ब्रह्म हेंच त्रिकाला-बाधित म्हणजे तिन्ही त्रिकाळ स्वस्वरूपानें विराजणारें असून त्याचा कधींहि नाश होत नाहीं. असें असल्यामुळें तेंच पूर्ण सत्य आहे. तेंच जगद्रूप भ्रमाचें अधिष्ठान व साक्षी आहे. त्यालाच सत् असें म्हणतात. तें इंद्रियांनीं होणाऱ्या ज्ञानाच्या पलीकडचें आहे. द्रष्टा, दर्शन व दृश्य, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय इत्यादि त्रिपुटीच्या पलीकडचें असून तें स्वयंप्रकाश आणि केवळ अनुभवानेंच लक्षांत येण्यासारखें आहे. देश-कालवस्तूंनीं अमर्यादित असें तें एकच एक अनंत आहे. सत्य, ज्ञान व अनंत अशीच ब्रह्माची व्याख्या केली आहे. त्यालाच भगवान् श्रीकृष्ण, दत्तात्रेय, पांडुरंग, श्रीहरि, गजानन अथवा जगदंब इत्यादि नांवांनीहि ओळखतात. हेंच परमात्मतत्त्व निरंतर भेदरहित व अद्वितीय असें आहे. ‘तत्त्वमसि’ या महावाक्यांतील तत् पदानें अभि-प्रेत असलेलें जें हें ब्रह्म त्यांतच हा सर्व विश्वप्रपंच ओविलेला असून तो यांच्याच आधारानें आहे. तेव्हां तें एक जाणलें म्हणजे हें सर्व जाणल्यासारखें होतें. परब्रह्म आणि जीवचैतन्य यांच्यामध्यें ऐक्य दर्शविण्यासाठींच निराळें निमित्तकारण व उपादानकारण मानलेलें नाहीं. प्रकृति आणि अधिष्ठाता एकच आहे, अशी त्याची प्रतिज्ञा वेदांमध्यें सांगितलेली आहे. याच कारणामुळें त्या एकाचें ज्ञान झालें असतां सर्वांचें ज्ञान होतें हेंहि वेदांचें म्हणणें बरोबर ठरतें. हें अखंड परब्रह्म म्हणजे जो विश्व उत्पन्न करून त्याचें रक्षण व लय करतो तो सर्वांतरात्मा, सर्वज्ञ, योगैकगम्य म्हणजे योगांच्याच अभ्यासानें प्रत्यक्ष होणारा परमेश्वर हाच सर्वांतर्गत ईश्वर तत्पदाचा वाचक आहे. अहंकारयुक्त जीव हा त्वं पदाचा वाच्यार्थ आहे. या दोहोंतील सर्वज्ञता आणि सर्वशक्तिमत्ता त्याचप्रमाणें अल्पज्ञता व अल्पशक्तिमत्ता यांच्या विरोधाचा

लक्षणेनें परिहार करून चिदात्मरूप ऐक्याचें ज्ञान मिळवावें आणि अपरिच्छिन्न शुद्ध-चैतन्यस्वरूप होऊन राहावें. याप्रमाणें श्रवणादि साधनांनीं चित्ताची एकाग्रता साधून जो एकत्वज्ञानाचें अनुभवपूर्वक आकलन करितो तो मुक्त होऊन कृतार्थ होतो. तेव्हां अथर्वमुनि म्हणाले, " तुम्ही देखील आत्मविज्ञानानें सुखी व्हाल, यावर श्रद्धा ठेवा. खिन्न होऊं नका. "

## योगविद्येचा उपदेश

अथर्वमुनि म्हणाले, " हे शांडिल्यमुने ! आतां मी तुम्हांला दत्तात्रेयांनीं सांगितलेला योग सांगतों. तो तुम्ही ऐका व त्याच्याप्रमाणें वागा. म्हणजे तुम्हांला शांति मिळेल. योग म्हणजे जीव व शिव यांचें ऐक्य. या योगाचीं आठ अंगें आहेत. " योगदर्शनांत सांगितल्याप्रमाणें याहि योगांत आठ अंगें सांगितलेलीं आहेत. (१) यम, (२) नियम, (३) आसन, (४) प्राणायाम, (५) प्रत्याहार, (६) धारणा, (७) ध्यान आणि (८) समाधि. यांचें क्रमानें अर्थ असे –

यम – देह आणि इंद्रियें यांच्याविषयीं वैराग्य असणें. या ठिकाणीं वैराग्य शब्दाचा अर्थ अनासक्ति असा समजावा. जरी देह आणि इंद्रियें व्यवहाराला आणि वैराग्याला उपयुक्त असलीं तरी त्यांच्याबद्दल अंतःकरणांत आसक्ति नसावी. असा अभ्यास करणें याला प्रकृत स्थलीं यम असें म्हटलेलें आहे. यालाच संयम असेंहि म्हणतात.

नियम – आत्मतत्त्वाविषयीं अंतःकरणांत आसक्ति म्हणजे उत्कंठा अथवा आवड असणें.

आसन – उदासीनपणानें बाह्य सृष्टीवरून दृष्टि अंतर्मुख करणें.

प्राणयामाचे तीन प्रकार असतात. (१) पूरक, (२) कुंभक, (३) रेचक. प्रकृतस्थलीं, आत्मतत्त्वाचें यथार्थ ग्रहण करणें याला पूरक असें म्हटलेलें आहे.

त्याचप्रमाणें गृहीत आत्मतत्त्वाचें बुद्धीमध्यें स्थिरीकरण करणें याला कुंभक असें म्हणतात.

तसेंच रेचक म्हणजे मायिक पदार्थांचा कल्पनेनें त्याग करणें होय. – असा त्रिविध प्राणायाम समजावा.

प्रत्याहार म्हणजे विषयापासून इंद्रियांना परतविणें होय.

आत्म्याच्या ठिकाणीं मनाचें दृढीकरण करणें याला धारणा असें म्हणतात.

आत्मस्वरूपीं दृढ झालेल्या मनानें, 'मी ब्रह्म आहें' असें चिंतन करणें याला ध्यान असें म्हणतात.

त्याचप्रमाणें देह म्हणजेच मी ही भावना फिरवून परमात्मा म्हणजे मी अशी भावना करणें ही समाधि होय. – या भावनेची जोंपर्यंत जाणीव होते तोंपर्यंत

या समाधीला सविकल्प समाधि असें म्हणतात. ही भावना मावळली म्हणजे सविकल्प समाधीलाच निर्विकल्प समाधीचें रूप प्राप्त होतें.

असा हा अष्टांग योग सर्व विरक्तांना मुक्तिप्रद आहे. एवढेंच नव्हे तर हा योग सामान्य विरक्तांनाहि मुक्ति देणारा आहे, असें सांगून अथर्व ऋषींनीं शांडिल्य मुनींना हा बोध हृदयामध्यें ठसण्याकरितां श्रीदत्तात्रेयांची उपासना करण्यास सांगितलें. एकाग्र चित्तानें इष्टदेवतेचें ध्यान करणें हेंच उपासनेचें तात्त्विक स्वरूप आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन अथर्वमुनींनीं शांडिल्यऋषींना दत्तात्रेयांच्या ध्यानाचेंहि वर्णन करून सांगितलें. तें असें —

दत्तात्रेयं शिवं शान्तमिन्द्रनीलनिभं प्रभुम् ।
आत्ममायारतं देवमवधूतं दिगंबरम् ।। १ ।।
भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम् ।
चतुर्बाहुमुदाराङ्गं प्रफुल्ल कमलेक्षणम् ।। २ ।।
ज्ञानयोगनिधिं विश्वगुरुं योगिजनप्रियम् ।
भक्तानुकम्पिनं सर्वसाक्षिणं सिद्धसेवितम् ।। ३ ।।
एवं यः सततं ध्यायेद् देवदेवं सनातनम् ।
स मुक्तः सर्वपापेभ्यो निःश्रेयसमवाप्नुयात् ।। ४ ।।

— शांडिल्योपनिषद् अ. ३

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे शिव म्हणजे ब्रह्मस्वरूप आहेत. ते शांत म्हणजे निर्विकार आहेत. त्यांची अंगकांति इंद्रनील रत्नाप्रमाणें म्हणजे शनीच्या खड्याप्रमाणें निळ्या रंगाची आहे. ते प्रभु म्हणजे समर्थ आहेत. त्याचप्रमाणें माया म्हणजे प्रकृति अथवा शक्ति. श्रीदत्तात्रेय हे स्वतःच्या मायेमध्यें रमलेले आहेत. तसेच ते देव म्हणजे देदीप्यमान आहेत. ते अवधूत म्हणजे नित्य, सर्वश्रेष्ठ, शुद्ध आणि परब्रह्मस्वरूप आहेत. तसेच ते दिगंबरहि आहेत.

त्यांनीं आपल्या सर्व अंगाला भस्म लावलेलें आहे. त्यांना चार हात असून त्यांचे सर्व अवयव सुंदर आणि नयनमनोहर आहेत. त्यांचे नेत्र विकसित झालेल्या कमलाप्रमाणें कोमल, आरक्त आणि विशाल आहेत.

अध्यात्म्यज्ञानाचे व योगविद्येचे ते निधि म्हणजे सागर आहेत. ते सर्व विश्वाचे गुरु असून सिद्ध व योगी लोक त्यांची नेहमीं सेवा करीत असतात.

याप्रमाणें सदासर्वकाळ स्वस्वरूपीं विराजमान असलेल्या देवाधिदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें ध्यान करावें. अशा रीतीनें जो ध्यान म्हणजे चिंतन करील तो सर्व पापांतून मुक्त होऊन त्याला आत्मकल्याणाचा लाभ होईल. शांडिल्यऋषींप्रमाणें नारदऋषींनाहि श्रीदत्तात्रेयांनीं योगमार्गाचा व भक्तिमार्गाचा उपदेश करून अनुगृहीत केलेलें आहे. शांडिल्य भक्तिसूत्रें आणि नारद भक्तिसूत्रें या दोन ग्रंथांचा

आविष्कार श्रीदत्तात्रेय यांच्याच कृपेनें झालेला आहे. नारदांनीं लिहिलेला 'नारद-पांचरात्र' हा भक्तिसंप्रदायाचा ग्रंथ तंत्रवाङ्मयांत प्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें गर्ग, गालव, गौतम इत्यादि अनेक ऋषींनाहि श्रीदत्तात्रेयांनीं अनुगृहीत केलें असल्याचें इतिहासांत पहावयास सांपडतें.

दत्तात्रेयांच्या असंख्य भक्तांमध्यें राणी मदालसा ही एक अत्यंत उच्च कोटीची दत्तभक्त होती. मदालसेचा जन्म विश्वावसु गंधर्वापासून झाला. ती ऋतुध्वज राजाची राणी असून सुप्रसिद्ध दत्तभक्त राजा अलर्क याची ती माता होती. सोमवंशांतील शत्रुजित नांवाच्या राजाची ती स्नुषा म्हणजे सून होती. पार्वतीप्रमाणेंच तिनें बालपणीं शंकरांची आराधना केली होती. शंकरांनी तिला श्रीदत्तात्रेयांची उपासना दिली. दत्तात्रेयांच्या कृपेनें ती योगविद्येमध्यें आणि अध्यात्मज्ञानामध्यें निष्णात झाली. ऋतुध्वज राजा हा एकदां आपल्या दरबारांत बसला असतां दत्तभक्त असलेल्या गालवऋषींची स्वारी अकस्मात त्या ठिकाणीं आली. राजानें गालवऋषींना पाहतांच सामोरें जाऊन अभिवादन केलें. त्यांना उच्च आसनावर बसवून त्यांचा यथोचित सत्कारहि केला. नम्रपणानें राजानें गालव-ऋषींना येण्याचें कारण विचारलें. तेव्हां ऋषि म्हणाले, "राजा ! मी आपल्या आश्रमांत तपश्चर्या करीत असतांना मला एकदा दैत्याकडून फार उपद्रव झाला. त्या वेळीं त्याच क्षणीं आकाशांतून एक दिव्य घोडा खालीं आला व आकाशवाणी झाली कीं, या घोड्यावर बसून शत्रुजिताचा मुलगा ऋतुध्वज हा तुझ्या दुःखाचा परिहार करील. म्हणून मी तुझ्याकडे आलों आहें. विश्वामित्राचें कार्य जसें रामानें केलें तसें माझें हें कार्य तुझ्या पुत्रानें करावें म्हणून मी हा घोडा घेऊन तुझ्याकडे आलों आहें. तरी तूं आपला पुत्र मला दे. म्हणजे मला सुखानें तपश्चर्या करतां येईल." 'ठीक आहे' असें म्हणून राजानें मुलाला त्याच्या स्वाधीन केलें. गालवानें त्याला घोडा देऊन आपल्या आश्रमांत नेलें. त्या आश्रमांत एकदां पातालकेतु या नांवाचा राक्षस वराहाचें रूप घेऊन शिरला. ऋतुध्वज राजानें त्या उन्मत्त असलेल्या रान-डुकराकडे पाहून 'हा राक्षसच आहे' असें ओळखलें व हातांत धनुष्य-बाण घेऊन तो त्या दिव्य घोड्यावर स्वार झाला. तो घोडा सर्वत्र गमन करणारा होता. त्यानें घोड्यावर बसून अर्धचंद्राकार बाणानें राक्षसाला घायाळ केलें. तेव्हां तो राक्षस पळूं लागला. ऋतुध्वजानें त्याचा पाठलाग केला तेव्हां तो पातालकेतु राक्षस पाताळांत शिरला. राजपुत्रहि त्याच्या पाठोपाठ पाताळांत शिरला. तों एका भव्य वाड्यांत असलेली एक स्त्री त्यानें पाहिली. राजपुत्राला पाहून ती स्त्री चंद्रशालेंत म्हणजे गच्चीवर चांदण्यांत गेली. तोहि तिच्यामागून गेला व तारुण्याच्या भरांत असलेली ती सुंदर स्त्री पलंगावर बसलेली दृष्टीस पडतांच मदनानें व्याकुळ झाला. तीहि त्याचें सौंदर्य पाहून मदनानें विव्हल होऊन मूर्च्छित झाली. ती स्त्री दुसरीतिसरी कोणी नसून मदालसाच होती. ती मूर्च्छित झाल्याबरोबर तिची सखी कुंडला व राजपुत्र

ऋतुध्वज या दोघांनीं तिला सावध केलें. नंतर ती सखी ऋतुध्वजाला म्हणाली कीं, "तूंच हिच्या मोहाचें कारण आहेस. तुला पाहूनच ही मदनमूच्छित झाली. हिचें नांव मदालसा असून ही विश्वावसु गंधर्वाची मुलगी आहे. पातालकेतु नांवाच्या मायावी राक्षसानें हिला पळवून आणलेलें आहे. तो येत्या त्रयोदशीच्या मुहूर्तावर हिच्याशीं विवाह करणार आहे. खरोखर अत्यंत दुष्ट असलेला तो दैत्य हिच्याशीं विवाह करण्याला योग्य नाहीं. काल ही त्या दैत्याच्या भयानें जीवच देत होती, परंतु कामधेनूनें सांगितलें कीं, "असें करूं नकोस. जो पुरुष या राक्षसाला विद्ध करील तोच तुझ्याशीं लग्न करील. त्याप्रमाणें आजच राक्षसाचा कोणीं तरी वेध केला आहे व तो दरींत शिरला आहे. त्याच्या पाठोपाठच आपण आल्यामुळें मला वाटतें त्याचा वेध करणारे आपणच कोणी देव आहां. मी हिची मैत्रीण आहे. मला कुंडला असें म्हणतात. आपणाला मी सर्व कांहीं सांगितलें आहे. आतां कृपा करून आपणच हिचें दुःख हरण करा." यावर तो राजपुत्र म्हणाला, "मी देव नाहीं. मी सोमवंशांत जन्मलेला, ऋतुध्वज राजाचा मुलगा आहें. गालवमुनींच्या आज्ञेनें विद्ध केलेल्या राक्षसाला ठार मारण्यासाठीं येथें आलों आहे. द्विज, देव आणि अग्नि यांच्या साक्षित्वानेंच विवाह होणें योग्य असतें. तेव्हां इच्याशीं मीं आज असाच विवाह केला तर दोष लागणार नाहीं का ?" त्यावर कुंडला म्हणाली कीं, "मी ध्यानयोगानें कुलगुरूंना येथें बोलावतें." नंतर तिनें ध्यान करताच कुलगुरु पुरोहित उपस्थित झाले. त्यांनीं सर्व वृत्तान्त समजावून घेतला व यथाशास्त्र योजकाग्नीची स्थापना करून त्यांचा विवाह साजरा केला. नंतर ते गुरु तपश्चर्येसाठीं परत गेले. कुंडलाहि पण आशीर्वाद देऊन तपाचरणासाठीं गेली. त्यानंतर राजपुत्र नववधूसह घोड्यावर बसून निघाला. इतक्यांत राक्षस लढाईसाठीं आला. त्याचा सैन्यासह वध करून व गालव-मुनींची आज्ञा घेऊन राजपुत्र पत्नीसमवेत राजधानीला परत आला. त्यानें सर्व वृत्तान्त वडिलांना निवेदन केला. विजयी पुत्राला व अप्सरेसारख्या सुंदर सुनेला पाहून राजाला आनंद झाला. त्या दिव्य घोड्यावर बसून ऋतुध्वजानें साऱ्या पृथ्वीचें यशस्वी रीतीनें पर्यटन केलें असल्यामुळें राजानें त्याचें नांव कुवलयाश्व असें ठेवलें. पुढें सर्व लोक त्याला कुवलयाश्व याच नांवानें संबोधूं लागले. मदालसाहि पति हाच देव मानून त्याची एकनिष्ठेनें सेवा करूं लागली.

एकदां ऋतुध्वज मृगयेला गेला असतां त्यानें ठार केलेल्या राक्षसाच्या, तालकेतु नांवाच्या भावानें त्याला पाहिलें. त्या तालकेतूनें भावाचें ऋण फेडण्याकरितां त्याचा कपटानें घात करण्याचें ठरवून मुनीचें सोंग घेतलें व एक कृत्रिम आश्रम निर्माण करून तेथें तप करीत बसला. राजपुत्र मुनीचा आश्रम समजून आंत गेला व त्यानें त्या कपटी मुनीला वंदन केलें. तेव्हां ऋषीचें सोंग घेतलेला तो तालकेतु राक्षस ऋतुध्वजाला म्हणाला, "तुझें कल्याण असो. मीं एक यज्ञ आरंभिलेला आहे. परंतु दक्षिणा देण्यास द्रव्य उरलें नाहीं. तुझा कंठा दे." राजानें 'ठीक आहे' असें म्हणून

कंठा दिला. तो घेऊन ऋषि म्हणाला, "जरा थांबा, मी वरुणाला नमस्कार करून येतों व नंतर तुम्हांला आशीर्वाद व श्रीफल देतों." राजा 'बरें' म्हणून तेथेंच राहिला. तो कपटी राक्षस ऋषिवेषानें राजधानीला आला. शत्रुजिताच्या व मदालसेच्या पुढें त्यानें तो ऋतुध्वजानें दिलेला कंठा ठेवला आणि आक्रोश करीत, "राजा, घात झाला! हाय! हाय! राजा, ऋतुध्वजाला राक्षसांनीं ठार मारलें. मरतां मरतां हा कंठा आश्वासन म्हणून दिला आहे. हा घ्या." – असें म्हणून कंठा तेथें ठेवला व आश्रमांत परत आला. त्यानें ऋतुध्वजाला आशीर्वाद व श्रीफल देऊन निरोप दिला. राजा ऋतुध्वज त्याला नमस्कार करून दुसऱ्या अरण्यांत गेला.

इकडे राष्ट्रांत ही वार्ता हां हां म्हणतां पसरली व मोठा आकांत उडाला. राजा व राणी पुत्रशोकानें ऊर बडवून आक्रोश करूं लागलीं. मदालसेच्या दुःखाला तर अंत व पार उरला नाहीं. श्वशुरांना समाधानाचे शब्द सांगून ती स्वतः सती जाण्याकरितां राजधानीच्या बाहेर पडली. अनेकांनीं तिला या संकल्पापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर ती सती जाण्याच्या उद्देशानें राजधानीच्या बाहेर पडलीच. अरण्यांतील इंधन गोळा करून तिनें चिता रचली व अग्नि प्रज्वालित करून ती चितेमध्यें उडी घेणार इतक्यांत भगवान् शंकर पार्वतीसह तेथें प्रकट झाले आणि मदालसेला शिवलोकास घेऊन गेले. ती शिवभक्त होतीच. तिनें शिवसान्निध्यांत बसून शिवाची आराधना आरंभिली.

इकडे सर्व प्रजा दुःखांत बुडाली. शेवटीं लोकांनीं समजूत घातल्यामुळें राजानें स्नान करून उभयतांना उद्देशून यथाविधि जलदान केलें. इतक्यांत ऋतुध्वज परत आला. त्यानें सर्वांना खिन्न पाहून सर्व वृत्तान्त समजावून घेतला व तोहि अत्यंत दुःखी झाला. नंतर नीट विचार करून 'या जन्मीं मीं कोणत्याहि स्त्रीशीं विवाह करणार नाहीं असें ठरविलें. नंतर सर्व उपभोगांचा त्याग करून तो उद्विग्नतेनें दिवस घालवूं लागला. दैवयोगानें अश्वतर नागाचे दोन पुत्र कंबलाश्वनाग आणि हलाश्वनाग हे दोघे ब्राह्मणरूपानें पृथ्वीवर आले व ते ऋतुध्वज राजाशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागूं लागले. त्यांचा ऋतुध्वजाशीं चांगलाच स्नेहसंबंध जुळला. राजपुत्र बुद्धींत बृहस्पतीसारखा, रूपांत मदनासारखा व पराक्रमांत इंद्रासारखा आहे, असें पाहून त्यांनीं रोज त्याचा सहवास ठेवला. त्यांच्याशिवाय राजपुत्रालाहि चैन पडेनासें झालें. ते अश्वतर नागाचे पुत्र वरचेवर नागलोकीं आपल्या घरीं जात असत व शत्रुजिताकडेहि परत येत असत. एकदां कंबलाश्व आणि हलाश्व हे दोघेहि नागलोकीं आले असतां त्यांच्या वडिलांनीं अर्थात् अश्वतर नागानें आपले पुत्र दुर्मुखलेले आहेत असें पाहून त्यांना विचारलें, "बाळांनो! तुम्ही आज असे खिन्न कां दिसतां?" यावर ते दोघेहि मुलगे म्हणाले, "बाबा, आमच्या मित्राचें दुःख पाहून आम्ही कष्टी झालों आहोंत. मृत्युलोकांत ऋतुध्वज नांवाचा आमचा एक मित्र आहे. तो अत्यंत दुःखी आहे. त्याचें दुःख दूर करण्याचें कार्य असाध्य असल्यामुळें आम्हांला फार खेद होत आहे.',

यावर बाप म्हणाला, "मित्राचें कार्य मित्रांनीं अवश्य केलें पाहिजे. तुमच्या मित्राचें असें कोणतें अवघड कार्य आहे! सांगा. तें मी करीन." वडिलांचें हें आश्वासन ऐकतांच त्या दोघांनीं ऋतुध्वजाचा सर्व वृत्तान्त वर्णन करून सांगितला. आमच्या मित्राची पत्नी ही त्याला परत मिळाली पाहिजे असें कांहींतरी तुम्ही करा' – हें मुलांचें म्हणणें ऐकतांच अश्वतर नागानें हिमालयांतील प्लक्षावरण नामक तीर्थाच्या ठिकाणीं जाऊन तपश्चर्या केली. तेथें त्यानें सरस्वतीदेवीची एकाग्र मनानें आराधना केली. सरस्वतीदेवी प्रसन्न झाली व म्हणाली, "तुला जें कांहीं पाहिजे असेल तें मागून घे." यावर अश्वतर नाग म्हणाला, "हे देवी, शंकर प्रसन्न व्हावेत म्हणून गायन करावयाचें आहे. तरी मला व माझ्या दोन मुलांना सुस्वर गायन करतां यावें म्हणून उत्तम कंठ, संगीतकला आणि ज्ञान दे." देवीनें 'तथास्तु' असें म्हणून अश्वतर नागाला इष्ट वर दिला आणि ती अंतर्धान पावली. पुढें अश्वतर नागानें कैलासावर जाऊन आपल्या दोन मुलांसह शंकराची तिन्ही त्रिकाळ संगीतसेवा केली. त्यांचें तें मधुर वाद्यांसह सुस्वर संगीत ऐकून भगवान् शंकर प्रसन्न झाले व म्हणाले, "तुम्हांला काय पाहिजे असेल तें मागा." अश्वतर म्हणाला, "हे प्रभो,! ऋतुध्वजाची पत्नी मदालसा ही अकालीं मृत झाली आहे. ती मला जशीच्या तशीच मिळावी." ही अश्वतराची प्रार्थना ऐकतांच शंकरानें मदालसेला इष्ट वर देऊन अश्वतराच्या स्वाधीन केलें. अश्वतर तिला घेऊन नागलोकीं परत आला.

पुढें मदालसेला ऋतुध्वजाकडील सर्व वृत्तान्त सांगून, ऋतुध्वजाला आपल्या मुलांकडून अश्वतर नागानें नागलोकीं बोलावून घेतलें. आदरसत्कार, विनोद व संभाषण झाल्यानंतर अश्वतर नागानें ती गंधर्वकन्या मदालसा ही ऋतुध्वजाला अर्पण केली. तिनें त्याच्याकडे पाहिलें व त्यानें तिच्याकडे पाहिलें. दोघांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. आपले मित्र व आपल्या वडिलांप्रमाणेंच आदरणीय व पूज्य असलेले आपल्या मित्रांचे वडील अश्वतर नाग यांच्याबद्दल पूर्ण आत्मीयता असल्यामुळें मदालसेबद्दल संशय घेण्यास ऋतुध्वजास तेथें वावच नव्हता. पुढें अश्वतर नागानें मदालसा कशी मिळाली हें सांगून हत्ती, घोडे, व विपुल धन देऊन आपल्या दोन मुलांसह मदालसेला ऋतुध्वजाबरोबर थाटामाटानें राजधानीला परत पाठविलें. आपली सून आणि मुलगा दोघेहि सुखरूप असून ते राजधानीला परत आले आहेत असें कळतांच राजा शत्रुजित याला व राणीलाहि जो आनंद झाला तो शब्दांनीं प्रकट करतां येत नाहीं व लेखणीनें लिहितां येत नाहीं.

प्रजाजनांनींहि पण सडासंमार्जन करून, रांगोळ्या घालून, गुढ्या उभारल्या. केळीचे खांब दाराशीं लावले. कमानी उभारून तोरणें लावलीं. भाताच्या लाह्या व फुलें उधळून ऋतुध्वजाचें व मदालसेचें हार्दिक स्वागत केलें. ठिकठिकाणीं सुवासिनींनीं निरांजनदीप लावून त्या दोघांना ओवाळलें. अशा थाटानें ऋतुध्वज व मदालसा हीं दोघेंहि आपल्या घरीं येऊन पोहोंचलीं. त्यानें आईवडिलांना व तिनें सासूसासऱ्यांना

वंदन केलें. ब्राह्मणांनाहि नमस्कार करून सर्वांचे आशीर्वाद घेतले. पुढें उत्तम मुहूर्त पाहून शत्रुजितानें ऋतुध्वजाला थाटानें राज्याभिषेक केला. राज्याचे सर्व अधिकार ऋतुध्वजाच्या स्वाधीन करून आणि सर्वांचा निरोप घेऊन एकनिष्ठेनें ईश्वराची आराधना करण्याकरितां पत्नीसह तो हिमालयांत निघून गेला.

ऋतुध्वज राज्यावर आल्यानंतर त्यानें राज्यव्यवस्था अत्यंत उत्तम ठेवली. प्रजाजनांचें तो पुत्रांप्रमाणें प्रतिपालन करूं लागला. त्यानें शत्रूंचा, चोरांचा उत्तम बंदोबस्त केला. राक्षसांच्या मुलखांत जाऊन तालकेतूला शोधून काढलें व त्याच्यासह सर्व राक्षसांचा निःपात करून टाकला. इकडे राणी मदालसा हिनेंहि ज्ञानसागर आणि महायोगेश्वर भगवान् श्रीदत्तात्रेय यांची आराधना करून योगविद्येचा आणि अध्यात्मज्ञानाचा उपदेश घेतला. ती मोठी योगिनी बनली. योगारूढ होऊन तिनें आत्मसाक्षात्कारापर्यंत आपली प्रगति करून घेतली. ती जरी स्वतः ब्रह्मज्ञानांत मग्न असे तरी चित्कला ज्याप्रमाणें जीवाला रमविते, त्याचप्रमाणें ती ऋतुध्वज राजाचें मनोरंजनहि करीत होती. कालांतरानें राणीला गर्भ राहून यथाकालीं मुलगाहि झाला. तिनें जन्मापासूनच त्याला ब्रह्मज्ञानाचे धडे दिले. दूध पाजून यथायोग्य संगोपनहि केलें. हंसवितांना, खेळवितांना व पाळण्यांत घालून झोके देतांना माता जो उपदेश देते तो इतरांकडून सहस्रकल्प प्रयत्न करूनहि मिळूं शकत नाहीं. बाळ उताणे पडून रडत असतांना मदालसा म्हणत असे कीं, "बाळा, तूं इतका कां रडतोस? हा सर्वनाश करणारा प्रमादरूपी मृत्यु माझ्याबरोबरच जन्माला आला आहे, अशी तुला भीति वाटते का? बाळा, तो तुझ्याबरोबर आलेला नाहीं. कारण तूं अत्यंत शुद्ध आहेस. तुला दुःखाचें कारण नाहीं. हा पांच भूतांचा म्हणजे पृथ्वी, जल म्हणजे पाणी, तेज म्हणजे उष्णता, वायु म्हणजे हवा आणि आकाश म्हणजे अवकाश या पांचांचा मिळून हा देह बनलेला आहे. तुझा त्या पांच भूतांशीं तत्त्वतः कांहीं संबंध नाहीं. पंचमहाभूतें म्हणजे हीं पांच तत्त्वें आहेत. या पांच तत्त्वांच्या विशिष्ट आकारानें नटलेल्या पिंडास म्हणजे समुदायास आपण देह म्हणतों. या देहाहून तूं अगदीं निराळा आहेस. लांकडांत राहूनहि अग्नि जसा लांकडाहून निराळा असतो अथवा घटांत राहूनहि आकाश जसें घटाहून निराळें असतें, त्याचप्रमाणें देहांत राहूनहि शुद्ध चित्कलास्वरूप असलेला तूं देहाहून निराळा आहेस. रडूं नकोस अं! देह हा कल्पित असून तूं शुद्ध चैतन्यस्वरूप आहेस. लांकडाच्या संयोगानें अग्नि जसा लांकडासारखा भासतो अथवा जास्वंदीचें फूल जवळ असल्यामुळें स्फटिक जसा तांबडा दिसतो त्याचप्रमाणें आत्मा हा देहांत राहत असल्यामुळें तो देहाच्या आकारानें प्रतीतीला येतो. तत्त्वतः आत्मस्वरूप असलेला तूं देहाहून निराळा आहेस. तुझ्या ठिकाणीं शोक हा शब्दच निरर्थक आहे, कारण सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांपासूनच सुख, दुःख आणि शोक यांची कल्पना आहे. विषयी जनांत गुणांचा प्रादुर्भाव दिसत असला तरी ते सर्व भौतिक आणि म्हणून मिथ्या आहेत. तसेंच हीं पंचमहाभूतें एकमेकांच्य

संयोगानें वृद्धि पावतात आणि वियोगानें ऱ्हास पावतात. तुझी वृद्धीहि होत नाहीं व ऱ्हासहि संभवत नाहीं. कारण अन्न-पाणी इत्यादिकांनीं होणारे संस्कार देहावरच घडतात. तेव्हां देहाबरोबर मीहि वाढत.आहे अशी वेडगळ कल्पनाच करूं नकोस. नाही तर अहंकारापासून होणाऱ्या कर्मांनीं तूं बांधला जाशील. हा बाप, ही आई, हें तुझें, हे माझें अशा प्रकारची कुभावना या संसारांतील वस्तूंविषयीं तूं आपल्या मनांत ठेवूं नकोस. सामान्य लोक दुःखामुळें संतप्त होतात; परंतु आत्मज्ञानी लोकांना त्यांतहि सुखच दिसत असतें. जें सुख पराधीन असतें म्हणजे इंद्रियें आणि विषय यांच्या संयोगानें निर्माण होणारें असतें, ते क्षणिक असल्यामुळें तुच्छ समजावें. त्वचेनें झाकलेली, रक्तमांसानें लिंपलेलीं आणि हाडांनीं सावरून धरलेली अशी ही काया मूर्तिमंत दुर्गंधीच नव्हे काय? तथापि देहाविषयीं ममत्व असतेंच. बाळ, देह हा अमंगल असला तरी त्याच्या योगानें आपण अविनाशी व आनंदमय आत्म्याचा लाभ करून घेऊं शकतों. तात्पर्य, देह हा हात, पाय इत्यादि अवयवांनीं युक्त असल्यामुळें सावयव आणि विनाशी असतो, तर शुद्ध चित्कलास्वरूप आत्मा हा निरवयव आणि अविनाशी आहे. जन्म, मृत्यु, वृद्धि, क्षय आणि जरा-व्याधि हे देहाचे धर्म असून त्या देहांत नांदणाऱ्या चित्कलास्वरूप अशा तुझा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. तहान भूक हे प्राणांचे धर्म आहेत. तुझा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. इच्छा, द्वेष, सुख, दुःख, लोभ, मोह, लज्जा आणि भय हे सर्व मनाचे धर्म आहेत. तुझा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. पाण्यांत प्रतिबिंबित झालेला पाणी हललें कीं, हलल्यासारखा दिसतो. त्याचप्रमाणें बुद्धींत प्रतिबिंबित झालेली शुद्ध चित्कला म्हणजे हा जीवात्मा बुद्धीच्या चांचल्यामुळें चंचल झालासा दिसतो; पण जन्म, मृत्यु, जरा, व्याधि इत्यादिकांचा शुद्ध चित्कलास्वरूप असलेल्या तुझ्याशीं कांहीं संबंध नाही. तूं सदासर्वकाल सुखरूप म्हणजे आनंदमय आहेस, हें लक्षांत ठेव."

यावर कोणी असें विचारील कीं, अहो, त्या लहान मुलाला हा उपदेश काय कळणार? खरें आहे! हा उपदेश त्याला त्या वेळीं कळला नाहीं तरी पुढें हे शब्द त्याच्या बुद्धींत प्रकाशतील व त्या वेळीं त्यांचा अर्थ त्याला कळेल. लहानपणीं घोकलेले पाढे व हिशेबाचे आडाखे कळले नाहींत तरी मोठेपणीं ते कळतात व त्यांचा फार उपयोग होतो. ते वायां जात नाहींत. त्याच न्यायानें हा लहानपणांतील बोध मोठेपणीं प्रकाशतो व उपयोगयला येतो. तो वायां जात नाहीं असें समजावें. याप्रमाणें खेळविण्याच्या मिषानें प्रत्यहि असा निर्मल उपदेश सुरू झाला. राजानें त्या मुलाचें नांव मोठ्या आवडीनें 'विक्रांत' असें ठेवलें. हें नांव ऐकून राणी मदालसा हंसली.

यानंतर मदालसेला दुसरा मुलगा झाला. त्यालाहि मदालसेनें पहिल्या मुलाप्रमाणेंच बोध केला. राजानें त्याचें यथाविधि सुबाहु असें नांव ठेवलें. त्या समयींहि मदालसा पूर्वीप्रमाणेंच मोठ्यानें हंसली. तिसऱ्या खेपेला प्रसूत होऊन मुलगा झाला त्यालाहि मातेच्या सदुपदेशामुळें द्वैताचें वारेंहि शिवलें नाहीं. राजानें त्याचें शत्रुमर्दन

असें नांव ठेवलें. त्याहि वेळीं मदालसा पूर्वीप्रमाणेंच मोठ्यानें हंसली. हीं तिन्हीं मुलें बालपणींच ज्ञानी आणि विरक्त होऊन आपलें राज्यवैभव सोडून गंगेच्या कांठाकांठानें हिमालयांत निघून गेलीं. त्यानंतर चौथ्या वेळींहि मदालसेला मुलगाच झाला. तो दिवस आणि ती वेळ अत्यंत शुभ होती. या वेळीं दिशा प्रसन्न झाल्या. सज्जनांचीं मनें आनंदित झालीं. आकाशांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली. या वेळीं शनि, मंगळ इत्यादि पांच ग्रह आपआपल्या उच्च स्थानांत होते. राजानें बाळाचा जन्मोत्सव मोठ्या थाटानें साजरा केला.

याचें नांव ठेवतांना राजा मदालसेला म्हणाला, "प्रिये! मागील तीन मुलांचीं नांवें मीं हौसेनें ठेवलीं असतां तूं कां हंसलीस?" यावर मदालसा म्हणाली, "मला तीं तिन्हीं नांवें निरर्थक वाटलीं म्हणून मी हंसलें. पहा, विक्रांत म्हणजे विशेष रूपानें हालचाल करणारा; पराक्रमीं; पण आत्मा हा आकाशाप्रमाणें सर्वव्यापी व निरवयव असल्यामुळें त्याला हालचाल संभवतच नाहीं. मग विक्रांत याला काय अर्थ राहिला? त्याचप्रमाणें आत्म्याला हातपाय वगैरे कांहीं नसतात. मग सुबाहु याला काय अर्थ राहिला? त्याचप्रमाणें आत्मा सर्व भूतांमध्ये सम म्हणजे एकरूप असल्यामुळें त्याला शत्रु आणि मित्र हा भेदभाव नसतो. समुद्रांत एका लाटेनेंच जशी दुसरी लाट मोडते, त्याप्रमाणेंच परस्परांच्या विरुद्ध आघातांनीं भौतिकांचाहि नाश होत असतो. बुद्धीलाहि अगम्य असा साक्षित्वानें असणारा केवळ आत्मा, त्याच्या ठिकाणीं अंतर्वासना अथवा बुद्धिकृत वैर हे भाव कोठून संभवणार? मग शत्रुमर्दन याहि नांवाला काय अर्थ उरला? अशीं हीं नांवें निरर्थक वाटल्यामुळें मी हंसलें." तेव्हां राजा म्हणाला, "आतां या चौथ्या मुलाचें तुला वाटेल तें नांव तूंच ठेव." राजाचें हें म्हणणें ऐकल्यानंतर मदालसेनें धाकट्या मुलाचें नांव 'अलर्क' असें ठेवलें. अलर्क या नांवांत तसें म्हटलें तर कांहीं अर्थ नाहीं. दगड्या, धोंड्या नांव ठेवावें तशांतलाच हा प्रकार आहे. तथापि सूक्ष्म विचार केल्यास "अलते, शोभते अर्कवत् इति अलर्कः" अर्काप्रमाणें म्हणजे सूर्याप्रमाणें जो शोभतो, सर्वांचें पोषण करतो अथवा समर्थ असतो त्याला अलर्क असें म्हणतात. अलर्क म्हणजे सूर्याप्रमाणें शोभणारा — असा अलर्क शब्दाचा अर्थ निष्पन्न होतो. 'अलर्क' हा मोठा झाल्यावर वरील व्युत्पत्तीने निष्पन्न होणारा अर्थ त्यानें सार्थ केला आहे.

कांहीं दिवसांनीं ऋतुध्वजराजानें अरण्यांत निघून गेलेल्या मुलांची भेट घेतली व त्यांनीं प्रवृत्तिधर्माचा स्वीकार करून आपलें राज्य सांभाळावें असा पुष्कळ उपदेश केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं अलर्क वयांत आल्यानंतर त्याला राज्याभिषेक करण्याचें ठरविलें. उत्तम मुहूर्त पाहून मोठ्या थाटामाटानें त्याला राज्याभिषेक केला. मदालसेनें अलर्काला प्रवृत्तिधर्माचा उपदेश करून राज्य कसें चालवावें तें उत्तम रीतीनें शिकविलें. अलर्क हा राज्याचें संगोपन करण्यास

समर्थ झाला आहे असें पाहून मदालसाहि ईश्वराची आराधना करण्यास ऋतुध्वजाला बरोबर घेऊन हिमालयामध्यें गेली. जातांना तिनें अलर्काला व्यवहाराचा व तत्त्वज्ञानाचा उत्तम उपदेश केला. शेवटीं सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांची भक्तिभावानें उपासना करण्याचेंहि सांगितलें. नंतर अलर्काला प्रेमानें जवळ घेऊन त्याचें मस्तक हुंगलें व पाठीवरून हात फिरवीत त्याला पुष्कळ आशीर्वाद दिले. अशी ही दत्तभक्त असलेल्या मदालसेची कथा पुराणांतरीं वर्णिलेली आहे.

## राजा अलर्क आणि भगवान् दत्तात्रेय

मदालसेचा धाकटा पुत्र राजा अलर्क याला सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं अनुगृहीत करून त्याला योगाचा व तत्त्वज्ञानाचा अत्यंत मार्मिक उपदेश करून भुक्ति व मुक्ति यांचा लाभ करून दिला. हा वृत्तान्त अत्यंत मननीय असल्यामुळें आम्ही त्याचा या ठिकाणी संक्षेपानें निर्देश करीत आहों. तो वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावा.

राजा अलर्क हा राज्य प्राप्त झाल्यानंतर आईच्या उपदेशाप्रमाणें नीतिन्यायानें राज्य करूं लागला. प्रजाजनांचें त्यानें अल्पकाळांतच उत्तम संगोपन करून प्रेम संपादिलें, पण पुढें लवकरच तो राज्यवैभवाच्या मोहांत गुंतला. ऐषआरामांत आणि चैनींत दिवस घालवूं लागला. खाणें, पिणें, गाणें, नाचणें व विषयसुख घेत राहणें यांतच त्याच्या आयुष्याचा काळ जाऊं लागला. ही वार्ता त्याचा थोरला भाऊ सुबाहु याच्या कानावर गेली. तेव्हां त्याला अत्यंत वाईट वाटलें. सर्व देहांत हा मानवदेह अत्यंत श्रेष्ठ आहे. तो ऐहिक आणि पारलौकिक कल्याण प्राप्त करून घेण्याकरितां लागणाऱ्या सर्व साधनांनीं संपन्न आहे. हा देह हातचा निघून गेल्यानंतर आत्मकल्याण पुनः केव्हां प्राप्त करून घेतां येईल याचा भरंवसा नाहीं. फिरून हा दिवस पुन्हां केव्हां व कसा प्राप्त होईल हें सांगतां येत नाहीं. हा नरदेह म्हणजे संसाररूपी दुःखसागरांतून तरून जाण्याचें एक उत्तम साधन आहे. पूर्वपुण्याईनें सहज त्याचा लाभ झालेला आहे. हें एक भवसागरांतून तरून जाण्याकरितां उत्कृष्ट जहाजच आपल्या हातीं लागलेलें आहे. तें सर्व उपयुक्त गुणांनीं संपन्न आहे. शहाण्या मनुष्यानें भगवत्कृपेचा वारा अंतःकरणरूपी शिडामध्यें भरून आणि कर्णधारपदावर सद्गुरूंची योजना करावी. सत्य, आर्जव, दान, दया, अहिंसा, शम, दम इत्यादि दैवी गुणांची शिदोरी बरोबर घ्यावी आणि आत्मप्रवण होऊन वेदान्तरूपी जहाजावर आरूढ व्हावें. सत्संगति आणि सर्वत्याग या मार्गानें सतत श्रवण, मनन, निदिध्यासन करून पैलतीराला पोहोंचावें व नित्य आणि सर्वश्रेष्ठ अशा आत्मसुखाचा लाभ घ्यावा. यांतच या नरदेहाची सार्थकता आहे. याच देहांत आणि याच डोळ्यांनीं आत्मसुखाचा सोहळा अनुभवावा. यांतच या देहाची सफलता आहे. हा देह हातचा निघून गेल्यानंतर जी हानि होईल ती भरून निघणें कठीण आहे. तरी माझा धाकटा भाऊ राजा अलर्क

याचा जन्म वायां जाऊं नये म्हणून मला कांहींतरी युक्ति योजून त्याला योग्य मार्गावर आणलें पाहिजे, असें सुबाहूनें ठरविलें.

वर सांगितल्याप्रमाणें विचार करून तो काशिराजाकडे गेला व काशिराजाशीं संगनमत करून त्यानें भलें मोठें सैन्य आपल्याबरोबर घेतलें आणि अलर्काच्या राजधानीला वेढा दिला. लोकांची रसद तुटल्यामुळें फार मोठी उपासमार होऊं लागली. अलर्क राजा हा मोठा दयाळू आणि अत्यंत धार्मिक होता. तो न्यायानें धन मिळवीत होता व धनानें धर्माचें आचरण करीत होता. धन आणि धर्म या दोघांच्या समन्वयांतून तो संपूर्ण राज्यवैभवाचें सुख भोगीत होता. तो प्रजाजनांचें पित्याप्रमाणें परिपालन करीत होता. आपल्या प्रजाजनांची आपल्या डोळयादेखत होत असलेली उपासमार पाहून त्याला अत्यंत दुःख झालें. संकटाच्या वेळीं उपयोगाला यावी म्हणून त्याच्या मातेनें त्याच्याजवळ एक सोन्याची अंगठी ठेविलेली होती व सांगितलें होतें कीं, अगदीं अपरिहार्य संकटाच्या वेळीं या अंगठीवरील ताईत तूं उलगडून पाहा; म्हणजे तुला संकटांतून मुक्त होण्याचा मार्ग दिसेल. या गोष्टीची आठवण होताच अलर्कानें ती अंगठी उलगडून पाहिली व त्या आंगठीमध्यें मातेनें लिहिलेला उपदेश एका सदाचारसंपन्न अशा अधिकारी ब्राह्मणाकडून वाचून घेतला. त्यांत लिहिलें होतें कीं —

त्याज्यः सर्वात्मना सङ्ग स चेत्त्यक्तुं न शक्यते ।
स सद्भिः सह कर्तव्यः संतो दुःसंगभेषजम् ।।
कामः सर्वात्मना हेयो हातुं चेत् शक्यते न सः ।
मुमुक्षां प्रति कर्तव्यः सैव कामार्तिभेषजम् ।।

दुसऱ्यांची संगति सर्वस्वीं टाळाली. ती जर टाळतां येत नसेल तर सज्जनांची संगति करावी. संत हे दुर्जनांच्या संगतीचा दुष्परिणाम टाळण्याचें उत्तम औषध होय. कोणत्याहि गोष्टीची इच्छा करूं नये. अर्थात् सर्व कामना सोडून द्याव्यात. त्या जर सोडून देतां येत नसतील तर मुक्त होण्याची कामना अंतःकरणांत ठेवावी. मुक्त होण्याची कामना ही सर्व कामनांच्या दुष्परिणामांचें उत्तम औषध होय.

इति श्रुत्वा मातृहार्दं बुध्वा सह्याद्रिसंस्थितम् ।
ज्ञात्वा सत्तममात्रेयं निर्विण्णः शरणं ययौ ।।

उत्तम संत कोण भेटेल व कोठें भेटेल याचें हें उत्तर या सहृदय मातेनें देऊन ठेवलेलेंच होतें. हा सर्व मातेचा हार्दिक म्हणजे कळवळयाचा संदेश ऐकून राजा अलर्क दत्तात्रेयांचा शोध करण्याकरितां सह्याद्रि पर्वताच्या परिसरांत आला व उत्तम संत भगवान् दत्तात्रेयच आहेत. तेच शरण जाण्याला योग्य आहेत, अशा श्रद्धेनें व आर्त चित्तानें दत्तात्रेयांचा शोध करूं लागला. भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं

मायायुक्त अवधूतरूपाचा त्याग करून आदिगुरूचें रूप धारण केलें व त्याच रूपानें अवतरून राजा अलर्काला दर्शन दिलें. आदिगुरु श्रीदत्तात्रेय यांना पाहतांच त्यांच्या चरणीं अलर्कानें साष्टांग प्रणिपात केला व करुणापूर्ण वाणीनें अनुग्रहाची प्रार्थना केली. सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेयांनीं राजा अलर्क याच्या अनुग्रहवर करून योग्य तो उपदेश केला. दत्तात्रेयांच्या उपदेशामुळें राजा अलर्क मोठा विवेकी आणि विरक्त बनला. त्यानें सुबाहूशीं अभेदभाव व्यक्त करून हें सर्व राज्य सुबाहूनेंच सांभाळावें. मी आणि सुबाहु भिन्न नसून आम्ही दोघे एकरूपच आहोंत असा अंतःकरणांतील यथार्थ प्रेममूलक ऐक्यभाव प्रकट केल्यानंतर आणि आपल्या भावाच्या अंतःकरणांतील झालेला पालट प्रकट झाल्यानंतर आपला हेतु सिद्ध झाल्याचें पाहून राजा अलर्क यालाच "तूं यापुढें आहेस असाच विरक्त राहून व परमेश्वराची आराधना करून निरपेक्षबुद्धीनें राज्य सांभाळ" असें सुबाहुनें सांगितलें. सैन्याचा वेढा उठवून व राज्य अलर्काच्या स्वाधीन करून तो पूर्वीप्रमाणें हिमालयांत निघून गेला. यानंतर सुबाहुनें सांगितल्याप्रमाणें अलर्कानें निरपेक्ष बुद्धीनें सर्व राज्य उत्तम रीतीनें सांभाळलें. तो एकनिष्ठ अंतःकरणानें आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांची शेवटपर्यंत आराधना करीत राहिला व दत्तात्रेयांच्या कृपेनें कृतार्थ झाला.

## आयुराजा आणि भगवान् श्रीदत्तात्रेय

सोमवंशामध्यें आयु नांवाचा एक मोठा उदार सम्राट् होऊन गेला. त्याला पुत्रसंतति नसल्यामुळें तो अत्यंत कष्टी असे. ऋषिमुनींच्या तोंडून त्यानें दत्तात्रेयांचें माहात्म्य ऐकलें. तो पुत्रप्राप्तीसाठी सह्याद्रीवर जाऊन दत्तप्रभूंना भक्तिभावानें शरण गेला. भगवान् दत्तात्रेय हे आपल्या अंगावर तरुण स्त्रीला घेऊन बसलेले होते. भोंवतालीं मद्य आणि मांसहि ठेवलेलें दिसत होतें. अशा स्थितींतहि प्रभूला पाहून त्याच्या शुद्धतेविषयीं शंकित न होता राजानें त्याला अभिवादन केलें. दत्तात्रेयांनीं त्याला झिडकारलें, परंतु राजानें तिळमात्रहि निष्ठा ढळू न देतां दत्तात्रेयांची भक्तियुक्त अंतःकरणाने सारखी सेवा सुरू ठेविली. याप्रमाणें शंभर वर्षे त्याची दास्यभक्ति झाली.

"अरे, मी हा असा व्रात्य, पतित व दुराचारी आहें. माझ्याशीं तुझें काय काम आहे?"

राजा म्हणाला, "आपण बुद्धीचे प्रेरक आहां. आपणच अत्रिपुत्र पुरुषोत्तम आहां. ज्यांनीं वर्णादिक विभाग ठरविले ते वेद म्हणजे तुमचीच वाणी होय. तुमचें स्वरूप जाणणारा भक्तहि त्या वेदोक्त विधिनिषेधाच्या पलीकडे असतो. मग तुम्हांला तें बंधन कोठून असणार? विधि व निषेध यांनीं व्याप्त असलेल्या वेदांनीं तुझें स्वरूप समजत नसल्यामुळें मी त्यांना सोडून इकडे वळलों आहें व तुमची भक्ति करीत आहें. माझा उद्धार करा."

यावर दत्तात्रेय म्हणाले, "तर मग सेवेसाठीं माझ्याजवळ रहा व मला जें जें कांहीं लागेल तें तें पुरवीत जा."

राजानेंहि एकनिष्ठपणें दत्तात्रेयांची सेवा केली. त्यानें सोमयाग व पशुयाग यांची भावना धरून प्रतिदिनीं दत्तात्रेयांच्या सांगण्याप्रमाणें नैवेद्य अर्पण करण्याचें कार्य केलें. तेव्हां संतुष्ट होऊन भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणाले, "वर माग." त्यावर राजा म्हणाला, "देव-ब्राह्मण यांवर श्रद्धा ठेवणारा, कर्तव्यदक्ष, पूज्य, अजिंक्य, धार्मिक, शरणागतावर दया करणारा, उदार अंतःकरणाचा व दीर्घायुषि असा पुत्र मला व्हावा, कीं जेणेकरून पितरांसहित माझा उद्धार होईल." यावर दत्तात्रेयांनीं राजाच्या हातीं एक फळ दिलें व तें राणी इंदुमती हिला दे असें सांगितलें. राजानें त्या फळाचा स्वीकार करून दत्तात्रेयांना वंदन केलें व तो नगरांत आला.

दत्तात्रेयांनीं दिलेलें फळ त्यानें इंदुमतीस दिलें. तें तिनें ऋतुस्नानानंतर भक्षण केलें व यथाविधि ती पतिरत झाली. दत्तात्रेयांच्या कृपेनें त्याच क्षणीं तिला दैवी गर्भधारणा झाली. नंतर पहांटेच्या वेळीं तिला एक स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत तिनें कोणी तरी शुभ्रवस्त्र परिधान केलेला, ज्याच्या मस्तकावर शेषानें आपल्या फणांचें छत्र धरलेलें आहे, त्याचप्रमाणें किरीटकुंडलें धारण केलेलीं असून स्मितहास्य करीत असलेला दिव्य पुरुष आपल्या हातावर मोतीं देत आहे व आपल्यावर शंखोदकानें अभिषेक करीत आहे, असें पाहिलें. जागे होतांच आनंदित होऊन तिनें तें स्वप्न आपल्या पतीला सांगितले. नंतर सकाळीं स्नान करून राजानें तें स्वप्न शौनक ऋषींना सांगितलें. शौनक म्हणाले, "राजा, तूं मोठा भाग्यवान् आहेस. अनसूयेच्या उदरीं आलेल्या दत्तरूप रत्नानें दिलेलें फळ राणीनें भक्षण केलें. त्याच्या प्रभावानें परमेश्वराच्या तेजानें युक्त अशी उत्तम गर्भधारणा झालेली आहे. चंद्रवंशाला भूषणभूत व कांतीनें विष्णूसमान असा दिव्य पुत्र तुला होणार व तो हुंडासुराला मारणार असें हें स्वप्न निःशंकपणें सुचवीत आहे. भगवान् श्रीदत्तात्रेय हे या गर्भाच्या ठिकाणीं उपस्थित राहून सर्व प्रकारें याचें रक्षण करोत. तसेंच दहाव्या महिन्यांत प्रसूत होतांना वरुण मृत्युपाशापासून याचें रक्षण करो." असे आशीर्वाद देऊन शौनक ऋषि सत्कार स्वीकारून निघून गेले व दत्तात्रेयांच्याकडे चित्त लावून राजाराणी आनंदानें राहूं लागलीं.

## हुंडासुराची कथा

कांचनपुरांत हुंड नांवाचा एक बलिष्ठ राक्षस रहात असे. त्यानें पृथ्वी पादाक्रांत करून व स्वर्गावरहि हल्ला करून देवांचा पराजय केला होता. त्यानें अशोकसुंदरी नांवाची शिवकन्या बलात्कारानें हरण करून आणली होती. तिनें त्याला, "तुला नहुष ठार करील" असा शाप दिला होता. एकदां हुंडाची मुलगी नंदनवनांत गेली असतां तेथें भाटांच्या तोंडून 'आयुराजाला मुलगा होईल व तो हुंडासुराचा

 

नाश करोल ' असें तिनें ऐकलें. घरीं येऊन तिनें तें वृत्त बापाला सांगितलें. तें ऐकून त्याला अशोकसुंदरीच्या शापाची आठवण झाली.

भीत भीत जाऊन त्यानें इंदुमतीस पाहिलें. तिचें मुख प्रभातकाळच्या चंद्राप्रमाणें झालें असूनहि ती इंदुमती तेजस्वी व लावण्ययुक्त दिसत होती. तिच्या मुखावर विष्णूच्या तेजाची छटा स्पष्ट दिसत होती. देदीप्यमान, सूर्यासारखी दिसणारी जशी चंडिका, त्याप्रमाणें ती दुर्धर्ष दिसत असून, सभोंवतीं तिच्या रक्षणास्तव सुदर्शनासारखें कांहीं फिरत आहे असेंहि दिसत होतें. तें पाहून तो दुष्ट राक्षस चकित झाला. " हाच माझा शत्रु. याला ठार केलेंच पाहिजे " असें म्हणून त्यानें इंदुमतीला झोंप लागण्याच्या संधींतच निद्रेचा नाश करणारीं वाईट स्वप्नें आपल्या असुरी मायेनें पाडण्यास सुरुवात केली. इंदुमती दत्तकृपेनें सुरक्षित असल्यामुळें तिला धोका झाला नाहीं. श्रीदत्तरक्षित गर्भाचाहि भ्रंश झाला नाहीं. इंदुमती ही दुःस्वप्नांच्या भीतीमुळें नित्य सूर्याची प्रार्थना करीत असे. " हे देवा, सूर्यनारायणा ! माझीं सर्व दुरितें व दुःस्वप्नें दूर घालव व कल्याण जवळ आण." अशी त्याची स्तुति करून ती निर्भय होत असे. तो दुष्ट दैत्य गर्भाला अपाय करण्याच्या दृष्टीनें आपल्या मायेच्या जोरावर संधीची वाट पाहात अंतःपुरामध्यें गुप्तपणानें राहिला. दिवस भरून गेले तरी राणी प्रसूत होईना. हें पाहून राजानें, " हे अश्विनीकुमारांनो ! ही माझी हांक ऐका व माझी सुटका करा अशी प्रार्थना करणाऱ्या या भयभीत गर्भाला मोकळें करा." या अर्थाच्या मंत्राचा जप केला. तेव्हां ती प्रसूत होण्याच्या बेतांत आली व थोड्याच वेळांत पांचहि ग्रह उच्चीत असतांना तिनें भाग्यवान् पुत्रास जन्म दिला. तो मध्यरात्रीचा समय असूनहि मुलगा जन्मतांच त्याच्या तेजापुढें दिवेहि अंधुक भासूं लागले. सूर्य जसा आकाशांत तेजानें तळपत असतो त्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या मुलाला पाहून इंदुमती अत्यंत आनंदित झाली. पुत्रजन्माचें वृत्त समजतांच राजानें स्नान करून जातकर्म संस्कार केला व दत्ताच्या सेवेनें प्राप्त झालेलें पुत्ररत्न पाहिलें. यथाविधि सोनें उगाळून तूप, मध यांबरोबर त्या बाळाला चाटविलें व मुखावलोकन करून त्यानें श्रेष्ठ विप्रांना गाई, वस्त्रें, भूमि व दक्षिणा यांचें दान केलें. सवाष्णींना वायनदान करून इतरांनाहि पेढे वांटून संतुष्ट केलें.

यानंतर आपला हेतु सिद्धीस जाण्यासाठीं हुंडासुर मोहिनी देवीस शरण गेला. " हे महामाये, देवि, मोहिनी ! आम्ही तुला सर्वश्रेष्ठ समजतों. तुला आमचा नमस्कार असो. आमच्यावर दया कर. आमचे मनोरथ पूर्ण कर. " अशी हुंडाची स्तुति ऐकून सिद्धिदा देवी संतुष्ट झाली. इतक्यांत एक दाई प्रसुतिगृहांतून बाहेर आली, तेव्हां त्या मायावी हुंडानें तिच्या शरीरांत प्रवेश करून सूतिकागृहांत प्रवेश मिळविला. तें सारें दत्तप्रभूंनीं जाणिलें. परंतु ते मोहिनीला मान दिल्यासारखें करून अगदीं शांत व स्वस्थ राहिले. अन्यथा ज्याच्या नामस्मरणानें कार्यासहित मायेचा नाश होतो, त्या मायातीतापुढें मायावी दैत्याचा तो काय पाड ? असो. नंतर दासीच्या

शरीरांत शिरलेला तो हुंड सूतिकागृहांत जाऊन बालकाला पळविण्यासाठीं लघु-प्रस्वापिनी म्हणजे ताबडतोब झोंप आणणाऱ्या मंत्राचा जप करूं लागला. "हे देवि! हे सगळे निद्रेच्या अधीन होऊन सूर्योदयापर्यंत निश्चेष्ट पडोत व प्रातःकाळीं पूर्वीप्रमाणें जागृत होवोत." त्या प्रस्वापिनीचा प्रयोग होतांच सारीं संमोहित होऊन पडलीं. निद्रेनें त्यांची ज्ञानशक्ति नाहींशी करून टाकली. त्यामुळें राक्षसाची करणी त्यांना कळली नाहीं. अशा स्थितींत राक्षस प्रकट झाला व त्यानें मूल पळविलें.

तो आकाशमार्गानें आपल्या नगराला आला व बायकोला तें मूल देऊन म्हणाला, "या मुलाला तूं आपल्या समक्ष ठार मार व त्याचें शिजविलेलें मांस सकाळच्या न्याहरीला मला दे."

ती म्हणाली, "हें नुकतेंच जन्मलेलें अर्भक आहे. हें भलतेंच कांहींतरी त्याच्या बाबतींत करणें बरें नाहीं. असें शास्त्रनिंदित अन्याय्य कर्म आपण कां करतां?"

राक्षस म्हणाला, "देवांनीं हा माझा काळ निर्माण केला आहे. मोठ्या कष्टानें मीं याला हस्तगत करून घेतला आहे. याच्यावर दया कशी करावी? धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गासाठीं आवडता जीव अवश्य सांभाळला पाहिजे. तो जीवच नष्ट झाला तर मग स्वार्थ कुठला? हें गुरुमत तुला ठाऊक नाहीं का?"

तेव्हां 'बरें' म्हणून त्या दैत्यपत्नीनें निर्दयपणानें तें बालक घेऊन एकला नांवाच्या दासीला हांक मारून ती म्हणाली, "विचार न करतां याला ठार मार आणि नीट शिजवून नाथांच्या भोजनास तयार कर." तिनें तें बालक दासीच्या जवळ दिलें. दासीनेंहि तें आचाऱ्याच्या हातांत दिलें. ज्याचा जसा मृत्यु ठरला असेल तसा तो कोणाच्यानेंहि टळत नाहीं. हें न समजतां नश्वर देहाची इच्छा करणाऱ्याला गुरुमतांचा काय उपयोग? असो. विश्वासानें बालक हवालीं करून हुंडाची बायको दुसऱ्या कामाला लागली.

इकडे आचाऱ्याजवळ स्वयंपाकघरांत काम करणारी एकटी सैरंध्री दासीच तेवढी राहिली. त्या निर्दयानें नुकत्याच जन्मलेल्या अर्भकाचें तीक्ष्ण शस्त्रानें छेदन करण्यास आरंभ केला. तथापि त्याला कांहींच इजा झाली नाहीं. पुन्हां दोन वेळां आचाऱ्यानें नेटानें शस्त्र चालविलें; परंतु सुदर्शन चक्र रक्षण करीत असल्यामुळें शस्त्र मोडलें पण मुलगा मेला नाहीं. उलट तो हंसतच असल्याचें दिसलें. "देव तारी त्याला कोण मारी?" ती क्रूर एकला दासी बालकाच्या भाग्यानें आचाऱ्याला म्हणाली, "हें बालक ठार करूं नये. या तेजस्वी बालकाचें रक्षण देवता करीत आहेत. याला कोण पामर मारूं शकेल?" आचारीहि म्हणाला, "एकले, मी याला मारीत नाहीं. देवच याचें रक्षण करीत आहे. पण ज्याला पाहून खाटिकालाहि दया येईल अशा तेजस्वी, देवासारख्या या बालकाचा घात हा दुष्ट राक्षस कां करीत आहे? ईश्वर ज्यांचा पाठीराखा आहे त्यांना कोण मारणार? ईश्वर ज्यांचा पाठीराखा असतो ते आपत्तींत सांपडले तरी शेवटीं सुखरूपपणें बाहेर येतात. त्यांना कोणत्याहि

साधनानें मृत्यु येत नाहीं." असें म्हणून त्यानें शस्त्र खालीं टाकलें. तेव्हां एकला दासी म्हणाली, "याला आपण कुठेंतरी नेऊन टाकूं." नंतर त्यांनीं दया करून त्याला वसिष्ठ ऋषींच्या आश्रमाजवळ ठेवलें व आपण परतलीं. आचाऱ्यानें एक हरिण मारलें व तें शिजवून हुंडाची खात्री करीत त्याला तें वाढलें. तेव्हां राक्षसानें तें मोठ्या आनंदानें खाल्लें व आपला काळ आपण कायमचा नष्ट करून टाकला असें समाधान मानलें.

इकडे सुप्रभातीं मुनिगणांसह वसिष्ठ महामुनि आश्रमाबाहेर आले, तों त्यांना तें अर्भक दिसलें. तें दिव्य लक्षणांनीं युक्त असें नुकतेंच जन्माला आलेलें, देवतुल्य, सौम्य व राजलक्षणें धारण करणारें बालक पाहून वसिष्ठ चकित झाले व म्हणाले. "ऋषिहो ! हें सुंदर बालक पहा. रात्रींत याला कोणीं आणून ठेवलें तें कळत नाहीं, याचीं भाग्यवान् मातापितरें कोण असावींत कीं ज्यांना त्यांच्या तपाचें असें बालरत्नरूप फळ मिळालें. त्या बालकाकडे पाहून सर्व मुनीहि चकित झाले. त्रिकालज्ञ वसिष्ठ मुनि ध्यानानें जाणून म्हणाले, "दत्ताच्या सेवेमुळें चंद्रवंशांतील आयुराजाला झालेला हा दत्तरक्षित भाग्यवान् व आयुष्मान् बालक आहे. राहूची मुलगी इंदुमती हिच्या उदरीं हा जन्मला यांत संशय नाहीं. हा आपला काळ आहे अशा समजुतीनें हुंडानें याचें हरण केलें होतें; परंतु दैवयोगानें हा त्याच्या तावडींतून सुटला व येथें आला." असें म्हणून ज्ञानी वसिष्ठहि मोहित झाले. त्यांनीं आपल्या हातांनीं उचलून त्या बालकाला आश्रमांत नेलें.

"हा देवांना व मानवांना संकटांतून सोडवून श्रीदत्तकृपेनें सम्राट् होईल," असें वसिष्ठ म्हणत आहेत तोंच देवांनीं पुष्पवृष्टि केली. अप्सरा नृत्य करूं लागल्या. गंधर्व गाऊं लागले. ऋषींनींहि संतुष्ट होऊन त्याला आशीर्वाद दिले. 'हे अत्रिनंदना ! हें विश्व स्वांशानें उत्पन्न करणारा तूं या बालकाला सर्व संकटांतून वांचव व सर्वत्र, सर्व कालीं याचें रक्षण कर. कोणाची दृष्ट याला होऊं देऊं नकोस, भूतग्रहाची बाधा याला होऊं देऊं नकोस. याच्या सर्व अनिष्टांचा नाश कर. तुझ्या रक्षणाखालीं, हा निजलेला, बसलेला अथवा चालत असतां सर्व अवस्थांत सुखरूप असो. अश्विनीकुमारांनो ! हा आपला कुमार निरोगी, दीर्घायुषि व ओजस्वी होवो" अशी प्रार्थना करून वसिष्ठमुनींनी त्याचें यथाविधि नामकरण केलें. "नहन म्हणजे शत्रूंचें बंधन करणारा हा नहुष या नांवानें प्रख्यात होईल. हा यत्किंचितहि दूषित नसल्यानें या देववंद्य नहुषाचें कल्याण असो,". असें नामकरण करून त्यांनीं वात्सल्यानें त्याचा प्रतिपाळ केला. सती अरुंधती हिनेंहि त्याचें औरसपुत्राप्रमाणें लालनपालन केलें.

याप्रमाणें तो आश्रमांत दिवसानुदिवस वाढूं लागला. पुढें अकराव्या वर्षी वसिष्ठमुनींनीं त्याचें उपनयन केलें व सांगोपांग वेदाध्ययन करवून सर्व विद्या व शास्त्रें यांचें शिक्षण दिलें. त्याचप्रमाणें सर्व कला, सरहस्य धनुर्वेद यांचेंहि शिक्षण दिलें. शेवटीं राजनीति व वेदान्त यांतहि त्यास प्रवीण केलें.

'केलेल्या पातकापासून माझा उद्धार करा' अशी एकवारहि प्रार्थना करणाऱ्याचें जो रक्षण करतो, तो श्रीहरि नित्य सेवा करणाऱ्यांची कशी उपेक्षा करील? हुंडासुरानें मुलगा नेल्यावर कांहीं वेळानें इंदुमती जागी झाली. मुलगा नाहीं असें पाहून तिनें हाहाकार करण्यास आरंभ केला.

## माता-पित्यांचा शोक

"माझें देवांच्या बालकाप्रमाणें असलेलें गोजिरवाणें पाडस कोणा चांडाळानें नेलें? हाय रे दैवा! आतां काय करूं? अनेक व्रतवैकल्यें करून कष्टानें बाळ झाला. त्याला कोणा पाप्यानें नेलें? ज्याचें माहात्म्य अगम्य आहे अशा श्रीदत्तात्रेयांनीं दिलेला व त्यांनींच रक्षिलेला बाळ कोणीं नेला तरी कसा? हा बाळा, लाडक्या! तं कुठें रे आहेस? पाडसा! तुला कसें रे कोणीं नेलें? धिक्कार असो माझा! मला कशी बरें काळझोंप लागली? हे चंद्रवंशभूषणा, बाळा! तुझी ताटातूट कशी रे झाली? डोहाळ्यापासून आजपर्यंत जें सुख दिलेंस तें स्वप्नासारखें कसें रे झालें? दहा महिने तुझा भार वाहिला तो व्यर्थच का? काय करूं? कोठें जाऊं? तूं माझा प्राण! तुझ्याशिवाय जगूं तरी कशी? बाळा! कोठें रे लपलास? हा बघ पान्हा फुटला आहे. उपजतांच नष्ट कसा झालास? तुझें कोडकौतुक तरी कांहीं घडलें का? हाय! माझें नशीब फुटलें. हाय दैवा! मूल झालें नाहीं तोंच नष्ट झालें, ही कोणाची बरें करणी? मागील जन्मीं मी कोणाच्या ठेवीचा अपहार केला असेल किंवा दुसऱ्याचा बाळ चोरला असेल म्हणूनच या जन्मीं माझें पुत्ररत्न नष्ट झालें. मीं कोणाच्या पुढचें ताट ओढलें असेल त्याचें हें फळ मला सांप्रत मिळालें आहे." असा शोक करीत वाऱ्यानें केळ पडावी त्याप्रमाणें राणी मूर्च्छित होऊन भूमीवर पडली.

राजाहि तें कळतांच तेथें आला व दुःखानें निःश्वास टाकणाऱ्या वत्सहीन धेनूप्रमाणें दिसणाऱ्या राणीकडे पाहून तोहि दुःखानें व्याकुळ होऊन शोक करूं लागला. "खंदकांनीं वेष्टित असे माझ्या नगराचे कोट, अडसरांसहित दरवाजे असलेले वाडे, माझें सैन्य, माझें मंत्रजाल व गुप्त राज्यव्यवस्था या सगळ्यांचा धिक्कार असो! कारण एकाचाहि येथें उपयोग झाला नाहीं. माझ्या जन्मयोगावरून अपत्याचा योग नाहीं असें माहीत असूनहि मीं व्यर्थ तपश्चर्या केली. कारण तिचा काय उपयोग झाला? दत्तात्रेयांच्या प्रसादानें मिळालेलें फळ अक्षय असतें, असें मीं ऐकलें आहे खरें; पण गुणवान् पुत्र मिळूनहि असें विघ्न कां यावें? श्रीदत्तात्रेया, दीनवत्सला! मला दुसरी गति नाहीं. तूंच माझें रक्षण कर."

अशा प्रकारें तीं उभयतां आत्मतत्त्वाच्या अज्ञानामुळें गौण आत्म्याविषयीं शरीरासंबंधीं शोक करीत दत्तात्रेयाकडे लक्ष लावून बसलीं. ईश्वराच्या ठिकाणीं भाव धरणारा भक्त, मग तो आर्त असो अगर अर्थार्थी असो अथवा इतर कोणीहि असो, तो नाश पावत नाहीं; कारण साक्षात् प्रभुच त्याचें रक्षण करीत असतो

आपलें चिंतन करणारा भक्त प्राग्जन्मींच्या वासनांमुळें तत्त्वापासून च्युत होत असला तरीहि तो त्याला अधःपातापासून वांचवितो. असा ईश्वरभक्तीचा महिमा आहे. त्याचा भक्त कधींहि नाश पावत नाहीं. त्याचा भक्त पूर्वी दुराचारी असला तरी भक्तीनें शुद्ध होऊन शेवटीं शांति मिळवितो. राजा मूळचा अर्थी भक्त होता. त्याला दत्तप्रसादानें पुत्ररूप अर्थ मिळाला; परंतु दैवयोगानें त्याला आर्त होण्याचा प्रसंग आला. सारांश, अशा मार्गानें त्याची भक्ति वाढली तेव्हां प्रभूंनीं त्याच्या उद्धारासाठीं नारदाला त्याच्याकडे पाठविलें.

वीणा वाजवीत व ईश्वरपर गायन करीत नारद आले तेव्हां सामोरे जाऊन राजानें सत्कारपूर्वक त्यांना आपलें दुःख निवेदन केलें. नारद हंसून म्हणाले, " अरे ! ज्याचें एकवार स्मरण केलें असतां सर्व दुःखांचा नाश होतो त्याचा तूं दास, नित्य त्याचें स्मरण करणारा भक्त आहेस मग तुझ्या संबंधांत तें खोटें ठरेल. निर्गुण असूनहि केवळ भक्तरक्षणासाठीं अत्रिपुत्ररूपानें जो प्रकट झाला त्याची तूं शेंकडों वर्षे भक्ति केलीस तरी शोकांतून पार पडला नाहींस ? अरे ! पुत्र, कलत्र व शरीर हीं सारीं नश्वर आहेत. तीं घेऊन काय करावयाचें ? हृदयांत अनुभवास येणाऱ्या आत्मरूप दत्तात्रेयाला शरण जा. आतां तूं ज्याच्यासाठीं शोक करीत आहेस तो तुझा पुत्र हुंडानें हरण केला असूनहि दैवयोगानें एका मुनिश्रेष्ठाच्या घरीं तो सुखानें नांदत आहे. तो विद्वान् झाला आहे. लवकरच हुंडाला ठार मारून तो पत्नीसमवेत परत येईल व पृथ्वीचें राज्य भोगून इंद्रपदाचा उपभोग घेईल." असें म्हणून नारदमुनि स्वर्गलोकीं गेले.

राजाहि आनंदित होऊन पत्नीकडे गेला व तिला नारदांनीं सांगितलेला सर्व वृत्तान्त निवेदन केला. 'प्रिये ! नारदांचें वचन सत्य आहे व दत्तात्रेयांचा वरहि सत्यच आहे. त्यांचा प्रसाद खोटा होणार नाहीं. तेव्हां शरीराचें शोषण करणारा शोक सोड. इंदुमतीनें तें संजीवनीसारखें भाषण ऐकून दत्तात्रेयांचें प्रेमभावानें, नम्र स्तवन केलें. "विश्व उत्पन्न करणारा परम पुरुष परमात्मा तूंच आहेस. संसाराला कारण जो अहंकारयुक्त जीव त्याचेंहि कारण तूंच आहेस. तथापि तूं केवळ शुद्ध सच्चिदानंद आहेस. अत्रिसुत म्हणून मायेनें प्रकट झालास, तो केवळ भक्तिमार्गाचा प्रसार करण्यासाठीं. मुक्तांना आनंद देणारा, केवळ स्मरणानें संसारसागरांतून उद्धरणारा व नमस्कारानें ईप्सित पुरविणारा जो तूं त्या तुझें मी भजन करीत आहें. तो तूं विश्वात्माच माझी सद्गति आहेस ! "

आयुराजानेंहि स्तवन केलें कीं, ' हे पुरुषाध्यक्षा, सद्गुरो दत्तात्रेया ! भवसंकटांतून माझें रक्षण करा. प्राण्यांना दुर्मिळ व सर्व सुखांचें आगर असें जें तुमचें अढळपद तें मला द्या. दुसऱ्या कशाचीहि मला इच्छा नाहीं. ह्याप्रमाणें त्या पतिपत्नींनीं प्रतिदिवशीं स्तवन करून शोकचिंतारहित अशी कालक्रमणा चालविली.'

इकडे वसिष्ठऋषींनीं नहुषाला हांक मारून म्हटलें, " तूं क्षत्रिय आहेस. हिंस्र पशूंना मारण्यासाठीं मृगयेला जा." तें ऐकून त्यानें " बरें आहे " असें म्हटलें. धनुष्य-बाण घेऊन गुरूंच्या आज्ञेप्रमाणें, त्यांना नमस्कार करून तो मृगयेला गेला. इतक्यांत त्यानें आकाशवाणी ऐकली कीं, " हा नहुष आयुराजा व इंदुमती यांचा पुत्र असून तो दैव-योगानें बालपणींच आईच्या वियोग झालेला व वसिष्ठऋषींनीं वाढविलेला असा आहे. याचे आईबाप कष्टी असून, अशोकसुंदरी याच्याशीं विवाह व्हावा म्हणून हुंडासुराच्या तुरुंगांत तपश्चर्या करीत आहे." अशी आकाशवाणी ऐकून तो चकित झाला. गुरु-जवळ येऊन त्यानें प्रणिपातपूर्वक तें वृत्त निवेदन केलें. त्यानंतर वसिष्ठऋषींनींहि प्रारंभापासूनचें सर्व वृत्त त्यास सांगितलें व म्हणाले, " आयुष्मन् नहुषा ! तूं वीर आहेस. धनुर्विद्येंत प्रवीण आहेस. श्रीदत्तात्रेय तुझें रक्षण करीत आहेत, तर जा; आणि हुंडासुराला ठार कर."

" आपल्या शिष्याचें रक्षण करा " असें म्हणत पायीं लागलेल्या नहुषाला उठवून, कुरवाळून व त्याची टाळू हुंगून वसिष्ठऋषि म्हणाले, " ब्राह्मण, पितर, देव, सूर्य व रोदसी म्हणजे पृथ्वी आणि आकाश तुझें अनिष्टापासून रक्षण करोत. शत्रुकृत दुष्ट प्रयोग तुझ्यावर न चालोत. सर्व प्रकारें विजयी हो ! " असा आशीर्वाद देऊन त्यांनीं त्याला निरोप दिला. नहुषानेंहि गुरूला वंदन करून श्रीदत्तात्रेयांचें स्मरण केलें व म्हणाला, " गर्भावस्थेपासून आजपर्यंत ज्यानें प्रेमानें माझें रक्षण केलें तो दत्तात्रेय मला विजय देऊन सांभाळो. माझा मार्ग सुगम व अन्नयुक्त असो. देवता माझें रक्षण करोत. सुदैवानें विजय मिळवून मी सुखानें परत येवो. इंद्रा ! रक्षणासाठीं योद्धे तुला हांक मारतात. मला जिथें भय वाटेल तिथें तूं अभय दे." असें म्हणून हुंडासुराला मारण्या-साठीं तो निघाला. तेव्हां देवांनीं पुष्पवृष्टि केली व आकाशांत दुंदुभीचे निनाद उमटूं लागले. हरिणें उजव्या दिशेनें जाऊन शुभ शकुन सुचवूं लागलीं.

नहुषाला रथ नाहीं असें पाहून इंद्रानें मातलीला हांक मारून म्हटलें, " रथाला घोडे जुंपून सर्व तयारीनें युद्धांत नहुषाच्या साहाय्यासाठीं लवकर जा." इंद्राच्या आज्ञेप्रमाणें मातलि आयुधांसहित रथ घेऊन नहुषाजवळ गेला व 'इंद्रानें मला पाठविलें आहे. कवच, बाण, धनुष्य, वगैरे साहित्यानें युक्त अशा दिव्य रथांत बसून हुंडाला मार ' असें म्हणाला. तें ऐकून नहुषानें रथाला नमस्कार केला व आंत बसून विहित मंत्रांनीं संनहन करून म्हणजे कवच वगैरे घालून हुंडासुराचा वध करण्याकरितां निघाला. किरीट, कवच, छत्र, रथ, धनुष्य व उत्तम सारथि यांनीं युक्त असा तो नहुष आकाशांतील सूर्याप्रमाणें शोभूं लागला.

अशोकसुंदरीला नहुषाच्या आगमनाची वार्ता समजतांच तिनें रंभेला त्याच्या-कडे पाठविलें. ती नम्रपणानें म्हणाली, " मी अशोकसुंदरीकडून आलें आहें. महाराज, ती फार दिवस हुंडाच्या बंदिवासांत आहे. तेव्हां हुंडाला मारून आपण तिचें पाणि-ग्रहण करावें." नहुष म्हणाला, " रंभे, तूं जा. मला मुळापासूनच सर्व समजलें आहे.

हुंडाला ठार केल्यावर मी देवीला भेटेन." तें ऐकून रंभा गेली व नहुषहि राक्षसाच्या वसतिस्थानाकडे गेला.

इतक्यांत साहाय्यासाठीं देवांचें सैन्य त्याला येऊन मिळालें. सिद्ध, चारण, गुह्यक, गंधर्व, विद्याधर, यक्ष व उरगादिकांचा कलकलाट ऐकून हुंडासुर भीतीनें आपल्या एका सेवकास म्हणाला, "दूता, जरा पुढें हो. कोण रिपु आला आहे? त्याचें बळ, तयारी वगैरेची माहिती काढून ये. म्हणजे त्याचा प्रतिकार करणें सोयीचें होईल." दूत जाऊन प्रयत्नानें बातमी काढून आला व म्हणाला, "महाराज! आयुराजाचा शूर पुत्र इंद्राच्या रथांत बसून युद्धासाठीं आला आहे." तें ऐकून राक्षस क्रुद्ध झाला व बायकोला, दासीला, आचाऱ्याला, "तें बालक मारलें होतें कीं नाहीं ?" असें पुन्हां पुन्हां विचारूं लागला. ती सारी मंडळी म्हणाली, "तें बालक मारलें व आपण तें खाल्लें हें खरें आहे." तें ऐकून राक्षस म्हणाला, "तर मग दैवच फिरलें. आतां मी काय करूं ?" नंतर त्यानें सर्व दैत्यांना बोलावून उग्रतेनें निक्षून सांगितलें कीं, "माझ्याबरोबर सर्व लढाईला चला. जे भ्याडपणानें कुचराई करतील त्यांना मी क्षणार्धात ठार मारीन !" असें म्हणून राक्षसांना बरोबर घेऊन तो तयारीनें युद्धासाठीं बाहेर पडला.

## हुंडासुराचा वध

रथांतून हुंडानें इंद्राच्या रथांत बसलेल्या स्वरिपूला पाहिलें. तो नहुष प्रखर सूर्याप्रमाणें तेजस्वी दिसत होता. हुंडानें आपले सेनानायक पाठविले. ते शूल, परशु, वगैरे विविध शस्त्रास्त्रांनीं लढूं लागले. त्या महारथींनीं प्रतिकाराला न जुमानतां देवांना घाबरून सोडलें. देव पीडित झाले. हें पाहून नहुषानें ऐंद्र धनुष्य ओढून दोरीच्या टणत्कारानें दैत्यांना भ्रांत करून लढाईला सुरुवात केली. मेघ जसा जलधारांचा वर्षाव करतो त्याप्रमाणें त्यानें दैत्यांवर बाणवर्षाव केला. त्या नहुषाच्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध होऊन दानव बलिष्ठ असूनहि पटापट पडूं लागले. दिवस व रात्र यांचा जेथें भेद कळत नव्हता अशा तुंबळ युद्धांत एकटा नहुष अनेकांशीं लढत होता. त्यानें कोणाचीं धनुष्यें तोडिलीं. कोणाचे सारथि व घोडे मारून रथ मोडले, कोणाचे हात उडविले तर कोणाचीं मस्तकें छेदिलीं. कोणाचे दोन तुकडे केले तर कोणाला मधोमध चिरलें. कोणाला ठार केलें तर कोणी रणांतून पळ काढला. सारांश, असुरांचे हत्ती-घोडे मेले. रथ मोडले व मांसरूपी चिखलानें युक्त अशा रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. हुंडाच्या सैन्यांत मोठा हाहाकार उडाला. त्या समयीं "राजा तुझें कल्याण असो. विजयी हो." असे देव व ऋषि यांनीं उद्गार काढले. आपल्या सैन्याचा नाश होत आहे व शत्रु बलशाली होत आहे असें पाहून हुंड संतापून नहुषासमोर येऊन ओरडून म्हणाला, "अरे मानवा, फार गर्जूं नकोस. हा मी पराक्रमी हुंड उभा ठाकलों आहें. या देवांसहित तूं आतां परत जिवंत जात नाहींस. मी जगाचा शास्ता तुला माहीत नाहीं काय ? जर जगावें अशी इच्छा असेल तर शस्त्र खालीं ठेवून शरण ये."

नहुष म्हणाला, "सोमवंशीयांची अशी वहिवाट नाहीं. तूं जर शूर म्हणतोस तर युद्ध कर. उगीच वडबड कशाला करतोस ? हा मी स्थिर उभा आहें. मी तुला ठार करण्यासाठीं आलो आहें. माझ्या आईला तूं फार दुःख दिलेंस व माझाहि प्राण घेण्याचा प्रयत्न केला होतास. आतां तुझे प्राण घेणारा हा मी तुझ्यापुढें उभा आहें. भगवान् श्रीदत्तात्रेय हे माझे रक्षक आहेत. माझ्यावर चालून येण्याचें साहस कोणता मूर्ख करील ? " असें म्हणून धनुष्य आकर्ण ओढून त्यावर बाण ठेवले व राक्षसाच्या हाल-चालीला अनुलक्षून राजा मातलीला म्हणाला, "मातले, तो पहा मायावी राक्षस आपल्या मायेनें निरनिराळीं वळणें घेत आहे. त्याच्या धोरणानें रथ चालव. आज मी त्याला मारतों."

त्याप्रमाणें मातलीनें राक्षसाच्या समोर रथ उभा केला. तेव्हां हुंडानें सूर्या-सारख्या प्रखर नहुषाकडे पाहिलें. याप्रमाणें पवित्रे टाकीत परस्परांवर जय मिळ-विण्यासाठीं त्यांचें विविध शस्त्रास्त्रांनीं युद्ध चाललें. तें युद्ध पाहून देव व ऋषि चकित झाले. हुंडानें नहुषावर वारंवार अस्त्रप्रयोग केले. तेव्हां सिद्धांती ज्याप्रमाणें एकाच वाक्यांत अनेक उक्ति खोडून काढतो, त्याप्रमाणें नहुषानें एका बाणानेंच हुंडाच्या अस्त्रांचा नाश केला. शेवटीं नहुषाच्या बाणांनीं विद्ध असा तो राक्षस रक्तबंबाळ होऊन फुटलेल्या पळसाप्रमाणें शोभूं लागला. त्यायोगें चाल करीत असतां त्याला मूर्च्छा येऊं लागली. त्याहि स्थितींत त्यानें धैर्यानें नहुषाला बाणांनीं आच्छादित करून टाकलें. नहुष बाणांच्या वेष्टनांत सांपडलेला पाहून इंद्रादि देव व ऋषिमुनि खिन्न झाले. त्यानंतर नहुषानें अल्पावधींतच हुंडाचें धनुष्य, रथ, घोडे व सारथि या सर्वांचा नाश केला व आपलें हस्तलाघव त्याच्या निदर्शनास आणिलें. तेव्हां हुंडानें दुसऱ्या रथांत बसून नहुषावर तीक्ष्ण शक्तीचा प्रयोग केला; पण नहुषानें एका क्षणांतच बाणानें तिचे तुकडे तुकडे केले. नंतर गुरूंचें व श्रीदत्तात्रेयांचें स्मरण करून धनुष्य आकर्ण ओढून नहुषानें त्याला दोन बाण जोडले व त्या अर्धचंद्राकृति बाणांनी हुंडाचे खांद्यापासून दोन्ही हातच तोडून टाकले. तेव्हां हुंड मोठ्यानें ओरडून नहुषाला खाण्यासाठीं धांवला. तेव्हां नहुषानें पुन्हां दोन बाण सोडून त्याचे पाय तोडले. तशाहि स्थितींत अनावर होऊन तो सर्पाप्रमाणे नहुषावर धांवून गेला. शेवटीं नहुषानें त्याच्यावर ऐंद्रशक्ति सोडली. त्या योगानें तो हुंड तत्काळ गतप्राण होऊन पडला. तो पडल्यावर उरलेले दैत्य त्रस्त होऊन पाताळांत गेले. तेव्हां पुष्पवृष्टि करून नहुषाच्या आज्ञेप्रमाणें देव पूर्वींप्रमाणें अधिकारारूढ झाले. हुंडासुराचा कांटा निघाल्यामुळें त्यांना हर्ष झाला.

इतक्यांत अशोकसुंदरी रंभेसह नहुषाच्या जवळ आली. "मी तुझी धर्मपत्नी आहें. माझ्याशीं विवाह कर" असें ती त्याला म्हणाली. नहुष म्हणाला, "गुरूंच्या इच्छेप्रमाणें करीन." त्यावर "बरें आहे" असें म्हणून ती व रंभा त्याच्या रथांत बसल्या. नंतर नहुषानें गुरूंच्या संनिध येऊन सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून

वसिष्ठऋषींना आनंद झाला व त्यांनीं सुमुहूर्तावर त्या दोघांचा विवाह केला व त्यांची आईवडिलांकडे रवानगी केली. गुरूंच्या पाया पडून नहुष पत्नीसमवेत रथांत बसला व आईबापांना भेटून नमस्कारपूर्वक त्यांचें सांत्वन केलें. रंभेला व मातलीला रथासहित स्वर्गलोकीं रवाना केलें.

रति-मदनाच्या जोड्यासारखा तो स्नुषा-पुत्राचा जोडा पाहून आयुराजा व इंदुमती यांना दत्तात्रेयांच्या वराची व गुरूंच्या वचनाची आठवण होऊन आनंद झाला नंतर आयुराजानें त्याला राज्याभिषेक केला. पुढें तो सम्राट् होऊन त्याच देहांत त्याला इंद्रपदाचाहि बहुत वर्षें लाभ झाला. आयु राजानें पुढें वानप्रस्थाश्रम स्वीकारला व इंदुमतीसह तो वनांत गेला. तेथें श्रीदत्तात्रेयप्रभूंचें नित्य ध्यान करून त्यांच्या कृपेनें अंतीं सायुज्य मुक्तीला प्राप्त झाला. असा हा श्रीदत्तात्रेयांच्या भक्तीचा महिमा आहे. त्यांचा कोणताहि भक्त नाश पावत नाहीं. सारांश, त्यांचा सकाम भक्तहि एकनिष्ठ भक्तीनें शुद्ध होऊन क्रमानें मुक्तीला जातो. मग निरपेक्ष बुद्धीनें भक्ति करणारा धन्य होईल यांत नवल काय ?

## यदुराजावर दत्तात्रेयांचा अनुग्रह

सोम वंशामध्यें ययाति या नांवाचा एक सुविख्यात राजा होऊन गेला. शुक्राचार्यांची कन्या देवयानी हिच्यापासून त्याला यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र झाले होते. त्याचप्रमाणे दैत्यांचा राजा वृषपर्वा याची कन्या शर्मिष्ठा हिच्यापासून त्याला अनु, द्रुह्यु आणि पुरु असे तीन पुत्र झाले होते. शुक्राचार्यांच्या शापामुळें ययाति राजाला अकालीं जरा म्हणजे वार्धक्य प्राप्त झालें असतां तो शुक्राचार्यांना शरण गेला व त्यानें क्षमायाचना केली. तेव्हां शुक्राचार्य म्हणाले, "तूं आपलें वार्धक्य आपल्या मुलाला दे आणि त्याचें तारुण्य तूं स्वतःला प्राप्त करून घे, व यथेच्छ विषय भोगीत रहा." ययातीनें यदूला " माझें वार्धक्य घेऊन तूं आपलें तारुण्य मला दे, " असें सांगितलें, पण यदूनें तें ऐकलें नाहीं. यदू हा अत्यंत विचारवंत होता. वडील हे आपलें तारुण्य घेतील व आपल्याच आईशीं विषय भोगीत राहतील. यामध्यें एक प्रकारें मीच आपल्या मातेशीं रमल्यासारखें होईल, म्हणून त्यानें वडिलांची मागणी मान्य केली नाहीं. ययाति राजा यदूवर रागावला आणि त्यानें यदूला राज्याचा वांटा न देतां हाकलून लावलें. पुढें सर्वांत धाकटा असलेला पुरु यानें मात्र वडिलांच्या आज्ञेला मान देऊन आपलें तारुण्य वडिलांना अर्पण केलें. यामुळें ययाति राजा संतुष्ट झाला व आपलें सर्व राज्य त्यानें पुरूला देऊन टाकलें. पुरूनें त्यांतला कांहीं भाग यदूला दिल्यामुळें यदू त्या भागाचा अधिपति बनला. यदू हा अत्यंत धर्मात्मा असून तो मोठा नीतिमान् होता. तो दत्तात्रेयांचा मोठा भक्त असून त्यानें निरंतर दत्तात्रेयांची भक्ति केली. तो सतत दत्तात्रेयांचें पूजन करीत असे. दत्तात्रेयांच्याच कृपेनें याच्या वंशांत श्रीबलराम आणि श्रीकृष्णप्रभु यांचे अवतार झाले असल्याचें दत्तपुराणामध्यें वर्णन केलेलें आहे.

एकदां तो कावेरी नदीच्या परिसरांत डोंगराळ प्रदेशामध्यें फिरत असतां त्याला सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें अवधूतरूपानें दर्शन झालें. अवधूतांची ती श्यामल कांति असलेली, दिव्य, तेजस्वी, तरुण आणि जटाधारी मूर्ति पाहून यदुराजानें अवधूताला साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला, "महाराज! आपली मुद्रा अत्यंत आनंदी दिसत आहे. मुखावर समाधानाचें द्योतक असें स्मितहास्य झळकत आहे. आपल्या संग्रहाला कमंडलु आणि कौपीन यांशिवाय अधिक कांहीं दिसत नाहीं. शरीराची सुदृढता आणि मुखकांति व प्रसन्न नेत्र हे आपलें जीवन सुखी असल्याचें सुचवीत आहेत. गृहस्थाश्रमी लोक सुखासमाधानासाठीं रात्रंदिवस धडपडत असतात. आटोकाट प्रयत्न करूनहि त्यांना तें मिळत नाहीं. तुम्ही मात्र एखाद्या लहान मुलाप्रमाणें सुखदुःखाचा विचार न करतां या निर्जन अरण्यांत निर्भयपणानें संचार करीत आहां. तुमच्याकडे पाहिल्यानंतर तुम्ही ज्ञानी, कुशल आणि बुद्धिमान् असे दिसत आहां. कांहीं प्रयत्न न करतां व कशाचीहि इच्छा न करतां तुम्हांला एवढें समाधान कसें लाभलें आणि तुम्हांला हें ज्ञान कसें मिळालें, हें मला कृपा करून सांगा."

यावर अवधूत म्हणाले, "हे यदुराजा, माझ्या सुखाचें व समाधानाचें मूळ कशांत आहे तें मी तुला सांगतों ऐक. मी या सृष्टीमध्यें स्वच्छंदपणें संचार करीत असतांना जे जे बोधप्रद प्रसंग अथवा वस्तु माझ्या दृष्टीस पडतील त्यांच्यापासून मी योग्य तो बोध घेतों व तेच माझे गुरु आहेत असें मानून त्यांच्यापासून घेतलेला बोध मी आपल्या आचरणांत आणीत असतों. हेंच माझ्या सुखाचें व समाधानाचें मूळ आहे; आणि हेंच माझ्या निर्मळ ज्ञानाचेंहि साधन आहे. हे राजा, ते माझे गुरु आणि त्यांच्यापासून मीं घेतलेला बोध मी तुझ्या कल्याणासाठीं तुला सांगतों ते तूं ऐक. आणि त्याप्रमाणें वाग म्हणजे तूंहि सुखी होशील."

पृथिवी वायुराकाशमापोऽग्निश्चन्द्रमा रविः।
कपोतोऽजगरः सिन्धुः पतङ्गो मधुकृद्‌गजः ॥ ३३ ॥
मधुहा हरिणो मीनः पिङ्गला कुररोऽर्भकः।
कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥ ३४ ॥

— श्रीमद्‌भागवत ११.७–३३–३४

चोवीस गुरूंची नांवें — १ पृथ्वी, २ वायु, ३ आकाश, ४ पाणी, ५ अग्नि, ६ चन्द्र, ७ सूर्य, ८ कपोत, ९ अजगर, १० समुद्र, ११ पतंग, १२ मधमाशी, १३ हत्ती, १४ भुंगा, १५ हरिण, १६ मासा, १७ पिंगला (या नांवाची वेश्या), १८ टिटवी, १९ बालक, २० कुमारी, २१ बाण करणारा (लोहार), २२ साप, २३ कातीण आणि २४ भिंगुरटी (कुंभारीण माशी).

कोणत्या गुरूपासून काय काय बोध घेतला तें मी तुला संक्षेपानें सांगतों, ऐक; असें म्हणून श्रीदत्तात्रेयांनी यदुराजाला जो उपदेश केला तो वाचकांनीं

श्रीदत्तात्रेय षोडशावतारजयंतीप्रकरणांतील १५ व्या दिगंबर अवताराच्या चरित्रांत अवश्य पहावा.

## राजा कार्तवीर्य आणि भगवान् श्रीदत्तात्रेय

पूर्वी कृतयुगामध्यें कृतवीर्य या नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. तो इंद्रासारखा पराक्रमी होता. त्याला शंभर पुत्र झाले होते; परंतु दैवयोगानें त्यांना च्यवन ऋषींनीं शाप देऊन भस्मसात् करून टाकलें. तेव्हां राजा कृतवीर्य देवांचे गुरु असलेल्या बृहस्पतीला शरण गेला. तेव्हां गुरूंनीं त्याला एक अघनाशक व्रत करावयास सांगितलें.

## अघनाशक व पुत्रप्रद व्रत

अनपत्यता म्हणजे पुत्र नसणें, गर्भस्राव होणें, गर्भपात होणें, अथवा मेलेलें मूल उपजणें अथवा उपजून मरणें, भूतांची बाधा होणें, ग्रहांची अथवा रोगांची पीडा होणें अशांपैकीं कांहीं झालें तरी रविवारयुक्त सप्तमीच्या दिवशीं पुढें सांगितल्या-प्रमाणें शांत करावी. व्रताचा संकल्प करून आचार्यांना पाचारण करावें. नंतर आचा-र्यानें भूमिशुद्धि करून त्या ठिकाणीं स्थंडिलावर यथाशास्त्र अग्नीची स्थापना करावी. स्थंडिलाच्या ईशान्य दिशेला कलशाची स्थापना करून त्यावर सूर्य, रुद्र व सप्तमातृका यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापन कराव्यात, व त्यांची पूजा करावी. पुढें यथाविधि सप्त-कुंभांची स्थापना करून अन्वाधान करावें. अर्थात् अग्नीची स्थापना करून यथाशास्त्र अग्नीला समिधा अर्पण कराव्यात. पायसादिक द्रव्यांनीं हवन करावें. नंतर स्विष्टकृत म्हणजे हवनांतील एक अंग करून बलिदान करावें. पूर्णाहुति झाल्यानंतर मुलेंबाळें असलेल्या वृद्ध सुवासिनींची पूजा करावी व त्यांनीं उत्तरेकडे तोंड करून कलशांत असलेलें पाणी देवाच्या ताह्मणांत घेऊन अभिषेक करावा. अभिषेकाचे मंत्र ब्राह्मणांनीं म्हणावेत. त्या मंत्रांचा अभिप्राय असा — "हे बालक दीर्घायुषि होवो. सूर्य-चंद्रयुक्त सर्व ग्रह व नक्षत्रगण याचें रक्षण करोत. लोकपालांसहित इंद्र, ब्रह्मा, विष्णु व शंकर तसेच इतरहि सर्व देव याचें रक्षण करोत. कुमाराला अग्नीपासून अथवा शनीपासून पीडा न होवो. याला आकडी अथवा मुडदूस यांसारखे रोग न होवोत. याचे माता-पितरहि सुरक्षित असोत." अशा प्रकारें अभिषेक झाल्यावर शुभ्र वस्त्र परिधान करावें. अभिषेकाच्या वेळीं अंगावर असलेलें वस्त्र आचार्यांस अर्पण करावें. नंतर देवतांचें उत्तरपूजन करून वर्णी दिलेल्या ब्राह्मणांचेंहि पूजन करावें. आचार्यांस सौवर्ण कालमूर्तींचें दान करून व दक्षिणा देऊन यथाशक्ति दांपत्यभोजन घालावें. नंतर ब्राह्मणाकडून मंत्राक्षतापूर्वक आशीर्वाद घ्यावा. मंत्राचा अर्थ असा, "हा कुमार व ही पुत्रवती शंभर वर्षें सुखानें जगोत. यांचें सर्व अनिष्ट नष्ट झालें आहे. विष्णुप्रमुख सर्व देव यांचें सर्व संकटांपासून रक्षण करोत." याप्रमाणें आशीर्वाद घेऊन यजमानानें कर्म ईश्वरार्पण करावें आणि नंतर प्रसाद म्हणून शेषान्नाचें भोजन करावें. याप्रमाणें

शुभ मासांतील सप्तमीच्या दिवशीं व्रत केलें असतां सर्व प्रकारची पीडा दूर होते. " राजा, तूं हें व्रत कर म्हणजे तुला सम्राट् पुत्र होईल." असें सांगून देवांचे गुरु बृहस्पति हे आशीर्वाद देऊन निघून गेले.

कृतवीर्याच्या महाराणीचें नांव शीलधरा असें होतें. तिनेंहि पण आपल्याला गुणवान् पुत्र व्हावा म्हणून मैत्रेयीला एखादें उत्तम व्रत सांगण्याची विनंति केली. मैत्रेयी ही याज्ञवल्क्य महर्षींची पत्नी होती. ती महाराणीला म्हणाली, 'उत्तम नि गुणवान पुत्र होण्याकरितां मी तुला श्रीदत्तात्रेयांनीं सांगितलेलें व्रत सांगतें. तें तू कर. तें व्रत मार्गशीर्ष पौर्णिमेपासून प्रत्येक महिन्याच्या पौर्णिमेस असें एक वर्ष करावयाचें असतें. त्या व्रताला अनंतक व्रत असें म्हणतात.

## अनंतक व्रत

पौर्णिमेच्या दिवशीं स्नान करून संकल्प करावा. उपाध्यायाकडून स्वस्तिवाचन, पुण्याहवाचन आणि नांदीश्राद्ध करावें. पुन्हां स्नान करून पंचगव्याचें प्राशन करावें. त्याच्यामुळें पापांचा नाश व देहाची शुद्धि होते. त्यानंतर अक्षर-परमात्म्याची पूजा करावी. मंत्राचा अर्थ, " सर्व कामनांचें फल अनंत भगवान् आहे. तोच अनंत. उत्तम पुत्र, सौभाग्य व इतर इष्ट असलेलें सर्व कांहीं देवो. पूजकाला अखंड पुण्याची जोड करून देणारा अनंत या महाव्रतानें संतुष्ट होवो." असें म्हणून अनंताची पूजा करावी. अनंत शब्दाचे अर्थ भगवान् विष्णु, कृष्ण, बलराम, शंकर इत्यादि अनेक आहेत. इष्ट देवतेची पूजा झाल्यानंतर रात्रीं हविष्यान्नाचें सेवन करावें. मार्गशीर्ष मासापासून क्रमानें, प्रत्येक महिन्यास वामपाद, वामकटि, वस्त्र, खांदे, दक्षकटि (म्हणजे कमरेची उजवी बाजू), दक्षपाद (म्हणजे उजवा पाय), कंठ, जानु म्हणजे गुढगे, ऊरु म्हणजे मांड्या, गुह्य म्हणजे गुप्तस्थान, हृदय व शीर्ष म्हणजे डोकें याप्रमाणें देवतेच्या अंगांचें पूजन करावें. अंगपरत्वें अनंत नांवानें शीर्षाची म्हणजे मस्तकाची पूजा करावी. अर्थात् देवाच्या मस्तकाला उजव्या हाताच्या बोटांनीं स्पर्श करून अक्षता अथवा पुष्प समर्पण करावें. "अनन्ताय नमः शीर्षं पूजयामि" असें म्हणावें. 'पुढें सर्वात्मने नमः पादौ पूजयामि' असें म्हणावें व पायांवर अक्षता, पुष्प अथवा तुलसीपत्र समर्पण करावें. याचप्रमाणें पुढें निर्दिष्ट केलेल्या अंगांची पूजा करावी. 'संकर्षणाय नमः ऊरु पूजयामि, दिव्यास्त्रधारिणे नमः बाहू पूजयामि, श्रीकंठाय नमः कंठं पूजयामि, कामाय नमः कटी पूजयामि (कमरेचा उजवा व डावा भाग), शेषाय नमः जानुनी पूजयामि (दोन्ही गुढगे), विश्वमुखाय नमः विश्वं पूजयामि' अशा रीतीनें अंगांची पूजा करावी. तसेच प्रत्येक महिन्यास संकर्षण व वासुदेव या नांवांनीं मुसळ व नांगर यांची पूजा करावी. याप्रमाणें एक वर्ष तूं व्रत कर. व्रताच्या पूर्वी चातुर्मास्यांत गोमूत्र प्राशन करावें. व्रताच्या समाप्तीनंतर बारा उदकुंभ (म्हणजे पाण्यानें भरलेले कलश), देऊन गोदान करावें व ब्राह्मणभोजन घालावें. याप्रमाणें व्रत केलें असतां सर्व मनोरथ पूर्ण करणारा

भगवान् श्रीअनंत संतुष्ट होतो. तर हे शीलधरे, तूं "तूं हें व्रत कर म्हणजे तुला दीर्घायुषि व गुणवान पुत्र होईल." असें सांगून श्रीयाज्ञवल्क्य ऋषींची पत्नी मैत्रेयी ही सत्काराचा स्वीकार करून निघून गेली.

राणीनेंहि वर सांगितलेल्या व्रताचें आचरण केलें. त्यायोगें भगवान् श्रीदत्तात्रेय संतुष्ट झाले. ते आपल्या अत्युज्ज्वल रूपानें राणीच्या स्वप्नांत येऊन हंसून म्हणाले "तूं व्रत केलेंस हें ठीक झालें. या व्रताच्या योगानें याच जन्मीं तुला सप्तद्वीपांवर सत्ता चालविणारा माझ्यासारखा स्मृतिगामी व समर्थ असा पुत्र होईल, याविषयीं संशय धरूं नकोस." असें स्वप्न पाहून राणी शीलधरा जागी झाली व तिला अत्यंत आनंद वाटला. तिनें तें स्वप्न आपल्या पतीला सांगितलें. तोहि आनंदित झाला. त्यानंतर त्यानें पुंसवनादिक विधि केले. गर्भाधान, पुंसवन, जातकर्म, नामकरण इत्यादि अनेक संस्कार करावयाचे असतात. त्यांपैकी पुंसवन हा एक संस्कार आहे. त्यानंतर यथाकाल रवि, शुक्र, शनि, मंगळ इत्यादि पांच ग्रह उच्चस्थानीं असतां राणी प्रसूत झाली व उत्तम भाग्यानें युक्त असा पुत्र जन्मास आला. त्या वेळीं सर्वत्र आनंदी आनंद झाला. दिशा निर्मळ झाल्या. आकाश निरभ्र झालें. आकाशांतून पुष्पवृष्टि झाली. अप्सरा नृत्य करूं लागल्या. गंधर्व गाऊं लागले. सिद्धांनीं त्या बालकाला "आयुष्मान् हो" असा आशीर्वाद दिला. ज्योतिषांना बोलावून जातकर्मादि केलें. ब्राह्मणांना गायी भूमि व सुवर्ण यांचें दान केलें. ज्योतिषी म्हणाले, "राजा, हा तुझा पुत्र वैभवशाली आहे. पुढें तपोबलानें श्रीदत्तात्रेयांची संपूर्ण कृपा याजवर होईल. याच्या नामस्मरणानेंच हरवलेली वस्तु सांपडेल. हा सप्तद्वीपांचा राजा होऊन दत्ताप्रमाणें स्मृतिगामी होईल. पंचाऐंशीं हजार वर्षें हा चक्रवर्ती होऊन राज्य करील. अनंत व्रताच्या प्रभावामुळें हा निरंतर विजयी होईल आणि सूर्यव्रताच्या पुण्यानें रोगरहित होऊन लाख वर्षें जगेल." असें सांगून ज्योतिषी आपआपल्या घरीं गेले.

राजानें सोळाव्या दिवशीं मुलाचें अर्जुन असें नांव ठेवलें. पुढें कालांतरानें त्या कृतवीर्य राजानें इहलोकाची यात्रा संपविली. पौरजनांनीं नंतर अर्जुनाला राज्यसूत्रें हातीं घेण्याची विनंति केली. तेव्हां तो सुविद्य आणि शिक्षणसंपन्न असूनहि "मी परिणामीं नरक देणारें राज्य करणार नाहीं." असें म्हणाला, पुढें कारण दाखवीत तो म्हणाला, "भूमीचा सहावा अंश आणि व्यापारावरील बारावा अंश कररूपानें राजानें घ्यावा, असें जें सांगितलें आहे तें प्रजेच्या संरक्षणाकरितां सांगितलेलें आहे. तेव्हां याप्रमाणें कर घेऊन जर राजनीतीप्रमाणें चोरांपासून व दरोडेखोरांपासून प्रजेचें रक्षण करतां आलें नाहीं, शिक्षेला पात्र असणाऱ्या अपराध्यांस शासन झालें नाहीं अथवा निरपराध मनुष्याला शासन झालें तर तो चैनींत लोळणारा कर्तृत्वहीन राजा अधोगतीला जातो. तेव्हां असा हा राजधर्म असल्यामुळें मी एकटा दुसऱ्यावर विश्वास ठेवून त्या धर्माचें यथायोग्य फल कसें मिळवूं शकणार ?" असें कार्तवीर्य अर्जुनाचें प्रौढ भाषण ऐकून महर्षि गर्गाचार्य म्हणाले, "जर तुला असें वाटत असेल तर तूं

द्वंद्वातीत अवस्थेंत स्वभक्तरक्षणासाठीं नित्य संचार करणाऱ्या अवधूतकुलमुकुटमणि असलेल्या सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना शरण जा. ते प्रसन्न झाले असतां आपल्या योगप्रभावानें तुला राज्यशासनासाठीं लागणाऱ्या धर्माचा व शक्तीचा लाभ करून देतील. त्या समदर्शी महात्म्याचा आश्रम सह्याद्रीवर माहुरगडाजवळ आहे. हा अत्रि-पुत्र, हे अनसूयेच्या उदरीं आलेलें रत्न म्हणजे साक्षात् भगवान् विष्णूच होय. तो भक्तांच्या सर्व कामना पूर्ण करणारा आहे. त्याला तूं प्रयत्नें करून प्रसन्न करून घे. म्हणजे तो तुझ्यावर योगज्ञानाला अनुग्रह करील. त्यायोगानें तुला बहुविध कार्यें सहज करण्याचें सामर्थ्य मिळून इष्टसिद्धींचाहि लाभ होईल. पूर्वी देवांचा राजा असलेल्या इंद्रानेंहि दत्ताचीच आराधना केली व दत्ताच्याच कृपेनें जंभासुराचा वध करून राज्य परत मिळविलें. आजमितीसहि तो, देव आणि देवर्षि यांच्या समवेत त्याची सेवा करीत असून त्यायोगानें स्वर्गाच्या राज्याचा निष्कंटक उपभोग घेत आहे. कुमति असलेल्या लोकांना या देवाचें आराधन दुःसाध्य आहे, परंतु सद्‌बुद्धि असलेल्या लोकांना हा लवकर वश होणारा आहे. कारण त्यांच्याकडे तो आत्मविश्वासानें पहातो. त्याची दिनचर्या मोठी लोकविलक्षण आहे. तो आठवण करावी तेथें संनिध असतो. त्याची भक्ति केली असतां काय मिळणार नाही ? तोच या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा आहे. त्यालाच भक्तिपूर्वक शरण जा."

हें ऐकून कार्तवीर्य अर्जुन म्हणाला, "अशा प्रभाववान् असलेल्या दत्ताची सेवा कशी करावी तें मला सांगा. माझी श्रद्धा जडली आहे. मी आपण सांगाल त्याप्रमाणें सेवा करीन." यावर मुनिश्रेष्ठ श्रीगर्गाचार्य म्हणाले, "दृढश्रद्धा आणि अनन्यभक्ति अंतःकरणांत ठेवून श्रीदत्तात्रेयांच्या चरणीं शरण जावें. साष्टांग प्रणिपात करावा. हात जोडून नम्रपणानें 'मला आपण पदरांत घ्या. आश्रय द्या,' अशी प्रार्थना करावी. त्यांची अनुमति घेऊन त्यांच्याच जवळ वास्तव्य करावें. रोज पहांटें त्यांच्या अगोदर उठावें. शुचिर्भूत होऊन प्रातःस्मरण करावें. गुरुदेव उठल्यानंतर त्यांचें अंथरूण काढावें. सडासंमार्जन करून भोंवतालची जागा स्वच्छ करावी. गुरुदेवांना हातपाय धुण्यास पाणी द्यावें. आपण स्नान करावें व गुरुदेवांनाहि स्नान घालावें. वस्त्रें धुऊन स्वच्छ करावींत व तीं वाळत घालावींत. धुतलेलीं शुचिर्भूत वस्त्रे परिधान करण्यास द्यावींत. विलेपनासाठीं भस्म आणि गंध अर्पण करावें. गळ्यांत रुद्राक्ष, स्फटिक, प्रवाळ व मौक्तिक यांच्या माळा घालाव्यात. पुष्पमालाहि समर्पण करावी. पायावर आणि मस्तकावर तुलसीपत्र आणि पुष्पें समर्पण करावींत. त्यानंतर सुगंधि द्रव्यांचा धूप घालावा. तुपाचा दिवा लावून नीरांजन करावें. प्यावयास दूध आणि खावयास फळेंहि द्यावींत. उत्तम जल अर्पण करावें. त्यांच्या इच्छेप्रमाणें तांबूल, अत्तर इत्यादि अर्पण करावें. त्यानंतर सेवेंतला मुख्य धर्म म्हणजे ते सांगतील त्याप्रमाणें वागावें. त्यांची आज्ञा प्रमाण मानून त्यांच्याच सान्निध्यांत त्यांच्याच इच्छेप्रमाणें वागत असावें. माता-

पिता, देव आणि गुरु सर्व कांही तेच आहेत असें समजून त्यांच्या जवळ राहावें. ही खरी त्यांची सेवा होय.

## जंभासुराचा वध

एकदां दैत्यांसह जंभासुर व देवांसह इंद्र यांच्यामध्यें स्वर्गासाठीं युद्ध सुरू झाले. त्यांत दैत्यांनीं देवांचा पराभव केला. तेव्हां देव सुरगुरुंकडे गेले आणि पुढें काय करावें म्हणून विचारूं लागले. त्यांना आश्वासन देत सुरगुरु म्हणाले, "तुम्ही दत्तात्रेयांना शरण जा म्हणजे तुमचें कार्य होईल."

नंतर देवांसमवेत इंद्र दत्तात्रेयांच्या आश्रमांत गेले. तेथें त्यांना भगवंताची अतर्क्य मूर्ति दृष्टीस पडली. भगवान् दिगंबर असून अंकावरहि वारुणी प्राशन करीत असलेली नग्न स्त्री होती. असें स्वरूप पाहूनहि बृहस्पतीनें सांगितल्या-प्रमाणें देवांनीं दत्तात्रेयांच्या एकनिष्ठ सेवेला प्रारंभ केला. अशा रीतीनें त्यांनीं पुष्कळ सेवा केली; तेव्हां दत्तात्रेय म्हणाले, 'तुम्हांला काय पाहिजे आहे तें सांगा.'

यावर देव म्हणाले, "महाराज, जगत्प्रभो ! जंभासुर नांवाचा दैत्य अत्यंत उन्मत्त झाला असून त्यानें स्वर्ग जिंकला व आम्हांला स्वर्गांतून हांकलून लावलें आहे. तरी आमच्या संरक्षणाचा व त्याच्या नाशाचा प्रभूंनी विचार करावा. तुमच्या शिवाय आमचें रक्षण दुसरें कोण करणार ?"

तेव्हां दत्तात्रेय म्हणाले, "मी तर पतित आणि भ्रष्ट आहें. माझ्या हातून काय होणार ?"

तेव्हां देव म्हणाले, "आपण तर ज्ञानदीप आहां. आपणांस पापाचा स्पर्श कसा होईल ? ही स्त्री म्हणजे आपलीच विद्या. हो सद्गति देणारी आहे. सूर्याचे किरण विप्रावर अथवा चांडाळावर पडले तरी उभयपक्षीं ज्याप्रमाणें पुण्यपापाचे धनीहोत नाहींत त्याप्रमाणेंच तुमची ही मायाप्रकृति निर्लेप आहे." दत्त म्हणाले, "ठीक आहे. तर मग जा. दैत्यांना युद्धाचें आवाहन देऊन येथें घेऊन या. उशीर लावूं नका."

तेव्हां देव मोठ्या आनंदाने दैत्यांवर चाल करून गेले. दैत्यहि पण त्यांच्याशीं विविध शस्त्रास्त्रांनी लढूं लागले. शेवटीं दैत्यांच्या भीतीनें देवांनीं पळ काढला. देव पुढें व दैत्य मागें अशा स्थितींत ते दत्तात्रेयांच्या आश्रमांत येऊन पोहोंचले. देव शरणार्थी होऊन दत्तात्रेयांच्या पाठीशीं दडले. त्या वेळीं दैत्यांनीं दत्तात्रेयांच्या अंकावर असलेल्या सुंदर स्त्रीस पाहिलें. सर्वांगसुंदर असलेल्या त्या स्त्रीस पहातांच दैत्य मोहून गेले. त्यांनीं देवांची व दत्तात्रेयांची उपेक्षा करून त्या सर्वांगसुंदर असलेल्या स्त्रीला दत्तात्रेयांच्या मांडीवरून पळविलें. आपणाला उत्तम स्त्रीरत्नाचा लाभ झाला असें मानून त्या दैत्यांनीं तिला पालखींत बसविलें व पालखी मस्तकावर घेऊन ते निघाले. तेव्हां योगींद्र भगवान् दत्तात्रेय देवांना म्हणाले, "देवहो, परस्त्रीच्या अभिलाषेनें व स्पर्शानें हे दैत्य निःसंशय सत्त्वहीन व दुर्बल बनलेले आहेत. लक्ष्मीचें चिन्ह जर पायावर असेल तर

ती घर देईल, मांडीवर असेल तर वस्त्र देईल, गुह्यभागीं असेल तर उत्तम स्त्री देईल, भुजांतरीं असेल तर अपत्य देईल, हृदयावर असेल तर इष्टफल देईल. कंठावर असेल तर धन देईल. मुखावर असेल तर उत्तम भोजन आणि वक्तृत्व देईल, मस्तकावर असेल तर शिरच्छेद करील. सारांश, या दैत्यांनीं तिला मस्तकावर धारण केलें असल्यामुळें तीच त्यांचा शिरच्छेद करून इकडे परत येईल. दैत्य आतां मृतवत् झाले आहेत असें समजा. तुम्ही जा. भिऊ नका. त्यांना मारा. तुमच्या विजयाची वेळ आली आहे. निमित्तमात्र व्हा. कारण लक्ष्मीनें त्यांचा आधींच नाश केला आहे."

तें ऐकतांच देव निघाले व त्यांनीं राक्षसांचा फडशा पाडला. बरेचसे दैत्य त्या स्त्रीविषयीं अहमहमिकेनें आपआपसांत लढले आणि सुंदोपसुंदन्यायानें एकमेकांच्या हातून ते एकमेक मरण पावले. त्याच प्रसंगीं देवांनी असुरांवर केलेल्या हल्ल्यांत जंभासुरहि इंद्राच्या हातून मरण पावला. नंतर मूलतः अविभाज्य असलेली लक्ष्मी श्रीदत्तात्रेयांकडे परत आली व दत्तात्रेयांच्या अंकावर विराजली. भगवान् श्रीदत्तात्रेय श्रीधर झाले. त्या श्रीधरांची आज्ञा घेऊन देव स्वर्गलोकीं परत गेले व पूर्ववत् तेथें आनंदानें राहिले.

असा श्रीदत्तात्रेयांचा महिमा आहे. म्हणून राजा कार्तवीर्या, तूं त्या दत्तात्रेयालाच शरण जा. हें गर्गमुनींचें वचन ऐकून सहस्रार्जुन दत्तात्रेयांच्या आश्रमांत गेला. गर्गमुनींच्या मुखांतून जंभासुरवधाची कथा ऐकून कार्तवीर्याच्या मनांत दत्तात्रेयांविषयीं अधिकच श्रद्धा जडली व तो एकनिष्ठ अंतःकरणानें श्रीदत्तात्रेयप्रभूंची सेवा करूं लागला.

श्रीदत्तात्रेय नको नको म्हणत असले तरी त्यानें दत्तात्रेयांच्या सेवेंत तिळमात्रहि अंतर पडूं दिलें नाहीं. गर्गमुनींनीं सांगितल्याप्रमाणें तो मनोभावानें दत्तात्रेयांची सेवा करीतच राहिला. एकदां दत्तात्रेयांनीं त्याचा भाव पाहण्याकरितां त्याचे दोन्ही हात आपल्या दृष्टिपातानें निखळविले, आणि हंसत म्हणाले, "चालता हो येथून. पहा, तुझे दोन्ही हात गळून पडले. गेला नाहींस तर मरशील. माझ्यासारख्या पतिताची सेवा करून तुला काय लाभ होणार ?"

हें दत्तात्रेयांचें भाषण ऐकून कार्तवीर्य राजा श्रद्धेपासून तिळमात्रहि ढळला नाहीं. गर्गमुनींनीं सांगितलेला कथाभाग लक्षांत घेऊन राजा म्हणाला, "सद्‌गुरो दत्तात्रेया! मला या असल्या लौकिक वाक्यांनीं मोहांत कां पाडतां ? देवा, तूं सर्वात्मा आहेस. तूं स्वतःच्याच मायेचा आश्रय केला आहेस. तूं अनघ आहेस व तुझी ही मायाशक्तीहि पण अनघा आहे. तुम्हा उभयतांचें हें रूप ज्यांना भेदबुद्धीमुळें समजत नाहीं त्यांनाच शास्त्रांतील विधिनिषेध बंधनकारक असतात. इतरांना नव्हे."

असें सरळ भाषण ऐकून दत्तात्रेय म्हणाले, "कार्तवीर्या, तूं सर्वच जिंकलेस. माझें गूढ तत्त्व तुला समजलें. मी प्रसन्न आहें. तुला रुचेल तो वर मागून घे. कारण शुद्ध भाव धरून जे मला तत्त्वतः भजतात त्यांचे मनोरथ मी पुरवीत असतों व इतरांना

 

शासन करीत असतों." तें ऐकताच राजाचें शरीर आनंदानें पुलकित झालें. तो नम्र होऊन म्हणाला, "भगवन् ! आपण प्रसन्न झाला आहां, तर मला आपण अशा रीतीनें ऐश्वर्य द्यावें कीं ज्यायोगें मी प्रजापालन करीत असतां मला धर्म व अर्थ या दोन्ही पुरुषार्थांची पूर्णपणें जोड लाभेल. तसेंच कोणीं माझें स्मरण केलें असतां त्याचें ज्ञान मला व्हावें. तसेंच सुप्रसिद्ध पुरुषांशींच युद्ध करण्याचा मला प्रसंग यावा. इच्छेस वाटेल तेव्हां सहस्रबाहु होतां यावें. सर्वत्र माझी गति अप्रतिहत म्हणजे अकुंठित असावी. सर्वांचें मनोगत मला समजावें. मी भलत्याच मार्गाला लागलों तर त्या वेळीं मला मार्गदर्शक भेटावा. द्रव्याचा खंड नसावा. अतिथींचा मला निरंतर लाभ घडावा. माझ्या स्मरणानें नष्ट वस्तु प्राप्त व्हावी. मला दीर्घायुष्य असावें. आयुष्यभर तुमच्या ठिकाणीं अनन्य भक्ति राहावी आणि माझ्यापेक्षां जो ख्यातीनें अधिक असेल अशाच्या हातूनच माझा मृत्यु व्हावा."

त्यावर भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणाले, "हें सर्व तुला प्राप्त होऊन माझ्या कृपेनें तूं सप्तद्वीप पृथ्वीचा अधिराज होशील." हें वरदान प्राप्त झाल्यानंतर सहस्रार्जुनानें दत्तात्रेयांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला व श्रीदत्तात्रेयांचा निरोप घेऊन तो आपल्या नगरीला परत आला.

नंतर ब्राह्मणांनीं त्याला राज्याभिषेक केला. राज्यावर बसल्यानंतर, "जो कोणी आजपासून माझ्याशिवाय हातांत शस्त्र धारण करील तो ठार मारला जाईल. जो कोणी चोरी करील अथवा हिंसा अगर दुराचार करील त्यालाहि हाच दंड होईल." अशी दवंडी त्यानें पिटविली. अशा रीतीनें क्षेत्रपाल, ग्रामपाल, पशुपाल व सेनापति वगैरे सर्व कांहीं तो स्वतः एकटाच बनला. तसेंच कोणत्याहि संकटापासून कोणाचेंहि रक्षण करणारा तोच धर्मपाल झाला. त्याच्या इच्छेनुसार इंद्राकडून पर्जन्यवृष्टि होऊं लागली. पृथ्वी समृद्ध झाली. त्यानें पुष्कळ यज्ञ केले. त्याचा त्रैलोक्यांत संचार असे. आत्मा जसा मायेचा आश्रय करून अनेक रूपें धारण करतो, त्याप्रमाणें कोणीं त्याची स्मृति केली असतां तोहि अनेक रूपें धारण करी. त्याच्या नामकीर्तनानें हरवलेली वस्तु सांपडूं लागली व सर्वत्र आरोग्य नांदूं लागलें. अशा रीतीनें पंचाऐंशीं हजार वर्षे सप्तद्वीप पृथ्वीवर त्यानें श्रीदत्तात्रेयांच्या कृपेनें राज्य केलें. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेला राजा सहस्रकरांनीं अधर्मी लोकांना शासन करून धर्मतत्परतेनें रहात असे. प्रत्येक वर्षीं माघ कृष्ण अष्टमीच्या दिवशीं तो अनघ व अनघा यांचें पूजन करीत असे. जो कोणी हें अनघव्रत करील त्याला सर्व कांहीं मिळेल. दत्तात्रेयांनीं त्याला माघ महिन्याचें माहात्म्य सांगून कल्पवासाचाहि उपदेश केल्याचें पुराणांतरीं वर्णन केलेलें आहे. ज्या दिवशीं त्याच्यावर दत्ताचा अनुग्रह झाला तो दिवस प्रतिवर्षीं महोत्सवाचा म्हणून तो पाळीत असे. आणि निरंतर श्रीदत्तात्रेयांचें स्मरण ठेवून त्या मार्गानें त्यांचें दर्शन घेत असे. खरोखर पराक्रम, प्रजावात्सल्य, कर्तव्यतत्परता आणि यज्ञयागादि कर्में यांमध्यें कार्तवीर्याची बरोबरी करील असा दुसरा कोणी राजा झाला नाहीं व होण्याची

शक्यताहि नाहीं. त्यानें राक्षसांचा अधिपति असलेल्या रावणाला बांधून टाकलें व कुबेराच्या विनंतीवरून सोडूनहि दिलें. शेवटीं दत्तात्रेयांच्या कृपेनें इहलोकीचें सर्व वैभव भोगून अंतीं तो कार्तवीर्य सहस्रार्जुन राजा परमात्मस्वरूपामध्यें समरस झाला.

## परशुरामावर श्रीदत्तात्रेयांची कृपा

एकदां राजा कार्तवीर्य चतुरंग सैन्य बरोबर घेऊन रथांत बसून मृगयेस गेला होता. शिकारीहून परत येतांना त्यानें श्रीजमदग्निमुनींचा पवित्र आश्रम पाहिला. तेव्हां त्यानें सर्व सैन्य बाहेर ठेवून दोन मित्रांसह आश्रमांत प्रवेश केला. तेथें मूर्तिमंत शंकर-पार्वतीप्रमाणें शोभणाऱ्या रेणुका व जमदग्नि या दोघांना पाहिलें. जमदग्नि हे प्रत्यक्ष शिवाचाच अवतार होते, तर रेणुका ही साक्षात् शक्तीचा अवतार होती. त्यामुळें रेणुका व जमदग्नि हीं दोघेंहि शिवशक्तिस्वरूपानें त्या आश्रमांत वास्तव्य करीत होतीं. कार्तवीर्य राजानें व त्याच्या दोन्ही मित्रांनीं त्या दोघांना वंदन करून स्तोत्रें म्हटलीं व जमदग्नीची आणि रेणुकेची स्तुति केली. त्यांच्या आज्ञेनें राजा आसनावर बसला व त्यांचें कुशल विचारलें. जमदग्नि ऋषींनींहि पण राजाला कुशल प्रश्न विचारले. तेव्हां राजा म्हणाला, ‘आपल्या कृपेनें राष्ट्रांत सर्व समृद्धि आहे. आपल्या दर्शनानें मी धन्य झालों आहें.’ नंतर जमदग्नि ऋषींनीं त्याला स्नेहपूर्वक प्रसादाचें आमंत्रण दिलें.

कामधेनूच्या प्रसादानें सर्व सैन्यासहित राजाचा उत्तम पक्वान्नांनी पाहुणचार केला. तें वैभव पाहिल्यानंतर भवितव्याच्या आधीन होऊन, “असें ऐश्वर्य आपणाला कसें प्राप्त झालें.” असा राजानें मुनींना प्रश्न केला. ऋषि म्हणाले, “कामधेनु मला सर्व कांहीं पुरविते.” यावर राजा म्हणाला, “ती मला द्या. मी तिच्या मोबदल्यांत तुम्हांला पुष्कळ धन देतों. रत्नें व भूमि वाटेल तें देतों; पण गाय द्या.” अशी त्यानें पुष्कळ विनवणी केली; परंतु ऋषि गाय देईनात. ‘हा शांत ब्रह्मर्षि माझें काय करणार ? देत नाहीं तर बळजबरीनेंच गाय न्यावी’ असें म्हणून राजानें गाय धरली व मुनीला रत्नें वगैरे द्रव्य देऊं लागला. मुनीनें त्या कशाचाहि स्वीकार केला नाहीं.

इतक्यांत परशुराम वनांतून आश्रमांत आला. त्याच्या भावांनीं झालेला सर्व वृत्तान्त निवेदन केला. तो ऐकून महापराक्रमी परशुराम अत्यंत क्रुद्ध झाला व जमदग्नीला म्हणाला, “माझें सामर्थ्य पहा. मी त्रैलोक्यहि जाळीन ! या उन्मत्त, ब्रह्मद्वेषी नि गर्विष्ठ राजाला आज त्याच्या सैन्यासह ठार करीन. मी उन्मत्तांचा शास्ता आहे व त्यासाठींच माझा अवतार आहे ! त्या दुष्टानें मला ओळखलें नाही.” असें म्हणून तो रक्तनेत्र परशुराम कार्यवीर्य राजा राजधानींत शिरत आहे तोंच त्यास गांठून निश्चयपूर्वक म्हणाला, “अरे चोरा ! आतां माझ्या तडाख्यांतून कसा सुटतोस तें मी पहातों. कोणत्या ठिकाणीं गाय नेत आहेस ? क्षत्रियाधमा, तुला हें योग्य आहे काय ?”

तें ऐकून राजाने परशुरामाला ओळखिलें व 'हा प्रत्यक्ष विष्णूच आला आहे. हा क्षात्रधर्मानें संतुष्ट होऊनच मुक्तीला जाईल.' असें म्हणून त्यानें परशुरामावर सैन्य धाडिलें. जो तो आपआपल्या शक्तीप्रमाणें लढूं लागला. रागावलेल्या परशुरामानें, अरुणानें अंधकाराचा नाश करावा त्याप्रमाणें क्षणांत त्या सैन्याचा फडशा पाडला. तें पाहून राजानें, 'आजपर्यंत माझ्यासमोर देव, दानव कोणीहि उभे राहूं शकले नाहींत. तर मानवाची कथा काय ? तथापि आज हा ब्राह्मण मलाहि जिंकील असें दिसत आहे. अथवा हा ब्राह्मण नव्हे, निश्चित हा विष्णूचाच अवतार आहे. तेव्हां याच्याशीं मला लढलेंच पाहिजे.' अशा निश्चयानें त्यावर चाल केली. अर्जुनानें दत्तस्मरणपूर्वक विविध अस्त्रांनीं लढाईस सुरुवात केली.

मेघ जसे पर्वताला आच्छादून टाकतात त्याप्रमाणें त्यानें परशुरामाला बाणांनीं वेढून टाकलें व सिंहनाद केला. त्या वेळीं तो सहस्रबाहु दुर्धर्ष सहस्रार्जुन रथारूढ भास्कराप्रमाणें दुर्निरीक्ष्य असा भासूं लागला. त्याचें हस्तलाघव पाहून परशुराम संतुष्ट झाले. वायूनें अभ्रें दूर करावीं त्याप्रमाणें त्यांनीं त्याचे बाण दूर सारून त्याचीं धनुष्यें तोडलीं व त्याला निस्तेज केलें. नंतर त्याला रथविरहित करून वृक्षाच्या फांद्या तोडाव्यात त्याप्रमाणें त्याचे हात तोडून टाकले. श्रीदत्तात्रेयांच्या वरदानाप्रमाणें त्याला पुन्हां बाहु उत्पन्न झाले. तेव्हां परशुरामानें अग्न्यस्त्राची योजना करून ते बाहु पुन्हां उत्पन्न होणार नाहींत असें केलें. हे दोघेहि दत्तात्रेयांचेच भक्त खरे पण बलिष्ठ अशा ईश्वराच्याच प्रेरणेनें त्या दोघांमध्यें अभूतपूर्व असें चुरशीचें युद्ध चाललें. तेव्हां सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं उपदेशिलेल्या परमात्मतत्त्वाची आठवण करून त्यानें आंतील बाहेरील सर्व व्यवहार सोडले व तो राजा परब्रह्मस्वरूपाशीं समरस झाला. मस्तक तुटण्यापूर्वींच तो ब्रह्मीभूत झाला, त्यानंतर परशूनें मस्तक तुटून धड जमिनीवर पडलें. तो दारुण संग्राम व तें सहस्रार्जुनाचें अलौकिक प्रयाण पाहून देवांनीं स्वर्गांतून पुष्पवृष्टि केली. तो नित्यमुक्त कार्तवीर्य राजा या प्रकारें श्रीदत्तात्रेयांच्या कृपेनें कैवल्यमुक्तीला गेला. त्याच्या सर्व कला स्व-स्वहेतूच्या ठिकाणीं लय पावल्या व राजाला दत्तसायुज्य मिळालें. नंतर कामधेनूला बरोबर घेऊन भगवान् श्रीपरशुराम आपल्या आश्रमाला परत गेले आणि पित्याला सर्व वृत्तान्त निवेदन केला. नंतर वडिलांच्या आज्ञेप्रमाणें राजवधाच्या दोषाचा परिहार करण्याकरितां श्रीपरशुरामानें विविध तीर्थक्षेत्रांचें पर्यटन करून प्रायश्चित्तहि घेतलें.

## जमदग्नीचा वध

इंद्राला अथवा इतर कोणालाहि जिंकणारा असा विजयी आपला पिता ब्राह्मणाकडून मारला जावा, हें आम्ही जिवंत असून सहन करणें लाजिरवाणें आहे; असा विचार करून पितृघातकाचा वध करण्यासाठीं अर्जुनाचे मुलगे वैरभावानें निघाले. ते येण्यापूर्वींच परशुराम बंधूंसह वनांत गेला होता. इकडे सहस्रार्जुनाच्या पुत्रांनीं

आश्रमांत येऊन धुमाकूळ मांडला. इकडे तिकडे शोधून परशुराम सांपडत नाहीं असें पाहून त्यांनीं दृष्टीस पडलेल्या जमदग्नीवरच प्रहार केला. रेणुका समोर आक्रोश करीत असतांहि ते जमदग्नींना ठार मारून निघून गेले.

तिकडे रानांत परशुरामालाहि अपशकुन झाल्यासारखें वाटून तो त्वरित घरीं आला व वडिलांचा घात झाल्याचें ऐकून शोक करूं लागला. "माझ्यामुळें वडिलांचा मृत्यु घडला. तेव्हां मला धिक्कार असो ! हे तात, दयासिंधो ! आपण कोठें गेलांत ?" असा शोक करून बंधु व माता निवारण करीत असतांहि शत्रूंना ठार करण्यासाठीं तो निघाला. अगदीं थोडयाच अवधींत सहस्रार्जुनाचे सर्व मुलगे मारून, राजवाडयासह सर्व नगर उद्ध्वस्त करून तो परतला व आईला सर्व सांगितलें. सर्व मुनिजन व बंधु नको नको म्हणत असतांहि त्यानें त्याच्या आईच्या समक्ष प्रतिज्ञा केली कीं, मी एकवीस वेळां क्षत्रियांचा नायनाट करीन व त्यांच्या रक्तानें निर्मित झालेल्या कुंडांत पितरांचें ऋण फेडण्यासाठीं तर्पण करीन.

तें ऐकून रेणुका म्हणाली, "मुला, तुझें म्हणणें बरोबर आहे. आधीं पितृसंस्कार कर व मग प्रतिज्ञा खरी कर. सहस्रार्जुन दत्तात्रेयांचा भक्त होता. तेव्हां तो प्रभु जर रागावला तर तुझा नाश करील. त्यासाठीं तुला मी एक उपाय सांगतें. कावडींत एका बाजूला पित्याला ठेव व दुसऱ्या बाजूला मला बसव आणि ती कावड घेऊन चल. 'थांब' अशी आकाशवाणी जेथें होईल तेथेंच तुला योग्य ब्राह्मण मिळेल व आमचा संस्कार यथाविधि घडून तूं कृतकृत्य होशील."

तें आईचें भाषण ऐकून तो पितृभक्त परशुराम एका बाजूस मृत पित्याला घालून व दुसऱ्या बाजूस मातेला बसवून कावड खांद्यावर घेऊन भक्तीनें निघाला. पितरांच्या संस्कारासाठीं कान्यकुब्ज प्रदेश सोडून वाटेंत तीर्थें, पवित्र नद्या, मुनींचे आश्रम पहात चालला असतां तो धर्मनिष्ठ परशुराम सह्याद्रिपर्वतावरील, मुनींनीं मंडित असलेल्या आमलकी गांवाला पोहोंचला. तें स्थळ निर्बाध, शांत व रम्य असून तेथील हवामान सर्व ऋतूंत सुखदायक असें होतें. तेथें ऋषि रहात असत व कंदमूळ-फळांचीहि तेथें समृद्धि होती. विद्याधर गंधर्वादिकांचाहि संचार त्या स्थलीं नित्य असे. अशा त्या सह्याद्रिभागांत एक सुरम्य आश्रम रामाच्या दृष्टीस पडला व तेथेंच आकाशवाणी झाली कीं, "परशुराम, तूं श्रीदत्तात्रेयांच्या संनिध आला आहेस. तेव्हां पितृसंस्कार येथेंच श्रीदत्तात्रेयांच्या आचार्यत्वाखालीं यथाविधि करणें योग्य आहे. तुझी प्रतिज्ञाहि येथेंच सफल होईल."

अशी आकाशवाणी ऐकून परशुरामाने कावड तेथेंच ठेवली आणि दत्ताश्रमांत प्रवेश केला. तेथें तुळस, उंबर, पिंपळ, बेल, शमी, वड वगैरे वृक्ष असून फुलझाडें व लतादिक हींहि विपुल होतीं. ठिकठिकाणीं थंडगार गोड पाण्याचे झरे वाहत होते. ठिकठिकाणीं योगिवृंद बसलेले दृष्टीस पडत होते. अशा त्या आश्रमांत अनघेनें युक्त दिगंबर भगवान् श्रीदत्तात्रेय बसलेले परशुरामाच्या दृष्टीस पडले. भगवान्

वारुणिपात्र हातांत घेऊन देवीशीं संभाषण करीत होते. तशाहि अवस्थेंत, ' हा विधि-निषेधातीत ईश्वर आहे ' असें जाणून परशुरामानें भक्तिपूर्वक प्रार्थना केली–" हे सर्वज्ञ भक्तवत्सला! पितृसंस्काराच्या उद्देशानें मी येथें आलों आहें, तरी त्याचा विधि आपण सांगावा. " श्रीदत्तात्रेय म्हणाले, " आम्ही विधिनिषेध कांहींच जाणत नाहीं. स्वैर पिशाचाप्रमाणें माझी अवस्था आहे. अनाचार म्हणजे काय किंवा धर्माधर्म म्हणजे काय तें मला माहीत नाहीं. " तें ऐकून परशुराम म्हणाले, " योगीश्वरा! कर्ता-हर्ता असा जगाचा स्वामी तूंच आहेस. तुला गुणातीताला धर्माधर्मभेद मानण्याचें प्रयोजन कोठें आहे? " यावर भगवान् म्हणाले, "अरे, तूं प्रत्यक्ष पहात असून असें उलट कसें बोलतोस ? " आम्ही हे असे आहोंत हें तुला समजत नाहीं काय ? विधिनिषेधाची वार्ता मला कसली ? " त्यावर परशुराम स्तब्ध राहिले. तेव्हां कावडींतून रेणुका म्हणाली, " हे आत्मरता! हीं लौकिक भाषणें करून आम्हांला मोहांत कां पाडतोस ? " तें ऐकून दत्तभगवान् सहास्य उभे राहिले व रेणुकादेवीची त्यांनीं स्तुति केली–" माते! हें दृश्य विश्व म्हणजे तूंच आहेस. तूं वंदनीय आहेस. एकटीच अनेक रूपें धारण करणारी तूं देह, इंद्रियें, मन, प्राण व अहंकार यांहून भिन्न आहेस. " ती स्तुति ऐकून रेणुकेनें पतिसमवेत आपल्या अंत्येष्टीची त्याला प्रार्थना केली. भगवान् दत्तात्रेय म्हणाले, " पति कशानें मृत झाले ? " ती म्हणाली, ' राजकुमारांनीं त्यांचा प्राण घेतला. ' तें ऐकून दत्तात्रेय क्रोधानें जळत म्हणाले, ' ब्राह्मणांनाहि ठार मारणारे उन्मत्त क्षत्रिय नष्ट होवोत. ' तें ऐकून परशुराम म्हणाले, " मी पृथ्वी निःक्षत्रिय करीन अशी प्रतिज्ञा केली आहे. आपल्या कृपेनें ती खरी होवो. तुझ्या योगज्ञ शिष्याला त्याच्या अपराधामुळें मीं मारला. त्याची क्षमा करून माझी प्रतिज्ञा खरी होईल असें कर. " दत्तांनी त्याला कुरवाळून म्हटलें, " तूं माझा सखा व मत्तुल्य म्हणजे माझ्यासारखाच अधिकारी आहेस. तुझी प्रतिज्ञा शेवटास जाईल. "

नंतर परशुरामानें श्रीदत्तांच्या आज्ञेप्रमाणें बाणांनीं पृथ्वीचा व पर्वताचा वेध करून अंत्यकर्मासाठीं सर्व तीर्थें एका ठिकाणीं एकत्र निर्माण केलीं व त्यांत स्नान केलें. रेणुका मातेनेंहि स्नान करून भूषणें धारण केलीं व श्रीदत्तात्रेयास आणि परशुराम यांना अनुलक्षून म्हणाली, " मी पतिसहित निजधामाला जाऊं इच्छितें. बा परशुरामा, तूं द्विजांचें रक्षण कर. आपली प्रतिज्ञा खरी कर " असें म्हणून श्रीदत्त व सूर्य यांना वंदन करून तिनें वायनें दिलीं. तो उत्सव पाहण्यासाठीं सर्व देव आपल्या स्त्रियांसह विमानांत बसून आले होते. गुरूंनी यथाविधि क्रव्याल नांवाचा अग्नि सिद्ध केला व ती सौभाग्यवती आहिताग्नि असलेल्या आपल्या पतीच्या समवेत त्यांत प्रविष्ट झाली. तो प्रदीप्त अग्नि सतीच्या स्पर्शानें सहस्रसूर्यप्रमाणें प्रकाशूं लागला. त्या वेळीं सर्वांनीं आदरानें वंदन करून जयघोष केला.

" हे सर्वज्ञ यज्ञस्वरूपा दत्तप्रभो! तुला नमस्कार असो. तूं माझा सखा आहेस, म्हणून आईबापांचें विधियुक्त और्ध्वदेहिक तूंच मजकडून करवून घे. " अशी परशु-

रामाची प्रार्थना ऐकून दत्तांनीं आचार्य होऊन अंजलिदानादि सर्व यथाविधि करविलें. नंतर श्रीदत्तप्रभु परशुरामाला म्हणाले कीं, "तुझे आईबाप कोठें गेले तें तुला माहीत आहे काय?" परशुराम म्हणाला, "तुमच्या कृपेनें ते स्वर्गांत गेले असावेत असें वाटतें." दत्तप्रभु म्हणाले, "मेले व स्वर्गाला गेले ही अडाणी समजूत आहे. तुझे आईबाप मेलेहि नाहीत व स्वर्गालाहि गेले नाहीत. ते पहा लीलेने विहार करीत आहेत. तोंच आपल्या तेजानें दिशा उजळवीत असलेल्या मातापितरांना परशुरामानें पाहिलें. तेव्हां त्यानें परम भक्तीनें नमन केलें. नंतर ते अदृश्य झाले. पुढें दत्तात्रेय परशुरामाला आलिंगून म्हणाले, "हे परशुरामा, अधार्मिक क्षत्रियांचा तूं संहार कर. तूं माझाच अंश आहेस. तूं विजयी होशील."

नंतर परशुरामानें स्नान करून क्षत्रहननाचा संकल्प सोडला. आयुधें हातांत घेतलीं आणि एकवीस वेळां क्षत्रियांचा संहार करून रक्ताचीं तळीं सांचविलीं. त्यानें पितरांचें तर्पण करून शस्त्रें धुऊन स्वच्छ केलीं. आचार्यस्थानीं श्रीदत्तात्रेयांची योजना करून कश्यपादि ऋषींना ऋत्विजांची वरणी दिली आणि सोमयागाचें अनुष्ठान पूर्ण केलें. त्या यज्ञाच्या योगानें सर्व देव तृप्त झाले. ब्राह्मणहि अन्न, वस्त्र व दक्षिणा मिळाल्यानें संतुष्ट झाले. जिंकलेली सर्व भूमि परशुरामानें कश्यपऋषींना दान केली. आचार्य जे दत्तात्रेय महामुनि यांनाहि परशुरामानें सुवर्णवस्त्रादि दानानें पूजिलें. परंतु भक्तिभावानें प्रभूंनीं तें सर्व ब्राह्मणांना वांटलें. परशुरामाला अंकावर बसवून ते म्हणाले, "बाळा, दुष्ट क्षत्रियांना जिंकून ठार करण्याचें दुष्कर कृत्य तूं केलेंस. यथाविधि यज्ञहि केलास. तूं शूर आहेस, फार काय तूं प्रत्यक्ष विष्णूच आहेस." तें ऐकून परशुराम म्हणाला, "मी कसला शूर? ही आपलीच कृपा आहे." त्यावर इंद्रादि देवहि 'शाबास, शाबास!' म्हणाले व परशुरामाच्या सत्काराचा स्वीकार करून स्वस्थानीं गेले.

परशुराम सख्यत्वानें श्रीदत्तात्रेयांच्या समीप राहिला असतां एकदां प्रभूंनीं संतुष्ट होऊन परशुरामाला त्रिपुरा देवीचें रहस्य सांगितलें. तें श्रवणमात्रेंकरून मुक्ति देणारे आहे. नंतर त्याला दत्तप्रभू म्हणाले, "तू चिरंजीव हो. कांहीं दिवस येथे रहा. नंतर लोककल्याणासाठीं पश्चिमसमुद्रतीरीं तप कर. तुझ्या ठिकाणीं हल्लीं जें मदंशरूपानें तेज ठेवलें आहे तें दुसऱ्या अवतारप्रसंगीं हरण करीन. नंतर शुद्ध ब्रह्मतेजानें युक्त होऊन तपश्चर्या कर. सावर्णिक मन्वंतरांत तूं महर्षि होशील व महाकल्पसमयीं माझ्याशीं सायुज्य पावशील." हें भगवंतांचें भाषण ऐकून एकवीस वेळां ज्यानें आपल्या तीक्ष्ण परशूनें क्षत्रियांचा उच्छेद केला तो परशुराम आपल्या आश्रमांत कांहीं दिवस राहिला. नंतर युगांतरीं विष्णूनें सूर्यवंशांत अवतार घेऊन त्याच्या तेजाचें हरण केलें. सारांश, हा पितृभक्त परशुराम म्हणजे ब्राह्मणरूपानें अवतरलेला विष्णूचाच अवतार होय.

---

# चतुर्थस्कन्ध

## पहिला अवतार श्रीयोगिराज

श्रीदत्तभक्त दासोपंत यांनीं श्रीदत्तात्रेयांचे सोळा अवतार मानलेले आहेत. निरनिराळ्या प्रसंगांनीं दत्तात्रेयप्रभूंनीं भक्तजनांच्या कल्याणाकरितां निरनिराळ्या स्वरूपांत आविर्भूत होऊन ज्या लीला आणि जीं चरित्रें प्रकट केलीं त्यांचीं वर्णनें श्रीदासोपंतांच्या अभिप्रायाप्रमाणें प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज यांनीं संस्कृतमध्यें लिहून ठेवलेलीं आहेत. तीं आम्ही या ठिकाणीं भक्तजनांच्या उपयोगासाठीं सुबोध, सोप्या मराठी भाषेंत खालीं देत आहोंत. दत्तात्रेयांचे हे अवतार निरनिराळ्या महिन्यांत व निरनिराळ्या मुहूर्तांवर झालेले असून त्यांचीं स्वरूपेंहि भिन्न भिन्न अशीं वर्णिलेलीं आहेत. प्रत्येक जयंतीच्या वेळीं विशिष्ट प्रकारें अभिषेकपूर्वक षोडशोपचार पूजा करून शेवटीं अर्घ्यपात्रामध्यें पाणी घेऊन त्यांत गंध, अक्षत, पुष्प, तुलसीदल आणि किंचित् व्यावहारिक द्रव्य व पूगीफल ठेवून त्या त्या प्रसंगीं दिलेले मंत्र म्हणून ते अर्घ्य दत्तात्रेयांना समर्पण करावेत. आरती आणि मंत्रपुष्प झाल्यावर सर्वांना यथाशक्ति तीर्थप्रसाद वांटावा व यजमानानें तो स्वतःहि सेवन करावा. अंतीं गुरुदेव श्रीदत्तात्रेय प्रभु यांचा जयजयकार करीत हा जयंतीचा समारंभ पूर्ण करावा. दत्तात्रेयांच्या प्रत्येक महिन्यांतील अवतारांचीं नांवें भिन्न भिन्न असून चरित्रेंहि पण निरनिराळीं वर्णन केलेलीं आहेत. तीं आतां संक्षेपानें आम्हीं खाली देत आहोंत.

श्रीदासोपंत यांनीं कार्तिकमासापासून दत्तात्रेयांच्या अवतारांची परिगणना केलेली आहे. आम्हीहि त्याच अनुरोधानें या ठिकाणीं दत्तात्रेयांच्या सोळा अवतारांचें वर्णन करीत आहोंत. दत्तात्रेयांचा पहिला अवतार कार्तिक शुद्ध पौर्णिमेस झाला. या अवतारांचें नांव योगिराज असें आहे. ब्रह्मदेवावर अनुग्रह करण्याकरितां परमेश्वरानें हा अवतार धारण केलेला आहे.

## ब्रह्मदेवाची तळमळ

मानवसृष्टि निर्माण केल्यानंतर हे जीव संसारामध्यें अनेक प्रकारचीं दुःखेंच भोगीत आहेत. जन्ममरणाच्या अविच्छिन्न परंपरेला संसार असें म्हणतात. प्रारब्धकर्माच्या अनुरोधानें संसारामध्यें विविध कष्ट भोगणाऱ्या या जीवांची या कष्टांतून सुटका कशी होणार? तेव्हां या दुःखांतून माझी व या सर्व जीवांची पूर्णपणें सुटका कशी होईल याचा मीं विचारपूर्वक शोध केलाच पाहिजे, असा विचार करून ब्रह्मदेव सर्व विश्वाचा आधार असलेल्या श्रीहरीला शरण गेले. लक्ष्मी ज्यांच्या चरणकमलांची सेवा करीत आहे असे शेषशायी भगवान श्रीविष्णु योगमायेचा अंगीकार करून शेषशय्येवर पहुडले असतां ब्रह्मदेव नम्रपणें जवळ उभे राहून श्रीविष्णूची स्तुति करूं

लागले. हे नारायणा, आपण सर्व विश्वाचें गुरु आहां. आपण दयापूर्ण दृष्टीनें सर्व विश्वाचें संरक्षण करीत आहां. आपण करुणासागर आहां. मी आपल्या चरणीं अनन्यभावानें शरण आलों आहें. आपल्या आज्ञेप्रमाणें मीं लोकसृष्टि निर्माण केली; पण जगांत जन्माला आलेले हे लोक सदासर्वकाळ दुःखांतच खितपत पडलेले आहेत. यांच्या दुःखानें मीहि दुःखी झालों आहें. तरी या सर्व जीवांना व मलाहि संसारसागरांतून पैलतीराला कसें जातां येईल व संसारतापांतून कसें मुक्त होतां येईल तें कृपा करून सांगा. तेव्हां श्रीविष्णु ब्रह्मदेवास म्हणाले –

एवं निशम्यात्मभुवो नियोगं साङ्गं निजोपासनमुक्तवान् सः ।
त्वं सात्त्विकं मामकमेकमेव भावज्ञ धामातितरामुपास्व ॥ ३ ॥

– जयंतीकल्प

हे ब्रह्मदेवा, तुम्ही स्वतः माझ्या एकच एक असलेल्या अद्वितीय सात्त्विक धामाची तेजोरूप स्वरूपाची उपासना करा व इतरहि जीवांना संसारदुःखांतून मुक्त होण्यासाठीं हाच उपाय सांगा. लोककल्याणासाठीं तळमळणाऱ्या तुमच्या अंतःकरणांतील भक्तिभाव पाहून मी तुमच्यावर प्रसन्न झालों आहें व मूर्तिमंत सात्त्विक रूपानें मी स्वतःच तुम्हांस अर्पण करून घेत आहें, असें म्हणून भगवान् श्रीविष्णु यांनीं शेषपर्यंकाचा परित्याग केला व "दत्तोऽहं, दत्तोऽहं" असें म्हणत ब्रह्मदेवाच्या पुढें दत्तरूपानें उभे राहिले आणि ब्रह्मदेवाला त्यांनी यथासांग योगमार्गाचा उपदेश करून तत्त्वसाक्षात्कारानें ब्रह्मदेवाचें जीवनकार्य यशस्वी व सुखमय केलें. हाच अभिप्राय खालीं दिलेल्या श्लोकांत व्यक्त केलेला आहे.

दत्तोऽहं ते मयेत्यात्मदानेनाहमवातरम् ।
दत्तोऽहमिति तद्रूपमुपास्यं निखिलैः सदा ॥ ४ ॥

वरील श्लोकांत 'अवातरम्' हा शब्द अत्यंत महत्त्वाचा आहे. या शब्दानें परमेश्वरानें मी तुमच्यासाठीं अवतरलों आहें हें स्पष्टच सांगितले आहे. ब्रह्मदेवाप्रमाणें जे कोणी या ज्योतिर्मय दत्ताची 'दत्तोऽहं, दत्तोऽहं' असें म्हणत ध्यानरूप उपासना करतील तेहि ब्रह्मदेवाप्रमाणेंच सर्व संसारदुःखांतून मुक्त होतील.

या उपासनेला गंधपुष्पादि बाह्योपचाराची आवश्यकता नाहीं. ते केवळ सच्चिदानंदस्वरूप ज्योतिर्मय दत्ताच्या चिंतनानेंच कृतार्थ होतील असा याचा अर्थ आहे. पुढें अत्रि–अनसूया यांच्यापासून अभिव्यक्त होणारीं ब्रह्मा, विष्णु आणि शंकर हीं तिन्हीं रूपें या ज्योतिर्मय दत्तरूपांत समाविष्ट झालेलीं असल्यामुळें या रूपालाहि त्र्यात्मा असें म्हटलेलें आहे. सर्व आत्म्यांचा याच दत्तरूपांत समावेश असल्यामुळें याला परात्मा म्हणजे परमात्मा असेंहि म्हटलें आहे. तोच परमात्मा सर्वांच्या हृदयांत, अंतर्यामीं रूपानें प्रविष्ट झालेला असून देवदैत्य, ऋषि-मुनीं व तत्त्ववेत्ते तसेच सर्व सिद्ध. योगी व मानव यांनीं त्याची स्तुति व पूजा केलेली आहे. श्रीदत्तगुरु हे वर्णाश्रम धर्मातीत असले तरी त्यांचा वर्ण व आश्रम उत्तम मानला जातो. म्हणून सर्व

वर्णांतील व सर्व आश्रमांतील लोक त्यांना भक्तिभावानें वंदन करीत असतात. दत्तगुरु हे सर्व जीवांचे हितकर्ते असून ते सदासर्वकाळ अवधूत या रूपानें विराजत असतात. या ठिकाणीं वाचकांनीं अवधूत या शब्दाचा पूर्ण अर्थ लक्षांत घ्यावा. अ म्हणजे अक्षर, अविनाशी परब्रह्म. व म्हणजे वरेण्य अर्थात सर्वश्रेष्ठ आणि वरणीय म्हणजे आश्रय करण्यास योग्य. धूत म्हणजे धुतलेला. स्वच्छ, निर्मळ, पवित्र अथवा शुद्ध असा धू या शब्दाचा अर्थ समजावा. अथवा ज्यानें आपलीं सर्व संसारबंधनें धूत म्हणजे झाडून फटकून टाकलेलीं आहेत तो. असाहि धू या अक्षराचा अर्थ समजावा; आणि त म्हणजे तत्त्वमसि या महावाक्यानें प्रतिपादिलेलें परब्रह्म. या चारी अक्षरांचा समुच्चय करून बनलेला अवधूत हा शब्द अविनाशी, सर्वश्रेष्ठ, शुद्ध परब्रह्म या अर्थाचा बोध करून देत आहे.

श्रीदत्ताचें हें स्वरूप आपण लक्षात घेऊनच सदासर्वकाळ " दत्तोऽहं, दत्तोऽहं " या मंत्राचा मनांतल्या मनांत जप करीत असावें. ' सोऽहं, सोऽहं ' या मंत्राप्रमाणेंच " दत्तोऽहं, दत्तोऽहं ' हा मंत्रदेखील तारक म्हणजे दुःखमय संसारसागरांतून तारून नेणारा आहे, हें भक्तजनांनीं लक्षांत घ्यावें. परमेश्वरानें वर्णाश्रमधर्माच्या संरक्षणासाठीं रामकृष्णादि अवतार घेतले. अद्वैताची जाणीव असूनहि नित्य वर्णाश्रमधर्माचें परिपालन करून व ज्योतिर्मय दत्तस्वरूपाचेंच स्मरण ठेवून त्या त्या अवतारांत प्रसंगानुरूप वर्तन केलें. दत्तस्मरणानेंच रामकृष्णादिदेव कृतार्थ झाले. याच अभिप्रायानें दत्तगुरूंना सर्ववंद्य व सर्वपूज्य असें म्हटलेलें आहे. असा हा दत्तगुरुंचा उत्कर्ष सृष्टीच्या आरंभकाळापासून चालत आलेला असून सृष्टीच्या अंतकालापर्यंत अधिकाधिक प्रमाणानें चालत राहणार. त्या दत्तगुरूंना माझा प्रणाम असो.

दत्तगुरूंचा हा पहिलाच अवतार असल्यामुळें व अत्रिमुनींच्या उदरीं ते पुढील काळांत अवतीर्ण होणार असल्यामुळें त्यांना दत्तात्रेय ही संज्ञा अद्यापि प्राप्त झालेली नाहीं. या पहिल्या अवतारांत परमेश्वरानें स्वतःला ब्रह्मदेवालाच अर्पण करून घेतलेलें असल्यामुळें त्यांना "ब्रह्मदत्त" असेंच नांव देणें योग्य होईल. सर्व योग्यांचें ते राजे असल्यामुळें त्यांना योगिराज असें नांव देण्यांत आलेलें आहे. मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्रप्रभु काय, लीलावतार भगवान् श्रीकृष्ण काय हे सर्व अवतार पूर्ण ज्ञानी व प्रत्यक्ष परब्रह्मस्वरूप असल्यामुळें ते तत्त्वतः पूर्णकाम व आप्तकाम होते. अर्थात त्यांच्या सर्व कामना परिपूर्ण झालेल्या होत्या व जन्माला येऊन जें मिळवावयाचें असतें तें त्यांनीं सर्व मिळविलेलेंच होतें. तत्त्वतः त्यांना कांहींच कर्तव्य उरलेलें नव्हतें; तथापि उन्मार्गगामी लोकांना सन्मार्गावर आणण्याकरितांच त्यांनी अवतार घेतले व रावण, कुंभकर्ण, कंस व कालयवन इत्यादि दुष्टांचा वध करून लोकांना त्यांच्या जाचांतून सोडविलें. स्वतः वैदिक धर्माच्या मर्यादांचें प्रतिपालन करून स्वतःच्या आचरणानें इतरांनाहि त्यांनीं आत्मकल्याणासाठीं सन्मार्गावर आणिलें. हीच गोष्ट इतरहि वसिष्ठादि ऋषिमुनींचीं व तत्त्ववेत्त्यांचीहि जाणावी. तात्पर्य, ऋषिमुनि,

तत्ववेत्ते, साधुसंत व महात्मे आणि पूर्णावतारस्वरूप असलेले श्रीरामकृष्णादिदेव हेहि निरपेक्ष बुद्धीनें श्रीदत्तात्रेय यांच्या चरणीं शरण गेले व त्यांच्या अनुग्रहानें कृतार्थ झाले. मग संसारतापानें होरपळत असलेल्या सामान्य मानवानें दत्तात्रेय यांना शरण जावें हें काय सांगावयास पाहिजे ? याप्रमाणें गुरुदेव दत्तभगवान हे योगिराजाच्या रूपानें ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून ज्योतिर्मय तेजोरूपानें अवतरले. तें रूप तर मानवांना अवलोकन करणेंहि शक्य नव्हतें. मग ते त्या ज्योतिर्मय दत्ताची काय उपासना करणार ? ही परिस्थिति लक्षांत घेऊन ब्रह्मदेवानें " महाराज, आपण सर्व लोकांच्या कल्याणासाठीं सगुण, साकाररूपानें अवतार घेऊन आपल्या उपासनेनें व उपदेशानें जनतेला कृतार्थ करावें ", अशी विनंती केली. त्यांच्या प्रार्थनेचा अंगीकार करून गुरुदेव दत्तभगवान हे तपश्चर्येच्या प्रभावानें प्रभावित होऊन अत्रि-मुनि व महासती अनसूया यांच्या उदरीं त्रिगुणात्मक त्रमूर्तीच्या रूपानें आविर्भूत झाले. अत्रिमुनींच्या उदरीं जन्माला आले म्हणूनच त्यांना आत्रेय हें नांव मिळालें. ब्रह्मदेव व अत्रिमुनि यांना त्यांनीं स्वतःच अर्पण करून घेतलेलें असल्यामुळें ते दत्त तर होतेच आतां दत्त व आत्रेय हीं दोन्हीं नांवें एकत्र करून लोक त्यांना दत्तात्रेय या एकाच नांवानें ओळखूं लागले. या ठिकाणीं " न मे पार्थास्ति कर्तव्यं " इत्यादि भगवद्गीतेंतील श्लोक वाचकांनीं लक्षांत घ्यावेत, व रामकृष्णादि देव आणि वसिष्ठादि ऋषिमुनि यांचें अवतारकार्य लक्षांत घ्यावें.

अत्रिमुनींचें व अनसूयादेवींचें चरित्र आम्ही सविस्तर मागें वर्णिलेलेंच आहे तें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें. या विश्वाच्या मुळाशीं एकमेव अद्वितीय तत्त्व अर्थात एकच एक तत्त्व असें एक तत्त्व विराजत आहे. तें तत्त्व मूळ स्वरूपांत आपल्याला स्थूल दृष्टीनें पाहतां येत नाहीं. तें तत्त्व या विश्वाच्या मुळाशीं आहे. म्हणूनच हें विश्व आपल्या दृष्टीपुढें विराजत आहे. सूर्य, चंद्र, पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश त्याचप्रमाणें जीवचैतन्य या रूपानें तेंच तत्त्व नटलेलें आहे. आपल्याला स्थूल देह पाहतां येतो पण स्थूल देहांत विलसत असलेलें जीवचैतन्य पाहतां येत नाहीं. केवळ शरीराच्या हालचालीवरून आपण जीवचैतन्याच्या अस्तित्वाचें अनुमान करीत असतों. जेथें जीवचैतन्य पाहतां येत नाहीं तेथें आपण जीवचैतन्याच्याहि पलीकडे असलेलें शुद्ध चैतन्य काय पाहूं शकणार ? तें तत्त्व निरुपाधिक आहे. अर्थात लहान-मोठ्या अशा कोणत्याहि पांचभौतिक उपाधींशीं त्याचा तत्त्वतः तिळमात्रहि संबंध येत नाही. तें सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असूनहि कशांतहि गुंतलेलें नाहीं. म्हणून त्याला निरुपाधिक असें म्हटलेलें आहे. तें तत्त्व एकच एक आहे. तें निर्गुण म्हणजे सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांनीं तत्त्वतः रहित आहे. त्या तत्त्वाला जन्म-मृत्यु अथवा वृद्धि आणि क्षय हे विकार असूं शकत नाहींत. कारण तें शुद्धचैतन्य निरवयव अर्थात अवयवरहित आहे. तें निराकार आहे, नित्य आहे. त्याचा कधीं विनाश होत नाहीं पाप-पुण्य अथवा सुखदुःख यांचा त्या शुद्ध चैतन्याशीं कांहींहि संबंध नसल्यामुळें त्याला

निरंजन असें म्हणतात. निरंजन शब्दाचा अर्थ निर्मळ अथवा शुद्ध, स्वच्छ असाच आहे. तें चैतन्यतत्त्व या विश्वामध्यें परिपूर्ण म्हणजे पूर्णपणें भरून राहिलेलें आहे. त्यालाच तत्त्ववेत्ते परब्रह्म असें म्हणतात. ते सत् म्हणजे निराबाध आहे. चित् म्हणजे ज्ञानस्वरूप आहे व आनंद म्हणजे सुखस्वरूप आहे. सत् चित् आनंद हेंच त्याचें स्वरूप असल्यामुळें त्याला सच्चिदानंदविग्रह असें म्हणतात. नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त असेंहि त्याला म्हणतात. तें शुद्ध चैतन्य सृष्टि, स्थिति आणि प्रलय यांपैकीं कांहींच क्रिया करीत नसतें. तें केवळ साक्षी अथवा प्रकाश या रूपानें विराजत असतें. तें सर्वाधार व सर्वसाक्षी असल्यामुळें लोक सृष्टीचें कर्तृत्व त्याच्यावर आरोपितात. शुद्ध चैतन्य हें सर्वांचा आधार असल्यामुळें त्याच्या सत्तेनें म्हणजे अस्तित्वानें घडून येणाऱ्या सर्व घडामोडींचें कर्तृत्व त्याच्यावर आरोपिलें जातें. सगरराजाच्या अश्वमेधाचा घोडा कपिलऋषींच्या सान्निध्यांत असल्यामुळें अथवा अणिमांडव्य ऋषींच्या सान्निध्यांत चोरीचा माल दिसून आल्यामुळें केवळ अज्ञानानें कपिल ऋषींवर अथवा अणिमांडव्य ऋषींवर चोरीचा आरोप केला गेला. त्याचप्रमाणें केवळ अज्ञानानें शुद्ध चैतन्याच्या ठिकाणीं सृष्टीच्या कर्तृत्वाचा आरोप केला जातो हें सूक्ष्म विचारांतीं लक्षांत घ्यावें.

निद्रेची अथवा जाग्रत् अवस्थेची अस्पष्टता ही ज्याप्रमाणें स्वप्नसृष्टीच्या मुळाशीं असते, त्याचप्रमाणें ज्ञानाची अवथवा अज्ञानाची अस्पष्ट अवस्था हीच व्यावहारिक विश्वाच्या घडामोडीच्या मुळाशीं असल्यामुळें स्वप्नांतील सृष्टीप्रमाणेंच व्यावहारिक सृष्टीदेखील काल्पनिकच असते, ही गोष्ट लक्षांत घ्यावी. प्रशांत महासागराच्या ठिकाणीं जसा मंद वायूच्या झुळकीचा सूक्ष्म आघात व्हावा आणि तेथें अस्पष्ट लहरींचें स्पंदन व्हावें त्याचप्रमाणें स्वभावतः शांत असलेल्या शुद्ध चैतन्यावर कालानुरोधानें संकल्पाचें स्फुरण होऊं लागतें. "बहुस्यां प्रजायेय" हाच तो संकल्प होय. याच संकल्पांतून पुढें सर्व सृष्टीचा आविर्भाव होतो. शुद्ध चैतन्याच्या ठिकाणीं आविर्भूत होणारें सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण प्रथम अत्यंत सूक्ष्म व समान अवस्थेंत असतात. त्या वेळेला कोणतेंहि कार्य व्यक्त होत नसल्यामुळें त्या अवस्थेला अथवा त्या अवस्थेंतील चैतन्य-तत्त्वाला अव्यक्त असें म्हटलें जातें. या शुद्ध चैतन्याला तत्त्ववेत्त्यांनीं ध्यानासाठीं आपल्या शुद्ध मंगलमय, कोमल, कल्पनेनें सगुण व साकार बनविलें. त्यालाच नारायण असें म्हणतात. तोच आपल्या अनिर्वचनीय शक्तीनें शेषशायी भगवान बनला. त्याची ती त्रिगुणात्मक मायाशक्ति लक्ष्मीच्या रूपानें नटून त्याच्या चरणकमलाची सेवा करीत त्याच्या सांनिध्यांत बसलेली आहे. हेंच रूप प्रथम ऋषिमुनींच्या ध्यानाचा विषय बनलें. याचेंच मंगलमय ध्यान आपण "शान्ताकारं भुजगशयनं" या श्लोकानें करीत असतों.

त्रिगुणात्मक मायाशक्तीचें जोंपर्यंत कांहीं कार्य अभिव्यक्त झालेलें नसतें तोंपर्यंत त्या मायेला अथवा मायाविशिष्ट चैतन्याला अव्यक्त असें म्हणतात. या अव्यक्तापासून प्रथम त्रिगुणात्मक सूक्ष्म असा पंचमहाभूतांची उत्पत्ति होते. या

पंच सूक्ष्म भूतांच्या गुणांना पंचतन्मात्रा असें म्हणतात. हीं पंचमहाभूतें मायेच्या तीन गुणांमुळें त्रिगुणात्मकच असतात. त्यांच्या सात्त्विक अंशाच्या समुदायापासून अंतःकरण बनतें. स्वभावभेदानें अथवा कार्यभेदानें व स्थानभेदानेंहि प्राण, अपान समान, उदान आणि व्यान असे पांच प्रकार झाल्याचें दृष्टीस पडतात. पंचमहाभूतांच्या तामस अंशापासून स्थूल अशा पंचमहाभूतांची उत्पत्ति होते. हीं पंचमहाभूतें पंचतन्मात्रांच्या मानानें स्थूल असलीं तरी त्यांचें पंचीकरण झाल्याशिवाय त्यांना व्यवहारक्षमता येत नाहीं. पंचीकरणाची कल्पना आम्हीं मागें दिलेलीच आहे. पंचमहाभूतांच्या पृथक् पृथक् सात्त्विक अंशापासून ज्ञानेंद्रियांची उत्पत्ति झाली. राजस अंशापासून कर्मेन्द्रियांची उत्पत्ति झाली. याप्रमाणें स्थूलप्रपंचाच्या मुळाशीं असलेल्या सूक्ष्म तत्त्वांचीं प्रथम उत्पत्ति होते. या सूक्ष्म तत्त्वसमुच्चयालाच ब्रह्मांड असें म्हणतात. याच्यावर तादात्म्याभिमान ठेवणाऱ्या आत्म्यालाच हिरण्यगर्भ असें नांव दिलेलें आहे. हींच सूक्ष्म तत्त्वें स्थूल प्रपंचांत गोंविलेलीं असल्यामुळें यांना सूत्र असें म्हणतात. यावरूनच हिरण्यगर्भ सूत्रात्मा असें नांव मिळालेलें आहे.

पंचमहाभूतांच्या पंचीकरणापासून म्हणजेच कमी-अधिक प्रमाणांत झालेल्या मिश्रणापासून जी सृष्टि निर्माण होते तिला पांचभौतिक स्थूलसृष्टि असें म्हणतात. या सृष्टींतील जीवसमूहावर तादात्म्याभिमान ठेवणाऱ्या आत्म्याला विराटात्मा असें म्हणतात. ज्या ब्रह्मदेवानें या विराट् स्थूल प्रपंचाची उत्पत्ति केली, तो ब्रह्मदेव शेषशायी भगवान् श्रीविष्णु यांच्या नाभिस्थानांतून निर्माण झालेल्या कमलांतून प्रकट झाला. श्रीहरीच्या कृपेनें त्यानेंच ही सर्व स्थूलसृष्टि निर्माण केलेलीं आहे. याच अभिप्रायानें ब्रह्मदेवाला आद्य प्रजापति असें म्हटलें जातें.

ब्रह्मदेवानें प्रथम आपल्या मनापासून सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार इत्यादिकांना जन्म दिला म्हणून त्यांना ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असें म्हणतात. हे जन्मतः अत्यंत विरक्त असल्यामुळें ब्रह्मदेवानें त्यांना गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली असतांनाहि त्यांनीं ती आज्ञा न मानतां सदासर्वकाळ ते नारायणाचेंच चिंतन करीत राहिले. त्यानंतर ब्रह्मदेवानें आपल्या देहाच्या निरनिराळ्या अवयवां पासून मरीचि, अत्रि, अंगिरा इत्यादि ऋषींना जन्म दिला. त्याचप्रमाणें दक्षप्रजापतींनाहि पण जन्म दिला. तसेच ब्रह्मदेवानें आपल्या छायेपासून कर्दमऋषींना जन्म दिला. आपल्या देहाच्या उजव्या भागापासून स्वायंभुव मनूला व डाव्या भागापासून शतरूपा या स्त्रीला जन्म दिला. शतरूपा व स्वायंभुवमनु यांच्यापासून दोन पुत्र व आकूति, देवहूति आणि प्रसूति अशा तीन कन्या जन्माला आल्या. प्रियव्रत आणि उत्तानपाद अशीं त्या मुलांचीं नांवें होतीं. त्या मुली उपवर झाल्या. नंतर क्रमानें रुचि, कर्दम आणि दक्ष यांना अर्पण करण्यांत आल्या. कर्दम ऋषींना नऊ मुली व एक मुलगा झाला. मुलाचें नांव कपिल भगवान् असें होते. नऊ मुलींपैकीं दुसरी मुलगी जी अनसूया ती अत्रिऋषींना देण्यांत आली. अत्रिमुनि आणि सती अनसूया यांच्या-

पासूनच आपले चरित्रनायक भगवान् सद्‌गुरु श्रीदत्तात्रेय यांनीं अवतार घेतला आहे. भिन्न भिन्न प्रसंगीं, भिन्न भिन्न उद्देशानें त्यांनीं भिन्न भिन्न अवतार घेतले. त्यांच्या या विविध अवतारांतील सोळा अवतारांना प्राधान्य असल्यामुळें शोडषावतारजयंती-कल्पामध्यें त्याच अवतारांचें वर्णन केलेलें आहे. आरंभीं वर्णन केल्याप्रमाणें आद्य विष्णु भगवान् श्रीहरि यांनीं ब्रह्मदेवाला तेजोमंडलवर्ति ज्योतिरूपानें दर्शन दिले, व ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून स्वत:ला ब्रह्मदेवास दत्तोऽहं असें म्हणून अर्पण करून घेतलें. तें रूप निर्गुण व निराकार आणि अत्यंत तेजस्वी असल्यामुळें इतर जनांना ध्यान करण्यास अत्यंत अवघड होतें. म्हणून ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून ज्योतिर्मय भगवान् विष्णु हे अत्रिऋषींच्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन मंगलमय मूर्त रूपानें अवतरले. हा दत्तात्रेय यांचा योगिराज नांवाचा पहिला अवतार होय. हाच अभिप्राय खालीं लिहिलेल्या कांहीं संस्कृत श्लोकांत प्रकट केलेला आहे. संस्कृतप्रेमी भक्तजनांसाठीं ते श्लोक आम्ही खालीं देत आहोंत.

निरुपाधिकमेकं यन्निर्गुणं निर्विकारकम् ।
निरंजनं निरवधि चैतन्यात्मकमद्वयम् ।। ११ ।।

परिपूर्णं परंब्रह्म सच्चिदानन्दविग्रहं ।
नित्यं शुद्धं नित्यमुक्तं विबुद्धं सर्वकारणम् ।। १२ ।।

शुद्धाद्वैतस्वरूपत्त्वात्तेन किञ्चित्कृतं न हि ।
निर्गुणेऽस्मिन्निर्विकारे सर्वमारोपयंति हि ।। १५ ।।

उपाधित्वेनचादाय स्वात्मशक्ति स एव हि ।
अभवद्देवदेवेशः सर्वज्ञः सर्वकारणम् ।। १७ ।।

अव्यक्तादिकमेतेन सर्वं सृष्टं चराचरं ।
वेदशास्त्रपुराणादावादिकर्ता स गीयते ।। १८ ।।

आपो नारा इति प्रोक्ता अयनं तस्य ताः पुरा ।
अतो नारायणोऽसौ तन्नाभेः कः समवर्तत ।। २६ ।।

जीवतो वाक्यकरणात्पितुः पुत्रस्य पुत्रता ।
इत्यजोऽनुशशासात्रि ब्रह्मा सृष्टिप्रवर्तकः ।। ३३ ।।

ब्रह्मणा नोदितः सृष्टावत्रिर्ब्रह्मविदां वरः ।
सह पत्न्या ययावृक्षं कुलाद्रिं तपसि स्थितः ।। ३७ ।।

भगवांस्तत्र तदनुग्रहायाविरभूत्स्वयं ।
कार्तिके शुक्लपक्षे तु पूर्णिमायां ज्ञवासरे ।। ४० ।।

आद्ये यामे मुहूर्ते च योगिराजो ह्यवातरत् ।
निराकारोऽप्युपासार्थं साकारत्वं गतः प्रभुः ।। ४१ ।।

शुद्धस्फटिकसंकाशः परानंदमयः पुमान् ।
नित्यशुद्धस्वात्मरूपनिष्ठत्वाद्योगिनामिव ।। ४२ ।।

योगप्रवर्तकत्वाच्च योगिराज इति स्मृतः ।
पूजांतेऽर्घ्यत्रयं दद्यान्मंत्रैरेतैरुपासकः ।। ४४ ।।

अत्रिमुनींच्या सानिध्यांत दत्तात्रेय यांनीं जो पहिला अवतार घेतला, तो कार्तिक शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं कृत्तिका नक्षत्रावर घेतला. त्या दिवशीं बुधवार होता. हा अवतार पहिल्या प्रहरामधील पहिल्याच मुहूर्तावर झाला. याप्रमाणें स्वतः निराकार असूनहि भगवान् दत्तात्रेय हे साकार बनले. त्यांनीं योगमार्गाचा उपदेश करून लोकांना सुखी केले. म्हणून त्यांना योगेश्वर अथवा योगिराज असें नांव मिळालें. तेजोमंडलवर्ती भगवान् योगिराज यांचें रूप अत्यंत कोमल व नयनमनोहर असून अंगकांति शुद्ध स्फटिकाप्रमाणें स्वच्छ होती. हा अवतार एकमुखी व चतुर्भुज प्रत्यक्ष विष्णूप्रमाणेंच होता. जयंती-समयीं यथासांग पूजा करून आरतीच्या पूर्वी खालीं दिलेल्या श्लोकांनीं त्यांना तीन अर्घ्य द्यावेत. ते श्लोक असे –

(मंत्राः) मायागुणविमुक्ताय सर्वलोकेश्वराय च ।
योगिराजाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

अद्वयानंदरूपाय योगमायाधराय च ।
योगिराजाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

अव्यक्ताव्यक्तरुपाय निर्गुणाय गुणात्मने ।
योगिराजाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

याप्रमाणें क्रमानें प्रत्येक वेळीं एकएक श्लोक म्हणून तीन अर्घ्य द्यावेत. भगवान् दत्तात्रेय हे मायेच्या गुणांतून पूर्णपणें मुक्त असून ते सर्व लोकांचे ईश्वर म्हणजे स्वामी आहेत. अत्यंत देदीप्यमान आणि योगिराज असलेल्या त्या दत्तदेवाला मी या पूजेच्या निमित्तानें अर्घ्य समर्पण करीत आहें.

भगवान् दत्तात्रेय हे एकच एक केवळ आनंदरूप असून त्यांनीं लोकांवर अनुग्रह करण्याकरितां योगमायेचा अवलंब केलेला आहे. त्या योगिराज दत्तदेवाला या पूजेच्या निमित्तानें मी अर्घ्य समर्पण करीत आहें.

भगवान् दत्तात्रेय हे स्वभावतः अव्यक्तरूप असूनहि योगमायेच्या सामर्थ्यानें ते व्यक्तरूपहि धारण करितात. अशा त्या दिव्य दत्तगुरूला मी अर्घ्य समर्पण करीत आहें.

याप्रमाणें वरील श्लोकांचा अर्थ लक्षांत घ्यावा. आरती व मंत्रपुष्प झाल्यानंतर गूळ अथवा खडीसाखर यासह खोबऱ्याचा नैवेद्य सर्वांना प्रसाद म्हणून वाटावा मध्यान्हसमयीं नैवेद्य-वैश्वदेव करून सवाष्ण, ब्राह्मण व इष्टमित्र यांच्यासह आपण

भोजन करावें. यथासमय श्रीदत्तात्रेय यांचें नामसंकीर्तन व गुणसंकीर्तन करून उत्सवदिन साजरा करावा. हीच रीति सर्वत्र अवतारसमयीं उपयोगांत आणावी.

## दुसरा अवतार अत्रिवरद श्रीदत्तात्रेय

श्रीदत्तात्रेय यांचा दुसरा अवतार अत्रिवरद या नांवानें वर्णिलेला आहे. मागील अध्यायांत योगिराज म्हणून आम्हीं त्याचें वर्णन केलें. तोच पुढें अत्रिमुनींना वर देण्याकरितां अत्रिवरद या नांवानें अवतरला. अत्रिमुनि जन्माला आल्यानंतर ब्रह्मदेवानें त्यांना आज्ञा केली कीं, तुम्ही गृहस्थाश्रम स्वीकारून पितृऋणांतून मुक्त व्हावें. वडिलांची ही आज्ञा ऐकून अत्रिमुनींनीं गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांना पुष्कळ पुत्र झाले. ते सर्व विद्वान संशोधकहि होते; पण त्यांच्या महत्त्वाकांक्षेला पूर्ण करणारा असा एकहि पुत्र त्यांत नव्हता. त्यांना त्रैलोक्यामध्यें कीर्तीचा ध्वज फडकवून साऱ्या विश्वाचें कल्याण करणारा असा पुत्र पाहिजे होता. त्यांनीं पुष्कळ विचार केला व शेवटीं महासती श्रीअनसूया हिला बरोबर घेऊन पुत्रप्राप्तीसाठीं त्यांनीं खडतर तप करण्याचें ठरविलें.

## अत्रिमुनींचें खडतर तप

अनसूयेला बरोबर घेऊन ते ऋक्ष्य पर्वतावर गेले.

"प्राणायामेन संयम्य मनो वर्षशतं शुचिः ।
अतिष्ठदेकपादेन सकृद्दृष्टं महौजसम् ।। ३ ।।

ज्ञानानंदघनं नित्यं प्रधानगुणतः परम् ।
योजिराजं महात्मानं चिंतयामास सर्वदा ।। ४ ।।

रोज पहांटेंच उठावें. स्नानसंध्यादि नित्यान्हिक उरकून तपश्चर्येला बसावें. प्रथम प्राणायाम करून मनाला एकाग्र करावें. याप्रमाणें सबाह्य अभ्यंतर शुद्ध होऊन, एका पायावर उभें राहून त्यांनीं तप केलें. तपाच्या वेळीं ते पूर्वीं एक वेळ योगिराजाच्या रूपानें दृष्टीस पडलेल्या तेजोरूप परब्रह्माचें ध्यान करीत असत. तें रूप सत्त्व, रज व तम या मायेच्या तिन्ही गुणांपासून अलिप्त असून नित्य चिन्मय व आनंदघन आहे, असेच त्यांच्या प्रतीतीला येत होतें. तें सर्व जीवांना आपल्यामध्यें सामावून घेणारें असून सर्वव्यापी, सर्वाधार व सर्वातीत आहे. निःस्सीम तेजोरूप अशा त्या परमात्म्याचेंच अत्रिमुनि सतत चिंतन करीत असत. अनसूया एकनिष्ठ अंतःकरणानें त्यांची सेवा करून त्यांच्या तपश्चर्येला साहाय्य करीत असे. त्यांची ही तपश्चर्या सतत शंभर वर्षें एका पायावर उभें राहून चालली होती. परमेश्वरानें मला त्रैलोक्यहितकारी सर्वज्ञ व सर्वसमर्थ असा, यावच्चंद्रदिवाकरौ लोककल्याणाकरितां कार्य करीत राहणारा पुत्र द्यावा हाच एक ध्यास त्यांच्या मनाला लागलेला होता. शंभर वर्षांनंतर त्या उग्र तपानें त्यांच्या मस्तकांतून अग्नीच्या ज्वाला प्रकट होऊं लागल्या. त्या प्रखर तेजानें त्रैलोक्याचा दाह होऊं लागला. देव, दानव, मानव,

पशु, पक्षी सर्व चराचरविश्व भयानें व्याकुळ झालें! आतां विश्वाची धडगत दिसत नाहीं; असें पाहून सर्व देव व ऋषिमुनि हे ब्रह्मदेवाला, विष्णूला आणि महेश्वराला शरण गेले. त्या तिघांनाहि सर्वांची दया आली. त्यांनीं सर्वांचें सांत्वन करून त्यांना अभयवचन दिलें. सर्व लोक त्या देवांना वंदन करून आपापल्या स्थानाला गेले. नंतर ब्रह्मदेव हंसावर आरूढ झाले, विष्णु हे गरुडावर बसले. शंकरहि नंदीवर बसले. हे तिन्ही देव आपआपल्या आयुधांसह ऋक्ष पर्वतावर अत्रिऋषींच्या जवळ येऊन पोहोंचले.

अत्रिमुनि हे ध्यानसमाधीमध्यें निमग्न होते. निद्रेंत असलेल्याला जागें करावें त्याप्रमाणें त्या तिन्ही देवांनीं आपल्या तेजानें अत्रिमुनींना जागृत केले. अत्रिमुनींनीं त्या देवांना पाहिलें. नम्रभावानें वंदन करून अत्रिमुनि त्यांना म्हणाले, "महाराज मी तर अंतःकरणांत एकाचेंच ध्यान केलेलें आहे; पण आपण तिघेजण माझ्यापुढें उभे आहां. आपण कोण, कोठून व कशाकरितां आलेले आहांत तें मला सांगा. आपले स्वरूप अत्यंत तेजस्वी व अलौकिक असून त्याचें मनाला आकलन होत नाहीं, व वाणीलाहि तें वर्णन करितां येत नाहीं. खरोखर तें मोठें आश्चर्यकारक आहे. मी धाष्ट्यनिंच विचारीत आहे. आपण मला स्वतःचा परिचय देऊन माझा संशय दूर करावा. माझा प्रश्न अयोग्य असल्यास मला क्षमा करावी. आपण भक्तवत्सल आहां, क्षमाशील आहां." अत्रिमुनींचें हें भाषण ऐकून ते तिन्ही देव म्हणाले, "तुझा प्रश्न अत्यंत बरोबर आहे. तुझें कल्याण असो. खरोखर तूं सत्यसंकल्पच आहेस. अर्थात् तूं जो संकल्प करशील, जें मनांत आणशील तें घडून येईल असें सामर्थ्य तुला या तपानें प्राप्त झालेलें आहे. तूं तपश्चर्येमध्यें ज्याचें ध्यान केलें आहेस तेच आम्ही ह्या तीन रूपांनीं तुझ्यापुढें प्रकट झालों आहोंत. तीन रूपांनीं आम्ही पृथक् पृथक् दिसत असलों तरी तत्त्वतः आम्ही एकरूपच आहोंत. ज्या परमेश्वराचें तूं हृदयांत चिंतन केलेंस तो परमात्मा आम्ही आहोंत. आम्ही तिघेंहि एकरूपच आहोंत ही गोष्ट लक्षांत घे. हे मुनिश्रेष्ठा, तत्त्वतः आम्हां तिघांमध्यें तिळमात्रहि भेद नाहीं याबद्दल यत्किंचितहि संशय मनांत येऊं देऊं नकोस. आम्ही एकरूपच आहोंत. हे मुनिवर्या, तूं विचारशील कीं, तुम्ही तीन रूपांनींच प्रकट कां झालां? दोन अथवा चार रूपांनीं प्रकट कां झाला नाहीं? यावर उत्तर असें कीं, ही सर्व सृष्टि त्रिगुणात्मक मायेच्या तीन गुणांपासून निष्पन्न होत असल्यामुळें त्या तिन्ही गुणांचीं पृथक् पृथक् कार्यं व्यक्त करण्याकरितां आम्ही त्या मायेचा अंगीकार करून हीं तीन रूपें धारण केलेलीं आहेत. माया ही त्रिगुणात्मकच आहे. सत्त्व, रज आणि तम हे तिचे तीन गुण प्रसिद्धच आहेत. या तीन गुणांच्या अनुरोधानें या सृष्टीमध्यें तीन शक्तींचेंच प्राधान्यानें कार्य चालू असतें. रजोगुणानेंच सर्जनशक्तीचा आविर्भाव होत असतो. या सत्त्वगुणापासूनच भरण, पोषण व संगोपन हीं कार्यें चालूं असतात. त्याचप्रमाणें तमोगुणापासून संहरणशक्तीचा आविर्भाव होत असतो. या तिन्ही शक्तींचें सनीकरण

अथवा एकीभवन म्हणजेच परमात्मा होय. तोच एक परमात्मा सृष्टि, स्थिति आणि प्रलय या तीन रूपांनीं विश्वाची व्यवस्था करण्याकरितां पृथक् पृथक् ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या रूपांनीं अभिव्यक्त होत असतो. म्हणूनच आम्ही या तीन रूपांनीं तुला दर्शन दिलेलें आहे.

" एकच परमात्मा तीन मूर्तींच्या रूपानें प्रकट झाल्यामुळें त्याला त्रिमूर्ति असें म्हटलें जातें. हे अत्रिमुने, तुम्हीं पूर्वीं प्रयत्नानें पाहिलेलें व ध्यायिलेलें तेंच अलौकिक रूप उपाधिभेदानें तीन रूपांनीं तुमच्यापुढें प्रकट झालेलें आहे. तुम्हांला इष्ट वर देण्याकरितांच आम्ही तीन रूपांनीं प्रकट झालों आहोंत. माया शक्तीच्या अनुरोधानें सृष्टि, स्थिति आणि प्रलय हीं तीन कार्यें आम्हीं क्रमशः स्वीकारलेलीं आहेत. म्हणून आम्हीं त्रिमूर्तिरूपानें नटून तुम्हांला हें दर्शन दिलेलें आहे. आमचें अलौकिक रूप पूर्वी ब्रह्मदेवानें मोठ्या प्रयत्नानें पाहिलें आहे. तेंच आम्ही तुम्हांला तुमच्या तपानें प्रसन्न होऊन आतां दाखवीत आहोंत. हें पहा." असें म्हणून ते तिन्ही देव एकदम अंतर्धान पावले आणि योगिराजाच्या रूपानें अत्रिमुनींच्या पुढें उभे राहिले.

योगिराजं महात्मानं योगमार्गप्रवर्तकम् ।
शुद्धस्फटिकसंकाशं भासयंतं दिशो दश ॥ १८ ॥

क्षणेन दृश्यते तत्तु त्रिगुणात्मकमुत्तमम् ।
योऽत्रिणाऽऽराधितो योगतपसाऽकल्मषेण सः ॥ १९ ॥

योगाध्यक्षो योगिराजो योगसंसिद्धिदः प्रभुः ।
अत्रिसंकल्पसिद्ध्यर्थं वरदानार्थमुद्यतः ॥ २० ॥

तप्तकांचनसंकाशः षड्भुजः सुस्मिताननः ।
यथाहूतो निद्रितो ना प्रज्ञानालंबनेन हि ॥ २१ ॥

बहिर्मुखो भवत्येवं भगवानप्ययं तथा ।
चित्प्रकृत्यवलंबेन शबलत्वमुपेत्य सः ॥ २२ ॥

भूत्वा बहिर्मुख इव देवो भक्तानुकंपया ।
आविर्बभूव सहसा कार्तिके मासि पुण्यदे ॥ २३ ॥

कृष्णपक्षे प्रतिपदि रोहिण्यां गुरुवासरे ।
प्रथमे प्रहरे चैव मुहूर्ते प्रथमे विभुः ॥ २४ ॥

अवतारो द्वितीयोऽत्रिवरदाऽख्योऽयमीशितुः ।
तप्तकांचनसंकाशः षड्भुजः सुस्मिताननः ॥ २५ ॥

त्रिगुणात्मकमायायुक् त्रिमूर्तिवरवेषधृक् ।
त्रिमूर्तित्वाद् ब्रह्मविष्णुशिवलक्षणलक्षितः ॥ २६ ॥

मालाकमंडलुरधःकरपद्मयुग्मे
मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे
ध्यायेत्तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।। २७ ।।

लोककल्याणासाठीं लोकांना योगमार्गाला प्रवृत्त करण्याकरितां उदार व दयाशील अशा परमात्म्यानेंच प्रथम योगिराजरूपानें अवतार घेतला. त्या अवताराचें रूप शुद्ध स्फटिकाप्रमाणें अत्यंत स्वच्छ होतें. त्याच्या तेजानें दाही दिशा उज्ज्वल झालेल्या दिसत होत्या. क्षणांतरांत तेंच रूप पालटून त्रिगुणात्मक त्रिमूर्तिरूपानें अत्यंत उत्तम रीतीनें शोभूं लागलें, असा साक्षात्कार अत्रिमुनींना झाला. अत्रिमुनींनीं निर्मल योगतपानें ज्या परमात्म्याची आराधना केली होती तोच परमात्मा आतां त्रिमूर्तिरूपानें आपल्यापुढें उभा आहे, अशी अत्रिमुनींची खात्री झाली. हा परमात्मा योगविद्येचा अध्यक्ष असून तो योगिराज आहे. तो योगविद्येची सिद्धि प्राप्त करून देणार आहे. अत्रिमुनींनीं त्याला नमस्कार केला, अभीष्ट वर देऊन अत्रिमुनींचा संकल्प पूर्ण करण्याकरितांच तो भूमंडलावर अवतरलेला होता. या स्वरूपांत अत्रिमुनींना इष्टवर प्राप्त करून दिल्यामुळेंच या अवताराला " अत्रिवरद " हें नांव पडलें.

अत्रिवरद दत्तात्रेय यांचें रूप तापविलेल्या सोन्याप्रमाणें अत्यंत देदीप्यमान होतें. मुखावर स्मितहास्य विलसत असून त्याला यथायोग्य आयुधांनीं विराजित असे सहा हातहि शोभत होते. गाढ निद्रेंत असलेला एखादा मनुष्य जसा जागा होऊन अवलोकन करूं लागतो. त्याचप्रमाणें योगिराज भगवान् दत्तात्रेय यांनीं अत्रिमुनींकडे पाहिलें. तत्त्वतः परब्रह्मस्वरूप असूनहि तो परमात्मा या वेळीं चित्प्रकृतीचा म्हणजे आपल्या मायाशक्तीचा अवलंब करून सोपाधिक मूर्तस्वरूप बनला व भक्तवात्सल्यानें प्रेरित होऊन अत्रिमुनींच्या पुढें वर देण्यासाठीं दत्त म्हणून उभा राहिला. तो महिना कार्तिक होता. कृष्ण पक्षांतील प्रतिपदेवर रोहिणी नक्षत्र आणि गुरुवार असतां पहिल्या प्रहरांतील पहिल्याच शुभ मुहूर्तावर हा दत्तात्रेय यांचा अत्रिवरद नांवाचा दुसरा अवतार झाला. वरील सहविसाव्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें त्रिगुणात्मक मायायुक्त उत्तम वेष धारण केलेला त्रिमूर्तिस्वरूप अवतार असल्यामुळें या अवतारांत ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर या तिन्ही देवांचीं आयुधें स्पष्ट दिसत होतीं. असा हा दत्तात्रेय यांचा षड्भुज व एकमुखी अवतार आहे. ध्यानसमयीं या रूपाचें चिंतन करावें.

यद्यपि वरील श्लोकांत एकमुख अथवा त्रिमुख असा उल्लेख नाहीं; तथापि श्रीवासुदेवानंदसरस्वती यांच्या संप्रदायाला अनुसरून आम्हीं एकमुखी असा उल्लेख केला आहे. वस्तुतः त्रिमूर्तित्वात या उल्लेखावरून दत्तात्रेय यांना या वेळीं तीन मुखें असावींत असेंच प्रतीतीला येतें. ब्रह्मांडपुराणांतहि हाच अभिप्राय व्यक्त केलेला

असल्यामुळें "तीन शिरें सहा हात" हेंच रूप असंख्य भक्तजनांना पसंत असल्याचें दिसतें. कांहीं ठिकाणीं तर दत्तात्रेय हे एकमुख व द्विभुज असल्याचेंहि दिसून येतें. हीं तिन्ही रूपें शास्त्रसिद्ध असल्यामुळें कोणत्याहि रूपाचें चिंतन केलें तरी तें शास्त्रविरुद्ध होत नाहीं. या बाबतींत आग्रह धरणें हें अज्ञानाचें व अविवेकाचें लक्षण ठरेल. कांहीं ठिकाणीं तर अक्षमाला व कमंडलु हीं ब्रह्मदेवाचीं चिन्हें खालच्या दोन हातांत दाखविलीं असून मधल्या दोन हातांत शंख आणि चक्र हीं विष्णूचीं चिन्हें दाखविलेलीं आहेत. वरच्या दोन हातांत त्रिशूळ आणि डमरू हीं शंकराचीं चिन्हें दाखविलेलीं आढळतात तर कांहीं ठिकाणीं शंख, चक्र, गदा आणि पद्म हीं सगळींच विष्णूचीं चिन्हें पहावयास सांपडतात. दत्तात्रेय यांच्या ठिकाणीं असलेल्या आपआपल्या अभिरुची-प्रमाणें भक्तजनांनीं दत्तात्रेय यांचें ध्यान निवडावें व त्या निवडलेल्या ध्यानाचें सतत चिंतन करीत राहावें असा शास्त्रज्ञांचा अभिप्राय आहे.

## आयुधांचीं प्रयोजनें

अत्रिवरद भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं जीं आयुधें अथवा चिन्हें धारण केलेलीं आहेत त्यांचें प्रयोजन आपण लक्षांत घेणें हें उपासनेच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. म्हणून आम्ही या ठिकाणीं त्याचें थोडेंसें विवेचन करीत आहोंत हें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें. वस्तुतः भगवान् श्रीदत्तात्रेय हे परिपूर्ण आत्मस्वरूप असल्या-मुळें ते स्वभावतःच आप्तकाम व पूर्णकाम असेच आहेत. ते षड्गुणैश्वर्यसंपन्न असल्यामुळें त्यांना कांहीं मिळवावयाचें उरलेलें आहे असें नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं अपुरें पडलें आहे असेंहि नाहीं. अशा स्थितींत त्यांना आयुधें धारण करण्याची काय आवश्यकता आहे? तत्त्वतः त्यांना स्वतःला आयुधांची कांहीं आवश्यकता नसली तरी भक्तजनांच्या कल्याणासाठींच त्यांनीं तीं आयुधें धारण केलेलीं आहेत. यावर कोणी अशी शंका घेईल कीं, अहो परमात्मा हा तर 'सत्यसंकल्प' आहे. तो बसल्या ठिकाणींच स्वतःच्या संकल्पबलानें भक्तजनांचे सर्व मनोरथ पूर्ण करूं शकतो. त्याला आयुधांची आवश्यकता काय आहे? माला ही जपाकरितां धारण करावयाची असते. क्वचित् ती भूषण म्हणूनहि धारण केली जाते. "माल्यते इति माला" अशी माला शब्दाची व्युत्पत्ति आहे. जपासाठीं अथवा भूषण म्हणून हातामध्यें अथवा गळ्यामध्यें जी धारण केली जाते तिला माला असें म्हणतात. दत्तात्रेय यांना तर जप करण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण त्यांना जप करून कांहीं सिद्धि वगैरे मिळवा-वयाच्या नाहींत. ते स्वतःच सिद्धराज आहेत. ते स्वतःच भूषणभूत असल्यामुळें त्यांना माला धारण करण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. मग ही माला कशाला? त्याच-प्रमाणें संध्यादि ब्रह्मकर्म करण्यासाठीं आवश्यक तें जल जवळ ठेवण्याकरितां कमंडलु धारण केला जातो. कमंडलु म्हणजे एक विशिष्ट प्रकारचें जलपात्र होय. परमात्मा हा नित्यशुद्ध व तृप्त असल्यामुळें त्याला जलाची आवश्यकताच नाहीं.

मग हा कमंडलु कशाला? त्रिशूळ आणि चक्र हीं दोन शस्त्रें आहेत. तीं स्वसंरक्षणासाठीं अथवा शत्रूंचें निर्दालन करण्यासाठीं धारण केलीं जातात. परमात्मा हा तर अद्वय असल्यामुळें निर्भय आहे. त्याला भय कोणाचें ? तो अद्वितीय अथवा समदर्शी असल्यामुळें त्याला कोणाचीहि भीति असणें शक्य नाहीं, व त्याला कोणी शत्रूहि नाहीं. मग त्रिशूळ आणि चक्र हीं आयुधें कशाला ? त्याचप्रमाणें शंख हा आपल्या विशिष्ट नादानें आनंद देत असतो. नित्य आनंदस्वरूप असलेल्या दत्तात्रेयांना शंखनादानें काय आनंद मिळणार ? तसेंच डमरूच्या नादानेंहि निजानंदामध्यें निमग्न असलेल्या दत्तात्रेयांना अधिक काय आनंद मिळणार ? अशा रीतीनें दत्तात्रेयांना कोणत्याच आयुधाचें कांहीं प्रयोजन नसतांना त्यांच्या सहाहि हातांत हीं चिन्हें अथवा आयुधें त्यांनीं कां धारण केलीं ?

प्रश्नकर्त्यांनीं निर्दिष्ट केलेले वरील सर्व प्रश्न अगदीं बरोबर आहेत. दत्तात्रेय यांना वरील कोणत्याहि आयुधांचें स्वतःला कांहींच प्रयोजन नसलें तरी त्यांनीं भक्तजनांच्या कल्याणाकरितांच हीं आयुधें धारण केलेलीं आहेत. यद्यपि त्यांना स्वसंकल्पबलानेंच भक्तजनांचें कल्याण करतां येणें शक्य आहे. तथापि ते भक्तजनांच्या ध्यानासाठीं सगुण-साकाररूप धारण करून सर्व आयुधांसह भक्तजनांच्या पुढें विराजमान झालेले आहेत. त्यांच्या या मंगलमय सगुण-साकार रूपाच्या ध्यानानेंच उपासकांचीं मनें शांत व प्रसन्न होतात आणि त्यांना सर्व सिद्धींचा लाभ होतो. याच अभिप्रायानें परमेश्वरानें दत्तात्रेय यांच्या अवतारांत हें रूप व हीं आयुधें धारण केलेलीं आहेत.

परमेश्वराच्या एकाच स्वरूपामध्यें दोन रूपांची कल्पना केलेली आहे. उजव्या अंगाच्या भागानें परमात्मा हा आदिगुरु बनला व डाव्या अंगाच्या भागानें तोच मायावी ईश्वर झाला. या आदिगुरूंच्या उजव्या हातामध्यें अक्षमाला शोभत आहे. अक्ष शब्दाचा अर्थ मणि असा आहे. रुद्राक्ष, स्फटिकाक्ष, प्रवालाक्ष (पोवळें) असे अक्षांचे अनेक प्रकार असतात. या अक्षमालेमध्यें बावन्न मणि असतात. त्यांतील प्रत्येक मणि वर्णमालेंतील बीजाक्षरांचें प्रतीकच आहे हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें. सोळा स्वर व छत्तीस व्यंजनें यांना बीजाक्षरें असें म्हणतात. प्रत्येक अक्षराच्या मस्तकावर अर्धचंद्र व अनुस्वार दिला म्हणजे तें अक्षर बीजस्वरूप बनतें. मालेच्या आरंभीं अ हें अक्षर असून शेवटीं क्ष हें अक्षर असतें. म्हणून या वर्णमालेला अक्षमाला असें म्हणतात. तंत्रशास्त्रांतील प्रत्येक मंत्र हा वर्णात्मक असतो. मंत्र हें देवतेचें रूप असतें. देवतेचें रहस्य व बीजाक्षराचा अथवा सबीज मंत्राचा जप हें सिद्धीचें आणि मोक्षाचें उत्तम साधन मानलें जातें. सर्व निगमागम ग्रंथांचा याच अक्षमालिकेंतून उगम झालेला असतो. मंद अधिकारी मुमुक्षु लोकांच्या कल्याणासाठीं आदिगुरु भगवान् दत्तात्रेय यांनीं आपल्या उजव्या हातांत अक्षमाला हें चिन्ह धारण केलेलें आहे. हें मोक्षाचें व सिद्धीचें द्योतक आहे. हें अक्षमालेचें रहस्य भक्तजनांनीं लक्षांत घ्यावें.

मध्यम अधिकारी मुमुक्षुजनांकरितां दत्तात्रेय यांनीं उजव्या बाजूच्या मधल्या हातांत डमरू धारण केला आहे, तो मोक्षाचा सूचक आहे. "अइउण्" इत्यादि पाणिनीय सूत्रांत ग्रथित केलेल्या सर्व अक्षरांचा आविर्भाव याच डमरूंतून झालेला आहे. हाच अक्षरसमुदाय संभाषणरूपानें अथवा पूर्वोत्तरपक्षरूपानें शब्दज्ञानाला प्रकाशित करीत असतो. वेद, शास्त्र, स्मृति व पुराणें हीं सर्व याच अक्षरराशींतून प्रकट होत असतात. नित्यानित्यवस्तुविवेक आणि क्षमदमादि साधनसंपत्ति व आत्म-साक्षात्कार याच अक्षरराशींतून मुमुक्षुजनांना मिळवितां येतों. हें सर्व आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या कृपेनेंच सिद्ध होत असतें. दत्तात्रेय यांच्या हातांतील डमरू हें चिन्ह हीच गोष्ट सुचवीत आहे. उत्तम अधिकारी असलेल्या मुमुक्षु जनांवर अनुग्रह करण्याकरितां आदिगुरु श्रीदत्तात्रेय यांनीं आपल्या वरच्या उजव्या हातांत चक्र धारण केलेलें आहे. या चक्राला सुदर्शनचक्र असें म्हणतात. हें सुदर्शनचक्र अत्यंत तेजस्वी असल्यामुळें मुमुक्षु जनांच्या अज्ञानरूपी तिमिराचा नाश करून त्यांना तावडतोब मुक्तिसुखाचा लाभ करून देण्यास समर्थ आहे. या सुदर्शनचक्राला बारा आरा असून तें अत्यंत तीक्ष्ण आहे. अज्ञान, मलिनवासना आणि पापपुण्यात्मक कर्में यांतून निर्माण होणाऱ्या संसाररूपी वृक्षाचा तें पूर्णपणें नाश करण्याला समर्थ आहेत. भक्तजनांच्या भवबंधाचा उच्छेद करून तें अविद्येच्या आवरणालाहि पार घालवून टाकणारें आहे. आपल्या अलौकिक तेजानें भक्तजनांच्या अंतःकरणांत स्वात्मज्योतीचा प्रकाश निर्माण करून भक्ताला परब्रह्माचा साक्षात्कार करून देण्याला आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचें हें सुदर्शनचक्र एकच एक अत्यंत समर्थ आहे. अशा रीतीनें दत्तात्रेय यांचें हें सुदर्शनचक्र मोक्षोपयोगी असल्यामुळें भक्तजनांनीं त्याचें दर्शन घ्यावें व हृदयांत नित्य चिंतन करावें. हा अभिप्राय व्यक्त करण्यासाठीं आदिगुरूनें आपल्या हातांत चक्र धारण केलेलें आहे. अशा रीतीनें दत्तात्रेय यांचें दक्षिणांग मुमुक्षु लोकांना मोक्ष प्राप्त करून देणारें आहे. भक्तजनांनीं हा भाव लक्षांत घेऊनच दत्तात्रेयांचें चिंतन करावें.

आतां आपण श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या वामांगाचा विचार करूं. वामांग म्हणजे शरीराची डावी बाजू. दत्तात्रेयप्रभूंच्या मूर्त स्वरूपाचा डावा भाग हा मायावी ईश्वर-स्वरूप मानला जातो. सर्व कर्मांचें परिमार्जन करणारे, स्नानसंध्यादि सर्व कर्मांना उपयुक्त असणारें आणि तहान भागवून तृप्त करणारें असें जल ज्या विशिष्ट पात्रामध्यें सांठविलेलें असतें त्या पात्राला कमंडलु असें म्हणतात. त्याच्या बुडाचा भाग वा मुखाचा भाग अर्धवर्तुळाकार व पसरट असून बोटानें धरण्याच्या सोयीसाठीं तोंडाच्या बाजूला अर्धवर्तुळाकार कडेंहि बसविलेलें असतें. पाणी ओतून घेण्यासाठीं मोराच्या मानेप्रमाणें त्याला तोटीहि बसविल्याचें आढळून येतें. त्याला कमंडलु असें म्हणतात. हा भोपळ्याचा अथवा तांबें–पितळ इत्यादि धातूंचा केलेला असतो. प्रायः ऋषिमुनि व वैराग्यशील लोक याचा वापर करतात. क म्हणजे जल; ज्याच्यामध्यें मंडयते

म्हणजे सांठविलें जातें त्याला कमंडलु असें म्हणतात. अशी कमंडलु शब्दाची व्युत्पत्ति आहे. हा कमंडलु दत्तात्रेय यांनीं खालच्या बाजूच्या डाव्या हातानें धारण केलेला आहे. संस्कृत भाषेमध्यें जलाला जीवन असें म्हणतात. प्रत्येक जीवाला कर्माचें फल देऊन त्याचें जीवन सुखसंपन्न करण्याचें कार्य परमात्माच करीत असतो. कर्में हीं क्षण-भंगुर असल्यामुळें काळाच्या उदरांत तीं गडप होऊन जातात. कर्माचा नाश झाल्यानंतर कर्माच्या अनुरोधानें जीवांना कर्मानुरूप फल देण्याचें कार्य परमात्माच करीत असतो. परमात्मा जर नसेल तर जीवांना आपआपल्या कर्माचीं फळें मिळणार नाहींत. त्याच तर्कानें शास्त्रज्ञ व सर्वज्ञ सर्वसमर्थ अशा ईश्वराचें अस्तित्व मानीत असतात. अधिक जिज्ञासू लोकांनीं हा विषय "फलमत उपपत्तेः" (३-२-३८) या ब्रह्मसूत्रावरील शांकरभाष्यांत अवलोकन करावा. कमंडलूंत असलेल्या जलानें मी सर्व जीवांना जीवन देतों, तृप्त करतों हाच अभिप्राय कमंडलु धारण करून भगवान् श्रीदत्तात्रेय प्रकट करीत आहेत. या कमंडलूचें जे भक्तजन चिंतन करतील त्यांचें जीवन सुखसमृद्ध होईल ही गोष्ट भक्तजनांनीं लक्षांत घ्यावी.

कर्माच्या अनुरोधानें जीवांना जन्म मिळतो व जन्म मिळाल्यानंतर जीवांच्या हातून कर्में घडत असतात. तर मग अगोदर कर्में मानावयाचीं का अगोदर जीवांचें अस्तित्व मानावयाचें ? तात्पर्य, कर्में घडून आल्याशिवाय जीवांची उत्पत्ति होत नाहीं व जीवांची उत्पत्ति झाल्याशिवाय कर्मांची उत्पत्ति होत नाहीं. मग अगोदर जीव मानणार का अगोदर कर्म मानणार असा प्रश्न पुढें येऊन उभा राहतो. "धाता यथा-पूर्वमकल्पयत्" हें श्रुतिवचन सुप्रसिद्ध आहे. ब्रह्मदेवानें पूर्वींच्या सृष्टीप्रमाणेंच ही सृष्टि निर्माण केली, असा वरील श्रुतिवाक्याचा अर्थ आहे. बीजांकुरन्यायानें सृष्टिप्रलय-परंपरा ही अनादि आहे. तिचा मूळ आरंभ पहावयास सांपडत नाहीं. म्हणून तत्त्ववेत्त जीव आणि कर्में हीं अनादि मानतात. जीव हा स्वतः ब्रह्मरूप असूनहि अविद्येमुळें आपलें स्वरूप विसरतो व स्वतःला ब्रह्माहून निराळें मानतो. मायेनें देहाशीं तादात्म्य पावून देहालाच मी असें मानतो, व देहाचे जन्म-मरणादि धर्म आपल्यावर लादून घेतो. पुनःपुन्हां प्राप्त होणाऱ्या या जन्म-मरणाच्या प्रसंगालाच संसार असें म्हणतात. ज्या अज्ञानानें या जीवाला दुःखमय संसार भोगावा लागतो त्या अज्ञानाचें प्रक्षालन करण्याकरितां भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं आपल्या कमंडलूमध्यें ज्ञानरूपी जीवन अथवा जल भरून ठेविलेलें आहे. याप्रमाणें गुरुदेवांच्या हातांत असलेल्या कमंडलूचें चिंतन करावें.

दत्तात्रेय यांनीं आपल्या डाव्या बाजूच्या दुसऱ्या हातांत त्रिशूळ धारण केलेला आहे. तो अत्यंत तीक्ष्ण आणि तेजस्वी आहे. त्याला शूळासारखीं अणुकुचीदार तीन टोकें असल्यामुळें त्रिशूळ असें म्हणतात. मधलें टोंक भाल्यासारखें असून त्याच्या शेजारीं दोन्ही बाजूंना दोन टोकें उभीं असतात. त्रिशूळाचीं हीं तीन टोकें जणू कांहीं

सदाचारकांड, व्यवहारकांड आणि प्रायश्चित्तकांड होत. पाण्यानें भरलेल्या घड्याला ज्याप्रमाणें तिवईचा आधार असतो त्याप्रमाणें मानवी जीवन या तीन कांडांवर आधारलेलें असतें. सर्व जगाची स्थिति याच तीन कांडांवर परमेश्वरानें कल्पिलेली आहे. धर्म, अर्थ आणि काम हा त्रिवर्ग याच तीन कांडांनीं सिद्ध होत असतो. मानवी जीवनांत या त्रिवर्गाची समृद्धि अत्यंत आवश्यक असते, हाच अभिप्राय त्रिशूळानें सुचविला जात आहे. दत्तात्रेय प्रभूंच्या डाव्या बाजूच्या वरच्या तिसऱ्या हातांत शंख आहे. त्याचा नाद दिव्य, दीर्घ व गंभीर असतो. जगाच्या स्थितीकरितां त्यानें नित्य, नैमित्तिक व काम्य अशीं तीन प्रकारचीं कर्में आपल्या तीन वलयांनीं सूचित केलेलीं आहेत. या तीन प्रकारच्या कर्मांच्या आचरणानें पुण्य लागतें. त्या पुण्याच्या जीवावरच जगाचें रहाटगाडगें चाललें आहे. हें सर्व ईश्वराच्या आज्ञेनेंच होत असतें; ही गोष्ट शंखानें सूचित केलेली आहे. याप्रमाणें मायावी ईश्वराचा हा अंश जगाच्या स्थितीला अत्यंत उपयुक्त आहे. त्याचप्रमाणें सद्‌गुरूंच्या मुखकमल, नेत्रकमल आणि चरणकमल इत्यादि अवयवांचें स्वरूप जीवांच्या मायाभ्रमाचा निरास करणारें असल्यामुळें त्याचेंहि चिंतन करावें.

याप्रमाणें हा अवतार कार्तिक महिन्याच्या कृष्ण पक्षांतील प्रतिपदेस झालेला असल्यामुळें त्याच दिवशीं अत्रिवरद दत्तजयंतीचा उत्सव साजरा करावा. अत्रिवरद श्रीदत्तात्रेय यांचें ध्यान व पूजन करून खालीं दिलेल्या मंत्रांनीं अर्घ्य द्यावेत. प्रत्येक मंत्र म्हणून झाल्यानंतर 'श्रीअत्रिवरदाय नमः इदमर्घ्यं समर्पयामि' असें म्हणून अर्घ्यप्रदान करावें. याप्रमाणें तीन मंत्रांनीं तीन अर्घ्य द्यावेत. असा हा समारंभ कार्तिक वद्य प्रतिपदेस साजरा करावा.

## अर्घ्यदानाचे मंत्र

मायागुणविमुक्ताय सर्वलोकेश्वराय च ।
अत्रिवरदरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

अद्वैतानंदरूपाय मोहमायाश्रयाय ते ।
अत्रिवरदरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

अव्यक्तव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने ।
अत्रिवरदरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

भगवान् श्रीदत्तात्रेय हे मायेच्या तिन्ही गुणांतून मुक्त असून ते त्रैलोक्याचे अधिपति आहेत. अत्रिवरदरूप अशा त्या दत्तात्रेयाला मी कर्माच्या निमित्तानें अर्घ्यदान करीत आहें.

हे परमेश्वरा दत्तात्रेया ! आपण अद्वैत म्हणजे एकमेव-अद्वितीयरूप असून आनंदमय आहां. त्याचप्रमाणें विश्वाला मोहजालांत टाकणाऱ्या मायेलेहि आश्रय

आहां. अत्रिवरदरूप अशा तुम्हांला या पूजाकर्माच्या निमित्तानें मी अर्घ्यदान करीत आहें.

हे प्रभो ! आपण अभक्त-जनांना अव्यक्त असून भक्तजनांना व्यक्त रूपानें दिसत आहां. आपण तत्त्वतः निर्गुण असूनहि भक्तजनांच्या कल्याणाकरितां सगुण-रूपहि धारण केलेलें आहे. अत्रिवरदरूप अशा तुम्हांला मी भक्तिपूर्वक अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्य देऊन दत्तात्रेय यांना केळांचा नैवेद्य दाखवावा. याप्रमाणें केलेल्या पूजनानें अत्रिवरद दत्तात्रेय भक्तजनांना आत्मसमर्पणहि करतात. मग भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण करतील हें काय सांगावें ? अशा रीतीनें दत्तात्रेय यांच्या दुसऱ्या अवताराचें वर्णन केलेलें आहे. ॐ तत्सत् ।

## तिसरा अवतार श्रीदत्तात्रेय

श्रीदत्तात्रेयप्रभूंचा तिसरा अवतार श्रीदत्तात्रेय याच नांवानें ओळखला जातो. मागील अवतारांत श्रीदत्तात्रेयप्रभु यांनीं अत्रिमहर्षींना मी तुम्हांला स्वतःला अर्पण करून घेऊन तुमच्या येथें पुत्ररूपानें अवतार घेईन असा वर दिला असल्यामुळें ते अत्रिवरद झाले. अत्रिवरद या अवतारांत परमेश्वरानें अत्रिमुनींना त्रिमूर्तीच्या रूपानें दर्शन देऊन फक्त वरच दिला. पुत्ररूपानें अवतार घेऊन मी तुमच्या वंशाला भूषवीन एवढेंच सांगून ते अंतर्धान पावले. त्यानंतर अत्रिमुनि व सती श्रीअनसूया यांनीं त्रिमूर्ति या रूपानें परमेश्वराचें सतत चिंतन केलें. कांहीं काळानें परमेश्वरानें अत्रिऋषींना व अनसूयेला प्रत्यक्ष दर्शन दिलें. मी तुम्हा उभयतांच्या तपश्चर्येनें व अनन्यभक्तीनें प्रसन्न होऊन तुम्हांला इष्ट वर दिलेला आहे. त्याप्रमाणें आज मी तुमच्यापुढें स्वतःला अर्पण करून घेऊन दत्तरूपानें तुमच्या सान्निध्यांत अवतरत आहें. पहा, माझें हें रूप त्रैलोक्यामध्यें अत्यंत दुर्लभ असलेलें व देवादिकांच्याहि दृष्टीस न पडणारें असें अलौकिक हें रूप केवळ तुमच्या भक्तीसाठींच मी प्रकट करीत आहें. असें बोलून भगवान् श्रीहरि अगदीं बालरूप धारण करून दोघांच्या पुढें अवतरले. तोच हा अवतार संप्रदायामध्यें दत्तात्रेय या नांवानें प्रसिद्धीस आला.

दत्तात्रेय यांचा हा अवतार कार्तिक वद्य द्वितीयेच्या दिवशीं झाला. त्या दिवशीं शुक्रवार असून मृग नक्षत्र होतें. या शुभ दिनीं व शुभ नक्षत्रावर, पहिल्याच प्रहरांतील पहिल्याच मुहूर्तावर दत्तात्रेयप्रभु, अत्रिमहर्षि व माता अनसूया यांच्यापुढें आविर्भूत झाले. आपल्या अत्यंत कोमल रूपानें त्रैलोक्याला मोहून टाकणारे दत्तदिगंबर हे अत्रिमुनींना दिलेलें वरदान सत्य करण्याकरितां पुत्ररूपानें अवतीर्ण होऊन अत्रिमुनींच्या सान्निध्यांत विराजूं लागले. यांच्या त्या कोमल रूपाचें वर्णन करणें वाणीला शक्य नव्हतें व मनालाहि तें पूर्णपणें आकलन करतां येत नव्हतें. अशा त्या सुंदर रूपाचें

शांडिल्योपनिषदांत वर्णन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. तो असा—'दत्तात्रेय यांची अंगकांति इंद्रनीलरत्नाप्रमाणें निळसर वर्णानें चकाकत होती. यांचें मुखकमल चंद्रबिंबाप्रमाणें आल्हाददायक होतें. चतुर्भुज स्वरूपांत अवतीर्ण झालेला प्रत्यक्ष विष्णूचाच अवतार होता तो. त्यांनीं आपल्या हातांत शंख चक्र, गदा व पद्म हीं आयुधें धारण केलेलीं होतीं. सर्वांगसुंदर अशा आपल्या दिव्य रूपानें त्यांनीं प्रत्यक्ष कामदेवालाहि जिंकलेलें होतें. दत्तात्रेय यांच्या मंगलमय ध्यानाचें जे कोणी चिंतन करतील त्यांचें त्या ध्यानानें मंगलच होईल. असें तें सुंदर ध्यान होतें. अवधूत दत्तदिगंबर गुरुदेव हे नित्य आत्ममायेमध्यें रमलेले असत. त्यांनीं सर्वांगाला भस्म चर्चिलें असून त्यांच्या मस्तकीं जटाजूटहि विराजत होता. त्यांचे नेत्र प्रफुल्ल कमलाप्रमाणें अत्यंत सुंदर दिसत होते. योगिजनप्रिय विश्वगुरु भगवान् दत्तात्रेय हे ज्ञानयोगाचे जणूं कांहीं मूर्तिमंत निधि म्हणजे संग्रहच आहेत, असें त्यांचें रूप दिसत होतें. सर्वसाक्षी व सिद्धांच्या समुदायामध्यें विराजत असलेले भक्तवत्सल भगवान् दत्तात्रेय केवळ भक्तीनें भक्तजनांच्या आधीन होतात. भक्तांवर अनुकंपा म्हणजे दया करणें हा त्यांचा स्वभाव आहे. त्या दत्तात्रेयाला माझा नमस्कार असो.

वर वर्णन केलेल्या अभिप्रायाचे दत्तजयंतीकल्पांतील कांहीं श्लोक भक्तजनांच्या अवलोकनासाठीं आम्ही खालीं उद्धृत केलेले आहेत. ते जिज्ञासू जनांनीं अवश्य पहावेत.

### भगवानत्रिवरदो वरदानाय चात्रये

आविरासीत्स एवाहं वरं वरय भो मुने ।। १ ।।

यदि प्रसन्नो भगवान् वरं दास्यति मे तदा ।
देयो भवादृशः पुत्रो नान्यत्किमपि कांक्षितम् ।। ६ ।।

मयाऽहं तेऽत्रये दत्तस्त्वदधीनोऽस्मि सर्वथा ।
इत्युक्त्वा बालभावेन दम्पत्योः पुरतः स्थितः ।। १० ।।

कार्तिके कृष्णपक्षे तु द्वितीयायां भृगोर्दिने ।
मृगर्क्षे प्रथमे यामे मुहूर्ते प्रथमेऽपि च ।। ११ ।।

आविरासीन्मुनेरग्रे दत्तात्रेयो दिगंबरः ।
वरदानमृतं कर्तुं सर्वलोकैकमोहनः ।। १२ ।।

शांडिल्योपनिषद्यस्य दत्तात्रेयस्य मंगलम् ।
ध्यानमुक्तं समासेनं तदिदं ध्यातृमंगलम् ।। १४ ।।

दत्तात्रेयं शिवं शांतमिन्द्रनीलनिभं प्रभुम् ।
आत्ममायारतं देवमवधूतं दिगंबरम् ।। १५ ।।

भस्मोद्धूलितसर्वांगं जटाजूटधरं विभुम् ।
चतुर्बाहुमुदारांगं प्रफुल्लकमलेक्षणम् ।। १६ ।।

ज्ञानयोगनिधिं विश्वगुरुं योगिजनप्रियम् ।
भक्त्यानुकंपिनं सर्वसाक्षिणं सिद्धसेवितम् ।। १७ ।।

वरील श्लोकांचें विवेचन आम्हीं वर दिलेलेंच आहे. त्याप्रमाणें परमेश्वरानें अत्रिमुनींना "दत्तोऽहं" म्हणून पुत्ररूपानें दर्शन दिल्यानंतर अत्रिमुनि व श्रीसती अनसूया यांनीं दत्तात्रेय यांचें ध्यान केलें. हात जोडून नम्र भावानें प्रार्थना केली— 'हे प्रभो, आपण भक्तकामकल्पद्रुम आहां. आपण सर्व देवांचे देव आहां. हे परमेश्वरा, आपण षड्गुणैश्वर्यसंपन्न आहां. आपण भक्तजनांच्या अंतःकरणांतील भावना म्हणजे गूढ अभिप्राय जाणतच आहां. भक्तीनें भक्तजनांच्या आधीन होणें हा आपला स्वभावच आहे. भक्तीनेंच आपलें स्वरूप जाणलें जातें. हे जनार्दना, तुम्ही या रूपानें आम्हांला आत्मदान केलें, ही गोष्ट खरी आहे. तथापि आम्हा उभयतांची एवढ्यानें तृप्ति होत नाहीं. आम्हांला औरसपुत्र असावा अशी आमची आकांक्षा आहे. तरी औरसपुत्ररूपानें तुम्ही आमच्या उदरीं जन्म घेऊन आम्हांला धन्य करावें. आम्हांला या वेळीं दिसत असलेलें तुमचें हें रूप अत्यंत मंगलकारक आहे. या भूतलावर लोकांचा उद्धार करण्याकरितां तुम्ही याच रूपानें असावें. हे जगन्नाथा, तुम्ही आमच्यावर प्रसन्न होऊन आमचे हे मनोरथ पूर्ण करा.'

अथापि नावयोस्तृप्तिरौरसात्मजकांक्षिणोः ।
अतएवौरसत्वं च समागच्छतु नौ भवान् ।। २० ।।

ही अत्रिऋषींची प्रार्थना ऐकून भगवान् अत्रिनंदन हे प्रसन्न झाले व अत्रिऋषींच्या देहांत तेजोरूपानें प्रविष्ट होऊन अनसूयेच्या उदरीं अवतरले. हा दत्तात्रेय यांचा तिसरा अवतार होय. यथाविधि श्रीदत्तात्रेय यांचें पूजन करून मागें सांगितल्याप्रमाणें दत्तात्रेय यांना तीन अर्घ्य समर्पण करावेत.

## अर्घ्यदानाचे मंत्र

दत्ताय दिव्यरूपाय तेजोरूपनिवासिने ।
भक्तसंतापनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

अव्यक्ताद्वैतरूपाय निर्गुणाय गुणात्मने ।
परब्रह्मस्वरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

मोक्षबीजाय मुक्ताय मुक्तनाथाय ते गुरो ।
सच्चिदानंदरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

दिव्यरूप धारण करणाऱ्या सद्गुरो, दत्तात्रेया ! आपण तेजोरूपानें सर्व विश्वा-

मध्यें निवास करीत आहां. भक्तांच्या त्रिविध तापांचा नाश करणाऱ्या तुम्हांला मी पूजाकर्माच्या रूपानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

हे दत्तात्रेया! आपण अव्यक्तरूप आहां. अर्थात् अभक्तांना व अज्ञजनांना आपलें रूप कळत नाहीं. आपण अद्वैतरूप आहां. अर्थात एकजिनसी शुद्ध सच्चिदानंद-रूप आहां; तसेंच स्वभावतः आपण निर्गुण व निराकार असलां तरी भक्तजनांच्या-करितां सगुण व साकाररूपानेंहि नटलां आहां. आपण परब्रह्मस्वरूप आहां. तुम्हांला मी पूजाकर्मस्वरूपानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

हे परमेश्वरा! आपण मोक्षाचें म्हणजे भवबंधांतून मुक्त होण्याचें बीज अर्थात् मूलकारण आहां. हे सद्‌गुरो, आपण सर्व मुक्तांचे नाथ म्हणजे संरक्षक आहां. अर्थात् मुक्त झालेल्या लोकांना आपण मुक्तावस्थेपासून कधींहि भ्रष्ट होऊं देत नाहीं. हे सच्चिदानंदरूपा, दत्तात्रेया! मी तुम्हांला या पूजाप्रसंगानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें पूर्वी सांगितलेल्या पद्धतीनें प्रत्येक मंत्राचा एक एक असे तीन अर्घ्य देऊन दत्तात्रेयांची प्रार्थना करावी. उसाचे करवे करून नेवैद्य दाखवावा. याप्रमाणें पूजा केली असतां भगवान् दत्तात्रेय संतुष्ट होऊन चिंतिलेले सर्व मनोरथ पूर्ण करतात. अशा रीतीनें दत्तात्रेय यांच्या तिसऱ्या अवताराचें चरित्र वर्णन केलेलें आहे. याप्रमाणें आरती व मंत्रपुष्प करून तीर्थप्रसाद वांटून हा समारंभ साजरा करावा. ॐ तत्सत् ।

## श्रीदत्तात्रेयांचा चौथा अवतार कालाग्निशमन

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं अत्रिमहर्षि व सती अनसूया यांच्या उदरीं प्रत्यक्ष औरसपुत्ररूपानें जो चौथा अवतार घेतला तो कालाग्निशमन या नांवानें ओळखला जातो. दत्तात्रेयांचा कार्यपरत्वें प्रत्येक वेळीं होणारा आविष्कार हा अव-तारच मानला जातो. स्वायंभुव मन्वंतरापासून विद्यमान कालापर्यंत दत्तात्रेयांचे भक्तजनांच्या कल्याणाकरितां असंख्य आविष्कार झालेले आहेत. त्यांत सोळा अव-तारांना प्राधान्य दिलें जातें. या सोळा अवतारांतहि चौथा अवतार श्रीकालाग्निशमन भगवान् दत्तात्रेय हा प्रमुख अवतार मानला जातो. अत्रि आणि अनसूया यांच्या तपश्चर्येचें हें मूर्तिमंत फल असल्यामुळें त्याला स्वाभाविक प्राधान्य प्राप्त झालेलें आहे. पुत्रप्राप्तीकरितां आरंभिलेल्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन परमेश्वरानें अत्रिमुनींना अभीष्ट वर दिल्यानंतर अत्रिमुनींनीं खडतर तपश्चर्येचें व्रत संपविलें व ते अनसूयेसह आपल्या आश्रमांत येऊन राहिले. तेथेंहि ते निरंतर ईश्वराचें चिंतन करीतच होते.

ऋक्ष पर्वतावर केलेल्या खडतर तपश्चर्येनें अत्रिऋषींच्या शरीरामध्यें एक प्रकारचें प्रखर तेज निर्माण झालें. तें कालाग्नीप्रमाणें अर्थात प्रलयकालच्या अग्नी-

प्रमाणें सारखें वाढतच राहिलें. त्या तेजानें अत्रिमुनींच्या अंतरंगाचा दाह होऊं लागला. सर्वज्ञ भगवान् श्रीहरि यांनीं ही गोष्ट जाणली आणि ते अत्रिमुनींच्या शरीराचा दाह शमविण्याकरितां अतिशीघ्र गतीनें अत्रिमुनींच्या जवळ आले. ज्याप्रमाणें मूर्ध-स्थानीं असलेल्या ब्रह्मरंध्राच्या द्वारां आत्म्यानें प्रवेश करावा त्याप्रमाणें श्रीहरीनें अत्रिमुनींच्या अंतरंगांत प्रवेश केला. या वेळीं परमेश्वराचें तेज कोटिचंद्राप्रमाण अत्यंत शीतल व आल्हाददायक होतें. अत्रिमुनींच्या हृत्कमलांतील दहराकाशांत अर्थात हृदयाच्या पोकळींत प्रवेश करून अत्रिमुनींच्या देहाला नखशिखान्त शांत व सुशीतल केलें. अत्रिमुनींचा ताप निवाला. याप्रमाणें कालाग्नीचा ताप शमविल्यामुळें अत्रि-मुनींच्या पोटीं जन्मास आलेल्या पुत्राला कालाग्निशमन असें नांव देण्यांत आलें. हाच दत्तात्रेय यांचा चौथा अवतार होय.

अत्रिमुनींचा ताप शांत झाल्यानंतर त्यांनीं डोळे उघडून पाहिलें तोंच अन-सूयेची अत्यंत लोभनीय मूर्ति अत्रिमुनींच्या दृष्टीस पडली. अत्रिमुनींप्रमाणें महा-सती श्रीअनसूयादेवी हिच्याहि अंतःकरणांत आपल्याला परमेश्वराप्रमाणें सर्वगुण-संपन्न व आकल्प ज्ञानोपदेश देऊन लोककल्याणाचें कार्य करीत राहणारा असा पुत्र व्हावा, अशी इच्छा होतीच. ऋतुस्नानाचा योग्य समयहि होता. तपोमूर्ति असलेल्या अत्रिमुनींनीं तिच्याकडे पाहिलें. इतक्यांत त्यांच्या दृष्टींतून निघालेलें तें सर्वव्यापी दिव्यतेज पाहतां पाहतां परमभाग्यशालिनी असलेल्या अनसूयेच्या अंतरंगांत वेगानें प्रविष्ट झालें, तो दिवस मोठा भाग्याचा होता.

मार्गशीर्षे सिते पक्षे सप्तम्यां शोभने दिने ।
आविवेशानसूयायां गर्भभावं गतं तु तत् ।। ११ ।।

मार्गशीर्ष शुक्ल सप्तमीच्या शुभमुहूर्तावर तेजोरूप भगवान् श्रीदत्तात्रेय हे अनसूयेच्या उदरांत प्रविष्ट झाले. स्वतः ते निर्गुण, निराकार असूनहि अत्रिमुनि व सती अनसूया यांना संतुष्ट करण्यासाठीं व सर्व जगाच्या कल्याणासाठीं विश्वव्यापी असूनहि आपलें वचन सत्य करण्याकरितां अनसूयेच्या उदरांत राहिले. जणूं कांहीं नऊ महिन्यांचा काल नऊ दिवसांतच अंतर्भूत झाला. अनसूया अग्नीसारखी अत्यंत तेजस्वी दिसूं लागली. लोकांच्या आश्चर्याला व आनंदाला पारावार उरला नाहीं. थाटामाटानें डोहाळजेवणें होऊं लागलीं. नऊ दिवसांतच गर्भ पूर्णावस्थेला येऊन पोहोंचला. मनालाहि ज्याचें स्वरूप व कार्य आकलन करतां येत नाहीं असा तो भगवान् दत्तात्रेय नऊ दिवसांतच मातेच्या पुढें अवतरला. सोळा वर्षांचें तें दिव्य त्रिमूर्तिरूप पाहून अनसूया अत्यंत आश्चर्यचकित झाली. तिनें दत्तात्रेय यांच्या चरण-कमलांना स्पर्श करून भक्तियुक्त अंतःकरणानें स्तुति करण्यास आरंभ केला. परमे-श्वराचें तें भक्तवात्सल्य पाहून तिचा कंठ दाटून आला. वाणी सद्गदित झाली. शब्द उमटेना. अंगावर रोमांच उभे राहिले. नेत्रांतून आनंदाचे अश्रु वाहूं लागले. जणूं

कांहीं अष्टविध सात्त्विक भावांच्या प्रवाहाचा अनसूयेच्या ठिकाणीं संगमच झाल आहे कीं काय असें वाटूं लागलें. असा तो आनंदाचा क्षण होता.

अनसूयेनें शांत चित्तानें दत्तात्रेयांची प्रार्थना केली. महाराज, आपण औरस पुत्ररूपानें माझ्या पोटीं जन्म घेतल्याशिवाय माझें समाधान होणार नाहीं. मीं आपणांस अंगावर घ्यावें, पोटभर पाजावें, टाळू माखावी, सर्वांगास तेल लावावें, न्हाऊं घालावें, तीट-काजळ करावें, पाळण्यांत ठेवावें, गोड-गोड गाणीं म्हणत झोके द्यावेत, अंगावर खेळवावें, इत्यादि रूपानें तुमचें कोडकौतुक केल्याशिवाय माझ्या मनाच समाधान होणार नाहीं. ही अनसूयेची प्रार्थना ऐकून भगवान् श्रीदत्तात्रेय अनसूयेच्या प्रसूतिशय्येवर नवजात शिशूच्या रूपानें प्रकट झाले. दत्तात्रेयांनीं घेतलेला हा कालाग्निशमन नांवाचा प्रधान अवतार मार्गशीर्ष महिन्यांत झाला. सर्व मासांमध्यें मार्गशीर्ष श्रेष्ठ मानला जातो. कारण तो साक्षात् परमेश्वराचाच अंश आहे. तो परमात्मस्वरूपच आहे. "मासानां मार्गशीर्षोऽहं" असें भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें स्वतःच सांगितलें आहे. शिवाय हा महिना अन्नधान्यानें समृद्धहि असतो. दत्तात्रेय अवतरले त्या दिवशीं पूर्णिमा तिथि होती. शुक्लपक्ष होता. बुधवार होता. मृग नक्षत्र होतें. भगवान् सूर्यनारायण दिवसभर आपलें कर्तव्य करून निरोप घेत होते. तर पूर्वेकडे पूर्णिमेचा पूर्णचंद्र उदयाला येत होता. आपल्या शीतल किरणांनीं जणूं कांहीं तो दत्तात्रेयांच्या आल्हाददायकत्वाची साक्षच देत होता. रात्रीच्या पहिल्या प्रहरांतील पहिल्याच मुहूर्तावर प्रदोषकाळीं अनसूयामातेच्या इच्छेला मान देऊन तिनें केलेल्या प्रार्थनेप्रमाणें भगवान् श्रीदत्तात्रेय बालभावानें अवतरले. हा औरस पुत्ररूपानें झालेला अवतार सर्वांनाच आनंददायक झाला. देवांनीं आकाशांतून शैशवावस्थेंत असलेल्या दत्तात्रेयांवर पुष्पवृष्टि केली. गंधर्व गाऊं लागले. मंगलवाद्यें वाजूं लागलीं. जनतेकडून होणाऱ्या जयजयकारानें दाही दिशा दुमदुमून गेल्या. हाच अभिप्राय खालीं दिलेल्या श्लोकांत व्यक्त केलेला आहे :

अजोऽव्ययोऽपि सर्वात्माऽनसूयागर्भसंभवः ।
अभवच्चित्रकृल्लोके मनसोऽविषयोऽपि यः ॥ १३ ॥

अनसूया गर्भिणीति लोके चित्रं प्रदर्शितम् ।
अयोनिसंभवो देवो मासि मासोत्तमे शुभे ॥ १४ ॥

स्वविभूतौ मार्गशीर्षे सर्वलोकसुखावहे
मनोहरे सुप्रसवे शुक्लपक्षे ज्ञवासरे ॥ १५ ॥

प्रदोषे पूर्णिमायां भे मृगशीर्षाभिधे शुभे,
पतत्सु पुष्पवर्षेषु देवमुक्तेषु नाकतः ॥ १६ ॥

आविरासीज्जगन्नाथोऽनसूयातोऽतिसात्त्विकः ।

वर वर्णन केलेला दत्तात्रेयांच्या जन्माचा काल स्कंदपुराणाच्या अनुरोधानें वर्णिलेला आहे. पद्मपुराणाच्या आधारें विचार केल्यास दत्तात्रेय यांचा जन्मकाल मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशी हा ठरतो.

मार्गे मासि सिते पक्षे चतुर्दश्यां बुधे दिने ।
रोहिण्यां प्रथमे यामे ह्यवतीर्णो दिगंवरः ।। १८ ।।

मार्गशीर्ष मासांतील शुक्ल पक्षांत, चतुर्दशीच्या दिवशीं बुधवारीं, रोहिणी नक्षत्र असतांना पहिल्या प्रहरांतच दत्तदिगंवर अवतरले असें स्पष्टच म्हटलेलें आहे. पूर्वी मार्गशीर्ष शुक्ल सप्तमीच्या दिवशीं दत्तात्रेय यांनीं अनसूयेच्या उदरीं प्रथम निवास केला असें सांगितलें आहे. त्यानंतर एका तिथीची वृद्धि होऊन श्रीदत्तात्रेय यांच्या जन्मदिनीं सूर्योदयाच्या वेळीं चतुर्दशी आली.

यां तिथिं समनुप्राप्य उदयं याति भास्करः ।
सा तिथिः सकला ज्ञेया दानाध्ययनकर्मसु ।।

ज्या तिथीवर सूर्य उदयाला आला असेल तीच तिथि दान, पूजा, अध्ययन, इत्यादि कर्मांसाठी संपूर्ण दिवस मानावी; असें धर्मशास्त्राचें वचन असल्यामुळें दत्तात्रेयांचा जन्म पौर्णिमा लागली असतांनाहि चतुर्दशीस मानला गेला. अशा रीतीनें स्कंदपुराण व पद्मपुराण यांतील दत्तात्रेयांच्या जन्मतिथीविषयींचा विरोध दूर करून वाचकांनीं समन्वय समजून घ्यावा.

तत्र तं पूजयेद्देवं कालाग्निशमनाभिधम् ।
आविर्भूतं जगत्त्रातुं दुर्वासश्चंद्रसंयुतम् ।। २१ ।।

तात्पर्य, दत्तात्रेयप्रभु मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेच्या वेळीं सायंकाळीं अवतरले. याच वेळीं दुर्वास आणि चंद्र हेहि अवतरले. आपल्या अनुग्रहानें सर्व जगाचें संरक्षण करण्याकरितां दत्तात्रेयांनीं घेतलेल्या या अवताराला कालाग्निशमन दत्तात्रेय असें म्हणतात.

चन्द्रोऽभूद्ब्रह्मणश्चांशो दत्तो विष्णुस्तु योगवित् ।
दुर्वासाः शंकरांशश्च ते त्रयोऽप्येकरूपकाः ।। २२ ।।

ब्रह्मदेव चंद्राच्या अंशानें अवतरले. योगविद्येचे अधिष्ठाते भगवान् विष्णु हे स्वतः दत्त झाले आणि भगवान् शंकर हे दुर्वास मुनींच्या रूपानें प्रकट झाले. ते तिघेंहि मायेच्या गुणांनीं पृथक् असूनहि तत्त्वतः एकरूप होते. पूर्वी सांगितलेल्या पद्धतीनें दत्तात्रेयांची सांगोपांग पूजा करून खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् अर्घ्यप्रदान करावें.

## अर्घ्यदानाचे श्लोक

अमायायात्मरूपाय कालाग्निशमनाय च ।
तोयतत्त्वनिवासाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

भगवान् दत्तात्रेय हे मायेच्या सान्निध्यांत असूनहि त्यांचा मायेशीं तिळमात्रहि संबंध नाहीं. ते आत्मस्वरूप म्हणजे परिपूर्णपरब्रह्मस्वरूप आहेत. ते कालाग्निशमन या नांवानें ओळखले जातात. जल तत्त्वाचें ते अधिष्ठानहि आहेत. त्यांना मी पूजेच्या निमित्तानें अर्घ्यदान करीत आहें.

ज्ञानानन्दैकदीपायानसूयानंदनाय च ।
भक्तारिष्टविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

ज्ञानदीपाला प्रज्वलित करणारा आणि आनंददीपाला उज्ज्वल करणारा असा एकच एक समर्थ व त्याचप्रमाणें भक्तजनांच्या संकटाचें निरसन करणारा असा जो अनसूयानंदन भगवान् दत्तात्रेय त्याला मी या पूजेच्या निमित्तानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

निर्विकल्पाय शुद्धाय सिद्धाय परमात्मने ।
मायागुणविमुक्ताय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

भगवान् दत्तात्रेय हे भेदरहित अर्थात् पूर्णपणें एकरूप आहेत. पाप-पुण्य व सुख-दुःख या संसारधर्मांचा त्यांच्या ठिकाणीं स्पर्शहि नसल्यामुळें त्यांना शुद्ध असें म्हणतात. सर्व सिद्धींनीं ते संपन्न असल्यामुळें त्यांना सिद्ध असेंहि म्हटलें जातें. ते प्रत्यक्ष परमात्माच असल्यामुळें मायेच्या तिन्ही गुणांतून ते मुक्त आहेत. त्यांना मी पूजा करून अर्घ्यप्रदान करीत आहें.

अशा रीतीनें पूर्वीं सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें तीन अर्घ्य देऊन पंचामृताचा नैवेद्य दाखवावा; अथवा खारीक, खोबरें, खडीसाखर, खसखस, खिसमिस, काजू, बदाम, इत्यादिकांचें मिश्रण करून तो नैवेद्य दाखवावा; किंवा लाडू, जिलेबी करंज्या इत्यादि मिष्ट पदार्थांचाहि नैवेद्य दाखवावा. यायोगें इष्ट दैवत संतुष्ट होतें. नंतर हात जोडून नम्रपणानें प्रार्थना करावी.

दत्तात्रेयोऽवतु स्वीयान्कालाग्निशमनाभिधः ।
बालभावं समाश्रित्य योऽनसूयापयोऽपिबत् ।। २८ ।।

भगवान् श्रीदत्तात्रेय स्वतः विश्वंभर असूनहि त्यांनीं बालरूप धारण करून अनुसूयेचें स्तनपान केलें व ते तृप्त झाले. असे हे कालाग्निशमन भगवान् दत्तात्रेय आपल्या भक्तजनांचें रक्षण करोत; अशी प्रार्थना करून हा कालाग्निशमन दत्तात्रेय यांचा जयंतीसमारंभ साजरा करावा. ॐ तत्सत् ।

## पांचवा अवतार योगिजनवल्लभ श्रीदत्तात्रेय

श्रीदत्तात्रेय प्रभूंचा पांचवा अवतार योगिजनवल्लभ या नांवानें प्रसिद्ध आहे. अत्रिमहर्षींच्या उदरीं अवतार घेऊन दत्तात्रेय यांनीं कालानलाप्रमाणें अत्रिमुनींच्या देहाचा दाह करणाऱ्या कालाग्नीचें प्रशमन केलें. अनादिसिद्ध प्रभु पुरुषोत्तम परमात्मा भगवान् श्रीदत्तात्रेय बालरूपानें अनसूयेच्या सान्निध्यांत विराजले असतां त्यांचें दर्शन घेण्याकरितां अत्रिऋषींच्या आश्रमांत इंद्रादि देव त्यांना अवलोकन करण्याकरितां आले. त्यांच्या पाठोपाठ ऋषिजनांचा समुदायहि तेथें जमला. गंधर्व आले, सिद्ध आले, चारण म्हणजे देवांचे स्तुतिपाठक तेहि आले. याचप्रमाणें योगविद्येमध्यें निष्णात असलेले योगिजन देखील आले. त्याचप्रमाणें साधुसंत व महात्मेहि आले. हे सर्व लोक दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं उत्सुक झालेले होते. त्यांची उत्कंठा पाहून दत्तात्रेयांनीं शैशवावस्था सोडून बालरूपानें सर्वांना दर्शन दिलें. योगमार्गाचा उपदेश करून त्यांनीं सर्वांना संतुष्ट केलें. नंतर पाहतां पाहतां ते आपल्या मूलभूत सनातन ज्योतिरूपानें सर्वांच्या पुढें प्रकट झाले. जणूं कांहीं ' माझ्या या साक्षीभूत स्वयंज्योतीचें आत्मरूपानें चिंतन करा. अर्थात् आत्मा म्हणजे मी स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश ज्योतिस्वरूप आहें. असेंच तुम्ही नित्य माझ्या रूपाचें चिंतन करीत रहा. अनायासानें सर्व दुःखांतून मुक्त व्हाल. ' हाच उपदेश त्यांनीं या रूपानें प्रकट होऊन सर्वांना केला. योगतत्त्वाचा उपदेश सांगून दत्तात्रेय यांनीं सर्वांनाच योगी केलें. सर्वांचे ते आवडते बनले. तेव्हांपासून लोक त्यांना योगिजनवल्लभ असें म्हणूं लागले.

आपल्याला दत्तात्रेयांनीं पुन्हां कांहीं उपदेश करावा असा सर्वांचा अभिप्राय लक्षांत घेऊन दत्तात्रेय आपल्या मधुर वाणीनें पुन्हा त्यांना म्हणाले, " मी सदासर्वकाळ सर्वत्र विराजत असल्यामुळें, मला जन्म नाहीं. कोणत्याहि कर्माचा माझ्याशीं कांहींहि संबंध नाहीं. मला पुण्य नाहीं व पापहि नाहीं. मला वास नाहीं व मला मृत्यूहि नाहीं. मी निर्गुण आहें. निराकार आहें. निरवयव आहें. जो जसें माझ्याकडे पाहील तसा मी त्याला दिसेन. मला देह नाहीं व कालहि नाहीं. मी जन्ममृत्युरहित असल्यामुळें मला देह आणि काल यांचा संबंध कसा असणार ? मी मायेच्या सर्व गुणांतून सदासर्वकाळ पूर्णपणें मुक्त आहें. मी केवळ आपल्या अनिर्वचनीय योगमायेच्या प्रभावानें स्वस्वरूपांतून आविर्भूत झालों असें लोकांना वाटतें. मी भक्तजनांवर अनुग्रह करण्याच्या बुद्धीनें विविध रूपें धारण करतों व सर्व लोकांना आत्मसुखाचा अनुभव देऊन त्यांच्यावर दया करतों, ही गोष्ट खरी आहे; पण हीं सर्व कार्यें मायिक असल्यामुळें माझ्या तात्त्विक स्वरूपाला त्यामुळें तिळमात्रहि बाध येत नाहीं. मी तुम्हां सर्वांना हें माझें उत्तम बालरूप दाखविलें आहे. तें केवळ तुम्हां सर्वांच्या मोक्षसुखासाठींच आहे असें समजा. माझें निर्मळ चरित्र सर्व जनतेच्या सुखासाठीं उपयुक्त व्हावें अशा बुद्धीनेंच मी हें सर्व चरित्र आचरीत आहें. "

दत्तात्रेय म्हणाले, "देवहो! तुम्ही आतां आपआपल्या स्थानाला जावें. ऋषिजनहो! मुनिजनहो! सर्वजनहो! तुम्ही आतां आपआपल्या स्थानाला जावें. मी सर्वांचा आत्मा आहें. मी सर्वस्वरूप आहें. मी सर्वत्र ओतप्रोत भरून राहिलेलों आहें. मी सर्वसाक्षी आहें. मी सर्वरूपानें नटलों आहें. सर्व कांहीं मीच आहें. जसा मी आहें, तत्वतः तुम्ही पण तसेच आहां. जसा मी तसेच तुम्ही व जसे तुम्ही तसाच मी. तुमच्यांत व माझ्यांत तत्वतः कांहीं अंतर नाहीं, हें नीट लक्षांत घेऊन वागा म्हणजे तुमची सर्व दुःखांतून सुटका होईल. अविद्येनें तुम्हांला पछाडलेलें आहे व मीं मात्र माझ्या मायेला स्वतःच्या आधीन करून ठेवलेलें आहे. माझ्या उपदेशाचें चिंतन करून तुम्ही ज्या वेळीं अविद्येंतून मुक्त व्हाल त्या वेळीं तुम्ही व मी सर्व एकरूप आहों अशी तुमची खात्री होईल. जा. माझें चिंतन करीत तुम्ही आपआपल्या स्थानाला आनंदानें जा." याप्रमाणें अत्रिमुनींच्या आश्रमांत आलेल्या देव, ऋषि, मुनि इत्यादिकांना निरोप देत असतां पुन्हां दत्तात्रेय म्हणाले, "हे सुजनहो! मी म्हणजे शुद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण, परब्रह्म आत्मा;— म्हणजे सर्व स्थूल, सूक्ष्म देहांतर्गत जीवचैतन्य आणि परमात्मा म्हणजे सर्व चराचरसृष्टीचा अधिपति, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, त्रिगुणात्मक मायेचा नियामक, शबल म्हणजे मायोपाधिक परब्रह्म यालाच पुरुषोत्तम असें म्हणतात. हें सर्व तत्त्वतः एकरूपच आहे. मी असंग म्हणजे कोणत्याहि संसारधर्मांत न गुंतलेला अर्थात् सुख-दुःख, पाप-पुण्य आणि कर्तृत्व-भोक्तृत्व इत्यादि सर्व संसारधर्मांतून मुक्त असलेला असाच आहें. मी अनंत म्हणजे अंतरहित आहे. मला जन्म-मृत्यु, जरा-व्याधि, क्षय-वृद्धि, तहान-भूक इत्यादि संसारधर्मांचा तिळमात्रहि संबंध नाहीं." यावर कोणी असें विचारील कीं, अहो मध्यान्हकाळ झाला कीं जीव भुकेनें व्याकूळ होतो, तहानेनें बेचैन होतो, लहानाचा मोठा होतो, अनेक रोगांनीं ग्रस्त होतो, शेवटीं मरतो. या सर्व गोष्टी माझ्या अनुभवाला येत असतांना माझा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं असें कसें म्हणतां? यावर सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणाले, "माझ्या भक्तांनो! तुम्हीं घेतलेला आक्षेप वरवर पाहतां खरा आहे असें वाटतें; पण सूक्ष्म विचारांतीं सद्‌गुरुकृपेनें अविद्येचें निरसन झाल्यानंतर तहान, भूक, वृद्धि-क्षय, जरा-मृत्यु आणि सुख-दुःख हे सर्व धर्म देहाचे आहेत; आत्म्याशीं त्यांचा कांहीं संबंध नसतो. इंधन हा अग्नीचा उपाधि असल्यामुळे इंधनाचे लहानमोठे आकार अग्नीवर आरोपिले जातात. त्याचप्रमाणें मी — म्हणजे आत्मा, तत्वतः निराकार व निर्यामक असूनहि स्थूल, सूक्ष्म, देहात्मक उपाधीशीं संलग्न झाल्यामुळें उपाधीचे लहानमोठे आकार व जन्म-मृत्यु-जरा-व्याधी आणि सुख-दुःखें हे सर्व उपाधीचे धर्म मीच्या म्हणजे आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानामुळें आरोपिले जातात. स्थूल देह, सूक्ष्म देह, स्वभावतः जड असूनहि मीच्या म्हणजे आत्म्याच्या सान्निध्यामुळें ते चेतन आहेत असे वाटतात; पण ते तत्त्वतः चेतन नसतात. हा विवेक तुम्हीं सूक्ष्मविचारानें लक्षांत घ्यावा. म्हणजे कोणत्याहि

आक्षेपाला थारा उरणार नाहीं. जा; तुम्ही आपआपल्या स्थळीं जा. मीं केलेल्या उपदेशाचें चिंतन करा. विचारांतीं तुम्ही सर्व दुःखांतून मुक्त व्हाल. मग तुम्हांला कळून येईल कीं मी असंग आहें, मी अनंत आहें. मी अद्वय-द्वैतरहित आहें, मी प्रभु आहें, ईश्वर आहें. याप्रमाणें मीचें म्हणजे आत्म्याचें यथार्थ स्वरूप जो जाणतो त्याला कर्माचें बंधन उरत नाहीं."

दत्तात्रेय म्हणाले, " सुजनहो ! जसा मी अज म्हणजे जन्मरहित, अमर म्हणजे मृत्युरहित, असंगी म्हणजे संसाराच्या संबंधांनीं विरहित, अक्रिय म्हणजे कर्मविर्वाजित आणि निरंजन म्हणजे शुद्ध आहें; तसेच तुम्ही देखील आहां, याविषयीं तिळमात्रहि संशय मनांत ठेवूं नका." हें दत्तगुरूंचें भाषण ऐकून ते सर्व देव, ऋषि, सिद्ध, चारण, गंधर्व आणि पितर संतुष्ट झाले व दत्तप्रभु यांना वंदन करून त्यांच्या आज्ञेप्रमाणें ते सर्व आपआपल्या स्थानाला निघून गेले.

याप्रमाणें मार्गशीर्ष शुक्ल पौर्णिमा, गुरुवार या रोजीं योगिजनवल्लभ दत्तात्रेयप्रभूंचा अवतार झाला. मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीस बुधवार व रोहिणी नक्षत्र या दिवशीं झालेला कालाग्निशमन दत्तात्रेयांचा अवतार निराळा व मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा, गुरुवार रोजीं प्रदोषसमयीं झालेला योगिजनवल्लभ दत्तात्रेय हा अवतार निराळा, असे मार्गशीर्ष महिन्यांत दत्तात्रेय यांचे दोन अवतार पृथक् पृथक् लक्षांत घ्यावेत. कांहींच्या मतें पांचवा अवतार मध्यान्हकाळीं झाला असेंहि म्हटलें जातें. यथाविधि दत्तात्रेयप्रभूंची पूजा करून खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन अर्घ्य द्यावेत.

## अर्घ्यदानाचे श्लोक

योगारिष्टविनाशायानसूयानंदनाय च ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

योगविज्जननाथाय भक्तानंदकराय च ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

विश्वेश्वराय सिद्धाय विश्वरूपधराय च ।
पृथ्वीतत्त्वविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

ज्याच्या कृपेनें योगमार्गांतील सर्व संकटें नष्ट होतात अशा अनसूयानंदन भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी पूजाकर्मरूपानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

योगविद्येमध्यें निष्णात असलेल्या लोकांचा नाथ म्हणजे अधिपति असलेल्या आणि भक्तजनांना आनंद देणाऱ्या देवाधिदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी पूजांगभूत अर्घ्यप्रदान करीत आहें.

भगवान् श्रीदत्तात्रेय हे विश्वरूप असून विश्वाचे अधिपतीहि आहेत. ते सिद्ध असून पृथ्वीतत्त्वाचे अधिष्ठान आहेत. त्यांना मी भक्तिपूर्वक पूजांगभूत अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्य देऊन उत्तम मोतीं समर्पण करावेत. अथवा जिलेबी, लाडू वगैरे उत्तम पक्वान्नांचा यथाशक्ति नैवेद्य समर्पण करावा.

सर्व अवतारांची पूजा करतांना प्रथम ॐ काराचा उच्चार करावा. मग त्या त्या अवतारांतील नांवाला चतुर्थी विभक्ति लावून पुढें नमः असा शब्द योजावा, व पूजेंतील प्रत्येक उपचार दत्तात्रेयांना समर्पण करावा. उदाहरणार्थ —ॐ योगिराजाय नमः स्नानं समर्पयामि । ॐ अत्रिवरदाय नमः । ॐ दत्तात्रेयाय नमः । ॐ कालाग्निशमनाय नमः । ॐ योगिजनवल्लभाय नमः । अशा रीतीनें त्या त्या अवतारांतील नांवाचा उच्चार करून त्या त्या अवताराचा उत्सव साजरा करावा. शेवटीं आरती व मंत्रपुष्प करून सर्वांना प्रसाद वांटावा. याप्रमाणें श्रीदत्तात्रेय यांच्या नांवाचा जयजयकार करीत उत्सव-समारंभ साजरा करावा. या चरित्रांतील कांहीं महत्त्वाचे श्लोक संस्कृतप्रेमी जनांकरितां खालीं देत आहोंत. त्यांचा अर्थ वर आलेलाच आहे. त्यामुळें तो निराळा देण्याची आवश्यकता नाहीं.

यदा दत्तोऽवतीर्णोयं कालाग्निशमनाभिधः ।
अत्रेर्गृहेऽवतीर्णो हि परमात्मा सनातनः ॥ १ ॥
तं द्रष्टुमागतास्तत्र देवाश्च ऋषयोऽपि च ।
गन्धर्वाश्चारणाः सिद्धास्तथान्ये योगपारगाः ॥ २ ॥
आत्मानं दर्शयामास भगवान्योगिवल्लभः ।
अनादिनिधनो देवो योऽनसूयात्रिसंभवः ॥ ३ ॥
त्यक्त्वाऽर्भकस्वरूपं स तेषां सम्पश्यतां सताम् ।
आविश्चकार भगवाञ्ज्योतीरूपं सनातनः ॥ ४ ॥

## दत्त उवाच

न मे जन्म न मे कर्म न मे गर्भेऽपि संस्थितिः ।
निर्गुणोऽजो निराकारो योऽस्मि सोऽस्मि यथा तथा ॥ ८ ॥
न मे देहः कुतः कालः संभवोऽपि न संशयः ।
मायागुणविमुक्तोऽहं भक्तानुग्रहकाम्यया ॥ ९ ॥
स्वरूपाज्जात इव च दर्शयामि स्वमायया ।
स्वभक्ताननुगृह्णामि सर्वलोकसुखावहः ॥ १० ॥
सर्वात्मा सर्वगः साक्षी सर्वत्रावस्थितः प्रभुः ॥ ११ ॥

असंगोऽहमनंतोऽहमद्वयः प्रभुरीश्वरः ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १३ ॥
इत्यजत्वं चाक्रियत्वमसंगित्वं ममात्मनः ।
तथैव भवतां ज्ञेयं नात्र कार्या विचारणा ॥ १४ ॥

## सहावा अवतार लीलाविश्वंभर श्रीदत्तात्रेय

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा सहावा अवतार लीलाविश्वंभर या नांवानें प्रसिद्ध आहे. आतां आपण त्यांचें चरित्र पाहूं. पूर्वी वर्णन केलेला योगिजनवल्लभ हा अवतार सर्व योगिजनांच्या कल्याणासाठीं घेतला असल्यामुळें या अवतारांत त्यांनीं योगिजनांच्या समुदायांत वास्तव्य केलें. योगाभ्यासाचा मार्ग दाखविला. त्यांच्या योगाभ्यासांतील सर्व विघ्नांचें निराकरण केलें. योगिजनांना उत्तम गति दिली. त्यामुळें ते योगिजनवल्लभ झाले. आतां लीलाविश्वंभर दत्तात्रेय यांचें चरित्र नीट लक्ष देऊन वाचावें. या चरित्रांत दत्तात्रेयांची वात्सल्यबुद्धि व त्यांच्या ठिकाणीं असलेली निरपेक्ष करुणा यांची आपल्याला प्रचीती येईल.

एकदां दुर्दैवानें देशांत सर्वत्र मोठा दुष्काळ पडला. नैसर्गिक आपत्तींनीं देश ग्रासला गेला. कधीं खूपच खूप पाऊस पडून धान्याचा नाश व्हावयाचा तर कधीं मुळींच पाऊस न पडल्यामुळें पिकें सुकून जावयाचीं. क्वचित् जलप्रलयाचे प्रसंग ओढवले जात; तर क्वचित् पिण्यालाहि पाणी दुर्मिळ होत असे. लोक अन्नपाण्याला मोताद होऊन देशोधडीला लागले. क्वचित् प्रखर उन्हानें होरपळून जाऊं लागले; तर क्वचित् प्रचंड वाऱ्यावादळाचे तडाखे खाऊन संत्रस्त होत असत. टोळधाडीनें तर वृक्षांचा हिरवा पालाहि नाहींसा होऊन ते वृक्ष खराट्यासारखे उभे असलेले दिसत. उंदरांचा सुळसुळाट इतका व्हावयाचा कीं त्यामुळें रानांत गवताची काडीहि दिसेनाशी झाली. जनावरांना खावयाला मिळत नसल्यामुळें त्यांचीं शरीरें केवळ हाडांचे सांपळे बनले. लोकांना खावयास कांहीं मिळत नसल्यामुळें उपासमारीनें त्यांच्यावर मृत्युमुखीं पडण्याचा प्रसंग येऊं लागला. कठोर अंतःकरणाचे बडे बडे व्यापारी महागाईची पराकाष्ठा करून जनतेला पिळून काढूं लागले. श्रेष्ठ कोटीचे संपन्न सांठेबाज धान्याचे सांठे दडवून लोकांना नडवूं लागले. चोरांचा व दरोडेखोरांचा खूपच उपद्रव होऊं लागला. बाहेरून परचक्राची भीति व आंतून बंडाळीचा वणवा लोकांना सतत भेडसावीत असे. देशाला कोणी त्राता उरला नाहीं. देशसंरक्षणाची ज्यांच्यावर जबाबदारी तेच देशाचे भक्षक बनले. सर्वोच्च सत्ताधीशापासून तों अतिकनिष्ठ कर्मचाऱ्यापर्यंत सर्वच भ्रष्टाचाराचें अधिष्ठान बनले. याप्रमाणें नैसर्गिक आणि मानवनिर्मित आपत्तींनीं लोकांची दे माय धरणीं ठाय अशी अवस्था होऊन गेली. मनाला स्वास्थ्य नाहीं, चित्ताला शांति नाहीं. ऋषिमुनींच्या तपश्चर्या व यज्ञयागादि कर्में यथासांग पार पडेनात. हा सर्व अभिप्राय ग्रंथकारांनीं "ईति" या शब्दानें दर्शविला आहे. अशी

देशाची दुरवस्था झाली असतां ऋषिमुनि, सत्शील ब्राह्मण आणि भक्तजन हे सर्व दयासागर, कनवाळू भगवान् श्रीदत्तात्रेय यांना शरण गेले. कठीण परिस्थितीमध्यें त्यांच्याशिवाय दुःखी जनांच्या दुःखाचा कोण परिहार करणार ? त्या वेळीं करुणानिधि भगवान् श्रीदत्तात्रेय महासती श्रीअनसूयादेवी यांच्या अंकावर स्तनपान करीत होते. दीन जनांची ती करुणापूर्ण प्रार्थना ऐकल्याबरोबर दीनवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय आपलें शैशवरूप सोडून लीलाविश्वंभररूपानें ते सर्वांच्या पुढें येऊन प्रसन्न मुखानें उभे राहिले. दत्तरूपी परमेश्वरानें त्यांना अभयवचन दिलें. खरोखर निर्वाणीच्या काळीं संकटांतून सोडविण्याला तो एक दयाघन परमात्माच समर्थ आहे. त्याच्यावांचून शरण जाण्याला योग्य दुसरा कोण आहे? दत्तात्रेयप्रभूंनीं त्या सर्व लोकांकडे कृपापूर्ण दृष्टीनें पाहिलें.

अन्नपानादिदानेन लीलाविश्वंभरोऽभवत् ।
लीलया विश्वरूपाणि मुनिभ्यः स व्यदर्शयत् ।। ७ ।।

सर्व लोकांना भरपूर अन्नपान देऊन तृप्त केलें व वस्त्रप्रावरणादिकांनीं संतुष्ट केलें. हें सर्व कार्य परमेश्वरानें सहज लीलेनें केलें म्हणून लोक त्यांना लीलाविश्वंभर असें म्हणूं लागले. दत्तप्रभूंनीं या सर्व लोकांवर अनुग्रह करून आपलें विश्वरूपहि त्यांना दाखविलें. परमेश्वराचें विश्वरूप अवलोकन करून सर्वांनीं त्या लीलाविश्वंभर दत्तात्रेयाला साष्टांग प्रणिपात केले व हात जोडून नम्र भावानें दत्तात्रेयांची ते स्तुति करूं लागले. दत्तात्रेयांनीं त्या सर्वांना आपल्या आश्रमांत कांहीं काळ ठेवून घेतलें. आपल्या अमृततुल्य मधुर वाणीनें सर्वांना सदुपदेश करून संतुष्ट केलें. दत्तात्रेयप्रभु आणि त्यांच्या सान्निध्यांत असलेले सर्व भक्तजन यांचा – अध्ययन-अध्यापन, योगाभ्यास आणि दत्तात्रेयप्रभूंच्या उपदेशाचें श्रवण असा नित्यक्रम आनंदांत चालू असतां त्या सर्वांची निष्ठा पाहून दत्तप्रभूंनीं त्यांना एके दिवशीं वनरूपानें प्रपंचाचें दर्शन घडविलें. प्रपंच हा एक विशाल अरण्यस्वरूप असून या अरण्यांत अहंकार नांवाचा एक मोठा पर्वत आहे. या पर्वताच्या सभोंवार व मध्यभागीं भलें मोठें जंगल आहे. त्यांत अस्ताव्यस्त वाढलेले मोठमोठे वृक्ष, छोटीं-मोठीं झाडें-झुडपें यांची खूपच गर्दी झालेली आहे. कामरूपी विकार हेच या अरण्यांतील आ वासून गिळावयास बसलेले महाभयंकर सिंह होत. त्याचप्रमाणें क्रोधरूपी विकार हे प्रक्षुब्ध होऊन फूत्कार टाकणारे सर्प होत. मनाला निर्माण होणारे निरनिराळ्या ग्राम्य विषयांबद्दलचे मोह हेच या प्रपंचरूपी अरण्यांतील जलाशय समजावेत. न पोहणारे लोक डोहांत पडून जसे बुडतात त्याचप्रमाणें अज्ञजन या मोहरूपी जलाशयांत सांपडून मृत्युमुखीं पडतात. या प्रपंचरूपी अरण्यांत वाढणारे नित्यनैमित्तिक क्रियारूपी वृक्ष सुखदुःखात्मक फुलाफळांनीं बहरलेले असतात. याप्रमाणें सर्वांना प्रपंचरूपी अरण्याचें दर्शन घडवून दत्तात्रेयप्रभु म्हणाले, “ हे जनहो ! हें कालरूपी वन अत्यंत कष्टदायक आहे तें बहुधा दुःखच देत असतें.

यांतील कांहीं फळें वरवर रमणीय दिसतात व गोड भासतात. पण तीं तशीं नसतात. या वनवृक्षांची छाया आणि पाणी हेंहि विषमयच असतात. हें वन दृष्टीस पडलें तरी कष्ट होतात. मग यांतील वास्तव्यानें किती दुःख होत असेल याची कल्पनाच करावी. म्हणून सुजनहो, तुम्ही या संसाररूपी घोर अरण्याचा आश्रय करून राहूं नका."

अहंकारो महानद्रिर्व्यस्तपादपसंश्रयः।
कामो व्यात्तमुखः सिंहो मन्यवः कुपिताहयः ॥ १२ ॥

जलाशयो मनोमोह आपोऽगाधा हि तत्र च।
क्रियायोगा हि ते वृक्षा निष्फलाः सफलाः क्वचित् ॥ १३ ॥

इत्येवं दर्शयित्वाऽथ तानुवाच महेश्वरः।
इदं कालवनं कष्टं प्रायो दुःखकरं परम् ॥ १४ ॥

आपातरमणीयानि दृष्टान्यत्र फलानि तु।
छाया विषमयी चापि पानीयं विषमेव हि ॥ १५ ॥

कष्टदं दर्शनादेव किमु तत्सेवितं पुनः।
तस्मान्न स्थेयमत्राद्य भवद्भिः सद्धितेच्छुभिः ॥ १६ ॥

वरील श्लोकांचा अभिप्राय वर दिलेलाच आहे. दत्तात्रेय यांचें हें उपदेशपर भाषण ऐकूनहि पुष्कळ लोक पूर्वीच्या सांसारिक प्रबळ दुर्वासनांमुळें व मोहामुळें पुनः संसाररूपी अरण्यांतच भटकूं लागले. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक तापत्रयाच्या वणव्यामध्यें सांपडून होरपळूं लागले.

पूर्वीप्रमाणेंच लीलाविश्वंभर अंतर्धान पावले व पुन्हां प्रकट झाले. अशा रीतीनें मलिन वासनांचा व अज्ञानाचा नाश होऊन सर्वांच्या अंतःकरणांत केलेला बोध ठसेतोंपर्यंत परमेश्वरानें ही लीला केली. करुणासागर असलेल्या लीलाविश्वंभराची ही लीला चालत राहिली. पुढें त्यांनीं स्वतःच कृपा करून सर्वांचें संसाररूपी अरण्य पार नाहींसें करून टाकलें. स्वप्नांत दुःखें अनुभवणारा माणूस जागा झाल्यावरोबर ज्याप्रमाणें सर्व दुःखांतून मुक्त होतो त्याप्रमाणें श्रीलीलाविश्वंभराच्या कृपेनें ते सर्व भक्तजन दुःखांतून मुक्त झाले. दत्तात्रेयप्रभूंकडे अवलोकन करून नम्रभावानें त्यांनीं दत्तात्रेय यांना विचारलें, 'महाराज, अतिभयंकर दिसणारें तें अरण्य कोठें गेलें?' तेव्हां दत्तात्रेय त्यांना हंसून म्हणाले, "अहो! जेथून तें निर्माण झालें होतें तेथें तें गेलें. हीच गति सर्व संसाराची आहे. अज्ञानामुळें संसार जेथून उदयाला येतो; — अज्ञानाचा निरास झाल्यानंतर तो तेथेंच मावळतो, यांत संशय नाहीं. जो कोणी या दुःखदायक संसाराला बाजूला सारून निरंतर माझें स्मरण करीत राहील तो सर्व संसारदुःखांतून मुक्त होईल. हा सर्व संसार असार असून त्याच्या मुळाशीं असलेला अधिष्ठानरूप आत्मा हाच फक्त सत्य आहे. ही गोष्ट ज्याच्या अन्तःकरणांत रुजेल तोच सर्व दुःखांतून

मुक्त होईल." यावर ते सर्व लोक म्हणाले, "महाराज, आत्मा हा कसा आहे व त्याचें ज्ञान आम्हांला कसें होईल हें कृपा करून सांगा. श्रीदत्तात्रेयप्रभु म्हणाले, "सर्वांचा अंतरात्मा मीच आहें. माझें ज्ञान सत्कर्मानें व भक्तीनें प्राप्त होऊं शकतें." भक्तजन म्हणाले, "हे देवाधिदेवा, आम्हांला ज्ञान नाहीं, सत्कर्म नाहीं व भक्तीहि नाहीं. मग आम्हांला आत्मस्वरूपाचा साक्षात्कार कसा होणार ?"

त्वया सह चरिष्यामो नित्यं त्वद्दर्शनोत्सुकाः ।
त्वां त्यक्तुमक्षमास्तस्मात् प्रसीद करुणां कुरु ।। ३० ।।

"हे दयाघना सद्गुरो ! आम्ही आतां सदासर्वकाळ तुमच्या बरोबरच राहूं. आम्हांला नित्य तुमच्या दर्शनाची उत्कंठा आहे. तुम्हांला क्षणभरहि सोडावयास आमचें मन समर्थ नाहीं. म्हणून हे परमेश्वरा ! प्रसन्न व्हा आणि आमच्यावर कृपा करा. आम्हांला नित्य तुमच्या सान्निध्यांत राहूं द्या."

ही सर्वांची विनंति ऐकून दत्तात्रेयप्रभु विचार करूं लागले. 'आसक्ति ही योगाभ्यासांतील एक मोठें विघ्न आहे. या लोकांची नित्य संगति माझ्या योगाभ्यासाला व एकांतवासाला बाधक ठरेल, तेव्हां हे सर्व लोक माझ्यापासून दूर कसे होतील, याचा मला विचार केलाच पाहिजे.' असा विचार करून भगवान् दत्तात्रेय हे जवळ असलेल्या सरोवराच्या अगाध पाण्यांत उडी घेऊन दडून बसले. दत्तात्रेयप्रभु वर येतील व आपणांस दर्शन देतील अशा बुद्धीनें ते सर्व बराच काळ सरोवराच्या कांठीं बसून राहिले. बराच काळ लोटल्यानंतर भगवान् श्रीदत्तात्रेय त्या सर्व लोकांची परीक्षा पाहण्या-करितां आपल्याबरोबर एका मायारूपी तरुण स्त्रीला घेऊन वर आले व तिच्यासह खानपानादि व्यवहार करूं लागले. हें प्रभूंचें आचरण पाहून बरेचसे लोक त्यांना कंटाळले व हे आचारभ्रष्ट आहेत असें समजून त्यांना सोडून जाऊं लागले. कांहीं लोक मात्र दत्तात्रेयांचा अधिकार फार मोठा आहे, ते कधीं आचारभ्रष्ट होणार नाहींत, आपण त्यांना सोडून जावें या हेतूनें ही केवळ त्यांनीं रचलेली माया असावी असा विचार करून पूर्ण श्रद्धेनें तेथेंच बसून राहिले. अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या सद्ध लोकांना कशाचाहि दोष लागत नाहीं, अशा श्रद्धेनें बसून राहिले. अशा रीतीनें जे लोक उरले त्यांच्यावर दत्तात्रेयप्रभूंनीं अनुग्रह केला —

संयोगो वा वियोगो वा कथं सर्वात्मनो भवेत् ।
अथापि लोकशिक्षार्थं दर्शयत्येवमीश्वरः ।। ३६ ।।

सर्वस्वरूप असलेल्या ईश्वराला संयोग अथवा वियोग कसा असणार ? दोन पृथक् पृथक वस्तूंचें एकत्र येणें, एकमेकांशीं संलग्न होणें याला संयोग असें म्हणतात, व एकमेकां-हून निराळें होणें याला वियोग असें म्हणतात. परमात्मा हा एकच एक सर्व रूपानें नटलेला असल्यामुळें त्याचा कोणाशीं संयोगहि नाहीं व वियोगहि नाहीं. तथापि

लोकांना शिक्षण देण्याकरितां परमात्मा भक्तांना जवळ करणें, अभक्तांना दूर करणें इत्यादि कार्य करीत राहतो.

संगात्संजायते कामस्ततः क्रोधादयोऽधदाः ।
शोकमोहादयः सर्वे संगादेव भवंति हि ।। ३७ ।।

योगभंगकरः संगः प्रतिकूलोऽविवेकिनाम् ।
विवेकिनां तु सत्संगः सर्वदा योगसिद्धिदः ।। ३८ ।।

यत्नाच्याज्यो वहिः संगः संगस्त्याज्यस्तथांतरः ।
इत्युपादिशदीशोऽयं लीलाविश्वंभरो विभुः ।। ३९ ।।

पौषमासे पूर्णिमायां पुष्यर्क्षे बुधवासरे ।
स सूर्योदयवेलायामवतीर्णो महाद्युतिः ।। ४० ।।

संग म्हणजे विषयासक्ति, ही अंतःकरणांत निर्माण झाली कीं, विविध सुखांचीं साधनें संगृहित करण्याची इच्छा निर्माण होते. या इच्छेलाच काम असें म्हणतात. ही इच्छा ज्या निमित्तानें विफल होते त्याच्याबद्दल अंतःकरणांत क्रोध निर्माण होतो. क्रोधाबरोबरच लोभ, मोह, मद, मत्सर, ईर्ष्या आणि द्वेष हे विकार अंतःकरणाला पछाडतात. हे विकार म्हणजे मनाचे रोगच होत. त्यांतून शोक आणि दुःख निर्माण होत राहतात. संग हा योगाभ्यासाचा भंग करणारा असल्यामुळें तो नेहमीं विवेकी लोकांना प्रतिकूलच असतो; आणि अविवेकी लोकांचाहि तो नाशच करतो. याकरितां विवेकी लोक विषयांचा संग सोडून सज्जनांचा संग नेहमीं स्वीकारीत असतात. कारण सज्जनांचा संग हा सदासर्वकाळ योगांची सिद्धि देणारा असतो. म्हणून शहाण्या लोकांनीं विषयांचा संग प्रयत्नानें टाळावा. बाह्य विषयांचा संग जसा हानिकारक आहे तसाच अंतःसंगहि हानिकारकच आहे. बाह्य विषय सोडले तरी अंतःकरणांत त्या विषयांची इच्छा शिल्लक राहणें त्याला अंतःसंग असें म्हणतात. तोहि घातकच असतो; ही गोष्ट मुमुक्षु जनांनीं लक्षांत घ्यावी. अशा रीतीनें लीलाविश्वंभर भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं पुढें असलेल्या भक्तजनांना उपदेश केला.

श्रीलीलाविश्वंभर दत्त हे पौषमासांतील पौर्णिमेच्या दिवशीं पुष्य नक्षत्र आणि बुधवार असतांना सूर्योदयाच्या वेळीं अवतरले. श्रद्धा आणि भक्ति अंतःकरणांत ठेवून 'ॐ लीलाविश्वंभराय नमः' असें प्रत्येक वेळीं म्हणून ध्यानावाहनादि सर्व पूजोपचार समर्पण करावेत. त्यानंतर प्रत्येक वेळीं एक एक श्लोक म्हणून तिन्ही श्लोकांनीं तीन अर्घ्यं द्यावेत.

## अर्घ्यदानाचे श्लोक

पूर्णब्रह्मस्वरूपाय लीलाविश्वंभराय च ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

अद्वैतानंदरूपाय विश्वरूपाय संभवे ।
अन्नमयाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

लीलाविग्रहरूपायानसूयानंदनाय च ।
संसारभ्रमनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

परिपूर्णपरब्रह्मस्वरूप असलेले भगवान् श्रीलीलाविश्वंभर दत्तात्रेय गुरुदेव यांना पूजानिमित्तानें मी अर्घ्य देत आहें.

हे लीलाविश्वंभरा ! आपण एकमेवाद्वितीय अर्थात् अद्वैतस्वरूप आहां. आपण आनंदरूप आहां. आपण विश्वरूप आहां. सर्व विश्वाचें कल्याण आपल्यामुळेंच होत आहे. आपण अन्नमय म्हणजे सर्व विश्वाला पोटभर अन्न देऊन विश्वाचें भरणपोषण सहज लीलेनें करीत आहां. म्हणून आपणांस लीलाविश्वंभर देव असें म्हणतात. मी भक्तिपूर्ण अंतःकरणानें या पूजासमयीं तुम्हांला अर्घ्यप्रदान करीत आहें.

हे दत्तात्रेया ! आपण भक्तजनांच्या कल्याणाकरितां लीलेनें मूर्त स्वरूप धारण केलेलें आहे. हे अनसूयानंदना दत्तात्रेया, आपण भक्तजनांच्या सांसारिक कष्टांचा नाश करून टाकतां. हे दयाळा, परमेश्वरा, मी या पूजाप्रसंगीं अर्घ्य समर्पण करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्यं देऊन दत्तात्रेयांच्या संतोषासाटीं मिष्टान्नाचा नैवेद्य दाखवावा. यायोगें तर संतुष्ट झालेले दत्तात्रेय तुमचें अभिलषित कार्य पूर्ण करून तुम्हांला संतुष्ट करतील. आरती व मंत्रपुष्प झाल्यानंतर तीर्थप्रसाद वांटून श्रीदत्तगुरूंच्या जयजयकारांत हा श्रीलीलाविश्वंभर यांचा सहावा जयंतीमहोत्सव समाप्त करावा. ॐ तत्सत् ।

## सातवा अवतार सिद्धराज श्रीदत्तात्रेय

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा सातवा अवतार सिद्धराज या नांवानें प्रसिद्ध आहे. लीलाविश्वंभर दत्त या नांवानें अवतरून अपेक्षित असलेलें सर्व कार्य पूर्ण झाल्यानंतर दत्तात्रेयप्रभूंनीं सिद्धराज या नांवाचा अवतार घेतला. सद्गुरु श्रीलीलाविश्वंभर देव हे एकदां स्वतःचें रूप लोकांच्या लक्षांत येऊं न देतां बालरूपानें प्रकट झाले व भूतलावर इतस्ततः पर्यटन करीत करीत हिमाचल प्रदेशांतील बदरिकावनांत एकटेच प्रविष्ट झाले. इकडे तिकडे फिरत फिरत ते बदरिकाश्रमापर्यंत येऊन पोहोंचले. तेथें अनेक सिद्ध लोक वास्तव्य करीत होते. त्यांनीं खडतर तपश्चर्या करून कष्टसाध्य अशा सिद्धि मिळविलेल्या होत्या. त्या सिद्धींच्या जिवावर ते अनेक प्रकारचीं सुखें भोगीत व चैन करीत काळ कंठीत होते. सिद्धींच्या बळावर ते खूपच कामक्रोधादि विकारांच्या आहारीं गेलेले होते. कोणी लंगोटी परिधान करून तर कोणी नग्न अवस्थेंतहि रहात होते. कोणी मौन धारण करून बसलेले होते, तर कोणी आत्मप्रौढीचें वर्णन करण्यांत गर्क झालेले होते. कोणी आस्तिकांचा पक्ष घेऊन तर

कोणी नास्तिकांचा पक्ष घेऊन निरनिराळ्या विषयांवर वादविवाद करीत बसलेले होते. एकदां त्या सर्व सिद्धांचा मेळावा एका ठिकाणीं जमला होता. त्या मेळाव्यांत लीलाविश्वंभर दत्तात्रेय हे बालरूप धारण करून सर्वांच्या मागें जाऊन बसले. सर्व सिद्धांच्या स्वभावाची परीक्षा पाहणें व त्यांच्या गर्वाचा परिहार करणें हा उद्देश दत्तात्रेयांनीं मनांत ठेवलेला होता. दत्तात्रेयांचें तें अत्यंत तेजस्वी व दिव्य बालरूप पाहून सर्वांची दृष्टि त्यांच्याकडे आकृष्ट झाली. अत्यंत मनोहर असलेले बालयोगी भगवान् दत्तात्रेय योगमुद्रेनें बसलेले होते.

दत्तात्रेयांना मोठ्या ऐटींत बसलेले पाहून त्या सर्व सिद्धांनीं प्रश्न केला, "बाळ तूं कोण आहेस ?" त्यांचा हा प्रश्न ऐकून दत्तात्रेय म्हणाले, "माझें स्वरूप कोणाच्याहि प्रतीतीला येत नसल्यामुळें मला अप्रतीतस्वरूप असें म्हणतात." यावर सिद्धांनीं विचारलें, "तुझा आश्रय कोण आहे हें तरी सांग." दत्तात्रेय म्हणाले, "मला कोणी आश्रय नाहीं व माझा कोणी स्वामी अथवा संरक्षकहि नाहीं."

"तुझा योग कोणता व त्याच्या अभ्यासाची रीत कोणती ?" दत्तात्रेय म्हणाले, "माझ्या योगाला मी चित्रयोग हें नांव दिलेलें असून त्याच्या अभ्यासाची कांहीं प्रक्रिया नाहीं." यावर सिद्धांनीं विचारलें, "तुझा गुरु तरी कोण आहे ?" त्यावर दत्तात्रेयांनीं उत्तर दिलें कीं, मला कोणी गुरूच नाहीं. पुन्हां सिद्ध म्हणाले, "तुझी मुद्रा कोणती ? वैष्णवी की शांभवी ?" सिद्धराज म्हणाले, "माझी ही करुणात्मक मायेच्या पलीकडची निरंजनी मुद्रा आहे."

"अरे ती कशी असते ?"

उत्तर – "जसा मी आहें तशीच ती असते."

"अरे या मुद्रेंत तुला काय दिसत आहे ?"

सिद्धराज दत्तात्रेय म्हणाले, "ध्यानातीत अवस्थेंत जें प्रतीतीला येतें अर्थात् ध्याता, ध्यान आणि ध्येय या त्रिपुटीच्या पलीकडचें जें कांहीं तत्त्व आहे तेंच माझें ध्येय होय."

यावर सिद्ध म्हणाले, "बाळ, तुझा मार्ग तरी कोणता ?"

त्यावर दत्तात्रेय म्हणाले, "ज्या मार्गानें गेलें असतां सहज अनायासें शिवतत्त्वाचा साक्षात्कार होतो तोच माझा मार्ग होय. अन्य कोणत्याहि मार्गानें जातां येणें शक्य नाहीं. तोच माझा मार्ग होय."

याप्रमाणें ती सिद्धमंडळी व भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा वादविवाद चालू असतां आकाशमार्गानें जात असलेले अकरा रुद्र, बारा आदित्य, अष्ट वसु आणि त्याचप्रमाणें एकूणपन्नास मरुद्गण तसेंच महर्षि, साध्यदेव, यक्ष, गंधर्व व किन्नर हे जात असतां त्यांची गति कुंठित होऊन ते सर्व भूतलावर त्या ठिकाणीं उतरले. त्यांना पाहून ती सर्व सिद्धमंडळी आश्चर्यचकित झाली. "अहो, देवांची गति कुंठित होऊन ते या ठिकाणीं

उतरले, हें आमच्या सिद्धीचें फल होय." त्यांतहि एक म्हणतो, हें माझ्या सिद्धीचें फल आहे, तर दुसरा म्हणतो, छे! तें माझ्या सिद्धीचें फल आहे. अशा रीतीनें त्यांच्यांत वाद सुरू झाला. मी श्रेष्ठ आहें – मी श्रेष्ठ आहें; याप्रमाणें स्वतःच्या श्रेष्ठत्वाची ख्याति ते गाऊं लागले. त्यांचा तो परस्परांमध्यें चाललेला कलह पाहून सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय त्यांना म्हणाले, "हे सिद्धजनहो! तुम्ही आपसांत हें भांडण कां करीत आहां? तुम्ही सर्वच श्रेष्ठ आहां, पण तुमच्यामध्यें अधिक श्रेष्ठ कोण आहे याचा निर्णय घेण्याची सोपी युक्ति मी तुम्हांला सांगतों. त्यामुळें तुमच्यामध्यें सर्वांत अधिक श्रेष्ठ कोण हें तुम्हांला सहज कळून येईल. गति कुंठित होऊन भूमंडलावर या ठिकाणीं उतरलेले हे सर्व देव आणि इतर लोक ज्याच्या शब्दानें पुनः वर जातील तो तुम्हां सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे असें समजा. त्याचें सिद्धिसामर्थ्य सर्वांपेक्षा प्रबळ आहे ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होईल. तात्पर्य, ज्याच्या शब्दानें हे सर्व लोक पूर्ववत् वर जातील त्याच्याच सिद्धीनें त्या सर्वांची गति कुंठित झाली हेंहि आपोआप सिद्ध होईल." हें दत्तात्रेय यांचें भाषण ऐकून ती सर्व सिद्धमंडळी ठीक आहे असें म्हणून पृथक् पृथक् "मी तुमच्या गतीचा अवरोध काढून घेतला आहे. तुम्ही आतां स्वच्छंदपणें आपआपल्या स्थानाला निघून जावें" असें त्या सर्व सिद्धांनीं म्हटलें; पण एकाच्याहि शब्दाचा उपयोग झाला नाहीं. कोणीहि देव अथवा ऋषि-मुनि आपआपल्या स्थानापासून हलूंहि शकले नाहींत.

यामुळें आपण खूप मोठी सिद्धि मिळविलेली आहे असें मानणारे ते सर्व सिद्ध-लोक अत्यंत लज्जित झाले. त्यांचा क्रोध मावळला. अहंकार पार गळाला. ते सर्व सिद्ध निस्तब्ध झाले व दुर्मुखलेले होऊन बसले. त्यानंतर सिद्धराज सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय म्हणाले, "हे देवहो, ऋषि-मुनिजनहो, तुम्ही सर्व आपआपल्या स्थानाला सत्वर जाऊन पोहोंचावें. मीं तुमचा प्रतिबंध दूर केला आहे. तुम्ही तिळमात्रहि चिंता न करतां आनंदानें आपआपल्या स्थानाला जावें. माझा तुमच्यावर अनुग्रह आहे." हे शब्द ऐकल्याबरोबर ते सर्व देव व इतर मंडळी एका क्षणांत आपापल्या स्थानाला जाऊन पोहोंचली. हें पाहून बदरिकाश्रमांतील सर्व सिद्ध महात्मे आश्चर्यचकित झाले व म्हणूं लागले, "खरोखर हा प्रत्यक्ष परमात्माच बालरूपानें आपल्यापुढें अवतरलेला आहे." देवांनीं निरोप घेतांना दत्तात्रेय यांच्या चरणीं सादर प्रणिपात केला व आतां त्या सर्व सिद्धांनींहि दत्तात्रेय यांच्या चरणीं भक्तिपूर्वक सादर अभिवादन केलें. देव आणि सिद्ध यांनीं त्या ठिकाणीं दत्तात्रेय यांची मुक्त कंठानें स्तुति केली. भक्तियुक्त अंतःकरणानें पुनःपुन्हां दत्तात्रेयरूपानें हा आपल्याला परमात्माच भेटला, असें मानून वारंवार नम्र भावानें नमस्कार केले. त्यानंतर दत्तात्रेयांनीं पाहिलें कीं, आतां हे सर्व सिद्ध आपले भक्त झालेले आहेत, त्यांचा अहंकार मावळलेला आहे, गर्व गळालेला आहे, अंतःकरणें शुद्ध झालेलीं आहेत. हे सर्व अनुग्रहाला पात्र झालेले आहेत असें पाहून दत्तात्रेय त्यांना म्हणाले –

अहं सिद्धः परो योगी परमात्मात्मभूः स्वयम् ।
देवदेवो जगन्नाथः कालाग्निशमनो हरिः ।। २५ ।।

सर्वात्मा सर्ववित्साक्षी मतो वः परमेश्वरः ।
शिवं भवतु सर्वत्र सर्वतो मत्प्रसादतः ।। २६ ।।

प्रसन्नोऽहं प्रवक्ष्यामि यदिष्टं तद् वृणीष्व मत् ।
सर्वसिद्धिप्रदः सोऽहं सिद्धिभूः सकलाश्रयः ।। २७ ।।

मी सिद्धराज आहें. मी श्रेष्ठ योगी अर्थात् योगिराज आहें. मी स्वतःच सिद्ध परमात्मा आहें. मला देवदेव म्हणतात, तर कोणी कालाग्निशमन असेंहि म्हणतात. सर्व भक्तांचीं दुःखें मी हरण करतों. म्हणून मला कोणी हरि असेंहि म्हणतात. मी सर्वांचा आत्मा आहें. त्याचप्रमाणें सर्वस्वरूपहि आहें. तसाच मी सर्वज्ञ व सर्वसाक्षीहि आहें. तसाच मी परमेश्वरहि आहें, हें तुमच्या प्रतीतीला आलेंच आहे. तुमचें सर्वत्र कल्याण असो. माझ्या कृपेनें तुमचें सर्व कांहीं भलें होवो. मी प्रसन्न आहें. तुम्हांला जें कांहीं पाहिजे असेल तें माझ्याकडून मागून घ्या. मी सर्व सिद्धि समर्पण करणारा आणि सर्व सिद्धींचा अधिष्ठाता आहें. मी सर्वांचें आश्रयस्थान आहें." अत्यंत प्रसन्न असलेल्या योगिराजांचें हें भाषण ऐकून ते सर्व सिद्ध म्हणाले, "हे परमेश्वरा ! जर तुम्ही आमच्यावर प्रसन्न आहां तर आम्हांला पूर्ण सिद्धींचें प्रदान करा. ज्याप्रमाणें दयाळ वडील आपल्या पुत्राचें हित करतात त्याचप्रमाणें देवदेवेश्वरा दत्तात्रेया, तुम्ही आमचें कल्याण करा. आम्हांला योगमार्गाचाहि उपदेश करा. त्याचप्रमाणें तुमच्या विषयीं आमच्या अंतःकरणांत अखंड भक्ति राहो. हीच आमची प्रार्थना आहे." त्यांची ही विनंति ऐकून दत्तात्रेय म्हणाले, "सिद्धींनीं दुसऱ्याला त्रास देण्याचा मोह निर्माण होतो. अहंकार वाढतो. सिद्धि या योगाला विघ्नें निर्माण करतात. तुम्ही सिद्धींच्या नादीं लागूं नका. हे सिद्धहो, मी सांगतों तें ऐका. मी तुम्हांला अशा योगाचा उपदेश करीत आहें कीं, त्याच्यामुळें जसा मी प्रत्यक्ष परमात्मा व आनंदसागर आहें त्याचप्रमाणें तुम्ही देखील सच्चिदानंदघन परिपूर्ण परब्रह्मस्वरूप व्हाल."

तथैव मंत्रराजोऽहं नादरूपोऽव्ययः शिवः ।
मदधीनं जगत्सर्वं मंत्राधीनोऽहमेव हि ।। ३५ ।।

जगद्‌गुरु श्रीदत्तात्रेय म्हणाले, "आत्मचिंतनाबरोबरच माझ्या प्राप्तीसाठीं माझ्या मंत्राचीहि उपासना करावी. माझ्या मंत्रांना मंत्रराज असें म्हणतात. मी मंत्रराजस्वरूप आहें. मी नादरूप असून अव्यय म्हणजे अविनाशी आणि शिव म्हणजे परब्रह्मस्वरूप आहें, मी म्हणजे परमात्मा. हें सर्व जग माझ्या आधीन आहे; आणि मी मंत्राच्या आधीन आहें. ते प्रभावी मंत्र आणि जपाची पद्धति मी तुम्हांला सांगतों. विधिपूर्वक केलेल्या अनुष्ठानानें हे मंत्र उपासकाला सिद्धि प्राप्त करून देतात." दत्तात्रेयांनीं अशा या आत्मशक्ति प्राप्त करून देणाऱ्या मंत्र-तंत्रांचा उपदेश सिद्धांना केला.

रहस्य, न्यास, कवच इत्यादि सर्व तांत्रिक पद्धतींचाहि उपदेश केला. सिद्धराजांनीं स्वतःच ही शास्त्रपद्धति सांगितलेली असल्यामुळें या पद्धतीला सिद्धराजागम असें म्हणतात. दत्तात्रेयांनीं सर्व सिद्धांना उपदेशिलेली ही सिद्धराजागमपद्धति कालांतरानें आपले अनन्यभक्त श्रीदासोपंत (अंबेजोगाई) यांनाहि उपदेशिली. दासोपंतांनीं ती लिहूनहि ठेवली आहे. हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ सिद्धराजागम या नांवानें उपलब्ध आहे; पण तो भक्तजनांच्या भाग्यानें जेव्हां प्रकट होईल तेव्हां तो एक सुदिनच मानला जाईल. बदरिकाश्रमांतील सर्व सिद्धमंडळी सिद्धराजागमाच्या पद्धतीनें अनुष्ठान करून पूर्ण सिद्ध व पूर्ण ज्ञानी झाली. सिद्धराजाच्या कृपेनें त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन ते कृतकृत्य व धन्य झाले.

दिवैव संगवस्यांते सिद्धेशस्तानुपादिशत् ।
माघमासे पूर्णिमायां मघायां गुरुवासरे ।। ३९ ।।

सिद्धराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं सिद्धमंडळींना सिद्धराजागमाचा उपदेश ज्या दिवशीं केला तोच दिवस सिद्धराजाचा जयंती दिवस मानला जातो. तो दिवस माघ शुद्ध पौर्णिमेचा होता. त्या दिवशीं मघा नक्षत्र होतें. गुरुवार होता. दिवसा संगवकाळ म्हणजे धार काढण्याची ती वेळ होती. अशा शुभ मुहूर्तावर हा उपदेश झाला. भगवान् श्रीदत्तात्रेय याच शुभदिनीं वर सांगितलेल्या सुमुहूर्तावर अवतरले. त्यांच्या मंगलमय मूर्तीचें सर्व सिद्धांनीं पूजन केलें. भक्तजनांनींहि यथाविधि पूजन करून खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन अर्घ्य समर्पण करावेत.

## अर्घ्यदानाचे श्लोक

सर्वसिद्धान्तसिद्धाय देवाय परमात्मने ।
सिद्धराजाय सिद्धाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।
संसारदुःखनाशाय सर्वशोकहराय च ।
सिद्धराजाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।
सवर्णज्ञानदीपाय सर्वशक्तिधराय च ।
सिद्धराजाय शांताय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

सर्व सिद्धांतांनीं ऊहापोह करून ज्याची सिद्धि केलेली आहे अथवा सर्व सिद्धांतांनीं ज्याला मानलेलें आहे; जो दिव्य शक्तिशाली असून सर्व सिद्धांचा राजा आहे, त्या सिद्धराज दत्तात्रेय याला मी पूजानिमित्तानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

जो सर्व संसार-दुःखांचा नाश करतो आणि जो सर्व शोकांचें निरसन करतो त्या सिद्धराज गुरुदेव दत्तात्रेयाला मी पूजानिमित्तानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

आपण स्वतः परब्रह्मस्वरूप असल्यामुळें आत्मसमान वर्ण जो परमात्मा त्याच्या स्वरूपावर प्रकाश टाकणारा जो प्रत्यक्ष प्रदीपच आहे आणि जो ज्ञानशक्ति, क्रिया-

शक्ति इत्यादि सर्व शक्तींना धारण करतो अशा त्या अत्यंत शांत असलेल्या सिद्धराज दत्तदेवाला मी या पूजाकर्मामध्यें अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्य देऊन नैवेद्य समर्पण करावा. अशा रीतीनें पूजा केली असतां भक्त सिद्ध बनतो. बदरिकाश्रमांतील सर्व सिद्धमंडळींनींहि सिद्धराजाची पूजा करून थोडयाच काळांत संपूर्ण सिद्धि प्राप्त करून घेतली. नैवेद्य, आरती, मंत्रपुष्प झाल्यानंतर सर्वांना प्रसाद वांटून सिद्धराज दत्तात्रेय यांचा हा जयंती-महोत्सव जयजयकाराच्या घोषांत साजरा करावा. ॐ तत्सत् ।

## आठवा अवतार ज्ञानराज श्रीदत्तात्रेय

श्रीदत्तात्रेय यांचा आठवा अवतार ज्ञानराज हा होय. एकदां विश्वगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय एकांतामध्यें बसले असतां विचार करूं लागले कीं, हे सिद्धलोक माझ्या उपदेशानें सिद्ध झाले खरे, पण जोंपर्यंत कामक्रोधादि विकार समूळ नष्ट होत नाहींत तोंपर्यंत खऱ्या शांतीचा व सुखाचा त्यांना लाभ होणार नाहीं. काम हा सर्व दुःखांचें मूळ असून कामामुळेंच जीव हा सतत संसारामध्यें धडपड करीत असतो. काम हाच कर्ता व करविता आहे. कामाच्या जोडीला क्रोधहि पाठोपाठ धांवत येतोच. काम आणि क्रोध यांच्या जोडीनें मनुष्यांना पछाडलें कीं, ते सर्वस्वीं कामक्रोधाच्या आधीन होऊन जातात. सूक्ष्म विचार केला असतां मानवांना स्वातंत्र्य आहे काय असा प्रश्न पुढें येतो.

कामाधीनं जगत्सर्वं वर्तते सस्पृहं तथा ।
चिंतया परया व्याप्तं तापत्रयविकंपितम् ।। ३ ।।

कामो हि नरकद्वारं दुःखदः पापसंग्रहः ।
सर्वानर्थकरः सर्गे भ्रमकः सर्वपीडकः ।। ४ ।।

हें सर्व जग कामाच्या आधीन आहे. काम म्हणजे इच्छा. मनांत इच्छेचा अंकुर निर्माण झाला कीं, एका इच्छेंतून दुसरी इच्छा व दुसरींतून तिसरी याप्रमाणें इच्छांची परंपरा निर्माण होत जाते. अशा रीतीनें हें सर्व जग विषयाभिलाषांच्या जाळ्यांत सांपडतें व चिंतेनें त्रस्त होऊन जातें. कामामुळें सर्व जग चिंतेनें व्याकुळ होत असतें. आणि आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक या त्रिविध तापांनीं होरपळत असतें, खरोखर काम हा नरकांचें म्हणजे विविध दुःखांचें द्वारच आहे. कामादि विकार हे पदरीं असलेला जणूं कांहीं पापांचा सांठाच होय. काम हा सर्व प्रकारचे अनर्थ निर्माण करणारा असून या जीवाला सृष्टीमध्यें भटकावयास लावतो व सर्वांना पीडा देतो. अंतःकरणांत कामविकार फोफावला कीं, अनर्थाची परंपरा सारखी वाढत राहते, आणि अनर्थ वाढला कीं, जगाचा नाश ओढवतो. तेव्हां सिद्धराज दत्तात्रेय मनांशीं विचार करीत आहेत कीं, 'मला या सर्वांना कामाच्या जालांतून सोडविलें पाहिजे. या लोकांना ज्ञानानेंच माझ्या सायुज्याचा लाभ होईल व ते पूर्ण सुखी होतील.' असा

विचार करून परम दयाळू भगवान श्रीदत्तात्रेय तें पूर्वीचें त्रिगुणातीत आणि नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त असें आपलें स्वाभाविक रूप व आपली सहजावस्था क्षणभर बाजूला ठेवून ते पुन्हां कौमार रूप धारण करून प्रकट झाले. हा श्रीदत्तात्रेय यांचा आठवा अवतार होय. या अवताराला ज्ञानसागर असें अनुरूप नांव देण्यांत आलें. हा ज्ञानसागर श्रीदत्तात्रेय यांचा अवतार फाल्गुन शुक्ल पक्षांतील दशमीच्या दिवशीं रविवारीं सूर्योदयाच्या वेळीं झाला. त्या वेळीं पुनर्वसु नक्षत्र होतें.

फाल्गुने मासि शुक्लायां दशम्यां रविवासरे ।
भास्करस्योदये चैव पुनर्वस्वृक्षसंयुते ।। ८ ।।

याप्रमाणें वरील श्लोकांत सांगितलेल्या शुभ मुहूर्तावर आविर्भूत होऊन बदरिकाश्रमांतील सिद्धांचा समुदाय ज्या ठिकाणीं बसला होता तेथें डोक्याइतक्या उंच स्थानावर आकाशांत अधांतरीं तेजोवलयांत प्रकट झाले. त्यानंतर सर्व सिद्धांनीं उच्च स्थानावर आकाशांत अधांतरीं विराजत असलेल्या दत्तात्रेयाला पाहून त्याचा प्रभाव सहन न झाल्यामुळें दत्तात्रेयांच्या त्या सिद्धीचा अथवा शक्तीचा पराभव करण्याचा विडा उचलला. सर्वांनीं आपआपल्या शक्तीप्रमाणें दत्तात्रेय यांना खालीं खेचण्याचा प्रयत्न केला; पण ते कांहीं दत्तात्रेयांना तिळमात्रहि स्वस्थानापासून भ्रष्ट करूं शकले नाहींत. त्यांच्या त्या प्रयत्नानें दत्तात्रेयांची मुद्रा म्हणजे सहजावस्था तिळमात्रहि ढळूं शकली नाहीं. असें हें अभूतपूर्व दत्तात्रेयांचें ईश्वरी सामर्थ्य पाहून पुन्हां एकदां त्या ईश्वरी शक्तीवर सर्व सिद्धांनीं एकवटून आघात करण्याचा प्रयत्न केला; पण त्यांचे ते सर्व प्रयत्न विफल झाले. वाऱ्यानें कितीहि आघात केले तरी खडकाळ पर्वताचें शिखर अणुमात्रहि विचलित होत नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञानसागर भगवान् श्रीदत्तात्रेय आपल्या स्थानापासून यत्किंचितहि ढळले नाहींत. तेव्हां सर्व सिद्धांची खात्री झाली कीं, हा कोणी सामान्य सिद्ध नसून साक्षात् परमात्माच आहे. असें समजून त्यांनीं दत्तात्रेयांच्या चरणीं नमस्कार केला आणि पूर्वीप्रमाणें दत्तात्रेय यांना तुम्ही कोण ? तुमचें नांव काय इत्यादि प्रश्न केले. दत्तात्रेय यांनींहि पण पूर्वीप्रमाणें उत्तरें देऊन त्यांचें समाधान केलें. त्यानंतर सर्व सिद्धांनीं तो पूर्वीचाच हा प्रत्यक्ष परमात्मा आपल्या पुढें उभा आहे असें जाणून भक्तियुक्त अंतःकरणानें प्रणाम केले व हात जोडून नम्रपणानें दत्तात्रेयांची ते स्तुति करूं लागले.

हे देव सर्वदेवेश दीननाथ जगत्पते ।
त्वत्प्रसादाद्वयं सर्वे तव शक्तिमुपागताः ।। १९ ।।

हे प्रभो देवाधिदेवा ! हे दीनानाथा जगन्नाथा विश्वंभरा ! तुमच्याप्रमाणेंच सर्व शक्तींनीं व सिद्धींनीं आम्ही तुमच्याच कृपेनें संपन्न झालेलों आहोंत; पण हे परमेश्वरा, अद्यापि आमची ही कल्पना भ्रांतच आहे. आम्ही आटोकाट प्रयत्न करूनहि तुम्हांला भूमंडलावर उतरवूं शकलों नाहीं यावरून आमची शक्ति अद्यापि अपूर्ण

आहे व तुम्ही शक्तीनें परिपूर्ण आहां. यावर ज्ञानसागर दत्तात्रेय म्हणाले, " वायु हा सर्व भूतांमध्यें राहून सर्वांचें संचालन करण्यास समर्थ आहे. तथापि तो आकाशाचें संचालन करूं शकत नाहीं. कारण आकाश हें अवयवशून्य आहे, सर्वांना व्यापून राहणारें आहे व सर्वांचें तें कारणहि आहे. म्हणून वायूच्या आघातानें तें तिळमात्रहि विचलित होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें मी त्रिगुणात्मक आत्ममायेच्या संपर्कानें तिळमात्रहि स्वरूपापासून विचलित होऊं शकत नाहीं. मी सर्व सृष्टीचें कारण आहें तसाच मी निर्गुणहि आहें. अर्थात् सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांपासून अलिप्त आहें. तसाच मी निर्विकार आणि निरामय म्हणजे क्षेमकल्याणस्वरूप आहें. सर्व देहांमधून माझें वास्तव्य आहे व सर्व पदार्थांशीं माझा संपर्क आहे. तरीपण मी सर्वांहून निराळा व पूर्णपणें अलिप्त आहें. मी सर्वदा अबाध्य म्हणजे कधींहि नाहींसा न होणारा आणि सर्व प्राणिमात्रांचा आत्मा मीच आहें. मी मायेचा आधार असून मला कोणाचाच आश्रय नाहीं. मी नित्य आनंदमय ब्रह्मस्वरूप आहें. मी सर्वसंगरहित आहें. मी सृष्टिकालीं उत्पन्न होत नाहीं. स्थितिकालामध्यें माझें पोषण अथवा वृद्धि कधीं होत नाहीं आणि प्रलयकालीं माझा नाशहि होत नाहीं. कारण मी सदा सत्यस्वरूप आहें. मी साक्षात् परिपूर्ण परम सत्य, परब्रह्मच आहें. मी शुद्ध, द्वैतरहित, एकमेव अद्वितीय अक्षर म्हणजे कधींहि न झिजणारा अविनाशी असा आहें. मला पाहिजे तर सर्वशून्य म्हणा. कारण हें जें कांहीं दिसत आहे तें कोणीच मी नव्हे, व तें कांहींच मी नव्हे अथवा मला अशून्य म्हणजे परिपूर्ण असेंहि म्हणतां येईल. कारण मी सर्व रूपानें नटलों आहें व मी सर्व कांहीं आहें. मी कधीं मायेनें आवृत म्हणजे आच्छादित झालेलों नाहीं. ईश्वरत्वच जेथें कल्पित अर्थात खोटें आहे तेथें सिद्धांची कथा काय ? तुम्ही सर्व काममोहित होऊन निष्फळ गोष्टींचा अभ्यास करण्यांत आसक्त झालेले आहांत. हाच अभिप्राय खालीं दिलेल्या श्लोकांत वर्णन केलेला आहे.

### श्रीदत्तात्रेय उवाच

सर्वभूतगतो वायुर्यथा सर्वस्य चेष्टकः ।
सोऽपि संचालने व्योम्नो नैव शक्नोति सर्वथा ।। २१ ।।

सर्वावयवशून्यत्वात् कारणत्वाद्यथाम्बरम् ।
न चलत्यनिलाघातात्तथाऽहं चात्ममायया ।। २२ ।।

कारणत्वान्निर्गुणत्वान्निर्विकारो निरामयः ।
सर्वत्रावस्थितो देहे सर्वसंस्पर्शवर्जितः ।। २३ ।।

अबाध्यः सर्वभूतात्मा मायाधारो निराश्रयः ।
नित्यानंदमयं ब्रह्म सर्वसंगविवर्जितम् ।। २४ ।।

नैवोत्पत्तौ समुत्पन्नः स्थितौ च न स्थितः कदा ।
न चैव प्रलयो नाशः सत्यरूपस्य मे सदा ॥ २५ ॥

ब्रह्मैवाहं परं सत्यं शुद्धमद्वयमक्षरम् ।
सर्वशून्यमशून्यं च मायया‍ऽनावृतं सदा ॥ २६ ॥

ईश्वरत्वमसद्यत्र सिद्धानां तत्र का कथा ।
विफलाभ्याससंसक्ता भवंतः काममोहिताः ॥ २७ ॥

दत्तात्रेय पुन्हां म्हणाले, कामामुळेंच मनामध्यें क्रोधाचा संचार होतो. क्रोधानें स्मरणांचा गोंधळ होतो. मति दिङमूढ होते. स्मृतिभ्रंश झाला कीं, अन्याय्य व दुःखप्रद अशीं कर्मे घडूं लागतात. ज्या कर्मांमुळें जीवाला नरकप्राय यातना भोगाव्या लागतात त्याचप्रमाणें या सिद्धीदेखील अंतीं नरकतुल्य दुःखेंच. सिद्धींच्या नादीं जो लागला त्याला कधीं माझी प्राप्ति होत नाहीं. त्याला कधीं सुखहि मिळत नाहीं व उत्तम गतीहि मिळत नाहीं. यावर सिद्धजन म्हणाले, ' हे देवदेवा, रमापते सद्‌गुरो ! तुम्ही आमचें रक्षण करा. खरोखर आम्ही अत्यंत मूढ आहों. तुमचें यथार्थ स्वरूप जाणण्याला असमर्थ आहों. तुमचें माहात्म्य आमच्या बुद्धीला आकलन होत नाहीं.

शत्रुः कामो मनुष्याणामज्ञामल्पमेधसाम् ।
इति ज्ञातं यथार्थत्वं त्वत्प्रसादात् सुवाक्यतः ॥ ३४ ॥

आपण म्हणालांत तें अगदीं बरोबर आहे. काम हा मनुष्याचा मोठा शत्रु आहे. मानव हा त्याच्यापुढें हतबल व निर्बुद्ध होतो, हें आम्ही तुमच्या कृपेनें तुम्हीं केलेल्या उपदेशावरून बरोबर लक्षांत घेतलें. हे जगन्नाथा सद्‌गुरो, तुम्ही आम्हांला या कामरूपी बंधनांतून सोडवावें. आम्हांला ज्याच्या योगानें खात्रीनें मुक्त होतां येईल व आम्ही पूर्ण सुखी होऊं असा उपाय सांगा.

यावर ज्ञानसागर दत्तात्रेय म्हणाले, "तुम्ही माझीच मन लावून आराधना करावी, मीं पूर्वी सांगितलेल्या पद्धतीनें सिद्धराजागमाचा अवलंब करून माझ्या मंत्रमय स्वरूपाची उपासना करावी. त्याचप्रमाणें मीं सांगितलेल्या ज्ञानमार्गांतील साधनांचा व तत्त्वज्ञानाचा वरचेवर सदाचारपूर्वक विचार करावा.

फलसंगपरित्यागात् कामक्रोधादि वर्जनात् ।
मद्‌भक्त्या मत्पदप्राप्तिर्न युक्त्यैवेति निश्चितम् ॥ ३७ ॥

केवळ युक्तीनें म्हणजे तर्कानेंच तुम्हांला माझी प्राप्ति होणार नाहीं तर तुम्हांला फलाची आसक्ति सोडून आणि कामक्रोधादि सर्व विकार जिंकून अनन्यचित्तानें माझी भक्ति करावी लागेल. याच साधनानें तुम्हांला माझ्या पदाची प्राप्ति होईल; दुसरा उपाय नाहीं. हा श्रीज्ञानसागर दत्तात्रेयांचा उपदेश श्रवण करून ते सर्व सिद्धजन याच मार्गानें गेले व कृतार्थ झाले. फाल्गुन शुद्ध दशमीच्या दिवशीं, सूर्योदयाच्या वेळीं

श्रीज्ञानसागर दत्तात्रेय यांचें यथाविधि पूजन करून खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं तीन अर्घ्यं द्यावेत.

## अर्घ्यदानाचे मंत्र

सर्वत्राज्ञाननाशाय ज्ञानदीपाय चात्मने ।
सच्चिदानंदबोधाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

भेदत्रयविनाशाय मोक्षबीजाय चात्मने ।
ज्ञानप्रियाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

भक्तारिष्टविनाशाय विज्ञानसागराय च ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

सर्वांच्या अंतःकरणांतील अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणारे आणि ज्ञानदीपस्वरूप असलेले तसेच सर्वात्मस्वरूप आणि सच्चिदानंदस्वरूप असलेले ज्ञानसागर भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी पूजाप्रसंगीं अर्घ्यदान करीत आहें.

जो परमात्मा निरवयव असल्यामुळें स्वगत भेदरहित आहे त्याच्यासारखा दुसरा कोणी नसल्यामुळें ज्याच्या ठिकाणीं सजातीय भेद नाहीं; त्याचप्रमाणे त्याच्यासारखें या जगांत दुसरें कोणीच नसल्यामुळें व तत्त्वतः त्याच्याहून भिन्न असें दुसरें कांहींच नसल्यामुळें त्याच्या ठिकाणीं भेदाचा लेशहि येऊं शकत नाहीं; अथवा ज्याच्या साक्षात्कारानें दृश्य, द्रष्टा आणि दर्शन इत्यादि त्रिपुटिस्वरूपाचा भेद मावळतो आणि जो ज्ञानप्रिय आहे अशा त्या ज्ञानसागर दत्तात्रेय यांना मी पूजांगभूत अर्घ्य समर्पण करीत आहें.

जो भक्तांचीं सर्व अरिष्टें दूर करतो आणि स्वतः विज्ञानांचा सागर आहे अशा त्या गुरुदेव दत्तात्रेयाला मी पूजाकर्मांगभूत अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्य दिल्यानंतर नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प करून श्रीज्ञानराज दत्तात्रेय यांच्या जयघोषांत हा उत्सव यथाशक्ति साजरा करावा. यथाशक्ति छोटें मोठें मंदिर बांधून तें दत्तात्रेयाला अर्पण करावें. ॐ तत्सत् ।

## नववा अवतार विश्वंभरावधूत श्रीदत्तात्रेय

श्रीअत्रिनंदन भगवान् दत्तात्रेय यांनीं भक्तजनांच्या कल्याणासाठीं श्रीविश्वंभरावधूत या नांवाचा नववा अवतार धारण केला. मागील अवतारांत बदरिकाश्रमीं राहून खडतर तपश्चर्येनें सिद्धिसंपन्न झालेल्या भक्तजनांवर अनुग्रह करण्याकरितां ज्ञानसागर रूपानें प्रकट होऊन त्यांच्या अहंकाराचा परिहार केला व सदुपदेशानें त्यांच्या अज्ञानरूपी तिमिराचा नाश करून त्यांना सदाचाराचें वळण लावलें. यानंतर बराच काळ निघून गेल्यावर दत्तात्रेय यांना त्यांचें स्मरण झालें. ते सर्व सिद्धजन माझ्या उपदेशाप्रमाणें वागून उत्तम गति प्राप्त करून घेण्याच्या स्थितींत आले आहेत कीं,

नाहींत हें पाहण्याची दयासागर दत्तात्रेय यांना इच्छा झाली. सद्‌गुरु हे केवळ उपदेश करूनच थांबत नसतात; तर आपण केलेल्या उपदेशाप्रमाणें वागून साधक हे उत्तम गतीच्या दिशेनें उत्तरोत्तर प्रगमनशील वाटचाल करीत आहेत कीं नाहींत हें परीक्षून पाहण्यासाठीं भक्तजनांना वारंवार भेटी देतात व त्या भेटींतून पुनःपुन्हां सदुपदेशाचा लाभ देऊन साधकाला ते कृतार्थ करण्याचा प्रयत्न करीत असतात. दयानिधि भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं बदरिकाश्रमांतील सिद्धजनांची परीक्षा घेण्याचें ठरविलें. सिद्धराज भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं एक विचित्र वेष धारण केला. त्यांनीं आपलें मंगलमय व नयनमनोहर असलेलें सुंदर रूप झांकून टाकलें आणि अमंगल व कर्मभ्रष्ट अशा म्लेंच्छ रूपानें बदरिकाश्रमांत ते प्रकट झाले. भिल्लासारखी अंगकांति, कांहींसा राकट चेहरा, डोक्यावर भुरके केंस, कमरेभोंवतीं मळकट वस्त्र गुंडाळलेलें, गळ्यांत काळा दोरा, हातांत वाकडी तिकडी काठी, बरोबर काळा कुत्रा अशा थाटांत दत्तात्रेय यांची स्वारी सिद्धांच्या आश्रमांत येऊन उभी राहिली. निर्मळ ब्रह्म पण भक्तजनांची परीक्षा पाहण्याकरितां मळकट रूपानें अवतरलें. या सर्व भक्तांना पूर्वीं आपण मंत्रानुष्ठानाचा मार्ग दाखविला होता. मंत्रानुष्ठानानें चित्ताची शुद्धि होते, इंद्रियें अंतर्मुख होतात, मनाची एकाग्रता होते. मन परमात्मस्वरूपीं विलीन होण्याचा मंत्रानुष्ठानयोग हा एक प्रभावी मार्ग आहे. मात्र या योगाचें निरलसपणें सातत्यानें अनुष्ठान होणें हें अत्यंत आवश्यक असतें. प्रमादविरहित मंत्रजपाची विधिपूर्वक नित्य क्रिया साधकाच्या हातून व्हावी लागते.

ततो बहुतिथे काले मंत्रानुष्ठानकारिणाम् ।
तेषामेवात्मभक्तानां क्रियाः सम्यक्परीक्षितुम् ।। १ ।।

तत्पूर्वरूपमाच्छाद्य मलीमसमिवाऽक्रियम् ।
अब्रह्मरूपमपरमवधूतं व्यधारयत् ।। २ ।।

बदरिकाश्रमांतील आपल्या भक्तांच्या हातून हीं सर्व अनुष्ठानें व्यवस्थित रीतीनें पार पडत आहेत कीं नाहींत हें पाहण्यासाठीं मंगलमय अवधूत अमंगल रूपानें अवतरले तरी त्यांचें तें रूप अवधूत म्हणजे शुद्धच होतें. अहंकारानें, अज्ञानानें व मोहानें ग्रासलेल्या त्या सिद्ध भक्तांना हें कसें कळणार ? म्लेंच्छरूपानें अवतरलेल्या दत्तात्रेय यांनीं मात्र सर्व सिद्धांचें सूक्ष्म निरीक्षण केलें, आणि त्या सिद्धांच्या समाजांत ध्यानमुद्रेनें ते शांतपणें एका बाजूला बसले. त्या वेळेला कांहीं लोक चित्ताचा स्वस्वरूपीं लय करून बसलेले होते, तर कांहीं चंचल चित्तानें थट्टामस्करी करीत बसलेले होते. कांहीं एकमेकांवर संतापलेले होते, तर कांहीं दुःखित, उद्विग्न व कष्टी होऊन संत्रस्त झालेले दिसत होते. कांहीं ग्राम्य गोष्टींच्या चर्चेत दंग झालेले होते, तर कांहीं लोकांना कामक्रोधादिविकारांनीं ग्रासून टाकलेलें होतें. कांहीं लोक पूर्वीं अभ्यासिलेल्या ध्यानयोगाच्या बळावर ध्यानसमाधीमध्ये निमग्न होऊन बसलेले होते. कांहीं परस्परविरुद्ध अशा

विचारांच्या लाटांचे आघात खाऊन संशयसागरामध्यें गटांगळ्या खात होते. दयानिधि भगवान् दत्तात्रेयांनीं हा सर्व प्रकार पाहिला. त्यांचें मन कृपेनें कळवळलें. त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठीं दत्तात्रेयांनीं त्या सर्वांचीं मनें आपल्याकडे वळवून घेतलीं. तेव्हां ते सर्व सिद्ध महात्मे आपापलीं कर्मं सोडून देऊन निश्चलपणानें व एकटक दृष्टीनें दत्तात्रेय यांच्याकडे पहातच बसले. दत्तात्रेय पूर्वीप्रमाणें पुन्हां आपल्याला सोडून देतील काय अशा भीतीनें त्यांचीं मनें घाबरून गेलेलीं होतीं. दत्तात्रेय बसले कीं ते बसत असत व दत्तात्रेय उठले कीं तेहि पण उठून उभे रहात असत. दत्तात्रेय थांबले कीं तेहि थांबत होते व दत्तात्रेय पळूं लागले कीं तेहि पळत असत. अशा रीतीनें छायेप्रमाणें ते दत्तात्रेयांचें अनुकरण करूं लागले. दत्तात्रेयप्रभूंनीं त्या सर्वांच्या बुद्धींना आपल्याकडे खेंचून घेतलें व कांहीं क्षणांनीं त्या सर्वांच्या चित्तवृत्तींना मोकळेंहि करून टाकलें. तेव्हां त्या सर्वांनीं, 'हा आपलीं मनें हिरावून घेत आहे व आपल्या मनाला भुरळ पाडीत आहे', असें समजून दत्तात्रेयांचा छळवाद करण्याला आरंभ केला. त्या सर्व सिद्धांनीं दत्तात्रेयांना विचारलें कीं, 'तुम्ही कोण आहां ?' यावर दत्तात्रेयांनीं मागील अवताराप्रमाणेंच उत्तरें देण्यास प्रारंभ केला, "अहो, माझ्या स्वरूपाची खरी प्रतीति कोणाला येऊंच शकत नाहीं. मी कोण आहें व कसा आहें हें कोणालाच कळूं शकणार नाहीं." दत्तात्रेयांचें हें उत्तर ऐकून सिद्धलोक आपापसांत म्हणूं लागले कीं, अहो हा पूर्वीच आपल्याला दर्शन देणारा व उपदेश करणारा दत्तात्रेय तर नसेल ना ? यावर कांहीं सिद्धलोक भानावर येऊन म्हणाले कीं, "अहो, खरोखर हाच तो सिद्धराज ज्ञानसागर भगवान् श्रीदत्तात्रेयच आहे." असा निश्चय करून त्या सर्वांनीं दत्तात्रेय यांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला. दत्तात्रेय यांचा जयजयकार करून हात जोडून नम्रपणानें ते दत्तात्रेयांच्या पुढें उभे राहिले व म्हणाले –

हे दत्त करुणामूर्ते गुरो संदेहनाशन ।
कृपया पाहि देवेश शरणागत वत्सल ।। १६ ।।

हे दत्तात्रेया सद्‌गुरो ! आपण प्रत्यक्ष करुणामूर्तीच आहां. आपण आमच्या अंतःकरणांतील सर्व संशय दूर करण्याला समर्थ आहां. आम्ही तुमच्या चरणीं अनन्य भावानें शरण आलेलों आहोंत. हे देवेशा ! तूं शरण आलेल्यावर दया करणारा आहेस. आमच्यावर कृपा करून तूं आमचें संरक्षण कर. हे प्रभो ! तुम्हीं आम्हांला मंत्रयोगाचा उपदेश केला; पण तो आम्हांला यथासांग आचरितां येत नाहीं. आमचें चित्त अत्यंत विक्षिप्त म्हणजे चंचल असल्यामुळें तुम्हीं सांगितलेला मंत्रयोग आमच्या चित्तामध्यें नीट ठसत नाहीं व त्याचें यथासांग अनुष्ठान आमच्या हातून घडत नाहीं.

गुणतश्चञ्चलं चित्तं तद्धावति पिशाचवत् ।
देहे बद्धासने बद्धे मुद्रामालापरिग्रहात् ।। १८ ।।

योगेनानेन सा सिद्धिर्भविष्यति कथं पुनः ।
अतस्त्रायस्व योगेश योगाभ्यासेऽति दुर्बलान् ।। १९ ।।

हे परमेश्वरा ! आमचें चित्त स्वभावतःच चंचल आहे. तशांतच त्यामध्यें रजोगुण अधिक वाढल्यामुळें तें मन अधिकच चंचल झालें आहे. त्यांतहि तमोगुणाची त्याला साथ मिळत असल्यामुळें तें मोहानेंहि व्यापून गेलेलें आहे. तें पिशाचाप्रमाणें सैरावैरा इकडे तिकडे धांवत सुटलें. देह हा बद्धासनावर स्थिर करून व मुद्रा आणि माला धारण करून तें चित्त स्थिर कसें करावें हें आम्हांला कळत नाहीं. तरी कृपा करून आम्हांला चित्त स्थिर करण्याचा उपाय सांगा. आम्ही सांगोपांग योगाचें अनुष्ठान करण्याला असमर्थ आहोंत.

तच्छ्रुत्वा वचनं तेषां दत्तात्रेयः कृपांबुधिः
चैत्रे शुक्ले पौर्णिमायां चित्रर्क्षे भौमवासरे ।। २० ।।
द्वितीययामे प्रथमे प्रहरे प्रादुरास सः । – श्लो. २१ पूर्वार्ध.

त्यांचें तें भाषण ऐकून दयानिधि दत्तात्रेय यांनीं आपलें पूर्वरूप सोडून दिलें व मंगलमय विश्वरूपानें ते सर्व सिद्धजनांच्या पुढें प्रकट झाले. याच अवताराला विश्वंभरावधूत असें म्हणतात. दत्तात्रेयप्रभूंचा हा अवतार चैत्र मासांतील शुक्ल पक्षांत, पौर्णिमेच्या दिवशीं चित्रा नक्षत्रावर, दुसऱ्या प्रहरांतील पहिल्याच मुहूर्तावर झाला. त्या दिवशीं मंगळवार होता. अशा या शुभमुहूर्तावर दत्तात्रेयांनीं नववा अवतार धारण केला. दत्तात्रेयांचें हें रूप सर्व लोकांच्या परिचयांत असलेल्या श्लोकानें वर्णन करावयाचें झाल्यास त्या रूपाकडे पाहून असेंच म्हणावें लागेल कीं –

नमोस्त्वनन्ताय सहस्र-मूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।
सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ।।

दत्तात्रेयांच्या त्या रूपांत अनेक वर्णांच्या छटा व्यक्त झालेल्या होत्या. त्याचप्रमाणें त्या रूपांत अनेक पावलें विराजत होतीं. हजारों उदरें आणि हजारों करकमलें दृग्गोचर होत होतीं. तसेंच मुखकमलेंहि हजारों दिसत होतीं. नेत्र म्हणजे डोळे, श्रोत्र म्हणजे कान आणि ग्रीवा म्हणजे कंठ हे अनंत संख्येनें दिसत असून तें रूप दिव्य ज्योतिर्मय असेंच सर्वांच्या प्रत्ययाला येत होतें. जणूं कांहीं या विश्वरूपानें दर्शन देऊन श्रीदत्तात्रेय यांनीं मीच सर्व विश्वाच्या उत्पत्तीचें, स्थितीचें व लयाचेंहि अधिष्ठान आहे ही गोष्ट सर्वांच्या प्रत्ययास आणून दिली. श्रीदत्तात्रेय सर्व सिद्धांना उद्देशून म्हणाले, ' हे सिद्धजनहो ! मी निर्गुण आहें, निराकार आहें, निर्विकार आहें, निरवयव आहें. मी सर्वव्यापी आहें. त्याचप्रमाणें मी मायेचा आश्रय असून अनंतकोटि ब्रह्मांडांत चालत असलेल्या सर्व घडामोडींचा साक्षी म्हणजे द्रष्टा आहें. मी सर्व गुणांचा द्रष्टा असून सर्व गुणांच्या रूपानेंहि प्रकट होत असतों. त्याचप्रमाणें मी स्वभावतः सर्वसंग-

वर्जित असल्यामुळें माझ्या ठिकाणीं कोणत्याहि क्रियेच्या लेशाचा स्पर्शहि होऊं शकत नाहीं. मी सर्वाभास म्हणजे सर्व जगाला प्रकाशित करीत असूनहि स्वतः निराभास म्हणजे चंद्रसूर्य आदि कोणाच्याहि प्रकाशानें प्रकाशित होणारा नाहीं. त्याचप्रमाणें मी सर्व मंत्रस्वरूप आहें. मी स्वभावतःच सर्वांपासून अलिप्त आहें. मग कोणत्याहि क्रियेचा मला लेप काय लागणार ?

हे सिद्धजनहो, तुम्ही माझेंच निरंतर स्मरण करा. माझ्याच निरंतर स्मरणानें तुम्हांला उत्तम गति मिळेल व मुक्तीहि मिळेल. माझ्याच सतत स्मरणानें तुम्हांला आत्मस्वरूपाचा साक्षात्कारहि होईल यांत तिळमात्रहि संशय नाहीं. भक्तजनहो, प्रेमानें आणि दृढनिश्चयानें तुम्ही माझेंच सतत स्मरण करा. सर्व भक्तांना निर्वाणयोगाचा म्हणजेच पूर्ण सुखाचा लाभ होण्याकरितां मंत्रराजस्वरूप असलेल्या अथवा मंत्रबीजाक्षरस्वरूप असलेल्या माझें जो अनन्य चित्तानें चिंतन करील अर्थात् "द्रां दत्तात्रेयाय नमः" या मंत्रानें अथवा केवल 'द्रां' या एका बीजाक्षर मंत्रानें जो माझें अत्यंत आवडीनें चिंतन करील तो सर्व दुःखांतून मुक्त होऊन पूर्ण सुखी होईल. याप्रमाणें दत्तात्रेयप्रभूंनीं आपल्या भक्तांना भक्तिमार्गाचा उपदेश केला. हाच अभिप्राय खालीं दिलेल्या श्लोकांत वर्णिलेला आहे.

निर्गुणोऽहं निराकारः सर्वव्यापी निरंजनः ।
नित्यानंदमयब्रह्मस्वभावाद् गुणवर्जितः ।। २४ ।।

अहं मायाश्रयः साक्षी गुणद्रष्टा गुणात्मकः ।
सर्वसंगविहीनात्मस्वभावात्तत्र का क्रिया ।। २५।।

सर्वाभासे निराभासः सर्वमंत्रमयः सदा ।
स्वभावात्सर्वनिर्मुक्तः क्रियाभिस्तत्र किं पुनः ।। २६ ।।

ममानुस्मरणान्मुक्तिर्ममानुस्मरणाद्गतिः ।
ममानुस्मरणाज्ज्ञानं भविष्यति न संशयः ।। २७ ।।

मंत्रराजं तु मां ध्यात्वा मंत्रबीजाक्षरात्मकं ।
यः करोति ममासक्त्या स्मरणं स सुखी नरः ।। २९ ।।

दत्तप्रभूंनीं उपदेश केल्यानंतर तें आपलें मंगलमय विश्वरूप पाहतां पाहतां झांकून टाकलें व क्षणभर पूर्वरूप प्रकट करून ते अंतर्धान पावले.

## अर्घ्यदानाचे श्लोक

विश्वंभराय देवाय भक्तप्रियकराय च ।
भक्तप्रियाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

सर्वज्ञानविनाशाय द्वंद्वतापहराय च ।
योगश्रमविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

नामप्रियाय देवाय योगसंस्थापकाय च ।
सर्वोत्तमाय सिद्धाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

वर सांगितलेल्या सुमुहूर्तावर विश्वंभरावधूत दत्तात्रेय यांचें शास्त्रोक्त विधीनें यथासांग पूजन करून वर सांगितलेल्या तीन श्लोकांनीं क्रमशः एक एक असे तीन अर्घ्यं द्यावेत. भक्तजनांना प्रिय असलेले भगवान् विश्वंभर अवधूत दत्तदेव यांना मी पूजाकर्म-निमित्तानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

भगवान् दत्तात्रेय हे भक्तजनांचें सर्व अज्ञान नाहींसें करून शीत-उष्ण, सुख-दुःख, मान-अवमान, यश-अपयश, आणि जय-पराजय इत्यादि सर्व प्रकारच्या द्वंद्वजनित तापांचेंहि हरण करणारे आहेत. त्याचप्रमाणें ते, भक्त योगाभ्यास करीत असतांना भक्तजनांना होणाऱ्या परिश्रमाचेंहि अपहरण करीत असतात. अशा त्या विश्वंभर अवधूतांना मी पूजाकर्मांगभूत अर्घ्यप्रदान करीत आहें.

दत्त दत्त दत्त असें आपलें सतत नाम घेत राहणें हें दत्तात्रेय यांना अत्यंत प्रिय आहे. भक्तजनांच्या कल्याणासाठीं योगिराज दत्तदेव यांनीं योगविद्येची प्रतिष्ठा-पनाहि केलेली आहे. ते स्वतः सर्वोत्तम आणि सिद्धपुरुष आहेत. त्या दत्तदेवाला मी या पूजेच्या निमित्तानें अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन अर्घ्य देऊन गोप्रदान करावें. नंतर नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प करून दत्तात्रेय प्रभूंचा जयजयकार करावा. शेवटीं, सर्वांना तीर्थप्रसाद देऊन हा जयंती-महोत्सव साजरा करावा. ॐ तत्सत् ।

## दहावा अवतार मायामुक्तावधूत

भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा दहावा अवतार मायामुक्तावधूत या नांवानें ओळखला जातो. सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय एकदां आपल्या भक्तांची परीक्षा पाहण्याकरितां वैशाख शुद्ध चतुर्दशीच्या दिवशीं एका भक्त ब्राह्मणाच्या घरीं भिक्षु-रूपानें अवतरले. त्या दिवशीं बुधवार होता आणि स्वाति नांवाचें नक्षत्र होतें. श्रीदत्तात्रेय प्रकट झाले तो काळ मध्यान्हाचा होता. अशा शुभ काळीं त्रैलोक्यपावन भगवान् दत्तात्रेय भक्तांच्या घरीं अवतरले.

माधवस्य चतुर्दश्यां शुक्लायां बुधवासरे ।
स्वात्यृक्षयुक्ते माध्यान्हे व्यक्तः स लोकपावन ।। २ ।।

दत्तात्रेयप्रभूंचा हा अवतार भक्तांच्या अंतःकरणांतील प्रेम, श्रद्धा आणि दृढनिश्चय पाहण्याकरितांच होता. वर सांगितलेल्या शुभ दिनीं एका शील नांवाच्या सदाचारसंपन्न बुद्धिमान् ब्राह्मणाच्या घरीं श्राद्धकर्म चालू होतें. त्याच वेळीं भगवान् दत्तात्रेय हे भिक्षुरूपानें अचानक प्रकट झाले. ते वैराग्यासारखे दिसत होते. अंगकांति शुद्ध सोन्यासारखी देदीप्यमान होती. हत्तीच्या सोंडेप्रमाणें त्यांचे दोन्ही हात गुडघ्याला

स्पर्श करतील इतके ते दीर्घ असल्याचे दिसत होते. मूर्ति अत्यंत सुंदर होती. अंगीं तारुण्य मुसमुसलेलें होतें. कटिभागीं कौपीन अर्थात लंगोटी शोभत होती. पृष्ठभाग छाटीनें आच्छादिलेला होता. त्यांनीं डाव्या हातामध्यें भिक्षापात्र व उजव्या हातामध्यें दंड धारण केलेला होता. गळचांत रुद्राक्षांची टपोरी माळ शोभत होती. त्यांचे नेत्र कमलदलाप्रमाणें किंचित् आरक्त, विशाल, तेजस्वी आणि पाणीदार दिसत होते. त्यांचा भालप्रदेश भव्य असून मस्तकावर जटाभार विलसत होता. त्यांनीं आपल्या शरीराला शुद्ध चंदनानें मिश्रित असें भस्म र्चाचलेलें होतें. पाठीमागून तरुण काळा कुत्राहि त्यांच्याबरोबर येत असलेला दिसत होता. अशी ती प्रभूंची दिव्य मूर्ति ब्राह्मणांचीं पानें मांडलेलीं होतीं त्या ठिकाणीं येऊन अकस्मात् उभी रहिली. त्या अवधूताला पाहून ते सर्व निष्ठुर ब्राह्मण संतापले व त्या बैराग्याचा धिक्कार करीत कठोर शब्दानें त्याला विचारूं लागले, "तूं कोण आहेस? धिक्कार असो तुझा" इत्यादि.

यावर दत्तात्रेय म्हणाले, "मी अप्रतीत अस्वरूप आहें. अनंत नामांनीं व अनंत रूपांनीं नटलेला विश्वव्यापी अवधूत आहें." त्याचें तें उत्तर ऐकून तो शील ब्राह्मण मनामध्यें समजला कीं, अहो हा पूर्वीचाच सिद्धराज अथवा ज्ञानसागर नाहीं ना? त्याची ती मुद्रा व हालचाल पाहून तोच हा असावा असें त्या शील ब्राह्मणाला वाटूं लागलें. आपला संशय दूर करण्याकरितां त्यानें त्या बैराग्यास पुन्हां विचारलें, 'तुझा आश्रय कोण ? तुझा स्वामी कोण ? तुझा संप्रदाय आणि उपासना कोणती ?' इत्यादि. यावर ते दिगंबर अवधूत म्हणाले, 'माझा आश्रय कोणीच नाहीं. मीच सर्वांचा आश्रय आहें. माझा स्वामी कोणीच नाहीं. मीच त्रैलोक्याचा स्वामी आहें.' त्याचीं तीं उत्तरें ऐकून शील ब्राह्मणानें हे तर आपले गुरूच आहेत असें त्यांना ओळखलें व त्यांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला. हात जोडून आसनावर बसविलें. अर्घ्यपाद्यादि पूजोपचारांनीं त्यांची भक्तिपूर्वक पूजा, स्तुति व नमस्कारहि केला. श्राद्धाकरितां शिजविलेलें अन्न त्या अवधूताला वाढून त्यास तृप्तहि केलें. याप्रमाणें धूप, दीप, नैवेद्य व तांबूल इत्यादि सर्वोपचारांनीं त्या भिक्षुवेषधारी अवधूताचा आदरपूर्वक पूर्ण सत्कार केला. या दोघांचें तें आचरण पाहून अभिश्रवणासह श्राद्धासाठीं निमंत्रिलेले सर्व ब्राह्मण फारच खवळले. त्या ब्राह्मणांनीं फारच कोलाहल करून "अब्रह्मण्यम् अब्रह्मण्यम्" असें म्हणत घराच्या बाहेर पळ काढला. ब्राह्मणांचा तो गोंधळ पाहून गांवांतील इतरहि ब्राह्मण एकत्र मिळून शील ब्राह्मणाच्या घरांत शिरले आणि सर्वांनीं मिळून खूपच गोंधळ माजविला. 'हे दुष्टा, तूं वर्णहीन आहेस. येथें कसा आलास? हा भ्रष्टाचार करण्यांत तुला काय मोठेपणा वाटत आहे ?"

भिक्षुवेषधारी अवधूत म्हणाले, "हे ब्राह्मणांनो ! ब्रह्म म्हणजे काय ? कर्म म्हणजे काय हें मला कांहीं कळत नाहीं. तें तुम्हींच मला समजावून सांगा. मला तें कांहीं कळत नाहीं. मी फक्त आत्मस्वरूपालाच ओळखतों." ते ब्राह्मण म्हणाले,

"ॐ एक अक्षर परब्रह्मस्वरूप आहे. तेंच वेदरूपानें विस्तारलेलें आहे. त्याच वेदानें संध्या, वैश्वदेव व श्राद्ध इत्यादि सर्व कर्में करावयाचीं सांगितलेलीं असतात. या नित्यनैमित्तिक कर्मांना ब्रह्मकर्म असें म्हणतात." यावर अवधूत म्हणाले, "मला वेद माहीत नाहींत. त्या वेदांनीं पूर्वीं काय सांगितलें आहे हेंहि मला माहीत नाहीं. तें तुम्हीच मला सांगोपांग विवेचन करून सांगा. ब्राह्मण म्हणाले, "वेद हा तत्त्वतः एक असून तो चार प्रकारांनीं विभागला गेला आहे. तूं कर्मभ्रष्ट व धर्मभ्रष्ट असल्यामुळें तुला वेदांचें श्रवण करण्यास अधिकार नाहीं. वर्णाश्रमविरहित स्वच्छंदपणें वाटेल तसा वागणारा तूं. तुला आम्ही वेदांतील नित्यनैमित्तिक कर्मांचें विवेचन कसें करून सांगणार?" यावर भिक्षुवेषधारी भगवान् म्हणाले, "मला वेदांचा अधिकार नाहीं. मी सर्वकाळ मायामुक्त असल्यामुळें मला कोणत्याहि प्रकारचें विधिनिषेधाचें बंधन नाहीं. वेद आणि वेदांत सांगितलेलीं सर्व कर्में त्रिगुणात्मक आहेत. मी त्यांना स्पर्शहि करीत नाहीं. ही सर्व सृष्टि त्रिगुणात्मक आहे. ही त्रिगुणात्मक सृष्टीच माझ्या पाठोपाठ कुत्र्याच्या रूपानें आलेली आहे. हा कुत्रा मायामय असल्यामुळें काळा आहे. मी आत्मसाक्षात्कारी असल्यामुळें या मायारूप कुत्र्याला स्पर्शहि करीत नाहीं.

चतुर्वेदधरश्चायं सर्वकर्मविशारदः ।
वेदव्याख्यानविद्वक्ता स तानिह वदिष्यति ॥ २६ ॥

हा माझ्याबरोबर येणारा कुत्रा चारी वेद मुखानें घडाघडा पाठ म्हणतो. वेदांत प्रतिपादिलेलीं जीं नित्यनैमित्यिक कर्में त्यांमध्ये तो पारंगत आहे. तो सर्व शास्त्रांत निष्णात आहे. तुम्ही त्याला विचारा. तोच तुमचें समाधान करील." असें म्हणून दत्तात्रेय यांनीं त्या कुत्र्याला सर्व वेद क्रमानें म्हणावयास सांगितले. दत्तात्रेय यांची ही आज्ञा ऐकल्याबरोबर त्या कुत्र्यानें वेद, वेदांगें आणि सूत्रें यांचें उच्च स्वरानें पठण करण्यास आरंभ केला. एखाद्या पट्टीच्या वैदिकाप्रमाणें तो कुत्रा घडाघडा वेद म्हणत असल्याचें पाहून तो सर्व ब्राह्मणसमाज आश्चर्यचकित झाला. धर्मशास्त्र, व्याकरण-शास्त्र, षड्दर्शनें यांवरहि त्या कुत्र्यानें व्याख्यान देण्यास आरंभ केला. दत्तात्रेय-प्रभूंनीं पितृलोकांत गेलेल्या त्या शील ब्राह्मणाच्या पितरांस पितृलोकांतून भूलोकांत आणलें. आणि सर्व लोकांच्या समक्ष त्या शील ब्राह्मणाच्या पितरांस स्वस्वरूपांत समाविष्ट करून घेतलें. ही कथा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं रेड्याच्या मुखांतून वेद वदविल्याच्या प्रसंगाची आठवण करून देत आहे. दत्तात्रेय यांची अद्‌भुत शक्ति ब्राह्मणांच्या दृष्टीस पडली व सर्व ब्राह्मणांच्या गर्वाचा पूर्णपणें परिहार झाला. त्या-नंतर दत्तात्रेयप्रभूंनीं त्या शील ब्राह्मणासह सर्व ब्राह्मणांना आपल्या संप्रदायाची दीक्षा देऊन तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. सर्वांना अत्यंत आनंद झाला. त्यांनीं दत्तात्रेय यांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात करून नम्र प्रार्थना केली, 'हे प्रभो, असाच आम्हांला वरचेवर उपदेश करून तुम्ही आमच्यावर अनुग्रह करावा.'

देवदेव जगन्नाथ सर्वज्ञ परमेश्वर ।
देहि देहि तदस्माकं ज्ञानं दुःखविनाशनम् ।। ३२ ।।

अस्माकं भवकीटानां कोऽन्यस्त्राता विना त्वया ।
त्रायस्व नः पुनः पाहि महात्मन् पुरुषेश्वर ।। ३३ ।।

हे देवदेवा जगन्नाथा, सर्वज्ञा, परमेश्वरा ! ज्या योगानें सर्व दुःखांचा नाश होईल असें ज्ञान तुम्हीं आम्हांला द्यावें हीच आमची वारंवार प्रार्थना आहे. परमेश्वरा, आम्ही या संसारांतील क्षुद्र कीटक आहोंत. तुमच्यावांचून दुसरें कोण बरें आमचें संरक्षण करणार ? हे महात्मन्, आमचें रक्षण करा.

अस्माकं सकुटुंबानां क्षेमं देह्यविचंचलम् ।
यशः प्रज्ञां धनं देहि स्थानं देहि सुखात्मकम् ।। ३४ ।।

आमच्या कौटुंबिक परिवारासह तुम्हीं आमचें चिरंतन कल्याण करावें. तुम्हीं आम्हांला यश द्यावें, उत्तम बुद्धि द्यावी. तसेंच धन आणि रहावयास उत्तम स्थानहि द्यावें; त्याचप्रमाणें आयुष्य आणि आरोग्यहि द्यावें. तुम्हीं सदासर्वकाळ आमच्यावर प्रसन्न असावें. दत्तात्रेय हे सर्व कामना पूर्ण करतात असें पाहून या ब्राह्मणाबरोबर इतरहि बरेचसे ब्राह्मण आणि ग्रामस्थजन दत्तात्रेयांच्या पाठीमागें लागले. दत्तात्रेय यांनीं त्यांचा संग टाळण्याकरितां धूम ठोकली व ते एका घनदाट अरण्यांत शांतपणें जाऊन बसले. असें हें मायामुक्त दत्तात्रेय अवधूतांचें चरित्र आहे. यथासांग त्यांची पूजा करून जयंतीदिवशीं खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं त्यांना अर्घ्यप्रदान करावें.

## अर्घ्यदानाचे श्लोक

मायामुक्ताय शुद्धाय मायागुणहराय ते ।
शुद्धबुद्धात्मरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

सर्वावयवमुक्ताय सर्वमायाहराय ते ।
सर्वसंतापनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

शुद्धात्मज्ञानदीपाय भक्तारिष्टहराय ते ।
मायापाशविमुक्ताय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

हे परमेश्वरा, तुम्ही मायामुक्त आहां. शुद्ध म्हणजे निर्मळ आहां. तुम्ही नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त व आत्मस्वरूप आहां.

त्याचप्रमाणें आपण शुद्ध ज्ञानदीप आहां. भक्तांच्या अंतःकरणांत आत्मज्ञानाचा दीप प्रज्वलित करून अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करतां. आपण सर्व भक्तांचीं अरिष्टें म्हणजे असाध्य विघ्नें दूर करतां. सदासर्वकाळ मायेच्या पाशांतून आपण मुक्त आहां. तुम्हांला या पूजेच्या प्रसंगीं अर्घ्य अर्पण करीत आहें. प्रत्येक अर्घ्य-

प्रदानाच्या वेळीं 'मायामुक्तावधूताय नमः इदमर्घ्यं समर्पयामि' असें म्हणून वरील तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन अर्घ्य द्यावेत. नंतर दहींभाताचा व यथाशक्ति पक्वान्नांचा नैवेद्य समर्पण करावा. आरती व मंत्रपुष्प करून आणि सर्वांना प्रसाद वांटून दत्तात्रेय यांच्या जयजयकारांत हा उत्सव समाप्त करावा. ॐ तत्सत्.

## अकरावा अवतार श्रीमायायुक्तावधूत

भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा अकरावा अवतार मायायुक्तावधूत या नांवानें ओळखला जातो. मायायुक्त अवतारामध्यें आपआपल्या इच्छा पूर्ण करून घेण्याकरितां खूपच मोठा समाज दत्तात्रेयप्रभूंच्या पाठीमागें लागला असतां दत्तात्रेय प्रभु या समाजांतून निसटले व अत्यंत गहन अशा भयंकर अरण्यांत जाऊन ध्यानस्थ बसले. तें अरण्य वाघ, सिंह, अस्वल आणि तरस इत्यादि हिंस्र पशूंनीं व्यापलेलें होतें. तरीपण पुष्कळ लोक दत्तात्रेय यांचा मागोवा काढीत काढीत दत्तात्रेय यांच्या जवळ जाऊन पोहोंचले. तेव्हां दत्तात्रेय यांनीं आपल्या मायेनें त्यांना भयंकर श्वापदें दाखविलीं. मोठमोठे भयंकर भुजंग फूत्कार करीत इतस्ततः धांवत असल्याचें दिसून येत होतें. कोठें कोठें वणवा लागल्याचेंहि भयंकर दृश्य दृष्टीस पडत होतें. ही परिस्थिति पाहून दत्तप्रभूंच्या पाठीमागें लागलेले लोक अत्यंत घाबरले; पण त्यांनी आपल्या ऐहिक इष्ट कामना पूर्ण करून घेण्याच्या लोभानें दत्तात्रेय यांना सोडलें नाहीं. ते दत्तात्रेय यांच्या जवळच धरणें धरून बसल्याप्रमाणें बसले. शेवटीं त्यांच्या दृढ निश्चयाची परीक्षा पाहण्याकरितां दत्तात्रेय यांनीं मायायुक्त अवधूताचें रूप धारण केलें व त्याच रूपानें ते त्या ठिकाणीं प्रकट झाले.

ज्येष्ठशुक्ल त्रयोदश्यां भृगौ स्वात्यामिनोदये ।
प्रादुर्बभूव स विभुर्मायायुक्तावधूतकः ।। ३ ।।

हा मायायुक्त अवधूताचा अवतार ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीच्या दिवशीं झाला. त्या दिवशीं भृगु म्हणजे शुक्रवार होता. स्वाती नक्षत्रावर हा अवतार झाला. 'इनोदये' — संस्कृतमध्यें इन शब्दाचा अर्थ सूर्य असा आहे. हा अवतार झाला त्यावेळीं भगवान् सूर्यनारायण हे उदयाला येत होते. अशा मंगल दिनी, शुभ मुहूर्तावर श्रीदत्तात्रेय अवतरले.

शुद्धः श्यामो युवा ध्यानयोगस्थोऽङ्के स्वमायया ।
नारीमादाय कल्याणीमुपविष्टो ह्यभासत ।। ४ ।।

भगवान् दत्तात्रेय हे शुद्ध म्हणजे सर्व संसारधर्मांनीं रहित व त्रिगुणरहितहि असून अत्यंत टवटवीत, श्यामवर्णाचे दिसत होते. तसेच ते अत्यंत तरुणहि दिसत होते. ते त्या वेळीं ध्यानयोगामध्यें निमग्न होते. त्यांनीं त्या वेळीं आपल्या योगमायेनें वामांकावर अत्यंत सुंदर, तरुण व देखणी अशी एक उत्तम स्त्री धारण केलेली होती.

अशा थाटांत ती स्वारी जणूं कांहीं लक्ष्मीनारायणच प्रकट झाले आहेत असें सर्वांना वाटूं लागलें. सर्वांनीं त्यांना भक्तिपूर्वक प्रणाम केला. विषयवासनेनें मोहित झालेल्या त्या सर्वांनीं दत्तात्रेय यांच्या पुढें आपल्या संसारांतील उणिवा व्यक्त केल्या. कोणी पुत्र मागूं लागले तर कोणी पैसा मागूं लागले. कोणी कीर्ति मागूं लागले तर कोणी आरोग्य आणि आयुष्य मागूं लागले. अशा रीतीनें जो तो आपल्या मनांतील सांसारिक विषयकामनाच प्रकट करूं लागला. परमार्थाकडे कोणाचें लक्षच नाही असें दत्तात्रेयांना दिसून आलें. नंतर दत्तात्रेयांनीं आपला ध्यानयोग बाजला ठेवून त्या स्त्रीसह उत्तम तालस्वरावर गायन सुरू केलें. पार्वतीसह भगवान् शंकर हे जसे तांडव नृत्यांत निमग्न व्हावेत त्याचप्रमाणें दत्तात्रेय हे आपल्या मायेनें निर्माण केलेल्या त्या स्त्रीसह नृत्य करण्यांत तन्मय झाले. दत्तात्रेय हे आपल्या मायेनें निर्माण केलेल्या त्या स्त्रीसह नृत्य करण्यांत निमग्न होऊन गेले तरी, त्या लोकांनीं दत्तात्रेय यांना सोडलें नाहीं. त्यानंतर दत्तात्रेय प्रभूंनीं आपल्या पुढें मद्य, मांस इत्यादि अभक्ष्य व अपेय असे बीभत्स पदार्थ निर्माण केले; तरीहि ते लोक दत्तात्रेयांना सोडीनात. शेवटीं दत्तात्रेयांनीं 'मी अमंगळ व निषिद्ध पदार्थांमध्यें सामान्य मानवाप्रमाणें रमलों आहें. मी स्वतःच जर भ्रष्ट आहे तर तुमचें सर्व काम पूर्ण करण्याची माझ्यांत शक्ति कोठून असणार? तुम्ही सर्व मला सोडून जा.' असें त्यांना निक्षून सांगितलें. स्त्री असो अथवा पुरुष असो, विषयासक्ति ही त्याला दुःखच देते व अंतीं त्याचा नाशहि करते. मी स्वतःच विषयासक्त आहें. मग तुम्हांला पूर्ण सुखी करण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें कोठून असणार? दत्तात्रेयांचें हें भाषण ऐकून विषयापाठीमागें लागलेले ते बरेचसे लोक दत्तात्रेय यांना सोडून गेले. दत्तात्रेय मनाशीं म्हणाले, 'फार बरें झाले. या स्त्रीने व मद्यमांसादि अमंगल पदार्थांनीं मला या दुर्जनांच्या संसर्गातून सोडविलें. दुर्जनांचा संसर्ग हा सर्व आयुष्याचा विनाश करीत असतो. दुर्जन स्वतः सुधारत नाहींत. ते दुसऱ्यांना बिघडविण्याचाच प्रयत्न करीत असतात. शहाण्या लोकांनीं नेहमीं दुर्जनांच्या संगतीपासून दूर असावें.'

दत्तात्रेय यांनीं, आपल्या मनांत आलेले वरील विचार जे कांही लोक दृढ श्रद्धेनें आपल्या सानिध्यांत राहिलेले होते त्यांना सांगितले. मानवांना सर्व दुःखांतून मुक्त होण्यासाठीं वैराग्य म्हणजे विवेकपूर्वक विषयांची अनासक्ति ही जितकी उपयुक्त आहे तितकें दुसरें कोणतेंहि साधन उपयोगाला येत नाहीं. श्रद्धा, भक्ति, ध्यान आणि शमदमादि साधनें स्वीकारून मानवांनीं संसारबंधनांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करावा. यावांचून शेंकडों जन्म घालविले तरी दुःखांतून सुटका होणार नाहीं. दत्तात्रेय म्हणाले, 'आपण मृगाजिनाप्रमाणें म्हणजे हरिणांच्या कातड्यांप्रमाणें आकाशाची जर घडी घालूं शकूं तरच परमात्मसाक्षात्कारावांचून सर्व दुःखांतून मुक्त होऊं शकूं; हें तुम्ही सर्वांनीं लक्षांत घ्यावें. उपनिषदें, गीता, भागवत इत्यादि ग्रंथ अथवा या ग्रंथांतील विचार व्यक्त करणारे साधु, संत, महात्मे आणि ऋषिमुनि यांचे

ग्रंथ वाचावेत व त्यांचें वरचेवर चिंतन करावें. चिंतनानंतर एकाग्र चित्तानें ध्यान करावें. हाच परमेश्वराला पाहण्याचा मार्ग आहे. पहा, आपण मुळांत जेथून बाहेर पडलों तेंच मूळ परमात्मा आहे. आपल्याला तेथेंच जाऊन पोहोंचावयाचें आहे. हाच मार्ग अभ्यासानें आचरिला तर तो सुलभ आहे. विषयासक्तीनें अथवा आळसानें उपेक्षिला तर तो अत्यंत दुर्लभ आहे. असा कळकळीचा उपदेश करून दत्तात्रेयांनीं त्या सर्वांचें अज्ञानपटल दूर केलें. आपल्या मायेचा पडदा बाजूला सारून व त्यांना आपल्या यथार्थ स्वरूपाचें दर्शन देऊन ध्यानमार्गाला लावलें आणि स्वतः ते मायायुक्त अवधूत रूपानें त्या गहन अरण्यांत चिरकाल संचार करीत राहिले. हें अरण्य नर्मदेच्या दक्षिण तीरापासून माहूरगडापर्यंत पसरलें असावें. कारण येथेंच त्यांना जंभासुराकडून पीडित झालेले इंद्रादिदेव जंभासुराला मारण्याची विनंति करण्याकरितां भेटतात. येथेंच त्यांना कार्तवीर्य सहस्रार्जुनाचीहि भेट होते, आणि जमदग्नीचे पुत्र भगवान् श्रीपरशुराम हे आपल्या रेणुका मातेच्या आज्ञेनें येथेंच दत्तात्रेयांना भेटतात. याप्रमाणें विषयी जनांचा संपर्क टाळण्याकरितां दत्तात्रेयांनीं मायायुक्त अवधूतांचा वेष घेतला. विषयीजनांना आपल्यापासून दूर केलें आणि, दृढनिश्चयानें आपल्या सांन्निध्यांत राहिलेल्या लोकांवर अनुग्रह करून त्यांना कृतार्थ केलें.

यावर कोणी असें विचारील कीं, दत्तात्रेय प्रभु हे दयाशील व समर्थ असल्यामुळें त्यांनीं सर्वांनाच कृतार्थ कां केलें नाहीं? यावर उत्तर असें कीं, जोंपर्यंत चित्तामध्यें ठाण मांडून बसलेल्या विषयवासना समूळ उच्छिन्न होत नाहींत तोंपर्यंत परमेश्वरानें अनुग्रह केला तरी चित्तांतील सूक्ष्मातिसूक्ष्म असलेल्या बीजभूत विषयवासना अवसर पाहून पुन्हां डोकें वर काढतात, व साधकांच्या आयुष्याचा नाश करतात. याकरितां श्रद्धा, भक्ति, शम व विषयवैराग्य यांचा अभ्यास करूनच साधकानें ईश्वराचा अनुग्रह संपादन केला तर तो उपयुक्त ठरतो. याच अभिप्रायानें दत्तात्रेयप्रभूंनीं मायायुक्त अवधूतांचें रूप घेऊन अनधिकारी जनांना वंचित केलें हें योग्यच आहे. दत्तात्रेयांनीं या मायायुक्त अवधूत अवतारांतच इंद्रादि देवांना दर्शन देऊन त्यांना अभिप्रेत असलेलें जंभासुराच्या वधाचें कार्य मोठ्या युक्तिप्रयुक्तीनें मायेचा अवलंब करून पूर्ण केलें. कार्तवीर्य सहस्रार्जुनालाहि मायायुक्त अवधूतरूपानेंच दर्शन देऊन कृतार्थ केलें. त्याचप्रमाणें मदोन्मत्त क्षत्रिय कुलांचा एकवीस वेळां संहार करून पृथ्वीचा भार दूर करणाऱ्या भगवान् श्रीपरशुराम यांनाहि दत्तात्रेयांनीं प्रथम मायायुक्त अवधूताच्याच रूपानें दर्शन देऊन नंतर परशुरामाच्या विनंतीप्रमाणें त्यांचीं सर्व कार्यें पूर्ण केलीं. त्याचप्रमाणें अंतःकरणाला समाधान देऊन जीवनाला नित्य उज्ज्वल करणाऱ्या श्रीत्रिपुरारहस्याचा उपदेश करून परशुरामाला श्रीविद्येच्या उपासनेची दीक्षा येथेंच दिली. असें हें मायायुक्त अवधूतरूपानें अवतरलेल्या श्रीदत्तात्रेयांच्या अवधूत अवताराचें चरित्र आहे. जंभासुरवध, कार्तवीर्य

राजावर केलेला अनुग्रह व परशुरामावर केलेली कृपा हा सर्व इतिहास पूर्वी आलेलाच आहे.तो वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावा. पूर्वी सांगितल्याप्रमाणें श्रीदत्तात्रेयप्रभूंची यथासांग पूजा करून खालीं दिलेल्या तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन वेळां अर्घ्यप्रदान करावें.

## अर्घ्यदानाचे श्लोक

स्वमायागुणगुप्ताय मुक्ताय परमात्मने ।
सर्वत्राज्ञाननाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

मायास्थाननिवासाय मायामुक्ताय चात्मने ।
भक्तारिष्टविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

योगारिष्टविनाशाय देवदेवेश्वराय ते ।
जंभदर्पविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

स्वतःच्या मायेच्या सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं जो झाकल्यासारखा दिसतो, पण तत्त्वतः या तिन्ही गुणांतून तो पूर्णपणें मुक्त आहे. त्याचप्रमाणें सर्वत्र अज्ञानाचा नाश करणारा तो प्रत्यक्ष परमात्माच आहे. या परमात्मस्वरूप अवधूताला मी या पूजाप्रसंगीं अर्घ्य अर्पण करीत आहें.

मायेचें स्थान असलेला विश्वप्रपंच अर्थात् कामिनी, कांचन, कीर्ति इत्यादि सर्व विषयांत राहूनहि तो मायेशीं सर्वस्वीं अलिप्त आहे. तत्त्वतः तो आत्मस्वरूप असल्यामुळें मायामुक्त आहे. त्याचप्रमाणें जो भक्तजनांच्या सर्व संकटांचा परिहारहि करतो अशा या अवधूताला मी पूजाकर्मांगभूत हा अर्घ्य अर्पण करीत आहें.

हे अवधूता, आपण योगाभ्यासांतील सर्व अरिष्टें दूर करतां. आपण सर्व देवांचे देव आहां. आपण जंभासुराचा गर्व घालवून त्याचा वध केला व सर्व देवांना सुखी केलें त्या तुम्हांला मी अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें अर्घ्य दिल्यानंतर सधाचा व मधुर पदार्थांचा नैवेद्य समर्पण करावा आरती व मंत्रपुष्प झाल्यानंतर तीर्थप्रसाद वांटून दत्तगुरूंच्या जयजयकारांत हा समारंभ समाप्त करावा. ॐ तत्सत् ।

## बारावा अवतार आदिगुरु

सद्‌गुरु श्रीदत्तात्रेय भगवान् यांचा बारावा अवतार आदिगुरू या नांवानें ओळखला जातो. मदालसेचा धाकटा पुत्र जो अलर्क त्याला योगाचा व तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याकरितां दत्तात्रेयांनी जो अवतार घेतला त्याला आदिगुरु असें म्हटलेलें आहे. मदालसा आणि अलर्क यांचा वृत्तान्त पूर्वी दत्तप्रभूंच्या चरित्रांत सविस्तरपणें निवेदन केलेलाच आहे, तो वाचकांनीं लक्षांत घ्यावा. प्रकृतस्थलीं वाचकांसाठीं आम्ही अतिसंक्षेपानें तो येथें निवेदन करीत आहोंत. मदालसेचा पुत्र अलर्क राज्य-

कारभार पहात असतां राज्यवैभवामध्यें त्याचें मन गुंतून गेलें. त्याला आईनें उपदेशिलेल्या, ध्यान, धारणा, तत्त्वज्ञान व वैराग्य या सर्व गोष्टींचा विसर पडला.. अलर्काचें जीवन कुत्र्यामांजराप्रमाणें विषयभोगांत वायां जाऊं नये या पवित्र हेतूनें अलर्काचा भाऊ सुबाहु यानें काशिराजाचें साहाय्य घेऊन अलर्कावर स्वारी केली. अलर्काच्या राजधानीला वेढा दिला व बाहेरची रसद बंद केली. अलर्क राजा मोठा दयाळू व धार्मिक होता. तो धर्मानें पैसा मिळवीत होता, व पैशानें धर्माचें आचरण करीत होता. पैसा आणि धर्म या दोहोंच्या समन्वयांतून तो संपूर्ण राज्यवैभवाचें सुख भोगीत होता. तो प्रजाजनांचें पित्याप्रमाणें परिपालन करीत होता. आपल्या प्रजाजनांची आपल्या डोळ्यांदेखत होत असलेली उपासमार पाहून त्याला अत्यंत दुःख झालें. संकटाच्या वेळीं उपयोगाला यावी म्हणून त्याच्या मातेनें त्याच्याजवळ एक अंगठी ठेविलेली होती व सांगितलें होतें कीं, अगदीं अपरिहार्य संकटाच्या वेळीं ही अंगठी तूं उलगडून पहा म्हणजे तुला संकटांतून मुक्त होण्याचा मार्गहि दिसेल. या गोष्टीची आठवण होताच अलर्कानें ती अंगठी उलगडून पाहिली व त्या अंगठीमध्यें मातेनें लिहिलेला उपदेश एका सदाचारसंपन्न अशा अधिकारी ब्राह्मणाकडून वाचून घेतला. त्यांत लिहिलें होतें कीं, –

त्याज्यः सर्वात्मना सङ्गः स चेत्त्यक्तुं न शक्यते
स सद्भिः सह कर्तव्यः संतो दुःसंगभेषजम् ।८॥
कामः सर्वात्मना हेयो हातुं चेच्छक्यते न सः ।
मुमुक्षां प्रति कर्तव्यः सैवा कामार्तिभेषजम् ॥ ९ ॥

दुसऱ्यांची संगति सर्वस्वीं टाळावी. ती जर टाळतां येत नसेल तर सज्जनांची संगति करावी. संत हे दुर्जनांच्या संगतीचा दुष्परिणाम टाळण्याचें उत्तम औषध होय. कोणत्याहि गोष्टीची इच्छा करूं नये. अर्थात् सर्व कामना सोडून द्याव्यात. त्या जर सोडून देता येत नसतील तर मुक्त होण्याची कामना अंतःकरणांत ठेवावी. मुक्त होण्याची कामना ही सर्व कामनांच्या दुष्परिणामांचें उत्तम औषध होय.

इति श्रुत्वा मातृहार्दं बुध्वा सह्याद्रिसंस्थितम् ।
ज्ञात्वा सत्तममात्रेयं निर्विण्णः शरणं ययौ ॥ १० ॥

उत्तम संत कोण भेटेल व कोठें भेटेल याचें हें उत्तर त्या सहृदय मातेनें देऊन ठेवलेलेंच होतें. हा सर्व मातेचा हार्दिक म्हणजे कळवळ्याचा संदेश ऐकून राजा अलर्क दत्तात्रेयांचा शोध करण्याकरितां सह्याद्रि पर्वताच्या परिसरांत आला व उत्तम संत भगवान् दत्तात्रेयच आहेत, तेच शरण जाण्याला योग्य आहेत अशा श्रद्धेनें व आर्त चित्तानें दत्तात्रेयांचा शोध करूं लागला. भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं मायायुक्तअवधूत रूपाचा त्याग करून आदिगुरूंचें रूप धारण केलें, व त्याच रूपानें अवतरून राजा अलर्काला दर्शन दिलें. आदिगुरु दत्तात्रेय यांना पाहतांच त्यांच्या

चरणीं अलर्कानें साष्टांग प्रणिपात केला व करुणापूर्ण वाणीनें अनुग्रहाची प्रार्थना केली. ह्या आदिगुरूंच्या अवताराचा समय खालीं दिलेल्या श्लोकांत निर्दिष्ट केलेला आहे.

> आषाढे पौर्णिमायां च दिवाऽऽदिगुरुराबभौ ।
> आद्ये यामे द्वितीये सन्मुहूर्ते मन्दवासरे ।। ११ ।।

आषाढ शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं भगवान् दत्तात्रेय हे आदिगुरूंच्या रूपानें अवतरले. तो दिवस मंगळवारचा होता. त्या दिवशीं पहाटें पहिल्याच प्रहरांतील दुसऱ्या शुभ मुहूर्तावर भगवान् श्रीदत्तात्रेय आदिगुरूंच्या रूपानें प्रकट झाले. दयासागर भगवान् श्रीआदिगुरु दत्तात्रेय यांनीं अलर्काच्या मुखांतून सर्व दुःखाची कहाणी ऐकली. हा आपला अनन्यभक्त असलेल्या राणी मदालसेचा पुत्र आहे. कयाधूच्या उदरीं प्रल्हादासारखें जसें पुत्ररत्न निर्माण झालें त्याचप्रमाणें मदालसेच्या उदरीं जन्माला आलेलें हें एक पुत्ररत्नच आहे, असें समजून आदिगुरु श्रीदत्तात्रेय यांनीं अलर्काचें सांत्वन केलें. त्याच्या मस्तकावर हात ठेवला. ममतापूर्ण हृदयानें त्याच्या पाठीवरूनहि हात फिरविला, आणि म्हणाले, "राजा ! तुला कशाकरितां दुःख होत आहे ? तूं कोण आहेस व दुःख कोणाला होत आहे ? नीट विचार कर. हा देह कशाचा व कसा बनला आहे ? यांत नेमकें तुझें स्वरूप काय आहे ? तुझा तूंच विचार कर म्हणजे सारें कोडें उलगडेल, व तुझें सर्व दुःखहि नाहींसें होऊन जाईल." हे दत्तात्रेयांचे बोल ऐकून राजा अलर्क स्वतःच्याच मनाशीं विचार करूं लागला, "खरोखर माझा देह कशाचा बनला आहे ? सूक्ष्म निरीक्षणाअंतीं या देहामध्यें पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश यांव्यतिरिक्त दुसरें कांहीं दिसत नाहीं. हा देह म्हणजे हात, पाय, कान, नाक इत्यादि अवयवांचा समुदाय आहे. हे सर्व अवयव पंचमहाभूतांनींच बनलेले आहेत. अवयव जर पांचभौतिक आहेत तर विशिष्ट आकारानें घडलेला अवयवांचा समुदाय म्हणजे देह हाहि पांचभौतिकच आहे, यांत तिळमात्रहि संशय नाहीं. आघात देहाला व दुःख मनाला. मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार हेहि प्रकृतीचे अथवा पंचमहाभूतांचेच विकार आहेत. सुख, दुःख, तहान, भूक, वृद्धि, क्षय आणि जरा, मृत्यु हे सर्व पांचभौतिक देहादि विकारांचेच धर्म आहेत. पंचमहाभूतांच्या व मूलप्रकृतीच्याहि पलीकडे असलेला शुद्ध चित्स्वरूप आत्मा तोच मी आहें. मग माझ्याशीं विकारांचे धर्म असलेल्या या सुखदुःखादिकांचा तत्त्वतः काय संबंध आहे ? अर्थात् कांहींच नाहीं."

स्थूल शरीर हें जसें पांचभौतिक आहे, त्याचप्रमाणें सूक्ष्म शरीर, मन, बुद्धि, चित्त, अहंकार, ज्ञानेंदियें आणि कर्मेंदियें हींहि सर्व पांचभौतिक अथवा प्रकृतीचे विकारच आहेत. जो न्याय स्थूल शरीराला लागू पडतो तोच न्याय सूक्ष्म शरीरालाहि लागू पडतो. अशा रीतीनें सुखदुःखादिकांचे संबंध स्थूल देहाकडे व सूक्ष्म देहाकडे

 

जातात. निर्विकार आत्म्यांशीं त्यांचा कांहीं संबंध येत नाहीं. आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक या त्रिविध तापांचा संसर्ग स्थूल व सूक्ष्म देहाशींच असतो. शुद्ध आत्म्याशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. राजा अलर्काला दत्तात्रेयप्रभूंनी केलेल्या केवळ प्रश्नांतूनच हा उलगडा झाला. त्याला अधिक कांहीं सांगावेंच लागलें नाहीं. या विषयाचा अधिक उलगडा दत्तात्रेय आणि अलर्क यांच्या संवादांत होणारच आहे. राजा अलर्क दत्तात्रेयांच्या चरणीं नमस्कार करून नम्र भावानें म्हणाला, "महाराज, आपल्या कृपेनें माझें अज्ञान संपलें, अहंकार गळाला, मोह पळाला, लोभ निमाला. मद-मत्सर संपला आणि द्वेषहि मावळला. शत्रु आणि मित्र हा भेदभाव उरला नाहीं. मी आतां व्यर्थ युद्ध कां करावें? काशिराजा काय, माझा सख्खा बंधु सुबाहु काय अथवा मी काय! – आम्ही शरीरानें भिन्न भिन्न असलों तरी आत्मस्वरूपानें एकरूपच आहोंत. हे सद्‌गुरु दत्तात्रेया, मी हें सर्व राज्य सुबाहूला अर्पण करतों. तो सुखानें प्रजाजनांचें परिपालन करील व मी आनंदानें ध्यानमग्न होऊन परमात्मस्वरूपाचें चिंतन करीत राहीन."

दत्तात्रेय म्हणाले, "राजा! तूं फार चांगला विचार केला आहेस. सर्व दुःखांचें मूळ – हें माझें, तें माझें अशा तऱ्हेची अंतःकरणांत असलेली ममता, म्हणजे माझे-माझेपणाची भावना व आसक्ति हेंच आहे. ज्या वेळीं ही ममता व आसक्ति सुटते त्याच वेळीं जीव सुखी होतो. जा, आनंदानें जा. माझें स्मरण करीत रहा. मी तुझ्या पाठीशीं उभा आहेच." दत्तात्रेयांचा आशीर्वाद घेऊन राजा अलर्क आपल्या राजधानीला परत आला. सर्व राज्य त्यानें सुबाहूच्या स्वाधीन केलें. साष्टांग नामस्कार करून तो म्हणाला, "बंधुराजा, हें सर्व राज्य तुमचेंच आहे. तें तुम्ही सांभाळा व आनंदानें रहा. सद्‌गुरु कृपेनें मी सर्व नाशिवंत प्रपंचजाळांतून मुक्त झालों आहें. मी आतां एकांतामध्यें आनंदानें आत्मस्वरूपाचें चिंतन करीत बसेन." अलर्काची ही वैराग्याची व आत्मज्ञानाची परिपक्वावस्था पाहून सुबाहूला अत्यंत संतोष वाटला. त्यानें तें सर्व राज्य परत अलर्काच्या स्वाधीन केलें. निरपेक्ष बुद्धीनें अनासक्त राहून तूंच हें सर्व राज्य नीट सांभाळ असें सांगून व अलर्काला आशीर्वाद देऊन आपला हेतु सफल झाल्याचें समाधान मानीत काशिराजासह तो आपल्या मार्गानें परत गेला. अशी ही आदिगुरु दत्तात्रेय यांच्या बाराव्या अवताराची कथा आहे.

## अर्घ्यदानाचे श्लोक

सर्वत्राज्ञाननाशाय गुरवे परमात्मने ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

चिदात्मज्ञानदीपाय गुरवे ब्रह्मरूपिणे ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

भेदतापविनाशाय सच्चिदानंदरूपिणे ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

सर्व प्रकारच्या अज्ञानाचा नाश करणाऱ्या व आदिगुरु परमात्मस्वरूप असलेल्या दत्तात्रेयाला मी पूजाप्रसंगीं अर्घ्य समर्पण करीत आहें.

चिदात्मसाक्षात्काराच्या प्रदीपाला प्रज्वलित करणारे ब्रह्मरूपी आदिगुरू भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी पूजासमयीं अर्घ्यप्रदान करीत आहें.

द्वैतबुद्धीचा आणि त्रिविध तापांचा नाश करणाऱ्या सच्चिदानंदरूप आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी हा अर्घ्य समर्पण करीत आहें.

याप्रमाणें तीन श्लोक म्हणून पृथक् पृथक् तीन अर्घ्य समर्पण करावेत. वर सांगितलेल्या शुभदिनीं आदिगुरु दत्तात्रेय यांची यथासांग पूजा करून नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प समर्पण करतांना "आदिगुरवे श्रीदत्तात्रेयाय नमः" असें म्हणावें. या प्रसंगीं सुवर्णदानहि करावें. शेवटीं तीर्थप्रसाद वांटून दत्तात्रेयांचा जयजयकार करीत हा समारंभ समाप्त करावा. ॐ तत्सत् । याप्रसंगीं राजा अलर्क याची कथाहि वर्णन करून सांगावी.

## तेरावा अवतार शिवगुरु दत्तात्रेय

भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु यांचा तेरावा अवतार शिवगुरू अथवा शिवदत्त या नांवानें ओळखला जातो. भगवान् श्रीविष्णु यांच्या सुदर्शनचक्रावर अधिष्ठित असलेल्या माहूर नगरीमध्यें एक पिंगलनाग नांवाचा ब्राह्मण रहात असे. तो मोठा वैदिक असून सदाचारसंपन्न कर्मठ ब्राह्मण होता. त्याचें सोंवळेंओंवळें व विचार अत्यंत पुरातनकालीन कट्टर सनातन्याप्रमाणें होते. तो एकदां माहूर क्षेत्राच्या परिसरांत फिरत असतां आवळयाच्या वृक्षाजवळ आला. या आवळीला काळचा रंगाचे आवळे भरघोस लागत होते. म्हणूनच लोक या वृक्षाला कृष्णामलकी असें म्हणत असत. पिंगलनाग या वृक्षाजवळ येऊन पहातो तों त्याला एक अत्यंत तेजस्वी व तारुण्यानें मुसमुसलेला असा ब्राह्मणकुमार दृष्टीस पडला. त्याचें स्वरूप व्रात्य अर्थात संस्कारहीन असें दिसत होतें. वेश मळकट असून मस्तकावर जटा शोभत होत्या. गळयांत रुद्राक्षांची माळ होती. तो ब्रह्मवर्चस्वी दिसत होता. मुखावर ब्रह्मतेज झळकत होतें. हातांत वेदांची पोथी असून मुखानें वेदांचें पठन चाललेलें होतें. अशा त्या ब्रह्मकुमाराला पाहून पिंगलनागाचें मन प्रक्षुब्ध झालें. तेजस्वी पण अमंगल वेश असलेला व मुखानें वेद म्हणणारा असा हा आहे तरी कोण असा प्रश्न त्याच्या मनांत आला. त्यानें त्या शिवरूप दत्तात्रेयाला विचारलें, "अरे, तूं कोण आहेस ? व्रात्य दिसतो आहेस, पण तोंडानें वेदपाठ म्हणत आहेस. तुला ब्रह्मचारी म्हणावें तर तुझ्याजवळ कौपीन नाहीं, हातांत दंड नाहीं, मृगाजिन नाही, कमरेला मौंजीबंधन नाहीं. ब्रह्मचर्याश्रमाचें कांहीं लक्षण दिसत नाहीं, मग ब्रह्मचारी कसें म्हणावें? बरें गृहस्था-

श्रमी म्हणावें तर गृहस्थाश्रमाचें द्योतक अग्निहोत्र तेंहि तुझ्याजवळ दिसत नाहीं. गृहस्थाश्रम्यानें कमींत कमी दोन तरी यज्ञोपवीतें धारण करावीं लागतात. तीं तुझ्या गळ्यांत दिसत नाहींत. एकच यज्ञोपवीत दिसत आहे. बरें तूं वानप्रस्थाश्रमी आहेस असें समजावें तर तुझें तसें वय दिसत नाहीं, पत्नी बरोबर नाहीं, जंगलांत झोपडी नाहीं, वानप्रस्थाश्रमाचीं कांहींच लक्षणें दिसत नाहींत. मग तुला वानप्रस्थाश्रमी कसें म्हणावें ? बरें, चतुर्थाश्रमी म्हणजे संन्यासी आहेस असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण काषायवस्त्रें परिधान केलेलीं नाहींस. दंड नाहीं, कमंडलु नाहीं, भगवी छाटी नाहीं, मस्तकावर शेंडी आणि गळ्यांत जानवें दिसत आहे. यावरून तुला संन्यासी म्हणतां येत नाहीं. तरी तुझा वर्ण कोणता व आश्रम कोणता हें तूंच सांग. वर्णाश्रम-रहित व विसंगत आचरण करणारा तूं तोंडानें मात्र वेदपाठ म्हणत आहेस. सदाचार-शून्य असलेल्या तुला वेद म्हणण्याचा काय अधिकार आहे ? त्याचप्रमाणें तुझ्याजवळ ही नग्न स्त्री दिसत आहे, मद्य दिसत आहे. यावरून तुझी स्त्रीलालसा व मद्यलालसा अनावर दिसत आहे. हा मार्ग तुला कोणीं दाखविला आहे ? " असे तर्ककुतर्क करून पिंगलनागानें दत्तात्रेयांना अनेक प्रश्न विचारले.

पप्रच्छ भवतः कोऽयमाश्रमो वर्णगर्हितः ।। ३ ।।

केनोपदिष्टो मार्गोऽयं नग्नस्त्रीमद्यलालस ।। ४ ।।

प्रभुःप्राह तमुक्तान्यः पंचमोऽयं ममाश्रमः ।
योऽविकल्पेनात्मरूपं विश्वं पश्येदभेददृक् ।। ५ ।।

वैराग्ययुक्तो वीतारिस्तस्यायं पंचमाश्रमः ।। ६ ।।

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देतांना भगवान् दत्तात्रेय म्हणाले, " तुम्हीं सांगितलेल्या सर्व आश्रमांहून माझा हा आश्रम निराळाच आहे. विकल्प म्हणजे भेद. कोणत्याहि प्रकारचा भेदभाव अंतःकरणांत न ठेवतां हें सर्व विश्व आत्मरूप आहे अशा ऐक्य-भावनेनें या विश्वाकडे पाहून जो वागतो त्याला पंचमाश्रमी म्हणतात. जो पूर्ण वैराग्य-युक्त असून कोणाच्याहि बाबतींत ज्याच्या मनांत शत्रुभाव अथवा परकेपणा उरलेला नसतो त्याला पंचमाश्रमी म्हणतात. हा पंचमाश्रम तुम्हांला माहीत नाहीं. तुमच्या कानावरहि तो आलेला नाहीं. सर्वत्र समदर्शी व आत्मसाक्षात्कारी असे अधिकारी महात्मेच हा आश्रम जाणूं शकतात. विवेक आणि वैराग्य बाजूला ठेवून केवळ वर्णा-श्रमधर्माचें थोतांड करणाऱ्याला हा आश्रम कळणार नाहीं. तुम्हांला खरें आत्मसुख पाहिजे असेल तर मन शुद्ध करा. विषयवासनांचें निर्मूलन करा व अंतर्मुख होऊन सतत आत्मस्वरूपाचें चिंतन करा. तरच तुमच्या मनाला शांति व समाधान लाभेल आणि तुम्ही पूर्ण सुखी व्हाल. "

दत्तात्रेय यांचें हें उत्तर ऐकून या पिंगलनाग ब्राह्मणाच्या अंतःकरणांत लख्ख प्रकाश पडला. " अरे हा तर महासती अनसूयादेवी हिच्या उदरीं जन्माला आलेला

सर्व अवधूतांचा प्रत्यक्ष चूडामणीच आहे. हें मूर्तिमंत ब्रह्मतेजच आहे. आम्ही आतां-पर्यंत ज्याच्याबद्दल ऐकत होतों तोच हा प्रत्यक्ष दत्तात्रेय आहे. मी आज दत्तप्रभूंच्या दर्शनानें धन्य झालों." असें म्हणून दत्तात्रेयांच्या दर्शनानें कृतार्थ झालेल्या त्या पिंगल-नागानें दत्तात्रेयांना साष्टांग प्रणाम केला व हात जोडून क्षमायाचना केली. 'महाराज माझे सर्व अपराध आपण पोटांत घालून माझ्यावर सतत अनुग्रहाची दृष्टि ठेवावी. मीं आपली फार निर्भर्त्सना केली, कठोर शब्द बोललों, दयासागरा, क्षमा करा.'

शुक्लाष्टम्यां श्रावणस्य विशेषादिंदुवासरे ।
शिवरूपधरं दृष्ट्वा दत्तात्रेयं महामुनिं ।। ८ ।।

श्रावण शुद्ध अष्टमीच्या दिवशीं सोमवारीं दत्तात्रेयप्रभूंनीं शिवरूप धारण करून पिंगलनागाला दर्शन दिलें व कृतार्थ केलें. दत्तात्रेय यांच्या चरणीं नमस्कार करून पिंगलनाग आपल्या आश्रमाला गेला.

## अर्घ्यदानाचे श्लोक

संसारदुःखनाशाय शिवाय परमात्मने ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

भेदतापविनाशाय मुख्यबिंबाय चात्मने ।
शिवाय गुरवे तुभ्यं कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

सर्वत्राभेदरूपाय सर्वत्र विमलाय ते
सर्वदानंदरूपाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

संसारदुःखाचा नाश करणारे व शिवरूपानें अवतरलेले परमात्मस्वरूप श्रीगुरुदेवदत्तात्रेय यांना मी अर्घ्य समर्पण करीत आहें.

भेदबुद्धि व त्रिविध ताप यांचा नाश करणारे, प्रत्यक्ष यथार्थ आत्मस्वरूप असलेले व शिवरूपानें अवतरलेले भगवान् श्रीदत्तात्रेय तुम्ही आहां. तुम्हांला मी अर्घ्यप्रदान करीत आहें.

हे परमेश्वरा, शिवगुरो, तुम्ही सर्वत्र एकरूपानें विराजत आहां. सदासर्वकाळ तुम्ही आनंदरूपानें व निर्मळ स्वरूपानें सर्वत्र विराजत आहां. तुम्हांला मी भक्तिपूर्वक अर्घ्य समर्पण करीत आहें.

दत्तात्रेय यांची वरील शुभमुहूर्तावर सांगोपांग पूजा करून वर दिलेल्या तीन श्लोकांनीं अर्घ्यप्रदान करावें. उदकदान करून नैवेद्य, आरती, मंत्रपुष्प करावा. शेवटीं सर्वांना तीर्थप्रसाद देऊन श्रीदत्तात्रेयांच्या जयजयकारांत उत्सव समाप्त करावा. ॐ तत्सत् ।

## चौदावा अवतार देवदेव अथवा देवदेवेश्वर

सद्गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा चौदावा अवतार देवदेव अथवा देवदेवेश्वर या नांवानें ओळखला जातो. तो कथाभाग असा – मार्कंडेय ऋषींनीं सांगितलेली ही कथा आहे. माहूर क्षेत्राच्या परिसरांतच विशेषतः शतानंदाला दर्शन देऊन अनुगृहित करण्यासाठीं भगवान् श्रीदत्तात्रेय हे देवदेवेश्वराच्या रूपानें प्रकट झाले. याच अनुषंगानें स्वर्गांतील इंद्रादि देव आणि सत्य लोकांतील ब्रह्मदेव यांनाहि दर्शन देऊन अनुगृहित करण्याचें कार्य देवदेवेश्वर प्रभूंनीं केल्याचें पहावयास सांपडतें. भगवान् श्रीदत्तात्रेय नर्मदेच्या दक्षिण तीरावरील अरण्यांतून दक्षिण दिशेनें प्रवास करीत करीत अतिप्राचीन अशा व सर्व पर्वतांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सह्याद्रि नांवाच्या पर्वताजवळ आले. प्रवासामध्यें अनेक ऋषिमुनींचे आश्रम पाहात पाहात त्यांनीं तेथील ऋषिमुनींना आपल्या दर्शनानें पावन केलें. अनेक नद्या, तीर्थें व इतर जलाशय यांच्यामध्यें अवगाहन करून त्यांना ते पवित्र करीत होते. अत्रिऋषींचे चिरंजीव भगवान् दत्तात्रेय हे स्वतःहि महामुनीच होते. कोठें ऋषिमुनींच्या पर्णकुटींत क्षणभर जाऊन सर्वांच्या क्षेमकल्याणाची विचारपूस करावी; कोठें स्नानसंध्यादि अनुष्ठान करून क्षणभर विश्रांति घ्यावी तर कोठें भोजन करूनहि भक्तजनांच्या मनाला ते संतोषवीत असत. अशा थाटानें दत्तात्रेयमुनींची स्वारी तो सर्व रम्य प्रदेश अवलोकन करीत करीत सह्याचलाच्या रम्य परिसरांत येऊन पोहोंचली. सह्य पर्वताचा तो परिसर त्यांना फारच रम्य वाटला. या भागांतील पर्वतश्रेणीला कांहीं ठिकाणीं सिंहाद्रि असेंहि नांव दिलेलें आढळतें. पूर्वीं आम्हीं याचें माहूर क्षेत्राच्या परिचयाच्या निमित्तानें सविस्तर वर्णन केलेलें आहे. दत्तात्रेयप्रभूंची ही जन्मभूमीच असल्यामुळें या परिसरांत त्यांचें मन रमणें हे स्वाभाविकच आहे. तशी तर संपूर्ण सह्याद्रि पर्वताचीं सर्व शिखरें दत्तात्रेयांना प्रिय वाटत होतीं; पण त्यांतल्या त्यांत माहूरगडच्या परिसरांतील अनसूयेच्या शिखराजवळ असलेलें एक शिखर दत्तात्रेयांना खूपच आवडलें. तेथेंच ते बराच काळ आश्रम करून राहिले. हें सर्व शिखर आज दत्तपादुकाशिखर अथवा दत्तशिखर या नांवानें ओळखलें जातें.

दत्तात्रेयो महायोगी योगाभ्यासरतः सदा ।
समः सर्वेषु वेदेषु ऋषिरूपधरो हरिः ।। ३ ।।

दत्तात्रेयाश्रमो रम्यः सदा पुष्पफलैर्द्रुमैः ।
सेवितो मुनिभिः सिद्धैर्देवैः सेन्द्रैः सकिन्नरैः ।। ४ ।।

भगवान् श्रीदत्तात्रेय हे महायोगी आहेत. ते सदासर्वकाळ योगाभ्यासामध्यें तन्मय झालेले असतात. सर्व वेदांमध्यें ते सम म्हणजे ब्रह्मस्वरूपानें वर्णिलेले आहेत. प्रत्यक्ष भगवान् विष्णूच जणूं कांहीं ऋषिरूप धारण करून अवतरलेले आहेत. माहूरगडाच्या परिसरांतील दत्तात्रेयांचा आश्रम हा फारच रम्य होता. तो सदासर्वकाळ

विविध प्रकारच्या फुलाफळांनीं समृद्ध असलेल्या असंख्य वृक्षांनीं मंडित होता. या आश्रमामध्यें मोठमोठे अधिकारी असलेले सिद्ध, मुनि वास्तव्य करीत होते. इंद्रादि देवहि या आश्रमांत सिद्ध, गंधर्व, यक्ष, किन्नर यांच्यासह मधून मधून येत असत. या आश्रमांत जन्मतःच एकमेकांचे वैरी असलेले असे अनेक हिंस्र पशु व इतर प्राणी आपला वैरभाव विसरून गुण्यागोविंदाने राहात होते. हत्ती आणि सिंह, वाघ आणि हरिण, मुंगूस आणि सर्प, मांजर आणि मूषक हे सर्व एकत्र रहात असलेले पाहून पाहणाऱ्याच्या मनाला मोठें कौतुक वाटत असे.

देवदेवस्वरूपेण दत्तात्रेयः स्वयं हरिः ।
कृष्णामलकवृक्षस्य मूले तिष्ठति नित्यशः ।। ७ ।।

या आश्रमांत प्रत्यक्ष विष्णूच असलेले भगवान् दत्तात्रेय हे देवदेवेश्वराच्या रूपानें अवतार घेऊन कृष्णामलकवृक्षाच्या छायेत नेहमीं वसत होते. मातापूर हें क्षेत्र अतिप्राचीन काळीं काळ्या आवळ्याच्या वृक्षांनीं खूपच सुशोभित असे म्हणून या ठिकाणच्या वसतीला कृष्णामलकी क्षेत्र असेंच म्हटलें जात होतें. त्या आश्रमांत प्रत्यक्ष विष्णूच शंख, चक्र, गदा इत्यादि आयुधें धारण करून देवदेश्वराच्या रूपानें राहात आहेत, हें पाहून सत्यलोकींचे ब्रह्मदेव आपल्या लोकांत वास्तव्य करीत असलेल्या इतर भक्तांसह देवदेवेश्वराच्या दर्शनासाठीं तेथें आले. तसेच सुप्रसिद्ध गौतम ऋषींचे पुत्र व जनकराजाचे पुरोहित असलेले शतानंद महामुनि देखील त्याच वेळीं तेथें आले. तेव्हां इंद्रादि देव, ब्रह्मदेव आणि शतानंद मुनि यांना दत्तात्रेयप्रभूंनीं देवदेवेश्वराच्या रूपानें अवतरून दर्शन दिलें. तो दिवस खालीं वर्णन केल्याप्रमाणें होता . . .

भाद्रे दिवा शुक्लचतुर्दशी तिथौ भृगोर्दिने भे शततारकाख्ये ।
आद्ये च यामे शुभदे मुहूर्ते दृश्योऽभवत्तत्र स देवदेवः ।। ९ ।।

श्रीदेवदेवेश्वरांचा अवतार ज्या शुभ मुहूर्तावर झाला त्याचें वर्णन वरील श्लोकांत केलेलें आहे. भाद्रपद शुक्ल चतुर्दशीच्या दिवशीं शुक्रवारीं शततारका नक्षत्र असताना पहिल्याच प्रहरामध्यें शुभप्रदसुमुहूर्तावर भगवान् दत्तात्रेय देवदेश्वराच्या रूपानें सर्वांच्या पुढें प्रकट झाले. अशा त्या परमपावन: पुण्यक्षेत्रस्वरूप असलेल्या आमलकी ग्रामांत अर्थात् माहूर क्षेत्रांत देवदेवेश्वररूपानें अवतरलेल्या श्रीदत्तात्रेयांना पाहून सर्वांना अत्यंत आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांत सर्वांनीं दत्तात्रेयप्रभूंवर पुष्पवृष्टि केली, गुलाल उधळला, गंधर्व गाऊ लागले, किन्नर आणि अप्सरा नृत्य करूं लागल्या, ब्राह्मण वेदघोष करूं लागले. देवदेवांच्या जयजयकारानें दाही दिशा दुमदुमून गेल्या. शंख, ताल, मृदंग व दुंदुभि इत्यादि मंगलवाद्यें वाजूं लागलीं. भगवान् दत्तात्रेय हे स्वतः अव्यक्त असूनहि भक्तजनांना दर्शन देण्याकरितां देवदेवेश्वराच्या रूपानें व्यक्त अर्थात् प्रकट झाले. निर्गुण निराकार असूनहि सगुण साकार बनले. अपरिच्छिन्न आणि अपरिमित असूनहि भक्तांकरितां परिच्छिन्न आणि परिमित बनले. नामरूप-

रहित असूनहि ते विविध नामांनीं व रूपांनीं नटले. मस्तकावर सूर्याप्रमाणें देदीप्यमान असलेल्या रत्नजडित मुकुटाच्या कांतीनें दिशा उज्ज्वल दिसत होत्या. काळे-कुरळे केंस, प्रशस्त ललाट म्हणजे कपाळ, धनुराकार भुंवया, कमलदलाप्रमाणें विशाल नेत्र, सरळ नाक, उत्तम कान, आरक्त अधरोष्ठ, कुंदाच्या कळ्यांप्रमाणें शुभ्र दंतपंक्ति, कानांतील कुंडलांचीं किरणें ज्यांच्यावर झळकत आहेत असे दोन्ही गाल, सुंदर हनुवटी, शंखासारखा कंठ, हत्तीच्या सोंडेप्रमाणें दिसणारे व विविध आयुधांनीं युक्त असलेले सुंदर बाहु, विशाल वक्षस्थल, गळ्यांत शोभणारी वैजयंतीमाला, स्फटिक्, रुद्राक्ष, प्रवाल आणि मौक्तिक माला, तडिल्लतेप्रमाणें झळकणारें पिवळें व रेशमी जरीकांठी पीतवस्त्र, खांद्यावर जरीचा दुपट्टा, कासवाच्या पृष्ठभागाप्रमाणें उंच असलेला पायावरील पृष्ठभाग, चंद्राच्या किरणाप्रमाणें आल्हाददायक व अरुणवर्ण नखकांति, कटितट, ऊरु, जानु आणि जंघा इत्यादि सर्वच अवयव रमणीयतेची सीमाच ओलांडीत आहेत असें ते देवदेवेश्वराचें रमणीय रूप पाहून सर्वांचीं मनें निवालीं व आनंदानें तृप्त झालीं. रत्नजडित सिंहासनावर देवदेवेश्वर भगवान् दत्तात्रेय विराजमान होताच सर्वांनीं प्रणिपात करून दृष्ट काढली आणि आरती व स्तुति करण्यास आरंभ केला.

जयजय सकलानंदकारक । जय भूधरादिभुवनधारक ।
जय वृंदारक वृंदानंददायक ।।

जयावनिजलदहनपवननभसां । जनिस्थितिमृतिकारक ।
विबुधानंदसंदोहप्रद ।।

जय परमहंसपरिव्राजकादि निष्किंचनजनप्रिय ।
जय त्र्यंबकादिसुरेशपूजित ।।

हे सर्व जनांना आनंद देणाऱ्या देवदेवा दत्तात्रेया ! तुमचा जयजयकार असो. हे परमेश्वरा ! पर्वत आणि सागर यांच्यासह तुम्ही भूमंडलादि चतुर्दशभुवनांचे धारण-कर्ते आहां. तुमचा जयजयकार असो. हे दत्तात्रेया ! आपण देवांच्या समुदायाला आनंद देणारे आहां, सर्व भक्तांना आनंद देणारे आहां. आपण पंचमहाभूतें व पांच-भौतिक विश्व यांची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय करणारे आहां. सर्व देव आणि भक्त यांना आनंद देणाऱ्या देवदेवा, तुमचा जयजयकार असो. परमहंस परिव्राजकादि अकिंचन जन ज्याला प्रिय आहेत किंवा अकिंचन जनांचा जो प्रिय आहे, त्या देव-देवेश्वराचा जयजयकार असो. शंकर, ब्रह्मदेव आणि इंद्र इत्यादि देवांनीं ज्याची पूजा केलेली आहे त्या दत्तात्रेयप्रभूचा जयजयकार असो. ही स्तुति ऐकल्यानंतर प्रसन्न झालेले देवदेवेश्वर ब्रह्मादि देवांना म्हणाले, "हे भक्तजनहो, तुम्हांला जो इष्ट वर पाहिजे असेल तो मागून घ्या." ब्रह्मादि देव म्हणाले, "हे देवाधिदेवा, तुमचे मुनिरूपानें व स्वस्वरूपानें दर्शन होणें दुर्लभ आहे. आज दोन्ही रूपांनीं तुमचें दर्शन झाल्यामुळे आम्ही धन्य आहोंत. आज तुमच्या कृपेनें आम्ही सर्व कृतार्थ आहोंत. हे जगत्पते परमे-

श्वरा ! या संसारांत पुन्हां आम्हांला यातायात करावी लागणार नाहीं अशी कृपा करावी, हीच आमची मनीषा आहे.' दत्तात्रेयप्रभूंनीं ब्रह्मादिदेव आणि ऋषिमुनि यांना 'तथास्तु' म्हणून इष्ट वर दिला आणि संतुष्ट केलें. त्याचप्रमाणें शतानंद मुनींनाहि इष्ट वर देऊन कृतार्थ केलें.

## अर्घ्यदानाचे श्लोक

देवदेवाय देवाय दुःखशोकहराय च ।
दुरितौघविनाशाय कर्मणार्घ्यं ददाम्यहम् ।। १ ।।

सर्वापराधनाशाय सर्वपापहराय च ।
देवदेवाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। २ ।।

भक्तप्रियाय देवाय शुद्धाय परमात्मने ।
दत्तात्रेयाय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ।। ३ ।।

हे देवदेवा परमेश्वरा ! तुम्ही दुःख आणि शोक नाहींसे करणारे आहां. त्याच प्रमाणें भक्तजनांना पापांच्या प्रवाहांतून वर काढणारे आहां. तुम्हांला मी हा अर्घ्य समर्पण करीत आहें.

हे परमेश्वरा ! आपण सर्व अपराधांची क्षमा करणारे आहां. आपण सर्व पापांचें निरसन करणारे आहां. मी आपल्याला अर्घ्यप्रदान करीत आहें.

हे दत्तात्रेया सद्‌गुरो, आपण भक्तजनांवर अत्यंत प्रेम करणारे आहां. आपण शुद्ध परब्रह्मस्वरूप आहां. मी आपणांस या पूजेमध्यें हा अर्घ्य समर्पण करीत आहें

याप्रमाणें सांगोपांग पूजा करून वरील तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन अर्घ्य द्यावेत आणि तांबूल दान करावें. शेवटीं नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प करून सर्वांना तीर्थ-प्रसाद द्यावा. ॐ तत्सत् ।

## श्रीदत्तात्रेयांचा पंधरावा अवतार

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा पंधरावा अवतार दिगंबर या नांवानें ओळखला जातो. सोम वंशांतील सुप्रसिद्ध राजा यदु याला दर्शन देऊन कृतार्थ करण्याकरितां दत्तात्रेयांनीं हा दिगंबर अवधूत अवतार धारण केलेला आहे. एकदां राजा यदु हा कावेरी नदीच्या परिसरांत असलेल्या अरण्यांत आणि डोंगराळ प्रदेशांत फिरत असतांना अकस्मात् त्याला दिगंबर अवधूताचें दर्शन झालें. यदु राजा हा दत्तात्रेयांचा भक्त असून तो दत्तात्रेयांची नित्य उपासना करीत असे. दिगंबर अवधूतांचें अकस्मात् दर्शन झाल्याबरोबर त्यानें दिगंबराला दंडवत् साष्टांग प्रणिपात केला व हात जोडून नम्रपणानें बोलण्यास आरंभ केला. राजा म्हणाला, "महाराज, बहुधा सर्व लोक संपत्ति आयुष्य, कीर्ति आणि सर्व प्रकारचें वैभव यांच्या प्राप्तीकरितां सतत प्रयत्न करीत

असतात. आपण तेजस्वी, तरुण व समर्थ असूनहि रानावनांत रिकामे कां हिंडता बरें ? तुम्हांला वैभव, सुख असावें असें वाटत नाहीं का ? या वयांत बहुधा सर्व कामाग्नीनें पीडित होत असतात. कामाग्नीनें ज्याला छळलें नाहीं असा या विश्वांत प्रायः कोणी दिसत नाहीं. कामाग्नि म्हणजे काय ? असा कोणीं प्रश्न विचारल्यास ग्राम्य विषयभोगाची चित्ताला अस्वस्थ करून टाकणारी उत्कंठा हेंच त्याचें उत्तर होय. अग्नीचा ताप जसा असह्य होत असतो त्याचप्रमाणें काम--विकाराचाहि ताप असह्य होत असतो. याच अभिप्रायानें कामविकाराला अग्नि असें म्हटलेलें आहे. महाराज, आपण याच दुर्धर तारुण्यावस्थेंत आहां. तुम्हांला कामविकाराचा ताप होत नाहीं काय ? आपण हा कामविकार कसा जिंकला ? आपल्याला वित्त, वैभव, ऐषआराम, मुलेंबाळें व उत्तम स्त्री हें सर्व असावें असें वाटत नाहीं काय ? महाराज हें सर्व सांगण्यासारखें असल्यास कृपा करून मला सांगा. इतर लोक प्रचंड वैभवांत अहोरात्र लोळत असूनहि सुखी दिसत नाहींत. दुःखी, दुर्मुखलेले व केविलवाणे असेच ते पहावयास सांपडतात. त्यांचीं शरीरें वैभवांत असूनहि निस्तेज, वेढब, कृश दिसतात. तुमच्याजवळ तर विषयवैभवाचा लेश नाहीं; पण तुम्ही अत्यंत तेजस्वी दिसत आहां. तुमचें मुखकमल प्रसन्न दिसत आहे. शरीर सुदृढ व बांधेसूद दिसत आहे. ते रोगी असतात तर तुम्ही सर्वस्वीं निरोगी आहांत. ते दीन व दुःखी असतात तर तुम्ही प्रसन्न व सुखी आहां. तुम्हांला राहावयास राजवाडे नाहींत व सेवा करावयास दास-दासी नाहींत; पण राजापेक्षांहि तुम्ही सुखी दिसत आहां. हा कशाचा परिणाम आहे हें कृपा करून मला सांगा. आपल्या कृपेनें मीहि सुखी होईन. ''

हे यदुराजाचे प्रश्न ऐकून दिगंबर अवधूत म्हणाले, आत्मसमाधानासाठीं विश्वाचें निरीक्षण करीत असतां मी निसर्गांतून चोवीस गुरु शोधून काढले व त्यांच्याकडून निरनिराळ्या प्रकारचे बोध घेतले. त्या बोधांतूनच मी विवेक आणि वैराग्य यांनीं संपन्न होऊन त्यांतूनच आत्मसाक्षात्कारापर्यंत जाऊन पोहोंचलों. तेथेंच मला शांतीचा व आत्मसमाधानाचा पूर्ण लाभ झाला. हेंच माझ्या सुखीपणाचें मर्म आहे. हा सर्व संवाद आम्हीं सविस्तरपणें पुढे दिलेलाच आहे. वाचकांनीं तो तेथेंच पहावा.

चतुर्विंशतिराचार्याः सन्ति मे बुद्धयुपाश्रिताः ।। ६ ।।
यच्छिक्षयेदृशो भूमा मुक्तसंगश्चरे महीम् ।

दिगंबर अवधूत श्रीदत्तात्रेय म्हणाले, '' राजा, माझ्या बुद्धीनें या निसर्गांतून चोवीस गुरु निवडून काढलेले आहेत. मी त्यांच्यापासूनच बोध घेऊन विचार करीत असतों. त्या बोधानेंच मी 'भूमा' म्हणजे परब्रह्मस्वरूप झालों आहें. मी सर्व विषयासक्तींतून मुक्त होऊन पृथ्वीवर आनंदानें फिरत असतों. कोणी कितीहि अपराध केला तरी आपण क्षमाशील असावें हा बोध मी पृथ्वीपासून व पर्वतापासूनहि घेतला. आपलें जीवन परोपकारार्थच आहे असें समजून आपण नित्य परोपकारच करीत रहावें हेंहि

मी पर्वतापासूनच शिकलों. प्राणवायु आणि भूतवायु हे सर्व विषयांशीं संबंध येऊनहि अलिप्त राहतात, त्याप्रमाणें आपण विषयांत राहूनहि विषयांपासून अलिप्त असावें हा बोध मीं प्राणवायु आणि भौतिकवायु यांच्यापासून घेतला. जल, तेज आणि पृथ्वी यांचे बाह्य गुण काळानें बदलतात; पण आंतरिक गुण बदलत नाहींत. त्याप्रमाणें आपणहि कालानें बदलणाऱ्या बाह्य गुणांची उपेक्षा करून आंतरिक गुण स्थिर करावेत. आकाश हें सर्वांमध्यें असून व सर्वांना व्यापूनहि जसें सर्वांहून निराळें आहे त्याचप्रमाणें आपला आत्मा आहे हें मी आकाशापासून लक्षांत घेतलें. जलापासून मीं स्वच्छता व मधुरता हे गुण घेतले. अग्नीपासून तेजस्वी असण्याचा बोध मीं घेतला. चंद्रापासून आत्मा हा क्षयवृद्धिरहित आहे असें लक्षांत घेतलें. सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांनीं पृथ्वीवरील जल शोषून घेतो व पावसाच्या रूपानें तें पृथ्वीला देऊन टाकतो तसेंच आपण वैभव मिळवावें व तें परोपकारार्थ देऊन टाकावें हा बोध मीं सूर्यापासून घेतला. अति स्नेह कोणावर करूं नये हा बोध मीं कपोत पक्ष्याकडून घेतला. कपोत पक्षी आपल्या पिलांवर असलेल्या अति प्रेमानें जाळ्यांत सांपडलें व पारध्याच्या हातीं लागले. दैवानें मिळेल त्यांत संतुष्ट असावें, व्यर्थ धडपड करूं नये हा बोध मीं अजगरापासून घेतला.

समुद्र हा पावसाळ्यांत वाढणार नाहीं व उन्हाळ्यांत आटणार नाहीं. तो खोल, अनंत आणि अपार असतो; तसेंच आपण असावें, हा बोध मीं समुद्रापासून घेतला. पतंग ज्याप्रमाणें दिव्यावर झडप घालून मरतो त्याप्रमाणें आपण विषयावर आसक्त होऊन मृत्यु ओढवून घेऊं नये, हा बोध मीं पतंगापासून घेतला. मधमाशा पोवळ्यामध्यें मधाचा संग्रह करतात पण तो मधाचा सांठा, मधमाशांना हाकलून, रानावनांत फिरणारे लोक अकस्मात् घेऊन जातात. त्याप्रमाणें आपण केलेल्या वैभवाचा संग्रह लबाड आणि लुटारू लोक लुटून नेतात, म्हणून संग्रह करूं नये, हा बोध मीं मधमाशांपासून घेतला. हत्तिणीच्या स्पर्शासाठीं हत्ती तिच्या मागें लागतो व खड्डयांत पडून बंधनांत सांपडतो त्याप्रमाणें मनुष्यानें स्त्रीच्या पाठीमागें लागून बंधनांत सांपडूं नये, हा बोध मीं हत्तीपासून घेतला. नांदाला लुब्ध होऊन हरिण जसा पारध्याच्या बाणाला बळी पडतो त्याप्रमाणें मनुष्यानें विषयाला लुब्ध होऊन बळी पडूं नये, हा बोध मीं हरिणापासून घेतला. मासा जसा आमिषाच्या लोभानें गळाला लागतो व मरतो त्याप्रमाणें मानवानें विषयाच्या नादीं लागून मरण ओढवून घेऊं नये हा बोध मीं माशापासून घेतला. परपुरुषाची व धनाची आशा करीत पिंगला नांवाची वेश्या रात्रभर जागली व निराश होऊन पश्चात्ताप पावली. त्याप्रमाणें मनुष्यानें खोटया आशेच्या नादानें आयुष्याचा नाश करूं नये, हा बोध मीं पिंगला वेश्येकडून घेतला. टिटवी मांसाचा तुकडा चोंचींत घेऊन उडते व इतर पक्ष्यांच्या आक्रमणाला बळी पडते मांसाचा तुकडा जेव्हां ती खालीं टाकते तेव्हां सुखी बनते. त्याचप्रमाणें मनुष्य आपल्या संग्रहीं असलेल्या धनाचा त्याग करतो तेव्हांच सुखी बनतो (त्यागेनैकेऽमृतत्व-

मानशु:) हा बोध मीं टिटवीपासून घेतला. लहान मूल आईनें तृप्त होईपर्यंत पाजलें आणि दुपट्यावर ठेवलें म्हणजे तें स्वत:शींच खेळतें. स्वत:शींच बोलतें व स्वत:शींच रमतें.त याप्रमाणें आपणहि आत्मस्वरूपांतच नित्य रमावें हा बोध मीं तान्ह्या बाळाकडून घेतला. एका गरीब ब्राह्मणाची कन्या घरीं पाहुणे आले असतां भात कांडूं लागली. तिच्या हातांतील कांकणांचा खळखळाट होऊं लागला. तो दुसऱ्याला ऐकावयास जाऊं नये म्हणून तिनें हातांतील एक-एक कांकण काढून ठेवलें. शेवटीं दोन-दोन कांकणांचा आवाज होऊं लागला म्हणून अखेर तिनें एकेकच कांकण शिल्लक ठेवलें. राजा, अनेकांमध्यें आपण राहिलों तर कलह होतो. एक जरी सोबतीला असला तरी शब्द होतोच. म्हणून आपण अगदीं एकांतांत असावें हें चांगलें. हा बोध मीं त्या कुमारीच्या कांकणांपासून घेतला. सर्प जसा जनसमुदायाला भिऊन आपल्या बिळांत राहतो त्याप्रमाणें आपण गिरिगुहेंत एकटे राहणें बरें हा बोध मीं सर्पापासून घेतला. ज्याप्रमाणें बाणाचें टोंक तयार करतांना लोहार आपलें चित्त एकाग्र करतो तसें आपण चित्त एकाग्र करून ब्रह्मचिंतन करावें हा बोध मीं लोहारापासून घेतला. कुंभारणीनें आपल्या घरांत ठेवलेली अळी जसे कुंभारणीचा ध्यास घेऊन कुंभारीण बनते तसा ब्रह्माचा ध्यास घेणारा योगी ब्रह्मच बनतो हा बोध मीं कुंभारणीपासून घेतला. कोळी (एक प्रकारचा कीटक) आपल्या नाभीपासून तंतु निर्माण करून जाळें विणतो, त्यांत राहतो व शेवटीं तें सर्व आपल्याच स्वरूपांत सामावून घेतो; त्याचप्रमाणें ईश्वर हा स्वत:पासून सृष्टि निर्माण करतो, तिच्यांत राहतो व शेवटीं सर्व सृष्टि आपल्यांत सामावून घेऊन एकटाच उरतो. हा बोध मीं कोळ्यापासून घेतला. फार काय सांगावें ? माझ्या देहाचाच मी विचार करूं लागलों म्हणजे मला त्यापासून वैराग्याचा बोध होतो. दिगंबर अवधूत म्हणाले, 'राजा, तूं देखील माझ्याप्रमाणें सृष्टीचें निरीक्षण कर. त्यांतून बोध घे, आणि सतत ब्रह्मचिंतन कर, म्हणजे तूंहि सर्व दु:खांतून मुक्त होशील. कामविकाराची बाधा तुला होणार नाहीं. क्रोध, लोभ, मोह आणि द्वेष इत्यादि सर्व विकार मावळतील आणि तूं पूर्ण सुखी होशील. दत्तात्रेयांचा बोध ऐकून यदुराजाला अत्यंत समाधान वाटलें. कृतज्ञतेनें त्यानें दिगंबर अवधूताच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला.

आश्विनस्य सिते पक्षे पूर्णिमायां ज्ञवासरे ।
आश्विन्यामुदिते सूर्ये श्रीदत्तोऽभूद्दिगंबर: ।। ४६ ।।

दत्तात्रेयप्रभूंचा हा दिगंबर अवतार आश्विन शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं बुधवारीं अश्विनी नक्षत्रावर झाला. दत्तात्रेय अवतरले ती वेळ बरोबर सूर्योदयाची होती. दत्तात्रेयांचें तें तेजस्वी दिगंबर रूप पाहून यदु राजानें त्यांना नमस्कार केला व दत्तकृपेनें तो पृथ्वीवर पर्यटन करीत राहिला. श्रीदत्तात्रेय प्रभूंच्याच कृपेनें यदुराजाचा वंश भूतलावर उत्कर्षाला प्राप्त झाला. श्रीकृष्णासारखा पूर्णावतार याच वंशांत होऊन हा वंश भूतलावर धन्य झाला.

## प्रल्हादावर अनुग्रह

याच दिगंबर अवतारामध्यें दत्तात्रेयांनीं प्रल्हादावर अनुग्रह केला असल्याचें श्रीमद्‌भागवतामध्यें वर्णन आलेलें आहे. प्रल्हाद हा हिरण्यकशिपूचा पुत्र. याच्या आईचें नांव कयाधु. प्रल्हाद हा कयाधूच्या पोटांत असतांना इंद्रानें दैत्यांचा पराभव करून कयाधूला पळवून नेलें. इंद्र हा गरोदर असलेल्या कयाधूला घेऊन जात असतां नारदांनीं इंद्राला समजावून सांगून कयाधूला आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें. कयाधूला त्यांनीं भक्तीचा महिमा खूप खूप वर्णन करून सांगितला. तो तिच्या पोटांत असलेल्या प्रल्हादानें ऐकला. त्यामुळें प्रल्हाद हा जन्मापासूनच मोटा भगवद्‌भक्त झाला. तो श्रीहरीचें सतत भजन करीत असे. हें हिरण्यकशिपूला रुचलें नाहीं. तो देवांचा वैरी होता. श्रीहरीनें वराहरूपानें अवतरून हिरण्याक्ष दैत्याचा वध केलेला होता. हिरण्याक्ष हा हिरण्यकशिपूचा सख्खा भाऊ असल्यामुळें आपल्या भावाला मारणाऱ्या श्रीहरीशीं, सर्व देवांशीं आणि ऋषिमुनि, भगवद्‌भक्त व ब्राह्मण यांच्याशीं त्यानें वैर केलें. आपल्या पुत्राचा, प्रल्हादाचा तर त्यानें खूपच छळ केला. शेवटीं श्रीहरीनें नरसिंह अवतार घेऊन हिरण्यकशिपूचा वध केला व प्रल्हादाला अनेक वर दिले. त्यांत छत्तीस हजार वर्षें तूं राज्य करशील असाहि वर दिला होता. शुक्राचार्यांनीं प्रल्हादाची मुंज करून त्याला राज्याभिषेकहि केला. प्रल्हादानें उत्तम राज्य केलें. सर्व प्रजाजनांची पित्या-प्रमाणें तो काळजी वहात असे. अन्न, वस्त्र, आरोग्य, आश्रय व शिक्षण या गोष्टींची प्रल्हादानें कोणालाहि उणीव भासूं दिली नाहीं. अशा रीतीनें तो राज्य करीत असतां त्याच्या मनाला समाधान वाटेना. नारदाच्या उपदेशानें तो मोठा भगवद्‌भक्त झाला खरा पण आत्मज्ञानाच्या अभावीं त्याच्या मनाला शांति व समाधान लाभलेलें नव्हतें. एके दिवशीं उद्विग्न चित्तानें तो मृगयेच्या निमित्तानें घराच्या बाहेर पडला. जंगलांतून आणि पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांतून इतस्ततः भटकूं लागला. सुदैवानें सह्याद्रीच्या खोऱ्यांत कावेरी नदीच्या कांठीं जमिनीवर शांत झोंपलेले दिगंबर अवधूत त्याला दिसले. त्या अवधूतांच्या अंगावर धूळ सांठलेली होती, पण शिखा आणि यज्ञोपवीत या चिन्हां-वरून तो ब्राह्मण असावा असा तर्क केला. त्याचें शरीर धुळीनें धूसर दिसत असलें तरी एक प्रकारचें अनिर्वचनीय ब्रह्मतेज त्याच्या मुखावर झळकत होतें. अवधूतांची स्वारी उठून बसल्यानंतर प्रल्हादानें त्याला आदरानें वंदन केलें व विचारलें.

प्रल्हाद म्हणाला, ' महाराज, आपल्याजवळ तर सुखाची कांहींच साधनसामग्री नाहीं. राहण्याची व खाण्यापिण्याचीहि कांहीं व्यवस्था दिसत नाहीं. मग आपलें शरीर सुखी असलेल्या श्रीमंताप्रमाणें धष्टपुष्ट कसें दिसत आहे ? आपण कांहींच उद्योग करीत असल्याचें दिसत नाहीं. आपल्याला कशाचीच कांहीं काळजी वाटत नहीं का ? एवढी गाढ झोंप आपल्याला कशी लागते ? उद्योगानें पैसा मिळतो. पैशानें खाण्या-पिण्याची व्यवस्था राहते. मनुष्याच्या अंगीं लागतें व शरीर धष्टपुष्ट होतें. आपल्या-

जवळ तर हें कांहींच दिसत नाहीं. मग आपल्याला अंगीं कसें लागतें व आपण सुखानें कसें झोपतां, हे सांगण्यासारखें असेल तर अवश्य सांगा.' हें प्रल्हादचे प्रश्न ऐकून दत्त अवधूत संतुष्ट झाले व म्हणाले, "बाळा प्रल्हादा ! ज्याच्याकरितां प्रत्यक्ष परमात्मा नरसिंहरूपानें अवतरला तोच तूं आहेस. तुझ्यावर नारदमुनींचा अनुग्रह झाल्यामुळें तूं श्रीहरीचा उत्तम भक्त झालास. तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें मी सांगतों, ऐक. मंदमति मानव अज्ञानानें व मोहानें भटकत भटकत तृष्णा नदीच्या म्हणजे आशेच्या प्रवाहांत सांपडतो व या मृत्युलोकामध्यें येतो. हा मृत्युलोक स्वर्गाचें, नरकाचें व मुक्तीचेंहि द्वार आहे. या मृत्युलोकामध्यें अनेक लोक सुखाकरितां प्रयत्न करीत असतात. पण त्यांच्या प्रयत्नाला यश येत नाहीं. उलट दुःखच पदरांत पडतें. हें पाहून मी उबगलों व या विषयसुखाचा नाद सोडून आत्मस्वरूपाचा विचार करूं लागलों. चित्ताचे क्लेश नाहींसे झाले की स्वयंप्रकाश व सुखस्वरूप असलेल्या आत्म्याचा साक्षात्कार होतो; आणि आत्मा हा पूर्ण सुखस्वरूप असल्यामुळें त्याच्या साक्षात्कारानें मानव हाहि पूर्ण सुखी बनतो. 'तरति शोकमात्मवित्' हें श्रुतिवचन प्रसिद्धच आहे. विषयापासून मिळणारें सुख हें शेवटीं दुःख देणारें असतें व यथार्थ आत्मसाक्षात्कारानें व्यक्त होणारें सुख हें अविनाशी असतें. हें जाणूनहि दुर्दैवी मनुष्य उपेक्षा करतो व दुःख भोगीत राहतो. तो पुन्हां घोर संसाराला प्राप्त होतो. हें लक्षांत घेऊन मी वागत असल्यामुळें मी सदा-सर्वकाळ आनंदांत निमग्न असतों. मला कशाचीच काळजी वाटत नाहीं. त्यामुळें मी जें खाईन व जें पिईन तें मला मानवतें. हेंच माझ्या आरोग्याचें, प्रसन्नतेचें व आनंदाचें मूळ आहे. तान्हेला मनुष्य शेवाळ्यानें झांकलेलें पाणी सोडून मृगजळाकडे धांव घेतो. त्याप्रमाणें अज्ञानानें आत्म्याची उपेक्षा करून जीव हा सुखाकरितां विषयाकडे धांव घेत असतो. ज्यानें मनाला व इंद्रियांना जिंकलेलें असतें, जो विवेकी व विरक्त असतो, त्याला कशाचेंहि भय उरत नसतें. तो निर्भय असल्यामुळें सुखानें झोंपतो." असें सांगून यदुराजाप्रमाणेंच प्रल्हादालाहि आपल्या चोवीस गुरूंपैकीं कांहीं गुरूंपासून घेतलेला बोध निवेदन केला.

"यदृच्छेनें खावयास व प्यावयास मला जें मिळेल त्यांत मीं संतुष्ट असतों. मला कधीं असंतोष वाटत नाहीं. त्यामुळें मी सुखी आहें. पुराणाची पोळी असो अथवा शिळ्या भाकरीचा तुकडा असो. शेंकडों ठिगळांची वाकळ असो अथवा जरीची शाल असो. हत्ती-घोडा असो अथवा पायी चालण्याचा प्रसंग असो. गाद्या-गिरद्या असोत अथवा जमीन-धोंडा असो; हें सर्व मी सारखेंच मानतों. मला कशाचाहि खेद वाटत नाहीं व सुखानेंहि मी मोहून जात नाहीं. मी कोणाची स्तुति अथवा निंदा करीत नाहीं. मी सदासर्वकाळ सर्वांच्या सुखाचीच चिंता करीत असतों. मी आणि इतर असा भेदभाव माझ्यामध्यें नाहीं. मी सर्वत्र समदर्शी असल्यामुळें मला कोणी शत्रु अथवा मित्र असे कांहीं वाटत नाहीं. राजा प्रल्हादा ! तूं तर श्रीहरीचा अनन्य भक्त आहेस. जा, श्रीहरीनें दिलेलें राज्य सुखानें सांभाळ. सर्व जन श्रीहरिस्वरूप आहेत असें मान

मी सांगितलेलें रहस्य लक्षांत घेऊन वाग. अंतर्मुख हो. सतत आत्मचिंतन करीत रहा. अशा रीतीनें वागल्यास तुला उद्वेगाचें कांहींच कारण उरणार नाहीं. तूं पूर्ण सुखी होशील." याप्रमाणें दत्तात्रेयांचा उपदेश ऐकून प्रल्हादला अत्यंत आनंद झाला. दत्तात्रेयांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात करून त्यांच्या आज्ञेनें तो आपल्या राजधानीस परत गेला. सर्वत्र समबुद्धि ठेवून निरपेक्ष वृत्तीनें त्यानें चिरकाल राज्य केलें. शेवटीं आपला पुत्र जो विरोचन त्याला राज्य देऊन टाकलें. सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांच्या उपदेशाप्रमाणें सर्वसंगविनिर्मुक्त होऊन जीवन्मुक्त अवधूताप्रमाणें भूतलावर यदृच्छेनें फिरत राहिला.

राजा यदु आणि भगवद्भक्त राजा प्रल्हाद यांच्यावर दत्तात्रेयांनीं दिगंबररूपानें दर्शन देऊन जसा अनुग्रह केला त्याचप्रमाणें स्वायंभुव मन्वंतरांतील सुप्रसिद्ध साध्यदेव यांच्यावरहि अनुग्रह करून त्यांना कृतार्थ केलेलें आहे. हा इतिहास, पुराणवाङ्मयामध्यें प्रसिद्ध आहे. प्राचेतस दक्षप्रजापतीला ज्या अनेक कन्या होत्या त्यांत साध्या नांवाची एक कन्या होती. ती ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असलेले धर्मऋषि यांना अर्पण केलेली होती. धर्मऋषींपासून साध्येच्या पोटीं जे पुत्र जन्माला आले ते साध्यदेव या नांवानें ओळखले जात. साध्यदेवांचा अधिकार फार मोठा होता. त्यांची देवांमध्यें गणना केली जात होती. त्यांना यज्ञामध्यें भागहि मिळत होता. या सर्व गोष्टी असूनहि साध्यदेवांच्या मनाला समाधान वाटत नव्हतें. शेवटीं दत्तात्रेयप्रभूंनीं त्यांना दर्शन देऊन उपदेश केला.

तथैव साध्यदेवेभ्यो भगवानाह हृद्धिया ।
धृतिसत्यशमाद्यैर्हृद्‌ग्रंथिं छित्त्वा शमं नयेत् ।। १ ।।

भगवान् दत्तात्रेयप्रभु यांनीं साध्यदेव हे आपल्याच अंतःकरणांतले, आपलेच आहेत अशा बुद्धीनें साध्यदेवांना म्हणाले, 'किती जरी मानमरातब अथवा मोठेपणा मिळाला तरी त्यानें अंतःकरणाचें समाधान होत नसतें. अंतःकरणाच्या शांतीसाठीं धैर्य, सत्य, शम म्हणजे मनाचा निग्रह, दम म्हणजे इंद्रियांचा निग्रह, आत्मप्रवणता म्हणजे निरंतर आत्मस्वरूपाच्या विचारांत तत्पर असणें हींच मनाच्या शांतीचीं साधनें आहेत. अंतःकरणांत असलेली अहंकाराची गांठ विवेकानें मोकळी करून शुद्ध बुद्धीनें विश्वव्यापी परमेश्वराच्या स्वरूपाचा विचार करावा. अति सूक्ष्मविचाराअंतीं परमेश्वराचें दर्शन घडेल तेव्हांच मनाला शांति मिळेल. तंतु जसे पटामध्यें आडवे-उभे ओतप्रोत भरलेले असतात त्याचप्रमाणें परमात्मा हा विश्वामध्यें खालीं, वर, मागें, पुढें सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे. सर्व विश्व परमात्मस्वरूपामध्येंच अधिष्ठित असतें. विश्व परमात्म्याहून निराळें असूं शकत नाहीं, व विश्वाहून परमात्म्याला निराळें पाहतां येत नाहीं. हें जेव्हां बुद्धीला पटेल त्याच वेळेला मनाला शांति मिळेल.

व्यवहारांत वागतांना गर्व सोडून द्यावा. कोणाचीहि निंदा करूं नये. शिव्याशाप देऊं नयेत. वेडेंवाकडें बोलूं नये. दुसऱ्यांनीं केलेला आपला व्यक्तिगत अपमान सहन करावा. कोणाशींहि द्रोह करूं नये. द्वेष, क्रोध, ईर्षा व अभिलाषा हे विकार जिंकावेत. कारण ते मोक्षसुखाचे वैरी आहेत. वस्त्राला जसा रंग द्यावा तसें तें बनतें. त्याचप्रमाणें मनालाहि जशी संगति द्यावी तसें तें बनतें. सज्जनांच्या संगतीनें तें चांगलें बनतें तर दुर्जनांच्या संगतीनें तें वाईटहि बनतें. आपण स्वतः सहनशीलतेनें वागावें. सुखें, दुःखें हीं प्रारब्धाधीन असतात, हें लक्षांत घेऊन वागावें. दुसऱ्याला दोष देऊं नये. गोड बोलावें व सत्य बोलावें. कोणाचाहि मर्मभेद करूं नये. आपला शब्द राखावा. दुसऱ्याचें देणें टाळूं नये. निंदा, स्तुति, उत्कर्ष व अपकर्ष या अवस्थेंत चित्ताला सम ठेवावें. हीं सर्व समाधानाची सामग्री मीं तुम्हांला सांगितली आहे. याप्रमाणें वागा म्हणजे मनाला शांति मिळते." असा बहुमोलाचा उपदेश करून दत्तात्रेयांनीं साध्यदेवाच्या मनाचें समाधान केलें. हा उपदेश सर्वांच्या मनाला समाधान देणारा असल्यामुळें सर्वांनींच त्यापासून बोध घ्यावा व त्याप्रमाणें वागावें.

कार्तवीर्य सहस्त्रार्जुन यानें दत्तात्रेयांची स्मरणभक्ति केली व तो कृतार्थ झाला अलर्क राजानें वंदनभक्ति केली व तो धन्य झाला. त्याचप्रमाणे आयुराजानें दत्तात्रेयांची दास्यभक्ति केली व आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. भगवान् श्रीपरशुराम यांनीं दत्तात्रेयांची सख्यभक्ति केली व ते दत्तकृपेनें कृतकृत्य झाले. विष्णुदत्त ब्राह्मणाने दत्तात्रेयप्रभूंची चरणसेवा केली व आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. यदुराजानें दत्तात्रेयांची अर्चन भक्ति केली व संसारबंधनांतून तो मुक्त झाला. वेदधर्म नांवाच्या ब्राह्मणानें कीर्तनभक्ति केली. दीपक नांवाच्या भक्तानें श्रवणभक्ति केली व ते दोघेहि उत्तमपदाला गेले. भगवान् श्रीदत्तात्रेयप्रभु म्हणाले, " हे साध्यदेवहो ! तुम्हीहि माझी आत्मनिवेदनभक्ति करून इतरांप्रमाणें आपले मनोरथ पूर्ण करून घ्यावेत हेंच माझें तुम्हांला सांगणें आहे. " दिगंबर अवधूतांचा हा उपदेश ऐकून साध्यदेवांना समाधान वाटलें. दत्तात्रेयांच्या चरणीं प्रेमानें प्रणिपात करून ऐक्यभावानें दत्तप्रभूंचे चिंतन करीत ते आपल्या स्थानाला निघून गेले.

## अर्घ्यदानाचे श्लोक

योगपालाय देवाय दत्ताय परमात्मने ।
दिगंबराय शांताय कर्मणाऽर्घ्यं ददास्यहम् ।। १ ।।

दुःखदुर्गतिनाशाय दत्ताय परमात्मने ।
योगारिष्टविनाशाय कर्मणाऽर्घ्यं ददास्यहम् ।। २ ।।

योगारिष्टविनाशाय योगमायाधराय ते ।
दिगंबराय देवाय कर्मणाऽर्घ्यं ददास्यहम् ।। ३ ।।

योगविद्येचें परिपालन करणारे व स्वतः योगाचें अनुष्ठान करणारे असे परमात्मस्वरूप असलेले देवाधिदेव भगवान् श्रीदत्तात्रेय यांना मी या पूजाप्रसंगीं अर्घ्यप्रदान करीत आहें.

भक्तजनांचीं दुःखें व त्यांना मिळणारी दुर्गति यांचा नाश करून त्यांचेंच संरक्षण करणारे आदिगुरु भगवान् श्रीदत्तात्रेय हे प्रत्यक्ष परब्रह्म परमात्मस्वरूप आहेत. योगाचा अभ्यास करीत असतांना येणाऱ्या सर्व संकटांचा ते निरास करीत असतात. त्यांना मी भक्तिभावानें हा अर्घ्य समर्पण करीत आहें.

योगानुष्ठानांतील विघ्नें दूर करून भक्तजनांवर अनुग्रह करण्याकरितां योगमायेचा अवलंब करणारे दिगंबर अवधूत असे तुम्ही सद्गुरु दत्तात्रेय, तुम्हांला मी प्रेमानें पूजाप्रसंगीं अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें पूजेच्या शेवटीं तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् तीन अर्घ्य समर्पण करावेत. या प्रसंगीं वस्त्र, माला अथवा विभूति समर्पण करावी. शेवटीं नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प करून सर्वांना तीर्थप्रसाद द्यावा, आणि दिगंबर अवधूतांच्या जयजयकारांत हा जयंतीमहोत्सव साजरा करावा.

## श्रीदत्तात्रेयांचा सोळावा अवतार

भगवान् सद्गुरु श्रीदत्तात्रेय यांचा सोळावा अवतार श्रीकृष्णश्यामकमलनयन या नांवानें ओळखला जातो. आदिगुरु श्रीदत्तात्रेय अवधूत यांनीं योगिराज, अत्रिवरद इत्यादि अनेक अवतार घेऊन या भूतलावर ज्ञान, भक्ति आणि वैराग्य, त्याचप्रमाणें अष्टांग योग या सर्व साधनांचा अधिकारपरत्वें भक्तजनांना उपदेश करून कृतार्थ केलें. त्यांना उत्तम पदाला पोहोंचविलें. आता भगवान् दत्तात्रेय हे स्वतःला कृतकृत्य समजून ज्ञानरूपी पर्यंकावर पहुडले आणि योगनिद्रेचा अवलंब करून विश्रांति घेऊं लागले. इतक्यांत अनेक भक्त व अनेक शिष्य दत्तात्रेयप्रभूंच्या दर्शनासाठीं त्या ठिकाणीं एकत्र जमले. ते सर्व आदिगुरूंच्या कृपेनें कृतार्थच झालेले होते. त्या सर्वांनीं गुरुदेवांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला. ते सर्वांगसुंदर असलेल्या दत्तप्रभूंकडे पाहात आहेत, तोंच पाहतां पाहतां श्रीकृष्णश्यामकमललोचन या स्वरूपांत त्यांना दत्तगुरूंचें दर्शन झालें.

कार्तिके शुद्धपक्षे तु द्वादश्यां बुधवासरे ।
रेवत्यां भास्वदुदयवेलायां जगदाश्रयः ॥ ५ ॥
भक्तानां पश्यतां तत्र प्रादुरासीत्परात्परः ॥

दत्तात्रेयांचा हा अवतार कार्तिक शुद्ध द्वादशीच्या दिवशीं, बुधवारीं, रेवती नक्षत्रावर भगवान् सूर्यनारायण उदयाला येत असतांनाच झाला. सर्व विश्वाचें अधिष्ठान असलेला तो परमात्मा अवधूत श्रीकृष्णश्यामकमललोचन या रूपानें प्रकट

होतांच सर्वांनीं जयजयकार करून त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली. दत्तगुरूंचें तें रूप इंद्रनीलमण्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी होतें. नीलवर्ण असलेल्या त्यांच्या त्या अंगकांतीनें दाही दिशा उज्ज्वल दिसत होत्या. त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर हा जणूं कांहीं नील-वर्ण प्रतिसूर्यच उदयाला आला आहे कीं काय असें भासत होतें.

अपरो वासरमणिराभातीवोदयं गतः ।
स कृष्णःश्यामकमलनयनो ध्यानमंगलः ।। ७ ।।

केवलं ध्यानमात्रेण सर्वाभीष्टप्रदो नृणाम् ।

त्यांचें तें रूप ध्यान करणाऱ्यांचें कल्याण करणारें होतें. मनुष्यानें केवळ या रूपाचें ध्यान केलें तरी त्याचे सर्व मनोरथ सफल होतील असेंच तें रूप होतें. त्या रूपामध्यें सर्व देवतांचा समावेश झालेला होता. सर्व तीर्थेंहि सामावलेलीं होतीं. त्या रूपांत सर्व धर्मांचा समन्वय झालेला होता. सर्व सुखें त्या रूपांत प्रतीतीला येत होतीं. तें रूप आनंदमय होतें, सत्‌चित्‌स्वरूप होतें. तें रूप पाहिल्यानें सर्व संसारयातना मिटत होत्या, पुनःपुन्हां जन्माला येणें व मरणें ही यातायातहि संपत होती. असा त्या रूपाचा महिमा शास्त्रांनीं व तत्त्ववेत्त्यांनीं मुक्तकंठानें गाइलेला आहे. श्रीकृष्ण-श्यामकमलनयन सर्व भक्तजनांना उद्देशून बोलत आहेत आणि भक्तजन वागी-श्वरेश्वराचे ते अमृताहूनहि गोड असलेले शब्द श्रवण करण्यांत तन्मय झालेले आहेत. देवदेवाची ती वाणी मेघगर्जनेप्रमाणें गंभीर होती. भगवान् दत्तात्रेय म्हणाले, " भक्तजनहो ! माझे दोन शब्द सावधान चित्तानें तुम्ही श्रवण करा —

सारात्सारं समुद्‌धृत्य दत्तं वः शीघ्रमोक्षदम् ।
वैदिकः शाश्वतो धर्म इष्टदोऽनिष्टवारकः ।। ११ ।।

अस्यैव योगरूढित्वान्नामान्वर्थकमुत्तमम् ।
अस्यैव शब्दमूलत्वान्महत्त्वं नित्यताऽपि च ।। १२ ।।

अनेनाघं निवार्याशु मद्‌ध्यानप्रतिबंधकं ।
ततोऽनायासतो ध्यात्वा मत्सायुज्यं गमिष्यथ ।। १३ ।।

एवमुक्त्वा स भगवान् विरराम तदाऽपि ते ।
अंगीचक्रुस्तथेतीशवचनं शिरसा मुदा ।। १४ ।।

तं कृष्णं श्यामकमललोचनं शांतविग्रहम् ।
संपूज्य परया भक्त्या दद्यादर्घ्याणि भाविकः ।। १५ ।।

दत्तात्रेय म्हणाले, "मी तुम्हांला जें सांगत आहें तें सर्व शास्त्रांचें आलोडन करून काढलेल्या साराचेंहि सार आहे. तें तुम्हीं आचरणांत आणलें असतां तुम्हांला सत्वर मोक्षसुखाची प्राप्ति करून देणारें आहे. असेंच हें तत्त्व मीं तुम्हांला दिलेलें आहे. तें तत्त्व म्हणजे धर्म होय. वेदांमध्यें प्रतिपादन केलेला धर्म हाच शाश्वत म्हणजे

नित्य असून तोच नित्य व उत्तम फलाची प्राप्ति सत्वर करून देणारा आहे. हा धर्म ज्याप्रमाणें इष्ट फलाची प्राप्ति करून देतो त्याचप्रमाणें .तो सर्व अनिष्टांचेंहि निरसन करतो. धर्म या शब्दाची मूलभूत व्युत्पत्ति म्हणजे अवयवार्थ आणि रूढि म्हणजे लोकप्रसिद्ध अर्थ या दोन्ही दृष्टींनीं धर्म हे नांव अत्यंत अन्वर्थक म्हणजे सार्थ आहे. वेद हे धर्माचा मूलभूत आधार आहेत; म्हणूनच धर्माला महत्त्व आणि नित्यत्व प्राप्त झालेलें आहे. ज्या तत्त्वामुळें आपल्या मनाची आणि समाजाची धारणा होते, अर्थात मनाला व समाजाला ज्या तत्त्वाच्या आचरणामुळें आणि मननामुळें धैर्य आणि स्थैर्य प्राप्त होतें त्याला धर्म असें म्हणतात."

भगवान् दत्तात्रेय म्हणतात, "या धर्माच्याच आधारानें माझ्या ध्यानाला प्रतिबंध करणारीं जीं विघ्नें असतील त्या विघ्नांना ताबडतोब बाजूला सारून त्यानंतर अनासायानें तुम्हीं माझें ध्यान करा. मी दत्त आहें. केवळ अत्रिमुनीच नव्हेत तर माझें अनन्यप्रेमानें चिंतन करणारे प्रेमळ भक्त त्यांनाहि मी आत्मसमर्पण करीत असल्यामुळें त्यांचाहि पण मी दत्तच आहें. मी जसें भक्तांना आत्मसमर्पण करतों तसेंच भक्तांनींहि मला आत्मसमर्पण करावें. अर्थात् भक्तांनींहि दत्त बनावें. मी भक्तांचा दत्त व दत्त माझे भक्त याप्रमाणें माझ्यांत आणि भक्तांत अंतर असतां कामा नये. असें अनन्य ध्यान जे करतात त्यांना मी सायुज्य देतों. सायुज्य म्हणजे एकरूपता. अर्थात् त्यांच्यांत व माझ्यांत पूर्णपणें एकरूपता प्राप्त होते. तात्पर्य, अनन्य भक्तीनें तुम्ही माझ्याशीं एकरूप व्हावें आणि मी तुमच्याशीं एकरूप होईन." याप्रमाणें बोलून श्रीकृष्णश्यामकमलनयन थांबताच सर्व भक्तांनीं ठीक आहे असें म्हणून त्यांना साष्टांग प्रणिपात केला.

ज्यांची आकृति अत्यंत शांत आहे अशा त्या श्रीकृष्णश्यामकमललोचन दत्तात्रेय प्रभूंची सांगोपांग पूजा करून त्यांना नैवेद्याच्या पूर्वक्षणीं अर्घ्य समर्पण करावेत.

## अर्घ्यदानाचे श्लोक

सर्वसिद्धांतसिद्धाय दत्ताय परमात्मने ।
कृष्णाय पद्मनेत्राय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ॥ १ ॥

अखंडाद्वैतरूपाय निर्गुणाय गुणात्मने ।
कृष्णाय पद्मनेत्राय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ॥ २ ॥

भक्तप्रियाय देवाय योगनिद्रातुराय च ।
कृष्णाय पद्मनेत्राय कर्मणाऽर्घ्यं ददाम्यहम् ॥ ३ ॥

सर्व सिद्धान्तांनीं ज्याचा निर्विवाद अंगीकार केला आहे त्या परमात्मस्वरूप असलेल्या श्रीकृष्णश्यामकमलनयन भगवान् दत्तात्रेय यांना मी पूजासमयीं अर्घ्य समर्पण करीत आहें.

जो निरुपाधिक अखंड अद्वैतरूप आहे, जो निर्गुण असूनहि भक्तांच्या काजासाठीं मायेच्या गुणांचा अवलंब करून गुणवान् बनला तो श्रीकृष्णश्यामकमललोचन भगवान् दत्तात्रेय परमात्मा, त्याला मी पूजाप्रसंगीं अर्घ्यप्रदान करीत आहें.

योगनिद्रेमध्यें निमग्न असलेले भक्तप्रिय भगवान् दत्तात्रेय श्रीकृष्णश्यामकमलनयन भगवान् दत्तात्रेय परमात्मा त्याला मी पूजाप्रसंगीं अर्घ्यप्रदान करीत आहें.

याप्रमाणें तीन श्लोकांनीं पृथक् पृथक् अर्घ्य दिल्यानंतर रुप्याचें दान करून ब्राह्मणांना भोजन द्यावें. वैश्वदेव, नैवेद्य, आरती व मंत्रपुष्प करून दत्तप्रभूंच्या जयजयकारांत हा समारंभ समाप्त करावा. ॐ तत्सत् ।

## सोळा अवतारांचीं क्रमशः नांवें

दत्तात्रेयप्रभूंचा पहिला अवतार कार्तिक शुद्ध पौर्णिमेस झाला. याला योगिराज असें नांव दिलेलें आहे.

दुसरा अवतार कार्तिक वद्य प्रतिपदेस झालेला असून त्याला अत्रिवरद असें नांव दिलेलें आहे.

तिसरा अवतार कार्तिक वद्य द्वितीयेला झालेला असून तो दत्तात्रेय या नांवानें ओळखला जातो.

चौथा अवतार मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस झाला. याला कालाग्निशमन असें म्हणतात.

पांचवा अवतार मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस झाला. याला योगिजनवल्लभ असें म्हणतात. हीच दत्तात्रेयांची जयंती म्हणून सर्वत्र साजरी केली जाते.

सहावा अवतार पौष शुद्ध पौर्णिमेस झाला असून याला लीलाविश्वंभरदत्त असें म्हणतात.

दत्तप्रभूंचा सातवा अवतार माघ शुद्ध पौर्णिमेस झाला असून याला सिद्धराज असें म्हणतात.

आठवा अवतार फाल्गुन शुद्ध दशमीस झाला. हा ज्ञानसागर या नांवानें ओळखला जातो.

नववा अवतार चैत्र शुद्ध पौर्णिमेस झाला. तो विश्वंभरावधूत या नांवानें प्रसिद्ध आहे.

दत्तगुरूंचा दहावा अवतार वैशाख शुद्ध चतुर्दशीस झाला असून त्याला मायामुक्त अवधूत असें म्हणतात.

अकरावा अवतार ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस झाला असून तो मायायुक्त अवधूत या नांवानें प्रसिद्ध आहे.

दत्तगुरूंचा बारावा अवतार आषाढ शुद्ध पौर्णिमेस झाला असून त्याला आदि-गुरु असें नांव देण्यांत आलेलें आहे. ही पौर्णिमा गुरुपौर्णिमा या नांवानें सर्वत्र ओळखली जाते.

आदिगुरूंच्या अवतारामुळेंच या पौर्णिमेला गुरुपौर्णिमा असें नांव दिलें गेलें असावें. रामनवमी, कृष्णाष्टमी याप्रमाणें गुरुपौर्णिमा असें नांव आदिगुरूंच्या जन्मामुळें या पौर्णिमेस पडणें हें स्वाभाविक आहे. नंतर ही पौर्णिमा व्यासमुनींच्या ज्ञानदानाच्या क्षेत्रांतील विशेष कार्यामुळें व्यासपौर्णिमा या नांवानेंहि ओळखली जाऊं लागली.

दत्तात्रेयांचा तेरावा अवतार श्रावण शुद्ध अष्टमीच्या दिवशीं झाला असून त्याला शिवरूप असें म्हणतात.

दत्तात्रेयांचा चौदावा अवतार भाद्रपद शुद्ध चतुर्दशीस झालां असून त्याला देवदेव अथवा देवदेवेश्वर असें म्हणतात.

दत्तात्रेयांचा पंधरावा अवतार आश्विन शुद्ध पौर्णिमेस झाला असून त्याला दिगंबर हें नांव देण्यांत आलें.

सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा सोळावा अवतार कार्तिक शुद्ध दशीस झाला असून तो श्रीकृष्णश्यामकमलनयन या नांवानें ओळखला जातो.

असे हे दत्तात्रेय यांचे सोळा अवतार आहेत. या अवतारांचीं वर वर्णन केलेलीं चरित्रें हीं दत्तात्रेयांचींच चरित्रें आहेत, हें भक्तजनांनीं लक्षांत घ्यावें.

भक्तजनांच्या सोयीसाठीं आम्ही सोळाहि अवतारांचीं चतुर्थ्यंत नांवें खालीं देत आहोंत.

ॐ योगिराजाय नमः। ॐ अत्रिवरदाय नमः। ॐ दत्तात्रेयाय नमः। ॐ कालाग्निशमनाय नमः। ॐ योगिजनवल्लभाय नमः। ॐ लीलाविश्वंभराय नमः। ॐ सिद्धराजाय नमः। ॐ ज्ञानसागराय नमः। ॐ विश्वंभराय नमः। ॐ मायामुक्तावधूताय नमः। ॐ मायायुक्तावधूताय नमः। ॐ आदिगुरवे नमः। ॐ शिवरूपाय नमः। ॐ देवदेवाय, अथवा देवदेवेश्वराय नमः। ॐ दिगंबराय, अथवा दिगंबरावधूताय नमः। ॐ श्रीकृष्णश्यामकमलनयनाय नमः।

याप्रमाणें नांवें घेऊन त्या त्या अवताराची पूजा करावी. 'द्रां' हें दत्तात्रेयांचें मुख्य बीजाक्षर आहे. हा दत्तात्रेयांचा एकाक्षरी मंत्रहि आहे. अधिकारी लोकांनीं ॐ च्या पुढें द्रां हें बीजाक्षर उच्चारून गुरूंनीं उपदेशिल्याप्रमाणें वर दिलेल्या नमोंत नांवाचा मंत्रजपहि करण्याची पद्धति आहे.

दत्तात्रेयप्रभूंच्या या अवतारांपैकीं कांहीं अवतार बारा महिन्यांचे अधिपति मानलेले आहेत. तो क्रम असा — मार्गशीर्ष महिन्याचे अधिपति प्रत्यक्ष दत्तात्रेयच आहेत; तर लीलाविश्वंभरदत्त हे पौष महिन्याचे अधिपति होत. माघ महिन्याचे

अधिपति सिद्धराज असून ज्ञानसागर हे फाल्गुन महिन्याचे अधिपति मानले जातात. विश्वंभरदत्त चैत्र महिन्याचे अधिपति असून मायामुक्त अवधूत हे वैशाख महिन्याचे अधिपति होत. मायायुक्त अवधूत हे ज्येष्ठ महिन्याचे अधिपति मानले आहेत तर आषाढ महिन्याचे अधिपति आदिगुरु दत्तात्रेय होत. श्रावण महिन्याचे अधिपति शिवरूप दत्तात्रेय असून भाद्रपद महिन्याचे आधिपत्य देवदेवेश्वरांकडे आहे. आश्विन महिन्याचे अधिपति दिगंबर अवधूत असून योगिराज हे कार्तिक महिन्याचे अधिपति आहेत. तसेच अधिक महिना असेल त्या वेळीं त्या अधिक मासाचे अधिपति अत्रिवरद दत्तात्रेय हे समजावेत. ज्या महिन्याचे जे अधिपति असतील त्यांचा नाममंत्र गुरु-मुखांतून घेऊन भोजनापूर्वी त्याचा जप करावा. याप्रमाणें बारा वर्षे अनुष्टान करून तज्ज्ञ ब्राह्मणाकडून त्याचें उद्यापनहि करावें अशी संप्रदाय पद्धति आहे. हें सर्व वर्णन प. प. वासुदेवानंदसरस्वती महाराज यांच्या श्रीदत्तात्रेय षोडषावतार जयंती-कल्प या ग्रंथांत आलेलें आहे.

---

# पंचमस्कन्ध

## भगवान् श्रीदत्तात्रेय आणि नाथसंप्रदाय

नाथसंप्रदायामध्यें दत्तात्रेयांना फार मोठें स्थान आहे. योगविद्या, मंत्रसिद्धि सिद्धिसामर्थ्य, वैराग्य, तपश्चर्या आणि अध्यात्मज्ञान या सर्व गुणांनीं नाथसंप्रदायांतील लोक पूर्ण समर्थ होते. आपल्या अलौकिक सामर्थ्यानें नाथसंप्रदायांतील लोक भारताच्या इतिहासांत फारच चमकलेले आहेत. या संप्रदायाचा उगम मध्ययुगीन काळांत सामान्यतः इसवी सनाच्या आसपास झालेला आहे. नाथसंप्रदायाचें उगमस्थान आदिनाथ भगवान् शंकर हेच आहेत असें आढळून येतें.

सृष्टीच्या आरंभकालीं ब्रह्मदेवाचा आविर्भाव झाला. पाठोपाठ साठ हजार वालखिल्य ऋषि जन्माला आले. ते मोठे तपस्वी व सूर्योपासक होते. ह्या वालखिल्यांच्या तेजोबीजापासून यमुनाजळांत वास्तव्य करणाऱ्या मत्स्यीच्या पोटीं गर्भ राहिला. तोच पुढें कालांतरानें मत्स्येन्द्रनाथ म्हणून प्रसिद्धीस आला आणि मुलगी मत्स्यगंधा हिनेंच पराशरऋषींना वरून व्यासमहर्षींना जन्म दिला.

एकदां यमुनेच्या कांठीं शिव-पार्वती हीं एकांतामध्यें सहज बसलीं असतां त्यांचा ज्ञानसंवाद सुरू झाला. पार्वतीनें अनेक प्रश्न विचारावेत आणि शंकरांनीं त्यांचीं उत्तरें द्यावींत असा प्रसंग होता तो. शंकरांच्या कथनाच्या ओघांत पार्वतीचे डोळे मिटूं लागले व तिला झोंप येऊं लागली. तेव्हां मत्स्यीच्या उदरांत असलेल्या अर्भकानें त्या प्रश्नांचीं उत्तरें ऐकून हुंकार देण्यास प्रारंभ केला. शंकरांच्या लक्षांत ही गोष्ट आली तेव्हां शंकरांनीं 'कोण हुंकार देत आहे त्यानें माझ्यापुढें प्रकट व्हावें' अशी आज्ञा केली. तेव्हां मत्स्येन्द्रनाथ प्रकट झाले आणि शिव-पार्वती-संवादाचा सर्व अनुवाद त्यांनीं शंकरांना निवेदन केला व त्याचबरोबर अत्यंत प्रभावी असलेल्या राममंत्राच्या जपाचाहि महिमा सांगितला.

### मत्स्येन्द्रनाथांचा जन्म

मासामाजीं मार्गशीर्ष मास । शुद्ध पक्ष गुरुवारास ।
श्रवणनक्षत्र माध्यान्हास । मत्स्येन्द्रनाथ अवतरले ।।
आदिनाथलीलामृत

भगवान् शंकर म्हणाले, 'अप्रत्यक्षपणें माझा हा उपदेश ऐकलास, पण प्रत्यक्ष गुरुमुखांतून ज्ञान ऐकल्याशिवाय त्या ज्ञानाचें व मंत्राचें फल मिळणार नाहीं. तेव्हां तूं दत्तात्रेयांच्या मुखांतून हें ज्ञान ऐकावें व मंत्रहि ऐकावा.'

यावर मत्स्येन्द्र म्हणाले, 'मला गुरु कोठें भेटतील तें सांगा.' तेव्हां शंकर म्हणाले, 'तूं बदरिकाश्रमामध्यें जा. तेथें बदरिनारायणाजवळ भगवान् दत्तात्रेय

वास्तव्य करीत आहेत. त्यांच्याकडून तूं उपदेश घे.' असें सांगून शंकरांनीं मत्स्येन्द्रनाथाला बदरिकाश्रमाकडे पाठविलें व आपणहि पाठोपाठ मत्स्येन्द्रनाथाबरोबरच बदरिकाश्रमीं जाऊन पोहोंचले. तेथें शंकरांनीं मत्स्येन्द्रनाथाला दत्तात्रेयांचें दर्शन घडविलें आणि 'याच्यावर अनुग्रह करून याला आपण उपदेश करा' अशी दत्तात्रेयांना विनंति केली. दत्तात्रेयांनीं मत्स्येन्द्रनाथाला तत्त्वज्ञानाचा—सिद्धतारकमंत्राचा उपदेशहि केला. अनुष्ठानविधि व तपश्चर्येचीं स्थानें सांगितलीं. तसेंच मत्स्येन्द्रनाथ पूर्ण सिद्ध होईतोंपर्यंत त्यांना मार्गदर्शन केलें. मत्स्येन्द्रनाथ पूर्ण सिद्ध झाल्यानंतर त्यांनीं आपल्या प्रभावानें देवादिकांचाहि गर्वाचा परिहार केला, अशा मोठ्या रमणीय कथा आहेत.

## जालंधरनाथ

बृहद्रवा नांवाच्या राजानें एकदां यज्ञ आरंभिला असतां त्या यज्ञांतील अग्निज्वालांमधून जालंधरनाथांचा जन्म झाला. अग्नीच्या शिखांचें जाळें हाच जालंधरनाथांचा आधार असल्यामुळें त्यांना जालंधर असें नांव पडलें. योगमार्गांतील जालंधरबंध नांवाची एक प्रक्रिया आहे. ही प्रभावी प्रक्रिया जालंधरनाथांनीं शोधून काढली व अभ्यासिली, तसेंच योगमार्गांतहि तिचा अंतर्भाव केला. म्हणूनहि लोक त्यांना जालंधरनाथ असें म्हणूं लागले.

अग्निनारायणानें पुत्रप्रेमानें आकृष्ट होऊन जालंधरनाथांच्या कल्याणाकरितां त्याला दत्तात्रेयांकडे नेलें व त्याला दत्तात्रेयांच्या स्वाधीन करून, 'आपण याला उपदेश देऊन कृतार्थ करावें' अशी प्रार्थना केली. मत्स्येन्द्रनाथांप्रमाणेंच दत्तात्रेयांनीं जालंधरनाथांवरहि अनुग्रह केला.

## गोरक्षनाथांचा जन्म

एकदां मत्स्येन्द्रनाथ भिक्षा मागत मागत एका ब्राह्मणाच्या घरीं गेले असतां त्या कुटुंबांतील प्रमुख स्त्रीनें त्यांच्याकडे अवलोकन केलें व हा कोणीतरी अपूर्व, दिव्य पुरुष आहे असें समजून त्याची प्रार्थना केली, 'महाराज ! मुझे आपके जैसा तेजस्वी, दिव्य और अलौकिक पुत्र प्राप्त हो ऐसी कृपा करें ।' हें तिचें वाक्य ऐकून मत्स्येन्द्रानाथांनीं आपल्या झोळींतून चिमूटभर विभूति काढली व ती मंत्रून त्या तरुणीच्याहातावर ठेवली आणि सांगितलें कीं. 'रात्रीं निजण्यापूर्वीं ती विभूति खा; बारा वर्षांनीं मी तुला भेटेन.' त्यानंतर मत्स्येन्द्रनाथ तेथून निघून गेले. त्या ब्राह्मण तरुणीनें बुद्धिभेद करणाऱ्या इतर स्त्रियांच्या सांगण्यावरून तें भस्म गाईच्या शेणाच्या ढिगांत टाकून दिलें. पुढें बारा वर्षांनीं मत्स्येन्द्रनाथ त्याच घरीं भिक्षेला आले व मुलाची चौकशी करूं लागले. तेव्हां त्या ब्राह्मण तरुणीनें झालेला सर्व वृत्तान्त निवेदन केला आणि क्षमा मागितली. पुढे मत्स्येन्द्रनाथांनीं तो गाईच्या शेणाचा ढीग पाहिला आणि

'आलख' असा शब्द उच्चारला. त्या क्षणीं त्या शेणाच्या ढिगांतून बारा वर्षांचा दिव्य बालक प्रकट झाला.

श्लोक – कार्तिक्यां शुक्लपक्षे च रेवत्यांचैव त्रयोदशी ।
द्विपरार्धे दिवा विष्णोरंशो गोरक्ष योनिजः ।।

भस्मगोमयसंभूतो गोरक्षः स महामुनिः ।
भूमिगर्भसमुद्भूतं ध्यायेन्नाथं जगद्गुरुम् ।।

ओवी – कार्तिक शुद्ध त्रयोदशी । भृगुवासर रेवती दिवशीं ।
सवाप्रहर सुदिनेसी । विष्णु अवतार उद्भवे ।।

मत्स्येन्द्रनाथांनीं गोरक्षनाथावर कृपा करून त्याला ज्ञान, योग, वैराग्य आणि मंत्रजप इत्यादि सर्व विषयांचें पूर्ण ज्ञान करून दिलें. त्यानंतर दत्तात्रेयांच्या भेटीसाठीं गिरनार पर्वतावर पाठविलें. गोरक्षनाथांचा ज्ञान आणि वैराग्य या दोन्ही क्षेत्रांत फार मोठा अधिकार होता; त्याला इतिहासांत तोड नाहीं.

आपले गुरु मत्स्येन्द्रनाथ हे एकदां स्त्रीराज्यामध्यें गुरफटले असतां त्यांना मोठ्या शिताफीनें गोरक्षनाथांनीं सोडविलें. स्त्रीराज्यांत पुरुषांना सहसा प्रवेश मिळत नसे; पण गोरक्षनाथांनीं नृत्य व संगीतकलेंत निष्णात असलेल्या स्त्रियांच्या फडामध्यें प्रवेश मिळवून ते स्त्रीराज्यामध्यें एक उत्तम पखवाजी या नात्यानें प्रविष्ट झाले. राजदरबारामध्यें संगीत चालू असतां गोरक्षनाथांनीं मृदंग हातीं घेतला व अत्यंत उत्तम साथ केली. त्या दरबारांत एकदां मत्स्येन्द्रनाथ सिंहासनावर येऊन बसले असतां गोरक्षनाथांनीं इतका सुंदर मृदंग वाजविला कीं, सर्व दरबार मंत्रमुग्ध होऊन गेला. 'चलो मछिंदर गोरख आया' हे बोल मृदंगांतून उमटले. ते मत्स्येन्द्रनाथांखेरीज इतरांना कळणें शक्य नव्हतें. मत्स्येन्द्रनाथांनीं मात्र हें रहस्य ओळखलें आणि कांहीं दिवसांनीं ते स्त्रियांचें राज्य सोडून गोरक्षनाथांबरोबर स्त्रियांच्या राज्यांतून बाहेर पडले.

मत्स्येन्द्रनाथ निघाले असतां राणी मैनावती व इतर स्त्रियांना मोठें दुःख झालें. त्यांनीं अत्यंत जड अन्तःकरणानें मत्स्येन्द्रनाथ आणि गोरक्षनाथ यांना निरोप दिला. निघतांना राणी मैनावतीनें एक मोठी सोन्याची वीट मत्स्येन्द्रनाथांच्या झोळींत ठेवली. मत्स्येन्द्रनाथांनाहि त्या सोन्याच्या विटेचा मोह आवरता आला नाहीं. त्यांनीं कित्येक दिवस तें ओझें खांद्यावर वाहिलें. एके दिवशीं लघुशंकेच्या निमित्तानें झोळी त्यांनीं खाली ठेवली व गोरक्षनाथास सांगून ते लघुशंकेला गेले. गोरक्षनाथांनीं ती झोळी सहज उचलून पाहिली तर ती त्यांना अत्यंत जड लागली. गोरक्षनाथ मनाशीं म्हणाले, 'कांतेच्या मोहजालांतून सोडविलें पण अद्यापि गुरुजी कनकाच्या मोहजालांतून मुक्त झाले नाहींत. हें जड ओझें ते अकारण आपल्या पाठीवर वाहत आहेत.

तेव्हां त्यांना याहि मोहांतून सोडविणें हें माझें कर्तव्य आहे.' असें म्हणून ती सोन्याची वीट त्यांनीं झोळींतून बाहेर काढली आणि जवळच असलेल्या एका पर्वताच्या पायथ्याकडे भिरकावून दिली. नंतर ते दोघेहि प्रवासाला लागले. मत्स्येन्द्रनाथांनीं झोळी पूर्वीप्रमाणें खांद्यावर घेतली. पण ती अगदीं हलकी लागली. संशय आला. हात घालून चाचपडून पाहिलें तों सोन्याची वीट नाहींशी झाल्याचें आढळलें. त्यांना अत्यंत दुःख झालें. एवढें जपून वागविलेलें धन एका क्षणांत नाहींसें झालें म्हणून ते शोक करूं लागले. गोरक्षनाथांनीं 'शोक कां करतां?' असें विचारलें असतां मत्स्येन्द्रनाथांनीं सर्व वृत्तान्त निवेदन केला. तेव्हां गोरक्षनाथ म्हणाले, 'यांत एवढें शोक करण्यासारखें काय आहे ? एकच वीट होती ना ? तर मग त्या समोरच्या पर्वतावरून हवें तेवढें सोनें घेऊन या.' मत्स्येन्द्रनाथ त्या पर्वताजवळ जाऊन पाहतात तो सारा पर्वत सोन्याचा असल्याचें त्यांना आढळून आलें. गोरक्षनाथांचें हें अपूर्व सिद्धिसामर्थ्य पाहून त्यांना अत्यंत संतोष वाटला. त्यांनीं तेथें पुष्कळच दानधर्म करून लोकांना अत्यंत संतुष्ट केलें.

पुढें फिरत फिरत गोरक्षनाथ सह्याद्रीचें शिखर असलेल्या ब्रह्मगिरीवर आले.

तंव ब्रह्मगिरि शिवस्थान । बुद्धि पंगूसी केवि गमन ।
यास्तव आशंकित मन । महद्भाव कठिण हा ।।

त्र्यंबकेश्वराच्या जवळ असलेलें हें ब्रह्मगिरि शिखर खूपच उंच आहे. तेथील सृष्टि-सौंदर्य बुद्धीलाहि अगम्य आहे, मग वाणी त्याचें वर्णन काय करूं शकणार ? तेथें या गुरुशिष्यांनीं कांहीं काळ वास्तव्य केलें. एक आखाडाहि स्थापन केला. या ठिकाणीं मत्स्येन्द्रनाथांनीं गोरक्षनाथांस योगमार्गाचा पुष्कळच उपदेश केलेला आहे. मत्स्येन्द्र-नाथ गोरक्षनाथाला अवधूत म्हणून संबोधित असत.

अजपा अनाहत अलक्षा । नाथ पंथाची मुख्य दीक्षा
तुज निवेदितो गोरक्षा । अनुभवी परीक्षा करी तूं ।।

मत्स्येन्द्रनाथांचा हा सर्व उपदेश ऐकून गोरक्षनाथ मत्स्येन्द्रनाथांच्या सांगण्या-वरून दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं गिरनार पर्वतावर गेले. तेथें तळमळीनें दत्तात्रेयांचा शोध केला. एका गुहेमध्यें त्यांना दत्तात्रेयांचें दर्शन घडलें. मत्स्येन्द्रनाथांनीं सांगित-लेल्या खाणाखुणांवरून गोरक्षनाथांनीं दत्तात्रेयांना ओळखलें. मोठ्या आदरानें प्रणाम करून ते दत्तात्रेयांच्या आज्ञेनें नम्रपणानें हात जोडून पुढें बसले. या वेळीं गोरक्षनाथांना आपल्या सिद्धिसामर्थ्याचा अहंकार फारच मोठा होता. त्यांनीं आपल्या सिद्धिसामर्थ्यानें दत्तात्रेयांना जिंकण्याचा खूपच प्रयत्न केला, पण तो दत्तात्रेयांच्या सिद्धिसामर्थ्यापुढें विफल ठरला. मग गोरक्षनाथांनीं आपला सर्व अहंकार सोडून देऊन ते दत्तात्रेयांना अनन्यभावानें शरण गेलें. तेथें दत्तात्रेयांनीं अध्यात्मज्ञानाचा व योग-

विद्येचा उपदेश करून त्यांना पूर्ण अनुगृहीत केले. या प्रसंगाची साक्ष अद्यापहि गिरनार पर्वतावरील दत्तपादुका शिखर आणि गोरक्षनाथ शिखर हीं दोन्हीं शिखरें देत आहेत.

गोरक्षनाथांचा अधिकार दत्तात्रेयांच्या कृपेनें एवढा वाढला कीं, ते दत्तात्रेयां-प्रमाणें स्वतः स्मृतिगामी बनले.

श्रीदत्तो नारदो व्यासः शुकश्च पवनात्मजः ।
कार्तवीर्यश्च गोरक्षः सप्तैते स्मृतिगामिनः ।।

या श्लोकावरून दत्तात्रेयांप्रमाणेंच नारद, व्यास, शुकाचार्य, हनुमान, राजा कार्तवीर्य आणि गोरक्षनाथ हे सर्व दत्तात्रेयांच्या अनुग्रहानें दत्तात्रेयांप्रमाणें स्मृति-गामी झाले असल्याचें दिसून येतें. 'स्मृतिगामी' शब्दाचा अर्थ स्मरण केल्याबरोबर प्रकट होणारा असा समजावा.

गोरक्षनाथांना पाहून लोक असें म्हणत असत कीं हा—

शुक किंवा वामदेव । कपिल सिद्ध दत्तात्रेय ।
सनक सनंदन ब्रह्मतनय । सनत्कुमार असेल ।।

असा अधिकार गोरक्षनाथांचा होता. मत्स्येन्द्रनाथांपासून सुरू झालेली ही नाथपरंपरा ज्ञानेश्वरमहाराज आणि मुक्ताबाई यांच्यापर्यंत येऊन पोहोंचती. खालीं दिलेल्या अभंगांत हीच परंपरा निर्दिष्ट झालेली आहे.

आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा
मत्स्येन्द्र तयाचा मुख्य शिष्य ।

मत्स्येन्द्रानें बोध गोरक्षासी केला
गोरक्ष बोळला गहिनी प्रति ।

गहिनी-प्रसादें निवृत्ति दातारे
ज्ञानदेवा सार चोजवीलें ।।

या परंपरेचा निर्देश करणारा दुसराहि एक अभंग वाचकांनीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तो असा—

आदिनाथ उमा बीज प्रकटलें
मत्स्येन्द्रा लाधले सहजस्थिति ।। १ ।।

तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली
पूर्ण कृपा केली गहिनीनाथा ।। २ ।।

वैराग्यें तापला सप्रेमें निवाला
ठेवा जो लाधला शांतिसुख ।। ३ ।।

निर्द्वंद्व निःसंग विचरता मही
सुखानंद हृदयीं स्थिर झाला ।। ४ ।।

विरक्तीचें पात्र अन्वयाचें मुख
देऊनि सम्यक अनन्यता ।। ५ ।।
निवृत्ति गयनी कृपा केली पूर्ण
कूळ हें पावन कृष्णनामें ।। ६ ।।

आदिनाथ म्हणजे भगवान् शंकर आणि उमा म्हणजे जगज्जननी पार्वती देवी. या उभयतांनीं विश्वाच्या कल्याणासाठीं ज्ञानाचें बीज अथवा बीजभूत ज्ञान प्रकट केलें. तें सहजच म्हणजे अनायासें मत्स्येन्द्राला लाभलें. तीच प्रेमस्वरूप चिन्मय ज्ञानमुद्रा मत्स्येन्द्रनाथानें गोरक्ष नाथांना दिली. त्यांनीं हेंच ज्ञान गहिनीनाथांना देऊन त्यांच्यावर पूर्ण कृपा केली. वैराग्याचा ताप आणि प्रेमाचा निवारा मिळाल्यामुळें प्रेमळमूर्ति गहिनीनाथ यांनीं तो शांतिसुखाचा ठेवा श्रीनिवृत्तिनाथांच्या स्वाधीन केला. श्रीनिवृत्तिनाथ हे स्वतःसिद्ध वैराग्यवृत्तीचें आधारस्थान होते. म्हणूनच त्यांना निवृत्तिनाथ असें अन्वर्थक नांव मिळालें. त्यांत गहिनीनाथांनीं निवृत्तिनाथांना अन्वयाचें मुख दिलें, म्हणजे आत्मप्रवण करून अंतर्मुख बनविलें आणि सम्यक् म्हणजे अत्यंत उत्तम असा विश्वात्मैक्यभाव अर्पण केला. निवृत्तिनाथ म्हणतात, गहिनीनाथांनीं माझ्यावर पूर्ण कृपा करून कृष्णनामाच्या उपदेशानें आमचें कूळ पावन केलें आहे.

निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानेश्वरनाथ होत. ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या ज्ञानदेवी अथवा ज्ञानेश्वरी या ग्रंथांत निवृत्तिनाथांची सद्गुरु म्हणून पदोपदीं स्तुति केलेली आढळते. हाच अधिकार सोपानदेवांचा होता. मुक्ताबाई अथवा मुक्ताई या तर शुद्धचित्कला याच शब्दानें ओळखल्या जात असत. नाथपरंपरेंत अनेक अधिकारी नाथ होऊन गेले व आहेतहि. त्यांत नऊ नाथांना प्राधान्य असल्यामुळें या परंपरेला नवनाथ परंपरा असें म्हटलें जातें.

श्रीमद् भागवतामध्यें पंचमस्कंधांत आणि एकादशस्कंधांत ज्यांचा उल्लेख आलेला आहे ते ऋषभदेव आणि जयंतीदेवी यांच्या शंभर पुत्रांतील नऊ पुत्र नवनारायण म्हणून ओळखले जातात. ते जन्मसिद्ध ज्ञानी, विरक्त आणि अवधूत होते. तेच नवनारायण पुढें नवनाथांच्या रूपानें अवतरले असा भविष्योत्तर महापुराणामध्यें उल्लेख आलेला आहे. ते नवनारायण आणि नवनाथ प्रातःस्मरणीय सिद्ध पुरुष असल्यामुळें आम्ही त्यांचीं नांवें श्लोकामध्यें ग्रथित करून वाचकांच्या सोयीसाठीं खालीं देत आहोंत. वाचकांनीं नित्य पाठामध्यें त्यांचा उपयोग करावा.

## नवनारायण परंपरा

कविर्हरिरन्तरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः ।
आविर्होत्रोऽथ द्रुमिलः चमसः करभाजनः ।।
नवनारायणाः प्रोक्ताः स्मरणात् पापनाशनाः ।
शान्ताः सिद्धा विरक्ताश्च ज्ञानिनो मुक्तिदायकाः ।।

लोककल्याणकर्तारः साधवो दीनवत्सलाः ।
सततं लोककार्यार्थं चरन्त्येते महीतले ॥

हेच नवनारायण पुढें कलियुगांत नवनाथांच्या रूपानें अवतरले.

## नवनाथ परंपरा

आदिनाथमहं वन्दे गुरूणां गुरुमीश्वरम् ।
सर्वविद्योपदेष्टारं दयालुं भक्तवत्सलम् ॥ १ ॥

मत्स्येन्द्रनाथं गोरक्षं जालंदरमथापरम् ।
कानीफनाथं तं वन्दे ज्ञानवैराग्यशालिनम् ॥ २ ॥

चर्पटं पंचम नाथं षष्ठं च वटसिद्धकम्
नागनाथेति विख्यातं समर्थं दीनवल्लभम् ॥ ३ ॥

सप्तमं भर्तरीनाथं रेवणं चाष्टमं तथा ।
नवमं गहिनीनाथं नवनाथेषु विश्रुतम् ॥ ४ ॥

निवृत्तिं ज्ञानदेवं च सोपानं मुक्तिमातरम् ।
इमां परम्परां वन्दे स्मरणात् पापनाशिनीम् ॥ ५ ॥

आदिनारायणापासून आणखी एक नाथपरंपरा सुरू झाली असल्याचें इतिहासांत दिसून येतें. 'नारायण विधि अत्रीनाथ दत्त जनार्दन श्रीएकनाथ' या भजनांत निर्दिष्ट केलेलीं नांवें हीं त्या नाथपरंपरेंतील श्रेष्ठ पुरुषांचीं आहेत. नारायण म्हणजे आदिनारायण भगवान् विष्णु होत. त्यानंतर विधि म्हणजे ब्रह्मदेव. ब्रह्मदेवापासून अत्रिनाथांचा म्हणजे अत्रिमहर्षींचा जन्म झाला. अत्रिमहर्षींपासून दत्तात्रेय जन्माला आले. दत्तात्रेयांचा जनार्दनस्वामींवर अनुग्रह झाला. श्रीजनार्दनांनीं तो वारसा पैठण येथील श्रीसंत एकनाथ यांना दिला. पुढें भानुदास, जीवानंदस्वामी, सखाहरिनाथ या क्रमानें ही परंपरा प्रस्तुत ग्रंथलेखकापर्यंत येऊन पोहोंचते. बीड येथील रामतीर्थामध्यें जीवानंदस्वामींची समाधि असून त्यावरील शिलालेखांत शके १७११ हा काळ जीवानंदस्वामींचा निर्याणकाळ उल्लेखिलेला आहे. श्रीजीवानंदस्वामींचा बीड या शहरांत दत्तगल्लीमध्यें श्रीरामाचा मठहि प्रसिद्ध आहे. 'श्रीगुरुदेव दत्तात्रेय जनार्दन श्रीएकनाथ' असा या घराण्यांतील भिक्षेचा सवाल अजूनहि प्रचलित आहे.

असे हे दत्तसंप्रदायाच्या परंपरेचे फांटे निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेले आढळून येतात.

## दत्तात्रेयांचा भर्तरीनाथांवर अनुग्रह

श्रीदत्तात्रेयांची उपदेशपद्धति कांहीं विलक्षण होती. प्रत्यक्ष विधायक अथवा निषेधात्मक वाक्यांनीं त्यांनीं कोणाला उपदेश केल्याचें आढळून येत नाही. ज्याला

उपदेश करावयाचा असेल त्याच्या पुढें एखादा विशिष्ट प्रसंग निर्माण करून त्या प्रसंगांतूनच त्यानें योग्य तो बोध घ्यावा, अशी त्यांची योजना असे.

एकदां भर्तरीनाथ यांची अत्यंत प्रिय असलेली पत्नी पिंगला हिचा दैवयोगानें वियोग झाला असतां भर्तरीनाथांना अत्यंत शोक झाला. दुःखानें व्याकुळ होऊन रामचंद्राप्रमाणें 'हा पिंगले हा पिंगले' असा शोक करीत रानावनांतून फिरूं लागले. इंदुमतीच्या वियोगानें अजराजाला शोक होऊन तो जसा दुःखानें व्याकुळ झाला; तशीच अवस्था पिंगलेच्या वियोगानें भर्तरीनाथांची झालेली होती. त्या वेळला भगवान् श्रीदत्तात्रेय हे गिरनारपर्वतावर होते, श्रीगोरक्षनाथहि त्यांच्या सान्निध्यांत बसलेले होते. तेव्हां दत्तात्रेयांनीं गोरक्षनाथांना सांगितलें कीं, 'आपला प्रिय भक्त भर्तरीनाथ हा पत्नीच्या वियोगानें अत्यंत व्याकुळ होऊन शोकसागरांत बुडालेला आहे. तेव्हां त्याला योग्य तो उपदेश करून त्याचें दुःख दूर करावें.' असें सांगून गोरक्षनाथांना दत्तात्रेयांनीं भर्तरीनाथांकडे पाठविलें. गोरक्षनाथ दत्तात्रेयांना वंदन करून निघाले. त्यांनीं पण भर्तरीनाथांना उपदेश करण्याची तऱ्हा निराळीच शोधून काढली.

त्यांना वाटेंत एक कुंभारवाडा लागला. कुंभार फिरत्या चाकावर मडकीं घडवीत बसला होता. गोरखनाथांनीं त्याच्याकडून एक बाहुली तयार करून घेतली. तिला उत्तम रंग देऊन नटविलें, भूषविलें. त्या बाहुलीचें नांव त्यांनीं बाटली असें ठेविलें. आपणहि कालमान लक्षांत घेऊन बाटलीऐवजीं पुतळी हें नांव योजूं. गोरक्षनाथ पुतळीला बरोबर घेऊन भर्तरीनाथांकडे आले, तेव्हां भर्तरीनाथ उदास अंतःकरणानें स्मशानभूमींत बसलेले होते. ठेंच लागल्याचें निमित्त करून गोरक्षनाथ तेथें पडले. पुतळी जमिनीवर पडली व फुटली. पुतळी फुटलेली पाहून गोरक्षनाथांनीं मोठा हंबरडा फोडला. ऊर बडवून घेऊं लागले. कपाळ जमिनीवर आपटूं लागले. "हाय रे देवा, माझी पुतळी मला सोडून गेली, आतां मी तिला कोठें पाहूं, माझी पुतळी, हाय हाय" याप्रमाणे गोरक्षनाथांचा आक्रोश ऐकून भर्तरीनाथ त्यांच्याजवळ आले आणि म्हणाले, 'महाराज, एवढा शोक आपण कां करतां?' तेव्हां गोरक्षनाथ म्हणाले, 'बाबा, तूंहि पण दुःखी आणि उद्विग्नच दिसत आहेस. हें कशाकरितां तें सांग.'

तेव्हां "महाराज, तुमची पुतळी ही मातीची बाहुली होती. कुंभाराला सांगून अशा पुतळ्या मी तुम्हांला करून देतों. तुम्ही शोक सोडा." यावर गोरक्षनाथ म्हणाले, "मी तुम्हांला तुमच्या पिंगलेप्रमाणें एक लाख पिंगला तयार करून देतों. तुम्हीहि शोक आणि दुःख सोडून द्या." असें म्हणून गोरक्षनाथांनीं आपल्या मंत्रसिद्धीच्या सामर्थ्यानें एक लाख पिंगला तयार करून भर्तरीनाथांपुढें उभ्या केल्या. 'घ्या, यांतील तुमची पिंगला शोधून काढा. नाहीं तर या सर्वांच्यासह सुखानें संसार करा.' हें गोरक्षनाथांचें सामर्थ्य पाहून भर्तरीनाथ आश्चर्यचकित झाले. त्यांनी विचार केला कीं, एका पिंगलेच्या मोहांत गुंतलों तर एवढें दुःख मला झालें आहे, मग या सर्व पिंगलांच्या मोहजालांत मी सांपडलों तर मला अतां कितीं दुःख भोगावें लागेल ? तरी विवेकासह

वैराग्य धारण करून सद्गुरुकृपेनें पूर्ण सुखाचा लाभ कां न घ्यावा ?असें म्हणून ते दोघेहि गिरनारपर्वतावर जाऊन दत्तात्रेयांना भेटले. दत्तात्रेयांनीं सर्व वृत्तान्त ऐकून गोरक्षनाथाला धन्यवाद दिले व भर्तरीला पोटाशीं धरून त्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरविला. असे आहेत आमचे भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय.

## श्रीदत्तात्रेय आणि शंकराचार्य व नागार्जुन

श्रीदत्तात्रेयप्रभूंनीं श्रीमदाद्य शंकराचार्यांना स्वप्नांत दृष्टान्त देऊन आपल्या सहस्रनामस्तोत्राचा उपदेश दिला. जागे झाल्यावर श्रीशंकराचार्यांनीं तें स्तोत्र जसेंच्या तसें लिहून काढलें. त्यानंतर ते वादामध्यें अजिक्य गणले गेले. त्यांच्या हातून ब्रह्म-सूत्रांवरील भाष्यासारखी अद्वितीय ग्रंथरचना झाली. ही गोष्ट शंकराचार्यांनीं दत्तात्रेयसहस्रनामस्तोत्रामध्यें नमूद केलेली आहे.

नागार्जुन यांनीं श्रीशैलपर्वतावर श्रीदत्तात्रेयांची आराधना केली. त्यांना दत्तात्रेयांनीं दृष्टान्त देऊन रसविद्येचा उपदेश केला. रस म्हणजे पारा. त्यावर जारण-मारणादि अठरा संस्कार करून तो शुद्ध व सिद्ध अशा स्वरूपांत सेवन केला असतां सर्व रोगांना नाहींसें करून दीर्घायुष्य मिळवून देतो, असा त्याचा प्रभाव आहे. लोकोप-कारार्थ दत्तात्रेयांनीं ही रसविद्या नागार्जुनांस दिली. नागार्जुनांनीं नागार्जुनतंत्र आणि नागार्जुनीय हे ग्रंथ लिहिले व रसशास्त्रज्ञ म्हणून मान्यता पावले.

## श्रीदत्तात्रेय व महानुभाव सत्पुरुष

इसवी सनाच्या दहाव्या शतकांत महाराष्ट्रांत प्रचलित झालेल्या महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर यांनीं आपल्या संप्रदायाचें प्रवर्तकत्व दत्तात्रेयांसच अर्पिलें आहे. ‘या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण’ असें त्यांनीं म्हटलें आहे. महानुभावांच्या पंचकृष्णांत दत्तात्रेयांचा समावेश आहे. आदिगुरु आणि उपास्यदैवत या दोन्ही दृष्टींनीं महानुभावपंथीयांत दत्तात्रेयांना अत्यंत उच्च स्थान आहे.

श्रीचक्रधरांचे परमगुरु चांगदेव राऊळ यांना दत्तात्रेयांनीं मोठ्या गमतीदार-पणें दर्शन दिलें. मुळांतच विरक्त असलेले चांगदेव राऊळ पत्नीच्या अधार्मिक वृत्तीला कंटाळून, गृहत्याग करून माहूरच्या यात्रेस गेले. तेथील मोवाळें अथवा मेरुवाळें तीर्थांत स्नान करून ते श्रीदत्तात्रेयशिखराकडे जात असतांना एका जाळींतून श्रीदत्ता-त्रेयप्रभु व्याघ्ररूपानें डरकाळ्या फोडीत आले. त्या डरकाळ्या ऐकून व समोर वाघो-बांना पाहून बरोबरीचे इतर लोक भिऊन पळून गेले. पण चांगदेव राऊळ तेथेंच स्तब्ध उभे राहिले. त्या व्याघ्ररूपी दत्तात्रेयांनीं एक पंजा चांगदेवांच्या डोक्यावर ठेवून त्यांना अनुग्रह दिला. महानुभावपंथीय परिभाषेंत सांगायचें तर पर आणि अवर शक्ति प्रदान केल्या.

## जनार्दनस्वामी

महाराष्ट्रांतील महान दत्तभक्तांमध्यें जनार्दनस्वामींना अग्रक्रम दिला जातो

तो जसा त्यांच्या काळाच्या प्राचीनत्वामुळें तसाच अधिकारामुळेंहि. जनार्दनस्वामी महान दत्तोपासक होते याबद्दल कोणाचेंच दुमत नाहीं. मात्र त्यांच्या गुरुपरंपरेबद्दल संशोधकांमध्यें मतभेद आढळतात. कांहींच्या मतें जनार्दनस्वामींचे गुरु साक्षात् दत्तात्रेय प्रभूच होत, तर कांहींच्या मतें तें पद नृसिंहसरस्वतींकडे जातें. अलीकडच्या कांहीं संशोधकांनीं जनार्दनस्वामींचें गुरुपद चांद बोधले या मुसलमान सत्पुरुषाकडे सोंपविलें आहे. विशेष म्हणजे या तिघांच्याहि गुरुत्वाबद्दल पुरावे उपलब्ध केले गेले आहेत.

संत एकनाथमहाराजांच्या गाथेंतील जनार्दनस्वामींच्या नांवावर असलेले पहिले चौदा अभंग हा नृसिंहसरस्वतींच्या गुरुत्वाचा पुरावा सांगण्यांत येतो; पण जनार्दनस्वामींच्या वैयक्तिक जीवनासंबंधींच्या एका अभंगांतील उल्लेखावरून हे जनार्दनस्वामी एकनाथांचे गुरु असलेले नव्हेत. हे दुसरेच कोणी जनार्दन असावेत असा तर्क केला जातो.

चांद बोधल्यांचे पक्षपाती चांद बोधल्यांचे दुसरे शिष्य जे श्रीगोंदा येथे राहणारे शेख महंमद त्यांच्या 'योगसंग्राम' ग्रंथांतील उताऱ्याचा आधार घेतात. तो असा–

'ॐ नमोजी श्रीसद्गुरु चांदबोधले। त्यांनीं जानोपंता अंगिकारिलें। जानोबानें एका उपदेशिलें। दास्यत्वगुणें ।।'

याशिवाय –

'धन्य चांद बोधले । त्यांनीं जानोपंता लोधलें'

असा शेख महंमदाचा एक अभंगहि असल्याचें सांगण्यांत येतें; परंतु या दोन्ही उल्लेखांवरून चांद बोधले व जनार्दनस्वामी यांचें गुरुशिष्याचें नातें स्पष्टपणें दिसून येत नाहीं. 'मुकुंदराज'नामक एकनाथशिष्यानें –

चंद्रबोधला मूळ । जनार्दन खोड । शाखापालव गोड । एकनाथ ।।

असें म्हटलें आहे तर पुणें येथील गंगानाथ मठाच्या गुरुपरंपरेंत चांद बोधले हे जनार्दनस्वामींचे गुरु असल्याचा उल्लेख आहे.

संत एकनाथमहाराजांनीं भागवताच्या एकादशस्कंधावरील प्राकृत टीकेंत एके ठिकाणीं जनार्दनस्वामींना झालेल्या दत्तसाक्षात्काराचें वर्णन केलें आहे. ते म्हणतात–

गुरुप्राप्तीलागीं सर्वथा । थोर जनार्दनासी चिंता ।
विसरला तिन्ही अवस्था । सद्गुरु चिंतितां चिंतनीं ।।

देव भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था ।
येणें जालें श्रीदत्ता । तेणें हातु माथा ठेविला ।।

हातु ठेवितांच तत्काळ । बोधु आकळिला सकळ ।
मिथ्या प्रपंचाचें मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ।।

कर्म करूनि अकर्ता । तोचि अकर्तात्मबोधु जाला देता ।
देहीं असोनि विदेहता । तेही तत्वता आकळिली ।।

गृहाश्रमु न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ।
निज व्यापारी वर्ततां । बोधु सर्वथा न मैळे ॥

तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्च्छापन्न पडियेला ॥

त्यासी सावध करूनि तत्त्वता । म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था ।
तोहि गिळोनि सर्वथा । होई वर्तता निजबोधें ॥

पूजाविधी करोनिया । जंव जनार्दनु लागला पायां ।
तंव अदृश्य जाला दत्तात्रेया । योगमायेचेनि योगें ॥

दत्तात्रेय व चांदबोधले या दोघांच्याहि पुराव्यांची संगति लावून आपल्याला असें सांगतां येईल कीं जनार्दनस्वामींनीं आत्मप्राप्तीच्या ओढीनें व गुरुदर्शनाच्या तळमळीनें दत्तोपासना केली असतां दत्तात्रेयांनीं त्यांना दर्शन देऊन 'अकर्तात्मबोध' केला व आध्यात्मिक उन्नतीसाठीं त्यांना चांदबोधले यांच्या हवालीं केलें. पावस येथील स्वामी स्वरूपानंदांच्या गुरुपरंपरेंतील एक सत्पुरुष श्रीरामचंद्रमहाराज तिकोटेकर यांच्या बाबतींतहि दत्तात्रेयांनीं हाच मार्ग अवलंबिला. रामचंद्रमहाराजांनीं गाणगापूरला तपश्चर्या केली तेव्हां त्यांना दत्तात्रेयांनीं स्वप्नांत दृष्टांत दिला. त्यानंतर त्यांची महादेवबोवा या सद्गुरूंशीं गांठ घालून दिली व गुरुप्राप्तीच्या जबाबदारींतून 'मुक्त आज झालों आम्हीं' असें सांगून आपण अंतर्धान पावले.

दत्तात्रेयांचा प्रभाव हिंदूंप्रमाणेंच मुसलमानांवरहि असल्याचे पुढें चंद्रद्रोणगिरीच्या वर्णनांत दिसून येणारच आहे. परंतु प्रस्तुत स्थळींहि जनार्दनस्वामींच्या दत्तोपासनेचा प्रभाव हिंदूंप्रमाणेंच मुसलमानांवरहि पडला असल्याचें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

## दासोपंत

संत एकनाथ महाराजांच्या समकालीन असलेले व मराठी भाषेचे कुबेर म्हणून म्हटले जाणारे महाराष्ट्रांतील एक अग्रगण्य दत्तभक्त दासोपंत हे बेदर परगण्यांतील नारायणपेठच्या देशपांड्यांच्या कुळीं दिगंबरपंत व पार्वतीबाई यांच्या उदरीं शके १४७३ च्या भाद्रपद वद्य अष्टमीस जन्मले. घरीं गजान्त लक्ष्मी आणि दत्तोपासना. वडील दिगंबरपंत संतवृत्तीचे. अशा वातावरणांत दासोपंत लहानाचे मोठे होऊं लागले. गोरापान रंग, रुबाबदार अंगकाठी व तरतरीत बुद्धि यांमुळें त्यांची सर्वांवर छाप पडत असे.

शके १४८० मध्यें बेदर परगण्यांत मोठा दुष्काळ पडला. लोक अन्नान्न होऊन मरूं लागले. दिगंबरपंतांनीं आपल्या ताब्यांतील बेदरच्या बादशहाचीं धान्यकोठारें भुकेलेल्या गोरगरिबांकडून लुटविलीं. ही बातमी बादशहास समजताच त्यानें निरोप पाठवून दिगंबरपंतांस बोलावून घेतलें. दिगंबरपंतांनीं सात वर्षांच्या छोट्या दासो-

पंतांनाहि आपल्या बरोबर नेलें. दासोपंतांचे चिमुकले पण तेजस्वी रुपडें पाहून बादशहा मनीं आनंदला. कां ? तर मुसलमानधर्मीयांत दासोपंतांच्या रूपानें चांगली भर पडेल या कल्पनेनें. 'एक महिन्यांत थकबाकीपोटीं दोन लाख रुपये तिजोरींत भरले नाहींत तर तुमच्या मुलाला मुसलमान केलें जाईल याची याद राखा' बादशहानें फर्मावलें व दासोपंतांस ओलीस ठेवून घेऊन नजरकैद केलें.

मुदत संपून गेली, तसें बादशहाच्या आनंदाला उधाण आलें. दिगंबरपंतांचा आनंद तर केव्हांच ओसरून गेला होता. बादशहाची मर्जी सांभाळून 'झरणी नरसिंहाच्या' मंदिरांत जाऊन स्नानसंध्या, पूजा-अर्चा करण्याचा दासोपंतांचा नेम असे.

'मी जन्मलों ज्याचे उदरीं । तो बाप राहिला देशान्तरीं ।
तूं बाप अससी हृदयान्तरीं । यास्तव वाहतो तुजलागी ।।
हा तो यवनरूपी व्याघ्र । गिळू पाहे समग्र ।
तरि कृपाशस्त्रें वधूनि शीघ्र । रक्षावें मज दयाळा ।।

अशी आळवणी ते नेहमीं करीत असत. बादशहानें दरबार भरविला. या दासोपंताचा दाऊदखान केव्हां एकदां करतो असें झालें होतें त्याला.

वंदीं पडला बालक स्मरे जनका ।
प्राण व्येचीत जाई क्षणु येका ।।
तुजवांचूनी करुणा न ये आणिका ।
तैसी गती बा जाहली माझी येका ।
दत्ता धाव रे धाव धावणीया ।।

असें दासोपंतांनीं अंतरींच्या दिगंबरास निर्वाणीचें विनविलें आणि तेवढ्यांत दत्ताजी पाडेवार नामक कोण्या इसमानें दोन लाख रुपये तिजोरींत भरल्याची तिजोरीच्या अधिकाऱ्याच्या सहीशिक्क्याची पावती बादशहास सादर केली. बादशहाचे हवेतील मनोरे क्षणार्धांत हवेंतच विरलें. हात चोळीत त्यानें दासोपंतांस बंधमुक्त केलें. दामाजीपंत व विठू महार यांची आठवण करून देणारा असाच हा प्रसंग घडला.

दासोपंत घरीं परतले. मातापित्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. पण दासोपंत ? त्यांच्या मनांतील विरक्ति कलेकलेनें वाढूं लागली. तशांतच दिगंबरपंतांनी दासोपंतांना चतुर्भुज केलें. सोन्याच्या पावलांनीं सून घरांत आली; पण दासोपंतांना ही संसाराची सुवर्णशृंखला कांचूं लागली. मोहमायेचें कुंपण असलेल्या, जन्म-मृत्यूचा कोलू असलेल्या विश्वाच्या कारावासांतून 'मुक्ति' मिळविण्यास त्यांचें मन धडपडूं लागलें. अखेर एके रात्रीं कोणास नकळत ते पुन्हां दत्तप्रभूंची भरघोस कृपा संपादन करण्यासाठीं घराबाहेर पडले. दिवस उजाडला. पण सर्वांच्या मनांत शोकांधकार भरून राहिला.

दासोपंत घराबाहेर पडले. ते हिलालपूरला आले. तेथून ते डाकुळगी येथें गेले. तेथून प्रेमपूरला जाऊन कुलदेवतेचें दर्शन घेऊन नांदेडला कांहीं काळ येऊन राहिले. तेथून ते थेट माहूरगडावर येऊन राहिले, तपश्चर्येसाठीं. तेथें त्यांची तपश्चर्या फलद्रूप झाली. मनींचें ईप्सित साध्य झालें. मग तेथून निघून राक्षसभुवन येथें ते आले. राक्षसभुवनला त्यांना श्रीदत्तपादुकांचा लाभ झाला. राक्षसभुवनहून ते पुन्हां डाकुळगीस आले, व तेथून वाणीसंगम या गांवीं येऊन उतरले.

येथपर्यंत एक तप उलटून गेलें होतें. याच वेळीं योगायोगानें दासोपंतांची पत्नी अग्निप्रवेश करण्याच्या तयारीनें तेथें आली. दासोपंतांनीं घरांतील लोकांस ओळखलें व त्या कृत्यापासून परावृत्त केलें. पुन्हां सर्वांना आनंदीआनंद झाला.

दासोपंतांनीं वंशपरंपरागत वतन आपल्या कारभाऱ्यास दान देवविलें व सर्व कुटुंबियांसमवेत ते अंबेजोगाई येथें येऊन राहिले. येथेंच त्यांनीं गीतार्णव, गीतार्थचंद्रिका हे ग्रंथ लिहिले. त्यांची प्रसिद्ध 'पासोडी' हीहि येथेंच निर्माण झाली. याशिवाय त्यांनीं असंख्य पदें रचलीं. भूपाळ्या, आरत्या रचल्या. त्यांनीं दत्तोपासनेला सुघटित असें स्वरूप दिलें. वासुदेवानंदसरस्वतींनीं पुरस्कारिलेल्या सोळा अवतारांची मूळ कल्पना दासोपंतांच्या संप्रदायांत आहे. श्रीवासुदेवानंदसरस्वतींप्रमाणेंच दासोपंतांच्याहि संप्रदायांत दत्तात्रेयांच्या सोळा अवतारांचा जयन्त्युत्सव साजरा केला जातो.

सन्त एकनाथमहाराज एकदां दासोपंतांच्या भेटीसाठीं अंबेजोगाईला आले. दासोपंतांच्या निवासस्थानाच्या दारीं येऊन पोहोंचले. ग्रंथलेखनाच्या कार्यांत निमग्न असलेले दासोपंत दुरूनच दिसले; पण त्यांच्या जवळ जातां येईना.

दत्तात्रेय धरूनि दार । रक्षी घेऊनि चोपदार ।
चमत्कार हाचि फार । दासोपंत चोजविले ।।

असा अनुभव त्यांना आला. तर प्रत्यक्ष भगवान् एकनाथांच्या घरीं पाणी भरीत असल्याचें दासोपंतांनीं चक्षुर्वै केलें.

महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा प्रचार करणाऱ्या जनार्दनस्वामी, दासोपंत व नृसिंहसरस्वति या त्रिमूर्तींत दासोपंत आपल्या आगळेपणानें उठून दिसतात. यद्यपि त्यांनीं प्रणीत केलेल्या मार्गानें जाणारे आज थोडेच आढळत असले तरी त्यामुळें त्यांच्या थोरवीस यत्किंचितहि कमीपणा येत नाहीं. असे हे महान दत्तभक्त साहित्यिक माघ वद्य पंचमी शके १६१५ मध्यें समाधिस्थ झाले. त्यांच्या चरणीं शतशः प्रणाम.

## समर्थ रामदासांना दत्तदर्शन

पहिलें तें हरिकथा-निरूपण । दुसरें तें राजकारण ।

यासाठीं समर्थ रामदासस्वामी अधूनमधून संचार करीत असत. एकदां ते कल्याणस्वामींना बरोबर घेऊन महाराष्ट्रांतून संचार करीत असतां माहूरगडावर गेले.

तेथील दत्तमंदिरांत ते गेले असतां कांहीं ब्राह्मण देवळांत अनुष्ठानाला बसलेले त्यांना दिसले. ते ब्राह्मण दत्तात्रेयांच्या दर्शनाच्या हेतूनें अनुष्ठान करीत बसले होते. समर्थांनीं त्यांची चौकशी केली व त्यांची अनुज्ञा घेऊन कल्याणस्वामींसह आपणहि अनुष्ठानांत सहभागी झाले.

कांहीं काळ गेल्यावर तेथें एक मुसलमान फकीर आला. तो एकटाच नव्हता. त्याच्याबरोबर त्याची बायकोहि होती. तसेंच सहा बकरे होते. पंचवीस कोंबड्या एका टोपलींत भरलेल्या होत्या व ती टोपली इतर सामानसुमानासह एका रेड्याच्या पाठीवर बांधलेली होती. दुपारची वेळ होती. तो फकीर खूप लांबून थकून आल्यासारखा दम खात त्या देवळाच्याच सावलीस बसला.

थोड्या वेळानें तो बायकोला म्हणाला, 'भूख लगी है। कुछ पकाओ तो सही।' तिनें काटक्याकुटक्या गोळा करून तीन दगडांची चूल मांडली. ती पेटवून तीवर एक भला मोठा हंडा ठेवून त्यांत थोडें पाणी घालून विचारलें, 'बोलो क्या पकाना ?' फकिरानें कोंबड्या शिजविण्यास सांगितलें. एक-दोन कोंबड्यांनीं त्याचें भागणार नव्हतें कीं काय म्हणून फकिरानें सर्वच्या सर्व कोंबड्या हंड्यांत घालण्यास सांगितलें. तरीहि तो पूर्ण भरला नाहीं. तेव्हां फकिरानें एकामागोमाग एक सर्व बकरे कापून त्या हंड्यांत टाकविले. तरीहि तो भरेना. तेव्हां फकिरानें सामान वाहण्याचा रेडाहि कापून हंड्यांत टाकण्याची बायकोला आज्ञा केली. तिनेंहि विचारीनें ती आज्ञा तंतोतंत पाळली. तरीहि हंडा कांहीं भरेना. फकीर वैतागला. त्यानें आजूबाजूस पाहिलें आणि आनंदानें ओरडला, 'इधर जो बम्मन बैठे हैं उनको काट डालो।' फकिराचे शब्द हवेंत विरतात न विरतात तोंच भला मोठा सुरा परजून ती बीबी-साहेबा निम्में अंतर चालून गेलीहि. ब्राह्मण ! ते जाग्यावर कशाला बसताहेत ? वाट फुटेल तिकडे पळून जाऊन ते लपून बसले. राहिले ते फक्त समर्थ व कल्याण. त्यांनाहि झालेला सर्व प्रकार समजलाच होता. तरीहि निश्चलपणें त्यांनीं आपलें अनुष्ठान चालूच ठेवलें. ती बीबीसाहेबा आली आणि कोठें नाहीशी झाली कोणास ठाऊक ! पण तो फकीर नाहींसा होऊन तेथें श्रीदत्तप्रभूंची सगुण साकार मूर्ति प्रकट झालेली उभयता गुरुशिष्यांनीं पाहिली. समर्थांनीं दत्तात्रेयांचा आशीर्वाद मिळविला. तसेंच दांभिक तप करणाऱ्या त्या ब्राह्मणांनाहि दत्तप्रभूंचें दर्शन घडविलें.

## श्रीदत्तभक्त किनारामबाबा

अघोरी संप्रदायाचे प्रमुख संत श्रीकिनारामबाबा यांनाहि भगवान् श्रीदत्तात्रेय यांनींच अघोर मंत्राची दीक्षा देऊन सिद्धिसामर्थ्यहि समर्पण केलें असल्याचें त्यांच्या इतिहासावरून दिसून येतें. श्रीक्षेत्र वाराणसी येथें 'शिव मोहोल्ला' या नांवाचा एक भाग आहे. तेथें क्रमिकुंडाजवळ किनारामबाबा यांचा विशाल मठ आहे. या ठिकाणीं दर वर्षी भाद्रपदांत षष्ठीच्या दिवशीं मोठी यात्रा भरत असते. या यात्रेस 'भादो की

छठ का मेला' असें म्हणतात. अघोर संप्रदायामध्यें बाबा किनाराम यांचें नांव अत्यंत उच्च कोटीचें गणलें जातें.

विक्रम संवत १७ व्या शतकांत यांचा जन्म वाराणसी जिल्ह्यांत असलेल्या चंदोली तालुक्यांतील रामगड या गांवीं एका रघुवंशीय क्षत्रिय कुलांत झाला. किनाराम-बाबा बालपणींच अति वैराग्यशील होते. ते बालपणींच लहान मुलांना एकत्र करुन सामुदायिक नामसंकीर्तनांत रंगून जात असत. ते बारा वर्षांचे असतांनाच आई-वडिलांनीं त्यांचा विवाह केला. बालपणींच ते विरक्त असल्यामुळें त्यांनीं विवाहाला नकार दिला होता. पण त्यांचें ऐकतें कोण ? अखेर त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांचा विवाह घडून आला.

विवाहानंतर तीन वर्षांनीं ते सासुरवाडीस जावयास निघाले तेव्हां त्यांनीं आईला दूधभात खावयास मागितला. त्या प्रांतांत केवळ दूधभात खाणें अशुभ मानलें जातें. त्यामुळें त्यांची आई त्यांच्यावर रागावली व म्हणाली, 'अशा वेळीं दूधभात खायचा नसतो.' पण त्यांनीं हट्ट करुन दूधभातच खाल्ला. दुसरेच दिवशीं त्यांच्या सासुरवाडीहून त्यांची पत्नी निवर्तल्याची बातमी आली. घरांतील सर्व परिवार दुःखी झाला. किनारामनें नेमका याच वेळीं दूधभात कसा खावयास मागितला याचें सर्वांना आश्चर्य वाटलें. त्यांच्या अंगीं असलेल्या स्वतःसिद्ध वैराग्यानें उचल घेतली व एके दिवशीं कोणालाहि न सांगतां किनारामबाबा अचानकपणें घरांतून बाहेर पडले. अगदीं पक्षी जसा पिंजऱ्यांतून निसटावा, त्याप्रमाणें.

## 'गुरुबिन कौन बतावे बाट

आपल्याला परमार्थाचें यथार्थ मार्गदर्शन करणाऱ्या गुरुचा ते शोध करीत निघाले. ते गाजीपूर जिल्ह्यांतील कारो या गांवीं गेले. त्या ठिकाणीं रामानुज संप्रदायांतील शिवारामजी या नांवाचे एक मोठे अधिकारी संत राहात होते. बाबा किनाराम यांनीं त्यांना अनुग्रह करण्याची प्रार्थना केली व त्यांची सेवा करीत ते तेथेंच राहिले.

एके दिवशीं शिवारामजी किनारामबाबांना म्हणाले, "चलो गंगाजीके किनारे। आज हम तुम्हें अनुग्रह देंगे" (चल गंगेच्या कांठीं आज मी तुला अनुग्रह देणार आहें) किनारामबाबांनीं शिवारामजींचें व्याघ्रांबर घेतलें व पूजासामग्रीहि बरोबर घेतली. ते गंगेच्या कांठीं प्रवाहापासून दहा-बारा हात अंतरावर वरच्या बाजूस उभे राहिले. शिवारामजी त्यांना म्हणाले, 'मी आत्तां येतों. थोडा वेळ तूं येथें थांब.' इतक्यांत चमत्कार असा झाला कीं, गंगेचा प्रवाह किनारामबाबांच्या पायाला स्पर्श करण्यासाठींच कीं काय सारखा वाढूं लागला. किनारामबाबा इकडे तिकडे न सरकता होते. त्याच ठिकाणीं उभे राहिले. गंगेनें किनारामबाबांच्या पायाला स्पर्श केला व तो प्रवाह झटकन उतरून आपल्या पहिल्या ठिकाणीं जाऊन थांबला. दिवस पावसाळ्याचे नव्हते. आकाशहि अभ्राच्छादित नव्हतें. वरच्या बाजूला धरणहि नव्हतें. पाणी वाढण्याची

कोणत्याहि दृष्टीनें शक्यता नव्हती. अशाहि स्थितींत गंगेचा प्रवाह वाढला व किनारामबाबांच्या पायाला स्पर्श करून तावडतोब उतरला आणि पूर्वींप्रमाणें तो आपल्या जागेवर जाऊन स्थिरावला. आपल्या पवित्र जलानें साऱ्या विश्वाला पावन करणारी गंगा जणूं कांहीं किनारामबांच्या चरणस्पर्शानें पुनीत होऊन शांत झाली. शिवारामजींनीं ही गोष्ट पाहिली. त्यांना आश्चर्य वाटलें. किनारामजींचा अधिकार कांहीं निराळाच आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. ते आपल्या मनाशीं म्हणाले, 'मी याला अनुग्रह काय देणार?' तथापि त्यांनीं किनारामबाबांना संकल्पित सुमुहूर्तावर गंगेच्या कांठीं मंत्रदीक्षा दिली.

किनारामबाबा कांहीं दिवस शिवारामजींच्या जवळ राहून त्यांच्या अनुज्ञेनें परिभ्रमण करण्याकरितां निघाले. जातां जातां वाटेंत एका खेडेगांवच्या प्रवेशद्वाराजवळ एक म्हातारी खूपच मोठ्यानें आक्रोश करीत बसली होती. किनारामबाबांनीं त्या म्हातारीस विचारलें, "बूढी माँ, तुम क्यों रोती हो ?" (आजीबाई, तुम्ही कां रडता ? ) म्हातारीनें त्या मुलाकडे पाहिलें. त्याची ती दिव्य तेजस्वी मूर्ति तिच्या मनांत भरली; पण हा पोर माझें दुःख दूर काय करणार ? असें समजून किनारामबाबांना ती म्हातारी म्हणाली, 'बाळा, जा. दोन घरें भीक मागून आपलें पोट भर. माझें दुःख ऐकून तुला काय मिळणार ?'

पण किनारामबाबांनीं त्या म्हातारीजवळ 'तूं कां रडतेस तें मला सांग' असा हट्टच धरला. अखेर म्हातारी म्हणाली, 'बाळ, माझा नातू सावकारानें नेला आहे. त्याचें माझ्यावर पुष्कळ कर्ज आहे. व्याजासह मुद्दल-रक्कम चुकती केल्याशिवाय हा मुलगा तुला मिळणार नाहीं, असें सांगून तो सावकार निघून गेला आहे.' किनारामबाबा म्हणाले, 'आई, तो सावकार कोठें राहतो ? सांग मला.' म्हातारी म्हणाली, 'येथून जवळच त्याचें गांव आहे' बाबा म्हणाले, 'तर मग चल माझ्याबरोबर आणि दाखव मला तो सावकार.' म्हातारी पुढें पुढें चालली व किनारामबाबा तिच्या पाठीमागून जाऊ लागले. तीं दोघेहि लवकरच त्या सावकाराच्या गांवीं येऊन पोहोंचलीं. गढीप्रमाणें भव्य असलेल्या त्या सावकाराच्या वाड्यांत दोघांनीं प्रवेश केला. म्हातारीचा नातू उन्हांत एका जागेवर बसलेला होता. समोरच दिवाणखान्यांत सावकाराची स्वारी गादीवर बसलेली होती. किनारामबाबांची ती तेजस्वी बालमूर्ति पाहून सावकारानें त्यांना नमस्कार केला. बाबा म्हणाले, 'ह्या म्हातारीचा नातू कोठें आहे ?' सावकारानें मुलाकडे बोट करून, 'तो पहा तेथें बसला आहे. व्याजासह मुद्दलाची रक्कम पुष्कळच झाली असल्यामुळें ती परत मिळाल्याशिवाय मी या मुलाला सोडणार नाहीं,' असें म्हटलें. सावकाराचें हें वाक्य ऐकून किनारामबाबा म्हणाले, "तो मुलगा जेथें बसला आहे ती जागा हात-दीड हात खणून पहा. तेथें तुम्हांला रुपये दिसतील. त्यांतील व्याजासह मुद्दलाची जेवढी रक्कम असेल तेवढी रक्कम तुम्ही काढून घ्या. खड्डा बुजवा आणि मुलाला सोडून द्या." किनारामबाबांचें हें म्हणणें ऐकून सावकारानें ती जागा खणली.

तेथें रुपये लागले. सावकारानें जेवढें येणें होतें तेवढी रक्कम मोजून घेतली. खड्डा बुज-विला आणि त्या म्हातारीच्या नातवास सोडून दिलें. किनारामबाबा ही एक अलौकिक दिव्य विभूति आहे हें लक्षांत घेऊन त्या सावकारानें किनारामबाबांचे पाय धरले. किनारामबाबांनीं त्याला अभय देऊन त्या मुलाला आपल्या जवळ घेतलें आणि त्याच्या आजीच्या स्वाधीन केलें.

म्हातारीनें किनारामबाबांचे पाय धरले. तिचा आनंद गगनांत मावत नव्हता. डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले होते. गद्गदित कंठानें ती म्हणाली, 'बाबा किनाराम, हा मुलगा आतां तुमचा आहे. तुम्हीच त्याचा सांभाळ करा.' किनारामबाबांनीं म्हातारीला आशीर्वाद दिले व मुलास बरोबर घेऊन ते अधिक अधिकारी असलेल्या सद्गुरूंचा शोध करीत निघाले. किनारामबाबांनीं आपल्या बरोबर घेतलेल्या मुलाचें बीजाराम असें नांव ठेवलें. पुढें हे बीजारामबाबाहि मोठे नामांकित संत झाल्याचें इतिहासांत उल्लेखिलेलें आहे.

'सत्य संकल्पाचा दाता भगवान्' या म्हणीप्रमाणें त्यांच्या या संकल्पाला पूर्ण करणारे गुरु गोरक्षनाथ त्यांना भेटले. गोरक्षनाथांनीं किनारामबाबास गिरनार पर्वतावर जाण्यास सांगितलें. तेथें भगवान श्रीदत्तात्रेय तुला भेटतील व त्यांच्याकडून तुला अनुग्रहहि मिळेल असें सांगितलें. श्रीगोरक्षप्रभूंची ही आज्ञा ऐकून किनारामबाबा गिरनार पर्वतावर जावयास निघाले. किनारामबाबांनाहि दत्तात्रेयांच्या दर्शनाचा सारखा ध्यास लागलेलाच होता.

पुरी द्वारिका गोमती गंगासागरतीर ।
दत्तात्रेय मोंही कहँ मिले हरन महाभवपीर ।।

हे त्यांचे शब्द त्यांच्या अंतःकरणांतील तळमळीचे द्योतक आहेत. 'मी दत्तात्रेयांच्या भेटीसाठीं जगन्नाथपुरी, द्वारका, गोमती आणि गंगासागराचा कांठ इत्यादि अनेक तीर्थक्षेत्रें फिरलों, पण मला दत्तात्रेय भेटले नाहींत. ते मला कोठें भेटतील ? कारण तेच संसाररूपी महासागराच्या दुःखांचें निरसन करण्यास समर्थ आहेत. वरील दोह्यांत हरन म्हणजे हरण करणारा, दूर करणारा आणि पीर शब्दाचा अर्थ पीडा-दुःख असा समजावा. त्यांच्या या तळमळींमुळेंच श्रीदत्तात्रेयप्रभूंनाहि त्यांना वरचेवर दर्शन द्यावें लागत असे. गिरनार पर्वत हा सौराष्ट्रांतील जुनागड या शहराजवळ आहे. हें शहर भारताच्या स्वातंत्र्यपूर्वकालांत मुसलमानी संस्थानाच्या राजधानीचें शहर म्हणून प्रसिद्ध होतें. जुनागडवरूनच गिरनारला जाण्याचा रस्ता असल्यामुळें किनारामबाबा जुनागडला येऊन पोहोंचले. गिरनार पर्वतावर दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं जाण्याकरितां साधु-संत व गोसावी-बैरागी हे पुष्कळच जात असत. जुनागडमध्यें त्यांची गर्दी व्हाव-याची. जुनागडच्या राजानें अशा लोकांना भिक्षा घालावयास बंदी केली आणि त्यांना अटक करून तुरुंगांत डांबून ठेवावयाचें ठरविलें. तुरुंगांत साधु-बैराग्यांची इतकी गर्दी

झाली कीं राजाला त्यांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था करणें कठीण जाऊ लागलें. शेवटीं राजानें त्यांना चक्की पिसणें (जात्यावरील दळण), पाणी भरणें, स्वयंपाक करणें इत्यादि कामांना जुंपलें. किनारामबाबांनाहि जुनागडमध्यें येतांच अटक झाली व त्यांना सक्तमजुरीची शिक्षा सुनावून तुरुंगांत पाठविण्यांत आलें. नेहमींप्रमाणें किनाराम-बाबांसह सर्व बैराग्यांना, दळण्याकरितां जात्यावर बसविलें. किनारामबावांनीं 'श्रीगुरुदेवदत्त' असा जोरानें घोष केला आणि सर्व बैराग्यांसह सामुदायिक नामसंकीर्तन करण्याला आरंभ केला. चमत्कार असा झाला कीं, किनारामबाबांनीं श्रीगुरुदेव दत्त असें म्हणतांच सगळीं जातीं आपोआप फिरूं लागलीं. दळण दळलें गेलें. पाण्याचीं भांडीं भरलीं. स्वयंपाक तयार झाला. 'श्रीगुरुदेव दत्त श्रीगुरुदेव दत्त' या घोषाच्या गजरानें सारें कारागार दुमदुमून गेलें. शिरापुरीचें यथेच्छ भोजन करून तुरुंगांतील सारे कैदी तृप्त झाले. तुरुंगाधिकाऱ्यांनीं हा सारा प्रकार बादशहाच्या कानावर घातला. बादशहाला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें किनारामबाबांना जवळ बोलावून घेतलें. मस्तक लववून नम्रपणानें सलाम केला. विनंति केली कीं, 'आपण आमच्या या शहरांत कायमच राहणें करावें.' बादशहाची ही विनंति ऐकून किनारामबाबा म्हणाले, 'अगोदर तुरुंगांतील सर्व बैराग्यांना सोडून द्या. मग आम्ही आपल्याशीं बोलूं.' किनारामबाबांची ही आज्ञा ऐकून बादशहानें सर्व बैराग्यांना तुरुंगांतून मुक्त केलें. किनारामबाबा बादशहाला म्हणाले, 'आतां यापुढें आपण कोणत्याहि बैराग्याला अपराधावांचून तुरुंगांत ठेवूं नये.' बादशहानें किनारामबाबांचें हें म्हणणें मान्य केलें. किनारामबाबांनीं जुनागडच्या बादशहाला उपदेश केला. त्याला आशीर्वाद दिले आणि 'स्मरण कराल तेव्हां मी तुम्हांला भेट देत जाईन' असें आश्वासनहि दिलें.

नंतर किनारामबाबा गिरनार पर्वताच्या दत्तशिखरावर गेले. तेथें त्यांनीं दत्त-पादुकांचें दर्शन घेऊन दत्तात्रेयांच्या दर्शनासाठीं धरणेंच धरलें. श्रीगुरुगोरक्षनाथ यांच्याकडून "तुला तेथें दत्तात्रेयांचें दर्शन होईल." असा आशीर्वाद मिळालेलाच होता. किनारामबाबांना दत्तात्रेयांच्या दर्शनाचा निरंतर ध्यासच लागलेला होता. त्यांची ही अनन्यता पाहून अखेर एके दिवशीं किनारामबाबांना भक्तवत्सल भगवान् दत्तात्रेयप्रभूंनीं दर्शन देऊन त्यांच्या मस्तकावर हात ठेवला. तोंच त्यांच्या त्या कोमल करस्पर्शानें अज्ञानाचें तिमिर मावळलें. तत्त्वज्ञानाची प्रभात फांकली. विचारांच्या दिशा उजळल्या. बोधरवीचा उदय झाला. ह्या प्रसंगाचें किनारामबाबा स्वतःच वर्णन करीत आहेत पहा—

"अति दयाल मम सीस पर कर परस्यो मुनिराज
ज्ञान विज्ञान भक्ति दृढ दीन्हो हृदय लखाय ।।"

ज्ञान म्हणजे परोक्ष साक्षात्कार, विज्ञान म्हणजे अपरोक्ष साक्षात्कार आणि त्याच-बरोबर दृढ म्हणजे अचल स्वरूपाची भक्ति अर्थात् ईश्वराविषयींचें अनन्य प्रेम, या

सर्व गोष्टींचा लाभ परम दयाळू मुनिवर भगवान् श्रीदत्तात्रेय यांचा कृपापूर्ण करस्पर्श माझ्या मस्तकीं झाल्याबरोबर मला झाला. माझ्या हृदयांत लख्ख प्रकाश पडला !

"कृपा कर्‍यो अनुभव कह्यो कायाकमल प्रकास
अलख रूप को ज्ञान कहि, दिया मोहि दृढ विश्वास"

काय गुरुकृपेचा महिमा आहे पहा ! सद्‌गुरु भगवान् श्रीदत्तात्रेय यांनीं कृपा केली, अनुभव दिला, त्याबरोबरच कायाकल्प झाला. मुखावर अलौकिक तेज झळकूं लागलें. शरीररूपी कमल उमललें. सर्व शरीर दिव्य दिसूं लागलें. त्यांनीं अलक्ष्य म्हणजे अव्यक्त अथवा कल्पनातीत अशा सच्चिदानंदरूप परब्रह्माचें दर्शन घडविलें. मी परब्रह्मस्वरूप असल्याचा त्यांनीं मला दृढ विश्वास दिला !

एकदां भगवान् श्रीदत्तात्रेय हे कालूरामाच्या रूपानें हरिश्चंद्रघाटावर येऊन राहिले. त्यांना किनारामाचा गर्वपरिहार करावयाचा होता. गर्व हा अधःपाताला कारण होतो. गर्वानें मोठ्या-मोठ्यांचा अधःपात केला आहे. मग किनारामाची कथा काय ? तेव्हां त्याचा अधःपात होऊं नये म्हणून दत्तात्रेयगुरूंनीं आपल्या अनेक सिद्धि प्रभावांनीं वाराणसी येथील जनतेला चकित करून सोडलें. एकदां त्यांनी सर्व बैराग्यांना भोजनाचें निमंत्रण दिलें. पंचपक्वान्नांचा थाटामाटाचा स्वयंपाक सिद्ध झाला. किनाराम आले. त्यांनीं तो सारा स्वयंपाक आपल्या सिद्धिसामर्थ्यानें अमंगल व घाणेरड्या रूपांत परिवर्तित केला. कालूरामबाबा म्हणाले, "अरे ! आपने यह क्या किया ? सब साधु वैरागी बिना खाये पिये भूखे चले जायेंगे । सब पदार्थोंको पूर्ववत् ठीक कर देना ।" किनारामांनीं खूप प्रयत्न केला पण श्रीकालूरामबाबांनीं आपल्या सिद्धिबलानें पूर्ववत मिष्टान्नाच्या रूपानें तो स्वयंपाक परिणत केला. सर्व लोक जेवून तृप्त झाले. किनारामबाबांच्या गर्वाचा परिहार झाला. कालूरामबाबा हे प्रत्यक्ष दत्तात्रेयच आहेत असें जाणून किनारामबाबा त्यांना शरण गेले व पाय धरले. अशा रीतीनें गर्वपरिहार करून दत्तात्रेयांनीं त्यांच्यावर दत्तरूपानें दर्शन देऊन अनुग्रह केला. तेव्हां संतमंडळींच्या मुखांतून सहज बाहेर पडलेले शब्द असे—

कीना कीना सब कहे कालू कहे न कोय ।
कालू कीना एक भये राम करे सो होय ।।

श्रीदत्तात्रेय आणि किनारामबाबा यांनीं एकमेकांना आलिंगन देऊन ते सर्वांसमक्ष एकरूप झाले.

जो न करे राम सो करे किनाराम ।

एक श्रीमंत दांपत्य पुत्रप्राप्तीकरितां अत्यंत आतुरलेलें होतें. संत तुलसीदासांना तें शरण गेलें. तुलसीदास म्हणाले, 'मी रामचंद्रप्रभूंना विचारून सांगतो.' नंतर रामदर्शनप्रसंगीं त्यांनीं हा विषय रामाजवळ काढला. रामचंद्र म्हणाले, "याच काय पण सात जन्मांतहि त्यांच्या प्रारब्धांत पुत्र नाहीं." पुढें त्यांनीं किनारामांचें दर्शन घेतलें.

ते त्यांना बरेच दिवस बोललेच नाहींत. एके दिवशीं त्यांनीं त्या दंपतीला नैवेद्य आणावयास सांगितलें. त्यांनीं तो आणला. त्यांत सात वडे होते. ते घेऊन त्यांनीं त्या बाईला सात धप्पे मारले. पुढें तिला सात पुत्र झाले. तिनें तुलसीदासांना पुत्र दाखविले. पुढें एके दिवशीं रामचंद्रप्रभूंच्या दर्शनाच्या वेळीं ही गोष्ट कशी घडून आली असें तुलसीदासांनीं श्रीरामाला विचारलें. तेव्हां श्रीरामप्रभु तुलसीदासांना म्हणाले, "माझ्या भक्तांनीं मनांत आणलें तर ते एखाद्याचें प्रारब्धकर्मंहि दूर करूं शकतात. मी नाहीं. तुम्हीं मनांत आणलें असतें तर हें काम तुम्हीहि करूं शकला असता." हें श्रीरामाचें उत्तर ऐकून तुलसीदास हंसले व म्हणाले, 'जो न करे राम सो करे किनाराम ।'

असा हा दत्तभक्त किनारामबाबांचा प्रभाव होता. गिरनार पर्वतावर दत्त-अवधूत यांचा व किनारामबाबा यांचा जो संवाद झाला तो आम्हीं पुढें संवादस्कंधा-मध्यें दिलेलाच आहे; तो वाचकांनीं अवश्य पहावा.

## रिद्धपूरचा औदुंबर वृक्ष

रिद्धपूर हें अमरावतीच्या उत्तरेस २४ मैल अंतरावर असून तेथें एस्. टी. नेंहि जातां येतें. हा गांव अमरावती जिल्ह्यांतच अन्तर्भूत असून मोर्शी तालुक्यांत त्याचा समावेश आहे. गांव बराच पुरातन असून विद्यमान वस्ती सुमारें चार हजार असावी. अमरावतीपासून २० मैल असलेल्या चांदुरबाजारपर्यंत सरळ सडक असून पुढें उजव्या हातानें जाणाऱ्या सडकेनें चार मैल गेल्यानंतर हा गांव लागतो.

रिद्धपूरचें मूळ नांव ऋद्धिपूर, ऋद्धपूर अथवा ऋतपूर हें असावें. या तिन्ही शब्दांचा अपभ्रंश होऊन हल्लीं लोकभाषेंत रिद्धपूर अथवा रितपूर हें नांव सर्वांच्या मुखीं रूढ झालेलें आहे. ऋत शब्द सत्य या अर्थाचा वाचक असून ऋद्ध शब्द समृद्धीचा बोधक आहे.

महानुभाव संप्रदायांतील थोर पुरुष श्रीगोविंदप्रभु यांचें या गांवीं बरींच वर्षं वास्तव्य होतें. श्रीगोविंदप्रभूंच्या व्यास्तव्यानें पावन झाल्यामुळें महानुभाव संप्रदायां-तील लोक या गांवाला आपल्या संप्रदायांतील हें एक वाराणसी क्षेत्र आहे असें मानतात.

येथें महानुभावांचें एक दत्तमंदिर असून अनेक मठ असल्याचें आढळून आलें. त्यांत राजमठ या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या मठाला प्राधान्य आहे. या मठांतील श्रीगोविंदप्रभूंचें दर्शन घेतल्यानंतरच श्रीदत्तमंदिरांत जाण्याची प्रथा असल्याचें दिसून आलें.

दत्तमंदिराच्या एका बाजूस असलेल्या जागेवर मुसलमानांनीं आक्रमण केलें असून तेथें मशीद तयार केली आहे. मंदिराचाहि कांहीं भाग मशिदींत अंतर्भूत केला असल्याचें स्पष्ट पहावयास सांपडतें. गांवांत पाण्याच्या विहिरी असून त्यांतील

वऱ्याच खाऱ्या पाण्याच्या आहेत. गोड पाण्याच्या विहिरी फारच थोडया असल्याचें कळलें. गांवापासून थोडया अंतरावर एक जुनी प्रचंड विहीर सांपडली असून तिला मणिकर्णिका असें नांव देण्यांत आलें आहे. विहीर व विहिरीभोंवतालचा प्रदेश कोणातरी देशपांडे घराण्याकडे असून विहिरीची अनास्था दिसून आली. विहिरीला वरेंच पाणी असून परस्परविरुद्ध अशा दोन्ही बाजूंनीं विहिरींत उतरण्यासाठीं बारवे-प्रमाणें चांगल्या पायऱ्या आहेत. संरक्षणाच्या अभावीं लोक मात्र विहिरीचे चिरे काढून नेत असल्याचें समजलें व त्या स्वरूपाचें दृश्यहि दिसून आलें. गांवांत शाळा, हायस्कूल, पोस्टऑफिस वगैरे सर्व सोयी आहेत.

रिद्धपूर येथील रहिवासी वतनदार श्रीभगवंतराव अच्युतराव देशमुख यांच्या घरीं आम्ही पोहोंचलों. तसें म्हणाल तर विदर्भांत आदरातिथ्याची उणीव आपणांस भासणार नाहीं. तथापि श्री. भगवंतराव देशपांडे यांच्या ठिकाणीं अभ्यागताचें आदरातिथ्य मनोभावें करण्याची सहजच प्रवृत्ति असल्याचें दिसून आलें. "तृणानि भूमिरुदकं" या सदुक्तीप्रमाणें त्यांनीं परिचय नसतांनाहि आमचें या म्हणून स्वागत केलें. बसावयास सतरंजी घातली, प्यावयास पाणी दिलें. हें सर्व झाल्यावर त्यांनीं आम्हांला आपली उपासनेची खोली दाखविली. खोली कसली ? दोनखणी देवघरच होतें तें. वास्तु अत्यंत जुनी. खण फारसे उंच नव्हते. लांकडावरील खोदकाम पुरातन शिल्पकलेचें स्मरण करून देत होतें. दारें अगदीं खुजीं. नम्र झाल्याशिवाय प्रवेश होणेंच अशक्य. आंत-बाहेर जातां-येतां नम्र होण्यांत थोडी जरी उपेक्षा झाली तरी चौकटीची वरची बाजू ताठर वृत्तीचा उपशम करण्यास दक्षच असल्याचें दृष्टीस पडत होतें. 'अंगिं नम्रता सदा असावी' या कवीच्या उक्तीची सहजच आठवण होई.

आम्ही हातपाय धुवून नम्रपणें देवघरांत प्रवेश केला. वातावरण अत्यंत शांत. खोलींत गेल्याबरोबर मस्तक सहजच नम्र झालें. दोन्ही हात एकमेकांशीं जुळले. अंजलिबंध आपोआपच झाला. जिकडे पहावें तिकडे अवतारी महाविभूतींच्या लहान-मोठ्या चित्रांनीं ती खोली एक प्रकारच्या अनिर्वचनीय सात्त्विक वैभवानें नटलेली होती. काचेवरून चित्राभोंवतीं काढलेले चंदनाचे ओंकार प्रेक्षकांच्या मनाला आकर्षून घेत होते. त्या ओंकारांचा रेखीवपणा व सारखेपणा पाहून तीं चित्रें न्याहाळून पाह-ण्याची सहजच वृत्ति अंतःकरणांत निर्माण होत असे. श्रीपादवल्लभ व श्रीनृसिंह-सरस्वति इत्यादि थोर विभूतींचीं दर्शनें घेत घेत भक्त उजव्या हाताच्या कोंपऱ्या-कडे गेला कीं त्याला तेथें श्रीरेणुकामाता विराजत असल्याचें दिसून येईल. श्री. देशपांडे यांची ही कुलदेवता होय. तिचें दर्शन घेऊन आम्ही खोलीबाहेर आलों.

जवळच असलेल्या भिंतीच्या पलीकडील बाजूस एक औदुंबरवृक्ष आहे. हा वृक्षराज म्हणजे प्रत्यक्ष भक्तकामकल्पद्रुम भगवान् दत्तात्रेय आहेत. अनिर्वचनीय दैवी शक्तीचा आविष्कार या ठिकाणीं अनेक भक्तजनांच्या निदर्शनास येतो. किती-तरी भक्तजन या कल्पद्रुमाच्या तळवटीं येतात. छायाछत्राचा आश्रय घेऊन बसतात.

श्रीहरीची आर्तस्वरानें करुणा भाकतात. स्तुतिप्रार्थना करतात. भावपूर्ण अंतःकरणानें भक्तिगीतें गाऊन भगवंताला आळवितात. गुरुचरित्राचा पाठ अथवा पारायण करतात. शेवटीं करुणाघन त्यांच्यावर कृपा करतो. लौकिक व्यवहाराच्या दृष्टीनें लोकांकडून अचेतन अथवा जड समजल्या जाणाऱ्या त्या औदुंबर वृक्षाच्या ठिकाणीं स्फुरण, स्पंदन अथवा कंपन होत असल्याचें दृष्टीस पडतें. पानें हलूं लागतात व त्या वृक्षांतून भक्ताच्या मस्तकावर प्रसादाची अभिवृष्टि होते. कधीं बेदाणा-किसमिस तर कधीं खारीक-खोबरें, कधीं खडीसाखर तर कधीं पेढे, कधीं भस्मकुंकू इत्यादिकांच्या पुडया तर कधीं लेखी संदेश अशा स्वरूपानें प्रसाद उपलब्ध झाल्यानंतर भक्त स्वतःला भाग्यवान समजतो. नव्हे तसा तो असतोच. प्रसादाच्या अपेक्षेनें भोंवतालीं उभे असलेले भावुक भक्तजन प्रसादाची अभिवृष्टि प्रत्यक्ष आपल्या मस्तकावर झाली नसली तरी त्या अद्‌भुत दैवी शक्तीच्या प्रभावांतून अभिवर्षिलेल्या प्रसादाचा लेश मिळवूनहि स्वतःला धन्य समजतात.

प्रस्तुत ग्रंथाचा लेखक स्वतःला आपण कोणी एक मोठे अधिकारी उपासक आहोंत असें मानीत नाहीं. ईश्वराच्या अनन्य भक्तांमध्ये स्वतःचा अन्तर्भाव करून घेण्याचेंहि धैर्य तो दाखवीत नाहीं. किंबहुना 'न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो, न चाह्वानं ध्यानं तदपि च जाने गुणकथाः' अशीच या ग्रंथाच्या लेखकाची भूमिका आहे. तथापि अद्‌भुत दैवी शक्तीचा साक्षात्कार करून देणाऱ्या त्या राज-वृक्षाचें दर्शन घेण्याच्या दृष्टीनें आम्ही त्या दिशेनें वळलों.

अमरावतीहून निघतांना श्री. सौ. ताईसाहेब – लक्ष्मीबाई जोशी यांनीं 'येतांना त्या दैवी शक्तीचा प्रसाद घेऊन या' असें सांगितलें होतें. त्या श्रेष्ठ कोटीच्या भक्त असून तत्त्वज्ञानाचीहि त्यांची भूमिका उच्च श्रेणीची आहे. मी म्हणालों, 'ताई-साहेब! मी त्या वृक्षराजाच्या दर्शनास जात आहें खरा, पण प्रसादाची खात्री कशी देणार ? माझें दत्तोपासनाकल्पद्रुमाचें लेखन आणि मुद्रण चालू आहे. ग्रंथाचा कांहीं मुद्रित भाग मी बरोबर आणलेला आहे. त्या वृक्षराजाच्या सान्निध्यांत असलेल्या श्रीदत्तप्रभूंच्या चरणांजवळ हा भाग ठेवून हें आरंभिलेलें कार्य निर्विघ्नपणें पार पडावें अशीच हात जोडून प्रार्थना करणार. सदासर्वकाळ परमेश्वरा, माझ्यावर अनुग्रह असूं दे, अशी प्रार्थना करून मी परत येईन,' असे म्हणून मी रिद्धपूरला आलों होतों.

हात जोडून नम्रपणें नतमस्तक होऊन भगवच्चिंतन करीत मी समोर अस-लेल्या छोटया दारांतून पलीकडे गेलों. आमूलाग्र वृक्षराजांचें अवलोकन करीत अधिकच नम्र होऊन त्या औदुंबर वृक्षाजवळ दोन हातांच्या अंतरावर गेलों. हात तर जुळलेले होतेच. एक-दोन श्लोकांनीं प्रार्थना करून शेवटीं 'पावना दत्ता दयाळा पावना दत्ता' असें भजन करावें असें मनांत आणलें. सिद्ध पुरुषांच्या वास्तव्यानें पुनीत असलेल्या भूमींत मी उभा आहें या विचारानें चित्त भारावलेलें होतें. धन्यत

वाटत होती. शरीर उत्पुलकित झालेलें होतें. अन्तःकरणांत अनिर्वचनीय आनंदाचा आविष्कार झालेला होता. 'ब्रह्मानन्दं परमसुखदं' असें म्हणण्यास आरंभ करीत आहें तोंच त्या वृक्षराजाचें अनुपम स्पंदन प्रतीतीस आलें. एक प्रकारचा अनिर्वचनीय नाद श्रुतिगोचर होऊं लागला. कान स्तिमित झाले. हें काय होत आहे हेंच कळेना ! वारे तर वाहत नव्हतेच पण वृक्षराजाचीं पानें सळसळत होतीं. छोटया छोटया गारांचा पाऊस पडावा किंवा मृग नक्षत्राचे अथवा हस्त नक्षत्राचे टपोरे थेंब आकाशांतून पडावेत असा आवाज होऊं लागला व दोन क्षण दिव्य शक्तीचा आविष्कार होऊन त्या वृक्षराजाच्या शाखांतून खडीसाखरेचे खडे आणि पेढे यांची अक्षरशः मस्तकावर वृष्टि झाली ! प्रसाद–प्रसाद असा दर्शनेच्छु भाविकांच्या मुखांतून एकच शब्द बाहेर पडला! मी मनांत म्हणालों, 'परमेश्वरा ! माझ्या स्तुतीची व भजनाचीहि तूं वाट पाहिली नाहींस! चिरकाल पुत्राच्या विरहव्यथेनें व्यथित झालेली माता, पुत्र भेटतांक्षणींच त्याच्या नमस्काराची वाट न पहातां त्याला पोटाशीं धरून कवटाळते व आनंदाश्रूंनीं त्याला न्हाऊ घालते त्यांतलाच हा प्रकार नव्हे काय ?'

कोणी म्हणेल कीं मंत्र, तंत्र, जादूटोणा, भूतपिशाच्च अथवा ठकबाजींतला सिद्धसाधकपणा यांतला हा प्रकार नसेल कशावरून ? पण हा आक्षेप व्यर्थ आहे. लेखक स्वतःच अशा गोष्टींवर विश्वास ठेवणारा भोळाभावडा नाहीं. बरोबर असलेले श्रीमंत बाळासाहेब वकील व माननीय बाबासाहेब वैद्य वकील, कनिष्ठ न्यायालयापासून उच्च न्यायालयापर्यंत पुढें आलेल्या पुराव्यांची छाननी करून तत्त्व शोधून काढणें हाच ज्यांचा व्यासंग त्यांनीं व मींहि भोंवतालच्या परिस्थितीचें शक्यतों सूक्ष्म निरीक्षण केलें. पण तशी कल्पना करावयास कोठेंहि वाव सांपडला नाहीं. मंत्रतंत्र अथवा जादूटोणा असता तर सर्वांनाच अशा रीतीनें फसविण्याचा व लोकांकडून पैसे काढण्याचा व्यवसाय सुरू झाला असता, पण तेथें तसें कांहींच दिसून आलें नाहीं. भूतपिशाच्चाची कल्पना करावी तर हें स्थानच असें आहे कीं येथें भूतपिशाचांना क्षणभरहि थारा मिळणार नाहीं. येथून ते दूरच पळतील. सिद्धसाधकपणाचीहि शंका घेता येत नाहीं. येथील भोंवतालची परिस्थितीच अशी आहे कीं तेथें लपून छपून कांहीं करतां येण्यासारखेंच नाहीं. भोंवतालच्या मंडळींतहि छक्केपंजे करणारा धूर्त कोणी असल्याचें आढळून आलें नाहीं. असा माणूस भोळ्या भावड्यांना फसवील पण तो सर्वांना सर्वकाळ फसवूं शकणार नाहीं. असत्य हें केव्हांना केव्हां तरी उघडकीस येतेंच हा निसर्गाचा नियम आहे. तात्पर्य, मनुष्याची बुद्धि कितीहि तर्कनिष्ठ असली तरी या वस्तुनिष्ठ व सत्यस्वरूप असलेल्या दैवी शक्तीचा अपलाप करतां येणार नाहीं. शेवटीं मोठमोठ्या तार्किक शिरोमणींना देखील 'अचिन्त्याः खलु ये भावा न तांस्तर्केषु योजयेत्' – जेथें तर्क चालतच नाहींत त्या गोष्टींना तर्काच्या कसोटीवर घासण्याचा कोणी प्रयत्न करूं नये, असेंच म्हणावें लागलें आहे.

वृक्षराजाकडून भगवत्कृपाप्रसादाचा लाभ झाल्यानंतर त्या प्रसादाचें सर्वांना

वितरण करण्यांत आलें. नंतर मी वृक्षराजाच्या सांन्निध्यांत बसून दक्षिणामूर्तिस्तोत्र म्हटलें व 'पावना दत्ता' हें आवडतें भजन म्हटलें. श्रीबाळासाहेब यांनीं उदबत्ती, नीरांजन लावून पूजा केली. प्रदक्षिणा व साष्टांग प्रणिपात करून नंतर राजवृक्षांतून आलेले संदेशहि दृष्टीखालून घातले. या संदेशांतील विचार अत्यंत बोधप्रद असून भाषाहि अत्यंत सरळ व सुबोध आहे. भाषा मराठी व हिंदी आहे. संदेशाचे कागद येतात व गुप्तहि होतात असें आढळून आल्यामुळें श्रीदेशपांडे यांनीं ताबडतोब ते संदेश लिहून ठेवण्याचें अत्यंत उपयुक्त व बहुमोलाचें कार्य केलेलें आहे.

## चंद्रद्रोणगिरीवरील दत्तपीठ अथवा दादापीर

म्हैसूर प्रांताच्या मध्यभागीं चिकमंगळूर या जिल्ह्याच्या ठिकाणच्या उत्तरेस पसरलेल्या पर्वतराजीचा आकार घोडचाच्या नालासारखा किंवहुना चंद्रकोरीसारखा असल्यानें प्राचीन वाङमयांत त्यास चंद्रगिरी अथवा चंद्रद्रोणगिरि म्हटलेलें आढळतें. क्वचित् यास वायुपर्वत अथवा मारुतशैल असेंहि म्हटलेलें आढळतें. या चंद्रद्रोणगिरीसच सध्यां 'बाबा बुदान पर्वत' असें म्हटलें जातें. चंद्रकोरीसारख्या असलेल्या व आग्नेय-वायव्य अशा दिशांस पसरलेल्या या पर्वताच्या दक्षिणबाजूस मुलाइनगिरि नांवाचें, ह्या पर्वताचें अत्युच्च शिखर असून ह्या मुलाइनगिरीच्या ईशान्येस दत्तात्रेयांचें हें एक स्थान आहे. हें स्थान चिकमंगळूरपासून ४५ मैल असलेल्या केम्मनगुंडी ह्या थंड हवेच्या ठिकाणीं जातांना लागतें.

या ठिकाणीं बाबा बुदान नांवाच्या एका हाजीनें म्हणजे हाजची (मक्केची) यात्रा करणाऱ्यानें कॉफीचें झाड आणून लावलें, असें सांगितलें जातें. भारतांतील कॉफीची ही पहिलीच लागवड. आजमितीस त्या भागांत कॉफीचे बरेच मळे आहेत. बाबा बुदान हे 'दादा हजरत मीर कलंदर' नांवाच्या सत्पुरुषाचे शिष्य असून आपल्या गुरूंचा अनुग्रह त्यांना येथेंच लाभला. हे दादा हजरत मीर कलंदर म्हणजे दुसरे-तिसरे कोणी नसून प्रत्यक्ष भगवान् दत्तात्रेय असावेत. म्हैसूर गॅझेटियरमध्यें 'Dattatreya is nothing but corruption of Dada Hayat Mir' (दत्तात्रेय हें दादा हैय्यत मीर ह्याचें अपभ्रष्ट रूप होय) असें म्हटलें आहे. आम्ही त्याच्या उलट म्हणतों.

दत्तात्रेयांचें पीठ असलेली ह्या पर्वतावरील गुहा दक्षिणाभिमुखी असून तिच्यांत पायऱ्या आहेत. त्या उतरून गेले असतां डाव्या बाजूस एका ओटचापुढें कांहीं कबरी आहेत. त्यांच्यापुढें आणखी एक दरवाजा असून त्यापुढें कोणाला जातां येत नाहीं. तो मक्केकडे जाण्याचा रस्ता असल्याचें सांगितलें जातें. या दरवाजाच्या उजव्या बाजूस दत्तात्रेयांची बसण्याची जागा असून त्या जागेपलीकडे त्यांच्या शिष्यांस बसण्यासाठीं जागा आहे. याच बाजूस एका कोनाडचांत पादुका आहेत.

दत्तात्रेयांचें हें पीठ आजमितीस 'दादापीर' या नांवानें ओळखलें जातें.

## हाजीमलंग नव्हे, भैरवगड आहे तो !

दक्षिण महाराष्ट्रामध्यें धोम महाबळेश्वरच्या केंद्रस्थानापासून सह्याद्रीच्या ज्या प्रचंड राशी सर्व दिशांनीं पसरलेल्या आहेत, त्यांतील एक रांग मुंबईच्या दिशेनें गेलेली आहे. या पर्वतश्रेणीच्या श्रेष्ठ शिखरराशीमध्यें कल्याणच्या जवळ गगनचुंबी तीन शिखरें असलेला एक प्रचंड पर्वत उभा आहे; यालाच 'हाजीमलंग का पहाड' असें म्हणतात. तत्त्वतः तो हाजीमलंग नसून त्याचें प्राचीन नांव भैरवगड असें आहे. सरकारी गॅझेटिअरमध्यें याचा याच नांवानें उल्लेख आढळतो. सह्यपर्वत हा दत्तात्रेयांचा अत्यंत आवडता पर्वत. त्यांतीलहि त्रिकूटाचल हा भाग दत्तात्रेयांचें विश्रांतिस्थान असलेला झाल्याशिवाय कसा राहील ? यांतील तिसरें शिखर फारच उंच आणि अवघड आहे. येथें अत्यंत मोडकळीस आलेले एक पुरातन भैरवनाथाचें व एक देवीचें मंदिर आहे असें सांगतात. दत्तात्रेयांच्या इतिहासांत प्रायः जेथें देवीचें स्थान असतें तेथें दत्तात्रेयांचेंहि स्थान असतें. अथवा जेथें दत्तात्रेयांचें स्थान असतें तेथें देवीचेंहि स्थान असतेंच. गिरनार, माहूर, आबूचा पहाड इत्यादि ठिकाणीं हें पहावयास सांपडतें. प्रकृत स्थळींहि अशीच स्थिति असल्यामुळें हें दत्तात्रेयांचें अत्यंत आवडतें स्थान होतें असें मानणें हें परिस्थितीला धरून सुसंगतच होईल. येथें नाथ संप्रदायांतील तीन-चार सिद्ध पुरुषांचीं तीन-चार समाधिस्थानें आहेत. त्या काळच्या परिस्थितीला धरून नाथांच्या समाध्या या कबरीप्रमाणेंच बांधल्या जात, म्हणूनच या कबरी आहेत, असा आपाततः भास होतो.



तीन शिखरें, भैरवगड (हाजीमलंग)

सुमारें ७०० वर्षें झालीं. येथें एक मस्ताना सिद्ध अवधूत रहात असे. त्याला मलंग म्हणजे ब्रह्मचारी-अवलिया असें म्हणत असत. तो हाज यात्रा करून आल्यानंतर लोक त्याला हाजीमलंग असें म्हणूं लागले व त्याच नांवानें तें स्थान ओळखलें जाऊं लागलें.

वस्तुतः "पश्यकः कश्यपः" या न्यायानें प्रकृतस्थळीं मंगल या नांवाचा विपर्यास होऊन मलंग असें नांव रूढ झालेलें असावें. कारण "कल्याणं मंगलं शुभम्" असा अमरकोष आहे. या मंगलपर्वताच्या पायथ्याशीं कल्याण नांवाची वस्ती आहे. अनेक सिद्ध व तपस्वी पुरुष कल्याणमध्यें वास्तव्य करून मंगल पर्वतावर विश्रांति आणि तपश्चर्या करीत असत असें दिसतें. म्हणूनच सिद्धराज भगवान् दत्तात्रेय यांचेंहि हें स्थान आवडतें असणें स्वाभाविक आहे. येथील कबरींना पांच-सहा इंची झरोक्या-सारखी खिडकी असून त्यांतून हात घालून चांचपडून पाहिलें असतां पादुकांचीं चिन्हें व बोटें हाताला लागतात. येथील पुजारी ब्राह्मण या पादुकांना चंदनाचा लेप लावून त्यावर गुलाबाचीं फुलें वाहत असल्याचें आढळून येतें. ही गोष्ट वाचकांनीं लक्षांत घ्यावी.

## दत्तभक्त दलादनऋषींचें भातगांव

नेपाळमध्यें काठमांडूपासून सुमारें तीस मैल अंतरावर एक छोटेंसें गांव आहे. याला फार पुरातन कालापासून भातगांव असें म्हणतात. दत्तात्रेयांचे अनन्य भक्त व दत्तज्ञानलहरीस्तोत्राचे रचनाकार श्रीदलादन ऋषि येथेंच तपश्चर्या करीत होते. एकदां श्रीगोरक्षनाथप्रभु अकस्मात् या गांवीं आले. नित्याप्रमाणें दुपारच्या वेळीं ते जय अलखनिरंजन' करीत भिक्षेला निघाले. नाथसंप्रदायांतील ती त्यांची विचित्र, वेषभूषा पाहून गांवांतील लोकांनीं त्यांचा उपहास करावयास आरंभ केला. उपहासांतून पुढें तिरस्कारहि सुरू झाला. अशा रीतीनें भिक्षा मिळणें तर लांबच राहिलें पण अव-हेलना मात्र वाढत चालली. गोरक्षनाथ हे मोठे निग्रहानुग्रहसमर्थ होते. त्यांच्या मनांत या अज्ञजनांवर अनुग्रह करावा असा विचार आला. उन्हानें तापल्याशिवाय छायेचें महत्त्व कळत नाहीं. दुःखें अनुभविल्याशिवाय सुखाला शोभा नाहीं. अंतःकरण विरह-तापानें द्रवल्याशिवाय भेटीच्या आनंदाचा ठसा तेथें उमटत नाहीं. त्याचप्रमाणें निग्रहा-शिवाय अनुग्रहाचें मूल्य कळणार नाहीं, असा विचार करून गोरखनाथांनीं तपश्चर्येचें तेथेंच ठाण मांडलें. निग्रहाच्या अर्थात् तेथील जनतेला दंड देण्याच्या उद्देशानेंच ती तपश्चर्या असल्यामुळें गोरखनाथांनीं तेथील मेघमंडलाला निगृहीत केलें. अर्थात् तेथील मेघमंडलाला गुंडाळून त्यांनीं आपल्या आसनाखालीं ठेवलें व त्यावर मांडी ठोकून ते बसले. अशा रीतीनें मेघमंडळ प्रतिबद्ध झाल्यामुळें वृष्टि थांबली. पिकें येईनाशी झालीं व दुष्काळ पडला. खावयास अन्न नाहीं व प्यावयास पाणी नाहीं अशी लोकांची दैना झाली. अखेर दलादनऋषि तेथें पूर्वींपासून तप करीतच होते. त्यांच्याबद्दल लोकांच्या अंतःकरणांत अत्यंत आदरहि होता. लोकांच्या उपासमारीनें होणाऱ्या दैन्याचा परिहार व्हावा म्हणून दलादनमुनींनीं आपलें आराध्य दैवत भगवान् श्रीदत्तात्रेय यांची मनोभावें स्तुति आरंभिली. तीच ही श्रीदत्तज्ञानलहरी स्तुति होय.

भगवान् श्रीदत्तात्रेय प्रसन्न झाले. त्यांनीं दलादनऋषींना विचारलें, 'काय पाहिजे आहे तुम्हांला ?' दलादनऋषि परमविरक्त होते, ज्ञानी होते. ते नित्यतृप्त

असल्यामुळें त्यांना स्वतःला कांहींच नको होतें. केवळ जनतेच्या दुःखानें ते दुःखी असल्यामुळें त्यांनीं दत्तात्रेयांची प्रार्थना केली. " हे दयासागरा दातारा! हे जन अन्नपाण्यावांचून तळमळत आहेत. देवा! यांना अगोदर जेवूं घाला, तृप्त करा. मग पुढचा विचार पुढें." भक्ताची ती प्रार्थना ऐकतांच करुणानिधि असलेल्या दत्तगुरूंनीं प्रथम त्या ठिकाणीं भाताची वृष्टीच केली. लोक भात खाऊन व भगवंताच्या कमंडलूंतील जल पिऊन तृप्त झाले.

दलादनऋषींना ज्या स्वरूपांत दत्तात्रेय भेटले त्या स्वरूपाचें प्रतीक म्हणून येथील दत्तात्रेयांची मूर्ति एकमुख व द्विभुज अशाच स्वरूपांत पाहावयास सांपडतें. दलादनमुनींनीं दत्तप्रभूंना प्रार्थना केली कीं, महाराज, येथील दुष्काळ नाहींसा व्हावा. पाऊस पडावा व लोकांना विपुल अन्नपाणी मिळावें असा कांहीं तरी उपाय आपण सांगावा. ही प्रार्थना ऐकल्यानंतर दत्तात्रेयांनीं थोडें ध्यान केलें व अंतर्ज्ञानानें जाणलें कीं. महायोगीश्वर श्रीगोरखनाथ प्रभु हे येथें जवळच तपश्चर्या करीत बसलेले आहेत. येथील मेघमंडलाला योगबलानें प्रतिबद्ध करून त्यांनीं आपल्या आसनाखालीं ठेविलें आहे व त्यावर ते तपश्चर्या करीत बसलेले आहेत. येथील लोकांकडून कांहीं प्रमाद घडला असल्यामुळें त्या लोकांना शासन करण्यासाठीं गोरखनाथांनीं येथील मेघमंडलाला योगबलानें अवगुंठित करून आपल्या आसनाखालीं प्रतिबद्ध करून ठेवलेलें आहे. त्यामुळें हा दोष निर्माण झाला असून लोक अन्नाच्या अभावीं कष्ट भोगीत आहेत. तरी मी सांगतों ती युक्ति करा म्हणजे तुमचें काम होईल. दत्तात्रेयांनीं ती युक्ति सांगितली. दत्तात्रेय म्हणाले, 'गोरखनाथांचे गुरु श्रीमत्स्येंद्रनाथ यांना तुम्ही आदरानें निमंत्रण देऊन येथें घेऊन या. ते येथें आले कीं, तुमचीं सर्व दुःखें दूर होतील.' दलादनऋषींना पुढाकार देऊन भातगांवच्या लोकांनीं मोठ्या प्रयत्नानें मत्स्येंद्रनाथांना भातगांवला आणलें. भातगांवच्या परिसरांत गोरखनाथ तपश्चर्या करीत असल्याचें समजल्याबरोबर मत्स्येंद्रनाथ गोरखनाथांच्या भेटीला मोठ्या उत्कंठेनें गेले. आपले गुरु श्रीमत्स्येंद्रनाथ आपल्या भेटीला येत आहेत असें पाहिल्याबरोबर गोरखनाथांच्या मनाची धांदल उडाली. स्वाभाविकच आहे. श्रेष्ठ अथवा वरिष्ठ आपल्या भेटीला येत आहेत हें पाहिल्याबरोबर कनिष्ठ लोकांच्या मनाची धांदल होत असते. सामोरे जाऊन अभिवादन व स्वागत करून त्यांना योग्य जागीं बसविलें म्हणजे जिवांत जीव येतो. मनाला शांतता लाभते.

श्रीगोरखनाथ प्रभु आपले गुरु श्रीमत्स्येंद्रनाथ यांना सामोरे जाण्यासाठीं जे लगबगीनें उठले त्याबरोबर त्यांच्या दृढ बैठकीनें मांडीखालीं दडपलें गेलेलें मेघमंडळ मोकळें झालें. त्यानें भातगांवचें गगनमंडल व्यापून टाकलें व विपुल वृष्टि केली! प्यावयास मुबलक पाणी व खावयास यथेच्छ अन्न मिळाल्यामुळें दुष्काळाचें भय मावळलें व भातगांवची जनता सुखी झाली.

भातगांव येथील सर्व वृत्तान्त मत्स्येंद्रनाथांनीं ऐकल्यानंतर त्यांनीं गोरखनाथाला उपदेश केला. मत्स्येंद्रनाथ म्हणाले, "बेटा गोरख ! तुमने सब कुछ पाया है किन्तु अभीतक भगवान् को नहीं पाया है। जबतक भगवान् को नहीं पाया जाता तबतक सबकुछ पाया जानेपर भी व्यर्थ है।"—बाळ तूं सर्व कांहीं मिळविलें आहेस, पण तुला अद्यापि परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार झालेला नाहीं. जोंपर्यंत परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार होत नाहीं तोंपर्यंत तुला सर्व कांहीं मिळालें तरी तें व्यर्थ आहे असें समज." गोरखनाथ म्हणाले, "महाराज, परमात्मसाक्षात्कार मला कसा होईल ?" मत्स्येंद्रनाथ म्हणाले, "जा. गुरुदेव भगवान् दत्तात्रेय यांना शरण जा." गोरखनाथ म्हणाले, "मला गुरुदेव कोठें भेटतील ?" मत्स्येंद्र म्हणाले, "ते गिरनारपर्वतावर तुला भेटतील." गोरखनाथ गिरनार पर्वतावर आले. दत्तात्रेयांची व त्यांची गांठभेट झाल्यानंतर दत्तात्रेय प्रभूंनीं त्यांच्या गर्वाचा परिहार केला व सर्वभूतांमध्यें एकच परमात्मा कसा वसत आहे हें तत्त्व पटवून दिलें व परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून दिला. हा मनोरम बोध आम्ही श्रीदत्तगोरक्षसंवाद या नांवानें पृथक् दिला आहे. वाचकांनीं तो तेथेंच पाहावा.

श्रीदत्तगुरूंच्या उपदेशानें कृतार्थ झालेले गोरखनाथ पुन्हां नेपाळला आले. येथील जनतेला आपण दुष्काळानें फार पीडित केलें याबद्दल त्यांना पश्चात्ताप होत होता. त्यांनीं तेथील सर्व लोकांना फार फार अनुग्रहीत केलें. याच प्रसंगाचें स्मारक म्हणून तेथील लोक आपल्याला अद्यापीहि "गोरखा" असेंच म्हणवितात. गोरखा याच शब्दाचा अपभ्रंश गुरखा असा आहे. गोरक्षनाथांबद्दल नेपाळच्या जनतेंत अद्यापि मोठा आदर आहे. अद्यापि तेथील नाण्यांवर गोरक्षनाथांचें चिन्ह पाहावयास सांपडतें. तें चिन्ह गोरखनाथांविषयीं असलेल्या आदराची व आत्मीयतेची साक्षच देत आहे. अद्यापि नेपाळमधील लोक दत्तात्रेयांना 'दत्तभट्टारक' असें म्हणतात. श्रीदलादन मुनींचें तें स्तोत्रहि आम्ही मराठी भाषेंत सुबोध विवेचन करून पृथक् दिलेलें आहे. तेंहि वाचकांनीं अवश्य पहावें.

---

# श्रीदत्तात्रेयांची मानसपूजा व दोन मंत्र

प्रस्तुत विषय दत्तोपासनाकल्पद्रुमाच्या द्वितीयखंडांत सांगोपांग पद्धतीनें येणारच आहे. तथापि दत्तात्रेयांचें चरित्र वाचल्यानंतर आपणहि कांहीं उपासना करावी असें जर भक्तांच्या मनांत आलें तर या खंडांत त्यांना कांहींच उपलब्ध होऊं नये हें बरें नव्हे. म्हणून आम्ही थोडक्यांत मानसपूजा आणि मंत्रजप यांचा निर्देश करीत आहोंत. पंचोपचार पूजा, षोडशोपचार पूजा, चौसष्टोपचारांनीं केली जाणारी पूजा इत्यादि पूजांचे अनेक प्रकार आहेत. त्याचप्रमाणें बाह्योपचारपूजा आणि मानसोपचार पूजा असेहि दोन प्रकार पूजेचे पहावयास सांपडतात. त्यांमध्यें मानस पूजा ही अधिक श्रेष्ठ मानली जाते. बाह्योपचारपूजेमध्यें मन इकडे तिकडे भटकत राहतें, पण मानसोपचार पूजेमध्यें पूजा सोडून मनाला इकडे तिकडे भटकण्याला अवसर मिळत नाहीं. म्हणून मानसपूजा ही श्रेष्ठ मानली जाते.

## मानसपूजा

भक्तानें हातपाय धुऊन अथवा आवश्यकता वाटल्यास स्नान करून शुचिर्भूत व्हावें. आसनावर बसून पुढें दत्तात्रेयांचें चित्र किंवा मूर्ति ठेवावी. आचमन करून दत्तात्रेयांची प्रार्थना करावी.

अथ ध्यानं, दत्तात्रेयं शिवं शान्तमिन्द्रनील-निभं प्रभुम् । आत्म-माया-रतं देवमवधूतं दिगंबरम् ।। १ ।। भस्मोद्धूलितसर्वांगं जटाजूट-धरं विभुम् । चतुर्बाहु-मुदारांगं प्रफुल्लकमलेक्षणम् ।। २ ।। ज्ञानयोग-निधिं विश्व-गुरुं योगिजन-प्रियम् भक्तानुकंपिनं सर्व-साक्षिणं सिद्धसेवितम् ।। ३ ।। एवं यः सततं ध्यायेद्देवदेवं सनातनम् । स मुक्तः सर्व-पापेभ्यो निःश्रेयसमवाप्नुयात् ।। ४ ।। शांडिल्योपनिषद् अध्याय ३.

श्रीदत्तात्रेयाय नमः लं पृथिव्यात्मकं गंधं परिकल्पयामि । हं आकाशात्मकं पुष्पं परिकल्पयामि । यं वाय्वात्मकं धूपं परिकल्पयामि । रं वह्न्यात्मकं दीपं परि-कल्पयामि । वं अमृतात्मकं नैवेद्यं परिकल्पयामि । सं सर्वात्मकं सर्वशेषोपचारान्-परिकल्पयामि । नमस्कारं करोमि । याप्रमाणें पंचोपचार मानसपूजा करावी. त्या त्या उपचाराचें नांव घेतांना शक्यतों बाह्य उपचारहि समर्पण करावेत. वरील पूजेंत अमृतात्मकं या शब्दाचा अर्थ अमृतस्वरूप असा समजावा. संस्कृत भाषेमध्यें अमृत शब्दाचा अर्थ पाणी असा आहे. हीं सगळीं वाक्यें उच्चारतांना एक-एक संध्येचें पळीभर पाणी देवाच्या ताम्हणांत समर्पण करावें. अशी ही पद्धति आहे. याप्रमाणें मानसपूजा झाल्यानंतर हातामध्यें रुद्राक्ष, स्फटिक अथवा पोवळें यांची माळ घेऊन माळेला नमस्कार करावा आणि ॐदत्तात्रेयाय नमः या आठ अक्षरांच्या मंत्राचा एकशेंआठ वेळ अथवा यथाशक्ति वेळेनुसार रोज नियमितपणें जप करावा. जपास तुळशीची

माळ घेतली तरी चालेल. स्त्रियांनीं शक्य असेल तर पुत्रवंतीच्या मण्यांची माळ घ्यावी.

### मंत्र दुसरा

ॐ सद्गुरवे श्रीदत्तात्रेयाय भगवते नमः

याहि मंत्राचा जप करावा. मात्र जो मंत्र एकदां स्वीकारला त्याच मंत्राचा नियमानें रोज जप करावा.

जप झाल्यानंतर ती माळ मस्तकावर ठेवून व कपाळीं लावून नमस्कार करावा. अशी ही संक्षिप्त उपासना पद्धति आचरणांत ठेवावी. तो भक्त श्रद्धेनुरूप दत्तात्रेयांच्या कृपेला पात्र होईल.



औदुंबर वृक्ष (विकासाश्रम, नागपूर)

औदुम्बरे सदा तिष्ठेत्पार्वती सर्व देवताः ।
तस्मात्स सर्वदा पूज्यः सर्वैः सर्वार्थसिद्धये ।।

— मार्कण्डेय पुराण

तुलसीवृक्ष, अश्वत्थवृक्ष, वटवृक्ष, आमलकीवृक्ष (आवळी) बिल्ववृक्ष, शमीवृक्ष आणि औदुम्बरवृक्ष या सर्व वृक्षांमध्ये दत्तात्रेयांना औदुम्बरवृक्ष कां आवडला ? लौकिकदृष्ट्या औदुम्बरवृक्षांतील अलौकिक गुणधर्म आम्हीं मागें वर्णिलेलेच आहेत. आतां शास्त्रीयदृष्ट्या औदुम्बर वृक्षाचें महत्त्व मार्कण्डेय पुराणांत वर्णिलेलें अवश्य

लक्षांत घ्यावें. सर्व देवतांच्या रूपानें नटलेली सर्वशक्तिस्वरूपिणी श्रीपार्वतीदेवी ही औदुम्बरवृक्षाच्या ठिकाणीं सर्वदा वास्तव्य करीत असते. ती दुर्गाभवानी (तुळजापूर) श्रीलक्ष्मीभवानी (कोल्हापूर) आणि श्रीरेणुकाभवानी (मातापूर) इत्यादि सर्व कुलदेवतांच्या रूपानें प्रकट झालेली आहे. श्रीचक्राधिष्ठित श्रीललिताम्बामहात्रिपूर-सुंदरीं दत्तात्रेयांची उपास्यदेवता पार्वतीच्या रूपानें वास्तव्य करीत असल्यामुळें श्रीदत्तात्रेय हे औदुम्बराच्या आश्रयानेंच तिची उपासना करीत असतात. म्हणूनच ते नेहमी औदुम्बर वृक्षाखालीं असलेले दृष्टीस पडतात. भक्तांनीं देखील आपल्या इष्टदेवतेचें व कुलदेवतेचें अधिष्ठान या दृष्टीनें औदुम्बरवृक्षाकडे पहावें व तेथें इष्टदेवतेची अथवा कुलदेवतेची पूजा करून श्रीआद्यशंकराचार्य यांनीं केलेलें श्रीअष्टभुजा महिषासुर मर्दिनीचें स्तोत्र अवश्य म्हणावें, व अर्थाचेंहि मनन करावें. त्यायोगें तो भक्त समस्त देवतांच्या आणि श्रीदत्तात्रेयांच्याहि अनुग्रहाला पात्र होऊन त्याचे सर्व मनोरथ सिद्धीला जातील. ॐ तत्सत् !

।। श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ।।

# श्रीमहिषासुरमर्दिनि-स्तोत्र

अयि गिरिनन्दिनि नन्दितमेदिनि विश्वविनोदिनि नन्दिनुते ।
गिरिवर-विन्ध्यशिरोऽधि-निवासिनि विष्णुविलासिनि जिष्णुनुते ।।
भगवति हे शितिकण्ठ-कुटुम्बिनि भूरि-कुटुम्बिनि भूतिकृते ।
जय जय हे महिषासुरमर्दिनि रम्य-कपर्दिनि शैलसुते ।। १ ।।

अयि हें संस्कृत भाषेमध्यें संबोधनवाचक अव्यय आहे. एकवचनी प्रयोगांत त्याचा अर्थ हे आणि अनेकवचनी प्रयोगांत त्याचा अर्थ अहो असा करतात. अयि म्हणजे हे जगज्जननी देवी, 'गिरिनंदिनि' गिरि म्हणजे पर्वत अर्थात् नगाधिराज हिमालयपर्वत. त्याची तूं नंदिनी म्हणजे कन्या आहेस. म्हणून तुला गिरिनंदिनि असें म्हणतात. हे गिरिनंदिनि महात्रिपुरसुंदरी पार्वती ! 'नन्दितमेदिनि' म्हणजे तूं संपूर्ण भूमंडलाला आनंदित करणारी आहेस. चंड, मुंड, शुंभ, निशुंभ आणि महिषासुर इत्यादि दुष्ट दैत्यांचा नाश करून साऱ्या पृथ्वीला आनंदित केलेलें आहेस, म्हणून तुला नंदितमेदिनि असें म्हटलें जातें. 'विश्वविनोदिनि' म्हणजे तूं आपल्या अलौकिक शक्तीनें विश्वाला रमवितेस. म्हणून तुला विश्वविनोदिनि असें म्हटलेलें आहे. 'नन्दिनुते' म्हणजे नन्दि हें शिवगणांतील घटक असलेल्या शंकराच्या एका भक्ताचें नांव आहे. त्यानें तुझी मनसोक्त स्तुति केलेली आहे, म्हणून तुला नन्दिनुता असें म्हटलेलें आहे. नुता या शब्दाचा अर्थ प्रार्थिलेली असा आहे. माते ! तूं श्रेष्ठ असलेल्या विन्ध्य पर्वताच्या शिखरावर अधिनिवास म्हणजे वास्तव्य करतेस. म्हणून तुला गिरिवरविन्ध्यशिरोऽधिनिवासिनि असें म्हटलें आहे. 'विष्णुविलासिनि' तूं समुद्रमंथनाच्या वेळीं प्रकट झालीस आणि शिवस्वरूप श्रीविष्णुभगवान् यांना वरिलेस. तूं त्यांच्याबरोबर विलास म्हणजे क्रीडा करतेस म्हणून तुला विष्णुविलासिनि असेंहि म्हटलें जातें. 'जिष्णुनुते' महायुद्धामध्यें विजय मिळविण्याकरितां जिष्णु म्हणजे अर्जुन यानें तुझी स्तुति केली व तो विजयी झाला, म्हणून तुला जिष्णुनुते असें संबोधन देतात. हे भगवति, सर्वैश्वर्यशालिनी पार्वतीदेवी ! तूं शितिकंठ म्हणजे भगवान् शंकर यांची कुटुंबिनि म्हणजे भार्या आहेस. भूरिकुटुंबिनि म्हणजे जिचा कुटुंबपरिवार भूरि म्हणजे फारच मोठा आहे. सारें विश्व हाच तुझा कुटुंबपरिवार असल्यामुळें तुला भूरिकुटुंबिनि असें म्हटलेलें आहे. 'भूतिकृते' तूं साऱ्या जगाला ऐश्वर्यशाली करतेस. म्हणून तुला भूतिकृते असें म्हटलेलें आहे.

हे जगज्जननी माते ! जगाला अत्यंत पीडा देणारा असा एक दैत्य समरांगणामध्यें महिषाचें म्हणजे रेडयाचें रूप धारण करून तुझ्याशीं युद्ध करीत असतां त्याचाहि तूं अष्टभुजादेवीचें रूप धारण करून निःपात केलास. तेव्हांपासून तुला भक्तजन महिषासुरमर्दिनि असें म्हणूं लागले. हे महिषासुरमर्दिनि माते ! तुझा 'कपर्द' म्हणजे मस्तकावर असलेला केशभार अत्यंत रमणीय आहे. म्हणून तुला रम्यकपर्दिनि असें



दत्तात्रेयांचें विश्रांतिस्थान तुळजापूर येथील श्रीभवानीमाता

विशेषण दिलेलें आहे. अथवा कपर्द म्हणजे कवडी. ती तुला अत्यंत प्रिय आहे. भक्तजन तुला भक्तीनें एक कवडी अर्पण करतात. तर तूं त्यांना उत्तम तेजस्वी टपोऱ्या मोत्यांचा हार देतेस. म्हणूनच समर्थांनीं म्हटलें आहे कीं –

कवडी एक अर्पितां देसी हार मुक्ताफळा हो ।

अशी तूं उदार अंतःकरणाची आहेस. तुझ्याजवळचे कपर्द म्हणजे कवडचा अत्यंत रम्य असल्यामुळें तुला रम्यकपर्दिनि असें म्हणतात. हाहि अर्थ वाचकांनीं या ठिकाणीं लक्षांत घ्यावा. शैलसुता म्हणजे गिरिजा पार्वतीदेवी. हे गिरिजे माते भवानी, तुझा जयजयकार असो. तुझा सतत उत्कर्ष होत राहो. याच अभिप्रायानें भक्तजन 'आई-राजाचा उदो उदो' म्हणून जयघोष करीत असतात.

सुरवरवर्षिणि दुर्धरधर्षिणि दुर्मुखमर्षिणि हर्षरते ।
त्रिभुवनपोषिणि शंकरतोषिणि कल्मषमोषिणि घोषरते ।।
दनुजनिरोषिणि दुर्मदशोषिणि दुर्मुनिरोषिणि सिन्धुसुते ।। जय० ।। २ ।।

हे जगन्माते देवी! तूं सुरवरवर्षिणि म्हणजे इन्द्र, चन्द्र, अग्नि, वरुण इत्यादि जे मोठमोठे देव त्यांच्यावर कृपावृष्टि करणारी आहेस. वर्षिणि या शब्दाशीं समास करतांना कृपा हा शब्द अध्याहृत म्हणजे पदरचा जोडावा. याला आद्यपदलोपी समास असें म्हणतात. दुर्धरधर्षिणि म्हणजे दुर्धर अर्थात् दुर्निवार उच्छृंखल असे जे दैत्य, राक्षस त्यांना धर्षिणि म्हणजे पादाक्रांत करणारी, ताब्यांत ठेवणारी. दुर्मुखमर्षिणि म्हणजे दुर्मुख या नांवाच्या राक्षसाचा (याचा उल्लेख सप्तशतींत आलेला आहे.) तूं निःपात करणारी आहेस. त्याला तूं निपटून काढणारी आहेस, म्हणून तुला दुर्मुख-मर्षिणि असें म्हणतात. 'हर्षरते'– हे आई, तूं आनंदामध्यें नित्य रमलेली असतेस. म्हणून तुला हर्षरते असें संबोधन दिलेलें आहे.

तूं त्रैलोक्याचे पालनपोषण करतेस. म्हणून तुला त्रिभुवनपोषिणि असें म्हण-तात. त्याचप्रमाणें तूं शंकरतोषिणि म्हणजे त्रैलोक्याधिपति भगवान् शंकर-महादेव, यांना सतत संतुष्ट ठेवतेस. म्हणून तुला शंकरतोषिणि असें म्हटलेलें आहे. हे आई, जगज्जननी, तूं भक्तजनांच्या कल्मषांचा म्हणजे पातकांचा समूळ नायनाट करतेस, म्हणून तुला कल्मषमोषिणि असें म्हटलेले आहे. मोषण या शब्दाचा चोरणें, विध्वंस करणें असा अर्थ समजावा. हे जगज्जननी माते! तूं नित्य घोषरता म्हणजे सिंहगर्जना अथवा शंखनाद यांमध्ये रमतेस; अथवा जयघोष तुला फार आवडतो. म्हणूनहि तुला घोषरते असें संबोधन दिलेलें आहे. याच अभिप्रायानें मातापूर अथवा तुळजापूर येथील देवीच्या मंदिरांत भक्तजनांकडून 'आईराजाचा उदो उदो' अशी सतत घोषणा होत असते.

हे आई! तूं दनु म्हणजे कश्यपमुनींची पत्नी, तिच्या उदरीं जनी म्हणजे जन्म घेणारे जे दानव त्यांच्यावर रोषिणि म्हणजे रागावणारी आहेस. म्हणून तुला

दनुजनिरोषिणि असें म्हणतात. दुर्मदशोषिणि म्हणजे शक्तीनें अति दुर्मदांध म्हणजे अत्यंत उन्मत्त झाल्यामुळें अविवेकी बनलेले जे राक्षस त्यांना शोषिणि म्हणजे नाहींसे करणारी आहेस, म्हणून तुला दुर्मदशोषिणि असें विशेषण दिलेलें आहे. दुर्मुनि म्हणजे दुर्वासऋषि. हे अति कोपिष्ट होते. त्यांच्या शापाला देवहि घाबरत असत. सगळ्यांना त्यांचा मोठा धाक वाटत असे. त्यांच्यावर रागावण्याची कोणाची प्राज्ञा नसे. पण एकदां ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें वेदघोष चालला असतां दुर्वासऋषींचा स्वर चुकला; म्हणून तेथें सरस्वतीच्या रूपानें असलेली तूं महिषासुरमर्दिनि मोठ्यानें हंसलीस. त्या वेळीं दुर्वासऋषींनीं संतापून 'मृत्युलोकामध्यें तुला जन्म घ्यावा लागेल.' असा शाप दिला. यावर हे माते शैलसुते! तूंहि, 'तुम्हांलाहि मृत्युलोकांत जन्म घ्यावा लागेल' असा शाप दिलास व त्यांचा गर्व नाहींसा केलास. या प्रसंगांतूनच दुर्वास-मुनींना मंडनमिश्रांचा जन्म घ्याला लागला व देवीला सरस्वतीच्या रूपानें अवतरून मंडनमिश्रांची पत्नी व्हावें लागलें. हा इतिहास लक्षांत घेऊन हे माते! तुला दुर्मुनिरोषिणि असें म्हटलें आहे. तसेंच तूं सागराच्या पोटीं लक्ष्मीच्या रूपानें अवतरलीस. म्हणून तुला सिन्धुसुते असेंहि म्हटलेलें आहे.

अयि जगदम्ब कदम्बवनप्रियवासिनि तोषिणि हासरते ।
शिखरिशिरोमणि तुङ्गहिमालयशृङ्गनिजालयमध्यगते ।।
मधुमधुरे मधुकैटभगञ्जिनि महिषविदारिणि रासरते ।। जय० ।। ३ ।।

अयि जगदम्ब – जगज्जननी! तुला कदम्बवनामध्यें वास्तव्य करणें फार आवडतें, म्हणून तुला कदम्बवनप्रियवासिनि असें म्हणतात. भक्तजनांचे सकल मनोरथ पूर्ण करून तूं त्यांना संतोषवितेस म्हणून तुला तोषिणि असें म्हणतात. सदा-सर्वकाळ तुझ्या मुखावर हास्य विलसत असल्यामुळें जणूं कांहीं हास्यरसाचा तूं आस्वादच घेत आहेस, म्हणून तुला हासरते असें संबोधन दिलें आहे. शिखरि म्हणजे पर्वत. त्यांचा शिरोमणि म्हणजे श्रेष्ठ असा जो उंच हिमालय त्या हिमालयाचें उच्च शिखर हें जिचें निजालय म्हणजे स्वतःचें निवासस्थान आहे त्यामध्यें तूं वास्तव्य करतेस.

आई जगदंबे! तुझें स्वरूप आणि स्वभाव मधापेक्षांहि गोड आहे, म्हणून तुला मधुमधुरे असें म्हटलेलें आहे. तुझें सौंदर्य, लावण्य, सौस्वर्य इत्यादि सर्व गुण मधुरच आहेत. मधु आणि कैटभ हीं दोन दैत्यांचीं नांवें आहेत. शेषशायी भगवान् यांनीं योगनिद्रेंतून जागे झाल्याबरोबर करंगळीनें एकदां आपला कान खाजवला-टोकरला. तेव्हां कानांतला मळ करंगळीला लागून बाहेर आला. त्या क्षणीं त्या मळापासून दोन दैत्य निर्माण झाले. त्यांचीं नांवें मधु आणि कैटभ अशीं होतीं. ते सर्व जगाला छळूं लागले, तेव्हां हे माते! तूं आपल्या पराक्रमाची पराकाष्ठा करून त्यांना गांजलेस. रंजीस आणलेंस व त्यांच्यावर वरताण करून विजय मिळविलास. या अभिप्रायानें

तुला मधुकैटभगञ्जिनि असें म्हणतात. युद्धामध्यें तूं, वरचेवर महिषाचें म्हणजे रेड्याचें रूप धारण करून लढणारा जो महिषासुर त्याचें विदारण केलेंस, चिरफाड करून टाकलेंस. म्हणून तुला महिषविदारिणी असें म्हटलें आहे. भगवान् श्रीविष्णु, कृष्ण अवतारामध्यें रासक्रीडा करीत असतांना तूं त्यांच्या रासलीलेमध्यें रमलीस, म्हणून तुला रासरते हें संबोधन दिलेलें आहे.

अयि निजहुंकृतिमात्रनिराकृत-धूम्रविलोचन धूम्रशते ।
समरविशोषित-रोषित-शोणितबीजसमुद्भव बीजलते ।।
शिव शिव शुम्भ निशुम्भ महाहव तर्षित भूतपिशाचरते ।। जय० ।।४।।

आई जगज्जननी माते! स्वतःच्या केवळ हुंकारानेंच धूम्रविलोचन आणि धूम्राक्ष इत्यादि शेंकडों मदोन्मत्त राक्षसांचें तूं निराकरण केलेलें आहेस. निराकरण करणें याचा अर्थ पादाक्रांत करणें, पराभूत करणें, नाहींसें करणें असा आहे. त्याच-प्रमाणें समरांगणामध्यें जमलेल्या सहस्रावधी राक्षसांच्या विशाल सैन्यसागराला तूं क्षणार्धांत सुकवून टाकतेस. म्हणजे नाहींसें करतेस. रोषित म्हणजे रागावलेला असा जो शोणितबीज म्हणजे रक्तबीज नांवाचा राक्षस. या राक्षसाची गोष्ट अशी आहे कीं, हा समरांगणामध्यें युद्ध करण्याकरितां उभा राहिला असतां याच्या रक्ताचे कण जमिनीवर पडल्यानंतर त्या रक्ताच्या कणाकणांतून त्याच्याच-सारखे पराक्रमी राक्षस जन्माला येत असत, म्हणून त्या राक्षसाचें नांव रक्तबीज असें पडलें होतें. अशा सहस्रावधी रक्तबीज राक्षसांनीं समरभूमि व्यापली जात होती. जन्माला येणारे ते राक्षस रक्तबीज याच रूपानें जन्माला येत असत, आणि त्यामुळें तें रक्तबीज राक्षसांचें सैन्य तिळमात्रहि कमी न होतां उत्तरोत्तर वाढतच असे. ही स्थिति पाहून, हे जगज्जननी माते! तूं त्या रक्तबीज राक्षसांचें रक्त स्वतःच पिऊन टाकीत होतीस. त्यामुळें काँग्रेस गवताप्रमाणें माजणाऱ्या त्या अफाट सैन्याचा नायनाट होऊं लागला. त्यामुळें तूं जणुं कांहीं त्या रक्तबीज राक्षसांना आपल्या पोटांत सामावून टाकल्यानें दुसरी जणुं कांहीं रक्तबीजलताच बनलीस. शिव शिव, हर हर, राम राम अशीं नांवें कोणत्याहि अनिष्ट प्रसंगाचा उल्लेख करतांना उच्चारण्याची व्यवहारांत पद्धति आहे. या पद्धतीला अनुसरून प्रकृतस्थलीं शिव शिव असे शब्द उच्चारून शुम्भ-निशुम्भाच्या प्रसंगाचा निर्देश केलेला आहे. शुम्भ-निशुम्भ हे प्रचंड शक्तिशाली महाराक्षस होते. हे पाताळांत राहत असत. ब्रह्मदेवाकडून यांनी आपल्याला कोणत्याहि पुरुषापासून मृत्यु येतां कामा नये, असा वर मिळविलेला होता. त्यानंतर ते अजिंक्य राक्षस अति उन्मत्त होऊन सर्व जगाचा अनन्वित छळ करूं लागले. तेव्हां त्यांना ठार करण्याकरितां आदिशक्तीनें महिषासुरमर्दिनीचें रूप धारण करून तिला शुम्भ-निशुम्भांचा वध करावा लागला. त्या महाहवयुद्धा-मध्यें रक्त प्राशन करण्याकरितां तान्हेलेलीं जीं भूत-प्रेत-पिशाचें, त्यांच्यामध्यें तूं रमत होतीस. असा या तिसऱ्या चरणाचा अर्थ समजावा.

अयि शतखण्डविखण्डितरुण्ड–वितुण्डितशुण्डगजाधिपते ।
निजभुजदण्डनिपातितचण्ड-विपाटितमुण्ड-भटाधिपते ।।
रिपुगजगण्ड-विदारण चण्डपराक्रमशौण्ड-मृगाधिपते ।। जय० ।। ५ ।।

हे जगज्जननी पार्वती! शतखंड म्हणजे शेंकडो तुकड्यांनीं विखंडित म्हणजे छिन्नविच्छिन्न झालेली समरांगणांतील राक्षसांचीं रुंडें – रुंड शब्दाचा अर्थ मस्तक नसलेलें धड किंवा धड नसलेलें मस्तक असा करतात. अशा तऱ्हेचीं रुंडें ज्यानें आपल्या पायाखालीं वितुण्डित म्हणजे तुडविलेलीं आहेत, तो तुझा उत्तम सोंड असलेला गजाधिराज तुझ्याजवळ शोभत आहे. स्वतःच्या भुजदंडांनीं खालीं आपटलेला जो चंड म्हणजे एक पराक्रमी राक्षस आणि सर्व योध्यांचा अधिपति म्हणजे नायक असा जो मुंड नांवाचा पराक्रमी दैत्य, त्याची तूं समरभूमीवर विपाटित म्हणजे चिरफाड करून टाकलीस. शत्रूच्या हत्तींच्या गंडस्थलांचें विदारण करण्यांत चण्ड म्हणजे भयंकर आणि पराक्रमशौण्ड म्हणजे पराक्रम करण्यांत अत्यंत कुशल असा मृगाधिपति म्हणजे सिंह हें तुझें वाहन आहे. त्याची तूं स्वामिनी आहेस.

धनुरनुषंग-रणक्षणसंग-परिस्फुरदंग-नटत्कटके ।
कनकपिशंग-पृषत्कनिषंग-रसद्भटशृंग-हताबटुके ।।
हतचतुरंगबल-क्षितिरंग-घटद्बहुरंगरटद्बटुके ।। जय० ।। ६ ।।

हे जगज्जननी माते! धनुरनुषंग म्हणजे धनुष्याचा तुझ्या हाताशीं आलेला संपर्क, आणि रणक्षणसंग म्हणजे समरांगणांतील युद्धाच्या उत्साहाची आसक्ति यामुळें जेव्हां सैनिकाचे बाहू स्फुरण पावतात त्या वेळेला संपूर्ण सैन्य त्या उत्साहाच्या भरांत नाचूं लागते. नटत् म्हणजे नाचणारे. कटक म्हणजे सैन्य.

कनकपिशंग म्हणजे सोन्याप्रमाणें पिंगट रंगाचे पंख लावलेले पृषत्क म्हणजे बाण, ज्याच्यामध्यें भरलेले आहेत असे निषंग म्हणजे भाते–बाण ठेवण्याच्या पिशव्या. रसद्भटशृंग म्हणजे आवाज करणारे वडे वडे योद्धे, आणि दैत्यकुमार यांना जिनें हत म्हणजे घायाळ करून टाकलेलें आहे, अशी तूं.

घोडदळ, गजदळ, रथदळ आणि पायदळ सैन्य हें वाताहत झाल्यामुळें पृथ्वीला रक्ताचे–गुलालाचे रंग दिसूं लागतात. तें पाहून दैत्यकुमार वगैरे जिच्या भोंवतालीं ओरडत आहेत अशी तूं. तुझा सर्वत्र जयजयकार असो.

अयि रणदुर्मदशत्रुवधाद्धुर-दुर्धरनिर्भरशक्तिभृते ।
चतुरविचारधुरीणमहाशयदूतकृत-प्रमथाधिपते ।।
दुरित-दुरीह-दुराशय-दुर्मति-दानवदूत दुरन्तगते ।। जय० ।। ७ ।।

हे जगज्जननी माते! रणदुर्मद म्हणजे समरभूमीवर युद्धाच्या अभिनिवेषानें दुर्मदांध झालेले शत्रु. त्यांच्या वधामुळें युद्धाचें जोखड शिरावर घेऊन शक्ति धारण

करणारी तूं; चतुर म्हणजे हुशार, विचारधुरीण म्हणजे योग्य विचाराची धुरा वाहणारे असे जे महाशय म्हणजे गूढ अंतःकरणाचे प्रमथाधिपति म्हणजे भगवान् शंकर यांना जिनें शत्रूकडे मध्यस्थी करणारे दूत म्हणजे वकील केलें आहे अशी तूं, दुरित म्हणजे पाप, त्यामुळें दुरीह म्हणजे दुर्वर्तन करणारे दुष्ट संकल्पाचे, दुराशय म्हणजे कुत्सित बुद्धीचे असे जे दुष्ट बुद्धीचे दानव हेच कोणी शत्रूंचे दूत, त्यांची गति तूं कुंठित करून टाकतेस.

अयि शरणागतवैरिवधूजन-वीरवराभयदायिकरे ।
त्रिभुवनमस्तकशूलविरोधि-शिरोधिकृतामलशूलकरे ।।
दुमदुमितामरदुन्दुभिनाद-मुहुर्मुखरीकृत-दिङ्ननिकरे ।। जय० ।। ८ ।।

हे जगज्जननी माते! तुझ्या चरणीं शरण आलेला वैरिवधूजन म्हणजे शत्रूंचा स्त्रीसमुदाय, त्यांच्या पराक्रमी पतींना तूं आपला अभयहस्त त्यांच्या मस्तकावर करून त्यांना जीवदान देतेस. त्रैलोक्याच्या मस्तकावर विराजत असलेला जो तुझा त्रिशूल, त्याच्याशीं प्रतिस्पर्धा करणारे जें शत्रूचे मस्तक तें तुझ्या हातावर आमलका-प्रमाणें म्हणजे आवळ्याप्रमाणें शोभत आहे, अथवा तुझ्या निर्मल हातावर विराजत आहे.

दुमदुम शब्द करणारा जो अमरदुंदुभि म्हणजे देवांचा चौघडा, त्याचा जो गंभीर नाद, त्या नादानें मुहुः म्हणजे वरचेवर मुखरीकृत म्हणजे निनादून सोडलेला आहे, दिङ्ननिकर म्हणजे दाही दिशांचा समुदाय जिने अशी तूं, त्या तुझा जयजयकार असो. उत्कर्ष असो. जगन्मातेचा विजय झाला असतां स्वर्गांतील देव नगारे आणि चौघडे वाजवून आनंद व्यक्त करीत असत. त्या नादानें दाही दिशा दुमदुमून जात असत, असा अभिप्राय वाचकांनीं लक्षांत घ्यावा.

सुरललना-ततथेयितथेयित थाभिनयोत्तर-नृत्यरते ।
कृतकुकुथाकुकुथोदिडदाडिक-तालकुतूहलगानरते ।।
धुधुकुट धूधुट-धिन्धिमितध्वनि-धीरमृदंगनिनादरते ।। जय० ।। ९ ।।

आई जगज्जननी भवानी माते! तुझ्यापुढें सुरललना म्हणजे अप्सरा यांचें नृत्य चालू आहे. 'ततथेयित थेयित था' असे नृत्याचे बोल म्हणत दोन्ही हातांनीं अभिनय म्हणजे हावभाव करून चालू असलेल्या नृत्यामध्ये तूं रमली आहेस. त्याच-प्रमाणें 'कुकुथाकुकुथोदिडदाडिकदादिंड' इत्यादि पखवाजाचे व सतारीचे बोल तसेच निरनिराळें आश्चर्यकारक ताल आणि गायन यांमध्ये तूं रमलेली आहेस. 'धुधुकुट-धूकुट-धिन्धिमित' अशा तऱ्हेचे जे गंभीर मृदंगाचे ध्वनि आणि कर्णमधुर नाद यांमध्येहि तूं रमलेली आहेस.

जय जय जाप्यजये जयशब्दपरस्तुतितत्परविश्वनुते ।
झणझण-झिंझम-झिंकृत-नूपुर-शिञ्जित-मोहित-भूतपते ।।
नटित नटार्धनटीनटनायक-नाटननाटितनाट्यरते ।। जय० ।। १० ।।

अयि माते ! तुझा जयजयकार असो. तुझा जप करण्यास योग्य असलेल्या मंत्रानें भक्तजनास विजय मिळतो. जय शब्द ज्याचयामध्यें वरचेवर येत आहेत अशा स्तोत्रामध्यें तत्पर असलेली तूं, सर्व विश्वानें तुझी स्तुति केलेली आहे.

'झणझण', 'झिंझम', 'झिम्' अशा शब्दांनीं जिच्या पायांतील नूपुर म्हणजे पैंजण वरचेवर मंजुळ ध्वनि करोत आहेत त्या शिंजित म्हणजे पैंजणाच्या मधुर आवाजानें भूतपति म्हणजे शंकर मोहित झालेले आहेत.

कोणी पूर्णपणे नटलेले तर कोणी अर्धवट नटलेले असे नटी आणि नट व त्यांचे नायक यांच्या नृत्यानें नाटित म्हणजे रंगलेलें जें नाटय म्हणजे नर्तन त्यामध्यें तूं रमून जातेस.

अयि सुमनः सुमनः सुमनः सुमनः सुमनोरमकान्तियुते ।
श्रितरजनी रजनी रजनी रजनी-रजनीकर-वक्त्रभृते ।।
सुनयन-विभ्रमर-भ्रमर-भ्रमर-भ्रमर-भ्रमराभिहते ।। जय० ।। ११ ।।

हे जगज्जननी! सुमनः म्हणजे ज्यांचीं मनें अत्यंत निर्मल म्हणजे कामक्रोधादि विकाररहित असतात, स्वच्छ असतात, ते देव, त्यांची सुमनः म्हणजे उपवनांतील, नंदनवनांतील कल्पवृक्षाचीं ताजीं फुलें, त्यांच्याप्रमाणें स्वच्छ, टवटवीत आणि सुमनः म्हणजे सज्जन, त्यांच्या मनाप्रमाणे निर्मल, व 'सुमनोरम' म्हणजे मनाला रमविणारी अशी जी निर्मल कांति, त्या कांतीनें तूं युक्त आहेस. ताज्या फुलाप्रमाणें तुझी अंगकांति टवटवीत आहे.

'श्रितरजनी' म्हणजे आश्रयाला येऊन राहिलेल्याला रमविणारी शरद् ऋतूंतील अथवा वसंत ऋतूंतील शुक्ल पक्षांतील रात्र; किंवा रजनी म्हणजे उत्तम व पक्का रंग देण्याला उपयुक्त असलेली लाख; अथवा रजनी म्हणजे नीळ. ती वस्त्रांना आपल्या संस्कारांनीं स्वच्छ व निर्मल करते. म्हणून निळेला रजनी असें म्हणतात. रजनीकर म्हणजे चन्द्र. त्याच्या आल्हाददायक बिंबाप्रमाणें मुखाला धारण करणारी. तात्पर्य, चंद्रबिंबाप्रमाणें आल्हाददायक आहे मुखकमल जिचें अशी तूं.

सुनयन म्हणजे अत्यंत उत्तम, किंचित नीलवर्ण असलेले नेत्र. त्याच्या भोंवतालीं विभ्रमर म्हणजे स्वतःच्या सादृश्यानें भ्रांत होऊन घिरटया घालणारे जे भुंगे अथवा मधुकर त्यांनी आपल्या भ्रमर म्हणजे घिरटया घालण्याची क्रिया, तिनें अभिहत म्हणजें अस्वस्थ अर्थात् चंचल केले आहे जिला, अशी तूं आपल्या अपूर्व शोभेनें शोभत आहेस.

महितमहाहववल्लभतल्लिक वल्लित रल्लित भल्लिरते ।
विरचितवल्लि-कपालिक-पल्लिक-झिल्लिक-भिल्लिकवर्गवृते ।।
श्रृतकृतफुल्लसमुल्लसितारुण-तल्लज-पल्लव-सल्ललिते ।। जय०।। १२ ।।

माते जगज्जननी! महित म्हणजे ज्येष्ठ, श्रेष्ठ असें जें महाहव म्हणजे महायुद्ध,

ते ज्यांना वल्लभ म्हणजे प्रिय आहे, असे जे शूर सैनिक, त्यांचे तल्लिक म्हणजे तळ-शिबिरें; त्या शिबिरांतील वल्लिक म्हणजे तंतुवाद्यविशेष; त्याचा रल्लित म्हणजे मधुर नाद आणि भल्लि म्हणजे भाले, यांत तूं रमतेस. विचरितवल्लि म्हणजे सभोवार लावलेल्या वेली. तेथें राहणारें कापालिक म्हणजे शंकर किंवा तांत्रिक लोक यांच्या पल्लिक म्हणजे झोपडया, राहुटया व स्थानें, तेथें होणारे झिल्लिक म्हणजे रात-किडयांचे किरकिर आवाज आणि मिल्लिकवर्ग म्हणजे भिल्लिणींचे समुदाय यांनीं तूं व्यापलेलीं आहेस.

श्रुतकृत म्हणजे कानांवर ठेवलेलीं टवटवीत फुलें. यांच्या योगानें समुल्लसित म्हणजे शोभायमान असे अरुण म्हणजे आरक्तवर्ण असलेले असे तल्लज म्हणजे उत्तम टवटवीत कोमल पानें यांच्या योगानें तूं उत्तम, ललित म्हणजे सुंदर दिसत आहेस.

अयि सुदतीजनलालसमानस, मोहन-मन्मथराजसुते ।
अविरलगण्डगलन्मदमेदुरमत्तमतंगजराजगते ॥
त्रिभुवनभूषणभूत-कलानिधिरूप-पयोनिधिराजसुते ॥ जय० ॥ १३ ॥

हे जगदम्बे! सुदतीजन म्हणजे ज्यांच्या मुखांतील दंतपंक्ती अत्यंत रेखीव आणि शुभ्र आहेत अशा तरुण स्त्रिया. त्यांचीं लालस म्हणजे अति उत्सुक आणि तल्लीन अशीं जीं मानस म्हणजे अंतःकरणीं त्यांना मोहून टाकणारा जो मन्मथराज म्हणजे कामदेव त्याला जिने पुत्राप्रमाणें जीवदान दिलेलें आहे अशी तूं. म्हणून कामदेव हा तुझा पुत्रच समजला जातो. शंकराने कामदेवाला तृतीय नेत्रांतील अग्नीनें भस्म करून टाकलें असतां पार्वतीनें रतीच्या प्रार्थनेचा अंगीकार करून कामदेवाला कृपेनें जिवंत केलें अशी कथा प्रसिद्ध आहे.

हत्तीच्या गंडस्थलांतून अविरल म्हणजे निरंतर पाझरणारे असें जें मदमेदुर म्हणजे दानोदकानें व्यापलेले, मतंगजराज म्हणजे तरणाबांड, वयात आलेला हत्ती. त्या हत्तीप्रमाणे जिची गति म्हणजे चाल मत्त म्हणजे सुंदर दिसत आहे अशी तूं गजराजगामिनी आहेस.

त्रिभुवनभूषण म्हणजे त्रैलोक्याला ललामभूत अर्थात् रत्नाप्रमाणें शोभविणारा जो कलानिधि म्हणजे पूर्णचंद्र त्याच्याप्रमाणें स्वच्छ, आल्हाददायक जो पयोनिधि म्हणजे क्षीरसागर त्याच्यामधून तूं प्रकट झाली असल्यामुळें तुला पयोनिधिराजसुता असें म्हटलेलें आहे.

कमलदलामलकोमलकान्ति-कलाकलितामलभाललते ।
सकलविलासकलानिलय-क्रमकेलिचलत्कलहंसकुले ॥
अलिकुलसंकुलकुन्तलमण्डल-मौलिमिलदवकुलालिकुले ॥ जय० ॥ १४ ॥

अयि महिषासुरमर्दिनि जगन्माते! तुझा भालप्रदेश म्हणजे भव्य कपाळ हे

कमलाच्या दलाप्रमाणें अमल म्हणजे स्वच्छ आणि कोमल असा जो कान्तीचा समुच्चय त्यानें व्यापलेला असल्यामुळें अत्यंत निर्मळ दिसत आहे.

सर्व प्रकारच्या विलासाचें आणि कौशल्याचें स्थान असलेल्या कलहंसाच्या समुदायाच्या मनोरम चालीप्रमाणें तुझ्या पायांचें चालणें शोभत आहे. त्याचप्रमाणें कृष्णवर्ण असलेला तुझा मस्तकावरील कुंतलमंडल म्हणजे केशभार हा भ्रमरांच्या समुदायामध्ये असा शोभत आहे कीं, जणुं कांहीं तुझ्या मस्तकावर बकुळीचीं फुलें शोभत असून त्यावर भ्रमरांचे समुदाय घिरटचा घालत असल्याचें दिसत आहे.

करमुरलीरव-वर्जित-कूजित-लज्जित-कोकिल-मञ्जुमते ।
मिलितमिलिन्द-मनोहरगुञ्जित रञ्जितशैलनिकुञ्जगते ।।
निजगणभूत महाशबरीगण-रंगणसम्भृत-केलिरते ।। जय० ।। १५ ।।

अयि महिषासुरमर्दिनि जगन्माते! तुझ्या हातामध्यें असलेली जी मुरली तिचा रव म्हणजे मधुर नाद. त्या मधुर नादापुढे कोकिलांचें कूजन म्हणजे मधुर स्वर फिक्के पडत आहेत. त्यामुळें मुरलीचा मधुर रव सोडून आपल्या कोमल कंठाबद्दल लज्जित झालेल्या कोकिळा तुझ्याभोवतीं सुंदर व मधुर किलकिलाट करीत आहेत. हे जगज्जननी! तुझी मति म्हणजे बुद्धी भक्तजनांवर अनुग्रह करण्याकरितां वळलेली असल्यामुळें तूं मोठी मञ्जु म्हणजे मनोरम दिसत आहेस. त्याचप्रमाणें तुझ्याभोंवतीं मिलित म्हणजे एकत्र झालेले मिलिन्द म्हणजे भ्रमर किंवा भुंगे त्यांच्या मनोहर गुंजारवाच्या योगानें रञ्जित म्हणजे निनादलेल्या पर्वतावरील लतामंडपामध्यें तूं विराजमान असतेस. तुझ्या स्वतःच्या गणामध्यें अंतर्भूत असलेला महाशबरीगण म्हणजे मोठा भिल्लिणींचा समुदाय याचें जें रंगण म्हणजे नृत्याकरितां धरलेला घेर, त्यामध्यें योजिलेल्या निरनिराळ्या क्रीडा त्यामध्यें तूं सदा रमलेली असतेस.

कटितटपीतदुकूलविचित्र मयूखतिरस्कृत चण्डरुचे ।
जितकनकाचलमौलिमदोर्जित गर्जितकुञ्जरकुम्भकुचे ।।
प्रणत-सुरासुरमौलिमणिस्फुरदंशुलसन्नखचन्द्ररुचे ।। जय० ।। १६ ।।

अयि जगदम्ब! तुझ्या कमरेभोंवतालीं असलेले पिवळे रेशमी वस्त्र, त्यावरील चित्रविचित्र किरणांनी प्रत्यक्ष चंडरुचि म्हणजे सूर्य. त्यालाहि तूं तिरस्कृत केलेले आहेस.

जितकनकाचल म्हणजे ज्यानें आपल्या अंगकांतीनें मेरू पर्वतालाहि जिंकलेले आहे असा सुवर्णासारखा देदीप्यमान सिंह ज्याच्या मस्तकावर झडप घालून बसला आहे, असा मदोन्मत्त, चीत्कार करणारा कुञ्जर म्हणजे हत्ती. त्याच्या गंडस्थलाप्रमाणें तुझें स्तनमंडल शोभत आहे. तुझ्या पायी प्रणत म्हणजे नम्र झालेले जे सुरासुर म्हणजे देव आणि दैत्य, त्यांच्या मुकुटांतील रत्नांची चकाकणारी किरणें, त्या किरणांप्रमाणें तुझ्या पायाच्या नखचंद्राची कांति शोभत आहे.

विजित सहस्रकरैक सहस्रकरैक सहस्रकरैकनुते ।
कृतसुरतारक संगरतारक संगरतारकसूनुनुते ।।
सुरथसमाधि समानसमाधि समानसमाधि झुजाप्यरते ।। जय० ।। १७ ।।

हे जगज्जननी! ज्यानें आपल्या हातांनीं सहस्रकर म्हणजे सूर्य, या सूर्यांचे हजारों समुदाय, त्यांतील सहस्रकरैकसहस्र म्हणजे हजार सूर्यांचा एक समुदाय ज्याने आपल्या सहस्र करांनीं जिंकलेला आहे, तो भगवान् श्रीविष्णुनें त्यानें हात जोडून जिची नुति म्हणजे स्तुति अथवा प्रार्थना केलेली आहे अशी तूं.

कृतसुरतारक म्हणजे देवांचें संरक्षण करण्याकरितां तारकासुराशीं महायुद्ध केलें. त्या महायुद्धांत तारकासुराचा समरभूमीवर पराभव करण्याकरितां श्रीकार्तिक स्वामींनीं तुझ्या पोटीं अवतार घेतला, आणि तारकासुराचा वध करून तुझी स्तुति केली.

राजा सुरथ आणि समाधि नांवाचा वैश्य या दोन्ही भक्तांनीं तुझे समान-समाधि म्हणजे सारखेंच चित्त एकाग्र करून तुझा जप केला. त्या जपानें तूं त्यांच्यावर प्रसन्न होऊन त्या दोघांचेहि मनोरथ पूर्ण केलेस.

पदकमलं करुणानिलये वरिवस्यति योऽनुदिनं सुशिवे ।
अयि कमले कमलानिलये कमलानिलयः स कथं न भवेत् ।।
तव पदमेव परं पदमस्त्विति शीलयतो मम किं न शिवे ।। जय० ।। १८ ।।

आई जगज्जननी ! जो रोजच्या रोज तुझ्या चरणकमलांची वरिवस्यति म्हणजे पूजा करतो, सुशिवे ! म्हणजे उत्तम कल्याण करणारी अशी तूं करुणासागर असल्यामुळें त्याच्यावर कृपा का करणार नाहींस ? हे माते कमले ! तूं कमलामध्यें निवास करतेस म्हणून तुला कमलनिलया असें म्हणतात. हे कमलानिलये माते ! जो तुझी अनन्यभावानें भक्ति करील तो कमलानिलय प्रत्यक्ष भगवान् विष्णूच होतो. तुझी कृपा त्याला विष्णुस्वरूप कां करणार नाही ? तुझे चरणकमलच माझें परमपद असावें असें नेहमी चिंतन करणारा जो मी त्या मला हे मंगलकारिणी माते तें तुझें पद कां प्राप्त होणार नाहीं ? अवश्य प्राप्त होईल.

कनकलसत्कलशीकजलैखुषिज्जति तेऽ रणरंग भुवन ।
भजति स किं न शचीकुचकुम्भ नटी परिरम्भ सुखानुभुवम् ।।
तव चरणं शरणं करवाणि सुवाणि पथं मम देहि शिवम् ।। जय० ।। १९ ।।

अयि शैलसुते जगन्माते ! कनकलसत्कलशीक म्हणजे सोन्याचा देदीप्यमान कळसा. त्यांतील पाण्यानें जो तुझ्या आश्रयाला येऊन सभामंडपामध्यें अवगाहन करतो म्हणजे त्या जलाचा स्पर्श करतो तो खरोखर शची म्हणजे इंद्राणी. तिच्या स्तनमंडलाच्या आलिंगनाचा अथवा नटीपरिरंभ म्हणजे अप्सरांच्या आलिंगनाचा,

सुखाचा अनुभव घेत नाहीं काय ? अवश्य घेतो. असा तुझ्या आश्रयाचा महिमा आहे. तूं उत्तम वक्तृत्वाचा मंगलकारक लाभ मला दे.

तव विमलेन्दुकुलं वदनेन्दुमलं कलयन्ननुकूलयते ।
किमु पुरुहूत पुरीन्दुमुखी सुमुखीभिरसौ विमुखीक्रियते ।।
मम तु मतं शिवमानधने भवती कृपया किमु न क्रियते ।। जय० ।। २० ।।

अयि शैलजे माते! आकाशांत विराजत असलेला चन्द्रांचा समुदाय तुझ्या अत्यंत निर्मल असलेल्या मुखचंद्राच्या लांछनाला स्वीकारीत तुला अनुकूलता दाखवीत आहे.

पुरुहूतपुरी म्हणजे देवांची नगरी जी अमरावती त्या अमरावतींत राहणाऱ्या चंद्राप्रमाणें आल्हाददायक ज्यांचीं मुखें आहेत अशा सुमुखि म्हणजे देवांगना. त्या तुझ्या मुखचंद्राकडे पाहून लाजतात आणि आपल्या माना खालीं घालतात. तुझ्याशीं त्या विमुख बनतात. असें कां बरें व्हावें ? मला तर असें वाटतें कीं, तूं भगवान् शंकर यांचें मूर्तिमंत मानधन म्हणजे स्वाभिमानाचें स्थानच आहेस. भक्तजनांवर होणारी तुझी कृपा काय करूं शकत नाहीं ? सर्व कांहीं ती करूं शकते. भक्तांचे सकलमनोरथ ती पूर्ण करूं शकते. असें तुझ्या कृपेचें सामर्थ्य आहे.

अयि मयि दीनदयालुतया कृपयैव त्वया भवितव्यमुमे ।
अयि जगतो जननीति यथाऽसि मयाऽसि तयाऽनुमतासि रमे ।।
यदुचितमत्रभवत्पुरगं कुरु शाम्भवि देवि दयां कुरु मे ।। जय० ।। २१ ।।

आई जगन्माते महिषासुरमर्दिनि! तूं अत्यंत दीनयाळु आहेस. त्यामुळें तूं माझ्यावर नेहमी कृपा करूनच असावेस. हे उमे! माझ्या ठिकाणीं तुझी कृपा निरंतर असावी. हे जगदंबे! तूं जशी साऱ्या जगाची जननी म्हणजे माता आहेस, तशी माझी पण माता आहेस. हे मनोरमे लक्ष्मी देवी! ही गोष्ट मला पूर्ण मान्य आहे. तर मग जसें योग्य असेल त्याप्रमाणें तूं मला परमपूज्य अशा तुझ्या सान्निध्यांत मी नेहमी राहूं शकेन, अशी माझ्यावर कृपा कर. हे शंभुगृहस्वामिनीदेवी ! 'दयां कुरु मे' तूं माझ्यावर दया कर. माझ्यावर पूर्ण कृपा कर. माझे सकल मनोरथ पूर्ण कर.

इति श्रीशंकराचार्यविरचितं महिषासुरमर्दिनिस्तोत्रं संपूर्णम् ।

